ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीची ग्रंथमाला.
ग्रंथ ५२ वा.

# बृहद्योग वासिष्ठसार.

## भाग ३ रा.

( निर्वाणप्रकरण–पूर्वार्ध ).

सार लेखक
वे. शा. सं. विष्णु वामन बापट शास्त्री.

प्रकाशक
दामोदर सांवळाराम आणि मंडळी.
प्रिंटर्स, पब्लिशर्स आणि कमिशन-एजंट्स, ठाकुरद्वार–मुंबई.

हें पुस्तक रा. रा. दामोदर सांवळाराम यदे यांनीं नं. ४३४, ठाकुरद्वार रोड, मुंबई, येथें 'इंदुप्रकाश' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केले.

सन १९१२ इ०.

किंमत २॥ रुपये.

# प्रकाशकांचे दोन शब्द.



बृहद्योगवासिष्ठसार, या ग्रंथाचा हा तिसरा भाग आज वाचकांच्या सेवेत सादर करीत आहोत या तिसऱ्या भागात निर्वाण-प्रकरण पूर्ण करण्याचा आमचा विचार होता, परंतु एकंदर प्रकरणात हेच निर्वाण-प्रकरण फार महत्त्वाचे असल्यामुळे ते थोडे विस्तारपूर्वक लिहिणे भाग पडले, आणि त्यामुळे या प्रकरणाच्या पूर्वार्धाचीच पृष्ठ-संख्या ३२५ वर झाली उत्तरार्ध पूर्वार्धापेक्षा बराच मोठा असून त्याची पृष्ठसंख्या ५५० पेक्षाही अधिक होईल असा अंदाज आहे अशा परिस्थितीमुळे या महत्त्वाचे प्रकरणाचे दोन भाग करणे भाग पडले आहे

या ग्रंथाच्या पहिल्या भागाची पृष्ठसंख्या ४९६, दुसऱ्या भागाची पृष्ठसंख्या ३७४, आणि ह्या तिसऱ्या भागाची पृष्ठसंख्या ३२५ याप्रमाणे तीन भाग मिळून सुमारे १२०० पृष्ठे झाली आहेत आणि आणखी सुमारे ५५० होतील असा अंदाज आहे म्हणजे चारही भाग मिळून सुमारे १८०० पृष्ठे होतील असा अंदाज आहे

पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणे चवथे भागाचे शेवटी लेखक वे० शा० सं० विष्णुशास्त्री बापट हे दोन परिशिष्टे जोडून त्यातील एकात या विस्तृत ग्रंथाचा मथितार्थ आणि दुसऱ्यात कठिण पारिभाषिक शब्दाचा अक्षरानुक्रमाने स्पष्टार्थ देणार आहेत साराश निवळ मराठी वाचकास हा महत्त्वाचा ग्रंथ सुलभ रीतीनें थोडक्यांत चांगला समजावा, अशा दिशेने चालविलेला हा प्रयत्न आमचे प्रिय वाचक गोड करून घेतील अशी आम्हास आशा आहे.

या ग्रंथाचा चवथा भाग हल्ली छापण्याचे काम चालू आहे, व सरासरी तीन महिन्याचे अवकाशात तो भाग पूर्ण होऊन वाचकाचे हाती पडेल, असा अंदाज आहे ह्या चवथ्या भागात निर्वाण-प्रकरणाचा उत्तरार्ध पूर्ण येऊन, ग्रंथ समाप्त होणार आहे. शेवटीं वर लिहिल्याप्रमाणे दोन परिशिष्टेही देण्यात येणार आहेत वाचकास आपल्या इच्छेप्रमाणे चारी भाग एकत्र बाधता यावेत म्हणून प्रत्येक भागाचा पृष्ठा-नुक्रम वेगवेगळा न ठेवता पूर्वीच्यास जोडून पुढचा ठेवला आहे हा क्रमही वाचकांस पसंत पडेल अशी उमेद आहे

**प्रकाशक.**

# विषयानुक्रमणिका.

## ६ निर्वाणप्रकरण-पूर्वार्ध. ८७१—११८७

| सर्ग. | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|

॥ श्रीः ॥

# अथ षष्ठं निर्वाणप्रकरणम् ।

## ( पूर्वार्ध )

**सर्ग १**—निर्वाणप्रकरणास आरंभ, सायकालसूचक वाद्यध्वनि, सभाविसर्जन, आह्निकानुष्ठान.

श्रीवाल्मीकि—'रामा, उपशमप्रकरणानंतर आतां हें निर्वाणप्रकरण ऐक. याचें श्रवण केल्यास हें निर्वाण देतें.' असें मुनिनायकानें राजपुत्राला सांगितलें असतां तो योग्य श्रोता श्रवणैकरस होऊन व मौन धरून बसला. सभेंतील इतर लोक वसिष्ठांची वाणी व तिचा अर्थ यांकडेच सर्व लक्ष्य लावून चित्राप्रमाणें निश्चल राहिले. विश्वामित्रादि मुनीही मोठ्या आदरानें वसिष्ठांचें म्हणणें ऐकावयास सज्ज झाले. पतिव्रता स्त्रिया जाळीच्या पडद्यांतून मोठ्या विस्मयानें मुनीकडे पहात होत्या. भगवान् सूर्यही पश्चिम खगोलार्धांतून मुनीकडे आपलें तोंड फिरवून जणुं काय त्याचें उपदेशामृत प्राशन करण्यासाठींच आकाशाच्या चवथ्या प्रदेशीं क्षणभर स्थित झाला. थोडासा ज्ञानोदय झाल्याप्रमाणें तो त्यावेळीं बराच सौम्य झाला होता. सुगंध वाहणारा वायु श्रवणाकरितांच जणुं काय शांत व शब्दरहित बनला. सर्व ज्ञेयतत्त्व कळल्यामुळें एकाग्र मनानें ध्यान करीत असल्याप्रमाणेंच भ्रमरांच्या पंक्ती पुष्पांच्या माळावर स्वस्थपणें झोंप घेत राहिल्या. पिंजऱ्यांतील पक्षी सर्व हालचाल बंद करून वेदान्तश्रवणानें प्राप्त झालेल्या अविक्षिप्त चित्ताचें जणुं काय द्योतनच करीत होते. खिडक्यांतून आंत आलेलीं सूर्यकिरणें विवेकी जनांच्या दीर्घदर्शित्वाचें अनुकरण करीतचशीं लांबवर पसरलीं होतीं.

पण इतक्यांत चवथा प्रहर लागला, असें सुचविणारा—नगारे, शंख इत्यादिकांचा—ध्वनि झाला. त्यानें सर्व दिशा दुमदुमून सोडल्या. त्यामुळें मुनीचा उंच स्वरही कोणाला ऐकूं जाईनासा झाला. सर्व लोकांची मोठी गडबड उडाली. पिंजऱ्यांतील पक्षी भीतीनें पंख फडफडावूं लागले. लहान मुलें आपापल्या आयांना घट्ट मिठ्या मारून बसलीं, व फुलांतील रसाचा

स्वाद घेणारे भ्रमरही भिऊन इतस्ततः उडू लागले. याप्रमाणें दशरथाच्या सभेमध्यें मोठा क्षोभ उत्पन्न करून, दिवस परिणत ( पक्व, वृद्ध ) झाला आहे, असें सुचविणारा तो वाद्यध्वनि शान्त झाला असतां आरंभलेल्या मधुर वचनाचा उपसंहार करणारा मुनिश्रेष्ठ सभेमध्यें रघूत्तमास म्हणाला, " हा निष्पाप रामा, मी हें वाग्जाल पसरलें आहे. त्याच्या योगानें चित्तरूपी पक्ष्याला बांधून व त्याचा हृदयांतल्या हृदयांत निरोध करून, त्याला आत्मरूप बनीव. माझ्या या भाषणांतील दुर्बोध व क्षय पावणारा अर्थ सोडून सुबोध व अक्षय्य अर्थ, हंसक्षीर न्यायानें, तूं घेतला आहेस काय ? त्याचा संग्रह तूं आपल्या मनात केला आहेस काय ? आपल्या बुद्धीनेंच वारवार या सर्व गोष्टींचा पूर्णपणें विचार करून हा साधो, तूं आतां याच मार्गानें जावेस. रामा, मीं सांगितलेल्या बुद्धीनेंच तूं विहार करीत राहिलास म्हणजे बद्ध होणार नाहींस. पण मी सांगतलेला उपाय ध्यानांत धरून त्याप्रमाणें तूं जर न वागलास तर एकादा गज जसा विंध्यारण्यांतील खोल खोऱ्यांत पडावा, त्याप्रमाणें तू अधोगतीस लागशील. रात्रीं दीप न घेतां जाणाऱ्या डोळस मनुष्याप्रमाणें किंवा आंधळ्याप्रमाणें अनर्थरूपी खळग्यांत पडशील; मी सांगितलेला अर्थ सिद्ध व्हावा म्हणून तूं प्राप्त व्यवहार असंगबुद्धीनें कर. कारण हाच सर्व शास्त्रांचा सिद्धान्त आहे. यास्तव तो मनात धरून तूं अपरिच्छिन्न आत्मबोधवान् हो.

अहो सभ्य जनहो, महाराज दशरथा, रामा, लक्ष्मणा, आतां आज तुम्हीं अगोदर आपापला आह्निक व्यापार करा. कारण हा दिवस बहुतेक संपलाच आहे. अजून आपल्याला बराच विचार करावयाचा आहे. पण तो उद्या सकाळीं येथें येऊन करूं. "

**श्रीवाल्मीकि**—मुनीनें असें सांगितलें असतां, सर्व सभाजन फुललेल्या कमलांप्रमाणें विकसित मुखानें युक्त होऊन उठले. राजे महाराजाला नमस्कार करून व राम, लक्ष्मण आणि वसिष्ठ यांची स्तुति करून आपल्या निवासस्थानीं गेले. नभश्चर मुनींनीं ज्याला नमस्कार केला आहे, असा श्रीमान् वसिष्ठ विश्वामित्रासह आश्रमास जाण्याच्या इच्छेनें आसनावरून उठला. ऋषि, मुनि व दशरथप्रभृति राजे वक्त्या मुनीच्या

मागोमाग बराच वेळ चालून व शेवटीं त्याचा निरोप घेऊन कांहीं आकाशांत, कांहीं वनांत व कांहीं आपापल्या उत्तम गृहाकडे जावयास निघाले. कमलांवरून उठलेल्या भ्रमरांप्रमाणें ते सर्व आपल्या अनुरूप निवासस्थानीं जावयास निघाले. ज्याच्या मागोमाग स्त्रियाही येत आहेत, असा स्वतः महाराजा दशरथ वसिष्ठाच्या पायांवर स्वच्छ पुष्पांची अंजलि समर्पण करून आपल्या अंतःपुरांत गेला. राम, लक्ष्मण व शत्रुघ्न मात्र गुरूबरोबर आश्रमापर्यंत आले व तेथें मोठया भक्तीनें गुरूंच्या पायांचें अर्चन करून राजगृहीं यावयास निघाले.

सर्व श्रोते आपापल्या गृहीं जाऊन स्नान, पूजन, इत्यादि करिते झाले. त्यांनीं देव व पितर यांचा सत्कार केला. अतिथींना भोजन घातलें. भृत्यांपर्यंत सर्वांस अन्नादि देऊन ब्राह्मणादिकांनीं वर्णधर्मोक्त रीतीनें भोजन केलें. इतक्यांत दिवसकर्मासह दिनकर अस्त पावून रात्रिकर्मासह रात्रिकर उदय पावला. खुतनीच्या शय्यांवर व आसनांवर बसून भूचर राजे, राजपुत्र, मुनि व ऋषि एकाग्र मनानें वसिष्ठानीं सांगितलेल्या संसारोत्तरणाच्या उपायाचें चिंतन यथावत् करू लागले. कांहीं वेळ चिंतन केल्यावर त्यांना झोंप लागली. राम, लक्ष्मण व शत्रुघ्न यांना मात्र पुष्कळ वेळ झोंप आली नाहीं. ते तीन प्रहर वसिष्ठांच्या उपदेशांचें चिंतन करीत होते; व शेवटीं अर्धा तास काय ती त्यांना झोंप मिळाली. पण सबीज (शबल) आत्मभावास सुद्धा थोडावेळ प्राप्त झाल्यानें पुष्कळ श्रमांचें निरसन होत असतें; या नियमास अनुसरून ते राजपुत्र थोड्याशा निद्रासुखाच्या अनुभवानें श्रमशून्य झाले, व ब्राह्ममुहूर्तावर उठून पुनः दिनकृत्यें करूं लागले. याप्रमाणें ती त्रिमाया संपून शुभ मनानें युक्त, असलेल्या विवेकी व उदाराशय श्रोत्याची श्रवणास जाण्याची वेळ जवळ आली.

**सर्ग २**—रामादिकांनी वसिष्ठास सभेंत आणलें. उक्तार्थस्मरण, व तत्त्वांमध्यें विश्रांति.

**श्रीवाल्मीकि**—विवेक उत्पन्न झाला असतां वासना जशी क्षीण होते, त्याप्रमाणें अरुणोदय होतांच रात्र संपली. त्या वेळीं पूर्वेचें मुख उत्तरोत्तर अधिक उज्ज्वल व पश्चिमेचें मुख अधिक म्लान होत चाललें. राम लक्ष्मण व शत्रुघ्न अनुचरांसह उठून, संध्योपासना करून पुण्यकारक वासिष्ठा-

श्रमास गेले. तेथें त्यांनीं संध्या करून बाहेर आलेल्या गुरूच्या चरणांवर अर्घ्य देऊन मस्तकें ठेविलीं. थोड्याच वेळांत तें मुनीचें सदन मुनि, ब्राह्मण, राजे, अश्व, गज, रथ, इत्यादिकांच्या योगानें भरून गेलें. तेव्हां बोलावण्यास आलेल्या त्याच सर्व परिवारासह वसिष्ठ मुनि दशरथाच्या सभेंत गेला. तेथें संध्यादि विधि करून पूर्वींच आलेल्या राजानें मुनीची आदरानें पूजा केली. नंतर पुष्पादिकाच्या योगानें अधिक भूषित केलेल्या सभेंत प्रवेश करून सर्व श्रोते स्व-स्व-स्थानीं बसले. आदल्या दिवसाप्रमाणेंच तें सर्व मंदिर गच्च भरून गेलें असतां, भाटादि राजभृत्य स्तुतिपाठ करून गप्प बसले असतां, व सर्वत्र शान्तता पसरली असतां स्वामिकुमार शंकराच्या, कच देवगुरूच्या, प्रल्हाद शुक्राच्या अथवा गरुड भगवान् विष्णूच्या तोंडाकडे जसा पाहतो, त्याप्रमाणें रामानें हळूच आपली दृष्टि वसिष्ठाच्या मुखाकडे लाविली. तेव्हा त्याचा आशय जाणून मुनीनें पूर्व क्रमानेंच भाषण करण्यास आरंभ केला.

**श्रीवसिष्ठ**—रघुनंदना, मी काल काय सांगितलें, तें तुला आठवतें आहे ना? आता आणखी पूर्वोक्त बोधच दृढ होण्यासाठीं व त्याच्या योगानें शाश्वत पदाची सिद्धि होण्यासाठीं मी सांगतों तें ऐक. वैराग्य, अभ्यास व तत्त्वावबोध यांच्या योगानें संसाराचें उल्लंघन करिता येतें, यास्तव तूं त्या तीन उपायाचाच अभ्यास कर. यथार्थ तत्त्वबोधानें दुर्बोध क्षीण होऊन वासनावेश गलित झाला म्हणजे विशोकपद प्राप्त होतें. देश, काल व वस्तु यांच्या योगानें होणाऱ्या परिच्छेदानें रहित असलेलें एक ब्रह्मच केवळ त्याच्या अज्ञानामुळें द्वित्वभावास प्राप्त झालें आहे. द्वैत म्हणजेच जगत् व एकत्व म्हणजेच ब्रह्म आहे. पण सर्व भावांनीं मर्यादित न होणारें शांत व सर्वत्र समान सत्तेनें युक्त असणारें ब्रह्मच जर एक आहे, तर जगद्रूप अन्यत्व कसें येणार? असा विचार करून व अहं ही भ्रांतील स्फूर्ति सोडून तूं शरीराध्यासरहित, महान्, एकरूप, प्रशान्तात्मा व साक्षात् स्वात्मसुखरूप हो. वस्तुतः चित्त नाहीं, अविद्या नाहीं, मन नाहीं, व जीवही नाहीं; तर या सर्व ब्रह्माच्या सत्तेनें झालेल्या आपल्याच कल्पना आहेत. भोग्यपदार्थ, भोगवृत्ति, चिदाभास, भोगां-विषयींच्या स्पृहा, इत्यादि जें जें कांहीं आहे, तें तें सर्व आदि—अंतरहित

ब्रह्मच आहे. पाताळ, भूतल, स्वर्ग, तृण, प्राणि, अंतरिक्ष इत्यादि वस्तूंमध्यें चैतन्यरूपानें तें परब्रह्मच आहे. दुसरें कांहीं नाहीं. उपेक्ष्य ( उपेक्षेस पात्र असलेले पदार्थ ) हेय ( त्याज्य ) व बधु, वैभव, शरीर इत्यादि ग्राह्य पदार्थांच्या रूपानेंही तें ब्रह्मच पसरलेलें आहे. जोंपर्यंत अज्ञानकलना आहे व जगज्जालाविषयीं आस्था आहे, ब्रह्मभावना झालेली नाहीं, तोंपर्यंत चित्तरूपी सर्पाची कल्पना होणारच. हा माझा आहे, अशी देहावर जोंवर आस्था आहे, तोंवर चित्तभ्रम रहाणारच. सज्जनांच्या संगतीनें जोंपर्यंत पूर्णता आलेली नाहीं व मौर्ख्य क्षीण झालेलें नाहीं, तोंवर चित्तादिप्रयुक्त नीचता अवश्य असणारच. हृदयांत आशा असेपर्यंत विचाराला थारा मिळत नाहीं. भोगांविषयींची अनास्था व मनाचें शीतलत्व याच्या योगानें आशापाशजाल तुटलें, कीं चित्तविभ्रम क्षीण होतो. अनास्थेनें चित्तभूमीचा त्याग केला, म्हणजेच ती प्रबोधफलवती होते. आपला हा देह परमार्थाच्या निरुपयोगी, आत्म्याहून अत्यंत भिन्न व मिथ्या आहे, असें जाणल्यावर चित्तभूमि कोठली रहाणार. श्रवणादिकांच्या योगानें साक्षात् आत्मज्ञान झाल्यावर जगाचा आत्म्यामध्येंच लय होतो, व त्यानंतर जीवादि विभ्रमही क्षीण होतो. परावरदर्शी जीवन्मुक्त महात्म्यांची जी चित्तपदवी, तिला सत्व असें म्हणतात. जीवन्मुक्ताच्या शरीरांत पूर्व परिचयामुळे व्यवहार करणारी वासना सत्त्व या नांवानें प्रख्यात आहे. तिला चित्त असें म्हणत नाहींत. चित्तरहित तत्त्वज्ञ नित्य समपदामध्यें स्थित होऊन या लोकीं लीलेनें भ्रमण करीत असतात. शान्त, जितेंद्रिय व सत्त्वस्थ पुरुष व्यवहार करीत असले तरी नित्य त्या ज्योतीला पहात असतात. अंतर्मुख होऊन चैतन्याग्नीमध्यें जगत्—तृणाला जाळणारे मुनि, आतल्या आत शान्त असतात. त्यांचे चित्तादि विभ्रम जातात. विवेकानें विशद झालेल्या चित्तालाच सत्त्व म्हणतात. दग्ध बीजापासून जसा अंकुर उद्भवत नाहीं, त्याप्रमाणें सत्त्व संज्ञक चित्तापासून मोह होत नाहीं. विमूढ जनाच्या हृदयांत चित्त असतें, म्हणून तें त्यांना पुनर्जन्मास पात्र करतें; पण ज्ञानी पुरुषाच्या हृदयांतील चित्त, बोधसामर्थ्यानें चित्त हें नांव सोडून कांहीं विलक्षण होतें. रामा, तुला जें प्राप्य होतें तें प्राप्त झालें आहे, त्यामुळें सत्त्वभावास प्राप्त झालेलें तुझें चित्त ज्ञानाग्नीनें

दग्ध होऊन गेलें आहे. आतां तें पुनः अंकुर उत्पन्न करणार नाहीं. कुऱ्हाडीनें तोडलेलें अथवा अग्नीनें जाळलेलें काष्ठ—तृणादि ज्याप्रमाणें भूमींतील बीजभावापासून पुनः उद्भवतें, त्याप्रमाणें पुत्र, वित्त व उत्तम लोक यां विषयींच्या एषणांनीं (इच्छांनीं) व्याप्त झालेलें चित्त पुनः संसाराकुरानें विकास पावतें. प्रबोधानें विशद (शुद्ध झालेले मन) तसें विकास पावत नाहीं. जग ब्रह्मापासूनच मोहामुळें आरोपित रूपानें वृद्धि पावलें आहे. यास्तव ब्रह्मज्ञान झालें म्हणजे तें ब्रह्माकारच होतें. कारण जगत् व ब्रह्म हा भेद केवळ अज्ञानानें झालेला आहे. यास्तव अज्ञान नाश पावलें म्हणजे तोही मिटतो. मिरचींतील तिखटपणाप्रमाणें त्रिभुवनांत चित् व्यापून राहिली आहे. यास्तव वस्तुतः चित् व जगत् भिन्न नाहीं. सत् व असत् ही कल्पना व्यर्थ केली जाते. शास्त्र व लोक—व्यवहारात सत् व असत् या शब्दांचा उपयोग केला जातो. पण ते दोन्ही शब्द अविद्याकृत कल्पित भेदाला उद्देशून योजलेले असल्यामुळें वस्तुतः मिथ्या आहेत. यास्तव त्यांविषयींची कल्पना सोड, व केवल चैतन्याचें अनुसंधान कर. सर्व चिन्मय आहे; अशी दृढ भावना ठेव. म्हणजे तुला अचिन्मयाचा अनुभवच येईनासा होईल. तूं निरंश व परावरशून्य चिदात्मा आहेस. आपल्या अपरिच्छिन्न स्वरूपाचें स्मरण कर. अस्मरणानें मर्यादित होऊं नकोस. तूं शान्त ब्रह्मरूप आहेस. यास्तव स्वस्थ हो. चित्तमर्कटाच्या विविध लीला नुस्त्या पहात रहा. म्हणजे सर्व जगाला जिंकणारा तूं सर्वांस पूज्य होशील २.

**सर्ग ३**—ब्रह्मादिकांच्या ऐक्य दृष्टीनें द्वैतभ्रमशांति व पूर्णस्थिति.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, पुढें होणाऱ्या अनेक तरंगांचा आधार जसें शान्त सागरांतील जल, त्याप्रमाणें अनंत भावी जगांना वाहणारी जी चिति तीच तूं आहेस. हे चिदात्मन्, तूं आतां संसाराविषयींच्या भावनेनें शून्य व भाव—अभावरहित झाला आहेस. तेव्हां आतां तुझ्या वासना वगैरे कोठें आहेत त्या सांग पाहूं ? जीव, वासना इत्यादि सर्व चित्—पासूनच कल्पनेनें होतें, व तिच्यामध्येंच कल्पनेच्या अभावीं लीन होतें. तेव्हां आतां अचित् वस्तूचा वाचक शब्द व त्याचा अर्थ म्हणजे स्वतः अचित् वस्तु यांना अवसर आहे कोठें ? तूं रामसंज्ञक सम व सौम्य चित्सागर आहेस. ज्याप्रमाणें अग्नीहून औष्ण्य, कमलाहून सौगंध्य, कज्जलाहून काळेपणा,

बर्फाहून शुभ्रत्व, व उंसाहून माधुर्य भिन्न नाहीं, त्याप्रमाणें चितीहून अनुभूति पृथक् नाहीं. जल व तरंग यांमध्यें जसा भेद नाहीं, त्याप्रमाणें चित्स्वभाव व जगत् यांचा अभेद आहे. अनुभव चैतन्याहून भिन्न नाहीं. मी अनुभवाहून भिन्न नाहीं; मजहून जीव भिन्न नाहीं; जीवाहून मन पृथक् नाहीं; मनाहून इंद्रियें पृथक् नाहींत; इंद्रियांहून देह निराळा नाहीं; शरीराहून जगत् निराळें नाहीं, आणि जगाच्या पलीकडे तर दुसरें कांहींएक नाहीं. कारण ही चैतन्याच्या विकाराची सीमा आहे. अशा प्रकारचें हें मोठें चक्र फार दिवसांपासून चाललें आहे. चैतन्यानेंच स्वरूपमोहामुळें अध्यासपरंपरेनें या चक्राला प्रवृत्त केलें आहे. पण परमार्थदृष्टीनें पाहिल्यास यांतील कांहीं प्रवृत्त झालेलें नाहीं. मूळ ब्रह्मचैतन्य शून्यामध्यें शून्य, फार मोठ्यांमध्यें मोठें, सत्यामध्यें सत्य व पूर्णामध्ये पूर्ण होऊन राहिलें आहे ज्ञानी महात्मा विषयदर्शन व संकल्प करीत असला, तरी त्याची त्याविषयीं उपादेय बुद्धि नसल्यामुळें वस्तुतः कांहीं करीत नाहीं. कर्तृता हा धर्म अज्ञाचाच आहे. विषय ग्राह्य आहेत, इष्ट आहेत, अशा समजुतीनें त्यांचें ग्रहण केलें म्हणजे तें ग्रहणच सुख व दुःख यांना कारण होतें. पण भाव–पदार्थ–रूपानें भासणारें हें सर्व मिथ्या आहे, असें समजलें म्हणजे त्याच्याविषयींची ग्राह्यता बुद्धि नष्ट होते; व ती नष्ट झाली म्हणजे सुख–दुःखाचें निमित्त रहात नाहीं. या सृष्टीमध्यें अनेक विचित्र पदार्थ प्रतिक्षणीं अनुभवास येत असतात; पण त्याच्या तत्त्वाविषयीं निश्चय करूं लागलें कीं, मति कुंठित होऊन जाते. त्यामुळें जगातील पदार्थ जागरावस्थेंत सार्थक आहेत, त्यांचा अतिशय उपयोग आहे, असें जरी अनेक विचारवानानांही वाटत असलें, तरी ते निरर्थक व अनर्थकरच होत. यास्तव राघवा, तूं शांत आकाशाप्रमाणें निर्मल राहून, बाहेर उचित व्यवहार कर. हर्ष–क्रोध इत्यादि विकारांचीं निमित्तें झालीं तरी काष्ठ किंवा लोष्ट ( ढेकूळ ) याप्रमाणें सम रहा. जो आपल्याशीं अतिशय शत्रुत्व करून आपल्याला सत्वर मारावयास तयार झालेला असतो, त्यालाच जो अकृत्रिम मित्र समजतो, तो खरा तत्त्वदर्शी होय. नदी आपल्या तीरावरील वृक्षांना जशी समूळ उपटून काढते, त्याप्रमाणें प्रेम, द्वेष इत्यादिकांना जो

समूल नाहींसें करून सोडतो, तो हर्ष, क्रोध इत्यादि दोषांचाही हंता होतो. राग व द्वेष यांचें तत्त्व काय आहे, तें विचारानें समजून घेतलें पाहिजे. कारण त्यावाचून त्यांचा समूल उच्छेद होणें शक्य नाहीं. यास्तव त्यांचें स्वरूप न जाणणारे कांहीं संत स्वभावतःच रागद्वेषशून्य जरी असले, तरी ते असंतच होत. त्यांचें सेवन करणेंही व्यर्थ आहे. कारण स्वभावतःच रागद्वेषभावना नसणें हें निराळें, व रागद्वेषाचीं निमित्तें झालीं तरी त्यांचें स्वरूप ओळखून त्यांचा उद्भव प्रयत्नपूर्वक न होऊ देणें हें निराळें. अहंकार हेंच त्या दोन महादोषांचें बीज आहे. तेंच त्यांचें तत्त्व आहे. यास्तव अहंकार सोडला म्हणजे अबुद्धिपुरःसर घडलेल्या शुभाशुभ कर्मांच्या योगानें बुद्धि लिप्त होत नाहीं; आणि बुद्धिलेपाच्या अभावीं प्राण्यानें लोकतः अनिष्ट वाटणारीं कर्मे कितीही जरी केलीं, तरी तो त्यामुळें बद्ध होत नाहीं.

अहंकाराचें तत्त्व आहे अज्ञान, व त्याची निवृत्ति केवळ आत्मज्ञानानेंच होणें शक्य आहे. जें वस्तुतः नाहीं तें आहे असें भासविणें, हीच माया अथवा भावरूप अज्ञान आहे. ज्याच्या अंतःकरणांतील वासनाभर तैलरहित दीपाप्रमाणें शांत झालेला असतो, त्या विकाररहित ज्ञानी पुरुषानें जिंकलें आहे. पण चित्रांतील एका राजानें दुसऱ्या राजाचा शिरश्छेद केला आहे असें पाहून, त्याचा जसा मिथ्या विजय भासतो, तसाच हा त्या वासनारहित पुरुषाचा विजय मिथ्या आहे. कारण वासनासारख्या निस्तत्त्व वस्तूंचा निरास होणें किंवा करणें, यांत खरा पुरुषार्थ कांहींच नाहीं. सारांश ज्या श्रेष्ठ पुरुषाला सर्व अनुकूल व प्रतिकूल अवस्थामध्यें कोणताही पदार्थ ग्राह्य वाटत नाहीं, तर एक तर ते सर्व मिथ्या आहेत असें वाटतें, अथवा आत्मरूप आहेत असें भासतें, त्याला त्यांपासून सुखदुःख होत नाहीं. असला पुरुषच जिवंत असूनही मुक्त होय. ३.

**सर्ग ४—बाह्यदृष्टीचा निरास व आन्तरदृष्टीचें स्थिरीकरण.**

**श्रीवसिष्ठ**—हे निष्पाप रामा, मन, बुद्धि, अहंकार, इंद्रियें इत्यादि सर्व निर्विषय चिन्मय आहेत. तेव्हां आता तुझे जीवादिक कोठें राहिले ? एका महात्म्या आत्म्यानेंच आपल्या सत्तासंसर्ग-अध्यासानें या सर्वांना नानात्व दिलें आहे. भोगतृष्णारूपी विषाचा वेग शान्त झाला, की तत्काळ

अज्ञान अस्त पावतें. मनांत अध्यात्मशास्त्रमंत्राची सतत भावना केली, कीं तृष्णा महामारी शान्त होते. कारण अज्ञानाचा लय झाला, कीं चित्त लीन झालेंच म्हणून समज. शास्त्रविचारानें अज्ञानाचा क्षय होऊन चित्तही अचित्त झालें म्हणजे वासनाभ्रम क्षीण होतो. सारांश, रामा, सर्व वेदान्त-शास्त्ररहस्यभूत अशी ही प्रत्यक् दृष्टि आहे. पण जे कोणी ( बरेच ) लोक या शास्त्ररहस्याची उपेक्षा करून विपरीत अर्थ भासवितात, ते कृमि-कीट इत्यादि होण्यास योग्य असें पाप करितात. रामा, तूं भावाभावरहित होऊन अति विस्तृत पदामध्यें स्थिरतेस प्राप्त झाला आहेस. माझा उपदेश व्यर्थ झालेला नसून त्याच्या योगानें तुला बोध झाला आहे, असें मला तुझ्या चर्येवरून वाटतें. रामा, कुलगुरूचे शब्द सामान्य जनाच्या हृदयालाही जर पटतात, तर ते तुझ्या सारख्या अति उदारमति राजपुत्राच्या मनावर परि-णाम का करणार नाहींत? मी आप्त आहें; मी तुझ्याशीं प्रतारणा कर-ण्याकरितां कांहीं सागणार नाहीं; असा मजविषयीं तुझा दृढ विश्वास असल्यामुळें, माझा उपदेश, तापलेल्या शेतांत पडलेल्या पाण्याप्रमाणें, तुझ्या हृदयात एकदम शिरत आहे. हे महाशया, आम्ही तुम्हां रघूद्वहांचे कुलगुरु आहों, यास्तव आमचें हें उपदिष्ट वचन तूं सत्वर, हाराप्रमाणें हृदयप्रदेशीं धारण कर ४.

सर्ग ५—ज्ञानी रामाचा स्वानुभव.

**श्रीराम**—गुरुवर्य, आपल्या वाक्यार्थाची भावना केल्यानें मी चित्-रूपतेस प्राप्त झालों आहें. आंतल्याआंत मला परमशांति प्राप्त झाली आहे. ग्रीष्म ऋतूंत अतिशय संतप्त झालेल्या भूमीवर जलवृष्टि झाली असतां ती जशी शान्त होते, त्याप्रमाणें अनेक विक्षेपांमुळें संतप्त झालेल्या चित्तावर ज्ञानरसाचा सेक झाल्याकारणानें तें आता अतिशय शांत झालें आहे. मी शीतलाकार व शांत आहें. मी केवळ सुखानें रहात आहें. ज्यामध्यें मत्त गज शिरून क्षोभ उत्पन्न करीत नाहीं, अशा सरोवराप्रमाणें मी प्रसादगुणाचा अनुभव घेत आहें. मुने, आतां मला सर्व दिङ्मंडल प्रसन्न दिसत आहे. माझे सर्व संदेह शांत झाले आहेत. माझी आशा-रूपी मृगतृष्णिका शात झाली आहे. विषयासक्ति व तिच्या विरोधी विरक्ति, या दोघींनींही मला सोडलें आहे. फार काय, पण मी दुसऱ्याही

सर्व परस्पर विरोधिवृत्तींनीं रहित झालों आहें. त्यामुळें मी शरत्कालच्या अरण्याप्रमाणें शीतल झालों आहें. हे नाथ, ज्याच्यापुढें अमृतरसाचा आस्वादही तृणासारखा उपेक्ष्य वाटतो, तो अतरहित आनंद मला लाधला आहे. मी आतां आपल्या पारमार्थिक स्वरूपांत स्थित आहें. मी स्वस्थ व मुदित झालों आहें. सर्व लोक ज्या सुखामध्यें विश्रांति घेतात, तें सुख मी आहें. अशा आनंदरूप मला व तुज देशिकालाही नमस्कार असो. माझे मागचे ते सर्व संशय व त्या सर्व कल्पना अकस्मात् अस्त पावल्या आहेत. अज्ञानरात्रीं भासणारा संसारवेताळ ज्ञानप्रभात होतांच कोठें गुप्त झाला आहे. माझें मन शरत्कालीन महा सरोवराप्रमाणें, अगदीं विक्षेपशून्य झालें आहे. चिद्रूप आत्म्याला अज्ञानादिकलंक कसा व कोणत्या निमित्तानें लागला; तो स्वप्रकाश आत्म्याच्या ठिकाणीं कसा रहातो; असंग व अपरिच्छिन्न अशा त्याला तो कसा आच्छादित करतो. कूटस्थाला संसारसंबंधीं विकाराचा अनुभव कसा येतो ? इत्यादि अनेक संशय आजवर मला फार त्रास देत होते; पण आतां त्यांचें मूल अज्ञानच नष्ट झाल्याकारणानें ते सर्व निर्मूल झाले आहेत. सर्व, सर्वत्र व सर्वदा स्फुरदाकार (स्फुरण, ज्ञान हाच ज्याचा आकार आहे) आत्माच आहे. मी सकल कसा आहें, मी पूर्ण कसा आहें, मी एकच कसा आहें, हें मला आतां समजलें. आपल्या वागमृताच्या पुरांत स्नान केल्यानें मी आतां तृप्त झालों आहें. त्यामुळें मागच्या गोष्टींचें स्मरण झालें. मी मिथ्या अहंकारादि कसे करीत होतों, तें आठवलें व तृष्णेनें मला कसें जखडून सोडलें होतें त्याची स्मृति झाली, म्हणजे माझें मला हसूं येतें. अहाहा, मी किती विस्तृत व पावन भूमीवर आरूढ झालों आहें; मज आत्म्याला सर्वथा नमस्कार असो. हाच एक वंद्य देव आहे. हे नाथ, लौकिकदृष्ट्या मजवर तुमचे अनंत उपकार झाले आहेत. मधुलोलुप भ्रमर जसे कमलाची संगति करितात, त्याप्रमाणें मीं नम्रभावानें तुमची संगति धरली व तुमचें श्रेष्ठ वचन लक्ष्यपूर्वक ऐकिलें, त्यामुळें मलाही शोकरहित व चिरकाल आनंददायी दशा प्राप्त झाली आहे. ५.

**सर्ग ६—देह व आत्मा यांचा विवेक. देहच आत्मा असें जाणल्यानें दुःख. स्त्रीसंगानें मूढांची मोहवृद्धि.**

श्रीवसिष्ठ—रामा, माझें भाषण ऐकून तुला मोठा आनंद होत असतो, म्हणून तुझ्या हिताच्या इच्छेनें मी आणखी कांहीं सांगतों, तें ऐक. बुद्धीचा विकास होण्यासाठीं, जगांत भासणारा भेद सत्य आहे, असें समजूनही दुःखिता कशी नसते, तें ऐक.

ज्या अज्ञाची, देहच आत्मा आहे अशी भावना असते, त्याला त्याचीं इंद्रियें, आम्हांला आत्मा न मानतां हा या देहाला आत्मा समजतो काय ? असें म्हणून जणुं काय मत्सरानेंच त्याला छळतात. पण ज्या ज्ञानी पुरुषाची स्थिति सत्य चैतन्य–आत्म्यामध्यें असते, त्याच्यावर जणुं काय प्रसन्न होऊनच इंद्रियरूपी मित्र त्याच्याशीं द्वेष किंवा विरोध करीत नाहींत. अहो, व्यवहार करणाऱ्या ज्या पुरुषाला विषय, दोषरहित व ग्राह्य वाटतच नाहींत, उलट ते सर्व निंद्य आहेत, असेंच सतत निश्चयानें वाटत असतें, तो देहदुःखाकरितां देहाचें आत्मत्वानें ग्रहण कां करील ? देहच आत्मा आहे, असें समजण्याचें त्याला कारणच नाहीं. शरीर व आत्मा यांचा कांहीं संबंध नाहीं. प्रकाश व अंधकार यांप्रमाणें ते दोघे परस्पर विरुद्ध आहेत. आत्मा उत्पत्ति, स्थिति इत्यादि सर्व भावविकारांनीं रहित आहे, तो निर्लेप आहे, तो भगवान् उदय पावत नाहीं व अस्त पावत नाहीं, तर नित्य उदित ( उदय पावलेलाच ) आहे. यास्तव जड, अज्ञ, तुच्छ, कृतघ्न व विनाशी अशा शरीररूपी पाषाणाचें जें व्हावयाचें असेल तें होवो. ( अर्थात् चित् व जड याचा अत्यंत विरोध असल्यामुळें एक आधार व दुसरा आधेय, हा संबंधही त्याच्यामध्यें नसतो. मग वस्त्र व त्याचें रूप यांच्याप्रमाणें त्याचें तादात्म्य कोठून असणार? त्याचप्रमाणें एक निर्विकार व दुसरा सविकार असल्यामुळेंही त्यांचें तादात्म्य होऊं शकत नाहीं. आता चिन्मयत्व हा देहाचा धर्म आहे, असें समजावें; म्हणजे धर्म-धर्मिरूपानें त्याचें तादात्म्य होऊं शकेल, म्हणून म्हणावें तर तेंही जमत नाहीं. कारण ) चित्स्वरूप जडाहून अगदीं पृथक् आहे, असें अगोदर समजल्यावाचून तें देहाचें आहे, कीं आणखी कोणाचें आहे, याचा निश्चय करतां येणें शक्य नाहीं. पण त्याचा परिचय झाला, कीं जडता देहाच्या ठिकाणीं रहाते आणि मग तिच्या विरुद्ध असलेल्या चिन्मयत्वाला देहामध्यें धर्मरूपानें राहण्यास अवकाशच मिळत नाहीं.

आता कदाचित् तूं म्हणशील, कीं आत्म्याच्या मानसदुःखानें देह कृश होतो व देहाला ताडनादि केलें असतां आत्म्याला दुःख होतें, असें आपण पाहतों. तेव्हां त्या दोघांचें सुखदुःख समान असल्यामुळें, तादात्म्य आहे असें समजण्यास काय हरकत आहे? पण तें बरोबर नाहीं; कारण तापवून लाल केलेल्या लोखंडांतील अग्नि व खतः लोखड यांच्या ऐक्याप्रमाणें आत्मा व देह यांच्या ऐक्याध्यासामुळें परस्परांचे धर्म परस्परांचे ठिकाणीं जरी भासत असले, तरी विवेकानें त्या दोघाना पृथक् केलें असतां ते तसे कधीं भासत नाहींत. तेव्हां त्यांची समानसुखदुःखता सत्य आहे, असें कसें म्हणतां येईल? शिवाय असंग व परम सूक्ष्म अशा आत्म्याशीं स्थूल शरीराचा नुस्ता संगम होणेही दुर्लभ आहे. मग ऐक्याची तर गोष्ट दूर राहिली. दिन व रात्र याप्रमाणें एकाचा उदय झाला, कीं दुसऱ्याचा अस्त होत असल्यामुळें ज्ञान अज्ञान होऊं शकत नाहीं, व अज्ञान ज्ञान होत नाहीं. छाया व प्रकाश याचाही परस्पर तादात्म्यभाव होऊ शकत नाहीं, त्याचप्रमाणें जगांत अनेक विचित्र दृष्टि असल्या, तरी सद्ब्रह्म असद्देहादिरूप होणें शक्य नाहीं. जलांत असणाऱ्या कमलाला जलाचा जसा लेप लागत नाहीं, त्याप्रमाणें देहांत असलेल्या ब्रह्मालाही देहाचा थोडासा सुद्धां संश्लेष होत नाहीं. कारण ब्रह्म हें देहकल्पनेचें अधिष्ठान आहे. आणि अध्यस्ताच्या गुणदोषांनीं अधिष्ठान अणुमात्रही दूषित होत नाहीं, असा नियम व अनुभवही आहे. वायूच्या कंपादिकानें आकाश जसें कंपादियुक्त होत नाहीं, त्याप्रमाणें शरीरगत जरा, मरण, आपत्ति, सुख, दुःख, बंध, मोक्ष इत्यादिकांनीं आत्मा लिप्त होत नाहीं. यास्तव तूं अगदीं शान्त व सुखस्वरूप होऊन रहा. देहात्मभावामुळेंच जरा-मरणादि भाव ब्रह्मगत आहेत, असा भ्रम होतो.

अज्ञ लोक हा भेद जाणत नाहींत. त्यामुळें ते स्वतः चेतन असूनही देह-संसर्गानें अचेतन असल्यासारखे झाले आहेत. वृक्ष व अज्ञ यांच्यामध्यें स्थावर व जंगम यावांचून दुसरा भेद नाहीं. ते विषयलाभानेंच आपल्याला कृतार्थ समजतात. ते जडदेहाकार झाल्यामुळें जडरूप असले, तरी भोगांविषयींच्या अहंकारानें व त्यामुळें होणाऱ्या चेष्टेनें सचेतन असल्यासारखे भासतात. नद्यादिकांचे मोठाले ओघ अचेतन असले तरी गमनादि

चेष्टा करीत असतातच. त्याप्रमाणें हे दुर्बुद्धि सुद्धां गमनादि चेष्टा करितात. पण त्यावरून ते सचेतन आहेतच असें म्हणवत नाहीं. कारण जलादिकांप्रमाणें त्यांच्यामध्येंही आत्मा असतो, पण त्याचें ज्ञान नसल्यामुळें तो असूनही नसल्यासारखा होतो. आत्मचैतन्याच्या अबोधामुळेंच सर्व जीव कृपण ( दीन ) झाले आहेत. लोहाराच्या भात्यांतून निघणाऱ्या वायूप्रमाणें अज्ञाच्या नाकांतून निघणारी श्वासपरपरा केवळ त्यांच्या देहस्पंदाला कारण होते. त्यावाचून अन्य कांहीं कार्य करूं शकत नाहीं. धनुष्यापासून निघणाऱ्या टणत्कारादिकांप्रमाणें चैतन्यबोधरहित असलेल्या मूर्खापासून क्रोधाच्या गर्जना, कठोर वाक्यें, इत्यादि केवळ मरणाकरितांच निघालेलीं ऐकूं येतात. अरण्यांतील वृक्षांप्रमाणें त्यांनाही सुखादि फलभोग होतो, पण या गमनादि चिह्नावरून त्याचें चेतनत्व सिद्ध होत नाहीं.

असल्या दुर्जनांच्या आधारानें राहणें किंवा त्यांच्यावर विश्वास ठेवून बसणें, म्हणजे एकाद्या पाषाणावर बसणेंच आहे. त्यांच्याशीं संगम करणें म्हणजे जंगलांतील तोडलेल्या वृक्षाशीं संगम करणेंच आहे. त्यांच्याशीं कांहीं भलेपणाचें आचरण करणें म्हणजे काडीनें आकाशाला मारणेंच आहे. अनात्मज्ञ अधमाला कांहीं देणें हें चिखलात फेंकण्यासारखेंच आहे. त्यांच्याशीं संभाषण करणें व कुत्र्याला बोलावणें हीं दोन्हीं सारखींच. आम्ही अज्ञाची ही जी इतकी निंदा करीत आहों. ती अज्ञान त्याज्य आहे. त्याचा सर्वांनीं परिहार करावा, एवढ्यासाठीं दयेनें करीत आहों; त्याचा द्वेष करण्याकरितां नव्हे. अज्ञान ही सर्व आपत्तींची निष्ठा ( मूळ ) आहे. अज्ञाला कोणती आपत्ति भोगावी लागत नाहीं? ही संसारपरपरा अज्ञाच्या प्रमादामुळेंच सतत चालली आहे. अज्ञालाच उग्र दुःखें व सुखें भोगावीं लागतात. शरीर, धन, स्त्री इत्यादिकांच्या ठिकाणीं आस्था ठेवणाऱ्या अज्ञाचें हें प्रत्यक्ष अनुभवाला येणारें दुर्दुःख कधींही शान्त होत नाहीं. अनात्मा व त्यामुळेंच एक दिवस फसवून जाणाऱ्या अशा या देहाचे ठिकाणीं आत्मभाव ठेवणाऱ्या अज्ञाला खरें सुख कोठून होणार? ज्याची बुद्धि दुष्ट भावांनीं व्याप्त झाली आहे, व त्यामुळें जो सत्य व अपरोक्ष वस्तूविषयींही अंध झाला आहे. त्याची असद्बोधमयी माया कदापि शांत होत नाहीं. नेत्र असूनही

असद्वस्तूमध्यें पदोपदीं आसक्त होणाऱ्या अज्ञाला चंद्रापासूनही विषाचा लाभ होईल. भूमींत उगवणाऱ्या दूर्वांकुराप्रमाणे दुधांतही कांटे उगवतील. देहसंज्ञक शाल्मलि ( शिवरीच्या ) वृक्षाच्या ढोलींत राहणाऱ्या आशासंज्ञक सार्पिणी–राग, लोभ, दैन्य, इत्यादि सर्पांस प्रसवतात. चांगल्या क्षेत्रांत जशा शाली उगवतात, त्याप्रमाणें अज्ञाच्या अंतःकरणांत आशा उगवतात. मयूरी जशी मेघाची वाट पहात असते, त्याप्रमाणें नरकश्री पापरूपी सर्पांनीं वेष्टिलेल्या अज्ञाची वाट पहात असते. स्त्रीरूपी विषवल्ली अज्ञाकरिताच विकास पावते. त्याच्याच हृदयसद्भूमींत रागरूपी वृक्ष चागला पोसतो; त्याच्याच अंतःकरणरूपी अरण्यांत द्वेषदावाग्नि पसरतो. अज्ञ पुरुषाच्या मात्सर्यरूपी जलानें भरलेल्या मानसा ( सरोवरां ) मध्यें परनिंदारूपी कमलवल्ली उगवतात. सारांश चिंता, स्पृहा, दुःखकल्लोळ, जन्म, बाल्य, यौवन, जरा, मरण इत्यादि सर्व दशा जडालाच वारंवार अनुभवाव्या लागतात. या जगद्रूपी जीर्ण कूपांत संसाररूपी रज्जूच्या योगानें अज्ञ मोघ्याप्रमाणें वारंवार बुडून वर येत असतो.

ज्ञान्याला जें जगत् गाईच्या पावलासारखें तुच्छ वाटत असतें, तेंच अनात्मज्ञाला अपरपार व अगाध भासते. त्यामुळें पक्षी जसे पिंजऱ्यातून सुटून आकाशांत जाऊं शकत नाहींत, त्याप्रमाणें अथवा आंधळ्याप्रमाणें अज्ञ पुरुषाच्या बुद्धि जठररूपी गुहेच्या पलीकडे जात नाहींत. उदरभरणाच्या आसक्तीनेंच त्यांची दृष्टि आकुंचित होते. त्यामुळें ती संसाराच्या परतीराइतकी दूर जाऊं शकत नाहीं. बाह्य विषयवासनांच्या भारानें त्यांचीं हृदयें अगदीं निर्बल झालेलीं असतात. अज्ञ संसारारण्यांत इंद्रियरूपी मांसभक्षक पक्ष्यांना तृप्त करण्याकरितां आपलीं शरीरें हेच जणुं मांसपिंड पसरीत असतो. मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि प्राणिमयी व हिमालय, विंध्य, इत्यादि शैलमयी दृष्टि वस्तुतः मांसलवमात्र व मृत्तिकालवमात्र आहे. अर्थात् मोहानें तत्त्वाचें पर्यालोचन न झाल्यामुळेंच प्राणी व जड पदार्थ यांची कल्पना होते. खरोखर या संकल्पकल्पवृक्षाची धन्य आहे. त्याच्यापासूनच अनंत जगत्पर्णांच्या परंपरा निघाल्या आहेत. त्या वृक्षावर विचित्र रचनायुक्त अनेक भोगी प्राणी हेच पक्षी बसले आहेत. जन्म हींच त्यांचीं पानें आहेत. कर्मजाल ह्याच कळ्या

आहेत. पुण्यें व पापें हींच अनेक फळें आहेत. वैभवशोभा ह्याच मंजिऱ्या आहेत. खरोखर या संसारखंडामध्यें अज्ञान चंद्रोदयाच्या योगानें स्त्रियारूपी औषधी परम शोभेस प्राप्त झाल्या आहेत. तात्पर्य हे रामा, अज्ञान हेंच या सर्व अनर्थांचें कारण आहे. त्याचें वर्णन कितीही जरी केलें तरी तें थोडेंच होणार आहे. विचार करीपर्यंत रमणीय वाटणारे विषय अज्ञालाच बद्ध करितात. क्षणभंगुरतादि दोष हीं या अज्ञान वृक्षाचींच नाना आकाराचीं व विफळ फळें आहेत. ६.

सर्ग ७–कारणाविद्येच्या विभूति.

**श्रीवसिष्ठ**—मोत्यें व रत्नें यांनीं भूषित झालेल्या स्त्रिया म्हणजे मदरूपी चंद्राचा उदय झाला असतां क्षुब्ध झालेल्या कामरूपी क्षीरसागराच्या ऊर्मि आहेत. त्याचा आकार इतका मोहक असतो कीं, तो पुरुषांच्या विवेकादि सर्व गुणाचा अपहार करून त्याला अनर्थांत पाडतो. त्याच्या नेत्रादि अवयवाकडे पाहून पुरुष अधीर होतात. ते आपल्या मनाला स्वाधीन ठेवूं शकत नाहींत. कामी पुरुष त्यांच्या मुखादि मलिन पदार्थांना चंद्रादिकाची उपमा देतात. स्त्रियाप्रमाणें लक्ष्मीही अज्ञानाचीच मोठी विभूति आहे. ती आरंभीं थोडी मधुर, मध्ये व्ययादि करण्याचा प्रसंग आला असता रागद्वेषादिकास कारण होणारी, व शेवटीं शीघ्र क्षीण होणारी आहे. शिवाय ती काहीं थोड्याशा लोकांमध्येंच राहते. पण असल्या लक्ष्मीची इच्छा करणें हें अज्ञानाचें विलसित नव्हे तर काय? मति शेंकडों प्रकारच्या सुखाला अनुकूल समजते व दुःखाला प्रतिकूल समजते. पण ही अनेक प्रकारची फलश्री कारण—अविद्येचा परिणाम आहे. कर्मकांडातील पुरुषाला काम्य कर्मांमध्यें प्रवृत्त करणारीं वाक्यें अज्ञा करिताच आहेत. कारण मोहवशात् स्वतःच काम्य कर्मांमध्यें प्रवृत्त झालेल्या लोकानाच तीं विषय करितात. निष्काम विरक्त त्यांच्याकडे ढुंकूनही पहात नाहींत. अगोदरच विवेकहीन व त्यामुळेंच अंध असलेल्या पुरुषाला तीं काम्यवाक्यें काहीं उच्च अवस्थेंत नेण्याचा प्रयत्न करितात हें खरें; पण परिणामीं तो त्याचा प्रयत्न अगोदरच खळग्यात पडलेल्या पुरुषाला आणखीं अधिक आत ढकलण्यास कारण होतो. काम्य कर्मांच्या अनुष्ठानानें तो अधिकाधिक विषयासक्त होतो. भोगांमध्यें प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा राग ( प्रेम )

पुत्रपौत्रादिकांचे ठायीं वाढतो. त्यामुळें त्यांना मरणादि आपत्ति आली असतां त्यांच्या वियोग–दुःखाची परंपरा अनुभवावी लागते. दुःख भोगता भोगतां व्याकुळ झालेला पुरुष स्वतः मरतो, व वासनावश होऊन पुनः जन्मास येतो. सारांश, या क्रमानें तो वारवार मृत्युमुखांत पडतो.

अशा प्रकारचे अनेक जीव या संसारअरण्यात पडले आहेत. ते आपल्या विलक्षण स्वरूपाप्रमाणेंच विलक्षण अवस्था भोगीत असतात. मोह, चिंता, जिह्वारस ( नाना पदार्थ खाण्याची लालसा ) दारिद्य, लोभ यौवनाचा नाश करणारी जरा, इत्यादि राक्षस व राक्षसी जीवांना जर्जर करून सोडतात. तेव्हां या अज्ञानाचा प्रभाव किती वर्णावा ? फेंसाप्रमाणें ही सृष्टि उत्तरोत्तर वाढत जाते. पृथ्वी, पर्वत इत्यादि स्थूल व उच्च पदार्थांनीं ही जरी विलसत असली, तरी ती निःसार आहे. आभास हेंच जिचें शुभ्र पुष्प आहे, आणि धर्म व अर्थ या फलानीं जी शोभत आहे, अशी जगत्पल्लवानें शोभणारी सत्ता–लता विकास पावली आहे; दुसरें कांहीं नाहीं. मेरु हा ज्याचा महास्तंभ आहे, चंद्र व सूर्य हीं ज्याला गवाक्षें आहेत आणि गगन हें ज्याचें सुंदर छत आहे, असें हें त्रिजगद्रूप गृह अज्ञानरूपी पायावर उभें आहे. या संसारसंज्ञक महा सरोवरात प्राणि रूपी भ्रमर भ्रमण करीत असून ते शरीररूपी कमलामध्यें अज्ञानानेंच बसून विषयसुखास्वाद घेतात. या भुवनोदरांत आदित्यदीपिका स्फुरण पावत आहे. आशा या नावाच्या तंतूनें जिला बांधलें आहे, अशी ही जागती ( सर्व जग ) या नावाची पक्षीण वासनारूपी शलाका ( काड्या तारा ) नीं युक्त असलेल्या इंद्रिय–पंजरात अडकून पडली आहे. संसृति संज्ञक वेलीचीं भूतसंज्ञक जीर्ण पानें एकसारखीं पडत असतात.

या अज्ञानजन्य सृष्टीचें वर्णन अनेक रूपकानीं करितां येतें. पण नुस्त शब्दप्रपंच करण्यात काय अर्थ आहे ? उत्पत्ति, कांहीं काळ स्थिति त्याप्रसंगीं नानाप्रकारच्या दशाचा अनुभव, कलहादि अनेक विक्षेपोत्पादक क्रिया, इत्यादि व शेवटीं क्लेशानें येणारें मरण, या परंपरेंत हरएक जीव पडला आहे. सृष्टींतील प्रत्येक पदार्थ हा जीवाच्या कर्माचा परिणाम आहे कारण प्रत्येक जड पदार्थ भोगसाधन असून भोग हें कर्मफल आहे. अनेक प्राण्यांचीं कर्मे अनेक असल्यामुळें त्याचीं फलसाधनेंही गिरि, नदी

वृक्ष व सर्प, वृश्चिक, पशु, पक्षी इत्यादिकांचीं शरीरें, इत्यादि अनेक उत्पन्न झालीं आहेत. या जगांत काळादिकांच्या परिमाणाचा कांहीं नियम नाहीं. एका महाप्राण्याच्या एका क्षणांत दुसऱ्या क्षुद्र प्राण्याचे अनेक कल्प होतात. नेत्र उघडताच ब्रह्मादिकांस उत्पन्न करणारे व ते झांकताच त्यांचा संहार करणारे कांहीं देवनायक कोठें कोठें आहेत. कांहीं इतर प्राण्यांस भय देणारे रुद्र आहेत, पण तेही दुसऱ्या महारुद्राच्या निमिषानेंच क्षय पावतात. सारांश, ही आचिंत्य व भासुर जगत्कल्पना अज्ञानविलास आहे. सर्व संपत्ति, विपत्ति, बाल्य, यौवन, जरा, मरण, उपताप ( संताप ), सुखदुःखपरंपरेंत मज्जन पावणें, इत्यादि या सर्व तीव्र अज्ञान—अंधकाराच्या विभूति आहेत ७.

**सर्ग ८**—कार्याविद्याविलास.

श्रीवसिष्ठ—या संसारवनखंडामध्यें चित्पर्वताच्या तटावर सृष्टि—अविद्या या नावाची ही कार्याविद्यारूपी वेल कशी व केव्हांपासून विकास पावली आहे, हें मोठें गूढ आहे. त्या वेलीचीं मेरु इत्यादि मोठमोठे पर्वत हींच पेरें, ब्रह्मांडाचीं आवरणें ह्याच साली, देह हीच यष्टि व विविधप्राणी हेच पानाचे विविध अंकुर आहेत. सुख, दुःख, जन्म, स्थिति, ज्ञान, अज्ञान, इत्यादि हीं त्या वेलीचीं प्रति दिवशीं वृद्धि पावणारीं फळें व मुळें आहेत. ( सुख व दुःख याना या अविद्यालतेचें मूलत्व व फलत्व कसें आहे म्हणून विचारशील तर सांगतों )—संपत्तिप्रभृति सुख साधनांपासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेऊं लागलें म्हणजे मला याहून आणखीं अधिक संपत्ति मिळावी व तिचा याहून अधिक भोग घडावा, अशी त्या सुखानुभवापासून रागलक्षण अविद्या उदय पावते. तिच्या योगानें यज्ञ, दानादि काम्य कर्मांकडे प्रवृत्ति होते, व त्या धर्मापासून पुनः सुख हें फळ मिळतें. त्याचप्रमाणें दारिद्र्यादि दुःखांपासून धनतृष्णादिरूप अविद्या उदय पावते. ती पापवासनेनें दुष्ट प्रतिग्रह, चौर्य इत्यादि अधर्मामध्यें प्राण्याला प्रवृत्त करिते व अधर्मामुळें त्याला पूर्वीपेक्षां अधिक दुःख होतें. याप्रमाणें सुख व दुःख हीं प्रत्यहीं वृद्धि पावणारीं अविद्येचीं मुळें व फळें आहेत. जन्म, स्थिति, ज्ञान व अज्ञान यांनाही अशाच रीतीनें अविद्येचें मूलत्व व फलत्व जाणावें. ही अविद्या लता नानाप्रकारच्या उल्हासांनीं युक्त, वासनारूपी

सुगंधानें शोभणारी, व दाट पल्लवांनीं सुंदर झाली आहे. दिवस हींच हिचीं फुलें व रात्री हे भ्रमर आहेत. कर्मवायु हिला वारंवार हालवीत असतो. क्वचित् विवेकरूपी गज हिला झाडून शुद्ध करण्याचा व शुंडाग्रानें उपटून टाकण्याचाही प्रयत्न करतो. पण तिच्यावर बसलेलीं वासनारूपी मळाचीं पुटें विवेकगजाच्या नुस्त्या हालविण्यानें निःशेष जात नाहींत. कारण अविद्यामूळ फार खोल गेलेले असल्यामुळें तिला सहज उपटताही येत नाहीं. हिच्या अंगाला विनाशरूपी अनेक छिद्रें आहेत. ही विषयोपभोगरूपी रसानें परिपूर्ण आहे. कुकर्मरूपी अजगरानें हिला वेढलें आहे. जीवाच्या जीवनोपायानीं ही भरलेली आहे. सामान्य लतेहून अगदीं विलक्षण अशींही नानाप्रकारचीं वैचित्र्यें हिच्या ठायीं आढळतात. विवेक, शम, शांति इत्यादि उत्तम पुष्पें व सुख, समाधान, आर्द्रता इत्यादि सुंदर फलें, यांनींही हिला कोठें कोठें शोभा आणली आहे. पण प्रायः ही अविद्यालता नानाप्रकारच्या विषयवासनागंधानें मूढाना मदोन्मत्त करीत असते. तिच्या मुळाशीं नानाप्रकारचीं अळीं आहेत, तिच्यावर अनेक प्रकारचे पक्षी आहेत, ती नानाप्रकारच्या परागानीं कठोर झालेली असून तिनें अनेक वृक्षांवर जाळीं पसरलीं आहेत. नाना कलारूपी कळ्या व नाना अविवेकरूपी वनें, यांनीं व्याप्त असलेली ती अनेक अहंकारपर्वततटांवर आरूढ होऊन नानाप्रकारच्या पर्णांनीं भरून गेली आहे. ती भूत व वर्तमान या कालांना एकसारखेच विषय करते. मिथ्या असलेली ती सत्य भासते. नित्य अत्यंत तरुणी ( पल्लवित ) असलेली ही अविद्यालता एका अर्थी नित्य शुष्कच होत असते. ही महा विषलता असून हिला दृढ आलिंगन दिल्यास संसारविषरूपी मूर्च्छा देते; पण हिच्या विषयीं शुद्ध मनानें विचार केल्यास ही लागलीच नाश पावते. कारण ती विवेकी पुरुषाच्या पूर्ण आत्म्यामध्यें गलित होते. लीन होऊन जाते. पण अज्ञाच्या ठिकाणीं ती सर्वतः अनुवृत्त झाल्याप्रमाणें असते. हिच्या एकीकडे जळ, दुसरीकडे पर्वत; एकीकडे नाग, दुसरीकडे देव; इकडे तीच पृथ्वी झाली आहे व दुसरीकडे आकाशरूपानें स्थित आहे; इकडे चंद्रसूर्यतेस प्राप्त झाली आहे, व तिकडे तारकाकार बनली आहे. तम व तेज, अंतरिक्ष व सस्यपूर्णभूमि, शास्त्रें व वेद, अशा द्वंद्वांनीं ती भरलेली

आहे. ती कोठें पक्षी, कोठें देव, कोठें स्तंभादि जड पदार्थ व कोठें वायु, जल इत्यादि वस्तू यांनीं विचित्र झाली आहे. ती वेल कोठें नरकांत लीन झाली आहे, कोठे स्वर्गांत विलास करीत आहे, कोठें देवपदास प्राप्त झाली आहे, कोठें कृमि होऊन राहिली आहे. कोठें ब्रह्मा, विष्णु, रुद्र, सूर्य, अग्नि, वायु, चंद्र, यम, इत्यादि अधिकारी जीवरूप झाली आहे. साराश, बा रामा, या भुवनांमध्यें महा महिम्यानें व्याप्त व शुष्क तृणानें युक्त असे जें जें म्हणून कांहीं दिसत आहे, तें सर्व दृश्य अविद्यारूप आहे, असें त्याचा बोध करण्यासाठीं, तूं जाण. कारण त्याचा बोध झाला म्हणजे आत्मलाभ होतो. ८.

**सर्ग ९**–गुणत्रयविभाग, हरादिकांची शुद्धसत्त्वता, विद्या व अविद्या यांचें स्वरूप.

**श्रीराम**—हरि–हरादि शुद्ध आकारजातही अविद्याच आहे, हें ऐकून मला भ्रमसा होत आहे.

**श्रीवसिष्ठ**—का बरें ? तुला भ्रम कां होत आहे ? त्याचें कारण मला तर कांहीं दिसत नाहीं. तथापि मी तुला भ्रमनिरासार्थ गुणत्रय-विभाग सांगतों. निर्विकार शुद्ध चैतन्याचा भिजलेल्या घृताप्रमाणें स्वतः घनभाव ( साकारता ) संभवत नाहीं. यास्तव त्या घनतेची उपपत्ति लावण्याकरिता अघटित घटना करणारी माया कल्पावी लागते. हा सर्व सृष्टिरूपी परिणाम पाहून सुख, दुःख व मोह, या तीन रूपानें भासणाऱ्या त्यातील पदार्थांचें कारणही त्रिविध असावें, असें अनुमान होतें. तें त्रिविध कारणच सत्त्व, रज व तम या नावांस पात्र होतें. त्यांत शुद्ध व अति सूक्ष्म अशा स्वरूपाला आच्छादित करण्यास असमर्थ असलेला जो मायांश त्याला शुद्ध सत्त्व हें नांव योजलें आहे. तें ( शुद्ध सत्त्व ) अति स्वच्छ आहे. त्यामुळें तें चैतन्याचें प्रतिबिंब घेऊं शकतें. तें चैतन्याच्या जोरावर सर्व विद्यांना उद्दीपित करतें, व तें स्वरूपाला झांकून टाकीत नसल्यामुळें त्याला सर्व विद्यांचें आधिपत्य असणेंही युक्तच आहे. आमच्या तत्त्वज्ञानानें त्याचा बाध होत असल्यामुळें त्याला अविद्यात्वही आहे.

गुणत्रयरूपी अविद्या हीच प्रकृति व हीच प्राण्यांची संसृति आहे. परम पद हिच्या पलीकडे आहे. वर सांगितलेल्या तीन गुणांचेही मिश्रणा-मुळें प्रत्येकीं तीन तीन असे एकंदर नऊ भेद झाले आहेत. त्यामुळें ही

अविद्याही नऊ प्रकारें भिन्न झाली आहे. या सर्व दृश्याला तिचा आश्रय आहे. ऋषि, मुनि, सिद्ध, नाग, विद्याधर, देव, हा त्या अविद्येचा सात्त्विक भाग आहे. पण या सात्त्विक भागामध्येंही नाग व विद्याधर यांमध्यें तमोगुणांचा अंश अधिक आहे. मुनि व सिद्ध हा रजोभाग होय; व देव, शंकर इत्यादि सत्त्व. या सत्त्वजातीमध्यें अविद्या व प्राकृत गुण यानीं रहित असलेले हरि–हरादि पूज्य, निर्मल पदास प्राप्त झाले आहेत. प्रकृतीचा सात्त्विक भाग पुनः उत्पन्न होत नाहीं, म्हणून त्याला मुक्त म्हणतात. हरि-हरादि ईश्वर आपापला अधिकार जरी चालवीत असले, तरी त्यांना स्वाभाविक जीवन्मुक्तता प्राप्त झालेली असते. त्याचे भक्तही त्यांच्याच सारखे जीवन्मुक्त होऊन त्यांचा अधिकार असेपर्यंत त्यांच्या लोकीं राहतात, व त्याचा अधिकार संपला म्हणजे त्या आपल्या उपास्यांबरोबरच परमपदीं लीन होतात. देहसंबंध असेपर्यंत ते महात्मे जीवन्मुक्त होऊन राहतात व देहवियोगानंतर विदेहमुक्त होऊन परमेश्वरामध्यें स्थित होतात. अशारीतीनें हा अविद्येचा भाग विद्यात्वास प्राप्त झाला आहे. या सृष्टीचा असा नियमच दिसतो, कीं हिच्यामध्यें बीज फलभावास प्राप्त होतें व फलच बीज बनतें. जलांतून जसा बुडबुडा उठावा व पुनः त्यातच लीन व्हावा, त्याप्रमाणें विद्येमध्येंच अविद्या उद्भवते व लीन होते. जल व तरंग यांना, आम्हीं समजतों म्हणून भिन्नता आहे; वस्तुतः नाहीं. त्याचप्रमाणें विद्यादृष्टि व अविद्यादृष्टि यांच्या भेदकल्पनेमुळेंच भेद आहे; स्वाभाविकपणें नव्हे. जल व तरंग यांचें जसें परमार्थतः ऐक्य आहे, त्याप्रमाणें या मायिक सृष्टींतही अविद्यात्व व विद्यात्व याच्यामध्यें वस्तुतः भेद नाहीं, त्या दोन्ही दृष्टींचा त्याग केला म्हणजे जें रहातें तेंच खरें तत्त्व आहे. रामा, विद्या ही अविद्येची प्रतियोगी व अविद्या ही विद्येची प्रतियोगी आहे. त्या प्रतियोगींच्या अपेक्षेनेंच त्या दोन दृष्टी उद्भवतात. यास्तव तूं त्या दोन्ही परस्पर सापेक्ष दृष्टी सोडून अवशिष्ट शुद्ध तत्त्वामध्यें स्थिर हो. विद्याही नाहीं व अविद्याही नाहीं. त्यांची ही कल्पनाच पुरे झाली. जें किंचित् आहे व किंचित् नाहीं, तें सर्व चित्संविद्च होय. तिचें भान नाहींसें झालें कीं, तिलाच अविद्या म्हणतात. पण या चित्चें ज्ञान होणें हीच विद्या होय. तिलाच अक्षय व

अक्षर अशी संज्ञा आहे. विद्याभावापासून अविद्या या नांवाची मिथ्या कल्पना उत्पन्न होत असते. मनामध्यें छाया व प्रकाश यांप्रमाणें परस्पर विरुद्ध रूपानें भासणाऱ्या विद्याविद्यांतील एक अविद्या बाध पावून चैतन्यात विलीन झाली, कीं त्या दोघीही क्षीण होतात, आणि ग्राह्य तत्त्व मात्र अवशिष्ट राहतें. राघवा, अविद्येच्या क्षयानें विद्यापक्षही क्षीण होतो. नंतर राहणारें जें सर्वगामी तत्त्व त्याला पाहिजे तर किंचित् म्हणा, पाहिजे तर न किंचित् म्हणा. कांहीं म्हटलें तरी चालेल.

रामा, विचार करून पाहूं लागलें म्हणजे वटबीजांत भासणाऱ्या पर्ण-पुष्प-फलयुक्त वटवृक्षाप्रमाणें त्यांत सर्व दिसतें. पण विचारहीन स्थूल दृष्टीने पाहिलें तर वटबीजात साक्षात् न दिसणाऱ्या वृक्षाप्रमाणें त्यांत कांहींच दिसत नाहीं. सर्वशक्ति हेंच किंचित्त्व आहे, तें परम तत्त्व आकाशाहूनही अधिक शून्य आहे; पण अगदीं अभावात्मक शून्य नव्हे, तर तें चिदात्मरूप आहे. सूर्यकांत मण्यामध्यें जसा निमित्तविशेषीं उत्पन्न होणारा अग्नि किंवा दुधामध्ये घृत गुप्त असतें, त्याप्रमाणें हें सर्व त्या परम तत्त्वात आहे. आणि अनुकूल देश, काल व क्रम यांचा उदय झाला म्हणजे तें उदय पावतें. ज्याप्रमाणें अग्नीपासून किटाळें व सूर्यापासून प्रकाश, त्याप्रमाणें नित्य स्फुरण पावणाऱ्या संविद्-पासून हीं सर्व भूतें उत्पन्न झालीं आहेत. ज्याप्रमाणें सागर तरंगांचा व सूर्य सर्व तेजांचा कोश ( निधि, खजिना ) त्याप्रमाणें तें तत्त्व ( ब्रह्म ) सतत सर्व जीव-संविदांचा कोश आहे. जीव व जगत् या दोघांनाही ब्रह्माचीच सत्ता आहे. कुंभातील आकाशाप्रमाणें तें ब्रह्म सदा अविनाशिस्वरूप ( त्रिविध परिच्छेदशून्य ) आहे. लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोखंडामध्यें जशी क्रिया दिसते, त्याप्रमाणें त्याच्या सान्निध्यानें सर्व जगाची चेष्टा चालली आहे; पण वस्तुतः लोहचुंबक जसा लोखंडाच्या क्रियेचा कर्ता नव्हे, त्याप्रमाणें ब्रह्मही खरें कर्मकर्तृ नव्हे. जीवाचें जाणें—येणें इत्यादि सर्व घटाबरोबर जाणाऱ्या व येणाऱ्या आकाशाप्रमाणें औपचारिक ( गौण ) आहे, मुख्य नव्हे. जीवाचें कर्तृत्वही औपचारिकच होय. तात्पर्य, हे रामा, अज्ञात चित् या नांवाच्या जगाच्या एका बीजामध्यें हें जग स्थित आहे. ( पूर्व-पूर्व जगत्कल्पित वासनांमुळें उत्तरोत्तर जगत्कल्पना होऊन, हें अज्ञान

ब्रह्मामध्यें जळांतील लाटांच्या समूहाप्रमाणें स्थित आहे. ) पण आकाशाहूनही सूक्ष्म असलेल्या त्या वस्तूचें ज्ञान झालें असतां त्याहून भिन्न, असें कांहीं रहात नाहीं ९.

सर्ग १०—बंधभ्रान्ति व मोक्ष यांचा विचार.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, वर म्हटल्याप्रमाणें जगत् व जीव हा भेद अज्ञात ब्रह्ममात्र असल्यामुळें, त्या ब्रह्माला जाणलें असता हें कांहीं नाहीं, असेंच होतें. तेव्हां अशा या असत् जगांतील वस्तूविषयीं काय इच्छा करावयाची आहे? देह व बाह्यभोग यामध्यें मी व माझा अशा प्रकारचा संबंध दिसतो; पण विचार केल्यावर तो आम्हांला आढळत नाहीं. कारण अज्ञात आत्माच जगद्भ्रम झाला आहे. यास्तव त्यालाच जाणलें म्हणजे सर्व संपलें. कारण सर्व भ्रामक ज्ञानांची ती सीमा आहे. विषयांना आपली सत्ता देऊन त्या विषय-मलाचा आश्रय करणारी जी चित् तीच अविद्या होय. पण तीच विद्येच्या योगानें सर्व उपाधिरहित झाली असतां विषयातीत स्वरूपास म्हणजे शुद्ध आत्मभावास प्राप्त होते. ( अविद्येचें स्वरूप सांगून आतां तिच्या कार्यरूप उपाधीच्या योगानें आत्म्याला बंधाचा भ्रम कसा होतो तें दाखवितात. ) चित्ताशीं तादात्म्याध्यास पावल्यामुळें पुरुष ( जीव ) चित्तप्राय झाला आहे. यास्तव चित्तरूपी उपाधीचा नाश झाला म्हणजे त्याचा जीवभाव जाऊन तो स्वरूपास मिळतो, व चित्त असलें कीं, हा असतो. कुंभ झाला कीं, आकाशाचा काहीं भाग कुंभाकार होतो, व कुंभ फुटला कीं तो भाग आपल्या स्वरूपास जाऊन मिळतो. दुसऱ्याच्या खांद्यावर बसलेलें अज्ञ मूल तो दुसरा मनुष्य जात असताना मी जात आहें, असें समजतें. व तो उभा राहिला म्हणजे मी उभें आहें असें जाणतें. त्याप्रमाणें चित्त जी जी क्रिया करतें, ती ती मीच करतों असें अज्ञ जीव समजतो. तो भ्रांत चित्तालाच व्याकुल झालेला मी आहें, असें समजतो. कोशकार किड्याप्रमाणें वासनातंतूंनीं आपल्यालाच वेढून घेणाऱ्या त्या मूर्खाला मी आपलाच घात करीत आहें, हें कळत नाहीं.

**श्रीराम**—प्रभो, अविवेकाच्या परमावधीस प्राप्त झालेल्या स्थावरांची चित्तस्थिति कशी असते, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, स्थावरामध्यें जीवचैतन्य सुषुप्तीप्रमाणें अमनस्त्वास प्राप्त झालेलें नसतें व जागराप्रमाणें मनस्त्वरूपानेंही नसतें. तर तटस्थरूपाचा आश्रय करून राहिलेलें असतें. ( निद्राकाळीं लीन झालेल्या मनामध्यें सुखदुःखास जाणण्याचें सामर्थ्य नसतें, व जागरांत तें त्यांना स्पष्ट जाणतें. पण वृक्षादि शरीरांतील चित्त आतल्याआत सुखदुःखादि जाणतें. पण बाहेर व्यक्त करता येत नाहीं. ) हे ज्ञानिश्रेष्ठा, त्या दशेंतील चित्ताची मुक्ति फारच दूर असते. कारण त्या दशेंत पुर्यष्टकांतील अंतःकरणें व बाह्यकरणें विवेक करण्यास समर्थ नसतात. त्यामुळें जीवचित् दुःखाचा प्रतीकार करण्यास समर्थ होत नाहीं. त्याकारणानें ती चित् दुःखदायिनी होते. ती तेथें कर्मेंद्रियरहित असते. ज्ञानेंद्रियें व मन यांचा तेथें फारसा प्रचार होत नाहीं. त्यामुळें स्थावर पदार्थांत चित्‌ला केवळ सत्तारूपानें रहावें लागतें.

**श्रीराम**—गुरुराज, चित् ज्ञानकर्मेंद्रियांचा व्यापार सोडून केवळ सत्तारूपाने जर स्थावर पदार्थांत रहात असली, तर बरेंच झालें म्हणावयाचें. कारण योग्याप्रमाणें त्याचाही मनोनाश व वासनाक्षय लवकरच होण्याचा संभव असल्यामुळें मुक्ति जवळ असणेंच उचित आहे. पण आपण ती दूर असते असें कोणत्या अभिप्रायानें म्हणतां ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, बुद्धिपूर्वक विचार करून हें तत्त्व यथावत् साक्षात् जाणणें व त्यानंतर सर्वत्र सामान्य सत्ता आहे असें पहाणें, हा अनंत मोक्ष होय. वासना दुःखाचें बीज आहे, असें जाणून त्याचा त्याग करणें उत्तम. असा बुद्धिपुरःसर वासनात्याग करून सत्तासामान्यरूप होऊन रहाणें हेंच कैवल्यपद होय. श्रेष्ठांसह शास्त्रांचा चांगला विचार करून व आत्मभावना स्थिर करून सत्तासामान्यनिष्ठ होणें हेंच परब्रह्म होय. बीजांतील अंकुराप्रमाणें, आंतल्या आंत निजल्यासारखी व मन्द असलेली वासना हेंच सुषुप्तत्व असून तेंच पुनः जन्म देणारें आहे. मननाला प्रतिबंध होऊन त्यामुळें वासनांनीं कुंठित होणें हेंच सुषुप्तत्व असून तें जड असलें तर शेंकडों जन्म देणारें आहे. स्थावरादि हे सर्व पदार्थ असेच जड-धर्मवान् आहेत. ते सुषुप्त पदीं आरूढ झालेले आहेत. त्यामुळें ते पुनःपुनः जन्म घेण्यास योग्य आहेत. बा साधो, ज्याप्रमाणें बीजामध्यें पुष्पादि व मृत्तिकेच्या

राशींत घट, त्याप्रमाणें स्थावरामध्यें स्ववासना स्थित असते. ज्यामध्यें वासनाबीज असतें तें सुषुप्तत्व सिद्धीस कारण होत नाहीं. तर ज्यांतील वासनाबीज ज्ञानानें दग्ध झालेलें असतें, तेंच परम सिद्धि देणारें तुर्य पद होय. वासनेचा स्वल्पसा अंश जरी अवशिष्ट असला तरी तो अग्नीच्या ठिणगीप्रमाणें अनुकूल स्थिति प्राप्त होताच अतिशय वाढतो व मोठा अनर्थ करतो. अग्नि व वासना यांच्या शेषाप्रमाणेंच कर्ज, रोग, शत्रु, स्नेह, वैर व विष यांचा स्वल्प अंशही पुढें मोठी पीडा देतो. यास्तव वासनेचा निःशेष क्षय करून सत्तासामान्यवान् झालेली चित् सदेह असो कीं विदेह असो, पुनः दुःखभाक् होत नाहीं.

राघवा, वासनाबीजशक्तियुक्त चित् स्थावरादि वस्तूंमध्यें राहिलेली असून तीच बीजादि सर्व कारणांमध्येंही नानारूपानें स्थित आहे. ती सर्वत्र सत्तासामान्यरूपानें असते. ती तर्व दृश्यदशेला भरून राहिली आहे. पण अनेक उत्तमोत्तम साधनांनीं आत्मदृष्टि संपादन केली म्हणजे ती सर्व दुःखांचा क्षय करते. या दृष्टीचा अभाव हीच अविद्या. तीच जगाचा हेतु. तिच्या पासूनच सर्व प्रवृत्त होतें. पण हातांत दिवा घेऊन अंधकाराला पहावयास जों जावें तों, तो जसा पळून जातो त्याप्रमाणें शम, दम, विवेक, वैराग्य इत्यादि साधनांनीं आत्मदृष्टि संपादन करून या अविद्याशक्तीला पाहूं गेल्यास ती कोठें नाहींशीच होते. दीप नसला तर तमाचा प्रादुर्भाव व साक्षात्कार. त्याप्रमाणें विवेकाच्या अभावीं तिचा व तिच्या कार्याचा अनुभव येतो. विचार करून पहावें, म्हणजे सर्व गोष्टींचा आपोआप निर्णय होतो. रक्त, मांस, हाडें इत्यादिकांनीं बनविलेल्या या यंत्रांतील मी कोण बरें असेन ? असा विचार केला कीं सर्वांचा लय होतो. उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतर नसणाऱ्या सर्वांचा मनानें परिहार केला म्हणजे जें कांहीं रहातें तोच अविद्येचा क्षय होय. त्याला पाहिजे तर न किंचित् म्हणा, पाहिजे तर किंचित् म्हणा, पण तें शाश्वत ब्रह्मच आहे.

साराश, हे रामा, हें ब्रह्म नव्हे, असा निश्चय असणें हीच अविद्या व हें सर्व ब्रह्मच आहे, असा दृढ प्रत्यय येणें, ही विद्या होय. अथवा हाच

अविद्याक्षय होय. सर्व दृश्यजात विभु नव्हे असें ज्ञान ( असा अनुभव ) हीच अविद्या व तें सर्व विभुच आहे, असें ज्ञान हाच तिचा क्षय आहे. १०.

**सर्ग ११**—हरि–हरादि जीवन्मुक्ताच्या सर्व ब्रह्म या दृष्टीचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, उत्कृष्ट बोधाकरितां मी हेंच तत्त्व तुला पुनः पुनः सांगतों. कारण हे साधो, अभ्यासावांचून आत्मभावना उदय पावत नाहीं. अविद्या हें जिला दुसरें नाव आहे, तें अज्ञान सहस्रावधि जन्मांनीं व त्यांतील असंख्य भावनांनीं अति दृढ झालें आहे यास्तव एकदां किंवा दोनदां उपदेश ऐकून तें जात नाहीं. अनंत कोटि जन्मात जिचा परिचय झाला आहे अशी द्वैतवासना अद्वैतवासनेहून अतिशय प्रबळ झाली आहे. देहाच्या विद्यमान स्थितींत म्हणजे जीवन व जागरकाळीं बाह्य व आंतर इंद्रियें द्वैताचें ग्रहण करितात व देहाच्या अभावदशेंत म्हणजे मरण व निद्राकाळीं साक्षी त्याचा अनुभव घेतो, आणि याप्रमाणें प्राण्याला अहोरात्र या द्वैताचाच अनुभव येत असल्यामुळें तो तन्मय होऊन जातो. सारांश अज्ञानाची सामग्री इतकी सुलभ आहे. पण ज्ञानाविषयीं पहावें तर त्याची स्थिति अगदीं उलट. कारण त्याची सामग्रीच किती दुर्लभ आहे ती पहा.

आत्मज्ञान कोणत्याही इंद्रियाचा विषय होत नाहीं. तर मनासह सहाही ज्ञानेंद्रियें क्षीण झालीं म्हणजे मग त्याची केवळ सत्ता भासते. अहो इंद्रियांच्या वृत्तींना सोडूनच जें राहणारें तें कोणत्याही प्राण्याला प्रत्यक्ष कसें दिसणार ? यास्तव रामा, हृदयवृक्षावर चढून फोफावलेल्या या अविद्यालतेस तूं ज्ञानाभ्यास-खड्गानें स्वसिद्धीकरिता तोडून टाक. ज्यानें ज्ञेयाला जाणलें आहे असा जनकराजा आत्मज्ञानाभ्यासामध्यें रत होऊन जसा विहार करीत होता, तसा तूं कर. बाह्य व्यवहार व आन्तर समाधि या दोन्ही स्थितींचा अनुभव घेणाऱ्या त्याचा जाग्रत्काळीं अथवा सुषुप्तींतही मी सांगतों तसाच निश्चय होता. तेंच सत्यज्ञान होय, याच निश्चयानें विविध आचार करणारा हरि भूलोकीं अनेक अवतार घेतो. राघवा, कांतेसह राहणाऱ्या शंकराचा व ब्रह्मदेवाचा जो निश्चय आहे तोच तुझा असो; देवगुरु, असुराचा गुरु, सूर्य, चंद्र, वायु, अग्नि, नारद, पुलस्त्य, मी, अंगिरस, व अशाच आणखी अनेकांचा जो निश्चय आहे तोच तुझा होऊं दे.

**श्रीराम**—भगवन्, हे सर्व महाबुद्धिमान् महात्मे ज्या निश्चयानें शोकरहित होऊन राहिले तो मला तत्त्वतः सांगा.

**श्रीवसिष्ठ**—हे ज्ञानिराजपुत्रा, मी त्यांचा निश्चय तुला स्पष्ट सांगतों तो ऐक. इंद्रियाना दिसणारें हें सर्व विस्तृत जगज्जाल ब्रह्म आहे. चित्, भुवन, भूतपरंपरा, मी, माझा शत्रु, माझे सन्मित्र व बांधव हें सर्व ब्रह्मच आहे. भूतादि तीन कालही ब्रह्म आहे. समुद्र आपल्या स्वरूपांतच तरंगमालेनें जसा वाढतो, त्याप्रमाणें ब्रह्म आपल्या रूपातच जगद्रूपानें विकसित होतें. सर्व क्रियाकारक व फल ब्रह्मरूप आहे. मायाख्य ब्रह्मशक्तीच्या योगानें विवर्त पावून ब्रह्म जगत् होतें. अर्थात् सर्व ब्रह्मच. माझा शत्रु व मित्रही जर ब्रह्मच आहे तर मग द्वेष, प्रेम इत्यादिकांना अवकाशच कोठें राहिला. संकल्प केल्यावर भासणाऱ्या व तो सोडल्यावर नष्ट होणाऱ्या पदार्थांना स्थिरत्व कोठचें ? अर्थात् संकल्प व असंकल्प या दोन्ही अवस्थांमध्यें एक ब्रह्मच आहे. फार काय पण गमनादि सर्व ब्रह्मच आहे. कोठलें सुख व कोठचें दुःख. रामा, अशी सर्वत्र ब्रह्मदृष्टि ठेवली म्हणजे अभयप्राप्ति होते. भोगासक्ति नष्ट होते. इच्छा मावळते. मरणादि सर्व विक्रिया ब्रह्ममय आहेत, असें कळलें म्हणजे सर्व क्लेश क्षीण होतात. तूं व मी हा भाव रहात नाहीं, वस्तुतः परमात्म्यामध्यें जड व अजड हा भेदच नाहीं. सोन्याचा कडेपणा व जलाचा तरंगपणा यांचा जसा एका दृष्टीनें भेद व दुसऱ्या दृष्टीनें तादात्म्य त्याप्रमाणें आत्म्याची ही प्रकृति आत्म्याहून भिन्न व अभिन्न आहे. हें जड व हें अजड ( चित् ) असा भेद करणें हा मोह आहे. ज्ञानात्मा असें मुळींच समजत नाहीं. अज्ञ पुरुषाला सर्व जग दुःखमय भासतें व ज्ञानी पुरुषाला तें आनंदमय आहे, असा अनुभव येतो. आंधळ्याला सर्व भुवन आंधळें व डोळसाला सर्व जग माझ्याप्रमाणेंच डोळस आहे, असें वाटतें. त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषाला जगत् एक आत्मरूप भासतें व त्यामुळें त्याला विक्षिप्त होण्याचें कारणच रहात नाहीं. पण मूर्खाला क्षणोक्षणीं विक्षिप्त होण्याचा प्रसंग येतो, व त्यामुळें त्याला सर्व जग दुःखमय भासतें. बालकाला अंधकारांत जसे वेताळ दिसतात, त्याप्रमाणें अज्ञांना स्वसंकल्पानेंच सर्व विरोध भासतात. ज्ञान्याच्या दृष्टीनें सर्व ब्रह्मच असल्या-

मुळें देहब्रह्म मरणब्रह्मरूप झाला तरी त्याला शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं. कारण, कांहीं मरत नाहीं व कांहींएक जन्माला येत नाहीं, तर हा सर्व पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें लय व विकास आहे, असें जाणून ज्ञानी आनंदांत मग्न असतो. ब्रह्मस्वरूपात स्थित असलेली ब्रह्मशक्ति जगच्छक्ति-रूपानें विकास पावते. त्यामुळें जगामध्यें कितीही जरी विलक्षणता असली, तरी ती शक्तीच्याही आधारभूत ब्रह्मामध्यें असत नाहीं. म्हणून ज्ञानी चित्तांत कधीं डगमगत नाहीं. तो सर्वत्र ब्रह्म पाहतो व ब्रह्मरूप होऊन राहतो. त्याला विधि, निषेध; इष्ट, अनिष्ट; सुख, दुःख; भोग्य, भोक्तृ इत्यादि भेदही भासत नाहींत. त्यामुळें व्यवहारकालींही त्याचा सर्व व्यवहार उदासीनासारखा होतो. हा सर्व आभास आहे. असा त्याचा निश्चय असतो. ज्ञानी पुरुष हें सर्व मीच आहें व माझेंच आहे; अथवा मी म्हणून कोणी नाहींच व मजहून जें इतर म्हणून कांहीं भासत आहे, तेंही मी नव्हे, असें समजतो. आणि त्याचा असा हा दृढ निश्चय असल्यामुळें तो महात्मा ‘ हें जग कृत्रिम ( मायिक ) असो कीं स्थिर असो, मी निःशोक होऊन रहाणार ’ असें मनांत म्हणून स्वस्थ राहतो. ११.

सर्ग १२—राम जनकादिकांच्या स्थितीचें ग्रहण करतो.

**श्रीवसिष्ठ**—रामभद्रा, जनकादि सर्व निष्पाप महात्मे अशा निश्चयानें युक्त होते. त्या धीराची बुद्धि अतिशय पूर्ण होती. त्यांचीं चित्तें सम व रागरहित होतीं. तसले ज्ञानी मरणाची निंदा करीत नाहींत व जीवि-ताचें अभिनंदन करीत नाहींत. त्याचा चमत्कार कोणाला कळत नाहीं. ते नाना प्रकारच्या इष्टानिष्ट प्रदेशांत किंवा अवस्थांत असतांनाही मना-मध्यें सम राहतात. कारण त्याचें मन आसक्तिरहित, उपाधिगतभ्रमशून्य, अतिशय शांत, परम सत्त्वपदास प्राप्त झालेलें, मोठमोठ्या संकटांतही मग्न न होणारें मोठ्या लाभानेंही उल्लसित न होणारें व दुःखतापानें म्लान न होणारें असतें. जनकादि महात्मे सदा अव्यग्र असतात. प्राप्त स्थितीला समदृष्टीनें पहातात. रामा, तूंही त्याच दृष्टीचा आश्रय कर. ती पापाचा नाश करणारी आहे. शुद्ध चैतन्याला आत्मा समजून तूं प्राप्त स्थितींत विहार कर. सर्व भ्रम सोडून गंभीर व सम होऊन रहा. हें सर्व चिन्मात्र

आहे, अशी भावना दृढ कर. महत्तेला प्राप्त होऊन व या बाह्य दृष्टीला तुच्छतेनें सोडून तूं सर्वत्र असक्तिबुद्धि हो.

श्रीराम—गुरुवर्य, आपल्या या उपदेशांजनानें माझी दृष्टि निर्मळ झाली आहे. सूर्याच्या समागमानें कमळ जसें विकास पावतें, त्याप्रमाणें मी तुमच्या प्रसादानें आतां चांगला जागा झालों आहें. खरोखर माझी सर्व भ्रांति नष्ट झाली आहे. माझे सर्व संदेह मिटले आहेत. माझा मद, मोह, मान व मात्सर्य, हीं निघून गेलीं आहेत. माझें चित्त मुदित झालें आहे, दीर्घ कालानें आज माझा शोक शांत झाला आहे. गुरुवर्य, मी आतां आपण सांगाल त्याप्रमाणेंच निःशंकपणें वागेन. १२.

**सर्ग १३**—ज्ञानानें वासनाविलय कसा होतो, तें सांगून प्राणरोधानें तो करण्याचा उपदेश.

**श्रीराम**—गुरुराज, उपशमप्रकरणांत आपण वासनाक्षयाचे दोन उपाय सांगितलेत व त्यांतील उत्तम अधिकाऱ्याच्या उपयोगी असलेला ज्ञान-विलासही वर्णिलात. त्यामुळें माझा वासनाविलय होऊन मी आतां जीव-न्मुक्तपदीं आरूढ झालों आहें. पण मध्यम व मंद अधिकाऱ्यांच्या वासना-क्षयास कारण होणारा प्राणस्पदनिरोध या नांवाचा उपाय कसा योजावा तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, संसाराला तरून जाण्याची जी युक्ति तिला योग असें म्हणतात. चित्ताचा उपशम हाच जिचा धर्म आहे, अशी ती दोन प्रकारची आहे, असें तूं जाण. आत्मज्ञान हा तिचा एक प्रकार असून, तो भूलोकीं प्रकट केलेलाच आहे. आतां प्राणनिरोध या नांवाचा दुसरा प्रकार मी सांगतों, तो ऐक.

**श्रीराम**—पण प्रभो, सुलभ व दुःख न देणारा असा या दोन्हींतील चांगला योग कोणता, कीं ज्याला नुसतें जाणल्यानेंच पुनः क्षोभ होणार नाहीं?

**श्रीवसिष्ठ**—यद्यपि दोन्ही उपायांना योग अशी संज्ञा लावतां येते, तरी योग हा शब्द प्राणनिरोध या अर्थीच रूढ झाला आहे. योग व ज्ञान हे दोन्ही उपाय संसारांतून पार जाण्यास सारखेच उपयोगी आहेत. ते दोन्ही एकच फल देणारे आहेत. कोणाला योग असाध्य होतो व कोणाला

ज्ञाननिश्चय असाध्य होतो. पण बा साधो, मला तर ज्ञाननिश्चयच सुसाध्य वाटतो. विचार करण्यास समर्थ नसलेल्या पुरुषांना ज्ञान व अज्ञान याचें स्वरूप समजणें कठिण आहे. पण प्रमाणकुशलांना तें कठिण नाहीं. शिवाय अज्ञान हें स्वतःच ज्ञानाभावरूप असल्यामुळें तें सदा अज्ञातच असतें. पण ज्ञान स्वप्रकाश असल्यामुळें स्वतःच प्रसिद्ध होतें. अज्ञानाची प्रसिद्धि अनुभवावर अवलंबून आहे. त्यामुळें ज्ञान व अज्ञान यांचा विवेक होऊं शकतो. म्हणून ज्ञान सुकर असून, योग दुष्कर आहे. योगानुष्ठानामध्यें प्रशस्त देश, काल, आसन, धारणा, इत्यादिकांची अपेक्षा असते. त्यामुळें योग सुसाध्य नसतो. पण मंदमती व निरुत्साह पुरुषांप्रमाणें प्रयत्नशील व समर्थ पुरुषाला शास्त्रीय साधनाविषयीं सुसाध्य, कष्टसाध्य इत्यादि चिंतन करीत बसणें शोभत नाहीं. यास्तव प्राणनिरोध हा उपायही सुसाध्यच आहे, असें जाणावें. असो; रघूत्तमा, ज्ञान व योग हे दोनच उपाय शास्त्रोक्त आहेत. त्यातील ज्याचा विषय ( आत्मा ) अति निर्मल आहे, असें ज्ञान मीं तुला सांगितलें आहे. आता प्राण व अपान यांची समता या धर्मानें रूढितः योग या नावास पात्र झालेला, देहसंज्ञक दृढ गुहेमध्यें असलेला, आकाशांतून गमनादि करण्याची शक्ति यावी अशी इच्छा करणारांना ती ( सिद्धि ) देणारा व ज्ञानेच्छूंना ज्ञान देणारा ( आत्मसाक्षात्कारास कारण होणारा ) योग तूं ऐक. बा राजसुता, तूंही उद्युक्तचित्तानें प्राणवायूचा निरोध कर व चित्तवृत्तिनिरोधाभ्यासाच्या योगानें अक्षय परमपदीं स्थित हो. म्हणजे निरतिशय आनंदरूप होऊन राहशील, १३.

**सर्ग १४**—देवसभेत ऐकलेल्या भुशुंडास पाहण्याच्या इच्छेनें वसिष्ठाचें गमन. मेरु व त्याचें शृंग याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—त्या अनंत तत्त्वाच्या एकदेशांत ( एका सूक्ष्म भागांत ) हा जगद्रूप परिस्पंद उठला आहे. कमलोद्भव ब्रह्मा त्याचें निमित्त झाला आहे. भूतसमूहरूप भ्रम निर्माण करणारा तो ' पितामह ' या संज्ञेस पात्र झाला आहे. त्याचा हा मी श्रेष्ठ मानसपुत्र असून, सप्तर्षिचक्रांत निवास करतों. मी एकदां इंद्राच्या सभेंत असतांना नारदादिकांच्या तोंडून अति दीर्घकाल जिवंत राहणाऱ्या महात्म्यांची कथा ऐकली. कथाप्रसंग चालला

असतां तेथें शातातप नांवाचा मौनी, मानी व महामति मुनि म्हणाला, " मेरूच्या ईशानकोणस्थ पद्मरागमय स्वर्गांत शृंगेचूत या नांवाचा श्रीमान् कल्पवृक्ष आहे. त्यावर दक्षिणेकडील शाखेच्या ढोलींत एक पक्ष्यांचें घरटें आहे. त्यांत भुशुंड या नांवाचा एक कावळा राहतो. ब्रह्मा जसा आपल्या कमळांत, त्याप्रमाणे तो विरक्त पक्षी आपल्या त्या मोठ्या कोशांत निवास करतो. जगत्कोशांतील देवाप्रमाणें तो तेथें चिरकाल जिवत आहे. हल्लीं त्याच्या इतका चिरजीवी या स्वर्गांत कोणीच नाहीं. व पुढेही कोणी होईल कीं नाहीं याची शंकाच आहे. तो जसा दीर्घायु तसाच विरक्त श्रीमान्, महामति, चित्तविश्रांतियुक्त, म्हणूनच शांत, सुंदर व कालज्ञ आहे. तो पक्षी जसा जिवंत राहतो त्याप्रमाणें जर जिवत राहिलें तरच तें दीर्घ जीवित पुण्यकारक व उदयसंपन्न होतें!

रामा, शातातपाचें हें भाषण ऐकून पुष्कळांनीं त्याला तेथें त्याच्याविषयीं अनेक प्रश्न विचारले व त्यानेंही देवसभेंत सर्व यथार्थ सांगितलें. नंतर कथाप्रसंग शांत होऊन देवसंघ उठून गेला असतां मी मोठ्या कौतुकानें त्या भुशुंड पक्ष्यास पाहण्याकरितां एका क्षणात मेरुपर्वतावर गेलों. जेथें तो कावळा राहत होता, तें मेरूचें शृंग फार मोठें व पद्मरागमणिमय होतें. रत्नें व गेरु यांच्या योगानें तें सुंदर झालें होतें. अग्नीसारखें त्याचें तेज होतें. तें दश दिशांस रंजित करीत होतें. ते कल्पाताग्नीच्या ज्वालेप्रमाणें दिसत होतें. त्याच्याकडे पाहून सुमेरुवनदेवीनें लीलेनें चंद्राला धरण्यासाठीं वर केलेल्या तिच्या हस्ताग्राचाच भास होत होता. त्या सुंदर शृंगाचा आश्रय करून अनेक तापस, देव, व गंधर्व रहात होते. त्यावर फुललेल्या दिव्य पुष्पांचा घमघमाट सभोंवार पसरला होता. नानाप्रकारच्या कमलाच्या योगानें व नक्षत्ररूपी रत्नांनीं तें एकसारखेंच विभूषित झालें होतें. तें मेरूचें पिंगल शिखर जणुं काय आकाशाच्या पार गेलें होतें. सारांश शुभ्र, हिरव्या, पिवळ्या, लाल व धवल वर्णांच्या पुष्पराशींनीं तें अति विचित्र झालेलें असल्यामुळें देवस्त्रियांचें लीलास्थानच होऊन राहिलें होतें १४.

**सर्ग १५—त्या शृंगावरील वृक्ष, त्यावरील पुष्पें व पक्षी, त्याच्या शाखेवरील काककुल व त्यांतील भुशुंड यांचें वर्णन.**

श्रीवसिष्ठ—त्या पुष्पमय शिखराच्या मस्तकावर जणुं काय शाखाचें चक्रच असा तो वृक्ष मीं पाहिला. त्या पर्वतशृंगांचेंही शृंगच, असा तो आपल्या उंचीनें आकाश जिंकणारा आम्रवृक्ष माझ्या दृष्टीं पडला. नक्षत्रांनीं त्याच्यावरील पुष्पांस दुप्पट केलें. मेघानीं पल्लवास द्विगुणित केलें. सूर्य-किरणांनीं त्याच्यावरील पुष्पपरागास वाढविलें. व विजांनीं मंजऱ्याच्या शोभेंत भर घातली. त्याच्या शाखावर बसून किन्नरी गात होत्या. अप्सरा झोंपाळ्यावर बसून झोंके घेत होत्या. सिद्ध, गंधर्व, व किन्नरही त्यावरील पक्ष्याच्या संख्येंत भर घालीत होते. श्रेष्ठ देव व विद्याधरही त्याच्या आश्रयानें सुख भोगीत होते. त्या सुंदर वृक्षावर पुष्प-पर्णादिकांचा आश्रय करून राहिलेले असंख्य पक्षीही होते. ब्रह्मदेवाच्या हंसापासून झालेले हंस, अग्नीच्या पोपटापासून झालेले पोपट, षडाननाच्या मोरापासून झालेले मोर, व असेच दुसरेही अनेक आकाशचर श्रेष्ठ पक्षी तेथें घरें करून वास करीत होते. दोन चोंचींचे भारद्वाजपक्षी, ज्याना सुवर्णशिखा आहे, असे पक्षी, चिमण्या, गिधाडे, कोकिल, क्रौंच, कुक्कुट, भास, चाष, बलाका, व हे राघव, असेच आणखी दुसरेही पुष्कळ पक्षी त्या वृक्षावर होते. जगामध्यें जसे विविध प्राणिसमूह असतात, त्याचप्रमाणें तेथें विविध प्राणिसंघ मला दिसले.

त्या चूतवृक्षाची फारच लांब व पानांनीं भरलेली दक्षिण शाखा मी अंतरिक्षांतूनच पाहिली. तिच्यावर डोम कावळ्याचें मंडल निवास करीत होतें. तेथें मी जों पाहूं लागलों, तों ज्यात विचित्र पुष्पाचें आस्तरण घातलें आहे. ज्यामध्यें विचित्र सुवास येत आहे व जें स्वर्गांतील सुखभोगास योग्य आहे, असें एकातात असलेलें स्कधकोटर मला दिसलें. त्यांतील सभेंत शांत्यादिगुणयुक्त वायस अक्षुब्ध होऊन बसले होते. ते सर्व मेघा-सारखे काळेकुट्ट होते. त्याच्या मध्यभागीं सर्वांपेक्षा उंच व श्रीमान् भुशुंड बसला होता. तो पूर्णचित्त, मान्य, सम, सर्वांगसुंदर, प्राणस्पंदाचा निरोध केल्यामुळें नित्य अंतर्मुख, सुखी, फार दिवस जिवंत राहिल्यामुळें चिरजीवी या यथार्थ नांवाने प्रसिद्ध असलेला, अनेक युगांची उत्पत्ति व नाश, याना पाहिल्यामुळें प्रौढचित्त झालेला, प्रत्येक कल्पामध्यें खिन्न मनानें, लोकपाल, शंकर, वायु इत्यादिकांच्या जन्माची गणना करणारा, मागें

होऊन गेलेले सुर, असुर व राजे यांस आठवणारा, प्रसन्न व गंभीर मनानें युक्त असलेला, चतुर, स्निग्ध व सुंदर भाषण करणारा, अति सूक्ष्म अर्थाचेंही स्पष्ट प्रतिपादन करणारा, विज्ञाता, निर्मम, निरहंकार, सर्वांचा सुहृत्, बंधु, मित्र, मृत्यूला पुत्राप्रमाणें प्रिय झालेला, व बुद्धीनें देवगुरूचा-ही प्रभु होता. कारण सर्व प्राण्यांच्या सर्व आरोपांचें अधिष्ठान असल्यामुळें तो सर्व प्रकारें सत्य व वर्णनसमयीं सर्वसंमत होता. तो एकाद्या सरोवरा-प्रमाणें सौम्य, प्रसन्न, मधुर, रसवान्, हृदयंगम व व्यवहारज्ञ होता. १५

**सर्ग १६**—वसिष्ठाचे भुशुंडाच्या सन्मुख गमन, आदर-सत्कार, व जन्मकर्मा-विषयीं त्यास प्रश्न.

**श्रीवसिष्ठ**—रामा, आकाशांतून जसें एकादें नक्षत्र गळून पडावें, त्याप्रमाणें मी दीप्त शरीरानें त्याच्या समोर वरून उतरलों. त्यामुळें त्याच्या सभेंत किंचित् क्षोभ उत्पन्न झाला. अकस्मात् पुढें उतरलेल्या मला पाहून प्रथम चकित झालेल्याही भुशुंडानें मागून मला ओळखिलें. लागलाच तो पानांच्या ढिगावरून उठला. आणि ‘हे मुने, तुझें स्वागत असो’ असें मधुर वचन बोलला. त्यानें संकल्पाबरोबर उत्पन्न झालेल्या हातांनीं मला पुष्पांजलि समर्पण करून करून हें आसन असें म्हटलें. व त्या कल्पतरूचें एक नवें पान बसाव-यास दिलें. सभेंतील सर्व पक्षी माझ्या आसनाकडे दृष्टि लावून उभे आहेत असें पाहून मीं त्या पर्णासनावर बसलों. तेव्हा मला अर्घ्यादि उपचार समर्पण करून अतिशय संतुष्टचित्त झालेला महा तेजस्वी भुशुंड स्नेहानें मला असें मधुर वचन बोलला—

**भुशुंड**—अहो भगवन्, तुम्ही फार दिवसानीं मजवर हा प्रसाद केलात. कारण सद्वृक्षच अशा या आम्हांवर तुम्हीं आज हा दर्शनामृताचा सेक केला आहे. मुने, माझ्या मोठ्या भाग्यानें आज आपण कोठून आगमन केलेंत ? या महा मोहामध्यें चिरकाल विहार करीत असलेल्या तुमच्या पावन चित्तात समता अखंडित वास करीत असतेना ? या आगमन-क्लेशानें अंतरात्म्याला खिन्न का केलेंत ? आपलें वचन श्रवण करण्यास उत्सुक असलेल्या आम्हांस कांहीं आज्ञा करा. हे मुने, तुमच्या पाददर्श-नानेंच मी सर्व जाणलें आहे. आपण आपल्या आगमनपुण्यानें आम्हांला

कां पावन केलेंत, तें मी समजलों. चिरकाल जिवंत असलेल्या महात्म्यांच्या वर्णनप्रसंगानें माझें स्मरण झालें व त्यामुळें या चरणांनीं माझ्या स्थानास पवित्र केलें आहे. पण मुने, याप्रमाणें मला जरी तुमच्या आगमनाचें कारण ठाऊक आहे, तरी तुमचें मधुर वाक्य ऐकण्याच्या इच्छेनें मी तें आपणालाच विचारतों.

राघवा, त्या ज्ञानी चिरंजीवी पक्ष्यानें असें म्हटलें असतां मी त्यास बोललों, " हे महाराज विहंगमा, तूं म्हणतोस तें खरें आहे. तुज दीर्घायूलाच पहावयास मी आलों आहें. मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं, तूं कुशलवान् व शीतलचित्त आहेस. तूं ज्ञानी आहेस व या भवजालांत पडला नाहींस. यास्तव भगवन् खरें खरें सांगून माझा हा संशय घालीव. तूं कोणत्या कुलांत उत्पन्न झालास ? सर्व ज्ञेय तुला कळलें कसें ? हे साधो, तुझें वय किती आहे ? तुझ्या पूर्व वृत्ताचें स्मरण तुला आहे का ? तुज दीर्घदर्शीला येथें निवास करावयास कोणी सांगितलें ?

भुशुंड—मुने, तूं जें विचारीत आहेस तें सर्व मी सांगतों. महात्म्यानें उद्विग्न न होता मोठ्या यत्नानें कथा श्रवण करावी, असा नियम आहे. कारण तुमच्या सारखे उदारबुद्धि महात्मे ज्या वृत्ताताला ऐकतात त्याच्या योगानें ते, वक्ता व इतर श्रोते याच्या अशुभाचा नाश करितात. १६.

**सर्ग १७**—जीवन्मुक्तोचित गुणानीं युक्त असलेला भुशुंड आपलें वृत्त सांगूं लागला, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—हे रामचंद्रा, नंतर इष्टार्थलाभानें हृष्ट न होणारा, सरलस्वभाव, स्निग्ध व गंभीर वचनानें युक्त असलेला, स्मितपूर्वक संभाषण करणारा, हातांतील बिल्वफलाप्रमाणें त्रिभुवनास ओळखणारा, सर्व भोग–समूहास तृणाप्रमाणें तुच्छ समजणारा, विषयांविषयीं पूर्ण विचार करून त्याचें फल जन्म–मरणलक्षण संसार आहे, असें जाणणारा, ज्ञानाच्या योगानें परापर ब्रह्मास जाणणारा, चित्तात गंभीर व स्थिर असणारा, संतुष्ट, शुद्ध, क्षीरसागरासारखा अगाधाशय, बाहेरून विश्रांतचित्त व आंतून आनंदचित्त, सर्व वस्तूंचे आविर्भाव व तिरोभाव ( उत्पत्ति व नाश ) यास जाणणारा भुशुंड माझ्या प्रश्नाचें उत्तर द्यावयास प्रवृत्त झाला. तत्काल त्याला सुंदर मुख प्राप्त झालें. उत्कृष्ट गायकाच्या आलापा-

प्रमाणें त्याची वाणी मधुर व हृद्य झाली. त्याचें शरीर सर्वांचें भय घालविणारें म्हणजे अति सौम्य झालें. नंतर अतिशय हृष्ट झालेला तो मधुर वाणीनें मला आपलें सर्व स्वरूप सांगण्यास प्रारंभ करिता झाला. १७.

सर्ग १८—स्वजन्मवृत्त सांगण्याकरितां भुशुंड प्रथम शंकर, त्याचे गण व मातृका यांचें व त्यांच्या पानादि लीलांचें वर्णन करितो.

भुशुंड—या जगांत सर्व देवांस पूज्य झालेला हर नांवाचा देवश्रेष्ठ आहे. आम्रवृक्षावरील पुष्पगुच्छयुक्त वेलीप्रमाणें तरुण भवानी त्याच्या अर्धशरीरीं वास करिते. त्याच्या जटेमध्यें त्रिभुवनाचा उद्धार करणारी गंगा सुंदर भूषण होऊन राहिली आहे. क्षीरसागरांतून निघालेला व अमृतस्राव करणारा शोभावान् चंद्रमा त्याचा चूडामणि झाला आहे. त्याच्या कंठांतील कालकूट, मस्तकावरील चंद्राच्या सततस्रावानें शांत होऊन त्याचें एक भूषण झालें आहे. त्याच्या अंगावरील भस्मपंक्ति हें ज्ञानचिह्न असून त्याच्या द्वारा तो देव ज्ञानाग्नीनें जाळलेल्या मायेचा व तिच्या जगत्कार्याचा बाध स्पष्ट सुचवीत असतो. त्याच्या शरीरावरील कपालादि अस्थि हींच सुंदर रत्नें होत. आकाश हेंच त्याचें वस्त्र असून तें तारकारूपी बिंदूंनीं सुशोभित केलेलें आहे. श्मशान हेंच त्याचें सुंदर बहिर्गृह होतें. अनेक विकृतवेषधारी गण व मातृदेवता हाच त्याचा आप्त परिवार होता. गणांप्रमाणेंच माताही भयंकर चेष्टांनीं युक्त असून त्या सर्वांनीं मुडाच्या माळा घातल्या होत्या. त्यांचीं तोंडें, केंस, नेत्र, दांत, हात, पाय, पोटें इत्यादि सर्व अवयव विचित्र होते. जया, विजया, इत्यादि आठ माता मुख्य असून बाकीच्या त्यांच्या अनुगामिनी होत्या.

हे मुनिनायका, त्या महायोग्य मातांमध्यें अलंबुसा म्हणून एक माता असून चंड या नांवाचा एक काक तिचें वाहन होता. त्याचा रंग मेघासारखा काळा व चोंच वज्रासारखी कठिण होती. एकदा भयंकर चेष्टा करणाऱ्या व अष्ट ऐश्वर्यानें युक्त असलेल्या त्या (अष्टमातृका) कांहीं निमित्तानें आकाशांत एकत्र जमल्या. त्यांनीं चित्ताच्या ऐकाग्र्यानें परमार्थतत्त्वप्रकाशक पानोत्सव तेथें केला. तुंबरुनांवाच्या रुद्राच्या वामभागीं बसून त्यांनीं त्याची उपासना केली. जगत्पूज्य अशा तुंबुरु व भैरव देवाची पूजा करून मदिरामदानें मत्त झालेल्या त्यांनीं विचित्र कथा सांगण्यास आरंभ केला.

बोलतां बोलतां त्यांच्यामध्यें असें भाषण सुरू झालें. हा उमापति देव आमच्याकडे असा अवहेलनेनें कां पाहतो ? आपण याला आतां आपला प्रभाव दाखवूं या, म्हणजे पुनः तो आपली अशी अवधीरणा ( अवज्ञा, तिरस्कार ) करणार नाहीं.

असा निश्चय करून व आपल्या सिद्धीच्या योगानें उमेचें मुख व वर्ण बदलून त्यांनीं मोठ्या आदरानें यज्ञांतील पशूप्रमाणें तिचें प्रोक्षण केलें. व मायेनें आपल्या मंडलांत आकर्षण करून आणलेल्या तिला चतुर्विध अन्नरूप करण्याकरिता जणुं काय शाप दिला. ज्या दिवशीं मातृदेवतांनीं ही चेष्टा केली, त्या दिवशीं त्यांचा मोठा उत्सव सुरू झाला. त्या नाचूं लागल्या; गाऊं लागल्या; मोठमोठ्यानें हसूं व ओरडूं लागल्या. त्यांनीं आपल्या कोलाहलानें आकाशास भरून सोडलें. त्या भयंकर हातवारे करूं लागल्या. सारांश, देवी पार्वतीला अन्नरूप करून, शंकराची खोड मोडून त्याला आपला प्रभाव दाखविण्याकरिता त्यांनीं हें सर्व केलें. १८.

**सर्ग १९**—भुशुंडाचा जन्म, ज्ञान व स्थानप्राप्ति.

भुशुंड—यांप्रमाणें त्या सर्व मातृदेवता महोत्सव करूं लागल्या असता त्यांच्या उत्तम वाहनांनींही उन्मत्त होऊन त्यांचेंच अनुकरण केलें. हंस, काक, शुक, मयूर इत्यादि पक्षीही आसवपानादि करून नाचूं लागले. इतक्यांत आकाशाच्या एका भागांत ब्राह्मीमातेच्या रथाच्या हंसी आनदानें नाचत होत्या. तेथें त्यांचा विलास पाहणारा अलंबुसेच्या रथाचा काक ( चंड ) उभा होता. आसवपानानें तोही मत्त झाला होता. त्यांचा परस्पर प्रेमसंबंध जडला. आणि आपापल्या जातीचें भान विसरून त्यांनीं आपसांत रतिसंयोग केला. त्या हंसी काकाशीं रत झाल्या. ब्राह्मीच्या रथाला सात कुलीन हंसी असतात. त्या सर्वजणींनीं चंड काकाला आपला प्रिय केलें व तोही त्यांचा दयित होऊन क्रमानें त्यांच्याशीं रममाण झाला.

पण अतिशय संतुष्ट झालेल्या त्या सृष्टिनियमाप्रमाणें गर्भवती झाल्या. तों तिकडे त्या मातृदेवतांचा उत्सवही समाप्त होण्याची वेळ आली. त्यांनीं अन्नरूप झालेल्या पार्वतीलाच शंकराच्या अन्नपात्रांत घातलें. पण तें त्यांचें कपट ओळखून भगवान् शंकर रागावला. तेव्हां त्याचा राग शांत करण्या-

करितां देवतांनीं आपापल्या अंगांपासून पार्वतीला निर्माण करून पुनः विवाहविधीनें ती त्याला दिली. तेव्हां देवी, हर व त्या दोघांचा परिवार संतुष्ट झाला व स्वेष्टस्थानीं गेला.

हे मुनीश्वरा, ब्राह्मीच्या हंसी गर्भवती झाल्या, असें मीं नुक्तेंच सांगितलें आहे. थोड्याच वेळानें तें त्याचें रहस्य ब्राह्मीला कळलें. तेव्हां ती उदार माता त्याना म्हणाली, "बायांनो, तुम्ही आतां गर्भवती झाल्या आहां. यास्तव तुम्हीं माझ्या रथाच्या उपयोगी नाहीं. तुमच्या हातून रथ ओढण्याचे कष्टही होणार नाहींत, यास्तव तुम्हीं आतां कांहीं दिवस स्वैर संचार करा." गर्भाच्या भारानें मंद झालेल्या हंसींना असें सांगून दयाळु ब्राह्मी निर्विकल्प समाधींत सुखानें स्थित झाली. हंसीही उदरस्थ गर्भांचा सांभाळ करीत ब्रह्मदेवाच्या कमलवनांत कमलपत्रांवर राहूं लागल्या. कांहीं दिवसानीं वेली जशा अंकुरांना प्रसवतात, त्याप्रमाणें त्यांनीं त्याच कमलवनात मृदु अंडीं घातलीं. प्रत्येकीचीं तीन तीन याप्रमाणें तीं एकदर एकवीस होतीं. त्यांतील गर्भ पूर्ण होतांच तीं फुटलीं. व हे मुने, त्यांतून हे आम्हीं एकवीस भाते उत्पन्न झालों. आम्हीं चंडकाकाचे पुत्र आहों.

आम्हीं सर्व त्याच कमलवनांत प्रत्यहीं वाढूं लागलों. योग्य समयीं पंख फुटून आम्हीं आकाशांतून संचार करण्यास समर्थ झालों. नंतर आम्हीं आपापल्या मातांसह समाधिस्थ ब्राह्मीदेवीची आराधना केली. पुष्कळ दिवसांनीं ती देवी समाधि सोडून उठली आणि बा मुने, प्रसाद करण्यास उन्मुख झालेल्या तिनें आमच्यावर असा अनुग्रह केला कीं, त्यामुळें आम्ही मुक्त होऊन राहिलों आहों. देवीचा अनुग्रह झाल्यावर आमचे मन अतिशय शांत झालें व आतां आपण कोठें तरी एकान्तांत जाऊन स्वस्थ बसावें, असा निश्चय करून पित्याच्या समीप गेलों. तेव्हां त्यानें आम्हाला आलिंगन दिलें. अलंबुसेनेंही आमचा सत्कार केला. तिनें प्रसाददृष्टीनें पाहतांच आम्ही तेथें विनयादि गुणांनीं बद्ध होऊन राहिलों. एकदां आमच्या पित्याशीं आमचा असा संवाद झाला.

चंड—"पुत्रांनो, अनंत वासनातंतूंनीं विणलेल्या या अतिशय कठिण संसारजालांतून तुम्हीं निघालां आहां काय ? नसाल तर मी या भृत्यवत्सल भगवतीची प्रार्थना करतों, म्हणजे तुम्ही ज्ञानपारग व्हाल."

त्यावर आम्हीं म्हटलें, " भगवान्, ब्राह्मीदेवीच्या प्रसादानें आम्हीं सर्व ज्ञेय जाणलें आहे. पण आतां आम्हांला चित्तविश्रांतीचा अभ्यास करण्याकरितां उत्तम एकांतस्थान पाहिजे आहे. "

चंड—"पुत्रांनो, सर्व रत्नांचा आधार व सर्व देवांचें आश्रयस्थान, असा मेरु या नांवाचा अतिशय उंच पर्वत आहे, ज्यांत चंद्र व सूर्य हे दोन दीप लावले आहेत, अशा ब्रह्मांडमडपाचा तो सोन्याचा आधारस्तभच आहे, असें म्हटलें तरी चालेल. त्यावर चंद्राकार सुवर्णपीठें आहेत. तो पर्वत म्हणजे भूमीचा वर केलेला हात असून रत्नमय शिखरें ह्याच त्याच्या अंगुली आहेत. एकाद्या सम्राटाच्या सभोंवार बसणाऱ्या राजांप्रमाणें अनेक लहान मोठे पर्वत त्याच्या सभोंवार स्थित आहेत. त्याची उंची व विस्तार याचें प्रमाण कोणालाही कळत नाहीं. देव, गंधर्व, किन्नर इत्यादि सर्वांना हा अतिशय पूज्य आहे. सर्व भूतें ( प्राणी ) याच्यावर उपजीविका कारितात. सुवर्णादि विविध धातु व रत्नें जशीं त्यावर आहेत तसेच नानाप्रकारचे वृक्ष, वेली, फुलझाडें, ओषधि, वनस्पति, फळें, मूळें, इत्यादि स्थावर प्राणी व सर्प, पशु, पक्षी, इत्यादि जंगमजीवही त्याच्या आश्रयानें रहातात. यास्तव पुत्रांनो, तुम्ही त्या पर्वतावर जा. तें स्थान म्हणजे देवांचा एक दृढ, दुर्ग व पक्ष्यांचें एक रम्य घरटें आहे. तेथें जाऊन तुम्हीं राहिलात म्हणजे भोग व मोक्ष या दोवांचाही तुम्हाला निर्विघ्नपणें लाभ होईल.

असें सांगून आमच्या बाबानें आम्हांला आलिंगन दिलें व आमचें प्रेमानें चुंबन घेतलें. त्यानें देवीकारितां आणलेलें मांस आम्हाला खावयास दिलें. तेव्हां तें खाऊन व देवी आणि पिता चंड यांच्या चरणावर मस्तक ठेवून आम्ही त्या अलंबुसेच्या विंध्यकच्छस्थ स्थानांतून निघालों. क्रमानें आकाशाचें उल्लंघन करीत वायुमार्गानें जात असतांना आम्हांला मध्यें अनेक आकाशचर देव, सिद्ध, मुनि, गंधर्व इत्यादि भेटले. त्यांस वंदन करून आम्ही सूर्यलोकाच्या पलीकडे गेलों. अमरावतीला आम्ही दुरूनच पाहिलें. कारण आम्हां निष्कामांना तिच्यामध्यें कांहीं विशेष असेल, असें वाटलेंही नाहीं. असो; बा मुनीश्वरा, पुढें आम्ही थेट ब्रह्मलोकास गेलों. तेथें जातांच माता व ब्राम्हीदेवी यांना पित्याची आज्ञा कळवून आम्ही

त्यांच्या संमतीनें मेरूवर जाण्याची इच्छा दर्शविली. तेव्हां देवी व आमच्या सातही हंसी माता यांनीं आम्हांस प्रेमानें आलिंगन व आशीर्वाद दिला असतां, त्याच्याच योगानें उत्साहसंपन्न होऊन आम्ही इष्टस्थानीं जावयास सज्ज झालों. त्या पूज्य देवींना नमस्कार करून ब्रह्मलोकाहून निघालों. लोकपालांच्या सूर्यासारख्या दीप्त नगरींचें उल्लंघन करून आम्ही सर्व भ्राते या पर्वतावरील कल्पवृक्षापाशीं आलों, आणि जणुं काय आमच्याच साठीं सज्ज करून ठेवलेल्या या घरट्यात शिरलों. हे मुने, तेव्हांपासून आम्ही येथें मौनाचा आश्रय करून निर्बाधपणें राहत आहों.

मुनिवर्य, आपल्या इच्छेप्रमाणें, आम्ही कसे झालों, येथें कसे येऊन राहूं लागलों, आम्हाला बोध कसा झाला व आमच्या बुद्धि शांत कशा झाल्या, हें सर्व मीं सांगितलें आहे. आतां आणखी काय ऐकण्याची इच्छा आहे, त्याची आज्ञा करा. १९.

**सर्ग २०**—प्रतिकल्पांतील जगाचें साम्य, भ्रात्यांचें मरण व भुशुंडाचें प्रळयसमयींही चित्तस्थैर्य.

भुशुंड—मुने, फार प्राचीन काळीं आम्ही या वृक्षावर येऊन राहिलों असें मी वर म्हटलें आहे. पण त्यावर कल्पान्ताचे वेळीं सर्व पदार्थांचा नाश होत असल्यामुळें हाच तो वृक्ष असें कसें म्हणतां ? अशी शंका तुम्ही घेऊं नका. कारण प्रळयसमयीं पदार्थमात्राचा लय जरी होत असला, तरी सृष्टिसमयीं ते सर्व पुनः जसेच्या तसेच उत्पन्न होत असल्याकारणानें तोच हा असें आम्हांस ओळखतां येतें. कारण मनुष्यादि जीव जेव्हां निजतात, तेव्हां त्यांना सर्व पदार्थांचें विस्मरण होतें. फार काय, पण 'हा मी' एवढेंही ज्ञान त्यांना त्यावेळीं नसतें. पण जागे होतांच त्यांना पूर्वींचे सर्व पदार्थ जसेच्यातसेच दिसतात कीं नाहींत ? व त्यांच्या आकारामध्यें भेद पडत नसल्यामुळें, तेच हे असेंही त्यांना वाटतें कीं नाहीं ? त्याचप्रमाणें प्रलयकालींही सुषुप्त पुरुषाप्रमाणें असणाऱ्या मला सृष्टिकालीं हे सर्व पदार्थ तेच आहेत, असें भासतें. आणि त्या कारणानें मी भूतकालचें वृत्तही अभ्यासामुळें वर्तमानवृत्तासारखें वर्णिलें. कारण हे मुनींद्रा, अनेक कल्पांचें सदा साम्यच माझ्या अनुभवास आलें आहे. दीर्घ कालापासून संचित केलेल्या पुण्यानें आज माझें जन्म सफळ

झालें. कारण आज मी आपल्या चरणांस निर्विघ्नपणें पहात आहें. हें आमचें घरटें, ही वृक्षशाखा, हा मी व हा वृक्ष अशीं सर्व आज आपल्या दर्शनानें पावन झालीं आहेत. प्रभो, या पक्ष्यानें दिलेलें हें अर्घ्य व हें पाद्य घेऊन व त्याला पावन करून बाकीच्या सेवेची आज्ञा करा.

श्रीवसिष्ठ—रामा, असें मोठ्या आदरानें बोलून आणि 'हें पाद्य व हें अर्घ्य?' असें वारंवार म्हणून तो मला तें देऊं लागला असता मी असें बोललों, "हे महाधीरा, पक्षींद्रा, तुझे ते भ्राते कोठें आहेत? येथें मला तूं एकटाच दिसत आहेस; म्हणून विचारतों."

भुशुंड—मुने, येथें राहणाऱ्या आमचा फार मोठा काळ निघून गेला. आजवर अनेक युगपरंपरा क्षीण झाल्या आहेत. त्यामुळें एवढा मोठा अवकाश लोटला असता माझे सर्व अनुज आपापल्या शरीरास तृणाप्रमाणें सोडून कल्याणपदीं लीन झाले आहेत. कारण कोणी कितीही दीर्घायु, मोठा बलाढ्य व महात्मा संत जरी असला तरी सर्वभक्षक काल त्याला गट्ट करून सोडतो.

श्रीवसिष्ठ—पण भुशुंडा, कल्पांताचे वेळीं सर्व भूतसमूहामध्यें विलक्षण व भयंकर क्षोभ उत्पन्न होत असल्यामुळें हा कल्पवृक्ष राहतो कसा? व तुला त्यावेळीं खेद कसा होत नाहीं? कारण महावात, बारा आदित्य, कल्पान्तमेघाची वृष्टि याच्या योगानें त्यावेळीं सृष्टींतील प्रत्येक पदार्थ क्षीण होत असतो. सर्वांची नुस्ती राखच होऊन रहात नाहीं, तर ती राखही नामशेष होऊन कोठल्या कोठें जाते, तेंही कळत नाहीं. तेव्हां अशा प्रसंगीं तुझी व या वृक्षाची स्थिति कशी होते?

भुशुंड—मुने, संकटप्रसंगीं महात्म्यांनाही जर खेद होतो तर पक्षियोनींत पडलेल्या मलाही खेद झाला तर त्यात नवल कसलें? तथापि विवेकाच्या प्रभावानें मला तो भासत नाहीं. ब्राह्मणा, आमची ही पक्षियोनीच कशी आहे ती पहा. आकाश हा तिचा आश्रय आहे, व सर्व लोक तिची अवहेलना करितात. त्यामुळें आमची जीविका इतरांच्या जीविकेच्या अपेक्षेनें अगदीं तुच्छ आहे. पण असल्या तुच्छ योनीमध्येंही विधात्यानें प्रीतीनें जीविका निर्माण केली आहे, हें मोठें आश्चर्य होय. हे प्रभो, असल्या जातींत उत्पन्न झालेल्या, चिरकाल जिवंत राहणाऱ्या व

आशापाशांनीं बद्ध झालेल्या पक्ष्याला शोक झाल्यावांचून कसा राहील? पण हे भगवन्, आम्हीं आत्मसंतोषाचा आश्रय करून राहिलों आहों. निःस्वरूप वस्तूविषयीं भ्रांत होऊन आम्ही कधीं आसक्त होत नाहीं. आम्ही केवल स्वभावप्राप्त अवस्थेंत संतुष्ट असतों. परपीडादि कष्टकर चेष्टा कधीं करीत नाहीं. आम्हीं आपल्या या आलयांत राहून केवल कालक्षेप करीत असतों. या कर्मदेहाला आम्ही जीवितापासून व मरणापासूनही हटवीत नाहीं. सर्व कामना सोडून नित्य सिद्ध निरतिशयानंदात्मस्वभावानें आम्ही राहतों. आम्ही लोकांच्या जन्म-मरणादि दशा पाहिल्या आहेत. हें सर्व मिथ्या आहे, असा निश्चय करविणाऱ्या स्वप्नादि दृष्टान्तदृष्टीचा विचार केला आहे. खरोखर आमच्या मनानें या चंचल शरीराची आस्था सर्वथा सोडली आहे. त्यामुळेंही कल्पान्त होईतों या कल्पवृक्षाच्या प्रभावानेंच आम्हाला खेद होत नाहीं. पण कालाची कला प्राणापानांच्या प्रवाहानें ( स्वरोदयशास्त्रप्रसिद्ध उपायानें ) आम्हांला समजते. या उच्च पर्वतावर सदाप्रकाश असल्यामुळें दिवस व रात्र याचा निर्णय होत नाहीं, तथापि आम्हांला आमच्या सूक्ष्म बुद्धीनें कालक्रम कळतो. त्यामुळें मला प्रलयसमयींही फारसा खेद होत नाहीं. शिवाय माझें मन स्थिर झालेलें आहे. ज्ञानामुळें तें विश्रांतियुक्त झालें आहे. संसारव्यवहारजन्य आशापाशांनीं मी परतंत्र होत नाहीं. शांत व धीर दृष्टीनें आम्ही जगन्मायेस पहात असतों. भयंकर दशामध्येंही आम्ही स्फटिकाप्रमाणें निर्मल असतों. त्यामुळें आम्हाला खेद होत नाहीं. आम्ही जगत्तत्त्वाचा वारंवार विचार करीत असतों. त्यामुळें आम्हाला मोहजन्य खेद होत नाहीं. भगवन्, सर्व भूतें अवश्य नाश पावणारीं आहेत, हें जर निश्चित आहे, तर त्यास भय कसलें? कालसागरात वेगानें जाऊन मिळणाऱ्या संसारनदीच्या तीरावर आम्हीं तटस्थ होऊन उभे आहों. आम्ही प्राप्त झालेल्या अनिष्टाचा त्याग करीत नाहीं. अप्राप्ताचें ग्रहण करण्याची इच्छा धरीत नाहीं. केवल शरीरस्थितीच्या उपयोगी असलेला व्यवहार मोठ्या सावधान चित्तानें करतों. पण व्यवहाराचा उच्छेद करणारी आमची दृष्टि मात्र अतिशय क्रूर आहे. आम्हावर तुमच्यासारख्या शोक–भयरहित व संतुष्ट पुरुषोत्तमाचा मोठा अनुग्रहही आहे. त्यामुळें आम्हांला कशाचेंही

भय वाटत नाहीं. खेदही आमच्या मनाला शिवत नाहीं. आमचें मन व्यवहारापुरतें इतस्ततः जात असलें, तरी रागादिवृत्तींमध्यें आसक्त होत नाहीं. तें नेहमी परमात्मतत्त्वामध्यें लीन झालेलें असतें. भगवन्, आपल्या आगमनानें तर आज आम्हांला अवर्णनीय धन्यता प्राप्त झाली आहे. आपल्यासारख्या निरिच्छ संतांनींही मजवर अशा रीतीनें येथें येऊन अनुग्रह करावा, यापेक्षा आणखी अधिक कुशल कोणतें असणार? केवळ आरंभीं रम्य वाटणाऱ्या भोगांपासून कोणता लाभ होणार आहे? सत्संगचिंतामणीपासून सर्व सार प्राप्त होत असतें. हे मुने, या त्रैलोक्यकमलकोशांत, स्निग्ध, गंभीर, उदार व धीर वाणीनें व मनानें युक्त असणारे आपणच एक धन्य आहां. अहाहा! खरेंच परमात्म्यास जाणणाऱ्याही माझें पाप आज आपल्या दर्शनानें नष्ट झालें आहे, आणि जन्म व हें दीर्घ जीवित सफल झालें आहे, असें मी समजतों. कारण साधुसंग सर्व भयाचा अपहार करणारा आहे २०.

**सर्ग २१**—कल्पवृक्षाचें माहात्म्य, प्रलयांतील स्थिति, नियति व विचित्र स्मृति.

**भुशुंड**—भगवन्, घोर युगक्षोभ झाले, तरी हा अतिशय स्थिर असलेला कल्पवृक्ष कधींही कंपायमान होत नाहीं. लोकान्तरीं विहार करणाऱ्या सर्व भूतांना हा वृक्ष अगम्य आहे. याच्यापर्यंत कोणतेंही भूत पोंचूं शकत नाहीं. त्यामुळें हे साधो, मी येथें सुखानें राहतों. हिरण्याक्षानें सप्तद्वीपवेष्टित धरापीठाला ( पृथ्वीला ) जेव्हां हरण केलें, तेव्हां दिव्य प्रभावामुळें हा वृक्ष कांपला नाहीं. वराहानें जेव्हां पृथ्वीची पुनः प्रस्थापना केली, तेव्हां तिचा तोल सारखा रहावा म्हणून तिच्यावर दुसरे अनेक पर्वत ठेवले. त्यावेळीं मेरुपर्वतही कांपला; पण या वृक्षामध्यें मुळींच क्षोभ झाला नाहीं. नारायणानें आपल्या हातांच्या भारानें मेरूला वांकवून मंदराला जेव्हां उपटलें, तेव्हांही हा वृक्ष डगमगला नाहीं. जेव्हां देव व असुर यांच्यामध्यें क्षोभ उत्पन्न होऊन चंद्र–सूर्य–मंडलेंही पडलीं, व सर्व जगांत अस्वास्थ्य उत्पन्न झालें, तेव्हांही हा चंचल झाला नाहीं. जेव्हां प्रलयवायूंनीं पर्वतांनाही उडवून मेरूवरील वृक्षांना जमीनदोस्त केलें, कल्पान्तमेघ अंतरिक्षांतून संचार करूं लागले, कालनेमी मेरूला उपटूं लागला, अमृताकरितां झालेल्या युद्धांत गरुडाच्या पंखाच्या वायूनें सिद्धही उलथून पडले,

गरुडाच्या जन्मानें भयभीत होऊन चळचळ कांपूं लागलेल्या पृथ्वीला संकर्षण शेषाकार होऊन धारण करूं लागला, गरुड उडून ब्रह्मांडास गेला, आणि शेष सर्व पर्वत व प्राणी यांस दुःसह असलेल्या कल्पाग्नीच्या ज्वाला सर्व फणांतून सोडूं लागला, तेव्हांही हा महावृक्ष कंपायमान झाला नाहीं. हे मुनिश्रेष्ठा, तेव्हां अशा प्रभावशाली श्रेष्ठ वृक्षावर निवास करणाऱ्या मला आपत्ति कोठून येणार? कारण दुष्टस्थानीं निवास केल्यास आपत्ति येत असतात.

**श्रीवसिष्ठ**—पण हे महाबुद्धे, कल्पातसमयीं उत्पातवायु वाहूं लागून चंद्र-सूर्यही गळून पडूं लागले असता तूं संतापरहित कसा असतोस?

**श्रीभुशुंड**—मुने, सहस्र महायुगें संपलीं असतां जगत्स्थितीचा व्यवहार जेव्हा लुप्त होतो, तेव्हा कृतघ्न जसा सन्मित्राचा त्याग करतो, त्याप्रमाणें मी या घरट्यास सोडतों. सर्व कल्पनांचा त्याग करून मी आकाशातच स्थित होतों. त्यावेळीं माझीं सर्व अंगें निश्चलस्वभाव होतात व मन वासनारहित बनतें. जेव्हा आदित्य पडतात व पर्वत उलतात, तेव्हां मी वरुणच आहें, अशी चित्तात निरंतर भावना करून मी राहतों. हिला वारुणी धारणा असें नांव आहे. जेव्हा अति श्रेष्ठ पर्वतांचे तुकडे उडविणारे प्रलय वायू वाहूं लागतात, तेव्हा मी पार्वती (पर्वतसबंधी) धारणा करून आकाशांत राहतों. जेव्हा ब्रह्मांड जलमय होऊन एक समुद्र बनतो, तेव्हा मी वायवी (वायुरूप) धारणा धरून राहतों. याप्रमाणें उत्तरोत्तर धारणा वाढवीत ब्रह्मांडाच्या (स्थूल—सूक्ष्म समष्टीच्या) पार जाऊन मी अव्याकृत अवस्थेस पोंचतों. नंतर तेथें तत्त्वाच्या शेवटीं असलेलें जें भूमा नांवाचें पद त्यामध्यें, निद्रेप्रमाणें, एकरस निर्विकल्प समाधि—अवस्थेनें मी असतों. मी त्या आनंदावस्थेंत किती वेळ असतों म्हणून विचाराल तर तेंही सांगतों—प्रळयावधि संपून सृष्टिकालाला आरभ झाल्यावर कमलोद्भव जगदुत्पत्ति करूं लागला म्हणजे मीही पुनः ब्रह्मांडांत प्रवेश करून या पक्ष्यांच्या निवासस्थानीं येऊन राहूं लागतों.

**श्रीवसिष्ठ**—हे पक्षींद्रा, तूं असा धारणांच्या योगानें प्रलयसमयींही निद्रित पुरुषाप्रमाणें राहतोस, तसे दुसरे योगी मुक्त न होतां स्वशरीरानें कां रहात नाहींत ?

**श्रीभुशुंड**—हे ब्रह्मन्, मी मात्र असें राहवें व त्यांनीं राहूं नये ही परमेश्वराची नियति दुर्लंघ्य आहे. प्रत्येक प्राण्याच्या प्रारब्धाप्रमाणें होणारी जी परमेश्वराची सत्य संकल्परूप इच्छा तीच नियति होय. प्रत्येकानें आपापल्या प्रारब्धाप्रमाणें असणें हा स्वभावाचा निश्चय आहे. त्याविषयीं हें असें कां व तें तसें कां नाहीं; असें म्हणून स्वबुद्धीनेंच निर्णय करतां येत नाहीं. भोक्त्यांच्या संकल्पाप्रमाणें सृष्टींतील पदार्थ उत्पन्न होत असल्यामुळें प्रत्येक कल्पामध्यें हा तरु पुनः पुनः असाच निर्माण होण्यास माझा संकल्पच कारण आहे.

**श्रीवसिष्ठ**—पक्षिराज, तूं मोक्षासारख्याच अंतरहित दीर्घ आयुष्याचा अनुभव घेत आहेस. यास्तव फार फार प्राचीन अर्थांचा निर्देश करण्यासही तू समर्थ आहेस. तूं ज्ञानविज्ञानसंपन्न, धीमान्, व ज्याची मनोगति योगयोग्य आहे, असा आहेस. तूं अनेक प्रकारच्या मोठमोठ्या सृष्टींच्या अनेक उत्पत्ति व नाश याना पाहिलें आहेस. यास्तव हे कल्याण, तुला या जगत्क्रमातील कोणत्या चमत्काराचें विशेष स्मरण होत आहे ?

**श्रीभुशुंड**—हे सर्वोत्तम, जिच्या पृष्ठप्रदेशीं शिला व वृक्ष नाहींत, जिच्यामध्यें तृण व वेली उगवलेल्या नाहींत, जी पर्वत व अरण्यें यांनीं रहित आहे व जी सहस्रावधि वर्षें भस्मानें भरलेली आहे, अशा पृथ्वीचें मला स्मरण आहे. जिच्या व्यवहाराकरितां चंद्र–सूर्य उत्पन्न झालेले नसून त्यामुळें जी गर्द अंधकारात पडलेली आहे, अशा पृथ्वीला मी पाहिलेलें आहे. पुढें उत्तरोत्तर तिच्या पृष्ठभागीं विविध पदार्थ व प्राणी कसे उत्पन्न झाले तेंही मला माहीत आहे. देव व असुर यांच्या संग्रामाचे वेळीं तिची कशी दुर्दशा होत होती, तें मला अजून आठवतें. काहीं काल दैत्यांच्या अंतःपुराप्रमाणें झालेल्या हिला मी या माझ्या डोळ्यानीं अवलोकन केलें आहे. दोन युगाचा काल लोटे तों हिच्यावर नानाप्रकारच्या वृक्षाची अतिशय दाटी झाली होती. पुढें चार युगें ही नुसत्या पर्वतांनींच परिपूर्ण होती. त्या दोन्ही वेळीं हिच्यावर लोकांचा संचार मुळींच होत नव्हता. दहा सहस्र वर्षें ही मेलेल्या दैत्यांच्या हाडांच्या ढिगानीं व्यापलेली होती. ज्यातील सर्व आकाशचर वैमानिक भयानें गुप्त झाले आहेत, असें अंतरिक्ष व वृक्षरहित पृथ्वी यांना पाहिल्याचें मला आठवतें. त्यावेळीं हे दोन्ही लोक

तमोमय झाले होते. दक्षिणेंत अगस्त्य अद्यापि गेलेला नव्हता व विंध्य गर्वानें अतिशय वाढला, हें मला ठाऊक आहे. मुने, या व अशाच दुसऱ्याही अनेक वृत्तान्तांचें मला स्मरण होत असतें. पण तें सर्व सागत बसण्यांत काय तात्पर्य आहे ? मी आतां सार सांगतों, तेवढें ऐका, म्हणजे झालें.

आजवर शतशः मनु व ब्रह्मदेव होऊन गेलेले मीं पाहिले आहेत. त्यांच्या अतिशय मोठ्या प्रभावामुळें ते शेकडों विलक्षण कृत्यें करीत असत. बह्माडशरीरात उत्पन्न झालेला विराट् कांहीं काल स्वात्मतत्त्वाचें पर्यालोचन करीत शांत चित्तानें बसला होता, हें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. देव व असुर यांनीं रहित असलेली ही सृष्टि माझ्या अवलोकनांत आली आहे. सर्व प्रकाशाचा समूह असें ब्रह्मांड मीं पाहिलें होतें. हरहर ! कलियुगांतील मद्यपान करणारे ब्राह्मण, देवताची निंदा करणारे शूद्र, व ज्यानीं अनेक पति केले आहेत अशा साध्वी स्त्रिया मी या डोळ्यानीं पाहिल्या आहेत. समुद्राला निर्माण करणाऱ्या प्रियव्रताच्या पूर्वीं सर्व भूपीठ वृक्षांनीं भरलें होतें. हा चतुर्विध समुद्र नव्हता. व त्यावेळीं भृगुप्रभृति पुरुष स्त्रीपुरुष-संगावाचून मानससृष्टीनें उत्पन्न होत होते. ही भूमि जलामध्यें मग्न झाली असतां जनलोकादि प्रकाशबहुल लोकाचा व्यवहार मात्र होत होता. त्यावेळीं पर्वत, भूमि यांचें तर नावच नको; पण देवही अंतराळीं आकाशाचा आश्रय करून रहात होते. योगसिद्ध मानवानींही देवाचेंच अनुकरण केलें. त्याकाळीं चंद्रसूर्यांचा प्रकाशही नव्हता. इंद्र, राजे, उत्तम, मध्यम व अधम जीव, नव्हते. दिशा अंधकारांनीं भरलेल्या होत्या.

मुने, मी येथवर मागच्या अनेक कल्पांतील कांहीं आश्चर्यांचें वर्णन केलें. आतां या कल्पाचें थोडेंसें वर्णन करतों, पण तें या कल्पांतील दुसऱ्याही अनेक दीर्घायूंना माहीत आहे. सृष्टीच्या प्रारंभाची कल्पना, त्रिभुवनाचा विभाग, सात कुलपर्वतांची स्थापना, जंबूद्वीपाची पृथक् स्थिति, वर्ण, वर्णधर्म व विद्या याची उत्पत्ति, भूमंडलाचा विभाग, नक्षत्र-चक्र व ध्रुवचक्र यांची रचना, चंद्र—सूर्यादिकाची उत्पत्ति, इंद्र व उपेंद्र यांची व्यवस्था, पृथ्वीचा हिरण्याक्षानें केलेला अपहार व वराहानें केलेला उद्धार, देव, दानव, मानव इत्यादिकांमध्यें राजांची स्थापना, मत्स्यावतारांतील

वेदांना परत आणणें, मंदराचें उन्मूलन, अमृताकरितां समुद्रमंथन, ज्याला पंखही फुटलेले नाहींत अशा अवस्थेंतील गरुड, सागराचा संभव, इत्यादिक जे अवश्य स्मर्तव्य अर्थ ते मीं पाहिलेल्या चमत्काराच्या अपेक्षेनें स्वल्प आहेत व माझ्यापेक्षां न्यून वयानें युक्त असलेल्या तुमच्या सारख्यांनाही ते माहीत आहेत.

सारांश हे ब्राह्मणवर्य, ज्याला दीर्घ आयुष्य प्राप्त झालें आहे असा हा मी, या कल्पांत प्रसिद्ध असलेल्या गरुडवाहनाला हंसवाहन ब्रह्मदेव होऊन देव-दैत्यादि सृष्टि करीत असताना पाहिलें आहे. पुढें त्याच हंसवाहन चतुर्मुखाला वृषभवाहन रुद्र होऊन संहार करितांना पाहिलें आहे व पुनः वृषभवाहनाला विष्णुशरीर धरून पालन करितांना अवलोकन केलें आहे. खरोखर हें मोठेंच आश्चर्य व रहस्य आहे. २१.

**सर्ग २२**—वसिष्ठाचे आठ जन्म, क्षीरसागराचें मंथन इत्यादि आणखी पाहिलेले चमत्कार.

**भुशुंड**—भगवन्, त्यानंतर या जगामध्यें तुम्ही, भरद्वाज, पुलस्त्य, अत्रि, नारद, इंद्र, मरीचि, पुलहादि मुनि, सनत्कुमार, गौरीप्रभृति देवी, मेरु–मंदरादि पर्वत, हयग्रीव, हिरण्याक्षादि दानव, शिबि, पृथु इत्यादि राजे, दत्तात्रेय, व्यास, वाल्मीकि, शुक इत्यादि महात्मे, व दुसरेही अनेक मोठे जीव उत्पन्न झाले. पण हल्लींच्या सर्गांतील जीवांप्रमाणें त्यांची गणना कोणाला करितां येणार आहे? मुने, ब्रह्मपुत्र अशा तुमचा हा, आठवा जन्म आहे असें मला आठवतें. यापूर्वी मागच्या आठव्या जन्मांत तुम्हीं मला भेटलां होता. पण मुनिराज, आपण कदाचित् आकाशापासून, कदाचित् जलापासून, कदाचित् वायूपासून इत्यादि भिन्न भिन्न करणापासून झाला आहां. कारण सर्व कल्पांमध्यें निरनिराळ्या अधिकारी पुरुषांचें नांव व रूप जरी एकसारखेंच असलें, तरी सर्वांचा आचार, व रचना एकसारखीच नसते. कदाचित् सारखी असते व कदाचित् नसते. या वेळीं जशा प्रकारची ही सृष्टि आपण पहात आहों, तशाच प्रकारच्या या पूर्वी तीन सृष्टि झाल्याचें मला आठवतें. एकच रूप, आचार व आकार यास धारण करणाऱ्या सम आयुष्यानें युक्त असलेल्या व असुरांनीं न चाळविलेल्या देवाचे दहा

सर्ग मीं पाहिले आहेत. मुने,पाण्यांत बुडालेल्या पृथ्वीला पांचदा कूर्मानेंच वर काढलें. वराहानें नाहीं, असें मी पाहिलें आहे. बारा वेळा मी समुद्र-मंथन पाहिलें आहे. हिरण्याक्षानें सर्वौषधिरसानीं युक्त असलेल्या या पृथ्वीला माझ्या देखत तीनदा रसातळास नेलें. हरीनें मध्यें मध्यें रेणुकापुत्र होऊन आजवर सहादा निःक्षत्रिय पृथ्वी केली आहे. शंभर कलियुगें, शंभरदा हरीनें दानवांना उन्मार्गी करण्यासाठीं घेतलेला बुद्धावतार, तीसवेळां शंकरानें केलेला त्रिपुरदाह, दोनदा केलेला दक्षयज्ञाचा विध्वंस, दहाश केलेला शक्रपराभव, बाणासुरासाठीं हरीशीं केलेले आठ संग्राम इत्यादि-कांचें मला चांगलें स्मरण आहे. प्रत्येक युगांतील पुरुषाच्या न्यूनाधिक बुद्धिसामर्थ्याप्रमाणें ब्रह्मचर्य, गुरुशुश्रूषा, भूशयनादि न्यूनाधिक क्रिया व शिक्षादिअंगाभ्यास यानीं युक्त असलेल्या वेदांचें मला चांगलें स्मरण आहे. अर्थ एकच असला तरी अनेक पाठानीं युक्त असलेलीं, पुराणें वेदज्ञ विद्वानानीं प्रतियुगीं निर्माण केलेलीं मला आठवतात. अशाच अधिकारी पुरुषानीं रचलेले अनेक इतिहासही मला माहीत आहेत. रामा-यण या नावाचा महा आश्चर्यरूप इतिहास एक लक्ष ग्रंथात्मक असून तें एक मोठें ज्ञानशास्त्रच आहे असें मला वाटतें. रामाप्रमाणें वागावें; रावणा-प्रमाणें परपीडात्मक विलास करूं नये; असा उपदेश करण्याच्या उद्देशानें तें रचलेलें आहे. पण आता तो आणखीं बत्तीससहस्र ग्रंथात्मक महारामा-यण नावाचा वसिष्ठ-रामसंवादरूप ग्रंथ होणार आहे. मला त्याचें ज्ञान दिव्यदृष्टीनें झालेलें असून योग्यसमयीं तुम्हालाही तें ( अर्थज्ञान ) होईल. हें वासिष्ठरामायण पूर्व कल्पातील वाल्मीकीनें किंवा त्याच नावाच्या दुसऱ्या जीवानें केलेलेंच आहे. पण त्याचा व्यवहार करणाऱ्या लोकांच्या परंपरेचा उच्छेद झाल्यामुळें तेंही नष्ट झालें आहे. पण आतां पुनः तें बाराव्या वेळीं निर्माण होणार आहे. ( या पूर्वी तें अकरावेळा झालें आहे ) याच्याच सारखें भारत या नावाचें दुसरें एक ग्रंथरत्न व्यासानें केलेलें असून तें आता उच्छिन्न झालें आहे. पण आता पुनः सातव्यांदां तेंच स्वतः व्यास किंवा व्यास या नावाचा दुसरा कोणी करणार आहे.

हे मुनीश्वरा, अशीं आणखीं दुसरींही अनेक आख्यानें व शास्त्रें प्रति-युगीं निर्माण झालेलीं असून विचित्र रचनेनें युक्त असलेलीं तीं सर्व मला

आठवतात. सारांश हे साधो, प्रतियुगामध्यें पुनः पुनः तेच तेच किंवा अन्य अन्य पदार्थसमूह निर्माण होत असतात. राक्षसांच्या क्षयाकरितां भूमीवर अवतार घेणाऱ्या हरीचे राम—कृष्णादि अवतार मी आजवर अनेक पाहिले आहेत. ही जगन्मयी भ्रांति कधीं असते व कधीं नसते. हिची अवस्था सर्वप्रकारें पाण्यावरील बुडबुड्यासारखी आहे. तिचा आकार कधीं सम असतो. व कधीं विषम असतो. तिच्यामध्यें उत्पन्न होणाऱ्या जीवाचीही सदा एक दशा नसते. प्रत्येकाचे निरनिराळे स्वभाव, भिन्न भिन्न आचार, पृथक् कर्मे व अगदीं परस्पर विलक्षण आकार असतात. हे ब्राह्मणा, याप्रमाणें प्रत्येक मन्वन्तरांत जगाचा क्रम विपर्यस्त झाला असतां, रचना बदलून गेली असता व प्रख्यात जन हा लोक सोडून गेले असतां माझे निरनिराळेच मित्र व बांधव होत असतात. भृत्य व आश्रमही प्रति मन्वंतरीं बदलतात. कधीं मी विंध्यकच्छांतील एकान्त स्थानीं असतों, कधीं सह्याद्रीवर घर करून राहतों, कधीं दर्दुरावर निवास करतों. कधीं हिमालयवासी होतों. कधीं मलयाचलाचा आश्रय करतों व कधीं प्राचीन रचनेनेंच युक्त असलेल्या या पर्वतावरील या आम्रवृक्षाच्या शाखेवर आपलें घरटें करतों. साराश, हे मुनिनायका, ज्यांना आदि व अंत नाहीं अशा या अनेक गत युगांमध्यें हा वृक्ष अशाच रचनेनें युक्त होऊन वारंवार उत्पन्न झालेला आहे. तो माझ्याप्रमाणें चिरंजीवी नाहीं. तर त्याच्यांतील जीव प्रतिमन्वंतरीं बदलत असतो. पण शोभा व आकार यांत फरक पडत नाहीं. माझा पिता चंडकाक जिवंत असताना जी या उत्तम वृक्षाची शोभा होती तीच आताही आहे. पर्वत, दिशा याचीही हीच स्थिति आहे. पूर्वीं जी उत्तर दिशा होती व जो मेरु पर्वत होता तीच दिशा किंवा तोच पर्वत आतां नाहीं. तर या वृक्षाप्रमाणेंच त्यांचेंही आकारमात्र साम्य आहे. पण माझी स्थिति याहून अगदीं भिन्न आहे. मी याच एका देहानें ब्रह्मदेवाच्या अनेक रात्री घालविल्या आहेत. कारण कल्पान्तीं वर सांगितलेल्या धारणापूर्वक स्थिर केलेल्या निर्विकल्पक समाधीच्या शेवटीं पुनः उत्पन्न झालेल्या सर्गास पाहून तोच हा मेरु, तोच हा वृक्ष, असें मी ओळखतों. त्यावरून माझ्या शरीराचा नाश होत नाहीं, असें मला वाटतें. कारण त्याचा जर नाश झाला असता तर तो हा अशी ओळख पटली नसती. त्याच-

प्रमाणें दिशादिकांच्या रचनेंत थोडेसें पडलेलें अंतरही मला कळतें. प्राच्यादि दिशांचा व्यवहार सूर्यचंद्र–नक्षत्रादि ज्योतींच्या उदयास्तावरून व मेरूच्या संनिवेशावरून होतो. एकाद्या कागदावर चित्र काढून ठेवावें व तें उभें आडवें तिरकस इत्यादि करेंही जरी फिरविलें तरी त्यांतील परस्पर सापेक्ष रचना जशी बदलत नाहीं, त्याप्रमाणें या जगाची स्थिति आहे. दिशादिकाप्रमाणें या सर्व जगालाही नियतरूपता नाहीं. म्हणूनच त्याला सत् किंवा असत् म्हणता येत नाहीं. तो केवळ बुद्धिभ्रम आहे. आत्म्याच्या मायिक विक्षेपशक्तीचा ह्या सर्व विकास आहे. यात पुत्र पिता होतो व शत्रु मित्र होतो. स्त्रीभावास प्राप्त झालेल्या शेकडों पुरुषांना व पुरुष झालेल्या शेकडों स्त्रियाना मी पाहिलें आहे. हे मुनीश्वरा, कलियुगात क्वचित् कृतयुगाचे आचार व कृतयुगांत क्वचित् कलियुगाचे आचार आमच्या दृष्टीं पडलेले आहेत. त्रेता व द्वापर यातही असाच धर्मसंकर झालेला आढळतो. ज्याना वेद–वेदार्थांचें ज्ञान नाहीं व जे स्वसंकेतानुरूप विहार करीत आहेत, असे निरर्गळ आचारांचे कांहीं प्राणीही मी क्वचित् पाहिले आहेत. हे ब्रह्मन्, सहस्र चतुर्युगें संपलीं असतां वेधा जगद्रूपाचा संहार करून जलांत शयन करितो, व योगनिद्रेच्या मिषानें परमात्म्याचें ध्यान करूं लागतो. पण तो असा ध्यान करूं लागला असता सुर, असुर व मानुष या सर्वांसह सर्व जगत् शून्य झाल्याचें मीं पाहिलें आहे.

परंतु याप्रमाणें जगाचा क्षय झाला असताही ( उत्पत्तिप्रकरणांत सांगितलेल्या ) ऐंदव प्रजापतींच्या मनःसंकल्पानें उत्पन्न झालेल्या, पार्थिवाकाररहित, व प्राणवायुप्राय भूतांनीं व्यापलेल्या दहा सर्गांस पाहिल्याचें मला आठवतें. सारांश, हे मुनिवर्य, मी प्रतिकल्पामध्यें विचित्र स्थानें, विचित्र कार्यें, विचित्र आकार इत्यादिकांनीं युक्त असलेल्या अशा अनेक चमत्कारास पाहिलें आहे २२.

**सर्ग २३**—ज्या दोषांचा त्याग केला असतां मृत्यु बाधा करीत नाहीं, व मन ज्याच्या परायण करणें प्रशस्त आहे तें येथें सांगतात.

**श्रीवसिष्ठ**—हे महाबाहो रामा, त्या कल्पवृक्षाच्या शाखेवर बसलेल्या पक्षिश्रेष्ठाला मी जिज्ञासेनें पुनः असें विचारलें—हे विहंगराजेंद्रा, या जगाच्या कोशांत व्यवहार करणाऱ्यांच्याही देहास मृत्यु बाधा कशी करीत नाहीं ?

भुशुंड—हे सर्वज्ञ ब्राह्मणा, स्वतः जाणत असूनही तुम्ही केवल माझी परीक्षा पाहण्याकरितां मला विचारीत आहां. प्रभु आपल्या भृत्याना असेच युक्तीनें बोलावयास लावीत असतात. तथापि, हे भगवन्, आपण मला जें कांहीं विचारीत आहां तें मी तुम्हाला सांगतों. कारण आज्ञे-प्रमाणें वागणें हेंच संतांचें मुख्य आराधन होय, असें म्हणतात. मुने, सर्व दोषांचा आधार वासना आहे, व तिचा नाश हाच मृत्यूला तरण्याचा मुख्य उपाय आहे. ज्यांत दोषरूपी मोत्यें ओवलेलीं आहेत, अशी वासना-तंतूंची माळ ज्याच्या हृदयांत नसते, त्याला मृत्यु कांहीं करूं शकत नाहीं. देहरूपी वृक्षास कापणाऱ्या निःश्वासरूपी करवती ज्याच्यापासून उद्भवतात व ज्या स्वतः देहवृक्षाच्या हस्तपादादि शाखांस भोकें पाडणाऱ्या किडी आहेत, अशा मनोव्यथा ज्याला जर्जर करीत नाहींत, त्याला मृत्यु मारीत नाहीं. चिंता व आशा ज्याला जाळीत नाहींत, ज्याचें मनोरूप बिळ राग-द्वेषविषानें भरलेलें नसतें, ज्याला लोभसर्पानें दंश केलेला नसतो, शरीरसागरातील जणुं काय वडवाग्नीच असा कोप सर्व विवेक-जलाचें प्राशन करून ज्याला जाळीत नाहीं, तिळांच्या मोठ्या राशीला जसा घाणा, त्याप्रमाणें ज्याला मदन चिरडून सोडित नाहीं, एका निर्मळ व परम पावन पदाचे ठायीं ज्यानें चित्ताला विश्रांत केलें आहे, त्याला मृत्यु मारीत नाहीं. ज्याचें मन मर्कटासारखें चंचळ नसतें, त्याला मृत्यूचें मुळींच भय वाटत नाहीं.

हे ब्राह्मणा, हेच महादोष संसारव्याधींचीं कारणें आहेत. पण ते (दोष) एका समाहित ( शांत, वृत्तिरहित ) चित्तालाच कांहीं करूं शकत नाहींत. शारीरिक व मानसिक दुःखें एका समाहितचित्तालाच व्याकुळ करूं शकत नाहींत. ज्याच्या चित्ताला समाधानासारख्या महागुणाचा लाभ झालेला असतो, त्यांच्या दृष्टीनें कशाचा अस्त होत नाहीं. व कोणाचा उदय होत नाहीं. त्याला कशाचें स्मरण नसतें व कशाचें विस्मरणही होत नाहीं. फार काय पण त्याला सुषुप्ति व जाग्रदवस्था यांचेंही भान राहत नाहीं. ज्याचें चित्त समाहित असतें त्याला हृदयाकाशास अंध करून सोडणाऱ्या व कोपकामादि विकारापासून उत्पन्न झालेल्या चिंता पीडा देत नाहींत. ज्याचें चित्त शांत असतें, तो यथाशास्त्र व्यवहार करीत

असला तरी वस्तुतः बुद्धिपुरःसर कांहीं देत नाहीं; कांहीं कोणापासून घेत नाहीं; कशाचा त्याग करीत नाहीं व याचना करीत नाहीं आणि या सृष्टीमध्यें जे जे धनादि दुष्ट अर्थ, क्षेत्रगृहादि आरंभ, राग–द्वेषादि गुण, व ज्या दुष्ट नीति आहेत, त्यांतील कोणी एकही शांत-चित्ताला बाधा करूं शकत नाहीं. सर्व प्रकारचीं मोठमोठीं सुखें शांत-चित्ताच्या मागोमाग धांवत असतात. परिणामी हितकर, सत्य, अपाय-रहित, भ्रमरहित, व भोगाभिलाषशून्य असें जें तत्त्व आहे तत्पर मन करावें. चित्ताला व्याकुल करणारें अनेकत्वपिशाच ज्याला कांहीं करूं शकत नाहीं तत्पर मन करावें. जें सर्व अवस्थांमध्यें आत्मसुख देतें व जें दीर्घकाळ परम उचित, मधुर व हितकर तत्त्व आहे, तत्पर मन करावें. जें अनंत, मनःपथ्यकर, तथ्य, सर्व अवस्थांमध्यें अनुगत व समस्त साधूंकडून सेवित आत्मसुख तत्पर मन करावें. जो बुद्धीच्या पलीकडे असलेला प्रकाश, जें आद्य व पर अमृत, व जें अनुत्तम सौभाग्य, त्या निरतिशय आनंदामध्यें मन लावावें. अमर ( देव ), असुर, गंधर्व, विद्याधर, किन्नर व अप्सरा यांनीं युक्त असलेल्या स्वर्गांत सुस्थिर व शुभ कांहीं नाहीं. बा मुने, विविध वृक्ष, नर, नरपति, पर्वत, नगरें, ग्राम, नद्या, समुद्र, इत्यादिकांनीं युक्त असलेल्या भूतलावर शोभन व स्थिर असें कांहीं नाहीं. त्याचप्रमाणें नाग, असुर, असुरांगना इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पाताळांतही शोभन व स्थिर कांहीं नाहीं. आधिव्याधियुक्त, दुःखपूर्ण व नित्यतुच्छ अशा क्रिया–फलामध्यें शुभ व स्थिर काहीं नाहीं. चित्तास चंचल करणाऱ्या व बुद्धीमध्यें विकार उत्पन्न करणाऱ्या मानसक्रियाफलांत, मनोमय सागरास क्षुब्ध करून सोडणाऱ्या संकल्पविकल्पांत व अति अद्भुत व तरवारींच्या धारेसारख्या दुःखद इंद्रियचेष्टांमध्यें शुभ व स्थिर कांहीं नाहीं. भूतलाचें आधिपत्य, देवरूपता, पाताळाचें राज्य, इत्यादिकांतील काहीं स्थिर नाहीं. म्हणूनच विचारी सज्जनांचें मन अशा कोणत्याही अशाश्वत व तुच्छ पदा-र्थांमध्यें आसक्त होत नाहीं. चित्तामध्यें आकुलता उत्पन्न करणाऱ्या शास्त्रांचा विचार करणें व पांडित्य संपादन करणें, लोकानुरंजनसामर्थ्य अंगीं आणणें किंवा भारतादि कथावर्णनाचें चातुर्य मिळविणें, हेंही प्रशस्त नव्हे. आधिमय दीर्घ जीवित बरें नव्हे. सर्वव्याधिरहित असला

तरी दुःखाचें कारण, अशी जी दृढ मूढता, तिनें युक्त असल्यामुळें, मरणही बरें नव्हे. नरकांतील दुःखभोगानें पापक्षय होत असला, तरी तो सर्व पापजन्मांची परमसीमा असल्यामुळें बरा नव्हे. सर्व भुवनांचें आधिपत्यही प्रशस्त नाहीं. पण मतिमूढ पुरुषास जगांतील या सर्व रचना व अवस्था अति रम्य वाटतात. तथापि चंचलतारूप दोषानें कलुषित झालेल्या त्यांच्यामध्यें महात्मे दीर्घकाल आसक्त कसे होणार ? २३.

सर्ग २४—देहनाड्या, षट्चक्र, प्राणस्पंदविभाग इत्यादिकांसह प्राणचिंता.

श्रीभुशुंड—भ्रमरहित, अपायरहित, सर्व ज्ञानामध्यें श्रेष्ठ, व अति उन्नत अशी आत्मचिंता ही एकच दृष्टि आहे. भगवन्, सर्व दुःखांचा अंत करणारी, फार दिवसांपासून झालेला दुःस्वप्नरूप भ्रम घालविणारी, निरातिशय भूमानंद-रूप प्रत्यगात्मांगणांमध्यें संचार करणारी व सर्व अनर्थांचा क्षय करणारी एक स्वात्मचिंताच आहे. ती सर्व संकल्परहित आहे. तुमच्या सारख्यांना सुप्राप असली, तरी आमच्या सारख्याना दुष्प्राप आहे. कारण सामान्य बुद्धीचे पुरुष समस्तकल्पनारहित व सर्वांच्या पराकाष्ठेस पोंचलेल्या या पदास कसे प्राप्त होणार ? महामुने, या आत्मचिंतेच्या अनेक सख्याही आहेत. विज्ञानानें शीतल झालेल्या व आत्मचिंतेशीं किंचित् साम्य पाव-लेल्या त्या अनेक विलासिनी सख्यांतील एका प्राणचिंतेचा मी आश्रय केला आहे. ती सर्व दुःखांचा क्षय करणारी, सर्व सौभाग्यांस वाढ-विणारी, व या दीर्घ जीवितास कारण होणारी आहे.

श्रीवसिष्ठ—हे रामा, असें बोलणाऱ्या त्या मुनीला मी स्वतः जाणत असूनही सहज असें विचारलें.—हे साधो, तूं सर्व संशयांचा उच्छेद कर-णारा आहेस. तुझें जीवित अत्यंत दीर्घ आहे. वास्तव प्राणचिंता म्हणजे काय, तें मला सांग.

श्रीभुशुंड—मुने, आपण सर्ववेदान्तज्ञ व त्याविषयींचे सर्वांचे संशय घालविणारे आहां. पण असें असतांनाही मज कावळ्याची केवळ थट्टा करण्यासाठीं आपण मला विचारीत आहां, असें दिसतें. अथवा तुमच्या-सारख्या पूज्यांच्या पुढें, हें प्राणदर्शन पुनः विशेष रीतीनें जाणण्याकरितां मला तुमच्या या प्रश्नाचें उत्तर देणें अवश्य आहे. भगवन्, या भुशुंडाला जीवित देणारें, त्याला आत्मलाभ देणारें, हें प्राणसमाधान ऐका. प्रभो,

देह हें मनोरम गृह आहे, असें पहावें. यांत कफ, वात व पित्त असे तीन महास्तंभ आहेत. त्याला नऊ द्वारें आहेत. ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक, प्राणपंचक, भूतपंचक, अंतःकरणचतुष्टय, अविद्या, काम व कर्म यांचें बनलेलें पुर्यष्टक हेंच त्यांतील कलत्र ( भार्या ) व इतर स्वजन आहेत. अहंकारगृहस्थ त्याचें सर्वतः परिपालन करीत असतो. अंतःसाक्षिरूपानें तुम्हीही मी वर्णन करीत असलेल्या या देहगृहाचा अनुभव घेतां. दोन चागले कान हींच त्यावरील दोन शिरोगृहें ( माड्या ) आहेत. केंस हेंच वरील आच्छादन ( छप्पर ) आहे. मोठाले दोन नेत्र ह्याच त्याला दोन खिडक्या आहेत. तोंड हेंच त्याचें मुख्य व विस्तृत द्वार आहे. दोन हात व कुशी ह्याच त्याच्या पडव्या आहेत. दातांची पंक्ति याच केसरमालेनें त्याचें मुखरूपी मुख्य द्वार भूषित केलेलें आहे. शब्द, स्पर्श इत्यादिकांच्या आगमनाची वार्ता आत कळविणारे ज्ञानेंद्रियरूप पाच द्वारपाल या गृहाच्या सभोंवार सतत पहारा करीत असतात. लिंगदेहाच्या द्वारा सर्व गृहास व्यापणाऱ्या आत्मप्रकाशानें तें सतत प्रकाशित झालेलें असतें. विशेषतः जागरप्रसंगींतर नेत्रांतील कनीनिकासंज्ञक वरच्या उंबऱ्यावर त्याच्या स्वामीची बसण्याची जागा नियत केलेली असते. आपल्या गृहांना जसा आपण जल, मृत्तिका व गोमय यांचा लेप देतों, त्याप्रमाणें या देहगृहाला रक्त, मांस व वसा यांचा लेप दिलेला असतो. शिरांच्या समूहानें तें चांगलें वेष्टिलेलें असतें. स्थूल अस्थिकाष्ठांनीं तें दृढ केलें आहे. त्याच्या त्वचारूपी भिंतीही सुदृढ आहेत.

या देहगृहाच्या मध्यें इडा व पिंगला या नांवाच्या दोन सूक्ष्म नाड्या डाव्या व उजव्या बाजूस आहेत. त्या स्पष्ट दिसत नाहींत. पण प्राणाच्या संचारावरून त्यांचें अनुमान करतां येतें. सर्व प्राणशक्तींचें आश्रयभूत, बाहात्तर सहस्र नाड्यांचें मूळ, संपुटाकार व एकमेकांस मिळालेल्या कमलांच्या तीन जोड्यांच्या आकाराचें पुरीतत् नांवाचें हृत्पद्मयंत्रत्रय आहे. तें अस्थिमांसमय, मृदु व कोमल असून त्याला खालीं व वरही नाल आहे. नासाग्रापासून पादान्तापर्यंत सकल देहाकाशांत संचार करणाऱ्या चंद्रनांवाच्या अपान वायूच्या अमृतसेकानें त्याचीं दलें विकास पावतात. तीं ( पानें ) हालूं लागलीं म्हणजे वायु पुरीततशीं संबद्ध असलेल्या सर्व

नाड्यांच्या छिद्रांत प्रवेश करून त्यांच्या द्वारा सर्व शरीरभर पसरतो. म्हणजे बाहेर अरण्यादिकांत लतांच्या पानांस वायूचा स्पर्श झाला असतां तीं पानें जशीं स्वतः हालू लागून त्याला सर्वतः पसरतात, त्याप्रमाणेंच हा वरील प्रकार होतो. याप्रमाणें वृद्धि पावलेला वायु हृदय, पायु, नाभि, कंठ व सर्वांग अशीं अनेक स्थानें कल्पून प्राणादि पांच संज्ञांस प्राप्त होतो. तो वर–खालीं असणाऱ्या बहात्तर सहस्र नाड्या या ज्याच्या प्रतिशाखा आहेत, अशा एकशें एक नाड्यामध्यें प्रवेश करून सर्व देहांत पसरतो. त्या हृदय-वायूच्या विचित्र आचारावरून त्याला प्राण, अपान, व्यान, उदान व समान अशीं विचित्र नावें प्राप्त झालीं आहेत

या हृत्पद्मयत्रत्रयांत सर्व प्राणशक्ति आहेत. चंद्रबिंबातून जसे किरण, तशा त्या नाड्यांच्या द्वारा प्राणाबरोबर सर्व शरीरांत खालीं व वर पसरतात. अन्नरसाला सर्व देहभर पसरण्याकरिता त्या (प्राणशक्ति) नाड्यातून जातात, येतात, आकर्षण करितात, नेतात, विहार करितात, वर उडतात, व लागल्याच खालीं पडतात. असो; त्या या हृत्पद्मगत वायूला प्राण असें म्हणतात. हे मुने, याचीच एक शक्ति नेत्रांचें प्रस्पंदन करविते. एक स्पर्शाचें ग्रहण करते. एक नासिकेच्या द्वारा निःश्वास–प्रश्वासरूपानें सतत वहात राहते; एक अन्नाला जीर्ण करते ( पचविते ); एक वचनें बोलते. बा मुने, असेंच आणखी अधिक वर्णन करीत बसण्यांत काय अर्थ आहे ? ज्या प्रमाणें सूत्रधार सूत्र हालवून बाहुल्यांकडून विविध चेष्टा करवितो, त्याप्रमाणें हा भगवान् वायु शरीरांतील सर्व चेष्टा करतो.

मुने, ऊर्ध्व गमन करण्याचा व अधोगमन करण्याचा संकेत करून प्राण व अपान वायु शरीरांत पसरतात. ते दोन्ही प्रकट व श्रेष्ठ वायु आहेत. बा मुने, मी त्यांच्या गतीचें अनुकरण करीत बसलों आहें. कारण वागादि इतर अमुख्य प्राण आसंगरूपी दोषानें दूषित झालेले असल्यामुळें श्रमरूप मृत्यूकडून ग्रासले जातात. पण हा मात्र आसंगदोषानें दूषित न होतां श्रमरूप मृत्यूकडून ग्रासला जात नाहीं. वास्तव मी तद्रूप आहें, असें तादात्म्यव्रत धरून ( म्हणजेच प्राणचिंता करून ) मी स्वतः मृत्यूला जिंकलें आहे. ते दोघे ( प्राण–अपान ) वायु नित्य शीत व उष्ण शरीर धारण करणारे ( शीतोष्णाकार, शीतोष्णस्पर्शवान् ) आहेत.

आकाशांतील नित्य पांथ ( प्रवासी ) आहेत. ते दोघेही शरीररूपी महायंत्राला सतत वाहतात. पण त्यांना कधीं श्रम होत नाहींत. ते हृदयाकाशांतील चंद्र-सूर्य आहेत अग्नि-सोमस्वरूप आहेत. शरीररूपी पुराचें रक्षक जें मन त्याच्या रथाचीं तीं दोन चाकें आहेत. या अहंकार राजाचे ते दोघे स्तुत्य व इष्ट अश्व आहेत, ते यावज्जीव कोठें कुंठित होत नाहींत. त्या दोघांची उपासना करणारा जो मी त्या माझ्या शरीराची व वायूची तेच दोघे परम गति आहेत. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थांत ते समरूप असतात. ( म्हणजे पुष्कळ अभ्यास केल्यामुळें त्यांचा सर्व अवस्थांत, आंत व बाहेर, द्वादश अंगुळप्रमाणच संचार होतो. अयोगी व अनभ्यासी पुरुषाच्या श्वासाप्रमाणें त्यांचें न्यूनाधिक प्रमाण होत नाहीं. गाढ झोंप लागली असतां प्राकृत जीवाचाही जसा प्राणापानसंचार होतो, तसा तो तिन्ही काळीं झाला पाहिजे पण स्वप्न आणि जागर या दोन काळीं मनांत निरनिराळे संकल्प व विकल्प उठत असल्यामुळें त्यांची गति सम रहात नाहीं. अर्थात् प्राणापानाची समगति हें समाहित किंवा अविक्षिप्त मनाचें चिह्नच झालें. )

कमलनाल ( बिस किंवा केळीचें काल ) मोडलें असतां त्यांतून पांढरे तंतु निघतात. त्यातील एका तंतूच्या सहस्राव्या भागाहूनही अति सूक्ष्म असलेल्या याची गति, विद्यमान असली तरी दुर्लक्ष्य आहे. यास्तव हे महात्मन्, हृदयादि स्थानांमध्यें ज्यांचा संचार सतत चालू आहे, अशा या वायूंच्या श्रुतिप्रोक्त व अनेकगुणसंपन्न गतींचें अनुसरण करून ( म्हणजे पुढें सांगितल्याप्रमाणें उपासना करून ) ज्यानें मृत्युपाशाचा नाश करून सोडला आहे, असा पुरुष तत्त्वज्ञानानें जीवन्मुक्त होऊन पुनः या संसारांत उत्पन्न होत नाहीं. ( कारण प्राणादिकांच्या निष्काम उपासना ज्ञानद्वारा मुक्तीस कारण होतात. हें श्रुतीमध्यें प्रसिद्ध आहे. ) २४.

**सर्ग २५—प्राणापानगतींमध्यें रेचकाची कल्पना व त्यांच्या उदय-लयांचें स्थान ब्रह्म यांचे वर्णन.**

**श्रीवासिष्ठ**—राघवा, रमणीय ज्ञानमार्गाचें असें प्रतिपादन करणाऱ्या त्या पक्ष्यास मी म्हटलें,—"सज्जना, प्राणवाताची गति कशी असते ?

**भुशुंड**—मुने, स्वतः जाणत असतांनाही मला उगीच लीलेनें कशाला विचारतां ! अथवा प्रश्न करतांच आहां, म्हणून सांगतों, ऐका.—हे ब्रह्मन्,

हा प्राण नेहमीं स्पंदशक्तीनें युक्त असतो. त्यासाठींच त्याला सदागति असें म्हणतात. पण त्याचा वाचक प्राण हा शब्द दोन प्रकारचा आहे. एक लोकव्यवहाराकडून रूढ व दुसरा प्राक्—अनिति (म्हणजे पुढें जातो) म्हणून प्राण असा यौगिक. या लक्षणाप्रमाणेंच तो या सबाह्याभ्यन्तर देहांत ऊर्ध्वमार्गी राहिला आहे. अपानही असाच असून तो अधोमार्गी निवास करतो. जाग्रत्कालीं अथवा निद्रासमयीं त्यांच्या गतीमध्यें प्राणायामचिंतन करणें हा उत्तम प्राणायाम होय. पण तें कसें करावें तेंच आतां सांगतों.—सर्वांचें कल्याण व्हावें, म्हणून मी तें सांगतों.—ज्याचा सर्व प्रयत्न अस्त पावला आहे, अशा प्राणाचें हृत्कमलकोटरातून स्वभावतःच बाहेर येऊं लागणें, याला सुज्ञ रेचक म्हणतात. त्याचप्रमाणें प्राणांनीं मूर्द्धप्रदेशापासून बाहेर बारा अंगुळांपर्यंत संचार करणें हा बाह्यपूरक होय. (श्वास सोडताना वायु हृदयापासून निघून नाकाच्या द्वारा बाहेर बारा अंगुळापर्यंत संचार करतो. या त्याच्या मार्गाचे दोन भाग केलेले आहेत. हृदयापासून मूर्धस्थानापर्यंत एक व मूर्धेपासून बाहेरचा भाग हा दुसरा. त्यातील पहिल्या भागांत जेव्हां श्वास स्वभावतःच—(प्रयत्नावांचून) संचार करतो, तेव्हां त्याला रेचक समजावें. तो रेचक आहे, असें चिंतन करावें व तो जेव्हां मूर्धेपासून बाहेर बारा अंगुळें पसरतो तेव्हां त्याला बाह्यपूरक समजावें.) त्याचप्रमाणें बाह्य प्रदेशापासून अपान आंत प्रवेश करूं लागला असतां नासाग्रापासून मूर्धपर्यंत व मूर्धादि—हृदयपर्यंत असा स्पष्ट भासणारा जो दोन प्रकारचा स्पर्श त्यालाही योगशास्त्रज्ञ पूरक म्हणतात. अपान (आंत शिरणारा श्वास) अस्त पावला असतां पुनः प्राण (बाहेर येणारा श्वास) हृदयामध्यें उदय पावे तों जी आंतील समस्थिति तोच कुंभक होय. या कुंभकावस्थेचा अनुभव योगाभ्यासी पुरुषाना नित्य येतो.

भगवन्, रेचक, कुंभक व पूरक अशा प्रकारचा हा त्रिविध वायु नासाग्राच्या बाहेर बारा अंगुलप्रदेशातही कल्पितां येतो. बा महामते, ज्यांची मति विशाल आहे, अशा पुरुषाचे सर्वदा यत्नावांचून स्वाभाविकपणेंच होणारे जे प्राणायाम आहेत ते ऐका—बाहेरील द्वादशांगुळ परि-

---

१ ष हा वर्ण उच्चारतांना आपल्या जिभेचा शेंडा जेथें लागतो तो मूर्धा.

माण प्रदेशांतून आंत शिरण्याकरितां अभिमुख झालेला जो वात त्याचे तेवढ्याच भागांत स्वभावतः पूरकादि होतात. ( त्याच्या पूरकादि भेदांचें तेथेंच चिंतन करावें ). बाह्यवायु व आंत जाणारा अपान यांची एकरूपानें हृदयापासून नासाग्रापर्यंत झालेली जी गति तिची ( वर म्हटल्याप्रमाणें ) बाह्यपूरकरूपानें कल्पना होते. ( म्हणजे तोच बाह्यपूरक आहे, असें जाणावें. ) नासाग्रापासून निघून बारा अंगुळें बाहेर जाणें या वायुगतीलाही बाह्य पूरक म्हणतात. प्राण बाहेर अस्त पावून पुनः अपानाचा उदय होई तों वायूची जी अवस्था असते, तो पूर्ण व सम असलेला बाह्यकुंभक होय. ( हा पूर्वोक्त कुंभकाचाच अनुवाद आहे. ) प्रस्पंद होण्यापूर्वी ( नाकांत शिरावयास लागण्यापूर्वी ) बाह्य वायूचें अपानरूप व्हावयास सज्ज होणें, हाच बाह्यरेचक आहे. चिंतन केलें असतां हा मुक्ति देतो. बाहेरील बारा अंगुल प्रमाण प्रदेशांतील अगदीं शेवटच्या भागापासून आरंभ होऊन नासाग्रापर्यंत येऊन पोंचे तों, जी अपानाची बाह्य स्थिति त्याला दुसरा बाह्यपूरक म्हणतात. या बाह्य व आभ्यंतर कुंभकादिसंज्ञक प्राणापान स्वभावाची सतत उपासना केल्यास उपासक पुनः जन्म घेत नाहीं. मुनिवर्य, मी येथें, राहून या आठही प्राणायामांचें चिंतन अहर्निश केलें आहे.

असो; जात असलेल्या, उभ्या असलेल्या, जागत असलेल्या अथवा निजणाऱ्याही पुरुषाच्या देह–वायूंचे मुक्तिदायक स्वभाव मी तुम्हांला सांगितले आहेत. त्यांचा अभ्यास केल्यास स्वभावतःच चपल असलेले हे वायु निरोध पावतात. यांच्या अभ्यासानें कर्तृत्व–भोक्तृत्वादिलक्षण अभिमानही नष्ट होतो. या प्राणचिंतनामध्यें संसक्त झालेलें व त्यामुळेंच बाह्य विषयाचा त्याग करणारें मन थोड्या दिवसातच केवल पदास प्राप्त होतें. कुत्र्याच्या चामड्याच्या पिशवींत ठेवलेलें दूध जसें ब्राह्मणाला सेव्य वाटत नाहीं, त्याप्रमाणें या कुंभकादिकाचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाचें प्रेम बाह्य विषयवृत्तींमध्यें बसत नाहीं. जे बुद्धिमान् या दृष्टीचा आश्रय करून राहिलेले असतात, त्यांना सर्व प्राप्तव्य प्राप्त झालेलें असतें. तेच सदा अखिन्न होत. जातां, येतां, जागता, निजतां, जे यांचा अभ्यास करितात त्यांना बंधन प्राप्त होत नाहीं. प्राणापानांच्या चिंतनानें ज्यांना बोध

झाला आहे अशा पुरुषाचें निर्मल व मोहरहित चित्त अंतरात्म्यामध्येंच निवास करतें. नानाप्रकारचे कृषि, गृह, आरामादि आरंभ सदा करणाराही स्वच्छ ज्ञानी जन या प्राणापानगतीस प्राप्त होऊन अति स्वस्थ होतो व सुख भोगतो. प्राण हृदयांतून निघतो व बाह्य द्वादशांगुलप्रमाण आकाशांत अस्त पावतो. आणि अपान बाह्य प्रदेशातून उदय पावून हृदयात जाऊन अस्त पावतो, इत्यादि वर सांगितलेंच आहे. बाह्य आकाशाकडे जावयास निघालेला प्राण अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ऊर्ध्वमुख वाहतो व हृदयात जाणारा अपान जलाप्रमाणें उतरत्या प्रदेशाकडे वाहतो. ( प्राण व अपान याना अग्निसोमरूपता आहे, असें वर सुचविलें आहे. त्याचेंच आता उपपादन करितात. ) अपान चंद्रमा आहे, तो बाह्यतः देहाला पुष्ट करतो. प्राण सूर्य अथवा अग्नि आहे. तो आंतून या शरीराला तापवितो. प्राण प्रतिक्षणीं हृदयाकाशास तापवून मागून तोंडापुढील गगनास तापवितो, म्हणून तो सूर्य होय. पण अपान—इंदु मुखाग्रास प्रथम अमृतानें शात करून नंतर एका क्षणांतच हृदयाकाशास थंड करून सोडतो. अपानचंद्राची शेवटची कला प्राणसूर्यानें जेथें ग्रासली आहे ( ज्या हृदयस्थ ब्रह्मामध्यें स्थित होऊन ग्रासली आहे ) त्या ब्रह्मास प्राप्त होऊन पुनः जीव शोक करीत नाहीं. त्याचप्रमाणें प्राणसूर्याची अंतस्थ कला ज्या स्थानीं ( बारा अंगुलप्रमाण बाह्याकाशोपलक्षित ब्रह्मामध्यें ) असलेला अपानचंद्र ग्रासतो त्या ब्रह्मपदास प्राप्त होऊन नर पुनः जन्मभाक् होत नाहीं. पण वस्तुतः एका प्राणाच्याच या दोन शक्ति पर्यायानें उदय पावत असतात, असें चिंतन करावें. कारण प्राणच सबाह्याभ्यन्तर आकाशांत सूर्य होतो व तोच उत्तरक्षणीं चंद्र होऊन शरीराचें आप्यायन ( आह्लादन ) करूं लागतो.

मुनिराज, याप्रमाणें प्राणापानांचे अस्तोदय पाहून दोन्ही कुंभकांमध्यें चित्त स्थिर केलें म्हणजे आत्म्याच्या निर्देहत्व, निष्क्रियत्व, निर्मनस्त्व इत्यादि वास्तव स्वभावांचा विचार करितां येतो. बाह्य कुंभकाचे वेळीं देहादि देशपरिच्छेद नसल्यामुळें व आयुःकालपरिच्छेदाचाही अभाव असल्यामुळें देशकालरहित स्वात्म्यामध्यें स्थित असलेला योगी शोक करीत नाहीं. त्याचप्रमाणें अंतःकुंभकामध्येंही हृदयांत प्राणापानसंधीमध्यें

प्रतिष्ठित असलेल्या मनाला आपल्या अधिष्ठानभूत ब्रह्माचा बोध अवश्य होत असल्यामुळें जन्मादि अनर्थांची प्रसक्ति होत नाहीं. अथवा हृदयस्थ स्वात्माच प्राणसूर्य असून तोच अपानात्मक चंद्ररूपानें उदय, अस्त, व तद्रश्मिभूत व्यानादि वृत्ति इत्यादिरूपानें विकार पावतो. यास्तव त्या स्वात्म्याहून निराळें कांहीं नाहीं, अशी उपासना करणें हाही स्वात्मदर्शनाचाच उपाय आहे. यास्तव हृदयस्थ प्रकाशरूप देवास पहावें. कारण बाह्य ज्ञानानें बाह्य भ्रामक तमाला कितीही जरी घालविलें तरी तें सर्वथा क्षीण होणें शक्य नसल्यामुळें त्याच्या क्षणिक क्षयानें कोणतीही उत्तम सिद्धि मिळत नाहीं. शिवाय बाह्य तमाची कल्पना आंतर तमामुळेंच होत असते. यास्तव बा मुने, हृदयस्थ ध्वांताला (अंधकाराला, अज्ञानाला)च घालवावें. त्याचा क्षय झाला असता उत्तम सिद्धि मिळते. दीपादिप्रकाशाच्या साह्यानें बाह्य तम घालविल्यास बाह्य रूपादि दिसतील. पण त्याच्या योगानें आंतर आत्मस्वरूप कधींही दिसणार नाहीं. यास्तव ज्याला चिरंजीवी व्हावयाचें असेल त्यानें बाह्य व आंतर कुंभकाचा अभ्यास करून हृदयगत तमाचा नाश करावा. म्हणजे सर्व अनर्थांचा व बाह्य तमाचाही क्षय होतो. प्राणायामपरायण पुरुषाला आधि-व्याधिजन्य, जन्म-नाशजन्य व देश-कालजन्य शोक होत नाहीं. यत्नावाचून सिद्ध झालेला अंतःस्थ कुंभक हेंच परमपद आहे. तेंच आत्म्याचें रूप, तीच शुद्ध व परम चिति आहे. पुष्पाच्या आंत असलेल्या सुवासाप्रमाणें प्राणाच्या आंत असलेल्या पण प्राणापानरहित चिदात्म्याची आम्हीं उपासना करतो. अपान व प्राण यांच्या संधीमध्यें असणाऱ्या चिदात्म्याची आम्हीं उपासना करतो. चिदात्मा प्राणाचा प्राण, जीवाचें जीवन, देहाचें धारण, मनाचें सत्य मनन, बुद्धीचा अवबोध, व अहंकाराचा अहंकार ( म्हणजे प्राणादिकांच्या व्यापाराचें निमित्त ) अशा चिदात्म्याची आम्ही उपासना करतों. ज्याच्यामध्यें हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व झालें आहे, जें हें सर्व आहे, जें सर्वतः व्यापून राहिलें आहे. व जें नित्य सर्वमय आहे, त्या चित्तत्त्वाची आम्ही उपासना करतों. सर्व ज्योतींची ज्योति, सर्व पावनाचें पावन व मनोबुद्धिप्रभृति भावानीं ( विकारानीं ) नम्र होत असूनही आपल्या पूर्वस्वभावापासून च्युत न होणारें, अशा चित्तत्त्वाचें आम्ही

चिंतन करतों. जेथें प्राणही अस्त पावतो व अपानही लीन होतो व जेथें ते दोन्हींही उदय पावलेले नाहींत अशा शांत व निर्विकार चित्तत्त्वाची आम्ही उपासना करतों. सर्व शक्तींच्या शक्तिरूप चैतन्याचें आम्ही अनुसंधान करतों. पूरकांशरहित असा हृदयांतील प्राणकुंभक व बाहेरील अपानकुभक हेंच चित्तत्त्व आहे. प्राणादि चिंतनानेंही तेंच प्राप्त होतें. इंद्रियांनीं विषयप्रदेशीं जाणें व त्यांचा उपभोग घेणें या दोन्ही कृत्यांचें तें निमित्त आहे. तें चित्तत्त्व सर्व कारणांचें कारण आहे. यास्तव आम्ही त्याचीच उपासना करतों. जें परमार्थतः सर्व कल्पनाकलंकरहित पण प्राकृताच्या दृष्टीनें जीवोपाधिभूत प्राणादि षोडशकलांनीं वेष्टित असलेलें आणि यथार्थ अनुभव हेंच ज्याचें निरातिशय ऐश्वर्य आहे, त्या सर्वोत्तम व सर्वदेववंद्य परपदास मी शरण आहें २५.

सर्ग २६—दीर्घ जीविताचीं कारणें.

भुशुंड—ही चित्तविश्रांति मी प्राणसमाधीच्या योगानें क्रमानें स्वतः आपल्या निर्मल अंतःकरणात प्राप्त करून घेतली आहे. हे मुने, मी या दृष्टीचा आश्रय करून राहिलों आहें. मेरु चळला तरी मी एक निमिषभरही चंचल होत नाहीं. माझी ही उत्तम समाधि कोणत्याही अवस्थेंत सुटत नाहीं. सर्व इष्ट व अनिष्ट जगत्स्थितींत मी विक्षेपरहित असतों. मी अंतर्मुख आहें. स्वच्छंदानें स्वात्म्यामध्येंच राहतों. सर्वाधार वायूचा जरी रोध झाला व महानद्यांचें जल जरी गोठून गेलें, तरी माझें हें समाधान नाहींसें झाल्याचें मला कांहीं अजून आठवत नाहीं. प्राणापानाचें अनुसरण व परमात्म्याचें अवलोकन केल्यानें मी आद्य व निःशोक पदरूप बनलों आहें. हे ब्रह्मन्, मी महाप्रलयापासून आजपर्यंत भूतांचे उदयास्त पहात जिवंत राहिलों आहें. मी भूत व भविष्य यांचें चिंतन करीत नाहीं. तर मनानें केवल वर्तमानस्वभाव साक्षिदृष्टीचा आश्रय करून राहतों. जशीं जशीं कार्यें प्राप्त होतील त्या त्या विषयीं फलेच्छा सोडून मी केवल सुषुप्त पुरुषाप्रमाणें निरभिमान बुद्धीनें राहतों, भावाभावमयी चिंता त्याज्य आहे, असा विचार करून मी आत्म्यामध्येंच स्थिर स्थित होतों. त्यामुळें मी उपद्रवरहित व चिरंजीव होऊन राहिलों आहें. प्राणापानाच्या संधींतील प्रकाशमय ब्रह्माचें चिंतन करीत मी आत्म्यामध्येंच संतुष्ट होतों हें

प्रिय मला मिळालें आहे व हें मिळेल अशी चिंता मी करीत नाहीं. त्यामुळें मी इतके दिवस जिवंत आहें. मी कधींही कोणाची ( आपली किंवा दुसऱ्याची ) स्तुति करीत नाहीं व निंदा करीत नाहीं. त्यामुळें शुभ गतीस प्राप्त होऊन चिरकाल जिवंत राहिलों आहें. हे साधो, माझें मन शुभप्राप्ति झाली तरी तुष्ट होत नाहीं व अशुभप्राप्ति झाली तरी खिन्न होत नाहीं. त्यामुळें सम व नित्य शुभ तत्त्वास प्राप्त झालों आहें. परम त्यागाचा आश्रय करून मी जीवितादि सर्व टाकलें आहे; ( त्याविषयींची आसक्ति सोडली आहे. ) हे मुने, माझें मन चापल्यरहित, शोकरहित, स्वस्थ, समाहित, व शांत झालें आहे. काष्ठ, विलासिनी स्त्री, दगड, गवत, अग्नि, बर्फ, आकाश, इत्यादि सर्वांना सारख्या दृष्टीनें पाहतों. आज मला काय मिळालें आहे अथवा आज मी काय केलें आहे व उद्यां मला मिळवावयाचें अथवा करावयाचें काय आहे, हा चिंताज्वर मला नाहीं. जरामरणादि दुःख आलें असतां मी भीत नाहीं व राज्यलाभादि सुख उपस्थित झालें असता मी हृष्ट होत नाहीं. हा माझा बंधु आहे, हा कोणी परका आहे, हा माझा आहे व हा दुसऱ्याचा आहे, ह्या कल्पना माझ्या कधीं मनांतही येत नाहींत. सर्व अनेक वस्तूंप्रमाणें भासणारें, आदि–अंतरहित व निरुपद्रव चित्‌च मी आहें, असें जाणतों व त्यामुळें सर्वउपद्रवरहित होऊन राहिलों आहें. आहार–विहारादि कोणत्याही अवस्थेमध्यें मी देह आहें, असें कधीं चुकून सुद्धां जाणत नाहीं. हा सर्व संसारसंबंधी आरंभ निद्रित पुरुषाप्रमाणें मी नसल्यासारखाच पहातों. प्रारब्धाच्या अनुरोधानें प्राप्त झालेले अर्थानर्थ शरीरस्थ हातांप्रमाणें प्रमाणें मला सम दिसतात. मी आपल्या स्निग्ध व मुग्ध दृष्टीनें सर्वत्र समभाव ठेवतों. या नखशिखान्त देहावर माझी ममता नाहीं; मी जें जें करतों त्याचा त्याचा अभिमान सोडतों. त्यामुळें शरीरवान् असलेल्याही माझें मन नैष्कर्म्याचा आश्रय करतें; हे मुने, मी जेव्हां जेव्हां कांहीं जाणतों तेव्हां तेव्हां माझी मति नम्रतेस धारण करते. मी दुसऱ्याचें आक्रमण करण्यास समर्थ असूनही तें करीत नाहीं. त्याचप्रमाणें मला कोणी ताप दिल्यास मी त्याकरितां खेद करीत नाहीं. मी अगदीं दरिद्र आहें; तथापि कशाची इच्छा करीत नाहीं. शरीर सचेतन असल्यासारखें दिसतें; पण मी

त्यांतील केवल चित्—कडेच ध्यान देतों. जडांशाचा विचारही करीत नाहीं. चिदात्मा सर्व प्राण्यामध्यें समान आहे. यास्तव मीही स्वतः सर्व-भूतांचा आत्मा बनून भूतसघास स्वशरीराप्रमाणें पाहतों. मी सर्वदा समाहितचित्त राहून आशापाशानीं आकृष्ट झालेल्या चित्तवृत्तीला हृदयांत थाराही देत नाहीं. निद्रित किंवा जागृत असतांनाही मी जगाची असत्ता व आत्म्याची सत्ता हातातील बेलफळाप्रमाणें साक्षात् पाहतों. जीर्ण झालेलें फुटलेलें, शिथिल झालेले, क्षीण झालेलें इत्यादि सर्वांस मी नूतन जाणतों. सुखी जनामध्यें मी सुखित आहें व दुःखितामध्यें दुःखित आहे. सर्वांचा प्रिय मित्र आहें; आपत्तींमध्यें मी पर्वतासारखा धीर व संपत्तीच्या वेळीं सर्व जगाचा मित्र आहें. धनादिकांच्या वृद्धि—क्षयामध्यें मी हे माझेच आहेत, असा अभिमान ठेवीत नाहीं. स्वतः मीच नाहीं, तेव्हा दुसरा कोणी माझा व मी दुसऱ्या कोणाचा कसा असणार ? घट, वस्त्र, आकाश, वन, गाडी इत्यादि सर्व चैतन्यच आहे. असा माझा भाव आहे. बा मुने, वर सांगितलेल्या या सर्व कारणामुळें मी चिरंजीवी झालों आहें.

मुनिराज, याप्रमाणें मी—त्रैलोक्यकमलांतील भ्रमर, अशा या चिरंजीव भुशुंड कावळ्याचा इतिहास आपणास सांगिला आहे. गुरुवर्य, मी अशा या महाविचित्र मायाविस्ताराचा दीर्घ काल अनुभव घेत येथें राहिलों आहें २६.

**सर्ग २७**—भुशुंडाची प्रशंसा, जाणाऱ्या वसिष्ठाची पूजा, व गमन.

**भुशुंड**—ज्ञानपारग मुने, केवळ आपली आज्ञा पाळण्याकरितां साहसानें मी चिरंजीव कसा झालों व येथें कसा राहिलों आहें, हें सांगितलें; मला क्षमा करा.

**श्रीवसिष्ठ**—भगवन् , हें काय, तूं आपला वृत्तान्त सांगून आम्हांला कृतार्थ केलें आहेस. तो वृत्तान्त अतिशय विचित्र व श्रवणभूषणरूप आहे. दुसऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणेंच असलेल्या तुला जे पाहतात ते धन्य होत. तुझ्यासारख्या चिरजीवी महात्म्याला पाहणाऱ्या या दृष्टी धन्य आहेत. बुद्धीला पावन करणारें आपलें चरित्र तूं यथावत् सांगितलेंस; व त्यामुळें या मनाला मोठा आह्लाद झाला आहे. मी सर्व दिशातून भ्रमण केलें आहे, देवांच्या अनेक विभूति पाहिल्या आहेत. पण तुझ्यासारखा महात्मा

मला कोठेंही आढळला नाहीं. या सृष्टींत पुष्कळ हिंडल्यास व अतिशय प्रयत्न केल्यास एकादा तत्त्वज्ञ महाजन आढळतो. पण तुझ्यासारखा भव्यात्मा ( कल्याणगुणसंपन्न पुरुष ) सर्व जगात सुलभ नाहीं. ज्याप्रमाणें एकाद्याच शिंपल्याच्या पेरांत मोती सांपडतें, त्याप्रमाणें एकादाच जगांत तुझ्यासारखा पुरुष आढळतो. पुण्यदेहवान् व मुक्तरूप अशा तुला मीं पाहिलें. हें आज एक मोठें शुभ कर्म केलें. यास्तव तुझें कल्याण असो; तूं आतां आपल्या शुभ गुहेंत प्रवेश कर. मध्याह्नसमय झाला आहे यास्तव मी देवमंदिरास जातों.

माझ्या तोंडून निघालेले हे शब्द कानीं पडतांच आपल्या संकल्पप्राप्त हातांनीं अर्घ्यपाद्यादि पूजासामग्री घेऊन तो काक वृक्षावरून उठला व शंकराप्रमाणें, माझी मोठ्या भक्तीनें आपादतलमस्तक पूजा करता झाला. नंतर महात्मन् , माझ्या मागोमाग मला पोंचवीत येणें इत्यादि उपचार पुरे झाले असें म्हणतच मी आसनावरून उठलों व पक्ष्याप्रमाणें आकाशात उडून गेलों. पण तो सुज्ञ एक योजनभर माझ्या मागोमाग मला पोंचवीत आला. तेव्हां आपल्या हातानें त्याला प्रतिबंध करून मी बळेंच त्याला पुढें न येण्याविषयीं आग्रह केला. मी पुढें निघून गेलों असता परतलेला तो पक्षी एका क्षणात आकाशमार्गामध्यें दिसेनासा झाला. खरोखर संतांची संगति सोडवत नाहीं. त्यानंतर मी त्या सत्पुरुषाचेंच मनांत सतत चिंतन करीत सप्तर्षिमंडलास प्राप्त झालों. तेव्हा अरुंधतीनें माझा सत्कार केला. रामा, कृतयुगाचीं आरभींचीं दोनशें वर्षे झालीं असतां मी भुशुंडाला मेरुशृंगावरील वृक्षावर भेटलों. आतां तें सर्व युग संपून त्रेता चालू आहे. हे शत्रुनाशका, तूं या युगाच्या मध्यभागीं झाला आहेस. आज आठ• वर्षांपूर्वी तो काक मला त्याच पर्वतार तशाच स्वरूपानें भेटला होता. असो; मी हा उत्तम भुशुंडवृत्तान्त तुला सांगितला आहे. याचा मनांत चांगला विचार कर, व जें युक्त दिसेल तें कर.

श्रीवाल्मीकि—जो शुद्धमति पुरुष ह्या भुशुंड कथेचा चांगला विचार करील तो या संसारभयपूर्ण असत् नदीस तरून जाईल २७.

**सर्ग २८—आख्यायिकासंबंध, देहादिकांचें आतिमात्रत्व.**

**श्रीवसिष्ठ**—हे निष्पाप राघवा, मी ही तुला भुशुंडाची आख्यायिका सांगितली आहे. या असल्या दृष्टीनें भुशुंड मोहसंकटांतून तरून गेला. रामा, प्राणाभ्यासपूर्वक या दृष्टीचा आश्रय करून तूंही संसारसागरांतून तरून जा. भुशुंडानें सतत अभ्यासानें प्रथम ज्ञानयोग संपादन केला. नंतर तो त्या पदास प्राप्त झाला. तूंही तसेंच कर. ज्यांची बुद्धि विषयासक्त नसते व जे प्राणापानांच्या गतींचें अवलोकन करितात, त्यांना भुशुंडाप्रमाणेंच परम तत्त्वांतील स्थिर स्थिति प्राप्त होते. या विचित्र विज्ञानदृष्टि तू ऐकल्या आहेस. यास्तव आतां स्वबुद्धीचा आश्रय करून वाटेल तसें कर.

**श्रीराम**—प्रभो, आपण माझ्या हृदयांतील अज्ञान पार घालविलें आहे. आम्हीं ज्ञानसंपन्न होऊन स्वपदीं प्रविष्ट झालों आहों. तुम्हांप्रमाणेंच सर्व विज्ञान जाणून आनंदामध्यें स्थित आहों. भगवन्, आपण सांगितलेलें भुशुंडाचें चरित्र फारच विस्मयकारक व अर्थबोधक आहे. ब्रह्मन्, त्या चरित्रांत आपण मांस–चर्मादिकांनीं बनविलेलें जें शरीरगृह सांगितलेंत तें कोणी व कां रचलें त्याची स्थिति कशी झाली व त्यांत कोण रहात आहे ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, परमार्थाचा बोध व दोषाचें निराकारण करण्याकरितां मी तत्त्वतः सांगतों, तें ऐक. मांसादिकांचें हें शरीरगृह कोणीही निर्माण केलेलें नाहीं. ( वेदादिकांमध्यें ईश्वर त्याचा निर्माता व जीव आपल्या कर्मभोगाकरिता तें त्याच्याकडून करविणारा आहे, म्हणून म्हणशील पण ) बाबारे, तें आभासमात्र आहे. निर्माण कर्त्यांवाचूनच झालेलें आहे. जलांतील चंद्राचें प्रतिबिंब निर्माण करणाराची अपेक्षा करतें कां ? भ्रांत वस्तूंना निर्माणकर्त्याची गरज मुळींच नसते. ( श्रुतींत सांगितलेलें ईश्वराचें जगत्कर्तृत्व मुख्य नव्हे, औपचारिक आहे. कारण तें मुख्य असतें तर, वेदादिकांत पुरुषाच्या स्वाभाविक निःश्वासाप्रमाणें जग ईश्वरापासून होतें, असें म्हटलें नसतें. तसाच जीवही निर्माण करविणारा नव्हे. कारण त्याच्या बुद्धिपुरःसर देह होत नाहीं. शिवाय तो जर करविता असता तर त्यानें आपल्यासाठीं चांगलाच देह निर्माण केला असता. अनिष्ट देह करावयास ईश्वराला त्यानें लावलेंच नसतें ) वस्तुतः चंद्र एक आहे. पण आपण त्याला जोंपर्यंत भ्रमानें दोन रूपानें पहात असतों

तोंवरच तो अनेक असतो. त्याप्रमाणें देहही प्रतीतिकालीं मात्र भासणारा आहे. त्याच्याकडचें लक्ष्य दुसरीकडे जाऊन त्याची प्रतीति नाहींशी झाली कीं तो नाहींसाच होतो. तो आहे, असेंही जें वाटत असतें तें सुद्धां त्याच्या अधिष्ठानसत्तेमुळें होय. स्वप्नामध्यें स्वप्नबोध सत्य असतो. इतर अवस्थांत तो असत् होतो. बुडबुडा दिसत आहे तों सत्य आहे. व दिसेनासा झाला कीं असत् होतो. भ्रमसमयीं मृगजल सत्य असतें; पण इतर वेळीं तें असत्य होतें. त्याप्रमाणें प्रतीतिकालीं देह सत्य असला तरी शुद्ध आत्म्याचें दर्शन झालें कीं, तो असत्य होतो. हें देहगृह आभासमात्र भासत आहे. त्याचा केवळ भास होत आहे. मी देह आहें, हें पूर्वी दृढ केलेलें मननच संस्कारद्वारा पुनः पुनः देहाकार होतें. यास्तव, निष्पाप रामा, देहच मी हा भ्रम सोड. कारण संकल्पानेंच निर्माण होणारे देह सहस्रावधि आहेत. तूं सुखानें शय्येवर झोंप घेत असतांना ज्या स्वप्नदेहानें दशदिशांत भ्रमण करीत असतोस, तो तुझा देह कोठें आहे? जागरसमयींही मनोराज्य करीत असताना स्वर्गीतील अंतःपुरांत अथवा मेरूवर ज्या सांकल्पिक देहानें जातोस तो देह कोठें आहे? स्वप्नांत आणखीं दुसरें स्वप्न पडून त्यांत ज्या देहानें तुझा विहार होतो अथवा एका मनोराज्यांत दुसरें मनोराज्य सुरू होऊन त्यात जो आणखी देह बनतो ते सर्व देह आहेत कोठें? रामा, हे सर्व देह जसे मनोमय व त्यामुळेंच सदसद्रूप आहेत तसा हा देहही मनोमय आहे. त्या कारणानेंच त्याला सत् किंवा असत् म्हणता येत नाहीं.

देह जसा अहं या अध्यासाचा विषय आहे त्याप्रमाणेंच धन, गृह इत्यादि ' हें माझें धन, हें माझें गृह ' इत्यादि ममताध्यासाचे विषय आहेत. त्यामुळें देहाध्यासाप्रमाणें हाही भ्रम आहे. तो सर्व संकल्पाचा विकास आहे. आतां स्वप्नादिकांहून देहाची स्थिति अगदीं भिन्न आहे, हें खरें; पण त्याचें कारण दीर्घ काल अध्यासानुवृत्ति हेंच आहे. पण तेवढ्यावरून त्याचें सत्यत्व, असांकल्पिकत्व इत्यादि ठरत नाहीं. संसार हें दीर्घ स्वप्न, अथवा दीर्घ चित्तभ्रम, किंवा दीर्घ मनोराज्य आहे. परमात्मप्रसादानें तुला जेव्हा बोध होईल, तेव्हा याचा बाध झाला आहे, असें स्पष्ट दिसेल. सूर्योदय होऊन पुरुष जागा झाला असतां जसें स्वप्न पाहत नाहीं,

त्याप्रमाणें तत्त्वज्ञानानंतर हा दीर्घ भ्रम अनुभवास येत नाहीं. जशी मी पूर्वीं ब्रह्मदेवाची उत्पत्ति वर्णिली आहे तशीच ही सर्व अनिर्वचनीय संकल्पकलना आहे. मनात आपोआप संकल्प उठत असतो. मन विचित्र संकल्पानीं भरलेलें असतें. याविषयीं मी ऐंदवाख्यानात काय सांगितले आहे, त्याचें स्मरणकर. एका शरीरातून निघताना चित्त ज्या देहाचे स्मरण करतें तो त्याला तसाच प्राप्त होतो. मरणसमयींही अति उत्कंठेने ज्याचें चिंतन केलेलें असतें त्याचेंच स्मरण होतें. यास्तव दीर्घ प्रयत्नाने मनाला प्रत्यगात्म्याकडे लावून आत्मसाक्षात्कार करून घेतला म्हणजे दे जगदाकार व संकल्प चैतन्यरूप होतो. पण रामा, याहून विपरीत भावन केल्यास, फलही विपरीत मिळतें. हा मी व हा माझा संसार अश भावना केल्यास तसाच अनुभव येतो. भावनादार्ढ्यामुळें संसारही सत टरतो. तीव्र वेगानें ज्याची भावना केलेली असते तेंच सत्वर तसें दिसतें. दिवसा ज्याचा जास्त परिचय झालेला असतो तेंच रात्रीं अनुभवा येतें. त्याचप्रमाणें अतिपरिचित संसाराचा अनुभव येतो. हा सर्व द संकल्पाचा परिणाम आहे. पण भितरा मनुष्य सुद्धा आपल्यासंकल्परचि व्याघ्रादिकांस जसा भीत नाहीं, त्याप्रमाणें बुद्धिमान् स्वसंकल्पज संसारास भीत नाहीं. ज्ञानी पुरुष आपल्या यथार्थ दृष्टीनें जगल्लक्ष्मी पहात नाहीं. हा भासमान स्वभाव स्वरूपभूत आहे. स्वच–आत्माच अ असें समजल्यावर मग त्याला कोण भिणार ? ज्याला भय वाटत अस त्याचेंच किंचित् विवेचन करावे. तो शुद्ध झाला म्हणजे या जगाचा म दिसत नाहीं. केवळ यथार्थ दृष्टीनेंच स्वभाव ( आत्मा ) शुद्ध होतो व त नंतर तो पुनः पूर्वीप्रमाणें अध्यासमल घेत नाहीं. जगत्रय हाच वरील मळ आहे. पण तो आभासमात्र आहे; खरा नव्हे, असें कळल्या आत्मा पुनः त्यानेंच मलिन कसा होणार ?

अनात्मपदार्थांच्या कल्पनेचा त्याग करणें हेंच यथार्थ ज्ञान हे मरण, जीवित, स्वर्ग, ज्ञान, अज्ञान, इत्यादि चिदाभासावाचून दुस कोणाला नाहीं; असें समजून एकता पाहणें हें सम्यक् ज्ञान होय. सत् आहे, माया असत् आहे, व त्या दोघांच्या योगानें संसार झ आहे. असें यथार्थ जाणून आत्ममय, ब्रह्ममय, झालें म्हणजे

अस्त पावत नाहीं व उदयही पावत नाहीं. सम्यक ज्ञान झालें असतां मन, सर्व भावरूपानें भासणाऱ्या पदार्थांचें असत्त्व व अधिष्ठानचिन्मात्राचें सत्त्व जाणतें. त्यामुळें निष्काम व शांत होऊन तें कोणाची निंदा व स्तुति करीत नाहीं. हर्ष व शोक करीत नाहीं. यथार्थ ज्ञानानें मन शीतल सत्यतेस प्राप्त होतें. सर्व बंधू अवश्य मरणारच, असा निश्चय झाल्यावर कितीही बंधूंचा जरी वियोग झाला तरी व्यर्थ परिताप कां होईल ? त्याचप्रमाणें स्वमरणाची तरी भीति कशाला वाटेल. उत्पन्न झालेल्या पुरुषाला कांहीं विभवादिक ( ऐश्वर्य वगैरे ) अवश्य मिळणारच. पण तेवढ्यावरून त्याला मोठा हर्ष मानण्याचें काय प्रयोजन आहे ? त्याचप्रमाणें संसारांत व्यवहार करणाराला आपत्ति भोगावी लागणारच. पण त्याकरितां शोक करण्याचें काय प्रयोजन ? मी अहंकार पूर्वी नव्हतों व पुढें नसणार, मग मध्येंच खरा कसा असेन ? हा देह काम, कर्म, वासना, अविद्या इत्यादि दोषांपासून उत्पन्न झालेला आहे. आणि हे रामा, मी देहाहून जर अन्य आहें तर चित्प्रकाशच असलों पाहिजे. ज्याप्रमाणें तित्तिर पक्षी आपलें घरटें बांधावयासाठीं गवताच्या मूळाजवळची मऊ काडीच घेतो, मधली राठ काडी घेत नाहीं; त्याप्रमाणें अत्युत्तम ब्रह्मपदीं स्थित झालेला ब्रह्मवेत्ता सर्वांच्या बाधाची सीमा, अशा ब्रह्मतेला ग्रहण करतो. प्रतीतिकालिक कठोरतेस ग्रहण करीत नाहीं. यास्तव या असत्य पदार्थांचे ठायीं थोडीशीही आस्था करूं नये. कारण बैलाला जसें दोरीनें बांधतात त्याप्रमाणें प्राण्याला आस्थेनें बंध होतो. ( आस्था त्याला बद्ध करते. ) यास्तव तिचा त्याग करून या लोकीं व्यवहार करावा. कर्तव्य असेल तें अवश्य करावें. पण अकर्तव्याची उपेक्षा करावी. आस्था व अनास्थाही सोडून श्रमावांचून प्रत्येक कृत्य करावें. आभासाचा त्याग केलास म्हणजे तूं नित्य निर्मल होशील. मी व हे भोग सत्य नाहींत; असें किंवा मी व हें सर्व चित्‌च आहे असें सतत चिंतन केलें असतां परम सिद्धि मिळते. या दोन चिंतनांतील तूं कोणतेंही जरी चिंतन केलेंस तरी तुला एकसारखेंच फल मिळेल. पण त्या चिंतनाबरोबर राग–द्वेषांचाही त्याग केला पाहिजे. त्याचा क्षय केला असता त्रिभुवनांतील सर्व प्रकारचें ऐश्वर्य प्राप्त होतें. परंतु ज्यांच्या बुद्धि रागादिदोषांनीं दग्ध झालेल्या असतात, त्यांच्या

चित्तांत उत्तम गुणांचा उदय होत नाहीं. धन, बंधु, इत्यादि रागाचे विषय व दारिद्र्य, शत्रु इत्यादि द्वेषाचे विषय पुनः पुनः उत्पन्न होऊन विलीन होत असतात. तेव्हां त्यांच्या ठिकाणीं सुज्ञानें अनुरक्त किंवा विरक्त काय व्हावयाचे आहे? कारण ही सर्व परमेश्वराची माया आहे. पण ती आपल्यामध्यें आसक्त झालेल्या पुरुषाला अधोगतीस लावीत असते. ही अज्ञाननिद्रा अतिशय घोर आहे. त्या निद्रेंत लोळणाऱ्यांनाच संसार-स्वप्न पडतें. यास्तव तूं तिचा त्याग कर. रामा, जागा हो. व सूर्या-प्रमाणें उदय पावलेल्या आपल्या चित्प्रकाशस्वरूपाला पहा. अरे निष्पाप राघवा, जागा हो; जागा हो. मी तुला वारंवार जागा करीत आहें. निरुपद्रव आत्मसूर्यास पहा. हें थंड ज्ञानजल तुझ्या अंगावर शिंपडून मी तुला जागा करीत आहें. यास्तव चांगला जागा हो. व आजच मिथ्या जगद्भ्रमाचा त्याग करून सत्य तत्त्व अवलोकन कर. सज्जना, विकल्प-समूहाचा त्याग करून तूं शांत आत्म्यामध्यें स्थित हो. २८.

**सर्ग २९**—रामाची विश्रांति, उक्तार्थाचाच पुनः विस्तार, पूर्वी कैलासावर शंकरानें असाच केलेला उपदेश.

**श्रीवाल्मीकि**—राघव स्वस्थ चित्तानें हें सर्व ऐकत होता. तो स्वात्म्या-मध्यें विश्रांति घेत होता. इतर श्रोतेही परम शांतीचा अनुभव घेत होते. एक क्षणभर ती दशरथाची सभा निश्चल व स्तिमित सरोवराच्या शोभेस प्राप्त झाली होती. राम शांत चित्तानें परमपदांत विश्रांति घेत आहे. तो परम सुखात निमग्न झाला आहे, त्याला स्वदेहाचें भान राहिलेलें नाहीं, असें पाहून भगवान् वसिष्ठही क्षणभर आपली वागमृत–वृष्टि बंद करून राहिला. अशा अतिशय शांत व निःशब्द अवस्थेत एक अर्धी घटिका गेल्यावर वक्त्यांतील श्रेष्ठ मुनि रामाला पुनः तोच परम अर्थ सांगूं लागला.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तूं सम्यग्ज्ञानी झाला आहेस. तुला स्वात्मलाभ झाला आहे. अशाच रीतीनें परमात्मतत्त्वाचा आश्रय करून तूं स्थिर रहा. संसारामध्यें स्थिति करूं नको. या संसारचक्राची नाभि संकल्प आहे. यास्तव त्याला रोध केला असतां सर्व संसारच बंद पडतो. त्याची गति कुंठित होते. आणि संकल्परूप मनोनाभि क्षुब्ध झाली कीं, संसारचक्र प्रवृत्त होतें. राग व द्वेष तिला क्षुब्ध करितात. क्षुब्ध झालेलें मन मोठ्या

प्रयत्नानेंही गतिरहित होत नाहीं. यास्तव अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें दृढ झालेल्या पौरुषानें चित्ताचाच निरोध करावा. शुद्ध बुद्धि व शास्त्रयुक्ति यानीं युक्त असलेल्या पौरुषानें प्राप्त होत नाहीं, असें काहीं नाहीं. अविचारी लोकाची समजूत घालण्याकरितां कल्पिलेल्या दैवपरायणतेचा त्याग करून स्वप्रयत्नाचा आश्रय कर व प्रथम चित्ताचा निरोध कर. हा अज्ञानभ्रम ब्रह्मदेवापासून प्रवृत्त झाला आहे. हे निष्पाप रामा, दृश्य जगाचे आकार म्हणजे शुद्ध भ्रमाचे विस्तार आहेत. संकल्प हेंच त्याचें कारण आहे. तो असेपर्यंत कोणतीही इष्टसिद्धि होत नाहीं. कारण त्याच्या अस्तित्वामुळें एका देहाचा नाश झाला तरी दुसरे अनेक देह उत्पन्न होतात. देहाच्या सुख-दुःखादिकाची चिंता करणारा पुरुष चित्रांतील पुरुषाहूनही अधम आहे कारण चित्राला तोडा, फाडा, मारा किंवा काय पाहिजे तें करा. त्याच्या आकारात हर्ष-खेदजन्य विकार होत नाहींत; पण पुरुषामध्यें तितकें धैर्य नसते. तर तो क्षणोक्षणीं अनेक परस्पर विरोधी विकारास प्राप्त होत असतो. मांसदेहाला कितीही जपलें तरी तो प्रतिवर्षी विकार पावतो. क्षीण होतो व शेवटीं मरतो. पण चित्रपुरुषाचा देह जपून ठेवल्यास त्याहून अधिक दिवस टिकतो. यास्तव या संकल्पदेहाहून चित्रदेह श्रेष्ठ होय. दीर्घसंकल्पजन्य मांसदेहाहून स्वल्पसंकल्पजन्य स्वाप्न देहही बरा. कारण तो जाग्रद्देहाप्रमाणें दीर्घ दुःख तरी देत नाहीं. चंद्रप्रतिबिंबाच्या दूषण-भूषणानें जसा स्वतः चंद्र लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें दीर्घस्वप्नमय व चित्तसंकल्पकल्पित असा हा देह भूषित किंवा दूषित झाला तरी चित्‌ला काहीं होत नाहीं. चित्‌चा अंत नाहीं. राघवा, आत्मा चलन-विकार रहित आहे. त्यामुळें देहाच्या क्षयानें तो क्षीण होत नाहीं. भोंवळ आलेल्या मनुष्याला सर्व दिशा गरगर फिरत आहेत, असें दिसतें. त्याप्रमाणें भ्रामक जीवाला देहव्यवहार भासतो. यास्तव धीरतेचा आश्रय करून भ्रमाचा त्याग करावा. देह संकल्पजन्य आहे. संकल्प वस्तुभूत नसतो. तर तो असत्य असतो. तेंव्हां असत्यापासून सत्य कसें होईल ? देह असत् असूनही रज्जुसर्पन्यायानें उत्पन्न झाला आहे. तो असत् किंवा सत् जगत्क्रिया करीत असतो; पण रामा, जडानें जें केलेलें तें तत्कृत ( जडकृत, ) आहे, असें कोणी समजत

नाहींत. यास्तव देह जरी करीत असला तरी तो क्रियांचा कर्ता नव्हे. जडाला वास्तविक चेष्टा किंवा इच्छा नसते पूर्ण आत्म्यालाही इच्छा असणें शक्य नाहीं. तर मग हें सर्व यंत्र चालतें कसें? तेंच तर मोठें गूढ आहे. त्याकरिताच आम्ही अनादि भावरूप अज्ञानाची कल्पना करून कशी तरी व्यवस्था लावितो; पण वास्तविक पाहिल्यास कोणी कर्ता नाहीं. चिदात्मा केवळ द्रष्टा आहे. ज्याप्रमाणें वायुरहित प्रदेशातील दीप आपल्याच समस्वरूपात साक्षिरूपानें स्थित असतो, त्याप्रमाणें सर्व व्यवहारात रहावें. ज्याप्रमाणें आकाशस्थ भास्कर स्वसत्तेनेंच भूमिगत लोकाच्या प्रवृत्तीचें कारण, त्याप्रमाणें तूंही या राज्यस्थितीचें निमित्त हो.

या शून्य देहगृहामध्यें कोठूनसा येऊन हा अहंकारवेताळ शिरला आहे. त्याचा तूं भृत्य होऊं नकोस. कारण त्याचा दास झाल्यास नरक हे फल मिळत असतें. सज्जन त्याच्या वाऱ्यालाही उभे राहत नाहींत; मोठमोठ्या योग्यांनाही त्याचें भय वाटत असतें. यास्तव धैर्य धरून स्वशरीरगृहातून याला हुसकून लावावें. चित्त पिशाचानें ग्रासलेलें असताना जे मरतात त्यांची बुद्धि पिशाचासारखीच होते यास्तव अहंकाराचें दास्य सोडून व त्याला अगदीं विसरून जाऊन एका स्वात्म्याचाच अवलंब करावा. ज्या नरकेच्छूंना या वेताळानें ग्रासलेलें असतें त्या मोहांधाना मित्र नाहींत व बांधवही नाहींत. अहंकारोपहत बुद्धीनें जी क्रिया केली जाते तिचें विषवल्लीप्रमाणें मरण हें फल मिळतें. विवेकधैर्य सोडून अहंकार करणारे मूर्ख मेलेच आहेत, ते नरकाग्नीचें इंधन झाले आहेत, असें समज. सर्वदुःखवृत्ति हा त्याचाच परिणाम आहे. आत्म्याचा अहंकाराशीं काहीं संबंध नाहीं. तो सर्वग असला तरी स्वरूपतः त्याच्याशीं मिळत नाहीं. अंकुराला जसें आकाश कारण, त्याप्रमाणें आत्मा चित्तचेष्टांचें कारण आहे. अहंकार, चित्त, मन, देह यांतील एकाशींही आत्म्याचा संबंध नाहीं. यास्तव त्यांचा शुद्धबुद्धीनें त्याग करून तूं आत्ममय हो. आत्म्याच्या सत्तेनें सर्व सत्तावान् आहेत. तिला विचारानें पृथक् केलें, कीं, सर्व जग तुच्छ होऊन राहतें.

आतां या विषयींच मला शंकरानें कैलासाच्या गुहेमध्यें सांगितलेली एक कथा मी सांगतों, ती ऐक. ही महामोहाचा नाश व संसार-दुःखाची

शांति करणारी आहे. गौरीरमणाचें सुंदर मंदिर असा एक कैलास पर्वत असून त्यावर भगवान् हर राहतो. त्या महादेवाची पूजा करीत, मी मागें एकदां त्या पर्वतावर गंगातटीं आश्रम बांधून रहात होतों. तपाकरितां मी पुष्कळ दिवस तेथें तापसाचार ( कृच्छ्रादि ) करीत राहिलों. मजबरोबर पुष्कळ सिद्ध होते. मी शास्त्रार्थसंग्रह केला होता. पुष्पांकरितां पानाचे द्रोण लावून ठेवले होते अनेक पुस्तकांचा मोठा संग्रह जमविला होता. रामा, अशा सर्व सामग्रीनें तप करणाऱ्या माझा पुष्कळ काल तेथें लोटला. नंतर एकदां श्रावणकृष्णपक्षाच्या अष्टमीस मध्यरात्रीं सर्व दिशा शांत झाल्या असतां, त्या मौन धरूनच बसल्या असता व गर्द अंधकार पसरला असतां, मी समाधि सोडून बाह्यदृष्टि होऊन बसलों होतों. इतक्यात अरण्यात एकाएकीं एक मोठें तेज उठलेलें मी पाहिलें. तें शुभ्रमेघांच्या संघाप्रमाणें अथवा चंद्रबिंबाप्रमाणें मला दिसलें. त्यानें सर्व दिशास प्रकाशित केलें. तेव्हा मी विस्मयानें अंतर्दृष्टीनें जों पहात आहें तों तेथें शंकर येत आहे, असें मला भासलें. त्यानें आपला हात गौरीच्या हातात दिला होता, व नंदी पुढच्या गणाची गर्दी मोडीत होता.

तेव्हां लागलीच, मी शिष्यांस बोलावून अर्घ्य घेऊन उठलों व ज्याच्या दृष्टीनें पवित्र झालेल्या त्याच्या अग्रभागीं गेलों. दुरूनच पुष्पांजलि देऊन, मी अर्घ्य समर्पण केलें. आणि देवाला साष्टांग नमस्कार घातला. तेव्हा चंद्रप्रभेची सखी पण तिच्यापेक्षा अधिक सरळ व शीतल, अशा दृष्टीनें मला त्यानें पवित्र केलें. नंतर पुष्पांच्या ढिगावर बसलेल्या त्या त्रैलोक्यसाक्षीला मीं जवळ जाऊन अर्घ्यपुष्पादि अर्पण केलें. त्याच्या अग्रभागीं मंदारपुष्पांच्या पुष्कळ अंजलि दिल्या, नानाविध स्तोत्रें व नमस्कार यांच्या योगानें मी त्या शिवाचें पूजन केलें. त्यानंतर मी तितक्याच आदरानें सखीयुक्त गौरी व गण यांची पूजा केली, पूजाविधि आटोपल्यावर पूर्णचंद्रकिरणांसारख्या शीतल वाणीनें तो भगवान् मला म्हणाला,'—ब्रह्मन्, शमशाली व विश्रांतीस प्राप्त झालेल्या तुझ्या कल्याणकारिणी चित्तवृत्ती परमपदामध्यें स्थित आहेत ना? तुझें तप निर्विघ्नपणें चाललें आहेना? कल्याणाची अनुवृत्ति होत असतेना? तुला प्राप्य वस्तु प्राप्त झाली आहे कीं नाहीं? तुझ्या सर्व भीति नाहींशा झाल्या कीं नाहीं?

भगवान् त्रिनेत्रानें असे प्रश्न केले असतां मीही म्हटलें,—" भगवन्, आपलें स्मरण हेंच कल्याण ज्यांना प्राप्त झालें आहे, त्यांना कांहीं दुष्प्राप नाहीं व कांहीं भयप्रद नाहीं. तुझ्या अनुचिंतनामुळे होणाऱ्या आनंदात निमग्न असलेल्या लोकांपुढें नम्र होत नाहींत असे या जगात आहेत कोण ? तुझें अनुस्मरण करीत स्थिरचित्तानें राहणारे जन जेथे असतात तेथील सर्व प्राणिसमूहाच्या प्राचीन पुण्याचें फल विस्तार पावतें व वर्तमान देहानें होणाऱ्या फलावर अमृतसेक होतो, म्हणजे तशा महात्म्याच्या संगतीनें प्राचीन व वर्तमान पुण्य अतिशय वृद्धि पावते. तुझें अनुस्मरण भक्ति उत्कर्षाचें बीज आहे, ज्ञानामृताचा कलश आहे. धैर्यरूपी चांदण्याचा चंद्र आहे. तुझें स्मरण हें मोक्षपुराचें द्वार आहे. हे भूतपते, तुझें अनुस्मरण याच चिंतामणीनें युक्त असलेल्या मी सर्व आपत्तींच्या मस्तकावर पाय दिला आहे. रामा, इतकें बोलून व त्यामुळें सुप्रसन्न झालेल्या त्या भगवान् महेश्वराला पुनः प्रणाम करून मीं काय म्हटलें, तें ऐक.

भगवन्, आपल्या अनुग्रहानें मला सर्व दिशा परिपूर्ण भासत आहेत; पण देवेशा, मी एक निर्णय विचारतों तेवढा सांग. कारण त्याविषयीं मला मोठा संदेह आहे. प्रसन्न मनानें व उद्वेग सोडून मला त्याचा उपदेश कर. हे प्रभो, सर्व पापक्षयकर व सर्वकल्याणवर्धन असें देवार्चनविधान कशा प्रकारचें असतें तें मला सांग.

**ईश्वर**—ब्रह्मज्ञा, मी तुला अत्युत्तम देवार्चन सांगतों. तें एकदां केल्यानेंच पुरुष मुक्त होतो. हे द्विजा, देव कोण असतो, हें तुला ठाऊक आहे का ? पुंडरीकाक्ष देव नव्हे; त्रिलोचन देव नव्हे; कमलोद्भव देव नव्हे; इंद्र देव नव्हे व अग्नि, वायु, सूर्य, चंद्र इत्यादिकांतील कोणी खरा देव नव्हे; ब्राह्मण, क्षत्रिय, मी, तूं इत्यादि देव नव्हे. देव देहरूपही नाहीं व चित्तरूप धारण करणाराही नाहीं. देव शरीरशोभारूप नाहीं व मतिही देव नव्हे, तर निरतिशय प्रमोद चित्प्रकाश देव आहे. कारण पुंडरीकाक्षापासून मतीपर्यंत वर ज्याचीं ज्यांचीं नावें घेतलेलीं आहेत त्या सर्वांची सत्ता व स्फूर्ति चित्प्रकाशाच्या अधीन आहे. पुंडरीकाक्षादि सर्व त्याच्या ठिकाणीं अध्यारोपित आहेत. यास्तव त्यांना चित्प्रकाशाहून पृथक् केल्यास त्याच्या स्वरूपाचीच सिद्धि दुर्लभ होते; मग देवत्व तर बाजलाच राहिलें.

सर्वत्र चित्प्रकाश हाच एक देव आहे. पण पुंडरीकाक्षादिकांमध्यें त्याची अतिशय अभिव्यक्ति झाल्यामुळें जळणाऱ्या कोळशाला जसें अग्नि म्हणतात, त्याप्रमाणें त्यांना देव समजतात. त्यामुळें श्रुति, स्मृति इत्यादिकांतील वादामध्येंही कांहीं विरोध नाहीं. देव या शब्दाचा अर्थ प्रकाशमान असा आहे. व मुख्य प्रकाश निरतिशयानंद स्वप्रकाश ब्रह्माचे ठायींच संभवतो. मर्यादित जडामध्यें संभवत नाहीं. यास्तव सूक्ष्मदृष्टि लोक अकृत्रिम चिच्छिवालाच खरा देव मानितात. देव या शब्दाचा वास्तविक अर्थ स्वप्रकाश आत्मा असा आहे. यास्तव त्याचीच उत्तम पूजा करावी. ज्यांना हें शिवतत्त्व माहित नाहीं, त्याच्याकरितां आकारादिकाचें पूजन सांगितलेले आहे. कारण जो योजनभर मार्ग चालू शकत नाहीं, त्याला कोसभर व्यायाम कर, असेंच सांगतात. आत्म्याचा तत्त्वतः साक्षात्कार होईपर्यंत पूजन केल्यामुळें प्रसन्न झालेल्या रुद्रापासून अमर्याद फल मिळतें. आत्म्याचा आनंद हेंच अकृत्रिम व अनाद्यन्त फल आहे जो अकृत्रिम फल सोडून कृत्रिम फलाच्या मागें लागतो, तो मंदारवन सोडून कारंजवनांत शिरतो. अकृत्रिमपूजनाची सामग्री—बोध, सर्वत्र आत्मदर्शन व शम हीं तीन उत्तम पुष्पें व चिन्मात्र शिव हा पूज्य देव,—एवढीच आहे. शम, बोध इत्यादि पुष्पांनीं ‘ आत्मा ’ या देवाचें पूजन करणें हेंच खरें देवार्चन आहे. आकाराचें पूजन, हें खरें पूजन नव्हे. आत्मज्ञानरूप देवार्चन सोडून जे जन कृत्रिम अर्चामध्यें आसक्त असतात त्यांना चिरकाल क्लेश होतात. ज्यांना ज्ञेय कळलें आहे, असे संत चिदात्मध्यान करावयाचें सोडून एकादेवेळीं साकार—देवपूजन करीत असल्याप्रमाणें दिसतात; पण तें त्याचें पूजन कृत्रिम फल मिळविण्याच्या आशेनें केलेलें नसून केवल बालक्रीडेसारखें होय. आत्माच भगवान् शिवदेव आहे. तेंच परम कारण आहे. ज्ञानपूजनानें त्याचेंच सदा पूजन करावें. मुने, तूं या जीवालाच अकृत्रिम, अव्यय, चिदाकाश, ब्रह्म जाण, तो त्याहून भिन्न नाहीं. यास्तव आत्मपूजन हीच मुख्य पूजा आहे.

**श्रीवसिष्ठ**—प्रभो, हें जग चेतनाकाशमात्र कसें ? व चेतनालाच जीवादित्व कसें तें सांग.

ईश्वर—मुनिवर्या, पारावारशून्य चिदाकाशच आहे. तेंच कल्पांतीं सर्वविषयविरहित होऊन राहतें. त्याचा विकास हेंच जग होय. स्वप्नातील नगराप्रमाणें हें जगत् चिदात्मक भासत आहे. पर्वत, नद्या, आकाश, जीव, भूतसंतति इत्यादि सर्व चिन्मात्र आहे. आकाश, परमाकाश. ब्रह्माकाश, जगत्—चैतन्य, इत्यादि हे सर्व चित्—तत्त्वाचेच पर्या[illegible] शब्द आहेत. स्वप्नामध्यें अनुभवास येणाऱ्या पदार्थांची जशी नि[illegible]च सामग्री, त्याप्रमाणें जाग्रतींतील पदार्थांचीही तीच सामग्री असून चित्तही महाचित्तत्त्वाकडून प्रकाशित होऊनच सर्व पदार्थमय होऊं शकतें. यास्तव त्रिभुवनांतील पदार्थमात्र चैतन्याधीन व म्हणूनच चैतन्यात्मक आहेत. त्रिकालीं भासणारें सर्व ठिकाणचें सर्व चिन्मात्ररूप आहे. असो; मुने, हा मी तुला परमदेव सांगितला आहे. तोच तूं, मी व हें सर्व जग आहे. त्यावाचून कोणत्याही अवस्थेत दुसरें कांहीं नाहीं. २९.

**सर्ग ३०**—चित्-ची सर्वात्मता, सर्व भोक्तृभावानें स्थिति, व तिला जीवभावाची प्राप्ति.

**श्रीईश्वर**—याप्रमाणें हें सर्व विश्व केवळ परमात्माच आहे. ब्रह्मच परमाकाश आहे. तोच पर देव होय. यास्तव त्याचें पूजन करणेंच श्रेयस्कर असून त्याच्यापासून सर्व इष्ट प्राप्त होतें. तेंच सर्व सर्गाची भूमि आहे. हे सर्व त्याच्यामध्येच व्यवस्थित आहे. अकृत्रिम, आदि—अंतरहित, अद्वितीय, अखंडित व बाह्य साधनांनीं साध्य न होणारें सुख त्याच्यापासून प्राप्त होतें. हे मुनिश्रेष्ठा, तू ज्ञानी आहेस, म्हणून सांगतों. या सर्वोत्तम देवाच्या पूजनांत पुष्प—धूपादिकांच्या ढिगाचें कांहीं प्रयोजन नाहीं. ज्याच्या बुद्धीला चांगलीशी व्युत्पत्ति झालेली नसते व जे बालकाप्रमाणें कोमल—चित्त असतात, त्यांच्याकरितां ही आकारपूजा कल्पिली आहे. शम—बोधादि सामग्री नसल्यास बाह्य पुष्पादिकांनीं पूजा करितात. मिथ्या कल्पित आकाराचे ठायींही ईश्वरभाव ठेवून व मोठ्या आदरानें त्याची धूपदीपादिकांच्या योगानें पूजा करून अज्ञ अतिशय संतुष्ट होतात. व त्यांना फलही तितक्याच योग्यतेचें मिळतें.

पण हे ब्राह्मणा, तुझ्यासारख्या उत्तम अधिकारी पुरुषाला हें बाह्य धूपादिकांच्या योगानें होणारें अर्चन कांहीं उपयोगाचें नाहीं. सर्व त्रिभुवनाचा

आधार असा एक परमात्माच देव असून तोच खरा शिवस्वरूप आहे. तो सर्वसंकल्पशून्य व अमर्याद आहे. वेलींतील रसाप्रमाणें तो सर्वांच्या आंत सत्तारूपानें भरून राहिला आहे. जें चित्तत्त्व अरुंधती, तूं, पार्वती, हे सर्व गण, मीं स्वतः, व हें त्रिभुवन, यांमध्यें आहे तोच खरा देव आहे, असें उत्तम बुद्धिमान् म्हणतात. व्यवहारांत हात–पाय इत्यादि अवयवांनीं युक्त असलेल्या मूर्तीला देव मानितात. पण त्यांत तरी चिन्मात्रावांचून दुसरें कोणतें तत्त्व आहे ? यास्तव हे ब्राह्मणा, तो देव कोणापासूनही दूर नाहीं. तो या शरीरातच स्थित आहे. तोच करितो, खातो, धारण करतो, जातो, श्वासोच्छ्वास करतो, सर्व जाणतो, अंगातील सर्व सूक्ष्म वेदनांनाही प्रकाशित करतो. या देहनगरीला तोच चालती बोलती करतो. तो मन व पांच ज्ञानेंद्रियें यांचा विषय होत नाहीं. त्या निर्मलात्म्याच्या व्यवहाराकरितांच चित् अशी संज्ञा कल्पिली आहे तिच्याच भ्रामक विकारांना जीव, चित्त, काल, देश, क्रिया, द्रव्य, चंद्र, सूर्य, पर्वत इत्यादि अनेक नावें व्यवहाराकरितां योजलेलीं आहेत. स्वार्थाची काहीं इच्छा नसतांना वसंत जसा अंकुरांना विस्तृत करितो, त्याप्रमाणें चिदात्माही स्वार्थावांचूनच जगल्लक्ष्मी पसरतो. या चित्–नेंच चतुर्भुज विष्णूच्या रूपानें असुरमंडलास मारलें. तीच त्रिनेत्ररूप होऊन चंद्र, नंदी, पार्वती, इत्यादिकांची आधारभूत झाली आहे. हीं चतुर्दश भुवनेंही ती महा चितिच आहे. या चित्–लतेला विचित्र दृश्यपुष्पें आलीं आहेत. पण तीं फार नाजुक आहेत. त्यांना विचाररूपी ऊन तर मुळींच सहन होत नाहीं. या महाचितीकडून भास्करादि सर्व ज्योति प्रकाशमान होत असतात. तीच या सर्व त्रिभुवनास व्यक्त करते. चिद्रसायनाचा सेक झाल्यानेंच सर्व पदार्थांची पंक्ति लावचर पसरते. या शरीरात चिच्चमत्कार जर नसते तर त्रैलोक्यांतील हे अनेक आकारही सिद्ध झाले नसते. कारण त्यामुळेंतर हें सर्व जीवाला भासत असून त्याची अस्तित्वसिद्धि होत असते. चित्प्रकाश नसून नुस्ती जिह्वाच जर असती तर तिच्या अग्रावर ठेवलेल्या गुळाची परीक्षा कशी झाली असती. त्याची गोडी कशी कळली असती ? तस्मात् सर्व चराचराचें कारण चित् आहे. एक चित्च आहे. परमार्थतः दुसरें काहीं नाहीं. हें सर्व चिन्मात्र उत्पन्न झालें आहे.

**श्रीवसिष्ठ**—रामा, ईश्वराचें हें भाषण ऐकून मी म्हटलें, “ प्रभो, जर एक चित्च आहे व तिच्यावाचून दुसरें कांहीं नाहीं तर हा देह निद्रा, मरण, मूर्च्छा या अवस्थात जड कसा होतो ? घट–वस्त्रादि इतर दृश्य जड कसें ? मृत्तिकासमूहरूप अशी ही पृथ्वी जड कशी ? त्याचप्रमाणें हा देह, मरण, मूर्च्छा इत्यादि अवस्थांपूर्वी चेतनावान् होता तो आता चेतनारहित होऊन पडला आहे, असा अनुभव का येतो ?

**ईश्वर**—मुने, तूं हा मोठा प्रश्न केला आहेस. तथापि मी तुला त्याचें उत्तर सांगतों, ऐक. या शरीरांत सर्वभूतमयी चित् आहे. पण उपाधींमुळें तिचे दोन प्रकार झाले आहेत. एक बुद्धीमध्यें आसक्त होण्याचा जिचा स्वभाव आहे अशी ( म्हणजे विज्ञानमय नांवाची कर्तृभोक्तृस्वभाव ) व दुसरी साक्षिरूप कूटस्थ चित्. या दुसऱ्या चित्ला निर्विकल्पा चित् असें म्हणतात. पण हा भेद वास्तविक नव्हे; उपाधिकृत आहे. चित्तसंकल्पामुळें ती चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें अन्य असल्यासारखी भासते. कोप आला असतां तोच पुरुष एका क्षणांत बदलून अन्य कसा होतो ? त्याचप्रमाणें विकल्पानें चिह्नित झालेली चित् अन्य स्वरूपास प्राप्त होते. नंतर अशारीतीनें स्वरूपापासून च्युत झालेली ती चित् क्रमानें जड देहादि वस्तूंच्या तादात्म्याची भावना करून आपल्याच विकल्पबुद्धीचा विषय होते. याप्रमाणें स्वतः चित् चेत्य (चिद्विषय) रूपास प्राप्त होऊन आकाशादि सूक्ष्मभूतरूप बनतें. शब्दादि भोग्यांचें बीज होते. पुढें क्रमानें वायुप्रभृति इतर शरीरसामग्री बनून जीव होते. लागलीच क्रमानें बुद्धि, अहंकार व मन होते. मी चंडाल आहें, असें मनन केल्यानें एकादा द्विज जसा चंडालत्वास प्राप्त होतो, त्याप्रमाणें मनोरूप झालेली बुद्धि मननानें संसाराचा आश्रय करते. या रीतीनें ब्रह्मचित्च अज्ञानानें शबलरूपास प्राप्त होऊन देह–जीवादि आकार बनते. नंतर त्याच्या जाड्यानें असर्वज्ञ होऊन पुनः पुनः भोगांचा संकल्प केल्यामुळें सतत संसार करते. जल जसें गार होतें तशी चित् जाड्यामुळें जीवताभ्रमास प्राप्त होते. त्यानंतर तिलाच चित्त, मन, मोह, माया इत्यादि नावें योजतात. ती जाड्याचा आश्रय करून संसारांत उत्पन्न होऊं लागते. ती मोहमांद्यास प्राप्त झाली आहे; तृष्णारूपी खोड्यानें पीडली आहे. काम–क्रोध–भयानें युक्त आहे. वैभव व दारिद्र्य यांच्या योगानें व्याकुळ

झाली आहे. तिनें आपला अनंत विस्तार सोडला आहे. भार्यापुत्रादि बाह्य व मर्यादित वस्तूंच्या वियोगानें ती दुःखित होते. ही मी आहें, या शून्य भावानें ती विकल केली गेली आहे. तिनें केवळ देहावरच आस्था ठेवलेली असून ती अतिशय दैन्यास प्राप्त झाली आहे. ती मोहरूपी महापंकात रुतली आहे. आपल्या कळपांतून चुकलेल्या हरिणीप्रमाणें परतंत्र झाली आहे. वैभवानें ही उदय पावते अथवा भूतमात्रांचा विकास झाला असतां ही अंतःकरणात चिदाभासरूपानें उदय पावते व दारिद्र्यानें अथवा भूतवियोगानें अस्त पावते. ही वस्तुतः आनदघन असूनही अज्ञानानें देहमय होऊन इंद्रियजन्य सुखलेशाची आशा करते. त्यामुळे संकटांच्या परंपरेंत पडून अतिशय विषमतेस प्राप्त होते. एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत, एका विपत्तींतून दुसऱ्या विपत्तींत ती पडते. क्रमानें मनुष्य जन्म लाधला तरी बाळपणापासून व्यवहारकौशल्याचा अभ्यास केल्यामुळें ती अधिकच दुःखात पडते. कारण विद्वत्तेकरिता काव्य—नाटक-तर्कादिकाचा अभ्यास करून ती धन गृह-क्षेत्रादि आपल्याच बधाला निर्माण करण्यास तयार होते. त्यातच ती आपला पराक्रम गाजविते. मोक्षोपयोगी विवेक संपादन करीत नाहीं.

याप्रमाणे जन्मभर व्यवहार करीत राहून आयुर्मर्यादा संपली व मरण-काल समीप आला म्हणजे तीच शबल चित् सर्वतः भयभीत व साशंक होते. भूमीवर पडलेल्या शफरीप्रमाणें गडबड लोळते. बाल्यामध्यें तिचे सर्व व्यवहार परवश असतात. यौवनात ती चिंताक्रांत असते. वार्धक्यात अतिशय दुःख भोगते व मेल्यावर कर्माधीन होते. ती स्वर्गादि अनेक लोकात व योनींत अनेक आकारानीं उत्पन्न होते. फार काय पण ती शबल चित्च नारायण होऊन क्षीरसागरीं शयन करते. ब्रह्मपुरात ध्यानमग्न ब्रह्मा बनते. या शैलावर अर्धनारीनटेश्वर होते व स्वर्गांत इंद्र होते. तीच सूर्य होऊन दिवस करते व मेघ होऊन वृष्टि पाडते. सारांश, ती सर्वात्म-रूप, सर्वग, सर्वशक्ति, व सर्व असून आकाशाहूनही अतिशय स्वच्छ व सूक्ष्म आहे. पण स्वाज्ञानामुळें जीव होऊन असंख्य योनींतून फिरत असते. हे महामुने, याप्रमाणें ही मी तुला जीवशक्ति सांगितली आहे. ती प्राकृत आचारांनीं परतंत्र, दीन व पशुधर्मिणी झाली आहे. अनंत वैभवा-

पासून भ्रष्ट होऊन दौर्भाग्यानें संतप्त होणारी ही चित् जीवत्वास प्राप्त होऊन पतिविरहित स्त्रीप्रमाणें रडत बसली आहे.

हे मुने, अविद्येचें सामर्थ्य कसें आहे तें पहा. पूर्ण आनंदस्वभाव असलेली चित्, रहाटास बांधलेल्या मडक्यातील आकाशाप्रमाणें आपल्या निरतिशय आनंदपूर्ण भावाचें विस्मरण झाल्यामुळें मी देहच आहें, असें जाणून भोगनिमित्त पुण्य सपलें असतां, अरे अरे माझी मोठी हानि आहे. असा शोक करीत पुनः पुनः पतन पावण्याकरितां अधिकाधिक खालीं जाते! केवढी कष्टाची गोष्ट आहे? ३०.

**सर्ग ३१**—जीवतादिकांचा निषेध करून शुद्ध चित्चें प्रदर्शन, तिची मन, प्राण इत्यादिकांच्या द्वारा अंतर्बहिः प्रथा.

**श्रीईश्वर**—वसिष्ठमुने,वर सांगितल्याप्रमाणें शबलचित् अज्ञानानें मी दुःखी आहें, अशी भावना करून खोटाच जीवजगद्भाव संपादन करते. मदिरामदानें मत्त होऊन पडलेली एकादी वधू स्वप्नांत मेलेली नसतांनाही मी मेलें आहें, असें समजून जशी रडते, त्याप्रमाणें चित्ही नष्ट झालेली नसतानाच मीं नष्ट झालें आहें असें समजून रडते. कारणावांचूनच विपरीत बुद्धि मोठ्या वेगानें फिरणाऱ्या चाकाला जशी स्थिर समजते, त्याप्रमाणें अहंताभ्रमामुळें चितिही हें अस्थिर जग स्थिर आहे, असे पाहते. या चितीला संसाराचा अनुभव येण्यास चित्तच कारण आहे. पण तें स्वतःही वस्तुभूत ( सत्य ) नव्हे. कारण तें चिद्रूप आहे कीं अचिद्रूप आहे, याचा निर्णय करता येत नाहीं. त्याला चित् म्हणावें तर तें साक्षिविषय आहे, ( म्हणजे साक्षीला दिसणारें, दृश्य आहे ) व जें जें साक्षिविषय असतें तें तें जड असते. बरे त्याला अचित् म्हणावें तर त्याचा जगामध्यें अंतर्भाव होऊन जगत्कल्पनेचें कारण होणार नाहीं. याप्रमाणें कारणचित्तच नाहींसें झाल्यावर कार्य चेत्य जगत् सिद्ध कसें होणार? तस्मात् ज्या चित्च्या योगानें चित्त मोठ्या यत्नानें केलें जातें, ती चित् चित्त किंवा चित्ताच्या अधीन असलेलें चेत्य नव्हे. तर ती शुद्धच आहे. याप्रमाणें चित्ताचा निषेध केला असता चित्–च्या ठिकाणच्या द्रष्टृ–दर्शन–दृश्य, कर्तृ-करण-कार्य, मातृ-मान-मेय इत्यादि त्रिपुटींचाही निषेध सहजच होतो. चित्तवृत्ति, तिचा आश्रय, व विषय इत्यादि दुसऱ्या सर्व भावाचाही तिच्या

ठिकाणीं वस्तुतः अभाव आहे. तुषारांमध्यें उष्णतेचा अथवा शिळेमध्यें अंकुराचा जसा अभाव असतो त्याप्रमाणे चितीच्या ठायीं वस्तुता, अवस्तुता शून्यता, अशून्यता इत्यादिकांचा अभाव आहे. ती केवल व अगदीं स्वच्छ आहे. हा सर्व अनर्थ देहेंद्रियादिकांचे ठायीं 'अह, मम' अशी व हें सर्व सत्य आहे, अशी भावना ठेवल्यामुळें उत्पन्न झाला आहे. त्यामुळेंच तत्त्वज्ञ पुरुषाच्या ठिकाणचा अनर्थ नुस्त्या भावनात्यागानेंच नष्ट होतो. पण याप्रमाणें हा त्रैलोक्य पदार्थ केवल भावनेनेंच तृणवत् त्याग करितां येण्याजोगा असूनही केवल भावनाबलानेंच अज्ञाला तो दुःसाध्य झाला आहे. हा अर्थ स्वाधीन आहे. पुरुषाला प्रयत्नानेंही जें साधता येत नाहीं तें तो अनायासानें कसें व केव्हां साधणार ?

असो; ही दुसरी निर्विकल्पा चित् सर्वगामिनी आहे. ती अतिशय स्वच्छ असून शिवाय सर्व तेजांची दीपिका आहे. ती नित्य निर्मल, नित्य उदित, निर्मनस्क, निर्विकार, निरंजन व सर्व वस्तूंत रहाणारी आहे. ती साक्षीप्रमाणें सर्वत्र स्थित असते. प्रकाशक दीपाप्रमाणें स्वतः कोणतीही क्रिया करीत नाहीं. पण ही अशा अद्भुत प्रभावानें युक्त असूनही देहादिभावनेनें मलिन झाली आहे. विकल्परहित असूनही विकल्प करणारी झाली आहे. अजड असूनही जडासारखी झाली आहे. व सर्वगा असूनही मर्यादित झाली आहे. ही विशेष अभिमानादि-विकल्परहित असलेली परा व सूक्ष्मा चित् लिंगदेहामध्यें प्रतिबिंबभावानें अनुगत होऊन ( येऊन ) हस्त-पादादि अंगें, हृदयादि मर्मस्थानें, असंख्य नाड्या, इत्यादि शरीरास नखशिखांत व्यापते. त्यामुळें जागरावस्थेंत पुरुषाची चित् बाहेर रूपादि पाहून व आंत संकल्पानें युक्त होऊन बोधरूप बनते. स्वप्नांत वासनामय विषय-दर्शन व संकल्प यांच्या योगानें अंतर्बहिर्बोधयुक्त होते. सुषुप्तींत ती केवल अज्ञानालाच पहाते. व उठल्यावर 'मला एवढा वेळ कांहीं कळलें नाहीं.' असें सांगते. यास्तव त्यावेळीं ती असली तरी नसल्यासारखी होते. म्हणून ती अबोधरूप होय. जसा साधु पुरुष असाधूंच्या समागमानें व त्यांच्या दुष्ट विचारांच्या संस्कारांनीं असाधु होतो, त्याप्रमाणें अति स्वच्छ ब्रह्मचित्च देहादिरूप होऊन त्याच्या अनुकूल व प्रतिकूल पदार्थांविषयींच्या चिंतेंत पडते. पण सोन्यांतील मलिन भाग काढून

टाकला असतां तें जसें शुद्ध होतें, त्याप्रमाणें चित्-वरील जडारोप काढून टाकला असता तीही शुद्ध होते. स्वरूपाला न जाणल्यामुळें हिचा संसार प्रवृत्त होतो. व तिचा स्वभाव कळताच तो निवृत्त होतो. थोडीशी भेद-दृष्टि केल्यानेंही ती मोठ्या अनर्थात पडते. इंद्रियादिकातील विषयग्रहणादि शक्ति चित्‌चीच आहे. इंद्रियगोलकाची किंवा विषयांची नव्हे. मनोवृत्तींचा संसर्ग सोडून सुषुप्ताप्रमाणें असलेली संवित् हीच परमचित् म्हणून सांगितलें आहे. चिति संकल्पामुळें क्रियोन्मुख होते. संकल्प हा मननाचाच एक प्रकार आहे. पण मनन हें चित्ताचें कालुष्य आहे. व आत्मा निर्मल चित् आहे. संकल्पामुळेंच चित् जीवरूप होते. या शुद्ध चितीचा रथ जीव आहे. जीवाचा रथ अहंकार आहे. अहंकाराचा रथ बुद्धि, बुद्धीचा रथ मन, मनाचा प्राण, प्राणाचा इंद्रियगण, इंद्रिगणाचा देह, देहाचा रथ स्पंदन व स्पदन हेंच कर्म आहे. तेंच जरामरणाचें निमित्त होय. अशा प्रकारचें हें आदिविभूतीपासून उत्पन्न झालेलें चक्र केवळ प्रतिभासरूपानें भासत आहे. प्राण हें मननाचें निमित्त आहे. जेथें प्राण-वायु असतो तेथें मनन राहते. जेथें प्रकाशश्री असते तेथेंच रूप शोभतें. सर्वांस चालन देण्यास समर्थ असलेला प्राण जेथें असतो तेथें मन कंपायमान होतें. मन आकाशात लीन झालें म्हणजे प्राण कंपायमान होत नाहीं. त्याचप्रमाणें प्राणवायु शांत झाल्यासही मनाचा थांग लागेनासा होतो. कारण प्राणानें प्रेरणा केली असतां मन, गोफणीनें सोडलेल्या दगडाप्रमाणें, एका क्षणात दुसऱ्या जागीं जातें. सारांश फूल व वास, अग्नि व उष्णता, इत्यादिकाप्रमाणें प्राण व मन यांचें साहचर्य आहे. चित्त व मन यानीं बनलेल्या लिंगशरीरात्मक प्राणाच्या गुहेंत चित्-चा बिंबप्रतिबिंबभावानें द्विगुणित विस्तार प्राणामुळेंच होतो. कारण तसें जर नसतें तर जड व अजड अशा दोन्हीप्रकारच्या पदार्थांत सम व स्वच्छ असलेली संवित् जडामध्यें व्यक्त न होतांच चेतनामध्यें व्यक्त झालेली कशी दिसती ? ती प्राणस्पंदामुळें जणुं काय क्षोभच पावत असते, असा अनुभव येतो व जडामध्यें केवळ सत्तामात्र स्वरूपानें राहते. प्राणानें जिला जागें केलें आहे अशी ती ज्ञानरूपानें शरीरांत सर्व जाणते. जीवनसमयीं नाना ज्ञानक्रिया करणारा देह प्राण निघून गेला

असतां कांहीं करीत नाहीं; तर तो मननरहित व निष्कंप होऊन राहतो. मुनिवर्या, अविद्या, काम व कर्म यानीं युक्त असलेलें लिंगशरीरच पुर्यष्टक आहे त्यात चित् प्रतिबिंबित होते. पण पुर्यष्टक मनःप्रधान आहे. तें सर्व कार्यांचें मुख्य कारण आहे. त्यालाच दुसऱ्या आचार्यांनीं चित्तादि दुसरींही नांवें योजलीं आहेत. असो, जीव, जीवाची उपाधि व त्याचें भोग्य सर्व विश्व उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही काळीं चिदेकरस सन्मात्र ब्रह्माच्या अधीन असल्यामुळें परमार्थतः ब्रह्मच होय; असें जाण. ३१.

**सर्ग ३२**—पुर्यष्टकगत चित् देहादिकाची चेष्टा कशी करविते व दुसऱ्या देशांत कशी जाते त्याचें वर्णन.

**ईश्वर**—मुने, परमा चित् वर सांगितल्याप्रमाणे पुरुषाच्या पुर्यष्टकात प्रवेश करून कोणत्या रीतीने ऐहिक व पारलौकिक कर्मं करते, देहादिस्पदशालिनी होऊन स्नान, भोजन, यजन इत्यादि कशी करते व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि शब्दास पात्र कशी होते ? तें मी सांगतों, ऐक. देहाच्या स्पंदाला चित्प्रतिबिंबभूत जीवाचें चलन कारण होतें. जीवचलनाला मायाशक्ति कारण आहे. ती-जीवाची उपाधि, असे जें पुर्यष्टकरूप मन त्याच्यारूपानें परिणत झालेली व वास्तव चित्स्वभावास आच्छादित करणारी आहे. पण ती मनोरूपानें परिणत होण्याचें कारण पूर्वसंचित कर्म आहे. मुने, या मायाशक्तीच्या प्रसादानें कलंकवती चित् गंधर्वनगरासारखें जगत् निर्माण करते व नाहींसें करते. ( अविचारानें करते व विचारानें तें मोडते ) पण देहस्पंदाला चित्त, मन, अहंकार इत्यादिकाचीही गरज आहे. कारण चित्तादिकाच्या अभावीं देह दगडाप्रमाणें जड होऊन राहतो. जीवाच्या प्राणकर्मेंद्रियव्यापारामध्यें ब्रह्म केवल सानिध्यानें साधारण निमित्त होतें. हे ब्राह्मण, परमात्म्यानें शरीररूपी शकट ओढावयास मन व प्राण हे दोन बैल योजले आहेत. व त्याच्या योगानें शरीराच्या विविधचेष्टा चालतात. पण जीवाच्या जीवनाला मुख्य आधार चिद्रूप परमात्म्याचाच आहे.

जीवांचीं शरीरें सर्वदुःखास कारण होणारीं आहेत. जलावरील तरंगाप्रमाणें शरीरात अनेक आधि व्याधि पुष्ट होतात. त्यामुळे जीवाना अतिशय क्लेश होतात. चित्–मध्यें सर्व शक्ति आहेत, हें मी सांगितलेंच

आहे. त्यामुळें मी चित् नव्हे, अशी भावना केल्यानेंही जीव अचित्-रूप असल्यासारखा होतो. ज्याप्रमाणे मदिरादिजन्य मदानें पराभूत ( मोहित ) झालेला पुरुष हातातील खड्गादिकाच्या योगाने आपलेच अंग कापलें जात आहे, हें जाणत नाहीं; त्याप्रमाणें मूढ चित् आपणच आपल्या संकल्पानें आपला नाश कसा करीत आहों, हे जाणत नाहीं. ज्याप्रमाणें मदोन्मत्त पुरुष काहीं वेळाने स्वकार्याचें स्मरण झालें असता सावध होतो, त्याप्रमाणें पुण्यपरिपाकामुळे या मूढ चित्-लाही आत्मानुसंधान होतें. जेव्हा प्राणाची स्पंदशक्ति, सर्व अंगभर पसरलेल्या जीवाच्या ज्ञानशक्तींचा हृदयात उपसहार केल्यामुळें, आपोआप बंद होते, तेव्हा चित् हस्तपादादिकाचें अनुसंधान करीत नाहीं. चित्तस्पदामुळें प्राणस्पंद होतो. व प्राणस्पंदाने चित्तस्पद होतो. यास्तव त्यातील कोणातरी एकाला बंद केलें पाहिजे असे वर म्हटलें आहे. पण मरणसमयीं प्राण शात झाला असतां, त्यामुळे सर्व इद्रियसंघ स्वकार्य करण्यास असमर्थ झाला असता व पुर्यष्टक क्षीण झालें असता देह निश्चल होऊन पडतो, पण प्राणवायूबरोबर पुर्यष्टक शरीरास सोडून बाहेर गेलेले असतें. कारण तें असेपर्यंतच देह जिवंत असतो व ते गेलें म्हणजेच देह मेला असे म्हणतात. वात, पित्त व कफ या परस्पर विरुद्ध दोषाचा क्षोभ झाला असता किंवा शस्त्रादिकाच्या योगाने देहाचा छेद-भेद वगैरे झाला असता देहातील हृदयकमल स्फुरण पावत नाहीं. व त्यामुळें पुर्यष्टकही शात होतें. नंतर आपल्या सकल्पामुळेंच जीव मरणादि अनेक दुःखें भोगतो. पण ज्यांच्या हृदयात विमल वासना असते ते मृत्युवश होत नाहींत, तर जीवन्मुक्त व दीर्घायु होतात. मन व प्राणवायु यानी रहित असलेलें शरीर शवरूप बनतें. पण आपला जरामरणरहित भाव विसरून जीव देहगत अशक्तीला स्वकल्पनेनेच प्राप्त झालेला असल्यामुळे मुक्त होत नाहीं. तर शरीर त्याग केल्यावरही कालवश होतो. झाडाचीं पानें जशीं पुनःपुनः उत्पन्न होऊन पुनःपुनः प्रतिवर्षी गळून पडतात, त्याप्रमाणें जीवाचीं शरीरें पुनःपुनः होऊन मरतात. सागरातील बुड्बुड्याप्रमाणेंच हे देहबुद्बुद उठत असतात. यास्तव विवेकी पुरुषाची आस्था त्याचे ठिकाणीं नसते.

सर्वगामिनी चित् चित्तांत प्रतिबिंबित होते, व तिच्या माहात्म्यानें हा सर्व व्यवहार होतो, असें जाणून ते स्वस्थ असतात. ३२.

**सर्ग ३३**—जीवादिभेद विचार केला असता संभवत नाहींत.

**श्रीवसिष्ठ**—भगवन्, अनत व एकरूप चित्-तत्त्वाला द्वित्व कसें प्राप्त झालें व विचारानें त्याचें निवारण कसें होतें ?

**श्रीईश्वर**—जेव्हा ब्रह्म सत् व एकरूप असतें तेव्हा हा द्वित्व-एकत्व व्यवहार निर्मूळच असतो. कारण द्वित्व व एकत्व हे भाव एकमेकाच्या अपेक्षेनें होणारे आहेत. त्यामुळें यातील एकाचा अभाव झाला कीं दोघांचाही अभाव होतो. कार्य व कारण यांचें बीज एकच असल्यामुळे त्यांना एकरूपता आहे. विकार कारणाहून निराळा नसतो. दहीं दुधाहून तत्त्वतः निराळे नाहीं. सर्व विकल्प सद्वस्तूपासूनच उत्पन्न होऊन जगातील व्यवहार करू शकतात. सर्व जगच विकल्पमात्र असलें, तरी अज्ञ त्यातील जलतरंगादि काहीं विकल्पास व्यावहारिक म्हणतात, मृगजलादिकास प्रातिभासिक म्हणतात व वंध्यापुत्रादिकास अत्यंत असत् म्हणतात. पण ज्ञानी पुरुषाला हे सर्व विकल्प सदनुविद्ध असल्यामुळे सदा सद्रूप भासतात. त्याची दृष्टि सत्कडे लागलेली असते, त्याकारणानें त्याला असत् असें काहीं भासतच नाहीं. अज्ञाला भासणारेही विकल्प सद्रूप आहेत, त्याना पृथक् सत्ता नाहीं, असा त्याचा दृढ निश्चय असतो. तो वाणीच्या विलासाकडे लक्ष्य देत नाहीं; वस्तुबोधाकडे ध्यान देतो. कोणी कितीही जरी शहाणपण खर्च केलें तरी ब्रह्माचे सर्वशक्तिमत्त्व कोणालाही नाहींसें करता येत नाहीं. पुष्पें, पल्लव, पानें, इत्यादि वेलीहून जशीं भिन्न नाहींत, त्याप्रमाणे द्वित्व, एकत्व, जगत्व, त्वपणा, मीपणा इत्यादि सर्व ब्रह्माहून भिन्न नाहीं. अर्थात् जगत्त्वादि भासमान भेद मायिक, भ्रामक व मिथ्या आहे. वास्तविक नव्हे. म्हणून चित्-ला द्वित्व कसे आलें ? हा प्रश्नच संभवत नाहीं. सर्व वस्तुजात चित्सत्तेनेंच सत्तावान् झालें आहे. देश, काल, क्रिया, सत्ता, नियति इत्यादि सर्व ब्रह्माच्याच शक्ति आहेत. चित्तादि सर्व त्याचींच नावे आहेत. ज्याच्यामध्यें विकाराचा संभवच नाहीं, अशा चित्सागरात तरंग उठणें हीच त्याची चेत्यसंगता (विषयसंसर्ग) आहे. यास्तव परब्रह्मच सत्य, ईश्वर, शिव इत्यादि शून्य, परमात्मा इत्यादि, नावानीं बोलले जातें.

अन्यत्वभावनेनें तें अन्य झालें आहे. भावनेनेंच तें संसारनदींत पडून प्रवाहाबरोबर वाहूं लागतें. चित्तत्त्वाच्या अवभासानें जीव तन्मय होऊन जिवत राहतो जीवत्वास प्राप्त झालेला सूक्ष्म देहही स्थूलदेहाच्या संस्काराप्रमाणें देह घेण्याकरिता व्रीहियवप्रभृति द्रव्यच मी झालों आहें, असें जाणतो. नंतर प्राण्यानें खाल्लेलें तें द्रव्य सत्वर वीर्य बनतें. त्यानतर क्रमानें स्त्रीयोनीमध्ये जाऊन मी प्राणवान् स्थूलदेह झालों आहें, असें जाणतो. साराश, अनुभवात्मक ब्रह्मच अहंतादि क्रमानें स्थूलदेहरूप होऊन चक्षुरादिद्वारा बाह्य स्थावर व जंगम पदार्थजात जाणते. आणि त्याच्या वासनेनें स्वतःही तसेच होतें. फार प्राचीन वासनाही एकाएकीं अकस्मात् उत्पन्न होण्यास कर्मच कारण आहे. द्वित्वकल्पनेनें द्वित्वाची कल्पना होते. एकत्वाच्या कल्पनेनें एकत्व अनुभवास येते. आत्मा सर्व भूतामध्यें एक आहे, तो अकर्ता व निर्लेप आहे, इत्यादि भावना केल्यानें तो तसाच अनुभवास येतो. शिवाय एकाच्या ठिकाणी द्वित्वाची कल्पना करणें, यात थोडासा तरी प्रयास लागतो. पण एकाचे एकत्व सिद्ध करण्यास मुळींच प्रयास नकोत, कारण केवळ असकल्पानेंच, नुस्त्या औदासीन्यानेंच त्याची सिद्धि होत असते. कारण संकल्प यक्ष, गंधर्वनगरी बनवावयाची झाल्यास अवश्य लागतो व तिचा नाश करावयाचा झाल्यास त्याची काहीं गरज नसते. केवळ दृढ संकल्पानेच आलेलें हें दुःख असंकल्पानेंच नष्ट होणे शक्य आहे. तेव्हा त्यात कष्ट कसचे ? नर काहींतरी संकल्प करून दुःखात पडतो व त्यानें जर काहींच सकल्प केला नाहीं तर तो अव्यय सुख भोगतो. चेतना संकल्पसर्परहित असली तरच तिला आनंद होणार ! विवेकवायूनें संकल्पमेघाना उडवून लावावें. संकल्प-नदीला प्राण व मन याच्या निरोधरूपी तापानें ( उष्णतेनें ) सुकवून सोडावें व तिच्यातून वाहत जाणाऱ्या जीवाला आश्वासन देऊन मनोरहित करावें. बा मुने, तूही संकल्पमल धुवून टाकून निर्मल व प्रसन्न हो. आत्मा सर्वशक्तिमान् आहे. यास्तव तूं जशी भावना करशील तसा तुला अनुभव येईल. संकल्पमूलाला उपटून काढ. म्हणजे हा असत् विस्तार सुकून जाईल. मी एक आहें, आत्मा आहें, ही एकच भावना कर म्हणजे तूं तसाच होशील. मुने, येणेंप्रमाणें जीवादि सर्व द्वैत असंभवनीय आहे.

त्यामुळें पूजक, पूजन, पूज्य इत्यादि संकल्पमय भावही मिथ्या आहेत. व परमार्थदृष्ट्या सर्व ब्रह्म आहे. विचारानें या तत्त्वाचा निर्णय होतो ३१.

**सर्ग** ३४—सौषुप्त, तुर्य व तुर्यातीत पदाचा उपदेश व शेवटच्या पदीं ईश्वराची विश्रांति.

**श्रीईश्वर**—मुने, याप्रमाणें असल्या या पूजेनें पूजलें जाणारें जगत् बाधदृष्टीनें असत् व अधिष्ठानदृष्टीनें सत आणि देवरूपी, असणें युक्त आहे. त्याचप्रमाणें तत्त्वतः द्वैत-ऐक्यपदरहित व व्यवहारात द्वैतैक्यरूप असणेंही युक्त आहे. कारण चितीला मोहरूपी कलकानें वैरूप्य (जडभाव) प्राप्त होणें हाच संसार आहे व तिनें निष्कलक होणें हेच असंसारित्व होय. मोहकलंकरहित चित् अभिन्न व अद्वयात्मक आहे. ही मी दृश्य देहादिरूप आहें, असा कलक आला कीं ती चित् बद्ध होते, पण तो कलंकही चित्कलाच आहे, असें समजले असता ती मुक्त होते. विषयाकाराची भावना केल्यामुळें द्वित्वास प्राप्त होऊन आपल्या अखंडसत्त्वास विसरते. व देहसुख-दुःखादियुक्त स्थिति सत्य आहे, असें मानू लागते. पण तिची अकलंकस्थिति शुद्ध, निरंश व सत्य-असत्य इत्यादि विकल्पांनी रहित असते. पण सर्व, पूर्ण व निरुपम ब्रह्मच प्रथम आकाशाप्रमाणें विकास पावणाऱ्या आपल्या मायाशक्तीनें जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, अथवा सृष्टि-स्थिति-संहार किंवा अध्यात्म-अधिदैव-अधिभूत अशा तीन मार्गांनीं मनाच्या योगानें विकास पावतें. यास्तव मनाचा छेद केला असता सत्य ब्रह्माचा साक्षात्कार होऊन जगाचा छेद होणें अगदीं युक्त आहे. याप्रमाणें तत्त्वबोधानें कल्पनासह मनाचा छेद झाला असता प्रथम जीवन्मुक्ताची स्थिति भाजलेल्या बीजासारखी असते व तिला इति असें नाव प्राप्त होतें. कारण उपनिषदात स्वपिति असें नाव सुषुप्तीला दिलेलें आहे. व जीवन्मुक्ताची प्रथम अवस्थाही जवळ जवळ तशीच असते. म्हणून स्वं अपि इति अशा तीन पदांनीं झालेल्या स्वपिति शब्दातील इति एवढाच निरुपाधिक अंश घेऊन तिचें नांव बनविलें आहे. त्याचप्रमाणें सर्व दृश्याचा बाध झाल्यावर केवल अपरोक्ष दृङ्मात्र कायम रहात असल्यामुळें पश्यती असेंही दुसरें नाव आहे. कारण ती चित्ताच्या विषयाचे पुनःपुनः प्रीतीनें अनुस्मरण करावयाचें सोडून

उदासीन व साक्षिरूपानें राहतें. ती सामान्य सत्ता होऊन अवशिष्ट राहते. शास्त्रजन्य ज्ञान प्राप्त होऊन ती आनंदपूर्ण झालेली असते.

असो, मन क्षीण झाले असता जीवाला प्रथम कोणतें पद प्राप्त होते तें सांगितलें. आता या चित्-शक्तीचे दुसरें पावन पद सागतों तें ऐक. मनापासून मुक्त झालेली हीच शक्ति शांतिशालिनी होते. ती सूर्य-चद्र-अग्नि-वाक् इत्यादि ज्योति व अंधकार, अज्ञान इत्यादि तम यानीं रहित असते. पूर्व स्थितीपेक्षा या स्थितींत कोणते विशेष आहेत ते सांगतों-पूर्व अवस्थाच अभ्यासवशात् जेव्हां गाढ झोंपेप्रमाणें अतिशय परिणत होते, तेव्हा आकाशात असलेली शून्यशक्ति परमाकाश—( चिदेकघन ब्रह्माकाश ) भावास प्राप्त झाल्याप्रमाणें होऊन चेत्याशोन्मुखतेचा त्याग करिते. पूर्व स्थितींत जीवन्मुक्त स्वतः व्युत्थान पावतो व या स्थितींत तो स्वतः देहभानावर येत नाहीं. ती जडही नाहीं व अजडही नाहीं, अशा काहीं अनिर्वचनीय स्थितीस प्राप्त होते. ही तुर्या नांवाची दुसरी स्थिति आहे. आतां तिसरी स्थिति ऐक. दुसऱ्या स्थितीचा दृढ अभ्यास झाला असता तिचा उदय होतो. ती ग्राह्य—ग्राहकांशरहित असते. एवढ्या करिताच तिला ब्रह्म, आत्मा इत्यादि शब्दही लावता येत नाहींत. अर्थात् दुसरी स्थिति सप्रज्ञातसमाधिगम्य असून ही असंप्रज्ञातसमाधिगम्य आहे. ती षड्भावविकाररहित असून कालतः स्थिर, स्वस्था, परमात्म्याच्या योगाने कलंकरहित व तुर्यातीतादि नावामुळेंही परम पुरुषार्थरूप आहे. ती तिसरी पवित्र स्थिति सर्व श्रेष्ठाची पराकाष्ठा, परम मगळ असल्यामुळें सर्व मंगलाहून मंगल, व अखंडैकरूप आहे. या स्थितींत दीर्घ काळ राहिलें असता सर्व शास्त्रवचनानींही अवाच्य असलेली जी दशा प्राप्त होते ती, हे मुने, मलासुद्धा शब्दानीं सागता येत नाहीं.

असो, वसिष्ठा, जाग्रदादि तीन अवस्था व त्यांच्या अपेक्षेनें रूढ झालेली तुर्या याच्या पलीकडे असलेलें तत्त्वच सनातन नित्य देव आहे; दुसरा कोणी नाहीं. सर्व जग तन्मय आहे, असें जाणल्यानें तें तन्मय होतें. सत्यज्ञानानें तें ' हें व हें नव्हे ' या विकल्पांनीं रहित होतें. कारण हें कांहीं प्रवृत्त होत नाहीं व हें काहीं

निवृत्त होत नाहीं तर एक, सम, शांतस्वरूपस्थित आहे, असा अनुभव येतो. सर्व शात व शिव होतें. तीच परात्पर गति होय.

श्रीवाल्मीकि—राजन्, असें बोलणारा ईश्वर, चित्ताचा परिणाम होऊन तें वाङ्मनसातीत परमपदीं लीन झालें असता, मुनीसह तसाच शात बसला. वक्ता व श्रोता अशा त्या दोघाच्याही सर्व वृत्ति विश्राति पावल्या, व बराच वेळ ते दोघेही त्याच दशेत राहिले. ३४.

**सर्ग ३५**—पूज्यांची परम सीमा, अशा महादेवाचें वर्णन.

श्रीवसिष्ठ—राघवा, असें सागता सागता स्वस्थ व शात झालेला महादेव एक घटिकाभर त्या मूक, व उदासीन दशेचा अनुभव घेऊन भक्तवात्सल्यामुळें माझ्या भाग्योदयानें प्रेरित होत्साता नेत्र उघडून पाहू लागला, व मला पुनः म्हणाला, मुने, तूं प्रथम चागला विचार करून आपल्या प्रत्यगात्म्याचें पारमार्थिकरूपच प्रमाणांनीं निश्चित कर. नतर त्या प्रत्यगात्म्याचे ठायीं जडांशरूप अनर्थाचा आरोप करूं नको. आत्म्याला बहिर्मुख करून त्वमर्थास योग्य करणें ( विषय करणें ) हेंच सर्व अनर्थाचें मूल आहे. आत्मज्ञानानेंच सर्व द्रष्टव्य पाहिल्यासारखें होतें तेव्हां दृष्ट व अदृष्ट या भ्रमाचें काय प्रयोजन आहे ? तत्ववेत्याच्या दृष्टीनें सर्वच तत्त्व असल्यामुळें हेय व उपादेय असें कांहीं रहात नाहीं. मनात शाति व अशाति उत्पन्न करणाऱ्या सर्व इष्टानिष्ट विकल्पास नाहींसें करून तू जर केवल आत्मदृष्टि झालास तरच खरा धीर आहेस, असें मी समजेन. आत्मबोधाकरिता प्रयत्न न करिता स्वस्थ बसण्यापेक्षा बाह्य दृश्य दशेस प्राप्त होऊन आत्मज्ञानासाठीं श्रवणादिकाच्या योगानें प्रयत्न करणे श्रेष्ठ आहे. पण सर्वथा बाह्यदृष्टि होणें योग्य नव्हे. इतर सर्व बाह्यदृष्टींपेक्षां देहच आत्मा आहे, ही बाह्यदृष्टि मोठी अनर्थावह आहे. यास्तव ती कधींही करूं नये. कारण देहाची क्रियाशक्ति प्राणाच्या अधीन असून ज्ञानशक्ति आत्मचैतन्याच्या अधीन आहे. अर्थात् देह सर्वथा पराधीन आहे. पण त्याच्या या दोन शक्तींतील क्रियाशक्तीचें मूळ वायु व आश्रय देह हीं दोन्ही नाश पावतात व चिच्छक्ति नष्ट होत नाहीं. कारण चिदात्मा आकाशाहूनही सूक्ष्म व स्वच्छ आहे. लिंगशरीरानें युक्त असलेल्या देहांतच, आरशांतील मुखाप्रमाणें, चित्तत्त्व प्रतिबिंबित होतें. हे

मुनिनायका, तें नुस्त्या देहांत व्यक्त होत नाहीं. म्हणजे पुढें एकादी वस्तु असली तरी ती मलिन आरशात जशी प्रतिबिंबित होत नाहीं, त्याप्रमाणें गतप्राण होऊन पडलेल्या देहात, विद्यमान असलेलेही सत् व्यक्त होत नाहीं. त्यामुळेंच सर्व वस्तूमध्यें असणारी पण मायाकलकानें आच्छादित झालेली चित् लिंगदेहावाचून दुसऱ्या कोणत्याही स्थानीं बाह्यक्रिया व स्वतत्त्वबोध यास समर्थ नसते; पण तीच लिंगदेहात आवरणशून्य होऊन चित्तवृत्तिद्वारा सर्व जाणण्यास समर्थ होते. ही अभिव्यक्त चित्च सर्व पदार्थांची सत्ता व स्फूर्ति याचें निमित्त होऊन विद्वद्दृष्ट्या देव या नावास पात्र होते. तिच्या अभिव्यक्तीचा जसा जसा उत्कर्ष होत जातो तशी तशी ती उत्तमोत्तम देवत्वास प्राप्त होते. परम उत्कर्ष पावलेली ती चितिच हरि, शिव, ब्रह्मा, सुरेश्वर, अग्नि, वायु, सूर्य इत्यादि आहे. याप्रमाणें हा आत्मा चैतन्याची खाण आहे. जे महाचितीच्या परम अभिव्यक्तीला प्राप्त होऊन मिथ्यामोहपरवश होत नाहींत, तेच या जगात ब्रह्मा, विष्णु, हर, इत्यादि परमदेव म्हणून प्रसिद्ध आहेत. पण परब्रह्मसज्ञक महादेवाच्या दृष्टीनें पाहिल्यास तीन गुणातील एकेका गुणावर अभिमान ठेवणारे हे सृष्ट्यादि कार्यांकरिता, अग्नीपासून निघालेल्या किटाळाप्रमाणें, ब्रह्मापासून झाले आहेत, असें वाटतें. पण हें वाटणे सुद्धा शास्त्रीयदृष्ट्या सत्य आहे. विवेकी पुरुषाच्या दृष्टीनें सर्व व्यवहारच आरोपित असल्यामुळें ब्रह्मादि देवही अविद्याकृत भ्रातिरूप आहेत. वेद, वेदार्थ, जीव, सृष्टि, सांगोपाग क्रिया, उपासना, काम, कर्म, वासना, जनन, मरणादि अवस्था इत्यादि सर्व अविद्या आहे. पण तिचे भेद अनत असल्यामुळें त्याची गणना करिता येत नाहीं. शिवाय तिचा काहीं विशेष उपयोगही नाहीं. ज्याअर्थी ब्रह्मा, विष्णु इत्यादिकाचा शरीरसबंधही चिदात्म्याच्याच अधीन आहे, त्याअर्थी तो महादेव त्याचाही पिता होय. तो मूळ बीज आहे. आत्मज्ञाला तो प्रत्येक वस्तूमध्यें स्पष्ट दिसत असतो. मातीच्या मूर्तीमध्यें नसलेल्या गणेशादि देवाचें तिच्याठायीं मंत्रानें आह्वान केलें जातें; पण सर्व वस्तूंमध्यें असलेल्या महादेवाचें आह्वानादि काय करावयाचें आहे ? त्याचें आह्वान सदा झालेलेंच आहे. स्वचित् सर्वत्र प्राप्त होते. मुने, मन ज्या ज्या दशेस प्राप्त होतें तेथें तेथें तें शिवस्वरूपासच जाऊन मिळत

असतें. तें शिवस्वरूपच सर्व वेद्याची परम सीमा आहे. तेंच आद्य, पूज्य, नमस्कार्य, स्तुत्य व अर्घ्य आहे. या आत्म्यास जाणून जंतु पुनः उत्पन्न होत नाहीं. असो; हे मुने, सर्व जंतूमध्यें असलेलें जें तत्त्व ज्ञात झालें असता अभय देत असते व जें आद्य आणि सहज उपास्य आहे तेंच अज व आत्मगत परम पद तूं आहेस. मग व्यर्थ मोहित का होतोस? ३९.

**सर्ग ३६**—अतिशुद्ध व सर्वकारण अशा आत्मतत्त्वाचें सर्वैश्वर्य.

**श्रीईश्वर**—ज्या अर्थी या आत्म्याला जाणून जीव पुनः जन्म घेत नाहीं, त्या अर्थी या देवाला ब्रह्मवेत्ते जगाचा ईश्वर असें म्हणतात. तो सर्व बीजाचें बीज आहे. संसाराचें सार आहे. क्रियाशक्तीचे निमित्त आहे. व निर्मळ चित्सार आहे. तें आपल्या सत्तेनें सर्व वस्तूस सत्तावान् करणारें असलें तरी परमार्थतः अकारण, शुद्ध, अभाव्य व अभयात्मक आहे. तें चिन्मात्र सर्व बुद्धिवृत्तींचें प्रकाशक, जीवांतीलही अंतःसाररूप ( चिद्रूप ) सर्व बाह्यविषयासही बुद्धिवृत्तीनें व्यापून प्रकट करणारे, सर्व विषयाचें परम तत्त्वभूत, स्वतःलाच मायेच्या योगानें पुष्कळ करणारें, नेत्रादि व आदित्यादि ज्योतींनाही प्रकाशित करणारें पण त्याच्याकडून प्रकाशित न होणारें, म्हणूनच अलौकिक, स्वयंप्रकाश, एकच बीज अनेक बीजरूपानें स्थित असणारें, पृथिव्यादिभूतरहित, व्यावहारिक व प्रातिभासिक सत्तेनें हीन, व जगत्सत्ता आणि अव्याकृतसत्ता या दोन्ही सत्ताचा बाध झाला असता साक्षिरूपाने राहणारें आहे, असें जाण. चित्तमलाच्या योगानें तें स्वतः रंजित होतें. अग्नीचे निखारे जरी अनेक असले तरी अग्निरूपानें त्याचें जसें ऐक्य असतें, त्याप्रमाणें स्वप्रकाश व स्वसत्तामात्र तेजाचे जगद्रूपी अवयव कितीही जरी झाले तरी तें सर्व चैतन्यच होय. आत्मदृष्ट्या त्याचा भेद नाहीं. म्हणूनच तो परमात्मा अणूंहून अणु व महत् परिमाणवान् पदार्थांहून महान् आहे, असें म्हणून श्रुति सर्व विरुद्ध धर्मांचा त्यात समावेश होत असल्याचें दाखवीत आहे. हा संसाररचना करीत नसूनही कर्ता झाला आहे. व एवढें महाकर्म करीत असूनही काहीं करीत नाहीं. हा द्रव्य असूनही निर्द्रव्य, निर्द्रव्य असूनही द्रव्यवान् शरीररहित असूनही महाशरीरवान् व महाकार्य असूनही अशरीरी आहे. सारांश, हा महेश्वर व त्याचें हें कार्य अशीं हीं दोन्हीं मोठीं आश्चर्यें आहेत.

जें सत्य नाहीं, असें काहीं नाहीं व हा नाहीं असेंही काहीं नाहीं. तर हें सर्व तो सत्य आत्माच आहे, त्या नित्य सर्वात्म्यास नमस्कार असो ३६.

**सर्ग ३७**—सत्संबधानें असत् वस्तूची सत्ता, शिवाच्या अनंत शक्ति व त्यांतील प्रधानशक्ति जी नियति तिचें वर्णन.

**श्रीईश्वर**—ज्या ईश्वराच्या ठिकाणीं सर्व विरुद्ध अर्थद्योतक शब्दांचाही अर्थ सत्य असल्यासारखा होतो. त्या सर्व जगत्सत्तारूप मणीच्या करंड्यासारख्या शबल सर्वेश्वराच्या ठिकाणीं कोणत्या शक्ति प्रकट होत नाहींत? ही बीजकणामध्यें असलेली चित्सत्ता मृत्तिका, काल, जल इत्यादि सहकारी कारणें मिळालीं असता प्रथम अंकुर उत्पन्न करते. नंतर क्रमानें तांदुळ होऊन साक्षात् पुरुषास भोज्य असलेला भात बनते. व अशाच रीतीनें हिचा जलादि दुसऱ्या सर्व पदार्थांत विकास होत असतो. याप्रमाणें ही सर्वकार्यव्यवस्थापिका शक्ति ईश्वरापर्यंत सर्व वस्तूंस व्यापून राहते. नियमानें प्रवृत्त होणाऱ्या या शक्तीला नियति असें म्हणतात. गृहांतील दीपाप्रमाणें हा अपरिच्छिन्न ज्योतिःस्वरूप साक्षी असला म्हणजे गंधर्व नगरांतील रंगभूमीसारख्या जाग्रदादि अवस्थांमध्यें जगच्चित्रपरंपरा प्रवृत्त होतात, व चिच्छक्ति साक्षीप्रमाणेंच स्थित होऊन आपलें संसाररूप वृत्त पाहते.

**श्रीवसिष्ठ**—हे जगन्नाथा, या शिवाच्या शक्ति कोणत्या व त्या कशा स्थित आहेत साक्षिता म्हणजे काय व त्याचें वृत्त कोणतें व कितीसें असतें?

**श्रीईश्वर**—अप्रमेय, शिव, शांत, सौम्य, चिन्मात्र व अनाकार अशा परमात्म्याच्याही इच्छासत्ता, आकाशसत्ता, कालसत्ता, नियतिसत्ता, महासत्ता, ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, कर्तृता, अकर्तृता इत्यादि शक्तींचा अंत नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—पण हे देवा, या अनेक शक्तींचा उदय कोठून व कसा झाला? याचें मला मोठें गूढ पडलें आहे.

**श्रीईश्वर**—चिन्मात्र व अनंतरूप अशा शिवाची ही शक्ति, इतकें म्हटलें तरी ती भिन्न होते. ज्ञत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व, साक्षित्व इत्यादिकांची विभावना केल्यानेंच शक्ति विविधरूपें धारण करितात. (अर्थात् सर्व चिद्भेद मायिककल्पनाप्रयुक्त आहेत.) त्या कालनर्तकानें उत्तम शिक्षण दिलें असता ब्रह्मांडरूपी रंगभूमीवर क्रमानें अशा नाचूं लागतात. महारुद्रापर्यंत प्रत्येक वस्तूची स्थिति नियत असल्यामुळें या शक्तीला

नियति म्हणतात. ती कधींही उद्विग्न न होता जगज्जाल नाटक करीत असते. ती पुष्पाचा उद्भव, जलाचा वर्षाव, पल्लवाचा उद्गम व अशाच दुसऱ्या आणखी अनेक क्रियाविलास करीत या जगात एकसारखी नाचते, तिनें या आपल्या नृत्यविलासानें सुखदुःखमय अनेक ब्रह्मांडरूपाटे उघडलीं आहेत. पण या नियतीच्या संसारसंज्ञक विकारमय विलासात सदा उदित स्वरूप परमेश्वर साक्षिरूपानें स्थित आहे. तो त्या नर्तकीहून व तिच्या जगद्रूप नृत्याहून वस्तुतः भिन्न नाहीं. १७.

सर्ग ३८—चिन्मूर्ति शिवाचें ध्यानानें बाह्य पूजन.

श्रीईश्वर—हा नियतिनाटकसाक्षी चिन्मात्र आत्माच परम देव आहे. तो घट, पट, वट, भित वानर, नर इत्यादिकामध्यें स्थित आहे. शिव, हर, हरि, ब्रह्मा, इंद्र, वरुण, यम, इत्यादि रूपानें हाच भगवान् सर्वात्मा स्वात्मा सुबुद्धिमानाकडून विविध क्रमानें आत व बाहेर पूजला जातो. पण हे तत्त्वज्ञा, तो बाहेर कोणत्या क्रमानें पूजला जातो. तें अगोदर ऐक. नंतर अंतःपूजेचा क्रम सांगेन. शास्त्रोक्त संस्कार व स्नान—आचमनादिक याच्या योगानें पवित्र असलेलेंही देहगृह त्याज्य होय. त्याचा यत्नानें त्याग करावा व साक्षिचित्प्रकाशरूप अति पवित्र गृहाचें ग्रहण करावें. त्याचें मनात ध्यान करणें हेच पूजन आहे. दुसरें काणतेंही नाहीं. यास्तव त्या त्रिभुवनाधाराचें नित्य ध्यानानें पूजन करावें. तें चिद्रूप तत्त्व लक्षसूर्यासारखें तेजस्वी व सर्वतेजाचें प्रकाशक आहे. यास्तव त्या अहंतासाराचा आश्रय करावा. तें सर्वत्र पसरलेलें आहे, असें जाणावें. ही भूतश्री त्याची रोमपंक्ति आहे, असें चिंतन करावें. त्याच्या शरीरगत इच्छादि शक्ति त्रिजगद्यंत्राच्या दोऱ्या आहेत, अशी कल्पना करावी. हा सत्तामात्ररूपी शिव अनंत पदाचा आधार आहे ज्यानें जगज्जालाचें विवर्तन केलें आहे, असा काल हा याचा द्वारपाल आहे. असंख्य नेत्र, कर्ण, मस्तक, हस्तपाद इत्यादि अवयवानीं व अनंत शक्तीनीं संपन्न असलेल्या त्या देवाचें ध्यान करावें. तो देव सर्वमननातीत, परमकल्याणमय, सर्वकर्ता व सर्व संकल्पित अर्थ देणारा आहे. तो सर्व भूताच्या अंतःकरणात स्थित आहे, सर्वाचें एक साधन आहे, इत्यादि चिंतन करून देवेशाचें यथाविधि ध्यान-

रूपी बाह्य पूजन करावें. व त्यास बाह्य अर्घ्य, पाद्य, स्नान, गंध, पुष्प, धूप, दीप इत्यादि उपचार अर्पण करावे.

आतां हे ब्रह्मज्ञा, मी तुला याचाच आणखी एक प्रकार सांगतों, तो ऐक. या ध्यानज्ञानरूप पूजनामध्यें तो ज्ञानात्मा देव गंध-पुष्प-धूप दीपादि उपहारानीं पूजिला जात नाहीं. तर नित्य, अयत्नलभ्य शीतल, अविनाशी, एक व अमृत अशा स्वबोधानें पूजिला जातो. अंतस्थ शुद्धचिन्मात्रवेदन हेंच पर ध्यान व हीच परापूजा होय. पाहणें, खाणे, जाणे, येणे, इत्यादि सर्व करीत असताना शुद्ध सविन्मय व्हावें. ध्यानामृतानें स्वतः ईश्वर-आत्म्याचें पूजन करावे, तेच त्याला अतिशय इष्ट आहे. ध्यानरूपी पुष्पानेंच तो अतिशय संतुष्ट होत असतो. ध्यान हे सर्व सर्वोत्तम उपहाराचें प्रयोजन सिद्ध करीत असतें. त्याच्या वाचून आत्मलाभ होतच नाहीं. बा मुने, हा आत्मा ध्यानाच्या योगाने प्रसन्न होतो व तो सर्व उत्तम भोगसुखश्री भोगतो. कारण ब्रह्मानंदामध्ये इतर सर्व आनंदाचा अतर्भाव होतो. ज्याना आत्मसाक्षात्कार झाला नसेल त्यानींही तेरा निमेष ध्यानानें ईश्वराचे पूजन केल्यास त्याना गोप्रदानाचें फळ मिळतें. शभर निमेष ध्यान केल्यास ते अश्वमेधयज्ञाच्या फळास पात्र होतात. व अर्धी घटिका ध्यान केल्यास सहस्र अश्वमेधाचें पुण्य लागते. मुने, जो मूढ ( अनात्मज्ञ ) ध्यानरूपी उपचाराने आत्मदेवाचें पूजन एक घटिकाभर करतो त्याला राजसूययज्ञाचें फल मिळतें. कारण परमात्म्याचे ध्यान हा परम योग आहे. हीच परम क्रिया आहे. हे आत्म्याचे सर्वोत्तम बाह्य पूजन मी सांगितलें आहे हें अतिशय पवित्र व अखिल पापनाशक आहे. यास्तव जो नर हें एक क्षणभरही खिन्न न होता करील तो मलाच प्राप्त झाला आहे, असें सर्व सुरासुरसंघ म्हणतील ३८.

सर्ग-३९-प्रत्यगात्मभूत शिवाचें अंतःपूजन.

**श्रीईश्वर**—जें पावनाचें पावन व सर्व तमाचा क्षय करणारें तें आतां आत्म्याचे अंतःपूजन सांगतों. ही ध्यानात्मिका पूजा सर्व व्यवहारामध्यें अनुगत आहे. या शरीरस्थ पर शिवाचें नित्य ध्यान करावें. केवल सानिध्याने सर्व प्रत्ययाचा ज्ञाता असा अंतर्यामीच उत्तम पूज्य आहे. तो सर्व अवस्थांमध्यें सर्व क्रियाचा साक्षी होऊन सदा साक्षात् दर्शन देतो. तो

शिव, शांत व विक्षेपशून्य स्वभावांत स्पष्ट दिसतो. प्रारब्धप्राप्त विषयांमध्यें स्थित असतो. बोधलक्षण-स्नानानें तो सदा शुद्ध असतो. तो प्राणापानरथावर आरूढ झालेला असून, अंतःकरणगुहेमध्यें गूढ असतो. तो सर्व ज्ञेयदृष्टींचा ज्ञाता, सर्व कर्मांचा कर्ता, सर्वभोग्याचा भोक्ता व सर्व अनुभूत वस्तूंचा स्मर्ता आहे. सर्वांगास पूर्णपणें जाणणारा, विषयभावना व अभावना याच्या योगानें लक्षित होणारा, सर्व प्रकाशाहून अतिशय भास्वर, व सर्वगामी अशा शिवाचें चिंतन करावें. वस्तुतः कलारहित पण आरोपावस्थेंत सकल, देहस्थ, हृदयाकाशांत संचार करणारा, सर्व अगांत व्यापून राहणारा बोध, मननशक्तिस्थ, शब्दादि विषयाना आंत नेणारा, मनाला प्रेरणा करणारा वाच्य व लक्ष्यवृत्ति वार्णित असणारा, तिळांतील तेलाप्रमाणें सर्वांगात राहणारा, अशा आत्म्याची 'हा तो देव आहे' असे साक्षात् जाणून भावना करावी. मुनिवर्या, ज्याप्रमाणे भार्या पतीची सतत सेवा करितात, त्याप्रमाणें विचित्र शक्ती माझी उपासना करितात. मन हा माझा द्वारपाल आहे. तो मला जगत्त्रयाचें निवेदन करीत असतो. शुद्धरूपी चिंता ही माझी द्वारपालिका आहे. बुद्धि ही माझी स्वरूपभूत शक्ति आहे. क्रिया ही श्रेष्ठ स्त्री आहे. विचित्र ज्ञानें हीं माझीं अंगावरील भूषणें आहेत. कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें हीं माझीं द्वारें आहेत. आणि अशा या सर्व परिवारासह असणारा हा मी अनंतात्मा परिच्छेदरहित आहें. मी अलौकिक आत्मचमत्कार धारण करतो. मी आतून देवत्वानें परिपूर्ण आहें. माझें स्वरूप कधीं दीन होणारें नाहीं. मी चेतनात्मा कधीं अस्त पावत नाहीं. कधीं उदय पावत नाहीं; कधीं संतुष्ट होत नाहीं. कधीं रागावत नाहीं; कधीं तृप्त होत नाहीं; कधीं क्षुधित होत नाहीं; कधीं कशाची इच्छा करीत नाहीं; कधीं कशाचा त्याग करीत नाहीं, मी सर्व सम, समाचार, समाभास, समाकृति, सौम्यतामलयुक्त, सुंदराशय, सर्व देहांत एक व अविच्छिन्न महामति आहें, असें जाणणारा महात्मा अहर्निश देवपूजनच करीत असतो, चित्तत्त्वामुळें चलित होणारा देहच त्याचा देव आहे, असें म्हटलें आहे. वेळोवेळीं प्राप्त होणाऱ्या त्रिपुटी वस्तूनें ज्ञानी त्याचें सदा पूजन करीत असतो. सर्व सम बुद्धीनें त्या चिन्मात्र देवाचें सर्वार्थानें पूजन करणें फार श्रेयस्कर आहे. या महादेवाच्या पूजे-

करितां गंधपुष्पादि बाह्य उपचार संपादन करण्याकरितां थोडासाही प्रयत्न करूं नये. त्या शोभन विभूचें पूजन प्राप्त ब्राह्मणक्षत्रियादि देहोचित यथाशास्त्र व्यवहाराने व देहधारणमात्रोपयोगी अन्नपानादिकाच्या योगानें सतत करावें. आत्म्याला तत्त्वत: जाणून प्राप्त अनिषिद्ध विषयाच्या योगानें संतुष्ट करावें. आधि-व्याधिजन्य सर्व दु:खांनींही त्याचें पूजन करावें. मरण, जीवित, स्वप्न इत्यादि अवस्था, दारिद्य, संपन्नता इत्यादि दशा, राग, द्वेष, मोह, लोभ इत्यादि विकार, माधुर्यधर्मिणी व संताच्या हृद‑यांत रूढ झालेली मैत्री, शुद्ध उपेक्षा; करुणा, मुदिता, इत्यादि उपाय, निषिद्ध व अनिषिद्ध भोगाचा त्याग इत्यादिकाच्या योगानें त्या शुद्ध व सर्वान्तर्यामी आत्म्याची पूजा करावी. जें जें इष्ट किंवा अनिष्ट नष्ट झाले असेल त्याची त्याची उपेक्षा करावी. व जें जें प्राप्त होईल त्याचा निर्विकार मनानें स्वीकार करावा. हेंच आत्म्याचे परम पूजन आहे. सर्वदा सर्व इष्टअनिष्ट दशेमध्यें परम साम्य ठेवून नित्य आत्मार्चान करावें.

सर्व ब्रह्म आहे अशा दृष्टीनें सर्व अतिशुभ आहे, असे तरी जाणावें, किंवा या जगातील ब्रह्माचा अंश शुभ व मायेचा अंश अशुभ आहे, असें समजावें. पण सर्व आत्ममय पहावें. जें आरंभीं रमणीय किंवा अति दु:सह वाटत असेल तें सर्व अगदीं सम आहे, असें जाणून नित्य आत्मपूजन करावें. हा मी व हा मी नव्हे, हा विभाग मोडावा. सर्व ब्रह्म आहे, असा निश्चय ठेवून आत्मपूजन करावें. इच्छा किंवा द्वेष न करिता स्वभावत: दैवयोगानें प्राप्त झालेल्या भोगभूमींचा स्वीकार करावा. तुच्छ व अतुच्छ वस्तूविषयीं उद्वेग व अनुद्वेग करू नये. प्राप्त शुभाशुभाचा निर्विकार मनानें स्वीकार करावा. मुने, या आत्मपूजनविधीमध्यें ज्या द्रव्यश्री सांगितलेल्या आहेत त्या एकाच रसानें युक्त आहेत. त्या अम्ल, कडू, तिखट, तुरट इत्यादि इतर रसानीं मिश्रित झालेल्या नसून केवळ मधुर आहेत. समता ही रसशक्ति मधुर, रसाळ, व अतींद्रिय आहे. तिनें ज्याची भावना केली आहे तें तत्क्षणीं अमृतच होणार ! समतारूपी अमृतानें ज्याची ज्याची भावना करावी तें तें अतिशय मधुर होतें. या रीतीनें आत्मपूजन करणारा ज्ञानी उपासक आतून आकाशासारखा निर्लेप व बाहेरून प्रकृतकार्य करणारा, रंजनामलानें रहित, अहंकारशून्य, व जीवित दशेंतच उत्तम

पदीं स्थित होणारा असतो. असो; प्रियवसिष्ठा, देश-काल-करण क्रम इत्यादिकांपासून उदय पावलेल्या सुख-दुःखभ्रमांनीं शरीरनायकाचें नित्य पूजन कर. व निष्काम बुद्धीनें शांत रहा १९.

**सर्ग ४०**—पूज्य-पूजक-पूजनादिविकल्परहित व परिशुद्ध चिदात्मा शिवच देवतातत्त्व आहे.

**श्रीईश्वर**—मुने, तू यथाकाल व यथाशक्ति जें करतोस किंवा करीत नाहींस तें सर्व चिन्मात्र शिवस्वरूप आत्म्याचें आंतर पूजनच होय. कारण तो देव त्या तसल्या पूजनानेंच निरतिशय आनंदानें अभिव्यक्त होतो. तो आपल्या पारमार्थिक रूपानें प्रकट होतो. पण सर्व स्वाभाविक चेष्टा रागद्वेषमूलकच होत असल्यामुळें त्याच्या योगानें तो प्रसन्न कसा होईल म्हणून म्हणशील तर सांगतो. आंतर पूजा करणारा आत्मवेत्ता रागद्वेषादि विकल्पांना आत्म्याहून भिन्न जाणतच नाहीं, आपलें किंवा दुसऱ्याचें ऐश्वर्य, विपत्ति, सुख-दुःख-ज्ञान इत्यादि सर्व आत्म्याचें पूजन आहे. नित्य शिवाच्या ठिकाणीं जगाचा आरोप करणें हें त्याचें पूजनच आहे. कारण ज्याप्रमाणें ब्रह्म आकाशादि क्रमानें घटादिरूपानें अलंकृत होतें, त्याप्रमाणें स्वतः प्रत्यगात्माही जाग्रदादि क्रमानें घटादिरूपानें भूषित होतो. याप्रमाणें एक शिवरूप अथवा प्रत्यगात्मरूप आत्मा जगदाकारास प्राप्त होऊन त्याच्याच भासानें हे सर्व भास्वर व त्याच्याच स्थितीनें हें स्थितिमत् झालें आहे. सारांश, प्रत्यगात्माच आंतल्या आंत विस्मृतिमान् झाल्यासारखा होऊन जीव व जगत् झाला आहे. याप्रमाणें तत्त्वतः पाहिलें असतां पूज्यपूजकादि सर्व त्रिपुटी बाधित होते. कारण ज्या नियत आकारतेमध्यें पूज्य-पूजादिमय क्रम कल्पिला जातो ती नियताकारता शांत ईश्वराचे ठिकाणीं संभवत नाहीं. पूज्यादि मर्यादा, सर्वशक्ति व अनंत ईश्वरत्वाचें पात्र होऊं शकत नाहीं. स्वच्छ ज्ञानमात्ररूप आत्म्याला ईश्वरत्वही वस्तुतः नाहीं. ज्यांचा परमेश्वर देश–काल इत्यादिकाच्या योगानें मर्यादित झालेला असतो त्यांना उपदेश करणें आम्हांला उचित नाहीं. यास्तव मुने, तू त्याची दृष्टि सोडून व या दृष्टीचा आश्रय करून सम, स्वच्छचित्त, शांत, वीतराग, स्वस्थ व अखिन्न, होऊन सुख-दुःख, शुभाशुभ इत्यादिकाच्या योगानें आत्म्याचें पूजन करीत रहा. कारण तूं अशा रीतीनें आत्म-

पूजक झालास म्हणजे तुज ज्ञानी साधूला कोणताही कलंक दूषित करणार नाहीं ४०.

**सर्ग ४१**—शास्त्र व आचार्य यांचे साफल्य, नामभेदकल्पना, अध्यारोप व अपवाद.

**श्रीवसिष्ठ**—हे नाथ, शिव कोणाला म्हणतात? परब्रह्म, आत्मा, परमात्मा इत्यादि नांवे कोणाला दिलेलीं आहेत. सत्, किंचित्, नकिंचित, शून्य, विज्ञान, इत्यादि भेद कसा झाला आहे?

**श्रीईश्वर**—आदि-अंतरहित, आभासशून्य, व सत् असें काहीं तत्त्व येथें आहे. पण तें इंद्रियानीं ग्राह्य नसल्यामुळें 'काहीं नाहीं' असेंच होऊन राहिलें आहे.

**श्रीवसिष्ठ**—भगवन्, जें बुद्ध्यादियुक्त सर्व इंद्रियाना अदृश्य झालेलें आहे, तें निःशंकपणे ज्ञात कसें होणार?

**श्रीईश्वर**—जो मुमुक्षु शमादिसाधनानीं शुद्ध झालेल्या केवळ मनोलक्षण सात्त्विक अविद्येशास सच्छास्त्र, सद्गुरु, व सत्संगादि नावाच्या सात्त्विक भागानींच घालवीत राहतो, त्याला सर्व अविद्येचा क्षय झाला असता आपोआप आत्मसाक्षात्कार होतो. आत्मस्वभावाचा स्वप्रकाशस्वरूपपरिशेष हाच निश्चय आहे. शास्त्रादिकाच्या विचारानें अविद्यामळ धुतल्याप्रमाणें निघून जातो. शास्त्राचें साह्य मिळालें असता आत्माच आत्म्याला पाहतो व आत्म्यशींच विचार करतो. या जगात आत्माच आहे, अविद्या नाहीं, असा निश्चय होणें हाच अविद्याक्षय होय. आपल्या इंद्रियासमोर आपल्याला हें जें काहीं नाना दिसत असते तो आत्माच आहे असा निश्चय करू नये. कारण तो स्वतः आत्मा नव्हे व वस्तुतः आत्मज्ञानाचा उपायही नव्हे. खरे पाहता, गुरूपदेशादिक आत्मज्ञानाचे कारण होत नाहीं. कारण गुरु इंद्रियाना गोचर होणारा आहे. व आत्मा ( ब्रह्म ) सर्व इंद्रियाचा क्षय झाल्यावर अनुभवास येणारा आहे. जी वस्तु ज्याचा क्षय झाल्यावरच प्राप्त होण्यासारखी असते ती तें असेपर्यंत मिळत नाहीं पण हे ब्राह्मणा, असें जरी असलें तरी गुरूपदेशादि आत्मज्ञानाच्या सिद्धीकरिता उपयोगी आहेत. कारण गुरूपदेश ऐकून शिष्य विचार करू लागला असता आत्मा अदृश्य व अनिर्देश्य असला

तरी आपोआप व्यक्त होतो; पण वस्तुतः तो, शास्त्रार्थ किंवा गुरुवचन यांच्या योगानें ज्ञात होत नाहीं, तर शिष्याच्या बोधसामर्थ्यानें आपोआप व्यक्त होतो. तथापि अज्ञमुमुक्षूला गुरु व शास्त्र यांच्या वचनावांचून आत्म्याचें परोक्ष ज्ञान होत नाहीं. उलट गुरु, शास्त्रार्थ व शिष्य यांचा दीर्घकाल समागम झाला असताच आत्मज्ञान प्रवृत्त होतें. म्हणूनच बोधाच्या योगानें ज्याच्या वरील आरोपित सर्व अमंगल नष्ट झालें आहे असा तो परमानंदात्मा शिव, आत्मा, सत् इत्यादि नावांनीं बोलला जातो. या जगाचा ज्ञानानें बाध झाला असता तें नाहीं व आरोपकालीं आहे. पण त्याचें अधिष्ठान तत्त्व सदा आहेच. ते व्यावहारिक सत्-हून विलक्षण असल्यामुळें सत्-सारखें भासते.

शिवाय शिव, आत्मा, सत् इत्यादि नावाच्या कल्पना जीवन्मुक्तांनीं अधिकारी शिष्यांना बोध करण्याकरिता कल्पिल्या आहेत. मोक्षोपदेश, शास्त्रार्थरचना इत्यादिकांकरिता नावाची कल्पना केलेली आहे पण पुरातन ऋषींनीं असा शब्दभेद जरी केला असला, तरी वस्तुभेद केलेला नाहीं. अथवा तो होणें शक्य नाहीं. हे मुनीश्वरा, याप्रमाणें जो ज्ञानी नित्य देवार्चन करतो, तो ज्याचे आम्हीं सर्व सेवक आहों त्या परम पदास जातो.

**श्रीवसिष्ठ**—भगवन्, शुद्ध चैतन्याच्या ठिकाणीं जीवभाव व त्याच्या संसाराचा आरोप यांचा क्रम मला संक्षेपतः सांगा.

**श्रीईश्वर**—मुने, ब्रह्मादि शब्दांचा अर्थ ही केवल संविद् (निर्विषय ज्ञान) च आहे, असें जाण अत्यंत सूक्ष्म आकाश व ती शुद्ध संविद् यामध्यें मेरु व परमाणु यांच्या एवढें अंतर आहे. ती विषयकल्पना करण्यास उन्मुख झाली असता चित् या नावास पात्र होते. हें तिचें नाव निर्विकल्पसमाधिप्रसिद्ध चिदानंदस्वभावात स्थित असलेल्याही तिला प्राप्त होतें. ती चित् विषयभावना करूं लागली, कीं एका क्षणात अहंतेस प्राप्त होते. अहंतेच्या मागोमाग देश कालादिरूपास प्राप्त झालेल्या कल्पना उद्भवतात व त्या तिच्या सख्या होऊन राहतात. त्यांनीं युक्त असलेली तीच सत्ता प्राणस्पंदयुक्त झाली असता जीव या नांवास पात्र होते. नंतर तीच जीवशक्ति निश्चयरूप विलास करूं लागली असता बुद्धि होते.

शब्दशक्ति, क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति अशा तीन शक्ति जीवशक्तीच्या मागोमाग दासींप्रमाणें जाऊं लागतात. या सर्व समुदायाच्या योगानें संकल्पवृक्षाचें बीज मन होतें. आतिवाहिक देह या संज्ञेस तेंच योग्य आहे, असें ज्ञानी म्हणतात व त्याच्यायोगानें जीव प्रमाता होतो.

अशा रीतीनें या सर्व अंतःशक्ति निर्माण झाल्या म्हणजे त्यांच्यामुळेंच बाह्य कल्पना उदय पावतात. वातसत्ता, स्पर्शसत्ता, स्पंदसत्ता, त्वक्सत्ता, तेजाची सत्ता, रूपसत्ता, जलसत्ता, रससत्ता, भूसत्ता, गंधसत्ता, पुष्टपिंडसत्ता, देशसत्ता, कालसत्ता, इत्यादि सर्व सत्ता उदय पावतात. या सर्व सत्तांनीं युक्त असलेलें हेंच पुर्यष्टक आहे. हाच वासनारूपानें आतिवाहिक देह आहे; पण अपरिच्छिन्न चित्स्वरूप ब्रह्मच या सर्व विकार-विभागानीं स्फुरण पावतें. दुसरें काहीं नाहीं. बा वसिष्ठा, अज्ञ पुरुषाच्या दृष्टीनें हें सर्व या क्रमानें झालें आहे. तथापि तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें काहीं झालें नाहीं. तें सर्व समुद्रातील जलाच्या विलासाप्रमाणें केवळ भासमान आहे. कारण भासणाऱ्या भेदाला संविद्-चाच आधार आहे. तिच्यावाचून तें सर्व जड किंवा मृत होतें. आणि तें संविद्रूप आहे, असें जाणलें तरी गंधर्वनगरासारख मिथ्या ठरतें. ब्रह्मच तें सर्व जाणतें व तेंच तें सर्व झालें आहे.

**श्रीवसिष्ठ**—पण ईश्वरा, हें आरोपित जग गंधर्वनगर व स्वप्न यांप्रमाणें मिथ्या जरी असलें तरी तें दुःखाला कारण होतें. तेव्हा त्याच्यापासून होणाऱ्या दुःखाचें निवारण करण्यास काय युक्ति करावी ?

**श्रीईश्वर**—वासनेमुळें दुःख होतें. यास्तव तिचें निवारण करावें. वासनेचा क्षय होई तों हें सर्व मिथ्या आहे, असा अति दृढ निश्चय करण, हाच दुःख-निवृत्तीचा उपाय आहे. सर्व खोटें आहे, अशी वासना दृढ झाली म्हणज जगाचा बाध होऊन त्याचें अधिष्ठान साक्षात् अनुभवास येतें. द्रष्टा जीव, दर्शन वृत्ति व दृश्य जग याचा क्षय झाला असता एक सत् अवशिष्ट राहतें, तेंच ब्रह्म होय. ज्याला भासणारा सत्य अथवा असत्य यक्ष विलीन झाला आहे, त्याला केवळ अवस्थेवाचून दुसरें काय दिसणार ? शून्य स्थानीं जसें भूत, त्याप्रमाणें ही जगत्-नावाची चित्तवासना उदय पावली आहे. यास्तव ती शांत झाली, कीं अक्षय्य शांत मिळते. अहंता, जगत् व मृगजल यांमध्यें जो आस्था ठेवतो त्या

नराला धिक्कार असो. त्याला सुज्ञानें कधींही उपदेश करूं नये. कारण तत्त्वज्ञ लोक विवेकी जीवालाच उपदेश करीत असतात. मूर्खाला कोणी उपदेश करीत नाहींत. पण जो कोणी शिष्यलोभी गुरु, अज्ञालाही उपदेश करतो तो आपली सालंकृत कन्या स्वप्नांत पाहिलेल्या पुरुषाला द्यावयासही कमी करणार नाहीं. ४१.

**सर्ग ४२**—समष्टि-व्यष्टिसंसार, ईश्वर इत्यादि सर्व माया आहे. शंकराचें स्वस्थानीं गमन.

**श्रीवसिष्ठ**—भगवन्, आदि सृष्टींत आकाशांत स्थित होणारा व देहभ्रम पाहणारा जीव कोणत्या अवस्थेस प्राप्त होतो.

**श्रीईश्वर**—स्वप्नपुरुष अतिशय सूक्ष्म नाडींत जसें अतिविस्तृत ब्रह्माण्ड पाहतो, त्याप्रमाणें तो जीव परम सूक्ष्म चिदाकाशांतही तें पाहतो. चिद्धन सर्वगामी असल्यामुळें नाडीछिद्रात प्रवेश करणारा स्वप्नपुरुषही तत्काळ कल्पित सृष्टि कशी निर्माण करतो तें सर्वांना माहीत आहेच. तोच आद्य सृष्टींतील समष्ट्युपाधिक हिरण्यगर्भ नावाचा जीव होय. तोच मी सनातन व अव्यक्त आहें. सात्त्विक, राजस व तामस कल्पांमध्यें क्रमानें त्याला विष्णु, ब्रह्मा व सदाशिव अशीं नावें प्राप्त होतात. तो संकल्पपुरुष असून संकल्पानेंच त्याची मूर्ति सिद्ध झालेली असते. त्याचा प्रथमसंकल्प पुष्ट झाला म्हणजे तो मनोमूर्तीचा आश्रय करतो. तो जशी जशी कल्पना करतो तसें तसें सत्वर होतें. त्यामुळें तें सर्व असद्रूप आहे. पण भ्रमदृष्टीनें सत् भासतें. अशा रीतीनें तो आदिपुरुष उत्पन्न केलेल्या जगाचा द्रष्टा होतो. तो एका निमिषांत नुसतें स्वरूप अवलोकन करूनच चिदाकाश मात्र होतो. व स्वरूपाला विसरून एका क्षणांत अनत व अपार संसारात पडतो. सत्यसंकल्प करण्यास समर्थ असलेला तो एका निमेषांत महाकल्पांची परंपरा केवळ बहिर्मुख होऊन पाहतो. पण ती परंपरा खरी नव्हे; मिथ्या आहे. स्वप्नातील नगराप्रमाणें चित्, चित्तीमध्येंच जगत्-चमत्कार निर्मिते. त्यांत देशकालादिकांचा कांहीं नियम नाहीं. हा पुरुष सर्वकर्ता आहे. त्याच्या इच्छेप्रमाणें रुद्रापासून तृणापर्यंत सर्व उत्पन्न होतें. या सत् किंवा असत् जगांत सर्वांच्या उत्पत्तीचा हाच क्रम आहे. या संसारमायेचें असें तत्त्व आहे, अशी सतत भावना केल्यानें भेद शांत

होतो व शिव समीप येतो. परा चिति एका निमेषाच्या शतांश काळही ( म्हणजे एक क्षणभरही ) जरी बहिर्मुख झाली तरी मोठा अनर्थ उद्भवतो. बाह्य वासना दृढ झाली, कीं महा चितीचें पूर्ण विस्मरण पडतें. असत्य संकल्पामुळें महान् आत्मा कीड, मुंगी इत्यादिकांच्या शरीरानेंही मर्यादित होतो. पण ज्या नित्य व्याप्त, अनंत व दृढ तत्त्वामध्यें, माळेच्या ठिकाणीं भासणाऱ्या सर्पाप्रमाणें हें जग भासत आहे, तें तत्त्व कोठें दूर, खालीं, वर, इत्यादि नाहीं. तें कालानें मर्यादित होत नाहीं. असो; मुने, तुझ्या प्रश्नांचें उत्तर मी दिलें आहे आता आम्ही इष्ट स्थानीं जातों; पार्वति, चल; ऊठ.

**श्रीवसिष्ठ**—रामा, इतकें बोलून, मी चरणावर पुष्पांजलि अर्पण केली असता तो देव परिवारासह आकाशात गेला. तेव्हा मी क्षणभर त्याचेंच चिंतन करीत राहिलों व पूर्वीचें जड देवार्चन सोडून त्यानें सांगितलेलें नूतन देवपूजन करण्याचा निश्चय केला ४२.

**सर्ग ४३**—आत्म-शिवार्चन ऐकून राम वैराग्यासह ज्ञानी झाला. त्याच्या कृतकृत्यतेचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, हें सर्वोत्कृष्ट शिवतत्त्व शंकरानें मला सांगितलें असता मी त्याप्रमाणें आचरण करून कृतकृत्य झालों. तसाच तूंही हो. मायेंतील मिथ्या भ्रमानें मिथ्योपाधिघटित मिथ्या जीवाकडून हें असत् जग पाहिलें जातें. कवीच्या कल्पनेप्रमाणें जशी काल्पनिक सृष्टि उदय पावते, त्याप्रमाणें जीवकल्पनेनें ही जाग्रत्–सृष्टि निर्माण होते. जलांतील द्रवत्वाप्रमाणें, वायूंतील स्पंदाप्रमाणें व आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं सर्गत्व आहे. असो; राघवा, शंकरानें उपदेश केल्यापासून या घटकेपर्यंत मी एकसारखें आत्मपूजन करीत असतों. दशरथपुत्रा, याच पूजाविधानानें मी अखिन्न मनानें मागचे सर्व व्यवहारपरायणही दिवस घालविले आहेत. मी यथाप्राप्त क्रिया व आचाररूपी पुष्पांनीं आत्म्याचें पूजन केलें आहे. निद्रासमयीं माझें तें पूजन व्युच्छिन्न होतें (आत्म्याचें अनुसंधान सुटतें ). पण पुनः जागा होताच मी एवढावेळ सुखानें निजलों होतों; मला कांहीं समजलें नाहीं, अशा अनुसंधानास कारण होणाऱ्या अविद्यावृत्तिपुष्पानें त्याचें पूजन करतों. त्यामुळें सुटलेलेंही

आत्मानुसंधान पुनः जोडल्यासारखें होतें. ( तर मग सर्व अज्ञाकडूनही तसलें शिवार्चन सदा होत असतें, त्यांत तुमचाच काय एवढा मोठा पुरुषार्थ आहे, असें म्हणशील तर सागतों. ) ग्राह्यग्राहकसंबंध हा सर्व देहवानांस सम आहे. पण योगी नेहमीं सावधान असतो व तेंच त्याचें आत्मार्चन होय. यास्तव हे रघुपते, या दृष्टीनें व निःसंगमनानें या संसाररूपी विरल अरण्यांत तूं विहार कर, म्हणजे खिन्न होणार नाहींस. बा सुव्रता, धन, बंधु इत्यादिकांच्या वियोगापासून उद्भवणारें मोठें दुःख प्राप्त झालें असता तूं या दृष्टीचा आश्रय करून विचार कर. धन व बंधु यांचा उदय अथवा क्षय झाला असता सुख व दुःख करूं नये. सर्व संसारदृष्टि नेहमीं अशाच नश्वर असतात, असें मनात जाणून स्वस्थ रहावें. विषयाची व्याकुल करणारी विचित्र गति कशी आहे, ते तूं जाणतोसच. इष्ट व अनिष्ट दशा कशा येतात, कशा जातात व पुरुषाला आपलें व्यसन लावून कशा बद्ध करितात, त्याला कशा पराभूत करितात, तें सर्व तुला माहीत आहे. प्रेम व विविध धन अकस्मात् येतें व अकस्मात् जातें. हे निर्मला, त्या सर्व जगत्क्रिया तुझ्या आत आहेत, यास्तव खरोखर तूं त्यांचा नव्हेस व त्या तुझ्या नव्हेत. हें जग असेंच काहीं विचित्र आहे. उगीच परितप्त कशाला होतोस ? तुला जगाची तुच्छता जर आवडत नसेल तर आत्माच जगत् आहे, असें पहा. अशा दर्शनानेंही तुझा बंध निवृत्त होईल. हर्ष-शोक करण्याचा प्रसंग येणार नाहीं. बाबारे, तूं चिन्मात्ररूप आहेस, व हें जग तुजहून भिन्न नाहीं. मग तूं ग्राह्य व त्याज्य कल्पना कशी करणार ? सर्व चित्सागर असल्यामुळें त्यांतील कोणाविषयीं हर्ष किंवा शोक करावयाचा आहे ? यास्तव रामा, तूं चिदेकरूप होऊन सुषुप्तिस्थितीस प्राप्त हो. आणि आजपासून तुर्यावस्थात्मक हो. सम व व उदारबुद्धि होऊन नित्य आत्मार्चापरायण हो. पूर्ण सागराप्रमाणें तृप्त रहा. असो; हें सर्व मी तुला सांगितलें आहे. तूं परिपूर्ण बुद्धि होऊन राहिला आहेस. पण हे रघुनंदना, आता आणखी तुला काय विचारावयाचें असेल तें विचार. पूर्वी एक-दोनदां ' हा प्रश्न येथें करणें उचित नाहीं, तो मग कर, असें म्हणून मी तुझ्या प्रश्नप्रवृत्तीला प्रतिबंध केला होता; पण आता तुला पाहिजे तें विचारण्याची मोकळीक मी देत आहें.

**श्रीराम**—गुरुवर्य, माझे सर्व संशय निवृत्त झाले आहेत. सर्व ज्ञातव्य मला ज्ञात झालें. स्वाभाविक तृप्ति झाली आहे. आता माझ्या मनांत द्वित्वमल राहिलेला नाहीं. विषयकल्पनाही उरलेली नाहीं. मागें मी जेव्हां आपणाला प्रश्न करीत होतों, तेव्हां माझ्या मनात गाढ अज्ञान होतें. पण आता तें नष्ट झालें आहे. अज्ञानवशात् आत्म्याला कलंक आहे, अशी माझी जी भ्राति होती, ती आता तुमच्या प्रसादानें निवृत्त झाली आहे. आत्मा उत्पन्न होत नाहीं व मरत नाही. तो कलंकित झालेला नाहीं. हें सर्व ब्रह्ममय आहे, असें जाणून मी सर्व संशय, प्रश्न, व मनोरथ यापासून पृथक् झालों आहें. माझें मन निर्मळ झालें आहे. साधूंनीं शिष्यास सागितलेल्या सर्व साधनोपदेशाविषयीं निरिच्छ झालों आहें. मला ग्राह्य, त्याज्य व उपेक्ष्य काहीं भासत नाहीं. माझा सर्व चिंताभ्रम शात झाला आहे. मी स्वर्गाची आकांक्षा करीत नाहीं व रौरवाचा द्वेष करीत नाहीं. हें जगत् असेंच आहे; त्याच्याहून भिन्न तत्त्वच नाहीं; असें जो प्राकृत जाणतो त्याच्या हृदयात सताप उत्पन्न करणारी संदेहसंतति होत असते. पण मी जगाला आत्मस्वरूप पहात असल्यामुळें मला ती व्याकुल करीनाशी झाली आहे. अज्ञपुरुष ज्या धनादि विषयांविषयीं कृपण होतो, दीन होतो, त्यानांच आम्ही तुच्छ समजतों. त्यामुळें आम्हीं क्षुधा, तृषा इत्यादि सहाऊर्मीनीं रहित व शुद्ध आनंदस्वरूप झालों आहों. भगवन्, तुमच्या प्रसादानें आम्हीं भवसागरातून पार तरून गेलों आहों. संपत्तींचा अवधि अम्हाला कळला आहे. आपत्तींची सीमा आम्हीं पाहिली आहे. सर्वसार असा जो भूमानंदाचा विषय ( आत्मा ) तो आम्हाला प्राप्त झाल्याकारणानें आम्हीं अदीन झालों आहों. आशागजास मारून आमचें मन वीर ठरलें आहे. साराश, परमेश्वरा, माझें मन आता अकार्पण्यामुळें स्थिर, पूर्ण चंद्र, क्षीरसागर, व शरदाकाश याहूनही अति निर्मळ व आतल्या आंत अतिशय हृष्ट झालें आहे ४३.

**सर्ग ४४**—ज्ञानदार्ढ्याकरितां गुरु, आसंगक्षयोचे वांच्छात्यागादि-मनःक्षयान्त उपाय पुनः सागतात.

**श्रीवसिष्ठ**—रामा, केवळ ( वासनारहित ) इंद्रियासह मनानें तूं जें करशील तें न केल्याप्रमाणेंच आहे. विषय संतोषाला कारण होतात, ही

समजूत व्यर्थ आहे. कारण ते, त्याच्या प्राप्तीच्या पूर्वी व वियोगानंतर संतोषाला कारण न होतां दुःसह दुःखालाच निमित्त होतात. यास्तव क्षणिक सुख व दीर्घ अनर्थ देणाऱ्या विषयांविषयीं आसंग ( आसक्ति, राग, प्रेम ) ठेवणें योग्य नव्हे. कारण इष्ट वस्तूचा लाभ झाला असतां होणाऱ्या आनंदाचें कारण वस्तुलाभ हेंच आहे. अर्थात् तो झाला नाहीं कीं दुःख. यास्तव असल्या विषयाची वांछा सोडणेंच योग्य आहे. रामा, तूं जरी तत्पदास प्राप्त झालेला आहेस तरी कदाचित् काल बदलल्यामुळें पुनः अहं-उदय होणें शक्य आहे, म्हणून म्हणतों कीं, तू अहंभावनारूप चिखलात रुतूं नकोस. रामा, तूं आत्मरूपी पर्वताच्या अग्रभूमीवर विश्रांति घेत बसला आहेस; यास्तव तुला आता पुनः अहंभावरूपी महाश्वभ्रात ( खड्ड्यात ) पडणें उचित नव्हे. वीरा, तुझा समता व सत्यतामय स्वभाव मला स्पष्ट दिसत आहे. तुझे सर्व विकल्प क्षीण झाले आहेत व अविद्या नाश पावली आहे असें मी समजतों. सौम्य व पूर्ण सागरासारखी तुझी ही निर्मळ समताच तूं स्वभावात स्थित आहेस, असें सुचवीत आहे. यास्तव संगरहित मनानें राहणाऱ्या तुझें मन अमन होवो; आशा निराशारूप होवो; व भावनेचा अभाव होवो. मनोरथाचा भंग झाला असतांही निराशा होत असते; पण तसल्या निराशेची इच्छा मी करीत नाहीं. तर निरतिशयानंद ब्रह्म-प्राप्ति झाल्यामुळें तुझ्या निराशेची मी आकांक्षा करीत आहें. तूं आत्म्याला विसरलास कीं बद्ध झालास व त्याला साक्षात् जाणलेंस कीं लागलाच मुक्त झालास, असें समज आणि मननादिकाच्या दृढतेनें स्वात्म्यास जाण. प्राप्त दुःख व सुख यांना सम जाणणें हेंच अवासनत्व आहे. वासनारहित अंतरिंद्रियाच्या योगानें तू क्रिया कर. म्हणजे आकाशाप्रमाणें विकार पावणार नाहींस. दुःखादिकालाही त्रिपुटीशीं मिळवून आत्मरूपानें जाण, म्हणजे तीं प्रतिकूल आहेत, असें भासणार नाहीं. चित्ताच्या निमिषोन्मेषानीं जगाचा क्षय व उदय होत असतो. यास्तव वासना व प्राण यांचा निरोध करून मनाला निमेषरहित कर. प्राणाच्या उन्मेष-निमेषांच्या योगानें जगाचे उदयास्त होत असतात. यास्तव प्राणायामांच्या अभ्यासानें त्यांचा नाश कर. मूर्खतेच्या उन्मेष-निमेषांमुळें कर्मांचा उदय

व नाश होत असतो. यास्तव गुरु व शास्त्रार्थ यांच्या साह्यानें, बलात्कारानें, तिचा लय कर. दृश्य व दर्शन यांच्या संबंधामुळें ही जगद्भ्रांति स्फुरत असते. यास्तव त्यांचा संबंध तुटला कीं तीही नाहींशी होते. लहर जशी जलस्पंदामुळें तशी माया चित्तस्पंदामुळें उत्पन्न झाली आहे. वासनांशाचा त्याग केल्यानें, अथवा बोधानें किंवा प्राणनिरोधानें चित्तस्पंद बंद पाडला कीं, चित्त अचित्त होतें व तेंच परम पद होय. विषय व इंद्रियें यांचा संबंध झाला असतां जें सुख होते तें वस्तुतः परब्रह्मसुखच होय. तद्रूप ब्रह्मदृष्टि केली असतां मनाचा क्षय होतो. जेथें चित्ताचा अभ्युदय होत नाहीं तेथें स्वाभाविक, सुखाचा अनुभव येतो. तसलें सुख स्वर्गादि दुसऱ्या कोठेंही संभवत नाहीं. चित्तोपशांती-मुळें होणारें सुख वाणीनें बोलून दाखवितां येत नाहीं. त्याचा कधीं क्षय होत नाहीं व त्याहून दुसरें कोणतेंही सुख अधिक नाहीं. तें कधीं उदय पावत नाहीं व शांतही होत नाहीं. भ्रांतीमुळेंच चित्ताचें अस्तित्व अनुभवास येतें. व ती बोधानें क्षीण झाली असतां चित्ताचाही नाश होतो. ज्ञानी पुरुषाचें चित्त हें चित्त नव्हे तर सत्त्व आहे. कारण नांव व अर्थ याच्या योगानेंच मात्र तें पृथक् आहे. चित्त वस्तुतः संभवत नाहीं म्हणूनच त्याचा विलय होऊं शकतो. कारण भ्रमच बोधानें बाधित होऊं शकतो. सत्-वस्तूचा बाध कधींही होत नाहीं. यास्तव चित्तादि सर्व विकार अवस्तु व विकल्परूप आहेत. सर्व आत्म्याच्या सत्तेनें विवर्तरूप-परिणामास प्राप्त झालें आहे, म्हणून त्याच्या बोधानें तें सर्व बाधित होतें. यास्तव तूं आपल्या चित्ताला सत्त्वरूप करून व किंचित् काळ जगत्स्थितींत विहार करून, तुर्यावस्थेंत जा. त्या रम्य अवस्थेंतही कांहीं काळ विहार केल्यावर तूं तुर्यातीत पदास प्राप्त होशील ४४.

सर्ग ४५—परब्रह्माचें बिल्वफलरूपानें वर्णन.

श्रीवसिष्ठ—रामा, आतां मी तुझ्या बोधासाठीं सांगत असलेली ही एक रम्य अपूर्व व संक्षिप्त कथा ऐक. एक मोठें बिल्वफल ( बेलफळ ) आहे. त्याच्या आंतील भाग सहस्रावधि योजन विस्तृत आहे. तें विमळ, स्पष्ट, अनेक युगांनींही जीर्ण न होणारें, अविनाशी रसानें परिपूर्ण, त्यांतील सार अमृतासारखें मधुर आहे, फार जुनें असूनही बालचंद्राप्रमाणें

मृदु व सुदर, भुवनाच्या मध्यगत—महामेरूप्रमाणें स्तंभाकार, मंदर-पर्वताप्रमाणें दृढ, महाकल्पांतींच्या वावटळीनेंही चंचल न होणारें, अतिशय विपुल, अमर्यादित. ब्रह्मदेवादि अतिवृद्ध पुरुषही ज्याची उत्पत्ति जाणत नाहींत, मूळ कोठें आहे व देंठ कोणीकडे आहे, तेंही कळत नाहीं, ज्याच्यामध्यें कधीं काहीं विकार झालेला दिसत नाहीं, सर्व पुरुषार्थ व फळें यामध्यें श्रेष्ठ असलेल्या ज्या फलांमध्यें मज्जा, नाहीं, बीज नाहीं, व शिराही नाहींत, असें तें फळ आहे. निर्विकार, निरंजन, शिलेच्या मध्य-भागाप्रमाणें नीरंध्र, अमृतस्राव करणाऱ्या चद्राप्रमाणें रसयुक्त, सर्व सौख्याचा कोश, शीतलप्रकाशकारक, पर्वतासारखें, अमृतपिंडासारखें, अनंतरक्षित, नित्य, अनन्य, इत्यादि प्रकारचें तें अपूर्व फळ आहे. त्यात त्रिभुवनाची कल्पना झालेली आहे. हा संकल्पविस्तार, ही रागद्वेषस्थिति, ही हेयोपादेय बुद्धि, ही त्वत्ता, ही मत्ता, हा ऊर्ध्वस्थ ब्रह्माडौघ, हे तीन काल, या दिशा, इत्यादि सर्व त्या फळांत आहे. राघवा, त्या महा-फळात आपल्या या सृष्टींत दिसणारें अमुक एक नाहीं, असें म्हणतांच येत नाहीं.

रघुनंदना, माझ्या या वर्णनावरून हें बिल्वफळ म्हणजे सर्वात्मिका व सर्वकारण महाचितिशक्तिच आहे. असें तुझ्या लक्षात आलेंना ? ती चिति शात, स्वस्थ, निराबाध, सौम्य, भावनारहित, व सत्य आहे. ४९.

सर्ग ४६—ब्रह्मप्रपंचाभासवर्णन.

**श्रीराम**—गुरुराज, आपण ही बिल्वरुपिणी महाचिद्घनसत्ताच येथें मला सागितली आहे, असें मी समजतों. कारण अहंतादि हें सर्व चिन्म-ज्जारूपच पसरलेलें आहे. यात द्वैतैक्यकल्पनात्मक भेद मुळींच नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—रामा, खरें आहे. पण केवळ अहंतादिच नव्हे तर सर्व ब्रह्माण्डच चिद्बिल्वाची मज्जा आहे. पण ही सर्व सृष्टि चिद्बिल्वाची मज्जा आहे, असें म्हणतांच चित् हा आधार व सृष्टि ही त्यांत ठेवावयाची वस्तु अशा प्राप्ति होईल. व त्यामुळें मर्यादित झालेल्या या सर्वग वस्तूचा विनाश होण्याचा प्रसंग येईल. पण तो संभवत नाहीं. चित्—सारख्या अतिशय सूक्ष्म व निरवयव पदार्थामध्यें जगत् हा एक मोठा चमत्कार आहे. शिळेच्या मध्यभागीं मन नांवाच्या शिल्पीनें कल्पिलेल्या

कमलवनाप्रमाणें ही त्यात राहिली आहे. याविषयींही मी एक आख्यायिका सांगतों ती ऐक.—

स्निग्ध, स्पष्ट. मृदुस्पर्श, महाविस्तारशालिनी, निबिड, नित्य अक्षुब्ध, अशी एक महाशिला आहे. तिच्या उदरात सरोवराप्रमाणें पुष्कळ प्रफुल्ल कमळें आहेत. त्यातील काहींच्या पाकळ्या एकमेकींस चिकटलेल्या आहेत, काहीं अगदीं दूर दूर आहेत, काहीं एकमेकींस झाकीत असतात. व काहीं स्पष्ट दिसतात. कित्येक कमळांचीं मुखें खालीं आहेत; कित्येकाचीं वर आहेत; कित्येकाचीं तिरकस आहेत. त्याचीं मूळें एकमेकास लागलेलीं असतात किंवा एकमेकांत अडकलेलीं असतात. कित्येकाचीं मूळें वर असतात. कित्येकाचीं खालीं असतात व दुसरीं कित्येक अमूल असतात. त्याच्या समीप शतशः शंख व हजारों चक्राचे ओघ असतात.

**श्रीराम**—गुरुवर्य, खरें आहे. मीं ती महाशिला शाळग्रामांत हरीच्या धामामध्यें सर्व परिवारासह पाहिली आहे.

**श्रीवसिष्ठ**—तूं म्हणतोस तें खरें आहे. तू त्या बाह्य दृष्टान्तभूत शिळेला पाहिलें आहेस व तिचा दार्ष्टान्तिक असा जो अनंतर निरतिशयानंद त्यालाही पाहिलें आहेस; पण रामा, मीं तुला ही आता अपूर्वच शिला सांगितली आहे. तिच्या महाकुक्षींत सर्व आहे व नाहींही. मीं तुला सांगितलेली ही चिच्छिला आहे. तिच्या आत जगें असतात. घनत्व, एकात्मकत्व इत्यादि गुणांच्या योगानें हिला शिला असें म्हणता येतें. आकाशात जसा मोठा वायु, त्याप्रमाणें या अति विस्तृत व नीरंध्राकार शिळेंत जगें असतात. जगाच्या समूहालाच मीं वर कमलवन म्हणून म्हटलें आहे. जग चित्–हून भिन्न असल्यासारखें भासतें; पण वस्तुतः तें भिन्न नाहीं व शुद्ध चित्ही नाहीं; तर शुद्ध माया आहे. चित्रामध्यें जशा नानाप्रकारच्या आकृति काढतात, त्याप्रमाणें या चिच्छिलेवर सर्व त्रिकालातील जगत् काढलेलें आहे. पाषाणातील मध्यभाग जसा एकाकार असतो, त्याप्रमाणें ही चित्ही एकाकार आहे. शिळेवरील चित्र शिळेहून पृथक् नसूनही जसें पृथक् भासतें, त्याप्रमाणें ही सृष्टि चित्–हून भिन्न नसूनही भिन्न भासते. पतिव्रतेच्या चित्तांत जसा तिचा पति अथवा बिल्वफळात मज्जा सतत असते, त्याप्रमाणें चिति अनंत, अपार, असल्यामुळें

तिच्यामध्यें हें सर्व आहे. केवळ वाणीनेंच जें संपन्न होणारें असतें, तें वाणीच्या अभावीं लय पावतें, असा नियम आहे. यास्तव नाममात्र पृथक् असलेले हे सर्व विकार वस्तुतः ब्रह्ममय आहेत. बीज अंकुरापासून पुष्प-फलापर्यंत सर्व कार्यांत जसें अनुवृत्त असतें, त्याप्रमाणें ब्रह्माची सत्ता सर्व वस्तूंमध्यें अनुवृत्त आहे. बीजसत्ता अंकुरादि पुढच्या सर्व परिणामांत जशी असते, तशीच चिद्धनामध्यें चित् असते. जगाचे कर्ते प्रत्यक्ष दिसत नाहींत. आजवर त्याना पाहिलेला एकही पुरुष त्याच्या अस्तित्वाविषयीं साक्ष द्यावयास पुढें आलेला नाहीं. यास्तव दिसणारें हें कधीं कोणीं केलें नाहीं व तें कधीं नाश पावत नाहीं. तर तो सर्व भ्रम आहे. सर्व ब्रह्म-सत्तात्मक आहे. हा सर्व जगद्भ्रम स्वप्न-भ्रमासारखाच दृष्टनष्ट आहे. रामा, हा सर्व जगद्विलास नित्य सुषुप्तपदच आहे. कारण तो सतत ब्रह्माकाश-रूप आहे. सृष्टीचें भान जरी होत असलें, तरी तें निव्वळ भानच आहे. यास्तव कोणतीही सृष्टि केव्हाही ब्रह्मामध्यें स्वाकारानें असणें संभवत नाहीं. ४६.

**सर्ग ४७**—वरील दोन्ही आख्यायिकांचें सार. मयूराडरसाचा दृष्टान्त.

**श्रीवसिष्ठ**—रामा, चिद्रूपतत्त्व जोंवर स्वस्वरूपानुसंधानरहित असतें, तोंवरच तें सृष्टीनें युक्त असतें; तोंवरच त्यात सृष्टीचा भास होतो. देश, काळ, क्रिया इत्यादि सर्व चिन्मयरूप असल्यामुळें, हें निराळें व हें निराळें, असें म्हणणें येथें उचित होत नाहीं. सर्व शब्द व त्याचे अर्थ ( पदार्थ ) या वासनाजन्य कल्पना आहेत, असें जाणणाराला एकरूप असल्यामुळें हें सर्व असत् आहे, असें कसें सांगतां येणार? त्याचप्रमाणें शिलेंतील रचनेप्रमाणें या चित्-रूपी आरशात जगद्रूपी नगर प्रतिबिंबित होतें. या परम चिन्मणीमध्यें असंख्य जगें आहेत. चित् नांवाच्या संपुटांत हें जगन्मौक्तिक तदंशमय असूनही अन्य असल्या-सारखें भासतें. भास्वान् चित्सूर्य जगद्द्रव्यें दाखवीत अहोरात्रीसारखीं वेदना व अवेदनारूपी कर्में करतो. समुद्रांतील लाटांप्रमाणें चिद्—मध्यें जगद्विलास होतो. जें आहे असें वाटतें तें सर्व चित्. त्या शिळेवरच हें सर्व जगच्चित्र खोदलें आहे. भाव व अभावरूप पदार्थांत जें सत्य म्हणून कांहीं असतें तें चित्च होय. ब्रह्माच्या ठिकाणच्या ब्रह्मत्वाप्रमाणेंच-

हें जगही त्यांत स्थित आहे. वृक्ष व झाड यांप्रमाणें ब्रह्म व जग यांमध्येंही भेद नाहीं. ब्रह्मज्ञानानें सर्वच ब्रह्म होतें. सर्व स्थूल व सूक्ष्म पदार्थांतील तें सार आहे. तृण, गुल्म, लता इत्यादिकांतील रसांप्रमाणें मेरुप्रभृति—तृणापर्यंत सर्व जड वस्तूंत तें ब्रह्म स्थित आहे. जगांतील वस्तूंची ब्रह्मसत्ताही गुणी—गुणरूप अथवा दुसऱ्या एकाद्या सत्तेनें भूषित होऊन राहते. आविर्भावदशेंत कार्यरूपानें जसें कारणच असतें, त्याप्रमाणें तिरोभावदशेंत कारणरूपानें कार्य असतें. ज्याप्रमाणें मोराच्या अंड्यांतील रसामध्यें विचित्र पिसें, पंख व मोराच्या शरीराचा कठीण भाग इत्यादि सर्व असतें, त्याप्रमाणें चित्तत्त्वामध्यें नानात्व असतें. विवेकदृष्टीनें पाहिल्यास चैतन्यांतील भेद कल्पित असून वास्तविक नाहीं, हें सहज कळण्यासारखें आहे. साराश, दृष्टान्तभूत मयूराडरसाप्रमाणेंच ब्रह्म कार्यशक्तियुक्त असून, अंडरसापासून होणाऱ्या विचित्र मयूराप्रमाणें त्याच्यापासून हा सर्व विचित्र ब्रह्मांडगोल भ्रमरूपानें निर्माण झाला आहे. ४७.

**सर्ग ४८**—सच्चिदानंद ब्रह्म कल्पित वस्तूंहून पृथक् करितात.

**श्रीवसिष्ठ**—रामा, अंड्यामध्यें जसा मोर त्याप्रमाणें वर वर्णन केलेलें आतील अहंतादि व बाहेरील आकाशादि जगत्रय ज्या शुद्ध तत्त्वामध्यें त्रिकालीं उदय न पावलेलें असेंच राहिलेलें असतें, तें ( ब्रह्मच ) या पूर्वोक्त दृष्टान्ताचें तात्पर्य आहे. जेथें परमार्थतः कांहीं उदय पावलेलें नाहीं व अविद्येनें हें सर्व जग आहे, तेंच या सर्व अंगांचा रस असा प्राण होऊन वैषयिक सुखाकारानें, निरनिराळ्या चित्तवृत्तींच्या रूपानें व विचित्र भोगाच्या आकारानें, आरशांतील चंद्राप्रमाणें अभिव्यक्त होतें. यास्तव विषयसुखाच्या अनुभवावरून त्याच्या बिंबभूत निरतिशयानंदाच्या अस्तित्वाविषयीं अनुमान करावें. मुनि, देवगण, सिद्ध, महर्षि इत्यादि तुर्यपदामध्यें स्थित असलेले सर्व सदा स्वरूपाचा आस्वाद घेतात. प्राणस्पंदामुळें होणारा विक्षेप व दृश्याच्या दर्शनाविषयींचा आसंग या दोन कारणांमुळें सर्वच मनुष्यांना त्याचा अनुभव येत नाहीं. म्हणूनच त्या दोन्हींचा परिहार करण्याकरितां योगी प्राणनिरोधन व नासाग्रदृष्टि यांचा सतत अभ्यास करितात. कर्में करीत असतांनाही जे भावनाशून्य असतात; विषय व चित्तवृत्ति यांचा संबंधच न होऊं देण्याविषयीं जे

प्रयत्न करीत असतात, चित्रांतील पुरुषाप्रमाणें ज्यांचा प्राण व मन स्पदन करीत नाहीं; व ज्यांचें चित्त अक्षुब्ध आहे तेच भूमानंदपदीं स्थिर असतात. ज्याप्रमाणें परमेश्वर बाहेर मायेनें सर्व जग रचित असला व त्याचें पालन व लय करीत असला तरी आतून स्वरूपानंदात निमग्न असतो, त्याप्रमाणें सहाव्या व सातव्या भूमींत आरूढ झालेले योगी बाहेरून जगत्कार्यें करीत असले तरी आतून स्वरूपांत तल्लीन झालेले असतात. विषय, इंद्रियें व वृत्ति याच्या संयोगसमयींही व्यक्त होणाऱ्या आनंदाकडेच त्याचें लक्ष्य असल्यामुळें त्याना सर्व व्यवहार सुखावह होतो. त्याच्या चित्तातील सुखस्वरूप अत्यत निर्विक्षेप असतें. व तेंच देह, इंद्रियें, प्राण, चित्त, वासना, जीव, स्पंद, इत्यादिकानीं रहित, शुद्ध, अदृश्य, उपदेश न करिता येण्यासारखें, दूरही नाहीं व समीपही नाहीं असे; सत् व असत्, शून्य व अशून्य इत्यादि भावनानीं हीन आत्मतत्त्व आहे. देश, काल, वस्तु इत्यादि काहीं नाहीं, तर या सर्व भावनांनी रहित असें एक आत्मतत्त्वच आहे. हृदयात जें असतांनाच हें दृश्य आविर्भाव–तिरोभाव-रूपानें स्फुरतें तें सन्मात्रच आत्मपद होय. अर्थात् तें कार्यकारण-विलक्षण आहे, अशी भावना करावी. तें आद्य पद कल्पांतींही नाश पावत नाहीं. अग्निप्रभृति भूतें आपलीं दाहादि कार्यें त्याच्यावर करूं शकत नाहींत. तें आपलें सद्रूप सोडून दुसऱ्या रूपास प्राप्त होत नाहीं. देहरूपी घट कितीही जरी उत्पन्न होऊन नाश पावले, तरी सद्रूप आकाशाला कांहीं विकार होत नाहीं. या सबाह्याभ्यंतर आत्माकाशामध्यें देहांच्या उत्पत्ति-नाशानीं काहीं खंड पडत नाहीं. कारण देहादि सर्वच आत्मा असल्यामुळें त्यांची कोणतीही अवस्था आत्मरूपच असते. केवल बोधामध्यें थोडासा विकार होताच देह आत्म्याहून पृथक् आहे, असा भास होतो. यास्तव व्यवहार करीत असताही निर्विकार आत्मदर्शनानें नित्यमुक्त आत्मस्वरूप पहावें. कार्यप्रसंगीं अनुरूप चेष्टा करीत असतांनाही शांत व निर्मम होऊन राहावें. हें जें कांहीं स्थावर–जंगमात्मक जग दिसत आहे तें सर्व निर्धर्म, निर्गुण व निर्मलात्मक ब्रह्म आहे, काल, क्रिया, करण, कर्तृ, कारण, कार्य, जन्म, स्थिति, नाश, स्मरण, इत्यादि सर्व ब्रह्मच आहे. असें आत्मदृष्टया पाहणाऱ्या तुला पुनरपि या भ्रमणांत पडावें लागणार नाहीं. तूं स्वयंब्रह्मच होशील ४८.

आत्म्याच्या स्पंदालाच प्रकृति असें म्हटलें आहे. स्पंद व वायु हे नाममात्र भिन्न असून वस्तुतः जसे एक, त्याप्रमाणें आत्मा व प्रकृति यांचा नाममात्र भेद आहे. सत्तारूपानें नव्हे. अबोधामुळें यांचा भेद भासतो व तो बोधानें लीन होतो. चित्क्षेत्रांतील कल्पनाबीजच चित्तरूपानें अंकुर धरतें. त्याच्यापासून नंतर हें संसारवन उद्भवतें. पण तें बीज आत्मज्ञानानें जळलें म्हणजे मग त्यावर वासनाजलाचा कितीही जरी सेक झाला तरी अंकुर उद्भवत नाहीं. त्याचप्रमाणें चित्क्षेत्रांत मुळीं कल्पनाबीजच जर पडलें नाहीं तर चित्ताकुर कसे उद्भवणार ? रामा, जगातील द्वित्व हें अज्ञानजन्य आहे. तूं आतां बोधयुक्त झाला आहेस. यास्तव अज्ञानाचा त्याग कर. आत्म्याचा एकभाव हेंच मोठें वैभव आहे. त्याच्यायोगानें तूं निर्भय हो. दुःख मुळीं नाहींच, असा आमचा परमार्थभूत उपदेश आहे ४९.

सर्ग ५०—कल्पनेनें जीवामध्यें पुर्यष्टकाचा उद्भव. इंद्रियांनीं बाह्यार्थग्रहण.

श्रीराम—गुरुवर्य सर्व ज्ञातव्य जाणलें, अक्षत द्रष्टव्य पाहिलें; व तुमच्या ज्ञानामृतानें आम्ही परिपूर्ण झालों आहों. पूर्ण ब्रह्मापासून निघून शरीरात नखशिखात प्रवेश करून राहिलेलें हें जीवरूप वस्तुतः पूर्ण ब्रह्मच आहे. पूर्णापासून आकाशादि क्रमानें जें व्यष्टि-समष्टि उपाधिरूप उद्भवतें तेंही पूर्णच उत्पन्न होतें. महावाक्यज्ञानानें उद्भवलेल्या मी ब्रह्म आहें, या ज्ञानानें कारणासह उपाधिपरिच्छेदाचा नाश झाल्यामुळें पूर्णब्रह्माच्या योगानें पूर्वींच परिपूर्ण असलेल्या जीवतत्त्वाची काल्पनिक पूर्णता जाऊन स्वाभाविक पूर्णता उदय पावते. तथापि हे गुरुवर्य, पुष्कळ लोकांना बोध होण्याकरितां मी आपल्याला आणखी लीलेनें प्रश्न करणार आहें. पण पुत्राचे निरर्थक प्रश्न ऐकूनही वत्सल पिता जसा त्याच्यावर कोप करीत नाहीं, त्याप्रमाणें आपणही मजवर रागावूं नका.

गुरुवर्य, मृत देहात कान, डोळे, त्वचा, जिह्वाग्र व नाक हीं गोलकें स्पष्ट दिसत असतानाही तीं आपापला विषय कां पाहूं शकत नाहींत ? व प्राणी जिवंत असतांनाच तीं सर्व विषय कशीं जाणूं शकतात ? जड इंद्रियेंही घटादिकांचें बाह्यत्व शरीरांत कसें अनुभवितात ? भिन्नप्रदेशीं पुरलेल्या दोन लोखंडी खिळ्यांना जसें परस्परांस आकर्षण करतां येत नाहीं, त्याप्रमाणें

ज्यांचा संबंधच संभवत नाहीं तीं इंद्रियें विषयांस किंवा विषय इंद्रियांस आकर्षण कसे करणार ? शिवाय एवढ्याशा इंद्रिय गोलकातून बाहेरचे वृक्षादि मोठाले पदार्थ आंत कसे शिरतात. मला जगाचें तत्त्व कळलें आहे. व त्यामुळें सर्व संशयही नाहींसे झाले आहेत; पण दुसऱ्या अज्ञांवर अनुग्रह करण्याकरिता मी हा असा प्रश्न करीत आहें.

**श्रीवसिष्ठ**—रामा, इंद्रियादि, चित्तादि व घटादि यातील काहींही निर्मळ चेतनाहून पृथक् नाहीं. कारण चागला विचार करूं लागलें असतां चित्–वाचून प्रमातृ–प्रमाणप्रमेयविभाग पृथक् संभवतच नाहीं. आकाशाहूनही स्वच्छ असलेली जी चित् तिनें आपण होऊनच आपलें रूप पुर्यष्टकरूपानें पूर्व पूर्व भावनेप्रमाणें कल्पिलें आहे. तेंच जगदवस्थितीच्या प्रकृतित्वास प्राप्त झालें. त्याच्याच अवयवापासून इंद्रियादिक व घटादिक पदार्थ झाले. साराश, याप्रमाणें इंद्रियाच्या द्वारा बाहेर गेलेल्या पुर्यष्टकघटक चित्तानें घटादिकास व्यापून आपल्या वृत्तींत प्रतिबिंबित झालेल्या त्यास बाह्याकारानेंच आत नेऊन दाखविणें, कालातरीं त्याची स्मृति होणें, स्वप्नांत आत असलेल्या त्याचाच बाह्यरूपानें अनुभव येणें इत्यादि सर्व होऊं शकतें. मृत शरीरात पुर्यष्टकघटित लिंगात्मा जीव नसतो. म्हणून त्यांत दर्शनादि सामर्थ्य नसतें.

**श्रीराम**—तर मग महाराज, सहस्रावधि जगाना निर्माण करण्याचें माहात्म्य ज्याच्यामध्यें आहे अशा या दर्पणासारख्या पुर्यष्टकाचें रूप काय आहे तेंच अगोदर मला साग.

**श्रीवसिष्ठ**—रामा, अज्ञात ब्रह्मतत्त्व हें त्याचें मूळ आहे. तें आकाशादि सूक्ष्म भूतास निर्माण करतें. त्याच्या योगाने लिंगशरीर बनवितें. नंतर भूताचें पंचीकरण करतें. ब्रह्माडास निर्मितें. त्यात स्वतः प्रतिबिंबित होतें. व प्राणांस धारण करूं लागतें. प्राणधारणामुळेंच त्याला जीव म्हणतात. तो जीव वासनाबुद्धीनें स्वतः वृद्धि पावतो, व बाह्याभ्यंतर व्यापारानीं चेष्टा करूं लागतो. तोच अहंभावामुळें अहंकार, मननामुळें मन, बोधनिश्चयामुळें बुद्धि, जीवाच्या ज्ञानसाधनामुळें इंद्रिय, देहाच्या भावनेनें देह व घटाच्या भावनेनें घट होतो. या सर्वव्यापारसाधारण स्वभावात्म्याला पुर्यष्टक असें म्हणतात. ( ज्ञानेंद्रियाच्या व्यापा-

रानें ) ज्ञत्व, ( कर्मेंद्रियांच्या व्यापारानें ) कर्तृत्व, ( त्याचें फल अशा सुख-दुःखांच्या आश्रयत्वानें ) भोक्तृत्व, ( औदासीन्यानें ) साक्षित्व इत्यादि धर्मांनीं युक्त होणारी जी संवित् तिलाच चैतन्यप्राधान्यानें जीव व जडप्राधान्यानें पुर्यष्टक असें म्हणतात. आपल्याशीं तादात्म्यरूपानें कल्पिलेल्या अंतः-करणाचे आकार कालभेदानें भिन्न भिन्न होत असल्यामुळें जीवही काम-क्रोध हर्ष—विषाद, इत्यादिकांनीं अनुरंजित होत्साता नाना असल्यासारखा होतो. वासनाजलाचा जसा जसा सेक होतो त्या त्याप्रमाणें जीवबीजापासून जगदंकुर उद्भवतो. त्यामुळेंच तो 'मी चिदात्मा नव्हे तर शरीरादि आकार आहे,' असें मिथ्या ज्ञानानें पाहतो. पाण्याच्या प्रवाहात पडलेल्या काष्ठाप्रमाणें वासनावेष्टित जीव दीर्घ काल जगत्प्रवाहात खालीं, वर, इकडे, तिकडे इत्यादि वाहत असतो. उपाधिभेदामुळें अनेकरूप झालेल्या जीवातील सनकादिकासारख्या ज्याची जाति ( जन्म ) अतिशय शुद्ध असते ते आद्य जन्मांतच ज्ञानानें मुक्त होतात. कित्येक पुष्कळ जन्म घेऊन ज्ञान मिळवितात व दीर्घ कालानें मुक्त होतात. व बहुतेक तर गुणामध्येंच आसक्त होऊन कल्पपर्यंत विषयासक्त होऊन राहतात. असल्या जीवामुळेंच हा संसार महा कष्टकर झाला आहे.

असो; राघवा, अशा रीतीनें जीव शरीरतेस प्राप्त झाला आहे. आतां तो नेत्रादिकाच्या योगानें बाह्य पदार्थांस आत कसें पाहतो, तें वर सामान्यतः सांगितलें आहे, तरी विशेषतः सांगतों. अन्तःकरणात प्रतिबिंबित झाल्यामुळें मर्यादित झालेलें चैतन्य नखशिखात शरीरास व्यापून राहतें. आणि त्यामुळें देहपरिमित झालेलें तें देहांतील सुखदुःख भोगतें. बाह्य घटादि पदार्थ जेव्हा पहावयाचा असतो, तेव्हा सरोवरातील जल पाटाच्या द्वारा जसें बाहेर जातें, त्याप्रमाणें सर्व शरीरातून नेत्रादि गोलकाच्या द्वारा बाहेर निघालेलें चित्प्रतिबिंब घटादिकांपर्यंत जाऊन पोंचतें. त्यामुळें घटाकार चित्प्रतिबिंब व जीव यांचें तादात्म्य होतें आणि अशा रीतीनें बाह्य विषयांचा अनुभव जीवाला हृदयांत येतो. अर्थात् अशा प्रकारचा हा चित्तयुक्त इंद्रियांचा बाह्यार्थांशीं होणारा संबंध जीवितकालींच संभवतो, मृत शरीरांत संभवत नाहीं. जगांत जें जें अति स्वच्छ असतें त्यांत बाह्य वस्तु प्रतिबिंबित होत असतात, असा नियम व अनुभवही आहे.

अंतःकरणवृत्ति अतिशय स्वच्छ आहे. कारण अंतःकरण हें सत्त्वगुणाचें कार्य आहे. त्यामुळें त्यांत प्रतिबिंबित झालेला बाह्य पदार्थ बाहेर असल्यासारखा भासत असूनही आंत जीवाला ज्ञात होणें अगदीं साहजिक आहे. विषयस्पर्श झाला असतां त्याचें ज्ञान होणें हा नियम बाल, पशु, पक्षी इत्यादिकांचे ठायीं प्रसिद्ध आहे. फार काय पण वृष्टि झाली असता टवटवीत होणें. इत्यादि चिह्नांवरून वृक्षादि स्थावर पदार्थांसही स्पर्शादि ज्ञान होतें, असें अनुमान करिता येतें. ( लाजरी म्हणून एक लहानसें झाड आहे. त्याला हात लावताच पानें मिटतात. ) आतां कोणी कदाचित् म्हणेल कीं दूर असलेल्या विषयांचा देहस्थ नेत्र–कर्णादि गोलकाशीं संबंध कसा होतो ? तर त्याचेंही उत्तर सांगतों–नेत्रादि शरीरगत गोलकाच्या आंत असलेल्या इंद्रियांचे जीवचिदाभासयुक्त किरण विषयापर्यंत जाऊन त्याला व्यापतात. व त्यामुळे जीवाला त्याचें हृदयांत ज्ञान होतें. ( शब्द मात्र कर्णाच्या द्वारा आपण होऊन आंत प्रवेश करूं शकतो. ) असो; अशा रीतीनें इंद्रियांशीं संबद्ध होऊन विषयांचें ज्ञान होते.

**श्रीराम**––गुरुराज, मन, आरशी व असेच दुसरेही अनेक स्वच्छ पदार्थ यांत प्रतिबिंबित होणाऱ्या घट, मुख, प्रभा इत्यादिकांचें स्वरूप काय आहे ?

**श्रीवासिष्ठ**––( हसून ) रामा, बिंब सत्य असले तरी प्रतिबिंब भ्रांतिमात्र आहे. मग तें ( प्रतिबिंब ) चित्चें असो कीं जडाचें असो. आणि चित्प्रतिबिंबभूत व्यष्टिसमष्टि जीवाचे रूपही जर बिंबाहून पृथक् आहे, असें प्रमाणतः सिद्ध करिता येत नाहीं, तर मग अत्यंत जड असें मुख व दर्पण, किंवा घट व चित्तवृत्ति यांची परस्पर अपेक्षा करणारें प्रतिबिंबस्वरूप सुवाच्य कसें असणार ? यास्तव चैतन्यात्म्याची भ्रान्ति हेच प्रतिबिंबाचें स्वरूप आहे. हें सर्व जगही तसेंच आहे. यास्तव त्यावर तूं विश्वास ठेवू नकोस. मी इत्यादि हा सर्व प्रपंच तरंगासारखा असून तो चित्–जलाहून पृथक् नाहीं. सदा चित्–जलच वर्तमान असतें. त्या पर सागरात देश, काल, क्रियादिक नाहींच. तन्मय झाल्यामुळें ज्ञानी पुरुषाला नित्य सर्वत्र तो सर्वगामी आत्मा दिसतो. हे रामा, तूं नित्य असक्तबुद्धि, शांत, सुखदुःखांना मिथ्या जाणणारा व ज्याची सर्व संसारलक्षणमाया

अस्त पावली आहे असा होऊन ब्रह्मस्वभावात म्हणजे समतेमध्यें स्थिर-चित्त हो ५०.

**सर्ग ५१—जीव, इंद्रियें, मन, देह, पुर्यष्टक इत्यादि भ्रम आत्म्याच्या अज्ञाना-मुळेच होतो. पण बोधसमयीं एक ब्रह्म अवशिष्ट राहतें.**

**श्रीवसिष्ठ**—ब्रह्मदेवाप्रमाणें ब्रह्मस्वभावांत स्थित असलेल्या तुझीं इंद्रियें मन इत्यादि साधनें सृष्टीच्या पूर्वी व्यक्त झालेलीं नव्हतीं, हें तूं माझ्या वचनाचें तात्पर्य जाणलेंच असशील. नंतर सृष्टीच्या आरंभीं हिरण्य-गर्भाच्या पुर्यष्टकाची जशी उत्पत्ति होते तशीच व्यष्टि जीवाचीही होते. व्यष्टि जीव गर्भामध्यें असतानाच सहाव्या महिन्यांत चक्षु, त्वक्प्रभृति इंद्रियाच्या उदयाने युक्त म्हणजेच पुर्यष्टकरूप होतो व तो तेव्हापासून ज्या ज्या व्यवहार्य वस्तूची भावना करतो त्या त्याप्रमाणें पाहतो. साराश हिरण्य-गर्भाच्या मनोव्यापारामध्यें स्वसंवेदन, जसें इंद्रियें व विषयरूप होतें, तसेंच तें तुझेंही झाले आहे. यास्तव सृष्टीच्या पूर्वी असलेली व्यष्टि व समष्टि याची एकच शुद्ध संवित् पुढें अहंवेदनालक्षण अनंत जीवपुर्यष्टक युक्त जरी झाली तरी तिचें स्वरूप अनिद्यच असतें. कारण वेद्याशीं तिचा जरी संसर्ग झाला तरी वेद्य ( विषय ) सत्य नसल्यामुळें त्याच्या योगानें ती दूषित होत नाहीं. शिवाय चित् मन, इंद्रिये-इत्यादि रूपास जरी प्राप्त झाली तरी तो तिचा खरा परिणाम नव्हे; तर विवर्त आहे. त्यामुळें तिचा मनःप्रभृति आरोपित भावही सत्य नसून मिथ्या आहे. विद्येच्या योगानें आविर्भूत होणारा आत्मा पूर्वी नव्हता, असेंही म्हणणे योग्य नव्हे. कारण मुळींच नसलेला परमात्मा विद्येनें तरी उत्पन्न कसा होणार ? अर्थात् मन व पाच ज्ञानेंद्रियें याना विषय न होणारा तो परमात्मा नाहीच, अशी मूढाना झालेली भ्राति विद्येच्या योगानें जाते, इतकेंच समजणें युक्त होय. परमात्मा असा अद्वितीय आहे. तथापि श्रुतीनें अज्ञाना उप-देश करतां यावा म्हणून, अग्नीपासून जशीं असंख्य किटाळें उडतात त्याप्रमाणें या परमात्म्यापासून अनेक जीव उत्पन्न होतात, असें म्हटलें आहे. यास्तव या अविद्यारोगाच्या मूळाचें फारसे चिंतन करूं नये. तर त्याची चिकित्सा कशी करतां येईल याचा विचार करावा. कारण त्याच्या मूळादिकाची कल्पना करणें हा सुद्धा त्याच्या निवारणाचा उपायच आहे.

त्या महाव्याधीचें निवारण झालें की निराकार ज्ञान अवशिष्ट राहतें. त्याच्या अपेक्षेनें हें महाकाशही महापर्वतासारखें स्थूल आहे. जेथें हें व्यवहारपूर्ण व खरें असल्याप्रमाणें भासणारें जगही असत्य ठरतें त्या निर्मल जीवन्मुक्तशरीरांत तूं विषयास सोडून रहा.

रामा, असत् हेंच अविद्येचें रूप आहे. कारण तिचें प्रमाणतः निरूपण करूं लागले असता ती नाहींशीच होते. अहो! जी मुळीं वस्तु नाहींच तिला कितीही शोधलें म्हणून काय होणार? कितीही जरी प्रयत्न केला तरी मृगजलानें भांडें कधीं तरी भरेल का? ज्या अर्थी असत्च सत् असल्यासारखें भासतें त्या अर्थी ते अज्ञानानेंच तसें भासत असलें पाहिजे. यात काहीं संशय नाहीं. ज्ञानाच्या योगानें वस्तु जशी असेल तशी दिसून तिच्या आधारानें झालेला भ्रम निवृत्त होतो. सत्य आत्म्याच्या सान्निध्यानें अत्यंत असत् अशीही अविद्येची कल्पना होते. शास्त्रांनीं जीवाला उपदेश करण्यासाठीं अविद्येची व अविद्येकरिता जीवाची कल्पना केली आहे. तीच तूं आता ऐक.–चित् जणुं काय जीवत्वास प्राप्त झाली आहे. पुर्यष्टक पदावर आरूढ झाली आहे. भावनारूपी कलंकानें कलंकित झाली आहे. ती बाह्य विषयदर्शनाविषयीं अत्यंत उत्सुक होऊन जशी जशी भावना करते तसा तसा लागलाच अनुभव घेते. एकाद्या पोरानें रात्रीं कल्पिलेला यक्ष सत्य असो कीं असत्य असो, पण त्याचें कार्य मात्र सत्य असल्यासारखें अनुभवास येतें; तसाच हा सर्व वरील प्रकार होतो. जीव देह सत्य आहे, असें मानतो. त्यातच पाच इंद्रियें उत्पन्न झालीं आहेत, असे पाहतो. त्यांच्या योगानें बाह्य भूतपंचक जणु काय पंचतन्मात्राहून अगदीं भिन्न असल्याप्रमाणें पाहतो. त्यामुळें हें आतर व हें बाह्य असा त्याचा निश्चय होतो. नंतर वासनेप्रमाणें त्याचे प्रत्ययही दृढ होत जातात. विषय व इंद्रियें यांच्या संयोगानें अभिव्यक्त झालेल्या स्वात्मसुखालाच तो विषयसुख असें समजतो. मिऱ्याचा तिखटपणा व आकाशाचें शून्यत्व त्यांप्रमाणें आत्म्याचें स्वाभाविक ज्ञानच विषयसंबंधामुळें उत्पन्न झालेलें आहे व तो अहंकारात्म्याचा धर्म आहे, अशी जीव कल्पना करतो. त्यानें या सांसारिक विषयभोगांमध्येंच पुरुषार्थाचा निश्चय करून त्यांकरिता ऐहिक व पारलौकिक कर्माचरणांचा दृढ नियम धरला आहे.

त्या कर्मापासून मला हा असा लाभ होईल, या कर्मापासून असें फल मिळेल इत्यादि संकल्प करून तो नश्वर सुखाच्या उद्देशानेंच सर्व आचरण करीत असतो. पण या दोन प्रकारच्या आचारांतील एक स्वाभाविक व दुसरा शास्त्रकृत असून त्यांतील पहिला रागद्वेषादिप्रयुक्त आहे. तथापि ते दोन्ही आचार संकल्पात्मक आहेत व पुरुषाच्या स्वाभाविक प्रयत्नानेंच होत असतात. त्या दोन्ही प्रकारच्या आचारात अज्ञ आत्माच प्रवृत्त होतो. तोच त्यांची प्रवृत्ति, साधन व फल या रूपानें विवर्त पावतो. उंसाच्या रसाची साखर होते व मातीच्या गोळ्याचा घट होतो. व तीं कार्यें झाल्यावर रसाचा पातळपणा आणि गोळ्याचा गोल आकार अनुभवास येत नाहीं. म्हणून स्वतः साखर व घट याना जरी विकार असें म्हणतां आलें, तरी रसांतील माधुर्य व गोळ्यांतील माती याचा अनुभव साखर व घट यांमध्यें येत असल्यामुळें त्यांना रसादिकांचा विवर्तच म्हटलें पाहिजे. ब्रह्माचाही या सर्व जगत्कार्यांत सत्तारूपानें अनुभव येत आहे. यास्तव जग हें ब्रह्माचा विवर्त आहे; विकार नव्हे. कारण त्याच्या ठिकाणीं विकार संभवत नाहीं. साराश, रामा, विकाराच्या सिद्धीकरिता अविद्येची कल्पना केली आहे.

तिच्या योगानें पृथक् नसतांना सुवर्ण-कुंडलन्यायानें पृथक् झालेलें हें द्वैत असत्य व मर्यादित आहे. पण नुस्त्या सुवर्णदृष्टीने पाहिल्यास तेंच अधिष्ठान ब्रह्मसत्तेनें सत्य आहे. वासनावान् चित्त सर्व भावना करतें व भावनेप्रमाणें त्याला सर्व दिसतें. त्याच्या ठिकाणीं चित्त्व आहे व जाड्यही आहे. त्यामुळें तें भावना करून भावित पदार्थांप्रमाणे तात्काळ होऊं शकतें. अंतर्वासनाकळ्या फुलल्या कीं जीव निराळाच बनतो. ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेला एक गाव एका क्षणातच बदलून वन होतो, त्याप्रमाणें हा देहभूत जीवही एका देहास सोडून अन्य देहांत जातो. कारण तोही स्वप्नाप्रमाणेंच प्रतिभासरूप आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांत दिसणारा नर झटकन भिंत होऊन लागलाच वस्त्ररूप भासतो, त्याप्रमाणें हें देहान्तरही असत्य असून आपोआप होतें. स्वप्नांतील आपल्याच अन्यरूपाप्रमाणें मरण व जन्म हीं दोन्ही खोटीं आहेत. निरनिराळ्या अवस्थांप्रमाणेंच जन्मान्तर आहे. अवस्था एकाच देहांत होतात म्हणून त्यांचें आम्हाला भान

होतें व जन्मांतरप्रसंगीं देह बदलतो म्हणून पूर्व जन्माचें भान होत नाहीं. पण निद्रित पुरुषालाच जसें स्वप्न पडतें त्याप्रमाणें आत्मज्ञानरहितालाच हा प्रपंचभ्रम होतो. आणि जागें होतांच स्वप्न जसें खोटें ठरतें, त्याप्रमाणें ज्ञानकालींच प्रपंचाचा बाध होतो. हा सर्व व्यवहार अनादि कालापासून प्रवृत्त होऊन प्रवाहरूपानें एकसारखा चालला आहे. पण यांतही पौरुषा-( प्रयत्ना ) नें प्राक्तन वासनेला जिंकता येतें. कालचें कुकर्म आजच्या यत्नानें सुकर्म होतें.

असो; रामा, जीवाला वासना-परिणामलक्षण देहादिबंध कसा होतो त्याचें मी वर्णन केलें. आतां त्याची शांति केव्हा होते, तें सांगतों. जिवंत पुरुषाच्या शरीरातील नेत्रादि इंद्रियें मोक्षावाचून शांत होत नाहीत. कारण तो चित्च्या संकल्पानेंच झालेला आहे. यास्तव संकल्पक्षयावाचून त्याचा क्षय होणें शक्य नाहीं. मन, बुद्धि, अहंकार व तन्मात्रपंचक यांनाच पुर्यष्टक म्हटलें आहे व तोच आतिवाहिक देह आहे. ( वर सांगितलेलें पुर्यष्टक याचें कार्य आहे. ) हा चित्तात्मा अमूर्त आहे. आकाश, वायु इत्यादि त्याच्या मानानें अति स्थूल आहेत. पण स्थूलभावाच्या अस्तित्वाची कल्पना मोक्षाच्या उपयोगीं नाहीं. उलट ती त्याला प्रतिबंध करणारी आहे. यास्तव देहादि प्रपंच मनोमात्र आहे, असें समजावें म्हणजे वैराग्यादिकाच्या अभ्यासानें व शमादिकाचें संपादन केल्यानें ज्ञानाचा उदय होऊन स्वप्नप्राय प्रपंच व त्याचे मूल अज्ञान याचा बाध होतो, आणि त्यामुळें कार्यकारणावस्थारूप दोन्हीं बंधांनीं रहित झालेल्या जीवाला मुक्ति मिळते. पण स्थूल भूत—भौतिकमूर्तप्रपंचाचा स्वीकार केल्यास ज्ञानानें त्याचा बाध होणार नाहीं. व प्रपंचाचा बाध न झाल्यामुळें मोक्षही होणार नाहीं. यास्तव प्राणी स्वप्न व सुषुप्ति या दोनच अवस्थाचा अनुभव घेत असतात. सर्व देहादि जड प्रपंचवासना ही सुषुप्ति व देहादि मी आहें, असें समजणें हें स्वप्न होय. मोक्षापर्यंत आतिवाहिक देह स्थावर व जंगम भावानीं या दोन अवस्थातच भ्रमण करीत असतो. तो जेव्हां सुषुप्त भावामध्यें स्थित असतो तेव्हा वासनारूपानें हृदयांत प्रवेश केलेल्या भावि दुःस्वप्नांनीं विद्ध झालेला असतो. म्हणजे त्याला स्मरण नसतें. त्यामुळें त्याची आकृति व्यक्त नसते.

तथापि तो चित्प्रतिबिंबानें युक्त असल्यामुळें व त्यानें सर्व जगाचा उपसंहार केलेला असल्यामुळें तो ( आतिवाहिक देह ) कालाग्नीसारखा दीप्त होऊन राहतो. ( अर्थात तार्किकांच्या म्हणण्याप्रमाणें तो अंतर्ज्ञानशून्य नसतो. ) स्थावरादि दशेंत त्याच्यामध्यें जाड्यांश अधिक असतो. हीच त्याची सुषुप्ति होय. तात्पर्य जडता हीच ह्याची सुषुप्ति; चित्तभ्रमण हेंच स्वप्न ( संसार ), तत्त्वबोध हीच बंधमुक्ति व तुर्या हीच जाग्रती आहे. जीव आत्मसाक्षात्कारामुळें परमात्मतेस प्राप्त होतो. ही ज्ञानप्राप्य मुक्ति दोन प्रकारची आहे. एक जीवन्मुक्ति व दुसरी अदेहमुक्ति ( विदेहमुक्ति ). वर सांगितलेली तुर्या हीच जीवन्मुक्ति व तुर्यातीतपदप्राप्ति हीच विदेहमुक्ति होय. बोधात्मा जीव उत्कृष्ट ( चिन्मात्र ) ब्रह्मरूप होतो. पण तो बोध पुरुषाच्या प्रयत्नानेंच होणें शक्य आहे. मी कसा व केवढा आहें, याचें प्रमाण ज्याला कळलें आहे, असा जीव सर्वावभासक साक्षिरूप होतो. पण ज्याला आपलें प्रमाण कळलेलें नसतें तोही परमार्थतः स्वरूपांतच स्थित असताना भ्रमानें प्रपंचभ्रम पाहतो. त्यामुळें तो भयभीत होतो. पण संसारभय हा मायाविलास आहे. तें मिथ्या, काल्पनिक आहे. जीवामध्यें एका चित्कलेवाचून दुसरें कांहीं नसतें. पण तिलाच भिन्न असल्याप्रमाणें पाहून तो व्यर्थ शोक करतो. जीवरूपी अणूमध्यें एका परमात्म्याहून दुसरें कांहीं तत्त्व नसतें. पण जेथें पाहावें तेथें माया पसरलेली दिसते ! वाहवारे मायेचा विलास ! ! भांड्यात उकळणाऱ्या पाण्यावर जसे अनेक विकार दिसतात, त्याप्रमाणें जीवाणूंमध्यें मिथ्यासंसारोदय झाला आहे. वासनाबंध हाच याचा बंध व वासनालय हाच मोक्ष होय. वासनाचा अंत ( समाप्ति ) होणें हीच ज्या जीवाणूची सुषुप्ति आहे. कारण तुर्य व तुर्यातीत या दोन दशामध्यें वासनाचा अभावच असतो. पण जीव स्वप्नामध्यें विचित्राकारांनीं स्पष्ट होतो. त्याचा वासनामोह जेव्हां घनाकार होतो तेव्हां तो स्थावरताभाक् होतो, मध्यमवासनोदयानें पशु–पक्ष्यादि तिर्यक् जीव होतो व विरलवासनामुळें मनुष्य देव इत्यादि बनतो. देहाला नखशिखांत व्यापून मी देहप्रमाण आहें, असें जेव्हा तो समजतो, तेव्हां देहाच्या बाहेरचे पदार्थ त्याच्यापासून वेगळे होतात. नंतर तो आंतील जीव इंद्रियांच्या द्वारा बाहेर जाऊन

घटादि पदार्थांना जेव्हां व्यापतो तेव्हां हा माझा ग्राह्य विषय, हा मी याचा ग्राहक इत्यादि मिथ्या ( आरोपित ) विभाग उदय पावतो. त्याचप्रमाणें ग्राह्य व त्याज्य हा भेदही वासनाध्यस्तच आहे; सत्य नव्हे. सारांश रामा, एक चिदात्माच याप्रमाणें आंतील व बाहेरील कलारूपानें प्रकाश पावला आहे. त्यामुळें त्रिभुवनात त्रिकाळीं चिच्चमत्कारावांचून दुसरें कांहीं नाहीं. आम्ही याच तत्त्वबोधानें विराजमान झालों आहों. समुद्र जसा एक शुद्ध व अद्वितीय जलरूप त्याप्रमाणें हें सर्व भेदजात एक परम तत्त्वरूप आहे; हे आतां तुला कळलें आहे ५१.

**सर्ग ५२**—जगत् जीवाचें स्वप्न आहे. आसक्ति सोडल्यानें त्याचा क्षय व अर्जुनाचें आख्यान.

**श्रीवसिष्ठ**—अनेक कल्पनानीं भरलेला आद्य जीवाचा जो प्रथम स्वप्नभ्रम तोच हा संसार आहे, असें तूं जाण. हा सत्यही नव्हे व असत्यही नव्हे. त्यात आम्हीं जीव अनेक जन्मरूपी अनेक स्वप्नातील स्वप्नें पहात राहतों. अजडाच्या ठिकाणीं जड व जडाच्या ठिकाणीं अजड, तसेंच सत्यामध्यें असत्य व असत्यामध्यें सत्य इत्यादि ही सर्व भ्रमपरंपरा दीर्घकाल अव्याहत चालते. जीवाचें तत्त्व सर्वग व अनंत असल्यामुळें जीव ज्याची भावना करितात तें ते पाहतात. असा प्रकार असल्याकारणानें आसक्तीचा त्याग केला असतां जगाच्या सत्यत्वाविषयींचा भ्रम निवृत्त होतो व त्यामुळें ज्याला तत्त्वज्ञान झालें आहे त्याची जीवन्मुक्ति सिद्ध होते. पुंडरीकाक्ष हीच शुभ अनासक्तिरूप गति अर्जुनाला सांगेल. व तिचा आश्रय करूनच अर्जुन जीवन्मुक्त महामुनि होईल. द्वापराच्याशेवटीं होणारा पांडुपुत्र ईश्वराच्या उपदेशाप्रमाणें आचरण करून आपलें जीवित सुखानें घालवील. रामा, त्याच्याप्रमाणेंच तूंही आपलें आयुष्य घालीव.

**श्रीराम**—गुरुवर्य, तो पांडुपुत्र कधीं होणार आहे ? व हरि त्याला कशाप्रकारची असंसक्ति सांगणार आहे ?

**श्रीवसिष्ठ**—एक सन्मात्र आत्मा आहे. तो आपल्याच महिम्यामध्यें राहतो. सोन्यात जसें कटकादिक अथवा जलांत तरंगादि त्याप्रमाणें त्या अतिशुद्ध आत्म्यामध्यें संसारभ्रम भासतो. जाळ्यांत अडकलेल्या पक्ष्यां-

प्रमाणें या संसारजाळ्यांत चवदा लोकांतील प्राणिजाति व्यवहार करीत असतात. त्या संसारजाळ्यांत यम, चंद्र, सूर्य, इंद्र इत्यादि वेदोक्त प्रशस्त आचरण करणारे देव लोकपाल होऊन राहिले आहेत. त्यानीं आपल्या संकल्पघटित ज्ञानानें हें पुण्य असून ग्राह्य आहे, हें पाप असून त्याज्य आहे, इत्यादि स्थिति स्थापिली आहे. त्यातील यमाचे चित्त आजपर्यंत आपल्या नेमलेल्या कर्मामध्ये स्थिर आहे. तो भगवान् चार युगांचा प्रत्येक फेरा संपला म्हणजे भूतसंहारामुळें मला किंचित् पाप लागलें असेल, या शंकेनें तप करतो तो काहीं ( दहापांच ) वर्षें असा उदासीनासारखा राहिला असता मृत्यु भूताना मारीत नाहीं. त्यामुळें भूतल प्राण्यानीं भरून जातें, व पृथ्वीला फार क्लेश होऊं लागतात. असा प्रकार झाला असता बा रामा, विष्णुप्रभृति देव अंशावतार भारतयुद्ध इत्यादि उपायानीं व अनेक युक्तींनीं प्राण्याचा संहार करून भूभार कमी करितात. असे प्रकार आजवर अनेकदा झाले आहेत.

असो; रामा या नियमास अनुसरून या कल्पात पुढें ही एकदां असाच सूर्यपुत्र यम बारा वर्षें तप करणार आहे. त्या वेळीं सृष्टींतील संहार बंद पडेल आणि पृथ्वीला मत्त व दुर्वृत्त प्राण्याचा असह्य भार होईल. त्यामुळें दीन झालेली ती हरीला शरण जाईल. तिचें दुःख निवारण करण्यासाठीं हरि दोन देहांनीं सर्व देवासह पृथ्वीवर अवतार घेईल. हरीच्या दोन अंशातील एक वसुदेवाचा पुत्र वासुदेव व दुसरा पाडूचा पुत्र अर्जुन होईल. धर्माचा पुत्र युधिष्ठिर या नांवाचा प्रख्यात राजा होईल. तो समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य करील. पण त्याच्या चुलत्याचा दुर्योधन म्हणून एक पुत्र असेल त्याचें व युधिष्ठिराच्या भीम नांवाच्या भ्रात्याचें सर्प व मुंगुस यांप्रमाणे हाडवैर पडेल. पुढे तें विकोपास जाऊन राज्याकरिता त्या दोन्ही पक्षातील वीरांचें भयंकर युद्ध होईल. अठरा अक्षौहिणी भयंकर सैन्य नाश पावेल. आणि अशा युक्तीनें विष्णु पृथ्वीचा भार कमी करील.

राघवा, हरीच्या दोन अंशांतील अर्जुन या नांवानें झालेला दुसरा अंश महाशूर असेल. पण तो हर्ष व क्रोध यांनीं युक्त असल्यामुळें नरधर्मवान् ( अज्ञतुल्य ) होईल. दोन्ही सैन्यात मरणास तयार होऊन उभ्या

राहिलेल्या स्वजनास पाहून त्याला मोठा विषाद वाटेल. तो युद्ध सोडून जाण्यास तयार होईल. पण हरि आपल्या कृष्णनांवाच्या प्रबुद्धदेहानें इष्टकार्यसिद्धीकरिता त्याला असा आत्मबोध करील.—आत्मा जन्म घेत नाहीं, मरत नाहीं, तो पूर्वी कधीं नसून पुढे होतो असें नाहीं, तो न जन्मणारा, नित्य, सतत एकरूप व अनादि आहे. मारल्या जाणाऱ्या शरीराबरोबर मारला जात नाहीं, हा दुसऱ्याला मारणारा आहे, असें समजणारा व हा दुसऱ्याकडून मारला जातो, असें समजणारा या दोघांनाही कांहीं समजत नाहीं. कारण हा कोणाला मारीत नाहीं व कोणाकडून मारला जात नाहीं. कारण अनत, एकरूप, सत्, आकाशाहूनही सूक्ष्मरूप व परम ईश असा आत्मा कसा व कोणत्या उपायानें नाश पावणार? अर्जुना, तूं अनत, अव्यक्त, आद्यन्तशून्य, अशा आत्म्याला अवलोकन कर. तूं निर्दोष ज्ञानाकार, अज व नित्य आहेस. तूं उपद्रवरहित आहेस १२.

**सर्ग ५३**—अहंकाराचा त्याग, उपास्य व ज्ञेय परमात्मरूप.

**श्रीभगवान्**—अर्जुना, तूं कोणालाही मारणारा नाहींस. आपला हा खोटा अभिमान सोड. तूं जरामरणरहित व शाश्वत स्वय आत्मा आहेस. मी हें अमुक एक कर्म केले असा अहंकार ज्याला वाटत नाहीं; व मी हें चांगलें किंवा वाईट कर्म केले म्हणून ज्याची बुद्धि हर्ष अथवा विषादानें लिप्त होत नाहीं, त्या महात्म्यानें या त्रिभुवनाला मारलें तरी तो वस्तुतः कोणाला मारीत नाहीं, व त्या हिंसेमुळें बद्ध होत नाहीं. अंतःकरणांत जशी जशी भावना उत्पन्न होते तसें तसें जीव बाहेर पाहतो. यास्तव हा मी व हें माझे ही आतील आसक्ति सोड.

हे भरतकुलजा, या आसक्तीमुळेंच तूं 'मी पुण्यानें युक्त आहें व पापानें नष्ट झालों आहें' असें समजून व्यर्थ भ्रांतीनें सुखदुःख भोगीत राहिला आहेस. अहंकारानें मूढ झालेला पुरुष देहेंद्रियादि गुणविकाराकडून केलीं जाणारीं कर्में मीच करीत आहें, असें जाणतो, मीच त्याचा कर्ता आहें, असा अभिमान बाळगतो. पण विचार केला असतां चक्षुःप्रभृति इंद्रियांचीच रूपादि विषयामध्यें प्रवृत्ति होते; आत्म्याची नव्हे. यास्तव तो कर्ता नव्हे, हें कळतें. मन संकल्परूप आपल्या कर्मामध्यें रत असलें

तरी मी या मनःप्रभृति संघातातील कोणी नव्हे, असें पाहणाऱ्या तुला कोणता पदार्थ क्लेश द्यावयास कारण होणार आहे? पुष्कळांनीं मिळून केलेल्या कर्मावर एकानेंच अभिमान ठेवून दुःखी होणें हेंही जर हास्यास्पद आहे, तर अगदीं अलिप्त असलेल्या आत्म्याला कर्ता समजून दुःखी होणें अधिक हास्यावह नाहीं का? म्हणूनच योगी चित्तशुद्धीकरितां केवल शरीर, मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या योगानें संग सोडून कर्में करितात. अहंत्वरूपी विषचूर्णानें ज्याच्या शरीरास मारिलें नाहीं, ते कर्में करीत असले व भोग भोगीत असले तरी रागादिरोगशून्य असल्यामुळें बद्ध होत नाहींत. मोठा शहाणा व अति विद्वान् असलेलाही मानव दुःशील असल्यास जसा शोभत नाहीं, त्याप्रमाणें ममतारूपी अमंगल पदार्थानें दूषित झालेला देह मुळींच शोभत नाहीं. जो ममतारहित, अहंकार-शून्य सुख व दुःख यास सम जाणणारा व क्षमावान् असतो तो कार्य किंवा अकार्य केल्यानेंही लिप्त होत नाहीं. पांडुसुता, युद्ध हें तुझें उत्तम क्षात्र कर्म आहे. तें अतिक्रूर असलें तरी स्वधर्मरूप असल्याकारणानें, अत्यंत श्रेयस्कर, सुखकर व उदय करणारें आहे. स्वधर्म निंद्य असला तरी शुभ परधर्माहून श्रेष्ठ होय. अरे वेड्या, मूर्खालाही जर स्वकर्म श्रेय-स्कर होतें तर बुद्धिमानाविषयीं काय सांगावें? जिच्यातील अहंकार सर्वथा गळून गेला आहे, अशी मति विषयाकडे गेली तरी लिप्त होत नाहीं. धनंजया, योगस्थ होऊन व संग सोडून कर्में कर. निःसंग व प्राप्त कर्म करणारा तूं बद्ध होणार नाहींस. शांत ब्रह्माकार होऊन ब्रह्मार्पण बुद्धीनें केलेलें शास्त्रीय कर्मही बद्ध करीत नाहीं. यास्तव तूं आपला सर्व आचार ब्रह्मार्पण केलास म्हणजे क्षणांत ब्रह्मच होशील. ज्यानें सर्व अर्थ ईश्व-रार्पण केले आहेत, जो ईश्वरात्मा झाला आहे, व जो निरामय आहे. असा तूं स्वतः ईश्वर व सर्वभूतात्मा हो. भूतलास भूषित कर. ज्यानें सर्व संकल्प सोडले आहेत. जो सम, शांतचित्त, व मननशील आहे आणि संन्यासयोगानें युक्त आहे असा होऊन तूं मुक्तमति हो.

अर्जुन—भगवन्, संगत्याग, ब्रह्मार्पण, ईश्वरार्पणरूप संन्यास, व ज्ञानयोग यांचें स्वरूप मला सांग. त्यावांचून माझा महामोह जाणार नाहीं.

**श्रीभगवान्**—सर्व संकल्प शांत झाले असतां ज्यांतील सर्व घन वासना अगदीं क्षीण झाल्या आहेत व जें कोणत्याही भावनाकारानें रहित आहे असें चित्तच परब्रह्म होय. त्याच्या प्राप्तीविषयीं विचार व चित्तैकाग्र्य यांच्या योगानें उद्योग करणें हेंच ज्ञान व योग होय. सर्व जगत् व मीही ब्रह्म आहें, असें जाणणें हें ब्रह्मार्पण होय. पाषाणाच्या मध्यभागाप्रमाणें आंत शून्य व बाहेर शून्य असणें, शांत व आकाशकोशाप्रमाणें स्वच्छ असणें, दृश्य नाहीं, दृष्टि मात्र आहे; तिच्यावाचून अन्य कांहीं नाहीं; पण तिला सोडून थोडेंसेंही पृथक् होणें हाच जगदाभास आहे. प्रत्येक शरीरात चित्-पासून उदय पावलेला अहंभाव मूळ चित्चा कोटिकोट्यंश आहे; वस्तुतः तोही अध्यारोप आहे. यास्तव असत्या त्या क्षुद्र अहंभावाविषयीं आग्रह धरणें युक्त नव्हे. हा अहंभाव आपल्या चिदधिष्ठानापासून अपृथक् भूतच आहे. (पृथक् नाहीं) कारण पृथक् होणें म्हणजे परिच्छिन्न—मर्यादित—होणेंच आहे, पण अपरिच्छिन्न ब्रह्माच्या ठिकाणीं तें संभवत नाहीं. शिवाय मी नाहीं असें कोणी जाणत नाहीं. यास्तव मी असें जाणण्यामुळेंच अहंभाव चित्-हून पृथक् झाला आहे, व तो अशा भ्रमानें पृथक् झाला आहे म्हणूनच मी असें आपल्याला जाणतो. यास्तव अहं असा भावच सोडला म्हणजे सर्वच प्रपंच आटोपला. अहंभावच त्याज्य वस्तु आहे. अहंतेप्रमाणें ममभावही सर्वथा त्याज्य आहे. हे दोन्ही अनर्थावह भाव सोडले म्हणजे समुद्रासारखा परिपूर्ण आत्माच अवशिष्ट राहतो. शिवाय विषयाच्या वैचित्र्यामुळें विचित्र झालेले अहं-मम-भाव स्फुरत असतांनाही त्यांच्या सत्तास्फूर्तीला निमित्त होणारा, अवस्थात्रयांमध्यें अनुगत असणारा, ज्ञानमात्रस्वभाव आणि विकल्पांचा उद्भव व नाश याचा साक्षी असा प्रत्यगात्मा एकरूपानें अनुभवास येतच असतो. तेव्हा त्याच्याविषयीं अगदीं योग्य असलेला आग्रह जीव कां धरीत नाहीं? त्याप्रमाणें विचार करून आत्मपरायण होणें हें ज्ञान होय.

अशारीतीनें चांगला विचार करून ज्याला सार व असार कळलें आहे, अशा पुरुषाच्या बुद्धींतील अहं-मम-भावाचा क्षय होणें व त्या कारणानें स्वाभाविकपणेंच सर्व कर्मांच्या फलाविषयीं इच्छा न राहणें हा त्याग होय. संकल्पसमूहाचा त्याग करणें यालाच असंसंग म्हणतात. सर्व द्वैतसमूह

नाममात्र असून वस्तुतः तो आपल्या उपादानकारणभूत ईश्वरमात्र आहे अशी भावना करणें, हेंच ईश्वरार्पण आहे. चिदात्म्याच्या ठिकाणीं त्यांचा भेद अबोधामुळें नाममात्र भासतो. बोधात्मा हाच एक जगाचा मुख्य अर्थ आहे. अर्जुना, मी सर्वांचा आत्मा आहें. माझी विभूति सर्वत्र पसरली आहे. मीच दिशा, जगत्, स्व, कर्म, काल, अद्वैत व द्वैत आहें. यास्तव तूं आपलें मन माझ्याच ठिकाणीं लाव. तूं माझा भक्त हो. माझें पूजन कर. मला नमस्कार कर. व मत्परायण हो. अशा रीतीनें तूं आपलें चित्त माझ्याच ठिकाणीं स्थिर केलेंस म्हणजे मलाच येऊन मिळशील.

अर्जुन——भगवन्, तुझीं पर व अपर अशीं दोन रूपें आहेत. मी आपल्या सिद्धीकरितां त्यांतील कोणत्या रूपाचा आश्रय करून राहूं ? व तीं कशीं आहेत ?

श्रीभगवान्—हे निष्पाप, एक सामान्य व दुसरें परम अशीं माझीं दोन रूपें आहेत, असें तूं जाण. हस्तादिकानीं युक्त व शंखचक्रगदाधर, असें जें माझें रूप आहे तें सामान्य, व आदि-अंतरहित, एक, अनामय, इत्यादि धर्मयुक्त असलेलें जें दुसरें रूप तें पर होय. ब्रह्मात्मा, परमात्मा इत्यादि शब्दांनीं त्याचाच निर्देश करितात. जोंवर तूं अप्रतिबुद्ध व अनात्मज्ञ आहेस तोंवर माझ्या चतुर्भुजाकार मूर्तीचें पूजन कर. म्हणजे त्याच्या योगानेंच तूं क्रमानें चांगला प्रबुद्ध होशील व त्यामुळें आपोआप माझें तें परम रूप जाणशील. माझें अनाद्यन्त रूप तुला साक्षात् कळलें म्हणजे तूं पुनः जन्म घेणार नाहींस. मी आपल्या सामान्यरूपाचें पूजन करण्या-विषयीं जें तुला येथें सांगितलें आहे तें तुझें चित्त शुद्ध झालेलें नाहीं, असें समजून तें होण्यासाठीं, सांगितलें आहे. पण तुझें चित्त जर आत्म-ज्ञानास योग्य असेल तर मज ईश्वराचें पारमार्थिक स्वरूप व तुज जीवाचें पारमार्थिक स्वरूप एक आहे, असें जाणून अखंड पूर्णात्म्याचा आश्रय कर. त्याला जाणून तन्निष्ठ हो. हें मी आहें, हें मी आहें, इत्यादि प्रकारें मी जें सांगत आहें, तेंही आत्मतत्त्वच असून केवल तुझ्या बोधासाठीं मी त्याचा उपदेश करीत आहें. मला तर तुझ्या चर्येवरून असें वाटतें, कीं तूं चांगला प्रबुद्ध झाला आहेस. परमपदीं विश्रांति पावला आहेस. व संकल्पांनीं तुला सोडलें आहे. यास्तव आतां तूं सत्य एकात्ममय हो. तूं

योगयुक्तात्मा होऊन आत्म्याला सर्व भूतांत पहा. व सर्व भूतांना आत्म्यामध्यें पहा. सर्वत्र समदृष्टि ठेव. कारण समत्व हेंच ब्रह्माचें लक्षण आहे. जो एकत्वाचा आश्रय करून सर्व भूतस्थ आत्म्याचें भजन करतो तो कसाही जरी वागत असला तरी पुनः जन्मदुःखात पडत नाहीं. एक व सर्व हे पर्यायशब्द आहेत. एक हा आत्मशब्दाचा अर्थ आहे. आत्माही वस्तुतः सत् किंवा असत् नाहीं. तर तो ज्यांत असतो त्याच्यासारखा होतो. त्याचा अनुभव त्रैलोक्यातील सर्व जीवाना सदा येत असतो. कारण तो सर्वांच्या बुद्धींचा प्रकाशक आहे. यास्तव तो स्वर्गादिकाप्रमाणें परोक्ष आहे, असेंही म्हणता येत नाहीं. जिह्वेवर ठेवलेलें जल, दूध, दहीं, तूर, लवणादिक, मध, शर्करा इत्यादि याचा रसानुभव हाच आत्मा आहे. यास्तव त्याला परोक्ष म्हणता येत नाहीं. सर्व शरीरामध्यें सूक्ष्म व विषयरहित असा जो अनुभव स्थित आहे तोच सर्वग आत्मा होय. सर्वप्रकारच्या दुधातील घृताप्रमाणें सर्व पदार्थ व देह यात असणारा, सर्व सागरातील रत्नाना सबाह्याभ्यन्तर व्यापणाऱ्या तेजाप्रमाणें देहाच्या सबाह्याभ्यंतर असणारा व हजारो कुंभाना सबाह्याभ्यंतर व्यापणाऱ्या आकाशाप्रमाणें त्रिभुवनांतील हजारो शरीरांस व्यापणारा असा हा आत्मा आहे. शेकडों मोत्यामध्यें जसा एक तंतु ओवलेला असतो त्याप्रमाणें हा लक्षावधि देहात असणारा आत्मा कोणाला फारसा दिसत नाहीं. ब्रह्मदेवापासून गवताच्या काडीपर्यंत जी एक सामान्य सत्ता आहे तोच आत्मा, असें ज्ञानी समजतात. वस्तुतः सदा ब्रह्मच असताना किंचित् स्फुरणाकार झालेलें तें अहं व जगद्रूप भ्रमाने मंडित होतें. हें सर्व जगद्रूप आत्माच आहे. तेव्हा यातील कोणाला कोण कसें मारणार ? अर्जुना, तूं व्यर्थ शुभाशुभ व जगद्दुःखें यानीं लिप्त का होतोस ? प्रतिबिंबांतील आधारभूत आरशाप्रमाणें साक्षितुल्य असलेल्या व नाश पावणाऱ्या शरीरांबरोबर नाश न पावणाऱ्या, याला जो पाहतो तोच खरा डोळस आहे. पाडवा, सर्वात्मा मी आहें, मीच आत्मा आहें, असें जाण. उत्पत्ति, स्थिति, लय इत्यादि या सर्व विक्रिया, सागरांतील जलस्पंदाप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणींच प्रवृत्त होत असतात. ज्याप्रमाणें पर्वतांचें पाषाणत्व, वृक्षाचें काष्ठत्व व तरंगाचें जलत्व त्याप्रमाणें सर्व पदार्थांचें आत्मत्व हें अधिष्ठान आहे. जो आत्म्याला सर्वभूतस्थ

व अकर्ता पाहतो, सर्व विकारात आत्म्याकडे दृष्टि लावतो तोच आत्मदृष्टि होय. जलात जसे अनेक चंचळ तरंग त्याप्रमाणें पर आत्म्यामध्यें सर्व नाशवान् भूतें. सर्व पदार्थ हीं भूतें व ब्रह्म यांचे नित्य ऐक्य आहे. आत्म्यावाचून या जगांत काय आहे? अर्जुना, आत्म्याला विचारानें पृथक् जाणल्यावर सत्य जग राहिले कोठें? उगीच का असा मोहित होत आहेस. असो, पाडवा, अशा प्रकारच्या या अभयतत्त्वाचें मनात चिंतन करून व सम दृष्टि ठेवून जीवन्मुक्त सन्त सदा जगात व्यवहार करितात. ज्याना मान व मोह नाहीं, ज्यानी संगदोषाला जिंकलें आहे, जे सतत आत्मनिष्ठ असतात, ज्यानी सर्व कामनाचा त्याग केला आहे, जे सुख-दुःख-संज्ञक द्वंद्वानीं मुक्त आहेत व जे मोहित होत नाहींत ते त्या अव्यय पदाला जाऊन पोंचतात ९३.

**सर्ग ५४**—सुखदुःखादिसबंधाचा हेतु, त्यांच्या त्यागाचा क्रम, व हानि प्रसंगीं योग्य आश्रय.

**श्रीभगवान्**—अर्जुना, माझा उपदेश ऐकून तूं अतिशय संतुष्ट होतोस, म्हणून हितबुद्धीनें मी आणखीं कांहीं सागतों ते ऐक. अर्जुना, इंद्रियाचे विषयाशीं संबंध उत्पत्ति-विनाशशील व शीतोष्ण-सुख-दुःख देणारे आहेत. यास्तव त्याना सहन कर. कारण ते इंद्रियविषयसंबंध, सुख, दुःख, शीत, उष्ण इत्यादि सर्व अद्वयपूर्णानन्दस्वरूप आत्म्याहून पृथक् नाहींत, असेंच जाणल्यावर पृथक् राहिले कोठें! शिवाय मी-मला अतिशय प्रिय असलेल्या धनादिकाच्या योगानें-पूर्ण आहें, अशा अभिमानानें जीवाला सुख होतें व त्याच्या वियोगादिकामुळें अप्रिय झालें असता अरे अरे, माझा सर्वस्वी घात झाला, अशा अभिमानानें दुःख होतें, असा नियम आहे. यास्तव आत्म्याचे स्वरूप समजून निरव-यव ब्रह्मामध्ये पूर्णता व खंड याचा संभवच नाहीं, असा निश्चय होताच सुख-दुःखाची निवृत्ति अनायासानें होते. विषय व इंद्रियें सत्य आहेत, ही प्रतीति ज्याची शात झालेली असते, तो सुखदुःखास सम समजणारा धीर अमृतत्वास समर्थ होतो. आता दुःखादिधर्म आपलें स्वाभाविक प्रतिकूल स्वरूप कसें सोडतील, म्हणून म्हणशील, पण तें बरोबर नाहीं. कारण सर्वच आत्मा असल्यामुळें दुःखादिकही त्याचेच

असत् भेद आहेत. तेव्हां असत्-रूपाला सहन करण्यांत काय अशक्य आहे? सुखदुःखांनाही स्वतःची सत्ता नाहीं तीं आत्म्याच्या सत्तेनेंच सत्तावान् झालीं आहेत. तेव्हां स्वतः सुख व दुःख असत्च होय. असत् वस्तूचें वास्तविक अस्तित्व नसतें व सत् वस्तूचा कधीं अभाव होत नाहीं. यास्तव सुखदुःखादि नाहींच; तर एक सर्वज्ञ परमात्मा आहे. जगत् व आत्मा याच्या विषयींची क्रमानें सत्त्व व असत्त्व बुद्धि सोडून बाकी राहिलेल्या मध्यस्थितींत तूं स्थिर रहा. अर्जुना, आत्मा दृश्यास पाहणारा, चेतनात्मा व शरीरांत राहणारा असला तरी सुखानीं हृष्ट होत नाहीं व दुःखानीं म्लान होत नाहीं. जड चित्तादिक दुःखाचें भाजन असून तेंच देहत्वास प्राप्त झालें आहे. यास्तव त्याला काहीं जरी झालें तरी आत्म्याला काहीं होत नाहीं. दुःखादिकाचा भोक्ता होऊन राहिलेलें हे देहादि जडजात अविद्येपासून उद्भवलेलें असून माया भ्रमरूप आहे, असें जाण. यथार्थ आत्मबोधानें त्याचा विनाश होत असतो. भ्रमानें भासलेल्या सर्पाचें भय त्याच्या अधिष्ठानाचे ज्ञान झालें असता जसें जातें, त्याप्रमाणें आत्मबोधानें प्रपंचभय निवृत्त होतें. ब्रह्म अज आहे. तें नाहीं, असें स्थानच या त्रिभुवनात नाहीं. तें जन्म घेत नाहीं व नाशही पावत नाहीं. तें सत्य व पर आहे. हाच परम बोध आहे. प्रपंच हा ब्रह्मसागरातील तरंग आहे. यास्तव तो काहीं वेळ उठून पुनः लीन होतो. अर्जुना, तूंही त्या महासागरातील एक भोंवरा वर्तमान समयीं दिसत आहेस, तथापि तूं त्रिकाळीं निरुपद्रव ब्रह्मच आहेस. सर्व काल, क्रिया, देश, तूं, मी व हे सैनिक ब्रह्मातील परिस्पंद ( लहरी ) आहेत. तूं मान, मद, शोक, भय, इच्छा, सुख, इत्यादि हें सर्व द्वैत सोड, कारण तें असत् आहे. व एक सद्रूपवान् हो. या अठरा अक्षौहिणी सैन्याला ब्रह्मरूपानें मारून ब्रह्मरूप कर. सुख, असुख, लाभ, अलाभ, जय, अजय याना समान समजून शुद्ध ब्रह्माशीं एकरूप हो. कारण हे भारता, तूं ब्रह्मसागर आहेस. लाभ व अलाभ यांना सम समजून प्रकृत कार्य कर. तूं जें करतोस, खातोस, होम करतोस, व देतोस तें आत्मा आहे, असें मानून स्थिर हो. जो पुरुष अंतःकरणात यन्मय असतो त्याला निःसंशय तेंच प्राप्त होतें. यास्तव सत्य ब्रह्माला मिळविण्यासाठीं तूं ब्रह्मसत्यमय हो.

ब्रह्मज्ञ पुरुष स्वतः ब्रह्म होऊन व फलाची अपेक्षा न करून ब्रह्मभावनेनें केवळ प्राप्त कर्म करतो. शरीरानें होणाऱ्या कर्मांमध्यें, आत्मा अकर्ता असल्यामुळें, त्याचें हें कर्म नव्हे, असे समजून जो अकर्म पाहतो व शरीराच्या अकर्मामध्यें मनातील तें कर्म न करण्याचा निश्चय अथवा ' मी यावेळीं अकर्मा आहें ' असें जाणणें, हेंच कर्म आहे, असें जो समजतो तोच मनुष्यांत बुद्धिमान्, योगी व खरा कर्मकर्ता होय. तूं कर्माच्या फलाची इच्छा करून त्याचा हेतु होऊं नकोस. तुझी अकर्माच्या ठिकाणीं (म्हणजे कर्म मुळींच न करण्यामध्यें) ही आसक्ति न होवो. धनंजया, तूं योगस्थ होऊन व संग सोडून कर्म कर. कर्मासक्ति व मूढता याचा आश्रय न करिता व नैष्कर्म्यामध्येंही आसक्त न होता जशाचा तसाच सम रहा. जो कर्मफलासंग सोडून व नित्यतृप्त आणि निराश्रय होऊन कर्म करतो तो वस्तुतः कांहीं करीत नाहीं. आसक्ति हेंच कर्तृत्व आहे. मन मूर्खतेमध्यें स्थित असल्यास कर्म न करणाराचीही ती ( आसक्ति ) होते. यास्तव मौर्ख्याचा त्याग करावा. परम तत्त्वाचा आश्रय करून आसक्तिरहित झालेला महात्मा सर्व कर्मामध्यें जरी रत असला तरी त्याच्याठायीं कर्तृता उदय पावत नाहीं. अकर्तृपणामुळें अभोक्तृत्व सिद्ध होतें व अभोक्तृत्वामुळे सम-एकता बाणते. समैकतेमुळें अनंतत्व व अनंतत्वामुळें ब्रह्मत्व सिद्ध होतें. अर्जुना, नानात्व हा मळ सोडून कार्य अथवा अकार्यही कर्म केलेंस म्हणजे तूं त्याचा कर्ता होणार नाहींस. ज्याच्या सर्व चेष्टा काम व संकल्प यानीं रहित असतात. त्याला ज्ञानी पंडित म्हणतात. कारण त्याचीं कर्में ज्ञानाग्नीनें दग्ध झालेलीं असतात. जो सम, सौम्य, स्थिर, स्वस्थ, शांत व सर्वविषयाविषयीं निःस्पृह असतो, त्याचें शरीर कार्यामध्यें व्यग्र असलें तरी तो स्वतः अव्यग्रच असतो. यास्तव अर्जुना, तूही शीत-उष्णादि द्वंद्वरहित, नित्य सत्त्वस्थ, योगक्षेमरहित, आत्मवान्, वेळ पडेल तसें वागणारा व त्यामुळेंच भूतलास भूषित करणारा हो. जो मूढचित्त पुरुष कर्मेंद्रियाचें मात्र नियमन करून मनानें विषयाचें चिंतन करीत राहतो, त्याला ढोंगी म्हणतात. पण जो ज्ञानेंद्रियांना मात्र प्रतिबद्ध करून व मनात असक्त राहून कर्मेंद्रियानीं व्यापार करतो तो विशेष (उत्तम) पुरुष होय. नद्यांच्या जलानें प्रतिक्षणीं भरणारा समुद्र जशी आपली

मर्यादा सोडीत नाहीं, त्याप्रमाणें सर्व काम ज्याच्या अंतःकरणांत प्रवेश करितात, पण त्याला विकारयुक्त करीत नाहींत त्याला शांति मिळते. उपभोगाची इच्छा करणाराला ती मिळत नाहीं ५४.

**सर्ग ५५**—अज्ञ व ज्ञानी या दोघांचाही आत्मा देहनाश झाला तरी सारखाच अविनाशी असतो. पण अज्ञ भ्रांतीनें जन्म घेतो व ज्ञानी घेत नाहीं.

**श्रीभगवान्**—शरीराच्या रक्षणाला अगदीं अवश्य असलेल्या अन्न-पानादि भोगांचा त्याग करूं नये. तर अत्यंत हितकर व शुद्ध अन्नादिकांचा उपभोग अवश्य घ्यावा. पण ते अवश्य असलेले पदार्थही चांगलेच असावे, इत्यादि व्यसन लावून घेऊं नये. त्यांचा लाभ झाला किंवा न झाला तरी अगदीं सम चित्तानेंच रहावें. त्याचप्रमाणें अर्जुना, हा देह अनात्मा आहे; म्हणजे आत्मा नव्हे. यास्तव त्याला आत्मा समजूं नकोस. तर सत्य व असंसारी आत्म्यालाच आत्मा समज. हे महाशूरा, देह जरी नाश पावला तरी आत्मा कांहीं नाश पावत नाहीं. आत्मनाश हाच खरा नाश आहे; पण तो तर त्रिकालीं नाश पावत नाहीं, कारण तो नित्य आहे. तो चित्तात्मा नसल्यामुळें क्षीण होत नाहीं. ज्यानें मी कर्ता, ब्राह्मण, शहाणा इत्यादि सर्व आग्रह सोडले आहेत तो कर्मामध्यें प्रवृत्त झालेला असला तरी कांहीं करीत नाहीं. कारण आसक्तिच कर्तृत्व आहे, हें वर सांगितलेंच आहे. आत्मा नाश पावतो, हा दुर्बोध तुला न होवो. कारण तो फार दुःखद आहे. उत्तम आत्मवेत्ते तसें समजत नाहींत. ते या शरीरांतच आपल्या शुद्धबुद्धीनें आत्म्याला साक्षात् पाहतात.

**अर्जुन**—भगवन्, असें जर असेल तर देहनाश होण्याचा प्रसंग आला असतां मूढाचेंही कांहीं प्रिय नष्ट होत नाहीं !

**श्रीभगवान्**—होय; अगदीं खरें आहे. मूढाचा वस्तुतः कोणताही अति प्रिय पदार्थ नष्ट होत नाहीं; कारण आत्माच अति प्रिय आहे व तो अविनाशी असल्यामुळें त्याचा विनाश केव्हा व कसा होणार? वंध्यापुत्राप्रमाणें हें नष्ट झालें व हें उत्पन्न झालें, असें म्हणणें हा शुद्ध शब्दविकल्प आहे. कधींही सत् न होणारें असत् व कधींही असत् न होणारें सत् याचा निर्णय तत्त्वज्ञानीं केला आहे. ज्यानें हें सर्व दृश्य व्यापलें

ण्यास कोणी समर्थ नाहीं. त्या नित्य शरीरवान् आत्म्याचे हे सर्व देह विनाश पावणारे आहेत. यास्तव हे भरतकुळजा, तूं युद्ध कर. आत्मा एक आहे. द्वित्व मुळीं नाहींच. तेव्हा जें नाहीं तें असेल कसें? व जें त्रिकालीं सत् तें ( आत्मस्वरूप ) नाहींसें होणार कसें? यास्तव द्वित्व व एकत्व यांचा त्याग केला असतां जें राहतें तेंच शांत परम पद होय.

**अर्जुन**—प्रभो, तर मग 'मी मेलों' असा लोकव्यवहार कसा होतो? व स्वर्ग आणि नरक यांची स्थिति कशी झाली आहे?

**श्रीभगवान**—भूमि, जल, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि, या तन्मात्रजाला—( सूक्ष्मभूतसमूहा )—शीं तादात्म्य पावलेला जीव या शरीरात राहतो. दाव्यानें जसें वासराला ओढतात त्याप्रमाणें तो वासनारज्जूनें ओढला जातो. पिंजऱ्यांतील पक्ष्याप्रमाणें तो शरीरांत वास करतो. देश-कालवशात् जर्जर झालेल्या देहातून निघून तो वासनांमुळें दुसऱ्या देहात जातो. वायु जसा फुलातील वास घेऊन जातो त्याप्रमाणें तो जातांना श्रोत्रादि इंद्रियें आपल्याबरोबर नेतो. त्याचा स्थूल देह हाही वासनांचाच परिणाम आहे. यास्तव वासनांचा त्याग केल्यानें तो क्षीण होतो व त्याच्या क्षयानें जीव तत्काल तत्पद होतो. वासनामुळें तो अतिशय परिपुष्ट होतो, व नाना योनींतून भ्रमण करतो. अर्जुना, वर सांगितल्याप्रमाणें इंद्रियशक्तींना घेऊन जीव देहांतून निघून गेला असता शरीर निश्चेष्ट होऊन पडतें, नंतर अग्नि, जल, वायु इत्यादिकांच्या परिणामानीं तो अदृश्य होतो. शरीर निश्चेष्ट झालें आहे, असें पाहूनच लौकिकांत हा मेला, असें म्हणतात. अर्थात् देह मरतो व जीव त्यातून निघून जातो. नंतर प्राणाकार झालेला जीव चिदाकाशांतील अथवा भूताकाशांतील ज्या ज्या देह, देश, काल किंवा भोग्याकारांत राहतो, तेथें तेथें वासनेप्रमाणें आकाराचा अनुभव घेतो. कोणताही जीव आपल्याच देहनाशाचा साक्षात द्रष्टा होत नाहीं; तथापि इतरांच्या मृत शरीरांकडे पाहून त्याला आपल्या देहनाशाची कल्पना होते. यास्तव अर्जुना, तू, देह नाश पावतो व तोच असत् आहे. आत्मा नाश पावत नाहीं, तर तो देहाला सोडून जातो; यास्तव तो सत् आहे, असें समज. अथवा निद्रित पुरुषाप्रमाणें तूं, देह, त्याचा नाश व त्याचें असत्त्व यांतील कांहींच पाहूं नकोस. जीव

आकारांना जसा पाहतो तसाच त्यांच्या नाशालाही अवलोकन करतो. हें सर्व जड अगदीं आरंभापासूनच पूर्व पूर्व वासनांनीं कल्पिलेलें आहे. उत्पत्तिसमयीं वस्तु ज्या रूपाने व धर्मानें भासते त्याच रूपानें ती कल्प-पर्यंत राहते. अर्थात् जग हा प्राक्तनवासनांचा विलास आहे. पण त्या वासनामूलाला पुरुषार्थानें जिकता येतें व काळचा दोष आजच्या शुभ आचरणानें निवृत्त होत असल्याचे प्रत्यक्ष अनुभवास येत असल्यामुळें तसें होणें अनुपपन्नही नाहीं. ज्या ज्या पुरुषार्थाविषयीं विशेष आग्रह असतो त्या त्या करिता पुरुषाचा दृढ प्रयत्न होतो आणि त्यामुळें दुसरे सर्व प्राक्तन भाव क्षणांत कुंठित होऊन राहतात. यास्तव विंध्याद्रि जरी दुभंगला व प्रळयवायु वेगानें वाहू लागला, तरी बुद्धिमानानें यथाशास्त्र आचरण ( शास्त्रीय पौरुष ) सोडू नये. कारण तें केवळ मद केल्यासही पूर्ववासनावैचित्र्यामुळें प्राप्त होणारी सुखदुःखपरंपरा सर्वथा दुर्वार होईल.

**अर्जुन**—प्रभो, जगाच्या स्थितीला कारण होणाऱ्या या जीवाला नरक; स्वर्ग, जन्म इत्यादि अनर्थांत कां पडावें लागतें ?

**श्रीभगवान**—बाबारे, ते सर्व भाव स्वप्नतुल्य आहेत. एवढ्यासाठींच वासनाक्षय संपादन करावा. कारण दीर्घ अभ्यासामुळें अतिशय वाढलेल्या व संसारभ्रम देणाऱ्या वासनेचा नाश केल्यावांचून हित होणें शक्य नाहीं.

**अर्जुन**—देवेशा, ही वासना कोठून उत्पन्न झाली आहे ? व तिचा क्षय कसा होईल ?

**श्रीभगवान्**—वासना आत्म्याच्या अज्ञानापासून उत्पन्न झाली आहे. अनात्म्याला आत्मा समजणें हें तिचें व्यक्तरूप आहे. ती आत्मज्ञानरूपी महाबोधानें क्षीण होते. अर्जुना, तुला विचारामुळें आत्मस्वरूपाचा परि-चय झाला आहे. तुला सत्य वस्तूंचें ज्ञान झालें आहे. यास्तव तू आतां ' हा मी ' व ' हे लोक ' ही वासना सोड.

**अर्जुन**—पण, प्रभो, लिंगशरीर वासनामय असल्यामुळें, व जीव त्यांतील प्रतिबिंब असल्याकारणानें वासनाक्षय झाला असता जीवाचाही क्षय होणार ! म्हणजे तत्त्वज्ञान जीवाच्या कल्याणाला कारण न होतां त्याच्या अनर्थालाच कारण होतें, असें म्हणावें लागणार !! शिवाय जीवा-

चाच क्षय झाल्यावर परमानंदाचा आविर्भाव व अनर्थांची परम निवृत्ति या लक्षणानें युक्त असलेला मोक्ष कोणाला मिळणार ?

**श्रीभगवान्**—अर्जुना, जीव खरोखरच जर कोणी पृथक् पदार्थ असता तर तुझी ही शंका बरोबर झाली असती. पण तो परमार्थतः ब्रह्मच असून आपल्याच मिथ्या मायेनें आच्छादित होऊन स्वस्वरूपास विसरतो. व जगत्, जीव इत्यादि कल्पना करून ससार करतो. पुढें तोच शास्त्रीय श्रवणादि प्रयत्नानें आपलें तत्त्व जाणून वासनेसह अविद्येचा विध्वंस करून आपल्या स्वभावांत राहतो. हीच मुक्ति होय. सारांश, वासनात्याग हीच मुक्ति असल्यामुळें त्यात जीवाची हानि कांहीं नाहीं. उलट लिंगशरीरानें परिच्छिन्न झालेलें आपलें मर्यादित स्वरूप सोडून अमर्यादित ब्रह्म होणें ही त्याची महावृद्धिच आहे. वासनावान् जीव पिंजऱ्यातील पक्ष्याप्रमाणे सदा बद्धच असतो. सारांश, ज्याच्या हृदयात सूक्ष्म वासनाही स्फुरण पावत नाहीं तोच मुक्त व वासनाध्वंस हाच बधच्छेद आहे.

**सर्ग ५६**—जीवन्मुक्तिप्रतिष्ठा, चित्सत्तत्व व जगद्रूप मनश्चित्र.

**श्रीभगवान्**—अर्जुना, तूं याप्रमाणें वासनारहित हो. म्हणजे जीवन्मुक्त स्थितीस पोंचशील. आतल्याआंत शीतळ होऊन बंधूंच्या वधाचें दुःख सोड. जरा व मरण याविषयीं निःशंक हो. आपलें चित्त आकाशाप्रमाणें निर्मळ ठेव. इष्टानिष्टसंकल्प सोड. आणि निःस्पृह हो. शिष्टव्यवहार-परपरेनें प्राप्त झालेलें कार्य तूं कर. त्याच्यायोगानें तुझ्या तत्त्वबोधाची कांहीं हानि होणार नाहीं. कारण प्राप्तकर्म निर्विकार चित्तानें करणें, हाच जीवन्मुक्ताचा स्वभाव आहे व हीच जीवन्मुक्तता आहे. मी हें कर्म सोडतों व हें करतों, असा निर्णय हेंच मूढाच्या मनाचें रूप आहे. पण ज्ञान्याची स्थिति समान असते. प्रवाहप्राप्त कर्म करणारे शांतचित्त जीवन्मुक्त सुषुप्तिस्थ असतात. कूर्माच्या अगाप्रमाणें ज्याचीं इंद्रियें विषयांपासून एकदम निवृत्त होऊन स्वभावतःच हृदयांत स्थिर होतात, त्याला हें सर्व जगत्रय अंतराळीं काढलेल्या चित्रासारखें दिसतें. चित्तरूपी चितान्यानें आकाशांत आकाशरूप असें हें सुंदर चित्र रेखाटलें आहे. नंतर त्या आकाशालाच त्यानें चित्राची आधारभूत भिंत केली आहे. वाहवारे भ्रम! खरोखर ही रचना अपूर्व आहे. या सृष्टींत

मायेची पराकाष्ठा झाली आहे. ती गवत, भिंत इत्यादि प्रकारची अतिशय असार असली तरी अज्ञांना शुभ वाटते. या जगच्चित्रांत आणखी एक आश्चर्य आहे, तें पहा. व्यावहारिक चित्रामध्यें चित्राहून त्याचा आधार ( भिंत, कागद, वस्त्र इत्यादि ) निराळा असतो. पण या चित्तकृत चित्रांच्या ज्या आकाशादि भिंति दिसत आहेत, त्यांच्यामध्यें आधार-आधेय-भाव जरी भासत असला तरी त्या सर्व मनोमय असल्यामुळें त्यांच्यामध्यें वस्तुतः थोडासाही भेद नाहीं. अर्जुना, त्या मनाच्या चित्ररचना अत्यंत असत् आहेत. स्वप्नांत एकक्षणांत ज्याप्रमाणें चित्तामध्यें नव्या त्रिभुवनाचा उदय व क्षय होतो, त्याप्रमाणेच आत्मा, मन, जगत् इत्यादि सर्वांचा उदयादि परिणाम मनात होतो. वास्तव हें सर्व शून्य आहे. तथापि दीर्घ मनोराज्यामुळें लोकाना तें सत्य असल्याचा भास होतो भ्रमामध्यें सत्यत्व नसतें व त्याच्या कारणाचें ज्ञान होण्यापूर्वी असल्यासारखें वाटणारेंही तें तत्त्वदर्शनानें नाहींसें होतें. याप्रमाणें मनश्चित्र भ्रांतिमात्र असल्यामुळें बंधुवधादिकांकरितां शोक करणें तुला योग्य नव्हे. मन असत् मनोराज्य करण्यास जसें समर्थ आहे तसें तें एका क्षणाला कल्प व कल्पाला क्षण करून दाखविण्यासही समर्थ आहे. तेंच असत् वस्तूला सत् करीत असतें. पण ही सर्व सृष्टि अशी मनःकल्पित असल्यामुळेंच, ती अज्ञाला दुरुच्छेद्य वाटली तरी, सुज्ञाला सुच्छेद्य वाटते. कारण जी वस्तु खरोखरच असते तिचा निरास करतांना प्रयत्न करावा लागतो; पण जी मुळीं नसतेच तिच्या निरासाला प्रयत्न कसला ? काय चमत्कार सांगावा, या मन नांवाच्या चिताऱ्यानें हें जग ( अनेक विचित्र वर्ण, आकार, नांवें, जाति, इत्यादिकांच्या योगानें ) अगदींच विचित्र निर्माण केलें आहे. त्यांत अनेक आबालवृद्ध स्त्री पुरुष जीव दाखविले आहेत. त्यांचे नानाप्रकारचे शुभ व अशुभ व्यवहार चालले आहेत. प्रवृत्ति व निवृत्ति यांच्या योगानें ब्रह्मदेवापर्यंत सर्व शरीरधारी चेष्टा करीत आहेत. सर्वत्र विक्षेप व दुःख पसरलें आहे. शांति व सुख नाहीं. हाय, हाय, असल्या या काल्पनिक व मायिक जगांत आसक्त होऊन स्वात्म्याला दुःखरूपी खड्ड्यांत लोटण्यांत काय अर्थ आहे ? अर्जुना, चित्तानें हें सर्व अद्भुत चित्रकर्म

केलें आहे. तें एक विलक्षण चित्रकार आहे. यास्तव मित्रा, तूं त्यालाच प्रतिबंध कर. तेंच या सर्व अनर्थांचें निमित्त आहे ९६.

**सर्ग ५७**—निर्वासन मन होण्याचा उपाय.

**श्रीभगवान्**—अर्जुना, जग हें केवढें आश्चर्य आहे, तें मी तुला सांगितलें. तें निराधार मनःकल्पित चित्र आहे. भोपळा पाण्यांत बुडावा व शिला तरावी त्याप्रमाणें ही माया उद्भवली आहे. तेव्हां तूं व्यर्थ अहंता कशाला करतोस. आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें ब्रह्माच्या ठिकाणीं राहणाऱ्या याला वस्तुतः तोडतां, फोडतां येत नाहीं; पण वासनाच्या अभावानें त्याचा बाध करितां येतो. आत्मबोधामुळें तुझ्या वासनाचा अभाव झाला असावा, असें मला वाटतें. जो सर्वधर्मपरायण असूनही वासनारहित असत नाहीं, तर वासनावान् असतो तो सर्वज्ञ असला तरी पिंजऱ्यातील सिंहाप्रमाणें बद्ध होतो. ज्याच्या चित्तांत थोडेंसेंही वासनाबीज असतें त्याला फार मोठ्या संसारभरण्याचा अनुभव घ्यावा लागतो. पण अभ्यासाच्या योगानें हृदयांत रूढ झालेल्या सत्य ज्ञानाग्नीनें दग्ध झालेलें वासनाबीज पुनः उत्पन्न होत नाहीं. कारण ज्याच्यातील वासनाबीज जळलें आहे असें मन सुखदुःखादिकांत निमग्न होत नाहीं. यास्तव अर्जुना, तूंही शांतचित्त, निर्भय, निरिच्छ व अविवेकशून्य होऊन, माझा हा गीताख्य उपदेश चांगला समजून घेऊन व एक शांतिरूप धारण करून आत्म्यामध्यें सुखानें रहा ५७.

**सर्ग ५८**—तत्त्वज्ञानानें अविद्येसह वासनेचा क्षय होण्याचा संभव; अर्जुनाची कृतकृत्यता.

**अर्जुन**—भगवन्, या उपदेशानें माझा मोह नष्ट झाला आहे. मला माझ्या स्वरूपाची स्मृति झाली आहे. तुझ्या प्रसादामुळें मी निःसंदेह झालों आहें. आतां मी तुझ्या सांगण्याप्रमाणें आचरण करीन.

**श्रीभगवान्**—अर्जुना, तत्त्वबोधाच्या योगानें हृदयांतील रागादि वृत्ति जर सर्वथा शांत झाल्या तर लागलेंच चित्त वासनासह शांत झालें आहे, तें सत्त्व बनलें आहे, असें तूं जाण. या सत्त्वावस्थेंत जें प्रत्यक्चेतनरूप असतें तेंच सर्वव्यवहारशून्य झालें असतां ब्रह्म होतें. तें सर्वतः व सर्व आहे. त्याला नेत्रादिक इंद्रियें व अज्ञ जन जाणत नाहींत. तें प्रत्यक-

चेतन सर्व क्षेत्रांना प्रकाशित करणारें, शुद्ध, संकल्पशून्य, कोणत्याही प्रमाणांचें अविषय, व नेत्रापासून फार दूर आहे, असें जाण. त्याच्या दर्शनाचा उपाय एकच आहे व तो-श्रवणादिकाच्या क्रमानें निदिध्यासनाख्य भावना दृढ करणें हाच आहे. ज्याची प्राप्ति झाली असता घट-पटादि हे सर्व पदार्थ क्षीण होतात त्या परम पदीं ही बिचारी वासना काय करणार ? अग्नीच्या ढिगावर पडलेला दंवाचा बिंदु जसा तत्क्षणीं नष्ट होतो, त्याप्रमाणें शुद्ध चित्तत्त्वापाशीं पोचताच अविद्या लीन होते. भोगबंधन देणारी पण धुळीच्या कणासारखी तुच्छ वासना कोठें व सर्व जगत्संघास भरून उरणारी चित् कोठें ? शुद्ध आत्म्याचें ज्ञान होई तोंच ही नाना आकारांनीं विकार पावणारी अविद्या स्फुरण पावते. पण त्या आत्मरूप सर्वव्यापी पदामध्यें सर्व दृश्यदृष्टि क्षीण होऊन स्वच्छता उदय पावली म्हणजे मग अविद्येचा कोठें थागही लागत नाहीं. तें तत्त्व समग्र-आकाररूप असून सर्वाकाररहितही आहे. त्याचें वाणीनें उच्चारण करिता येत नाहीं. तेव्हा त्याला उपमा कशी व कोणाची देणार ? यास्तव बा अर्जुना, तूं विषयविषाचा त्याग करून, अहंवासना सोड, व इष्टाचा ( कामाचा ) परिहार करणें, या मंत्रयुक्तीने संसारबंधनरहित होऊन अभयस्वभाव भगवान्च हो.

**श्रीवसिष्ठ**—भगवानाचें हें उपदेशामृत ऐकून तृप्त झालेला अर्जुन कांहीं वेळ मौन धरून राहील व शांतीचा पूर्ण अनुभव घेऊन पुनः असें म्हणेल.

**अर्जुन**—भगवन्, माझी ही मति सर्वशोकभाररहित झाली आहे. तुज लोकरक्षकाच्या वचनानें मला चांगलेंच प्रबुद्ध केले आहे.

असें बोलून व उठून गांडीवधन्वा पांडव रण करावयास सिद्ध होईल व हरि ज्याचा सारथि आहे असा तो कुंतीचा तिसरा पुत्र निःसंदेहमनानें रणलीला करील. तो महावीर शत्रूंचे घोडे, गज, रथ, व पदाति यांना आपल्या तीक्ष्ण व दोन्ही हातानीं सोडलेल्या बाणांनीं मारून पाडील. रणभूमीस रक्तानें रंगवील. मांसाशन करणाऱ्या पशुपक्ष्यांस बलिदानानें तृप्त करील व विजय मिळवून आपली अक्षय कीर्ति त्रिभुवनभर पसरून सोडील ५८.

अर्जुनाख्यान समाप्त.

---

**सर्ग ५९—जीवन्मुक्तपदीं मुक्तचित्स्थिति स्थिर कशी होईल ?**

**श्रीवासिष्ठ**—राघवा, तूंही या दृष्टीचा आश्रय करून निःसंग व ब्रह्मार्पणमयरूप होऊन रहा. स्थितिसमयीं ज्याच्या आधारानें हें जग राहतें. सृष्टिकाळीं ज्याच्यापासून हें सर्व होतें व संहारप्रसगीं हें सर्व ज्याच्यामध्यें जाऊन मिळतें, त्याचप्रमाणे जो सर्व अनित्य प्रपंचमय असूनही नित्य पर असतो त्याला तूं आत्मा जाण. सर्व प्रपंचाहून अगदीं विलक्षण व प्रपंचाच्या बाहेरही असल्यामुळे अति दूर असणारा तो सर्वांचा अंतर्यामी असल्यामुळें अगदीं समीपही आहे. तसाच तो आकाशाप्रमाणें सर्वग असला तरी जातीप्रमाणें प्रत्येक वस्तूमध्यें पूर्ण आहे. याप्रमाणें सर्वप्रकारें तेंच एक आहे. दुसरें काहीं नाहीं, असें सिद्ध झालें असता तूं परिच्छिन्न ( मर्यादित ) रूपानेंही त्याच्यामध्यें राहतोस. म्हणून तूं तत्स्थ आहेस, म्हणजे त्याच्या सत्तेनेंच सत्तावान् होतोस. स्वतंत्रतेनें नाहीं. मग असें जर आहे तर ‘ मी हा इतराहून निराळा आहे ’ असा मर्यादित अभिमान कशाला करतोस ? तो सोड. कारण तूं तोच अपरिच्छिन्न सन्मात्र आहेस. विवेक्यांना चिदात्म्याचें रूप दोन प्रकारचे भासतें. एक चित्त व चित्तवृत्ति यांत प्रतिबिंबित झालेलें व दुसरें चित्त, त्याच्या वृत्ति, विषयांचे उत्पत्ति—विनाश इत्यादि सर्व अवस्थांचें साक्षि. यातील पहिलें विषयप्रकाशनरूप व चित्तनिर्मित असतें आणि दुसरें संविद्रूप व अनिर्मित असतें. तेंच त्रिपुटीरहित झालें, कीं परम पद होतें. तीच पराकाष्ठा आहे. तीच सर्व दृष्टींतील उत्तम दृष्टि आहे. तोच सर्व महिम्याचा महिमा आहे. तोच सर्व गुरूंचा गुरु, तोच आत्मा, तेंच विज्ञान, तेंच शून्य, तेंच परब्रह्म, तेंच कल्याण, तोच शांत शिव, तीच विद्या, व तीच परा स्थिति होय. हा जो आतील सर्वानुभवात्मक आत्मा व ज्याच्या सत्तेनें इतर द्रव्यें सत्तावान् होतात तो या जगद्रूपी तिळांतील तेल, जगद्रूपी गृहातील दीप, जगद्वृक्षांतील रस व जगद्रूपी पशूंचा पालक आहे. भूतें हींच मोत्यें असून त्यांतील तो तंतु आहे. तो सर्वांच्या हृदयाकाशांत ओंवलेला आहे. तो भूतरूपी असंख्य मिरच्यांतील एक तिखटपणा आहे. तो पदार्थांतील पदार्थत्व आहे. तो अत्युत्तम तत्त्व आहे. तो सत् वस्तूचें सत्त्व व अभावासारख्या असत् वस्तूचे स्वतः असत्त्व आहे. तो आपल्याच तात्त्विक-

रूपानें विचित्रबोधाच्या द्वारा आपल्यालाच पाहतो. सर्व जगद्भाव अविचारानें सुंदर भासतात. ते अविद्यमान असतानाही विद्यमान असल्यासारखे वाटतात. पण विचार केला असता त्यांचा क्षय होतो. आत्म्याला इयत्ताच नाहीं. कारण तो आदि-अंतरहित आहे; असा आतल्या आंत निश्चय ठेवून जीवन्मुक्त बाहेरील व्यवहार हर्षविषादरहित होऊन करीत असतो. त्याचें सम ब्रह्मामध्यें समरूपानें स्थित असलेलें मन व्यवहारसमयीं उदय पावत नाहीं व अव्यवहारदशेंत अस्त पावत नाहीं. ज्याचें चित्त आकाशाप्रमाणें निर्मल असतें तोच महात्मा होय. आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें तो जात, येत, बोलत असला तरी वस्तुतः काहीं करीत नाहीं. ज्याच्या हृदयात मानापमानादिजन्य दुःख थोडेंसेंही नसतें तो मुक्तिभाक् होय. जगत् हा चित्‌चा चमत्कारच आहे. जीव, इंद्रियवृत्ति, विषय इत्यादि सर्व सोन्याच्या कड्याप्रमाणें, चितीहून पृथक् नाहींत. चित्त हाच चितीचा स्पंद असून तिचा अबोध हाच संसार आहे. पण बोधानें त्याचा विलय झाला असता रामा, शुद्ध चित् राहते. आत्म्याचा नुस्ता साक्षात्कार होतांच भोगवासना क्षीण होते. भोगांची भावना न करणें हेंच श्रेष्ठ ज्ञत्व ज्ञानिपणा आहे. यास्तव ज्ञानी पुरुषाला स्वभावतःच भोग आवडत नाहींत. कारण सुग्रास भोजन करून अगदीं तृप्त झालेला पुरुष कदन्नाची इच्छा कशी करील ? यास्तव स्वभावतःच भोगांची इच्छा न करणें, हेंच ज्ञत्वाचें लक्षण आहे, असें जाण. जो प्राप्त भोगाचा भोगही बुद्धिपुरःसर संकल्पपूर्वक घेत नाहीं तोच बुद्धिमान् होय. कारण भिंतीवर डोकें आपटलें असतां रडणाऱ्या बालकाची समजूत घालण्याकरितां, एकादा वृद्ध व ज्ञानी पुरुषही जसा त्या भिंतीला काठीनें मारतो, त्याप्रमाणें ज्ञानी अज्ञाकरितां विहित कर्मे करतो; पण ती त्याची वृथा चेष्टा होय. कृत्रिम बुद्धीवांचून सिद्धि मिळत नसते. हानि करणारें, चित्तात मळ उत्पन्न करणारें कर्म आत्मसिद्धीस कारण होत नाहीं. यास्तव स्वसिद्धीकरिता करावयाचें कर्मही शास्त्रविहितच असलें पाहिजे. म्हणजे त्यापासून आत्मबोध परिपुष्ट होऊन शिवाय लोकसंग्रह होतो.

एका चित्‌चाच हा सर्व विलास असल्यामुळें बंध व मोक्ष हे भिन्न पदार्थ नाहींत. कारण मोक्ष आहे, इतकें म्हटल्यानेंही आत्म्याच्या

पूर्णतेचा क्षय होतो. संकल्प करणें या शब्दाला व त्याच्या अर्थाला कारण होणारा जो महाचितीचा स्पंद तो बंध, मोक्ष इत्यादि भावांस योग्य आहे. पण तो कोण आहे म्हणून विचार करूं लागलें असतां क्षीण होतो. आणि नुस्त्या विचारानेंच निराधार अहंभाव शांत झाला असतां कशाच्या योगानें कोणाचें काय बद्ध होतें व काय मुक्त होतें हें आम्हांस समजत नाहीं. संकल्पच सर्वकारण असल्यामुळें त्याचा अभावच सर्वांच्या नाशाचें कारण आहे. सर्वांचा नाश चित्-हून पृथक् नाहीं. म्हणूनच या दृश्यमय दीर्घ स्वप्नामध्यें नाना अवस्थांचा अनुभव घेत असतानाही ज्ञानी मोहित होत नाहीं. यास्तव पुरुषानें कितीही निवारण केलें तरी ज्याच्यामध्ये सतत जगदाकार उपलब्ध होत असतात सर्व कल्पना ज्याच्यामध्यें गळतात, व ज्याच्यामुळेंच आनंदाचा स्वाद घ्यावयास सांपडतो, त्या प्रत्यगात्म्यालाच आतल्या आंत ध्यानानें जाण रामा, तूं त्याचाच साक्षात्कार करून घे ५९.

**सर्ग ६०**—अद्वितीय आत्म्याचीच सर्वाकाराने स्थिति व विभूति.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, अशा प्रकारचें तें आद्य, पर व चिद्घन तत्त्व असून ब्रह्मा, विष्णु, हर इत्यादि हे महारूप देव त्याच्यामध्येंच स्थित आहेत. मानुष आनंदाच्या परम कोटीस पोंचलेल्या राजाप्रमाणें सर्वोत्तम विभूतींनीं स्फुरण पावणारे ते आकाशगमनादिक क्रीडानीं दीर्घकाल खेळतात. स्वर्गांतील स्वर्गवासी जनांप्रमाणें इतर जनही चिदानंदास प्राप्त होऊन वस्तुतः मरत नाहींत व शोक करीत नाहींत. बा रामा, फार काय पण त्या चिन्मयाला प्राप्त होऊन क्षुधा, तृषा इत्यादि जीवनास निमित्त होणाऱ्या भावांनींही ते पीडित होत नाहींत. त्याचप्रमाणें त्या अपार परमाकाशरूपी परमात्म्याला भिंत, वृक्ष इत्यादि कोणी प्रतिबंध करूं शकत नाहीं. रामा, तूं तें सत्तासामान्यरूप एक क्षणभरही जरी मनात आणलेंस तरी तू एका निमेषांतच मुक्तमन मुनि होशील. व संसारकर्में करीत असतांनाही पुनः संतप्त होणार नाहींस.

**श्रीराम**—भगवन्, मन, बुद्धि इत्यादि सर्व द्वैत जेथें क्षीण झालें तें निर्विशेष आभान पूर्ण चिन्मात्रच आहे व तेंच सत्ता सामान्य होय, असें

तुम्ही म्हणतां, कीं मन आदि सर्व विशेषवान् व सर्वात्मा ईश्वर आहे, असें आपलें म्हणणें आहे ?

**श्रीवसिष्ठ**—जें सर्वदेहस्थ ब्रह्म तेंच खातें, पितें, बोलतें, घेतें, सुषुप्ति व प्रलयसमयीं सर्वांचा संहार करतें व तुरीयावस्थेंत विषयवर्जित संविन्मात्र राहतें. तेंच सर्वगत आदि-अंतरहित, सत्तासामान्य व सर्व वस्तूचें तत्त्व आहे. तें आकाशांत आकाशत्वानें, शब्दांत शब्दत्वानें, स्पर्शांत स्पर्शत्वानें, त्वचेंत त्वक्तेनें, रसांत रसतेनें, रसनेंत रसनात्वानें, रूपांत रूपतेनें, नेत्रांत दृक्शक्तीनें, शरीरांत शरीरतेनें, मनांत मनतेनें, वृक्षांत वृक्षतेनें, स्थावरांत स्थावरतेनें, अमरांत अमरत्वानें, मानवांत मानवत्वानें, व अशाच रीतीनें जगांतील सर्व पदार्थांमध्यें त्याच्या त्याच्या भावरूपानें राहिलें आहे. त्यामुळें तो परमेश्वर सर्व पदार्थांत अभिन्न आहे. पदार्थांचें नानात्व खरें नसून कल्पित आहे. यास्तव सर्वत्र राहणाऱ्या चिद्रूप व निरुपद्रव अशा मीं हें सर्व विविध विलासानीं व्यापलें आहे, असें समजून, हे महात्म्या, तूं शांतचित्त होऊन सुखानें रहा.

**श्रीवाल्मीकि**—वसिष्ठ इतकें बोलत आहे तों दिवस मावळला व श्रोते सायंतन विधीकरितां निघून गेले. आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं नेहमींप्रमाणे दिनकृत्यें आटोपून पुनः सभेंत श्रवण करावयास आले ६०. ( दिवस १६ वा ).

**सर्ग ६१**—युक्तीनें जग स्वप्न व मायामय आहे, असें प्रतिपादन.

**श्रीराम**—भगवन्, हें जग आमच्या स्वप्नांतील नगरादिकांप्रमाणें जर आहे, ब्रह्मदेवादिकांचा शरीरपरिग्रहही जर तसाच आहे व हें सर्व जर मिथ्याच उत्पन्न झालें आहे तर आम्हालाच मात्र त्याविषयीं हें सत्य आहे असा दृढतर प्रत्यय कसा येतो ? व ब्रह्मादिकांला तसा का येत नाहीं ?

**श्रीवसिष्ठ**—एकाद्या वस्तूची अबाधितपणें दीर्घकाल प्रतीति येणें, हेंच ती वस्तु सत्य आहे, असें वाटण्याचें कारण असून, बाधित होणें हें तिच्या असत्यतेचें कारण आहे. जेव्हां ब्रह्मा पूर्वी उपासकावस्थेंत होता. त्यावेळीं त्याला तत्त्वज्ञान झालेलें नसल्यामुळें आम्हाला हल्लीं जसा हा सर्ग सत्य वाटत आहे तसाच त्यालाही वाटत होता. पण आतां तत्त्वज्ञानानें तो बाधित झालेला असल्यामुळें खरा वाटत नाहीं. अज्ञान असेपर्यंत

चिति सर्वगामी असल्यामुळें सर्व जीव होतो. व सर्वत्र संसार सत्यसा भासतो; पण ज्ञानानें तो भ्रम नाहींसा होतो. म्हणून प्रजापतीच्या तत्त्वज्ञानानें बाधित झालेला व म्हणूनच स्वप्नतुल्य असलेला असा जो हा प्रपंच-प्रतिभास उठला आहे तोच आमच्या अहंताप्रत्ययाशीं एकरूप होऊन अति दृढ झाला आहे. तर मग जागें होताक्षणींच स्वप्न जसें बाधित होतें त्याप्रमाणें प्रजापतींनीं आपणच होऊन कल्पिलेल्या प्रपंचाचा तत्त्वबोधानें सत्वर नाश का होत नाहीं ? म्हणून विचारशील तर सांगतों—तत्त्वबोधाच्या बळानें प्रत्येक ब्रह्मदेवाला त्रिभुवन मिथ्या आहे, असें वाटत असतें. पण भोक्त्या जीवांच्या भोगाकरिताच त्यानें त्याला कल्पनेनें निर्माण केलेले असल्यामुळें जीवाचें कर्म क्षीण होईतों त्याला त्याचा संहार करिता येत नाहीं. आणि त्यामुळें सृष्टि एक कल्पभर अव्याहतपणें चालते. आम्हाला ज्ञान नसल्यामुळें ती खरी वाटते व ज्ञानी ब्रह्मदेवाला ज्ञानी मुक्ताप्रमाणेंच स्वप्नप्राय भासते. यास्तव स्वप्नपुरुषापासून जें झालें तें स्वप्नपुरुषमयच होय. आम्रादि बीजच फळरूप होतें, हें प्रसिद्ध आहे. अर्थात् असत्य मनःपुरुषानें साधलेले हें असत्य आहे, असें ठरलें. यास्तव हें जग स्वर्ग, नरक इत्यादि सप्रयोजन क्रिया करण्यास समर्थ असलें तरी त्याविषयीं दृढ सत्यत्वभावना करणें युक्त नव्हे. आम्हांला भासणारें स्वप्नादिक त्या त्यावेळीं खरेंच वाटत असतें. पण तेवढ्यावरून त्याला सत्य म्हणणें युक्त नव्हे. तसेंच सृष्टिसमयीं ( जाग्रतींत मात्र ) सत्य भासणाऱ्या या जगालाही सत्य म्हणणें अयुक्त होय.

रामा, प्रजापतीचा सर्ग दीर्घकाळ राहतो ही गोष्ट मान्य करून मी हें वरील समाधान तुला सांगितलें आहे. पण वस्तुतः त्याचें दीर्घत्वही हरिश्चंद्राच्या स्वप्नाच्या दीर्घत्वाप्रमाणें थोड्या वेळांत सुद्धा होऊं शकतें. पण दृश्याची प्रतीति चित्च्या अधीन आहे. म्हणून तें मिथ्या आहे, असें आम्ही म्हणतों. कारण ज्याची सिद्धि सर्वस्वीं दुसऱ्याच्या अधीन त्याला खरें म्हणून कसें चालेल. यास्तव सर्व दृश्य द्वैत मिथ्या आहे, तें असत् आहे; पण असत् असलें तरी स्वप्नव्यवहाराप्रमाणें व्यवहार होऊं शकतो. यास्तव या स्वप्नतुल्य प्रपंचाविषयीं उगीच प्रश्न करीत बसणें उचित नव्हे. भ्रमानें संभवत नाहीं, असें काहीं नाहीं. त्रैलोक्यात विचित्र वस्तुदृष्टि आमच्या

अनुभवास येत असतात. जलांत वडवाग्नीसारखा अग्नि जळतो, आकाशांत नगरें दिसतात, हिमालयावरील वृक्षांप्रमाणें शिलांतून कमलें उद्भवतात. कल्पतरूसारख्या एकेक वस्तूमध्येंही सर्व पुण्यें आढळतात. चिंतामणीसारखे पाषाणही वृक्षाप्रमाणें विविध फलें देतात. शिलेच्या उदरांत बेडूक इत्यादि प्राणी असतात. चंद्रकान्तपाषाणांतून जल गळतें, स्वप्नवृत्तींत एका क्षणांत घट असतो तो पट होतो. स्वप्नात आपल्या असत्य मरणाचाही प्राणी अनुभव घेतो. अंतरिक्षांत अकस्मात् विपुल जल निर्माण होतें, मंदाकिनी अंतरालीं प्रवाहरूपानें वाहते. याप्रमाणें आणखी असंख्य असंभाव्य गोष्टीही या मायिक जगात सत्य असल्यासारख्या साक्षात् अनुभवास येतात; पण मोक्ष उत्पन्न होवो, ब्रह्माचा नाश होवो, प्रपंच सत्य असो; भोग नित्य राहोत, वेद अप्रमाण होवोत इत्यादि कोणी कितीही जरी सत्यसंकल्प केले तरी ते सफल होत नाहींत. कारण ते मिथ्या नसून सत्य आहेत. यास्तव त्याच्यामध्यें अन्यथाभाव उत्पन्न करण्याचें सामर्थ्य संकल्पाच्या अंगीं नाहीं. बाकी अतिविस्तृत चंद्र टीचभर दिसणें, आकाशांत धूमकेतूसारखे उत्पात आढळणें, इत्यादि दुसरेही अनेक विचित्रारंभ भासतात; पण ते खरे नव्हेत. कारण त्यांचे स्वरूप एक नाहीं. क्षणोक्षणीं बदलणारें आहे. आत्मदृष्ट्या पाहिल्यास या जगात सत्य नाहीं, असें काहीं नाहीं व पदार्थदृष्ट्या पाहिल्यास मिथ्या नाहीं, असें काहीं नाहीं. पण जीव या सत्यअसत्याचें मिश्रण करून दृश्य आकारच सत्य आहेत, असें मानतो व व्यर्थ मोहित होतो. ६१.

**सर्ग ६२**—जीवटाख्यान, विचित्र वासनायोगाने नाना देहांची प्राप्ति.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, याविषयीं मी एका मननशाली भिक्षूचा वृत्तांत सांगतों, तो ऐकः—समाधि-अभ्यासामध्यें तत्पर असा येथें कोणी एक महाभिक्षु होता. तो आपल्या आश्रमास उचित अशा श्रवण-मननादि व्यवहारानें सर्व दिवस घालवीत असे. समाधीच्या अभ्यासानें शुद्ध झालेलें त्याचें चित्त ज्या ज्या भावाचें चिंतन करीत असे तसें तसें तें एका क्षणात होत असे. एकदा समाधि सोडून उठलेला तो एकाग्र चित्तानें बसला होता. तों त्याच्या मनांत कांहीं क्रियेचा क्रम आला. चिंतन करितां करितां ‘ मी आता सामान्य जनवृत्तीची भावना सहज लीलेकरितां

करतों' असा त्यानें संकल्प केला. आणि लागलेंच त्याचें चित्त किंचित् भिन्न नरासारखें झालें. त्या चित्तनरानें आपल्याच वांछेनें आपलें जीवट असें नांव ठेवलें. नंतर तो जीवट स्वप्नपुरुष स्वसंकल्पानेंच निर्मिलेल्या एका नगरांतील मार्गांत दीर्घकाल विहार करीत राहिला. भ्रमर जसा कमलरस पितो त्याप्रमाणें त्यानें तेथें मद्यपान केलें. नंतर तो मत्त व लीलेनेंच अतिशय हृष्ट होऊन गाढ झोंप घेत पडला. इतक्यांत त्याला स्वप्न पडलें. त्यांत मी वेदाध्ययनानें संतुष्ट होणारा ब्राह्मण आहें, असें त्याला वाटलें. एकदा तो ब्राह्मण दिनकृत्यें करून स्वस्थ बसला असतां झोपीं गेला. कांहीं वेळानें त्याला स्वप्न पडलें. व मी राजा आहें, असा भास झाला. एकदा तो सामंत राजा भोजन करून स्वस्थ निजला, तों त्याला 'मी सम्राट् आहें' असें स्वप्नात भासलें. पण तो सम्राट्ही कांहीं वेळानें निद्रावश झाला. पण त्यालाही स्वप्न पडून आपण सुंदर अप्सरा झालों आहों, असा भास झाला. एकदां आपल्या प्रियाबरोबर रति करून श्रांत झालेली ती देवस्त्री गाढ निजली असता, 'मी हरिणी झालें आहें' असा स्वप्न-भ्रम तिला झाला. जिचे नेत्र अतिशय चंचल आहेत अशी ती हरिणी एकदां एका झाडाखालीं निजली. तों वेलींच्याच दृढ परिचयामुळें 'मी वेल आहें' असें तिला स्वप्न पडलें. विपरीत होणें, परिणाम पावणें, हा चित्तस्वभावच असल्यामुळें पश्वादि तिर्यक् जीवांनाही स्वप्नें पडतात. कारण पाहिलेल्या व ऐकलेल्या भावांचें म्हणजेच अनुभूत पदार्थांचें स्मरण होणें हा चित्ताचा प्रसिद्ध धर्म आहे. ती लता पुष्पें, पल्लव, फलें यानीं सुंदर शोभणारी झाली. वनदेवीच्या वनोद्यानातील लतेप्रमाणें विलास करूं लागली. तिनें एकदा आपल्या आतील सूक्ष्म संवेदनानें आपल्याला कोणी कापून टाकलें आहे, असें पाहिलें, व त्या दुःखानें ती मोहित झाली. पण त्या मोहनिद्रेंतच तिनें–आपण भ्रमर झाल्याचें–पाहिलें. तरुणीबरोबर जसा तिचा वल्लभ विहार करतो, त्याप्रमाणें तो भ्रमर वनातील लतांवरून व कमलांवरून विहार करूं लागला. प्रियेच्या अधरामृतपानाप्रमाणें तो पुष्पांतील मध मोठ्या आसक्तीनें पिऊं लागला. त्या मूर्खाला पुष्परसाचें व्यसनच लागलें. तो एका कमलिनीवर अतिशय आसक्त होऊन तिच्याच नालावर चिकटून बसला असतां एकदां त्या कमलिनीला तोडावयास एक

गज झाला. मूढांचा प्रयत्न नेहमीं रम्य वस्तूंचा नाश करण्यासाठींच होत असतो. त्या मत्त पशूनें भ्रमरासह नलिनीचा विध्वंस केला. दांताखालीं सांपडलेल्या तांदुळाप्रमाणें त्या बिचाऱ्याचें पीठ झालें. पण मरणसमयीं हत्तीला पाहून त्याचीच भावना केल्यामुळें तो आपल्याला महागंधहस्ती झाल्याचें पाहूं लागला. कांहीं दिवसांनी, जीव जसा अंधकारमय शून्य संसारांत पडतो त्याप्रमाणें तो गज त्याला धरण्याकरितां एका राजाच्या हस्तिपकांनीं तयार केलेल्या एका शुष्क खड्ड्यांत पडला. कांहीं दिवसानीं एकाद्या निशाचराप्रमाणे शत्रूंच्या महा सैन्याचा विध्वस करणारा तो मदोन्मत्त गज राजाला फार आवडूं लागला. पुढें एकदा एका युद्धांत तो शत्रूंच्या असह्य शस्त्राघातानीं मरण पावला. तो आपल्या गंडस्थलावर फिरणाऱ्या भ्रमरानां नेहमीं पहात असे. त्या संस्कारामुळें स्वतः भ्रमर झाला. तो वनलतावरून विहार करिता करिता पुनः पद्मिनीवर येऊन बसला. अज्ञपुरुषाच्या वासनाचा दुरभ्यास दुस्त्यज आहे. तेथें हत्तीच्या पायाखालीं चुरडून तो पुनः मेला व जवळच असणाऱ्या हंसाच्या संस्कारामुळें कलहंस झाला. अन्य हसाबरोबर विहार करीत तो बरेच दिवस राहिला. त्या हंससभेत ब्रह्मदेवाच्या हसाचें वर्णन त्याने एकदा ऐकलें. त्यामुळें त्याच्याविषयींचे दृढ संस्कार त्याच्या मनात बसले. कांहीं दिवसांनीं तो मेला व ब्रह्मदेवाचा हंस झाला. त्या शुभ जन्मात, ब्रह्मलोकीं एकसारख्या चालू असलेल्या विवेकी प्रजापतीच्या वैराग्यतत्त्वज्ञानादि उपदेशाच्या योगानें त्याला चांगला आत्मबोध झाला. त्यामुळें त्यानें लौकिक वस्तुदृष्टि सोडली, व तेथे जीवन्मुक्त होऊन राहिला. याप्रमाणें जिवंत दशेंतच जर त्याला निरतिशय मोक्षसुख प्राप्त झालें होतें तर युगांतसमयीं ब्रह्मदेवाबरोबर विदेहमुक्त होऊन त्याला आणखी अधिक काय साध्य करून घ्यावयाचें होतें ? कांहीं नाहीं. ६२.

**सर्ग ६३**—जीवट पुढें रुद्र झाला. त्याला पूर्वदेहाचे ज्ञान, त्याचें शतरुद्रत्व व ऐकात्म्य.

**श्रीवसिष्ठ**—पुढें कमलोद्भवाच्या कमलनालावर लीला करावयास सांपडल्यामुळें अतिशय प्रसन्न झालेला तो हंस एकदा ब्रह्मदेवाबरोबर रुद्रपुरास गेला. तेथें त्यानें रुद्राला पाहिलें. तेव्हा मी रुद्र आहें, अशी

याची मति झाली. त्याबरोबर त्यानें रुद्ररूपी होऊन प्राक्तन शरीराचा त्याग केला. नंतर तो त्या रुद्रभवनांत यथेच्छ विहार करूं लागला. अनेक गणानीं वेष्टित होऊन इतस्ततः भ्रमण करणाऱ्या त्याला अत्युत्तम ज्ञानविलासामुळें आपला सर्व पूर्ववृत्तान्त आठवला. ज्याचें शरीर आवरणरहित ज्ञान हेंच आहे असा तो भगवान् आपल्याच शेंकडों स्वप्नानीं विस्मित होऊन एकांतांत आपल्याशींच बोलला;—अहो, ही विश्वाला मोह पाडणारी विचित्र माया पसरली आहे. ती माळ भूमीवरील मृगजलाप्रमाणें असत्य असून सत्य असल्यासारखी भासते. अहाहा; मला आता सर्व आठवलें. प्रथम मी चित्-तत्त्व होतों. त्यानंतर मायेनें चित्त झालों. ( बहु व्हावें, या संकल्पवृत्तिरूप झालों ) संकल्पामुळेंच मी सर्व झालों. मी चिदंशात सर्वज्ञ व जडांशामध्यें गगनादि भूत—व शरीरादि—भौतिकरूप बनलों. नंतर भूततन्मात्रानीं रंजित होऊन जीव झालों. त्याच्या अनेक जन्मांतील एक शुभ जन्मांत अक्षुब्धचित्त भिक्षु झालों; पण त्या भिक्षूलाही आत्मज्ञान नव्हतें. म्हणून तो आसनावर देहादिकांना स्थिर करून बाह्य आकारामध्यें देवतादि भावना करून त्याची पूजा करीत असे. तो त्याच रम्य लीलेचा अनुभव घेत असे. पण वेल वसंतऋतूंत प्यालेलें जल ग्रीष्मऋतूंत जसें सर्वथा बाहेर टाकते, त्याप्रमाणें त्याचा पुढचा अनुभव रूढ झाला, कीं मागचा नाहींसा होत असे. असो; याप्रमाणें तो भिक्षु सिद्ध असूनही अशास्त्रीय मानसखेळात प्रवृत्त झाल्यामुळें अनर्थपरंपरेचा उदय झाला. अनेक भूच्छिद्रातून जशी मुंगी भ्रमण करते त्याप्रमाणें तो भिक्षु जीवट होऊन वासनेमुळें विविध जंतु बनला व अनेक योनींतून भ्रमण करीत राहिला. तो द्विजाचा मोठा भक्त असल्यामुळें प्रथम आपल्या ठिकाणीं द्विजत्वच पाहूं लागला. कारण बलवान् वासनासंघच वृद्धि पावत असतो. नंतर त्याला एकसारखी चिंतिलेली सामंतता प्राप्त झाली. कारण सतत प्यालेला रसच वृक्षामध्यें फलरूपानें परिणत होतो. राज्याकरिता अनेक धर्मकार्यें केल्याकारणानें तो सम्राट् झाला. पुढें तोच कामुकस्वभावामुळें देवस्त्री झाला. चंचल नेत्राच्या लोभानें ती देवस्त्री हरिणी झाली. हर! हर! वासनामोह प्राण्याना कसा दुःखद होतो, तो पहा. पुढें मृगी सदा मनांत असलेली वेल बनली. तिनें अवश्य प्राप्त होणाऱ्या छेदांचा अनुभव घेतला. तिला

चिर परिचित भ्रमराचा जन्म घ्यावा लागला. त्याचा हत्तीच्या पायाखाली चूर उडाला. याप्रमाणें मी महासंसारसंकटात वारंवार भ्रमण केलें. व शंभर जन्मानंतर आतां या मनोमात्रभ्रमरूप संसारभ्रमात रुद्र होऊन राहिलों आहें. याप्रमाणें अत्यंत विचित्र व अनेक संसार-अरण्य भूमीमध्यें मी व्यर्थ भटकत आहें. मी कधीं जीवट झालों, कधीं ब्राह्मणश्रेष्ठ झालों, कधीं राजा झालों; कधीं हंस व हत्तीही बनलों. याप्रमाणें मी देहयंत्रातील व मनोयंत्रांतील या दशेस प्राप्त झालों आहें. अगदीं प्रथम सृष्टींत मी परमानंदलक्षण परम-पदा-पासून च्युत झालों व या गोष्टीस आज सहस्रावधि चतुर्युगें झालीं फार दिवस संसारक्लेश भोगल्यावर मला उत्तम जन्म लाधला. त्यांत मी भिक्षु होऊन श्रवण-मननादि अभ्यासाची योग्यता संपादन केली. पण दुर्दैवामुळें माझ्याहातून प्रमाद घडला. मी जन्ममरणपरंपरेंत पडलों. आणि शेवटीं ब्रह्मदेवाचा हंस झालों. पण रुद्राचा संगम होतांच तो माझा प्राक्तन अभ्यास फलद्रूप होऊन रुद्रत्वास प्राप्त झालेल्या मला तत्त्वज्ञान झालें आहे. एवढ्या साठींच शास्त्रीय साधनाभ्यास श्रेष्ठ आहे. कारण तो अनेक विरुद्ध जन्माच्या योगानें अंतरला असला तरी पुनः उदय पावून पुरुषार्थास साधतो. अशास्त्रीय साधनाभ्यासालाही हाच न्याय लावता आला असता; पण अनायासानें घडलेल्या साधुसमागमानें जीवाचा अशुभ वासनाभ्यास निवृत्त होत असतो; पण—अशुभ वासनांप्रमाणें शुभ वासनाभ्यासही स्वतःच प्राक्तन संस्कारांपासून उद्भवेल. व त्याच्या बलानेंच हा पुरुष अशुभ वासनाचा त्याग करील. यास्तव त्याकरितां पुरुष-प्रयत्नाचें विधान करणें व्यर्थ आहे, असें म्हणशील तर सांगतों—वासनाजालाचा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाचा हा प्राक्तन शुभवासनाभ्यास कालांतरीं आपल्या उदयासाठीं पुरुषाच्या शास्त्रीय प्रयत्नाची अपेक्षा करितो. तो त्याच्या वाचून उत्पन्न होत नाहीं. अनेक जन्मात ज्याचा अभ्यास केला आहे, असाच तो यत्न सद्वासनेस दृढ करून असद्वासनेचा क्षय करण्यास समर्थ होतो. रामा, देवादि अनात्मस्थानप्राप्तीला कारण होणारा शास्त्रीय भावनाभ्यासही दुःखमिश्रित सुखालाच कारण होत असतो. यास्तव सर्व भावनांचा उच्छेद करणें, हाच आत्यंतिक अनर्थ जय आहे. भावनाच

देहाला आत्मा समजते. पण ती नुस्त्या तत्त्वदर्शनानेंच क्षीण करितां येण्यासारखी आहे. जगद्भ्रमाकडे दुर्लक्ष्य केलें, म्हणजे तेवढेंच त्याच्या नाशाला पुरेसें निमित्त आहे. अथवा त्याच्याकडे जरी लक्ष्य गेलें तरी तत्त्वज्ञानानें त्याचा बाध झालेला असल्यामुळें जगत्प्रत्यय पूर्वीप्रमाणें त्याच्या अनर्थाला कारण होत नाहीं; तर लीलेचें साधन होतो. असो; तर आतां नुस्त्या कौतुकानेंच येथून उठून व स्वतः जाऊन मी आपले सर्व संसार पाहतों व त्यास यथार्थ ज्ञान देऊन एकरूप करतों.

असा मनात विचार करून तो रुद्र जेथें मठस्थ भिक्षु शवाप्रमाणें शयन करीत होता त्या सर्गांत गेला. नंतर चित्त व चेतन याच्या योगानें त्या भिक्षूस बोधयुक्त करून त्यानें उठविलें तेव्हां त्याला आपल्या भ्रमाचें स्मरण झालें. नंतर रुद्र व भिक्षु असे ते दोघेही चिदाकाशाच्या एका कोनामध्यें असलेल्या जीवटसंसारास गेले. त्याचें भुवन, द्वीप, मंडल, देश व नगर यांस क्रमानें जाऊन पोंचल्यावर तेथें हातात तरवार घेऊनच शव होऊन निजलेल्या जीवटाला त्यांनीं पाहिलें. त्याचें निश्चेष्ट झालेलें शरीर संसार-भूमीमध्यें शरीरभाव ठेवून नुस्तें शरीराकार भासत होतें. त्याला सावध करून व लागलीच चित्त व चैतन्य यांनीं युक्त करून रुद्र, भिक्षु व जीवट असे ते एकरूप व त्रिरूप झाले. ते बोधवान् असूनही अबोधवान् असल्या-सारखे, विस्मित असूनही अविस्मित, व एक क्षणभर चित्राकार झाले. तिघेही मुकाट्यानें बसले. नंतर ते असेच पुढच्या सर्व संसारभूमीत गेले व मृत झालेल्या सर्वांना उठवून एक असतांना अनेक झाले. परस्परास पाहून ब्रह्महंसापर्यंत ते सर्व विस्मित झाले. ते शंभर जीव रुद्ररूप होऊन शोभूं लागले, त्याची संवित् ( चैतन्य ) एक होती तरी शरीरें व चेष्टा भिन्न होत्या. तें परमेश्वराचें एकच रूप अनेकाकार भासत होतें. रुद्राचीं तीं शेकडों शरीरें एक शुद्ध चिन्मय होतीं. प्रसिद्ध रुद्राची अशीच स्थिति आहे. रामा, भिक्षुकरुद्रानें कल्पिलेल्या शंभर जगातील तुला व मला दिसणारे हें जग अकरावें आहे. हा भ्रमरुद्राचा संसार आहे. ज्या जीवाच्या सभोंवार जो संसार उत्पन्न होतो तो त्यांतच निमग्न होऊन आपल्याच इतर भेदास पहात नाहीं. त्यामुळें या संसारातील जीव परस्परांस भिन्न समजून द्वैतभाव धरितात. पण तत्त्ववेत्त्यांना सर्व

दिसते. कारण त्यांची स्थूलावरील आसक्ति जाऊन केवल शुद्ध चैतन्याकडे दृष्टि लागलेली असते. व सर्व जीवतत्त्वभूत ब्रह्मैक्यलाभ हेंच ब्रह्मदर्शन होय. प्रत्येक संसारांत उदय पावलेल्या अनेक जीवराशी असत्य असून चित्सार ब्रह्म सर्वगामी असल्यामुळें त्याच्या योगानें सत्य असल्यासारख्या भासतात. भूमींत जेथें जेथें खणावें तेथें तेथें आकाश सांपडतें, त्याप्रमाणें सर्वगामिनी चितीवर जो जो आरोप करावा तो तो चिन्मय असतो. ज्या अर्थी तुला सर्व प्रपंचरूप भूतांचा अनुभव येत आहे, त्याअर्थी सर्व भूताचा आत्मा असें चित्त्व सर्वत्र आहेच. शिला व काष्ठ याना तोडून, फोडून घांसून त्याला मूर्तीचा आकार आणला असता तो मूळ शिला, काष्ठ, इत्यादिकांहून भिन्न दिसू लागतो, त्याप्रमाणें सद्रूप एकात्मा सर्वाकार दिसतो. ( पाषाणाचें कृत्रिम परिच्छिन्नरूप म्हणजेच जशी मूर्ति, त्याप्रमाणें चित्–चें कृत्रिम परिच्छिन्नरूप म्हणजेच जगत् होय. ) पण त्या परिच्छेदाचें कारण काय ? म्हणून म्हणशील तर सांगतों. कोणत्याही साधनाचा विषय न होणाऱ्या पर व शुद्ध आत्म्याचे ठायीं विषयत्व आणणें ( त्याला विपरीत जाणणें ) हेंच जगाचें अथवा चित्परिच्छेदाचें कारण आहे. पण चिदेकरसाचे ठायीं जाड्य निष्कारण असल्यामुळें तें आकाशाप्रमाणें शून्यरूपानें स्थित आहे. तस्मात् अशा प्रकारचें विषयवेदन हाच दृश्यबंध व त्याच्या पासून निवृत्ति हाच मोक्ष आहे. यास्तव आता या दोन्हींतील तुला जें इष्ट वाटत असेल त्याचा तूं स्वीकार कर. जन्म, अजन्म व बंध-मोक्ष. विषयवेदन व विषयावेदनरूप आहेत. ते दोन्ही बोधाहून पृथक् नाहींत. यास्तव आतां तुला वाटेल तसें कर. केवळ अदर्शनानेंच ( दुर्लक्ष्य केल्यानेंच ) जें नाहींसें होणार त्याचा नाश झाला म्हणून त्यात दुःख कसलें ? तसेंच जें नुस्त्या स्वस्थ बसण्यानेंच प्राप्त होणार त्या सुखाला आयासांची काय गरज आहे ? जगत् वेदनमात्र आहे. ( त्याच्याकडे जेव्हां बाह्य वृत्ति होऊन पहावें तेव्हां तें दिसतें ) यास्तव नुस्त्या अवेदनानेंच त्याचा परिहार होणें शक्य आहे. या जगाच्या अनुभवाचाही जो अनुभव तेंच साक्षिचैतन्य असून तें सदा भासतच आहे. तरग हा जसा पाण्याचा स्पंद त्याप्रमाणें जगत् हा चित्चा स्पंद आहे. या दृष्टान्त-दार्ष्टान्तिकामध्यें इतकेंच अंतर आहे की. देश-

काल, स्वरूप इत्यादि असतांनाच (म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीनंतर) जलामध्यें तरंग दिसतात व जगाच्यापूर्वी नसलेले देशादि चैतन्याच्या आधारानें भासणाऱ्या जगांत आढळतात. स्वप्रकाश आत्मस्वरूपच अविद्यावरणामुळें मंदप्रकाश होऊन त्रिजगत् बनतें. पण चित्चें पारमार्थिक रूप ज्ञान हेंच आहे; त्याच्या या जगद्रूपी विपरीत भावांमध्यें अनुभवास येणारें जाड्य नव्हे. जगाचें स्वरूप नाममात्र आहे, व परमात्मा वाणीचा विषय न होणारा आहे. अर्थात् 'आत्मचैतन्यच सर्व' जग आहे, हे शब्द व त्यांचा अर्थ यांमध्यें कांहीं अंतर नाहीं. कारण जल व तरंग हे दोन शब्द दोन भिन्न पदार्थांचे द्योतक आहेत, असें म्हणणें युक्त नव्हे. तस्मात् आत्मज्ञानाच्या अभावींच हें सर्व प्रपंचजात युक्त आहे. आत्मज्ञान झाल्यावर नाहीं ६३.

**सर्ग ६४**—त्या त्या देहांनीं त्याचा अवशिष्ट भोग, रुद्रगणत्वप्राप्ति, व संकल्पस्थिरतेचा क्रम.

**श्रीराम**—गुरुवर्य, भिक्षूच्या स्वप्नामुळें ज्यांना शरीर प्राप्त झालें आहे, असे जीवटब्राह्मण, हंस इत्यादिकांचें पुढें काय झालें?

**श्रीवसिष्ठ**—रुद्राचा समागम होतांच ते ज्ञानी झाले. त्यांनीं परस्परांचे मागचे पुढचे संसार पाहिले. आणि कृतकृत्य झाल्यामुळें सुखी होऊन राहिले. रुद्रानें ती माया पाहून कौतुकानें त्या आपल्या अंशाना प्रथम त्याच्या त्यांच्या संसारस्थितीस पुनः पाठविलें. तो त्यास म्हणाला, "तुम्ही आतां सत्वर आपापल्या स्थानीं जा, व जगत्प्रतिभास क्षीण होईतों तेथें (प्रारब्ध क्षय होण्यास्तव) आपल्या परिवारासह भोग भोगून नंतर मजकडे या आणि माझ्या पुरांतील भूषणें,असे मदंशभूत गण व्हा. त्या नंतर महाप्रलय जेव्हां होईल तेव्हां आम्हीं सर्व मिळून त्या परमपदास जाऊं."

**श्रीवसिष्ठ**—असें त्यांस सांगून भगवान् रुद्र अंतर्धान पावला, व रुद्रांमध्यें आला. जीवटादिकही आपापल्या संसारस्थानीं गेले. तेथें आपल्या स्त्रीप्रभृति परिवारासह प्रारब्ध भोग भोगीत राहिलेले ते पुढें योग्य समयीं शरीरत्याग करून रुद्रलोकास येतील व उत्तम गण होतील.

**श्रीराम**—पण प्रभो, जीवटादिक ते सर्व भिक्षूच्या संकल्परूप आहेत. तेव्हां ते सत्य कसे असतील? संकल्पित अर्थ कधीं सत्य नसतात.

श्रीवसिष्ठ—संकल्पांतही त्याच्या अधिष्ठानभूत चिदंशाला सत्यता असते. व संकल्पित अंशाला असत्यता असते. यास्तव संकल्पित अंशाचा त्याग कर. विवेकानें त्याचा त्याग करितां येतो. संकल्पित वस्तु बाहेर जरी नसली तरी चैतन्यात असते. चिद्भिन्न पदार्थ योग्य देश, काळ व अवस्था यामध्येंच फक्त अनुभवास येतात. पण अनुभूत व अननुभूत पदार्थ चैतन्यास्यामध्यें नित्य असतात, कारण तें (चैतन्य) सर्वाधार आहे. संकल्प हा अचिदात्म पदार्थांचा जनक आहे. पण हें ज्ञान सुद्धा सामान्य जीवाना अभ्यासयोगावाचून प्राप्त होत नाहीं. शंकरादिक ईश्वरांचें योगफल सदा सिद्ध असतें. यास्तव या वेळीं हा मी या अमुक वस्तूचा संकल्प करीत आहें, असें भान त्यानां होतें. पण तेंही चित्तैकाग्र्याचें फल आहे. एक निष्ठावानाचें सर्व कार्य सिद्ध होत असतें. दक्षिणेकडे जाणारा उत्तर-दिशेस कसा पोंचेल. संकल्पपरायण लोकासच संकल्पार्थ ज्ञात होत असतो; पण एकनिष्ठेच्या अभावीं तोही होत नाही. एकार्थनिष्ठेनेंच भिक्षुजीवानें रुद्रतेस प्राप्त होऊन रुद्राप्रमाणेंच सर्वज्ञ झाल्यामुळें सर्व प्राप्त करून घेतलें. पण त्याच्या संकल्पित जीवानीं म्हणजे भिक्षु व रुद्र याच्या मधल्या अठ्याण्णव जीवानीं पुनः कधीं एकमेकास पाहिलें नाहीं. कारण त्यांचें जग पृथक् पृथक् होतें रुद्राच्या समीप असतांना मात्र ज्ञाना-वरण गेलेलें असल्यामुळें त्याना परस्पराचें ज्ञान झालें. रुद्र सर्वेश्वर असल्यामुळें त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व होतें. त्या इच्छेनें ते तत्काल तद्रूप व बहुरूप झाले. सारांश, हा जीव धारण व ध्यान या यत्नांच्या योगानें सर्व इष्ट एकदम किंवा क्रमानें करण्यास समर्थ आहे. कारण तो परमार्थतः अनंत आहे. व अनंताचे ठायीं सर्व शक्ति असतात. पण एकेक शरीरावर अभिमान ठेवल्यामुळें जीव अज्ञानानें आपण होऊनच मर्यादित होतो. आणि त्या कारणानें तो एकेक कार्य करण्यासच समर्थ असतो. तो जन्म व नाश यांच्या चक्रांत सांपडतो व स्वतःच्या दोषानेंच इष्टानिष्टाचा अनुभव घेतो. त्यांत ईश्वराचा कांहीं दोष नाहीं. असो; ध्यान व धारणा यानीं सिद्ध झालेल्या योगिनी व योगी देशकालानुरूप प्राण्यावर अनुग्रह, त्याचा निग्रह इत्यादि अधिकारिकर्मांनीं क्रीडा करीत स्वगृहात किंवा मनास वाटेल तेथें एका देहानें किंवा अनेक देहांनीं राहतात. भगवान्

दत्तात्रेयाच्या प्रसादानें कार्तवीर्य स्वगृहांत असूनही त्याच्या राष्ट्रांत जेथें जेथें कोणी काहीं अकृत्य करीत असेल तेथें तेथें प्रत्यक्ष होऊन त्याला भय दाखवीत असे. क्षीरसागरामध्यें असणारा भगवान् विष्णु भूलोकीं जन्म घेऊन व्यवहार करतो. स्वर्गादिकांतील योगिनींच्या गणांत असलेल्या योगिनी भूलोकीं पशु—पेयादि उपाहार आणण्याकरितां जातात. स्वर्गासनस्थ इंद्र यज्ञभागाकरिता यज्ञमंडपांत येतो. जनार्दन प्रसंगीं सहस्रसंख्य होतो. भक्तावर अनुग्रह करण्यासाठीं तो महादेव स्वतः मनुष्यही बनतो. अंशावताररूप लीलांनीं जगाची स्थिति चालवितो. रामा, त्याप्रमाणेंच ते भिक्षुसंकल्पामुळें उत्पन्न झालेले जीवटब्राह्मणादिक रुद्रविज्ञानसामर्थ्यानें आपापल्या संकल्पपुरीस गेले आहेत. आणखी काहीं दिवसांनीं तेथें चिरकाळ उपभोग भोगून ते रुद्रपुरास परत येतील व रुद्रगण होऊन परिवारासह सुखानें राहतील ६५.

**सर्ग ६५**—हाच भिक्षुन्याय सर्व जीवांस लागू आहे, सभाविसर्जन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, जसा त्या भिक्षूनें आपल्या चित्तात किंचित् भ्रम पाहिला व तोच पुढें फलरूपानें अतिविस्तृत व आपल्याहून पृथक् असा त्याला दिसला, तशीच सर्व जीवांची जन्ममरणमयी संसारस्थिति आहे. प्रत्येक जीवाच्या मरणकाळीं उद्बुद्ध ( जागें, फलोन्मुख ) झालेलें कर्मच स्वप्नाप्रमाणें जगद्रूपानें मोक्षापर्यंत भासतें. भिक्षूचा आत्माच सर्वव्यापी असूनही देहानें परिच्छिन्न झाल्याप्रमाणें मोक्षापर्यंत आकुळ होऊन राहतो. रामा, या कथेच्या मिषानें मी तुला जीवसमूहाचेंच वर्णन करून सांगितलें आहे. कारण पूर्णस्वरूपापासून च्युत झालेला एकटा भिक्षूच नसून सर्व जीव आहेत. आमचा जीव एका मोहांतून दुसऱ्या मोहांत कसा जातो हें प्रतिदिवशीं आमच्या स्वप्नांतील अनुभवानेंच सिद्ध आहे. पर्वताच्या अग्रावरून घसरलेला पाषाण जसा उत्तरोत्तर खालीं खालीं जातो, त्याप्रमाणें आत्मस्वरूपापासून भ्रष्ट झालेला जीव हें दृढ स्वप्न पाहतो. तो या एका स्वप्नातून दुसऱ्या स्वप्नात जातो, अशा अनेक स्वप्नांच्या परंपरेमुळें हें जग दृढ झालें आहे, शेवटीं मायेनें आतल्या आंत अतिशय जर्जर केलेला जीव कांहीं निमित्तानेंच या जन्मादि दुःखाचा केंव्हा तरी आपण होऊन विचार करूं लागतो. त्यामुळें त्याला देहाभिमान हाच बंध, व स्वात्मलाभ हाच मोक्ष, असें कळतें.

**श्रीराम**—हाय हाय! केवढा कठिण मोह या जीवाला होता हा! थोड्याशा श्रमानें व्याकुळ होऊन निजलेल्या जंतूला त्याचें मन जसें स्वप्नांतील दुस्तर व भयंकर संकटात नेऊन सोडतें, त्याप्रमाणें या उग्र मायेनें जीवाला अत्यंत भयामध्यें पाडलें आहे. भगवन्, या जगत्स्थितींत सर्व सर्वत्र सर्वदा संभवतें, असें जें आपले म्हणणें आहे, त्याचा मला अनुभव आला. पण गुरो, आपण हा जो भिक्षु मला सांगितलात तो कोणी खराच आहे, कीं माझ्या बोधाकरितां त्याची नुस्ती कल्पना केलेली आहे. जर खराच असेल तर या गुणानीं विशिष्ट असलेला तो महात्मा भिक्षु सांप्रत कालीं या सृष्टींत कोठेंसा आहे तें अदृष्टीनें पाहून सत्वर मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, आज रात्रीं समाधिस्थ झाल्यावर या त्रैलोक्य मठींत मी सूक्ष्म दृष्टीनें पाहीन. व उद्यां सकाळीं असा एकादा भिक्षु तिच्यामध्यें आहे कीं नाहीं तें सांगेन.

**श्रीवाल्मीकि**—वसिष्ठ मुनि इतकें बोलत आहे तों 'माध्याह्न काल झाला' असें सुचविणारा घोर शखनाद झाला. त्याबरोबर पौरादिकांनीं वसिष्ठादिकांच्या पायावर पुष्पाजलिपरंपरा सोडली. राजानें सभेचें विसर्जन केलें. सर्व स्वस्थानीं गेले. अवशिष्ट दिनकृत्यें आटोपून रात्रीं विश्रांतीच्या शान्त वेळीं त्यानीं मुनीच्या उपदेशाचा विचार केला. त्यामुळें ती रात्र केव्हां गेली हेंही कोणाला समजलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते सर्व सभास्थानीं आले व परस्पर सत्कार करून श्रवणोचित स्थानीं बसले ६९.

**सर्ग ६६**—वसिष्ठांनीं पुष्कळ शोध केल्यावर तो भिक्षु त्यांना दिसला व तसेच दुसरेही मागचे व पुढचे मुनी भेटले.

**श्रीवाल्मीकि**—विश्वामित्र, वसिष्ठ इत्यादिकांसह खेचर व भूचर सभेंत स्वस्थ बसले. श्रेष्ठ राजांनीं स्वस्थानीं बसल्यावर थोडीशी विश्रांति घेतली. राम-लक्ष्मणादि राजपुत्रही उत्सुक मनानें वसिष्ठ मुनीच्या समोर खालीं तोंड करून बसले. तेव्हा रामाच्या प्रश्नाची अपेक्षा न करितां मुनीश्वर आपण होऊनच त्यास असें सांगूं लागला. कारण दयाळु साधु बलात्कारानें बोध करीत असतात.

**श्रीवसिष्ठ**—बा रघुनंदना, काल मी ज्ञानदृष्टीनें त्या भिक्षूला पुष्कळ वेळ शोधलें. मी तुला सांगितलेली कथा जरी काल्पित होती तरी तिच्या-

गज झाला. मूढांचा प्रयत्न नेहमीं रम्य वस्तूंचा नाश करण्यासाठींच होत असतो. त्या मत्त पशूनें भ्रमरासह नलिनीचा विध्वंस केला. दांताखालीं सापडलेल्या तांदुळाप्रमाणें त्या बिचाऱ्याचें पीठ झालें. पण मरणसमयीं हत्तीला पाहून त्याचीच भावना केल्यामुळें तो आपल्याला महागंधहस्ती झाल्याचें पाहूं लागला. कांहीं दिवसांनीं, जीव जसा अंधकारमय शून्य संसारात पडतो त्याप्रमाणें तो गज त्याला धरण्याकरिता एका राजाच्या हस्तिपकांनीं तयार केलेल्या एका शुष्क खड्डयांत पडला. काहीं दिवसांनीं एकाद्या निशाचराप्रमाणे शत्रूंच्या महा सैन्याचा विध्वंस करणारा तो मदोन्मत्त गज राजाला फार आवडूं लागला. पुढे एकदा एका युद्धांत तो शत्रूंच्या असह्य शस्त्राघातानीं मरण पावला. तो आपल्या गंडस्थलावर फिरणाऱ्या भ्रमराना नेहमीं पहात असे. त्या संस्कारामुळें स्वतः भ्रमर झाला. तो वनलतावरून विहार करिता करिता पुनः पद्मिनीवर येऊन बसला. अज्ञपुरुषाच्या वासनाचा दुरभ्यास दुस्त्यज आहे. तेथें हत्तीच्या पायाखालीं चुरडून तो पुनः मेला व जवळच असणाऱ्या हंसाच्या संस्कारामुळें कलहंस झाला. अन्य हंसाबरोबर विहार करीत तो बरेच दिवस राहिला. त्या हंससभेत ब्रह्मदेवाच्या हंसाचें वर्णन त्यानें एकदा ऐकलें. त्यामुळें त्याच्याविषयींचे दृढ संस्कार त्याच्या मनात बसले. काहीं दिवसानीं तो मेला व ब्रह्मदेवाचा हंस झाला. त्या शुभ जन्मात, ब्रह्मलोकीं एकसारख्या चालू असलेल्या विवेकी प्रजापतींच्या वैराग्यतत्त्वज्ञानादि उपदेशाच्या योगानें त्याला चांगला आत्मबोध झाला. त्यामुळें त्यानें लौकिक वस्तुदृष्टि सोडली, व तेथे जीवन्मुक्त होऊन राहिला. याप्रमाणें जिवंत दशेंतच जर त्याला निरतिशय मोक्षसुख प्राप्त झालें होतें तर युगांतसमयीं ब्रह्मदेवाबरोबर विदेहमुक्त होऊन त्याला आणखी अधिक काय साध्य करून घ्यावयाचें होते? कांहीं नाहीं. ६२.

**सर्ग ६३**—जीवट पुढें रुद्र झाला. त्याला पूर्वदेहाचे ज्ञान, त्याचें शतरुद्रत्व व ऐकात्म्य.

**श्रीवसिष्ठ**—पुढें कमलोद्भवाच्या कमलनालावर लीला करावयास सापडल्यामुळें अतिशय प्रसन्न झालेला तो हंस एकदा ब्रह्मदेवाबरोबर रुद्रपुरास गेला. तेथें त्याने रुद्राला पाहिलें. तेव्हा मी रुद्र आहे, अशी

याची मति झाली. त्याबरोबर त्यानें रुद्ररूपी होऊन प्राक्तन शरीराचा त्याग केला. नंतर तो त्या रुद्रभवनात यथेच्छ विहार करूं लागला. अनेक गणानीं वेष्टित होऊन इतस्ततः भ्रमण करणाऱ्या त्याला अत्युत्तम ज्ञान-विलासामुळें आपला सर्व पूर्ववृत्तान्त आठवला. ज्याचें शरीर आवरणरहित ज्ञान हेंच आहे असा तो भगवान् आपल्याच शेंकडो स्वप्नानीं विस्मित होऊन एकांतांत आपल्याशींच बोलला;—अहो, ही विश्वाला मोह पाडणारी विचित्र माया पसरली आहे. ती माळ भूमीवरील मृगजलाप्रमाणें असत्य असून सत्य असल्यासारखी भासते. अहाहा; मला आता सर्व आठवलें. प्रथम मी चित्-तत्त्व होतों. त्यानंतर मायेनें चित्त झालों. ( बहु व्हावें, या संकल्पवृत्तिरूप झालों ) सकल्पामुळेंच मी सर्व झालों. मी चिदंशात सर्वज्ञ व जडांशामध्यें गगनादि भूत—व शरीरादि—भौतिकरूप बनलों. नंतर भूततन्मात्रानीं रंजित होऊन जीव झालों. त्याच्या अनेक जन्मांतील एक शुभ जन्मांत अक्षुब्धचित्त भिक्षु झालों; पण त्या भिक्षूलाही आत्मज्ञान नव्हतें. म्हणून तो आसनावर देहादिकांना स्थिर करून बाह्य आकारामध्यें देवतादि भावना करून त्याची पूजा करीत असे. तो त्याच रम्य लीलेचा अनुभव घेत असे. पण वेल वसंतऋतूंत प्यालेलें जल ग्रीष्मऋतूंत जसें सर्वथा बाहेर टाकते, त्याप्रमाणें त्याचा पुढचा अनुभव रूढ झाला, कीं मागचा नाहींसा होत असे. असो; याप्रमाणे तो भिक्षु सिद्ध असूनही अशास्त्रीय मानसखेळात प्रवृत्त झाल्यामुळें अनर्थपरंपरेचा उदय झाला. अनेक भूच्छिद्रातून जशी मुंगी भ्रमण करते त्याप्रमाणें तो भिक्षु जीवट होऊन वासनेमुळें विविध जतु बनला व अनेक योनींतून भ्रमण करीत राहिला. तो द्विजाचा मोठा भक्त असल्यामुळें प्रथम आपल्या ठिकाणीं द्विज-त्वच पाहूं लागला. कारण बलवान् वासनासंघच वृद्धि पावत असतो. नंतर त्याला एकसारखी चिंतिलेली सामंतता प्राप्त झाली. कारण सतत प्यालेला रसच वृक्षामध्यें फलरूपानें परिणत होतो. राज्याकरितां अनेक धर्मकार्यें केल्या-कारणानें तो सम्राट् झाला. पुढें तोच कामुकस्वभावामुळें देवस्त्री झाला. चंचल नेत्राच्या लोभानें ती देवस्त्री हरिणी झाली. हर! हर! वासनामोह प्राण्याना कसा दुःखद होतो, तो पहा. पुढें मृगी सदा मनांत असलेली वेल बनली. तिनें अवश्य प्राप्त होणाऱ्या छेदांचा अनुभव घेतला. तिला

चिर परिचित भ्रमराचा जन्म घ्यावा लागला. त्याचा हत्तीच्या पायाखाली चूर उडाला. याप्रमाणें मी महासंसारसंकटांत वारंवार भ्रमण केलें. व शंभर जन्मानंतर आतां या मनोमात्रभ्रमरूप संसारभ्रमांत रुद्र होऊन राहिलों आहें. याप्रमाणें अत्यंत विचित्र व अनेक संसार-अरण्य भूमीमध्यें मी व्यर्थ भटकत आहें. मी कधीं जीवट झालों, कधीं ब्राह्मणश्रेष्ठ झालों, कधीं राजा झालों; कधीं हंस व हत्तीही बनलों. याप्रमाणें मी देहयंत्रांतील व मनोयंत्रांतील या दशेस प्राप्त झालों आहें. अगदीं प्रथम सृष्टींत मी परमानंदलक्षण परम-पदा-पासून च्युत झालों व या गोष्टीस आज सहस्रावधि चतुर्युगें झालीं फार दिवस संसारक्लेश भोगल्यावर मला उत्तम जन्म लाधला. त्यांत मी भिक्षु होऊन श्रवण मननादि अभ्यासाची योग्यता संपादन केली. पण दुर्दैवामुळें माझ्याहातून प्रमाद घडला. मी जन्ममरणपरंपरेंत पडलों. आणि शेवटीं ब्रह्मदेवाचा हंस झालों. पण रुद्राचा संगम होतांच तो माझा प्राक्तन अभ्यास फलद्रूप होऊन रुद्रत्वास प्राप्त झालेल्या मला तत्त्वज्ञान झालें आहे. एवढ्या साठींच शास्त्रीय साधनाभ्यास श्रेष्ठ आहे. कारण तो अनेक विरुद्ध जन्मांच्या योगानें अंतरला असला तरी पुनः उदय पावून पुरुषार्थास साधतो. अशास्त्रीय साधनाभ्यासालाही हाच न्याय लावता आला असता; पण अनायासानें घडलेल्या साधुसमागमानें जीवाचा अशुभ वासनाभ्यास निवृत्त होत असतो; पण—अशुभ वासनांप्रमाणें शुभ वासनाभ्यासही स्वतःच प्राक्तन संस्कारांपासून उद्भवेल. व त्याच्या बलानेंच हा पुरुष अशुभ वासनांचा त्याग करील. यास्तव त्याकरितां पुरुष प्रयत्नाचें विधान करणें व्यर्थ आहे, असें म्हणशील तर सांगतों—वासनाजालाचा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाचा हा प्राक्तन शुभवासनाभ्यास कालांतरीं आपल्या उदयासाठीं पुरुषाच्या शास्त्रीय प्रयत्नाची अपेक्षा करितो. तो त्याच्या वांचून उत्पन्न होत नाहीं. अनेक जन्मांत ज्याचा अभ्यास केला आहे, असाच तो यत्न सद्वासनेस दृढ करून असद्वासनेचा क्षय करण्यास समर्थ होतो. रामा, देवादि अनात्मस्थानप्राप्तीला कारण होणारा शास्त्रीय भावनाभ्यासही दुःखमिश्रित सुखालाच कारण होत असतो. यास्तव सर्व भावनांचा उच्छेद करणें, हाच आत्यंतिक अनर्थ जय आहे. भावनाच

देहाला आत्मा समजते. पण ती नुस्त्या तत्त्वदर्शनानेंच क्षीण करितां येण्यासारखी आहे. जगद्भ्रमाकडे दुर्लक्ष्य केलें, म्हणजे तेवढेंच त्याच्या नाशाला पुरेसें निमित्त आहे. अथवा त्याच्याकडे जरी लक्ष्य गेलें तरी तत्त्वज्ञानानें त्याचा बाध झालेला असल्यामुळें जगत्प्रत्यय पूर्वीप्रमाणें त्याच्या अनर्थाला कारण होत नाहीं; तर लीलेचें साधन होतो. असो; तर आता नुस्त्या कौतुकानेंच येथून उठून व स्वतः जाऊन मी आपले सर्व संसार पाहतों व त्यांस यथार्थ ज्ञान देऊन एकरूप करतों.

असा मनात विचार करून तो रुद्र जेथें मठस्थ भिक्षु शवाप्रमाणें शयन करीत होता त्या सर्गांत गेला. नंतर चित्त व चेतन यांच्या योगानें त्या भिक्षूस बोधयुक्त करून त्यानें उठविलें. तेव्हा त्याला आपल्या भ्रमाचें स्मरण झालें. नंतर रुद्र व भिक्षु असे ते दोघेही चिदाकाशाच्या एका कोनामध्यें असलेल्या जीवटससारास गेले. त्याचें भुवन, द्वीप, मंडल, देश व नगर यांस क्रमानें जाऊन पोंचल्यावर तेथें हातात तरवार घेऊनच शव होऊन निजलेल्या जीवटाला त्यांनीं पाहिलें. त्याचें निश्चेष्ट झालेलें शरीर संसार-भूमीमध्यें शरीरभाव ठेवून नुस्तें शरीराकार भासत होतें. त्याला सावध करून व लागलीच चित्त व चैतन्य यानीं युक्त करून रुद्र, भिक्षु व जीवट असे ते एकरूप व त्रिरूप झाले. ते बोधवान् असूनही अबोधवान् असल्या-सारखे, विस्मित असूनही अविस्मित, व एक क्षणभर चित्राकार झाले. तिघेही मुकाट्यानें बसले. नंतर ते असेच पुढच्या सर्व ससारभूमींत गेले व मृत झालेल्या सर्वांना उठवून एक असताना अनेक झाले परस्परास पाहून ब्रह्महसापर्यंत ते सर्व विस्मित झाले. ते शंभर जीव रुद्ररूप होऊन शोभूं लागले, त्यांची संवित् ( चैतन्य ) एक होती तरी शरीरें व चेष्टा भिन्न होत्या. तें परमेश्वराचें एकच रूप अनेकाकार भासत होतें. रुद्राचीं तीं शेकडों शरीरें एक शुद्ध चिन्मय होतीं. प्रसिद्ध रुद्रांची अशीच स्थिति आहे. रामा, भिक्षुकरुद्रानें कल्पिलेल्या शंभर जगांतील तुला व मला दिसणारें हें जग अकरावें आहे. हा भ्रमरुद्राचा संसार आहे. ज्या जीवाच्या सभोंवार जो संसार उत्पन्न होतो तो त्यातच निमग्न होऊन आपल्याच इतर भेदास पहात नाहीं. त्यामुळें या संसारातील जीव परस्परांस भिन्न समजून द्वैतभाव धरितात. पण तत्त्ववेत्त्यांना सर्व

दिसतें. कारण त्यांची स्थूलावरील आसक्ति जाऊन केवल शुद्ध चैतन्याकडे दृष्टि लागलेली असते. व सर्व जीवतत्त्वभूत ब्रह्मैक्यलाभ हेंच ब्रह्मदर्शन होय. प्रत्येक संसारांत उदय पावलेल्या अनेक जीवराशी असत्य असून चित्सार ब्रह्म सर्वगामी असल्यामुळें त्याच्या योगानें सत्य असल्यासारख्या भासतात. भूमींत जेथें जेथें खणावें तेथें तेथें आकाश सांपडतें, त्याप्रमाणें सर्वगामिनी चितीवर जो जो आरोप करावा तो तो चिन्मय असतो. ज्या अर्थी तुला सर्व प्रपंचरूप भूताचा अनुभव येत आहे, त्याअर्थी सर्व भूताचा आत्मा असें चित्त्व सर्वत्र आहेच. शिला व काष्ठ याना तोडून, फोडून घांसून त्याला मूर्तीचा आकार आणला असता तो मूळ शिला, काष्ठ, इत्यादिकांहून भिन्न दिसूं लागतो, त्याप्रमाणें सद्रूप एकात्मा सर्वाकार दिसतो. ( पाषाणाचें कृत्रिम परिच्छिन्नरूप म्हणजेच जशी मूर्ति, त्याप्रमाणें चित्-चें कृत्रिम परिच्छिन्नरूप म्हणजेच जगत् होय. ) पण त्या परिच्छेदाचें कारण काय ? म्हणून म्हणशील तर सांगतों, कोणत्याही साधनाचा विषय न होणाऱ्या पर व शुद्ध आत्म्याचे ठायीं विषयत्व आणणें ( त्याला विपरीत जाणणें ) हेंच जगाचें अथवा चित्परिच्छेदाचें कारण आहे. पण चिदेकरसाचे ठायीं जाड्य निष्कारण असल्यामुळें तें आकाशाप्रमाणें शून्यरूपानें स्थित आहे. तस्मात् अशा प्रकारचें विषयवेदन हाच दृश्यबंध व त्याच्या पासून निवृत्ति हाच मोक्ष आहे. यास्तव आता या दोन्हींतील तुला जें इष्ट वाटत असेल त्याचा तू स्वीकार कर. जन्म, अजन्म व बंध-मोक्ष. विषयवेदन व विषयावेदनरूप आहेत. ते दोन्ही बोधाहून पृथक् नाहींत. यास्तव आतां तुला वाटेल तसें कर. केवळ अदर्शनानेंच ( दुर्लक्ष्य केल्यानेंच ) जें नाहींसें होणार त्याचा नाश झाला म्हणून त्यात दुःख कसलें ? तसेंच जें नुस्त्या स्वस्थ बसण्यानेंच प्राप्त होणार त्या सुखाला आयासांची काय गरज आहे ? जगत् वेदनमात्र आहे. ( त्याच्याकडे जेव्हां बाह्य वृत्ति होऊन पहावें तेव्हां तें दिसतें ) यास्तव नुस्त्या अवेदनानेंच त्याचा परिहार होणें शक्य आहे. त्या जगाच्या अनुभवाचाही जो अनुभव तेंच साक्षिचैतन्य असून तें सदा प्राप्तच आहे. तरंग हा जसा पाण्याचा स्पंद त्याप्रमाणें जगत् हा चित्चा स्पंद आहे. या दृष्टान्त-दार्ष्टान्तिकामध्यें इतकेंच अंतर आहे कीं, दृश्य-

काल, स्वरूप इत्यादि असतांनाच (म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीनंतर) जला-मध्यें तरंग दिसतात व जगाच्यापूर्वी नसलेले देशादि चैतन्याच्या आधारानें भासणाऱ्या जगांत आढळतात. स्वप्रकाश आत्मस्वरूपच अविद्याव-रणामुळें मंदप्रकाश होऊन त्रिजगत् बनतें. पण चित्चें पारमार्थिक रूप ज्ञान हेंच आहे; त्याच्या या जगद्रूपी विपरीत भावांमध्यें अनुभवास येणारें जाड्य नव्हे. जगाचें स्वरूप नाममात्र आहे, व परमात्मा वाणीचा विषय न होणारा आहे. अर्थात् 'आत्मचैतन्यच सर्व' जग आहे, हे शब्द व त्यांचा अर्थ यांमध्यें कांहीं अंतर नाहीं. कारण जल व तरंग हे दोन शब्द दोन भिन्न पदार्थांचे द्योतक आहेत, असें म्हणणें युक्त नव्हे. तस्मात् आत्मज्ञानाच्या अभावींच हें सर्व प्रपंचजात युक्त आहे. आत्मज्ञान झाल्यावर नाहीं ६३.

सर्ग ६४—त्या त्या देहांनीं त्याचा अवशिष्ट भोग, रुद्रगणत्वप्राप्ति, व संकल्प-स्थिरतेचा क्रम.

श्रीराम—गुरुवर्य, भिक्षूच्या स्वप्नामुळें ज्यांना शरीर प्राप्त झालें आहे, असे जीवटब्राह्मण, हंस इत्यादिकांचें पुढें काय झालें?

श्रीवसिष्ठ—रुद्राचा समागम होतांच ते ज्ञानी झाले. त्यांनीं परस्परांचे मागचे पुढचे संसार पाहिले. आणि कृतकृत्य झाल्यामुळें सुखी होऊन राहिले. रुद्रानें ती माया पाहून कौतुकानें त्या आपल्या अंशांना प्रथम त्याच्या त्यांच्या संसारस्थितीस पुनः पाठविलें. तो त्यांस म्हणाला, "तुम्ही आतां सत्वर आपापल्या स्थानीं जा, व जगत्प्रतिभास क्षीण होईतों तेथें (प्रारब्ध क्षय होण्यास्तव) आपल्या परिवारासह भोग भोगून नंतर मजकडे या आणि माझ्या पुरांतील भूषणें, असे मदंशभूत गण व्हा. त्या नंतर महाप्रलय जेव्हां होईल तेव्हा आम्हीं सर्व मिळून त्या परमपदास जाऊं."

श्रीवसिष्ठ—असें त्यांस सांगून भगवान् रुद्र अंतर्धान पावला, व रुद्रांमध्यें आला. जीवटादिकही आपापल्या संसारस्थानीं गेले. तेथें आपल्या स्त्रीप्रभृति परिवारासह प्रारब्ध भोग भोगीत राहिलेले ते पुढें योग्य समयीं शरीरत्याग करून रुद्रलोकास येतील व उत्तम गण होतील.

श्रीराम—पण प्रभो, जीवटादिक ते सर्व भिक्षूच्या संकल्परूप आहेत. तेव्हां ते सत्य कसे असतील? संकल्पित अर्थ कधीं सत्य नसतात.

श्रीवसिष्ठ—संकल्पांतही त्याच्या अधिष्ठानभूत चिदंशाला सत्यता असते. व संकल्पित अंशाला असत्यता असते. यास्तव संकल्पित अंशाचा त्याग कर. विवेकानें त्याचा त्याग करितां येतो. सकल्पित वस्तु बाहेर जरी नसली तरी चैतन्यांत असते. चिद्भिन्न पदार्थ योग्य देश, काल व अवस्था यांमध्येंच फक्त अनुभवास येतात. पण अनुभूत व अननुभूत पदार्थ चैतन्यात्म्यामध्यें नित्य असतात, कारण तें (चैतन्य) सर्वाधार आहे. संकल्प हा अचिदात्म पदार्थांचा जनक आहे. पण हें ज्ञान सुद्धा सामान्य जीवाना अभ्यासयोगावाचून प्राप्त होत नाहीं. शंकरादिक ईश्वराचें योगफल सदा सिद्ध असतें. यास्तव या वेळीं हा मी या अमुक वस्तूचा संकल्प करीत आहें, असें भान त्यांना होतें. पण तेंही चित्तैकाग्र्याचें फल आहे. एक निष्ठावानाचें सर्व कार्य सिद्ध होत असतें. दक्षिणेकडे जाणारा उत्तर-दिशेस कसा पोंचेल. संकल्पपरायण लोकासच संकल्पार्थ ज्ञात होत असतो; पण एकनिष्ठेच्या अभावीं तोही होत नाही. एकार्थनिष्ठेनेंच भिक्षुजीवानें रुद्रतेस प्राप्त होऊन रुद्राप्रमाणेंच सर्वज्ञ झाल्यामुळें सर्व प्राप्त करून घेतलें. पण त्याच्या संकल्पित जीवानीं म्हणचे भिक्षु व रुद्र याच्या मधल्या अठ्याण्णव जीवानीं पुनः कधीं एकमेकास पाहिलें नाहीं. कारण त्याचें जग पृथक् पृथक् होतें रुद्राच्या समीप असताना मात्र ज्ञाना-वरण गेलेलें असल्यामुळें त्याना परस्पराचें ज्ञान झालें. रुद्र सर्वेश्वर असल्यामुळें त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व होतें. त्या इच्छेनें ते तत्काल तद्रूप व बहुरूप झाले. सारांश, हा जीव धारण व ध्यान या यत्नाच्या योगानें सर्व इष्ट एकदम किंवा क्रमानें करण्यास समर्थ आहे. कारण तो परमार्थतः अनंत आहे. व अनंताचे ठायीं सर्व शक्ति असतात. पण एकेक शरीरावर अभिमान ठेवल्यामुळें जीव अज्ञानानें आपण होऊनच मर्यादित होतो. आणि त्या कारणानें तो एकेक कार्य करण्यासच समर्थ असतो. तो जन्म व नाश याच्या चक्रांत सांपडतो व स्वतःच्या दोषानेंच इष्टानिष्टाचा अनुभव घेतो त्यात ईश्वराचा काहीं दोष नाहीं. असो; ध्यान व धारणा यानीं सिद्ध झालेल्या योगिनी व योगी देशकालानुरूप प्राण्यावर अनुग्रह, त्याचा निग्रह इत्यादि अधिकारिकर्मांनीं क्रीडा करीत स्वगृहात किंवा मनास वाटेल तेथें एका देहानें किंवा अनेक देहांनीं राहतात. भगवान्

दत्तात्रेयाच्या प्रसादानें कार्तवीर्य स्वगृहांत असूनही त्याच्या राष्ट्रांत जेथें जेथें कोणी काहीं अकृत्य करीत असेल तेथें तेथें प्रत्यक्ष होऊन त्याला भय दाखवीत असे. क्षीरसागरामध्यें असणारा भगवान् विष्णु भूलोकीं जन्म घेऊन व्यवहार करतो. स्वर्गादिकांतील योगिनींच्या गणांत असलेल्या योगिनी भूलोकीं पशु–पेयादि उपाहार आणण्याकरिता जातात. स्वर्गासनस्थ इंद्र यज्ञभागाकरिता यज्ञमंडपांत येतो. जनार्दन प्रसंगीं सहस्रसंख्य होतो. भक्तावर अनुग्रह करण्यासाठीं तो महादेव स्वतः मनुष्यही बनतो. अंशावताररूप लीलानीं जगाची स्थिति चालवितो. रामा, त्याप्रमाणेंच ते भिक्षुसंकल्पामुळें उत्पन्न आलेले जीवटब्राह्मणादिक रुद्रविज्ञानसामर्थ्यानें आपापल्या संकल्पपुरीस गेले आहेत. आणखी काहीं दिवसांनीं तेथें चिरकाल उपभोग भोगून ते रुद्रपुरास परत येतील व रुद्रगण होऊन परिवारासह सुखानें राहतील ६५.

**सर्ग ६५**—हाच भिक्षुन्याय सर्व जीवांस लागू आहे, सभाविसर्जन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, जसा त्या भिक्षूनें आपल्या चित्तांत किंचित् भ्रम पाहिला व तोच पुढें फलरूपानें अतिविस्तृत व आपल्याहून पृथक् असा त्याला दिसला, तशीच सर्व जीवाची जन्ममरणमयी संसारस्थिति आहे. प्रत्येक जीवाच्या मरणकालीं उद्‌बुद्ध ( जागें, फलोन्मुख ) झालेलें कर्मच स्वप्नाप्रमाणें जगद्रूपानें मोक्षापर्यंत भासतें. भिक्षूचा आत्माच सर्वव्यापी असूनही देहानें परिछिन्न झाल्याप्रमाणें मोक्षापर्यंत आकुल होऊन राहतो. रामा, या कथेच्या मिषानें मी तुला जीवसमूहाचेंच वर्णन करून सागितलें आहे. कारण पूर्णस्वरूपापासून च्युत झालेला एकटा भिक्षूच नसून सर्व जीव आहेत. आमचा जीव एका मोहांतून दुसऱ्या मोहांत कसा जातो हें प्रतिदिवशीं आमच्या स्वप्नातील अनुभवानेंच सिद्ध आहे. पर्वताच्या अग्रावरून घसरलेला पाषाण जसा उत्तरोत्तर खालीं खालीं जातो, त्याप्रमाणें आत्मस्वरूपापासून भ्रष्ट झालेला जीव हें दृढ स्वप्न पाहतो. तो या एका स्वप्नातून दुसऱ्या स्वप्नात जातो, अशा अनेक स्वप्नांच्या परंपरेमुळें हें जग दृढ झालें आहे, शेवटीं मायेनें आतल्या आंत अतिशय जर्जर केलेला जीव कांहीं निमित्तानेंच या जन्मादि दुःखाचा केव्हां तरी आपण होऊन विचार करूं लागतो. त्यामुळें त्याला देहाभिमान हाच बंध, व स्वात्मलाभ हाच मोक्ष, असें कळतें.

**श्रीराम**—हाय हाय! केवढा कठिण मोह या जीवाला होता हा! थोड्याशा श्रमानें व्याकुल होऊन निजलेल्या जंतूला त्याचें मन जसें स्वप्नांतील दुस्तर व भयंकर संकटांत नेऊन सोडतें, त्याप्रमाणें या उग्र मायेनें जीवाला अत्यंत भयामध्यें पाडलें आहे. भगवन्, या जगत्स्थितींत सर्व सर्वत्र सर्वदा संभवतें, असें जें आपलें म्हणणें आहे, त्याचा मला अनुभव आला. पण गुरो, आपण हा जो भिक्षु मला सांगितलात तो कोणी खराच आहे, कीं माझ्या बोधाकरिता त्याची नुस्ती कल्पना केलेली आहे. जर खराच असेल तर या गुणानीं विशिष्ट असलेला तो महात्मा भिक्षु सांप्रत कालीं या सृष्टींत कोठेंसा आहे तें अदृष्टीनें पाहून सत्वर मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, आज रात्रीं समाधिस्थ झाल्यावर या त्रैलोक्य मठींत मी सूक्ष्म दृष्टीनें पाहीन. व उद्यां सकाळीं असा एकादा भिक्षु तिच्यामध्यें आहे कीं नाहीं तें सांगेन.

**श्रीवाल्मीकि**—वसिष्ठ मुनि इतकें बोलत आहे तों ' माध्याह्न काल झाला ' असें सुचविणारा घोर शखनाद झाला. त्याबरोबर पौरादिकांनीं वसिष्ठादिकांच्या पायावर पुष्पांजलिपरंपरा सोडली. राजानें सभेचें विसर्जन केलें. सर्व स्वस्थानीं गेले. अवशिष्ट दिनकृत्यें आटोपून रात्रीं विश्रांतीच्या शान्त वेळीं त्यानीं मुनीच्या उपदेशाचा विचार केला. त्यामुळें ती रात्र केव्हां गेली हेंही कोणाला समजलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते सर्व सभास्थानीं आले व परस्पर सत्कार करून श्रवणोचित स्थानीं बसले ६९.

**सर्ग ६६**—वसिष्ठांनीं पुष्कळ शोध केल्यावर तो भिक्षु त्यांना दिसला व तसेच दुसरेही मागचे व पुढचे मुनी भेटले.

**श्रीवाल्मीकि**—विश्वामित्र, वसिष्ठ इत्यादिकासह खेचर व भूचर सभेंत स्वस्थ बसले. श्रेष्ठ राजांनीं स्वस्थानीं बसल्यावर थोडीशी विश्राति घेतली. राम-लक्ष्मणादि राजपुत्रही उत्सुक मनानें वसिष्ठ मुनीच्या समोर खालीं तोंड करून बसले. तेव्हा रामाच्या प्रश्नाची अपेक्षा न करिता मुनीश्वर आपण होऊनच त्यास असें सांगूं लागला. कारण दयाळु साधु बलात्कारानें बोध करीत असतात.

**श्रीवसिष्ठ**—बा रघुनंदना, काल मी ज्ञानदृष्टीनें त्या भिक्षूला पुष्कळ वेळ शोधलें. मी तुला सांगितलेली कथा जरी काल्पित होती तरी तिच्या-

मध्यें सर्व संभवनीय गोष्टीच मी सांगितल्या होत्या म्हणून तसला भिक्षु मला कोठें तरी आढळेल, या आशेनें मी ध्यानानें फार वेळ पुष्कळ हिंडलों. पण साती द्वीपें, मोठाले कुलपर्वत, नदीतीर अरण्यातील गुहा इत्यादिकातील कोठेंही तो मला आढळला नाहीं. कारण मनोराज्य बाहेर कसें उपलब्ध होणार ? शेवटीं पहाटे पहाटे मी मनानें उत्तर दिशेंतील प्रदेशात जाऊन पाहूं लागलों, तों वल्मीक नांवाच्या देशाच्या वर जिन नावाचा एक प्रसिद्ध देश आहे. त्यात विहार या नावाचा एक बहुजनाचा आश्रय आहे. तेथें पवित्रस्थानीं, ज्याचे केंस पिंगट वर्णाचे आहेत, असा दीर्घदश नांवाचा भिक्षु एकवीस दिवसांची समाधि लावून, ज्याला घट्ट आडणा लाविला आहे अशा घरासारख्या सुरक्षित कुटींत बसलेला होता त्याच्या समाधीचा भंग होईल, या भीतीनें त्या मुनीचे प्रिय भृत्यही त्याच्यापाशीं येत नसत. आजच त्या भिक्षूला अत्य साक्षात्कार होण्याचा दिवस आहे. कारण त्याचें आयुष्य ठरविणाऱ्या विधात्यानें तसाच नियम केला आहे. ध्याननिष्ठ होऊन राहिलेल्या त्याच्या एकवीस रात्री निघून गेल्या आहेत. सहस्रावधि वर्षें तो पूर्वोक्त प्रकारानेंच होता. एका प्राचीन कल्पामध्यें तो असाच भिक्षु झाला होता व सांप्रतकाळीं हा दुसरा तसला भिक्षु आहे. या लोकीं तिसरा तसला कोणी आढळला नाहीं. नंतर मी हा सर्ग सोडून दुसऱ्या सर्गांत जाऊन पाहूं लागलों. त्यात तसलाच तिसरा एक भिक्षु मला सापडला. त्या सर्गांतील सर्व ब्रह्मनिर्मित क्रम याच्यासारखाच होता. वास्तव भिन्न भिन्न ब्रह्मांडातही एकसारखेच पदार्थ उत्पन्न होत असल्यामुळें तसले भिक्षुही अनंत असणें अथवा पुढें होणें शक्य आहे. या सभेंतही जे मुनि व ब्राह्मण आहेत त्यांच्या आचरणाप्रमाणें व त्यांच्या आकाराप्रमाणें ज्यांचें आचरण व आकार आहेत असे जन भिन्न भिन्न काळीं व समयीं उत्पन्न होणें शक्य आहे. आज हा जसा नारद आहे तसाच पुढें दुसरा एकादा न होईल किंवा मागें झाला नसेल म्हणून कशावरून ? हाच पूर्वी त्या भिक्षूसारखा अथवा यातीलच दुसऱ्या कोणासारखा झाला नसेल असें निश्चयानें कोणाला सांगता येईल काय ? व्यास, शुक, शौनक, क्रतु, पुलह, पुलस्त्य, अगस्त्य, भृगु, अंगिरा, हे सर्व

आज जसे ज्ञान व कर्म यांनीं युक्त आहेत, तसे दुसरे कोणी किंवा हेच मागेंही कधीं नसतील म्हणून कशावरून ? जगही अतिशय विस्तृत माया पसरली आहे हिच्यामध्यें फार फार दिवसांनीं तुल्य आचार व जन्म यांनीं युक्त असे ते तेच किंवा दुसरे दुसरे लोक निर्माण होतात. पाण्यावरील तरंगांप्रमाणें या सृष्टींत वारंवार विवर्त होत असतात. त्यांतील कांहीं अत्यंत सदृश असतात, कांहीं अर्धसम असतात. कांहीं थोडेसेच एकसारखे असतात, कांहीं अगदींच भिन्न असतात. हरिहरादि मोठमोठ्या ईश्वरानांही मोह पाडणारी ही माया अशी पसरली आहे. रामा, निरवयव कालात्म्यामध्यें मानसचेष्टाही नाहीं, मग देहादि चेष्टालक्षण कर्म तर दूरच राहिलें. अर्थात् ही सर्व शुद्ध भ्रांति आहे. भिक्षूच्या चरित्रातही ती स्पष्टच आहे. जीवटादि अनंत सर्गाकृति व त्याचा साक्षात्कार तरी सत्य कशाचा ? वाहवा, मनोगति कशी भयंकर आहे पहा. हें सर्व केवल प्रतिभा-कल्पना-मात्र विकास पावलें आहे. शुद्ध संवेदनापासूनच हें सर्व अशुद्ध संसारजाल उत्पन्न झालें आहे. भिक्षुमनाप्रमाणेंच सर्व जीवांच्या मनातही जगद्रूप प्रतिभास उदय पावला आहे. व त्याच्या आत आंत आणखी अनेक दुसरे दुसरे संसार उत्पन्न झाले आहेत. ते सर्व आपापल्या दृष्टीनें सत्य व्यवहारच करीत असतात; पण व्यवहाराचें सत्यत्व स्वतः नसून आत्मसत्यतेमुळें आहे. हा भेद वस्तुतत्त्वज्ञानानंतर स्पष्ट होत असतो ६६.

सर्ग ६७—समाधींत मुक्त झालेल्या भिक्षूचा देहनाश. त्याच्याप्रमाणेंच इतरांचा बंध–मोक्ष.

दशरथ—गुरुराज, मी आपले भृत्य त्या भिक्षूकडे पाठवितों. म्हणजे ते कुटीमध्यें समाधिस्थ असलेल्या त्याला सावध करून शीघ्र येथें आणतील.

श्रीवसिष्ठ—राजन्, त्या महाभिक्षूचा तो देह प्राणरहित झाला आहे. प्राणाचें बल वाढविणारा अन्नरस शुष्क होऊन निराळ्याच स्वरूपास प्राप्त झाला आहे. तो आता पुनः जीवंत होण्यासारखा नाहीं. त्याचा जीव ब्रह्मदेवाचा हंस होऊन जीवन्मुक्त दशेचा अनुभव घेत आहे. तो पुनः संसाराचें भाजन होणार नाहीं. त्याचे भृत्य एक महिनाभर वाट पाहून

त्याच्या कुटीचें द्वार बलात्कारानें उघडतील व आंत शिरून गतजीवित झालेल्या त्याला तेथून उचलून जलांत टाकतील. व त्याची काष्ठमयी प्रतिमा करून व ती तेथें बसवून तिची मोठ्या भक्तीनें व दृढमनानें पूजा सुरू करतील. अशा रीतीनें तो भिक्षु देहापासून मुक्त होऊन राहिला आहे. तेव्हां आतां त्याच्या नष्ट शरीराला सजीव कसें करितां येईल ? ही गुणमयी माया दुर्बोधामुळें दुरुल्लंघ्य झाली आहे. पण सत्य आत्म्याच्या बोधानें हिचें अनायासानें उल्लंघन करितां येतें नुसत्या दर्शनानेंच ही बाधित होते. परमात्माच याप्रमाणें अज्ञानामुळें जीवभावास प्राप्त होतो व तो आपल्या विवेकानेंच सर्व आत्मा आहे, असें पाहतो. सर्व प्रतिभास हा स्वबोधानें आत्माच आहे. पण तो अबोधामुळें संसाररूपानें उदय पावलेला असतो. याप्रमाणें प्रत्येक जीवाचें संसारमंडळ भ्रांतीनें उत्पन्न झालें आहे. हिरण्यगर्भाच्या मनापासून याची प्रवृत्ति झाली आहे. म्हणून तो स्वप्नतुल्य होय. चित्त अस्वच्छ असे पर्यंत तो खराच वाटतो. पण वस्तुतः तो तसा नाहीं. या आमच्या म्हणण्याची प्रतीति चित्त शुद्ध झाल्यावर प्रत्येकाला येऊ शकेल. केवल चित्सत्ता घेऊन तिच्यापासून स्वसंकल्पानेंच वेगळा झालेला जीव जरा-मरणादि दुःखाचें पात्र बनला आहे. विचित्र पुण्यशालिनी जीवचित् स्वचित्ताशाच्या नुसत्या स्पंदानेंच पातालादि अधोलोक अथवा देवादिब्रह्मान्त ऊर्ध्व लोक संपादन करून त्यांचा उपभोग घेत राहते. परमात्मचित्‌च प्राणकल्पनेनें स्पंदरूपिणी होऊन व त्यामुळेंच जीव या नांवास पात्र होऊन आत्म्याचे ठिकाणीं देहाकार संभ्रम आणणारी व बाहेर जाऊन विषयाकार संभ्रम आणणारी होते. असो; कांहीं झालें तरी हा परमात्माच सहस्रावधि अध्यासांनीं सहस्रावधि आकारांचा झाला आहे विपरीत ज्ञानाचें कारण बुद्धिस्पंदच आहे. यास्तव समाधीच्या अभ्यासानें बुद्धीला स्पंदरहित केलें म्हणजे भेदबुद्धि आपण होऊनच बुद्धींत लीन होते. नंतर अभेदबुद्धीही आपल्या कारण ब्रह्मामध्यें लय पावते. भेदभावनेनें भेद उत्पन्न होतो. पण अभेदज्ञानानें सर्व भेद गळून गेला म्हणजे पर तत्त्व राहतें. या वस्तुस्थितीमध्यें कोणालाही बदल करितां येत नाहीं. रामा, तूं कोणाही तत्त्वज्ञाला विचारलेंस तरी तो तुला हेंच सांगेल. यास्तव याविषयीं निःशंक होणेंच फार चांगलें.

स्वप्न, जागर, सुषुप्ति, तुर्यता, बंध, मोक्ष इत्यादि आत्मभिन्न कांहीं नाहीं. एक शांति मात्र आहे. सर्वांचा आधार एक चित् आहे. चिच्चंद्रबिंबामध्यें जो कलंकसा भासत आहे तो कलंक नव्हे, तर तें चिद्घनाचें घन स्वरूप आहे. यास्तव तूं त्याच्या विस्तृत पदावर आरूढ हो ऐक्यबोधाचा अवलंब कर. तुझें माहात्म्य अवर्णनीय आहे. तूं ज्याला स्पर्श करतोस त्या पदार्थाला अमृतशरीरी करतोस. तूं आपल्या चिद्विलासांतच विश्रांति घे. हे रामा, तूं या आनंदसागररूपानें रहा. भेदभ्रांतीचा त्याग कर. या पूर्ण-अपूर्ण दशा माझें एकच रूप आहेत असें जाण. ६७.

**सर्ग ६८**—चतुर्विध मौनाचे लक्षण.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तूं सुषुप्त मौनवान् होऊन, चित्तविलासित्व सोडून, संकल्पमलरहित होऊन व तत्पदाचा आश्रय करून रहा.

**श्रीराम**—मुने, वाङ्मौन, इंद्रियमौन व काष्ठमौन मला माहीत आहे. पण सुषुप्तमौन म्हणजे काय ते माहीत नाहीं. यास्तव तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, श्रेष्ठ योगी मुनि दोन प्रकारचा असतो, असें सांगतात. एक काष्ठतपस्वी व दुसरा जीवन्मुक्त कृच्छ्र चांद्रायणादि शुष्क क्रिया ही बंद करून बलात्कारानें इंद्रियसमूहास जिंकणारा मुनि काष्ठतापस होय. (वाङ्मौन व इंद्रियमौन हे याचेच अवान्तर भेद आहेत.) हें सर्व तत्त्वतः जाणून, व्यवहारांत इतर तपस्व्याप्रमाणेंच दिसत असूनही जो आंतल्याआंत निरतिशयानंदानें तृप्त असतो तो मुक्त मुनि होय. या दोन प्रकारच्या शांत मुनिनाथाचा जो चित्तनिश्चयरूप भाव त्याला मौन असें म्हणतात. मौनवेत्ते जन मौन चार प्रकारचें आहे असें सांगतात. वाङ्मौन, अक्षमौन, काष्ठमौन व सौषुप्तमौन. वाणीचा निरोध करणें हें वाङ्मौन, इंद्रियांचा बलात्कारानें निग्रह करणें हें अक्षमौन, सर्व चेष्टांचा त्याग करणें हें काष्ठमौन होय. मनोमौन म्हणून एक पांचवें मौन संभवतें, व तेंही काष्ठतापसाचेंच मरण, मूर्च्छा व सुषुप्ति या अवस्थांत होऊं शकतें, अन्यकाळीं नाहीं. असो; आत्मतत्त्वाचा अनुभव येऊन बोलावयास कांहीं न उरल्यामुळें होणारें जें मौन तें सौषुप्त मौन होय. जीवन्मुक्त त्यावर निर्वाह करतो. या पूर्वोक्त चार मौनांतील पहिल्या तिन्हींचा विषय ( अधिकारी ) काष्ठ-

तापस आहे. सुषुप्त मौनावस्थेंत जीवन्मुक्ताची बुद्धि आसक्त असते; कारण तें मौनच तुर्या होय. पहिल्या तीन प्रकारच्या मौनांत मौनत्व असतें; पण तें मलिन मनोनिश्चयरूप असल्यामुळें जीवाच्या बंधालाच कारण होतें. कारण असल्या मौनानें युक्त असणारा काष्ठतापस समाधींत बलात्कारानें मनोनिग्रह करून आंत अहंभावाचेंही अनुसंधान न करितां व बाहेरही दृश्यरूप प्रपंचास व वाङ्मय नामप्रपंचास स्पर्श न करितां, अज्ञानानें आवृत झालेल्या आत्म्यास न पाहतांच, निद्रावस्थेप्रमाणें नित्य आत्मदृष्टीचा लोप झालेला नसल्यामुळें राखेनें आच्छादित झालेल्या अग्नी-प्रमाणें साक्षिमात्र ज्योतीनें राहतो. व्युत्थानसमयीं मात्र तो या त्रिविध मौनांतील कोणत्या तरी एका मौनाचा अंगीकार करतो. पण ज्ञानी पुरुषाच्या चित्ताचाच बाध झालेला असल्यामुळें त्याला निरोध-व्युत्थानादि लीला करावी लागत नाहीं तत्त्वज्ञ या त्रिविध मौनावर, हें बंधनिमित्त आहे, असें जाणून रागावोत किंवा तो चिदानंदाचा विलासच आहे, असें समजून न रागावोत, तथापि त्यांना तें ( त्रिविध मौन ) ग्राह्य वाटत नाहीं परंतु हें जें शेवटचें सुषुप्त मौन आहे तें जीवन्मुक्ताचें आहे, असें अनुभवानें सिद्ध झालें आहे. ज्याला पुनः जन्म घ्यावयाचा नसतो त्याला तें होतें. यास्तव तूं तें ऐक. तत्त्वदर्शन सिद्ध झालें म्हणजे यत्नावाचूनच हें मौन सिद्ध होत असतें. यास्तव त्याकरितां पूर्वींच्या मौनांप्रमाणें क्लेश करावे लागत नाहींत. यांत प्राणांच्या त्रिविध गतींचा निरोध करावयास नको. तत्त्ववेत्याचें मन विषयहर्षानें उल्लसित होत नाहीं व निरोधक्लेशानें म्लान होत नाहीं. ज्ञानाच्या योगानें बाधित झालेलें तें नानात्वसंकल्प करीत नाहीं, शांतही नसतें, त्याला मन अथवा अमन म्हणतां येत नाहीं. त्याला सत् व असत्‌ही म्हणवत नाहीं. त्याच्यामध्यें तारतम्यविभाग नसतो त्याला अभ्यासाची अपेक्षा नसते. व अशा अवस्थेस प्राप्त झालेल्या मनालाच सौषुप्त मौन म्हणतात. जगद्भ्रमाचें अधिष्ठान असें जें आत्मतत्त्व तें सदा एकरूपानें स्थित आहे, असें जाणून निःसंदेह व अनंत होऊन राहिलेल्या मनाला सौषुप्त मौन म्हणतात. शिव-आत्म्यानें पूर्ण, अशून्य व विवर्तशून्य अशा त्या उत्तम मौनांत जीवन्मुक्त मुनि राहतात. मी नाहीं; दुसरा कोणी नाहीं; मन नाहीं,

मानस नाहीं; अशी अविच्छिन्न समजूत होणें हीच अति मौनता आहे. मीच सत्तास्वरूप सर्वांमध्यें आहें, अशा रीतीचें सत्तासामान्यच सौषुन-मौन आहे. ज्यावेळीं सर्व संवित् आहे, असें कळतें तेव्हा स्व, अन्य इत्यादि कल्पनाच नाहींशा होतात व अनंत सौषुप्तमौन विस्तार पावून राहतें, तेंच अविद्येचा बाध झाल्यामुळें तुर्य व बाधकवृत्तीचाही बाध झाल्यामुळें तुर्यातीत होय. तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेल्या सात भूमिकांतील शेवटच्या तीन भूमिका म्हणजे या मौनाचेच भेद आहेत. व ते जाग्रत्कालींही अनुभवास येतात. ज्याच्या सर्व मलिनवृत्ति शांत झाल्या आहेत, असा जीवन्मुक्त व्यवहार करीत असला तरी व समाधि लावून बसलेला असला तरी नित्य तुर्यस्थच आहे. तो सदेह असला तरी विदेहच आहे. ही स्थिति स्थूल व सूक्ष्म असे दोन्ही आकार बाधित करून निराकार होणाराला प्राप्त होण्यासारखी आहे. हे रामा, तूं ओंकारोच्चारण करून संसारवासनाशून्य एक तुर्यरूप होऊन रहा ६८.

**सर्ग ६९**—गणांचेंही रुद्रत्व, मुक्तांची ऐच्छिक स्थिति, योगानें प्राणांचा लय, व मरणानें पुनरुद्भव.

**श्रीराम**—हे मुनिनायका, शंभर रुद्र कोठून आले. गणांनाच रुद्र म्हणतात कीं काय ?

**श्रीवसिष्ठ**—पूर्वी वर्णन केलेल्या त्या त्या जन्मादि-प्रस्तावनेवरून तुला हें कळलेंच आहे. भिक्षूनें शंभर स्वप्नें व शरीरें पाहिलीं असा याचा तात्पर्यार्थ आहे. शंभर गणही जीवटादिकांचे आकारच होत. ते गण असले तरी ऐश्वर्यादि साम्यामुळें रुद्रच होत. पण त्यांचें ऐश्वर्य मुख्य रुद्राच्या अधीन असल्यामुळें त्यांना गण असें म्हणतात.

**श्रीराम**—भिक्षूच्या स्वप्नकृत रुद्रानें एका चित्तापासून अनेक चित्तें कशीं केलीं ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, अनीश्वर व अज्ञ पुरुषांना जरी असलीं दिव्य कर्में करतां न आलीं तरी नित्य ज्ञानैश्वर्यसंपन्न सत्यसंकल्प ईश्वराला तीं कठीण नाहींत. कारण तो सर्वेश्वर सर्वात्मा सर्वगत असल्यामुळें ज्याची जेथें जशी भावना करतो तसें तत्काळ तेथें पाहतो.

श्रीराम—त्यांना असें जर ऐश्वर्य आहे तर हरि--हरादिक मानुषयोनींतील अवतार, श्मशानवास, इत्यादि मालिन्य व कष्ट आपल्या ठिकाणीं कां कल्पितात. शुभ कल्पनाच का करीत नाहींत ?

श्रीवसिष्ठ—महेश्वर, सिद्ध व जीवन्मुक्त याना क्रियानियम नाहीं. अज्ञांकरिताच तो कल्पिलेला आहे. अज्ञाचें चित्त राग, द्वेष, लोभ, क्रोध इत्यादि अनेक दोषानीं प्रतिक्षणीं तोडलें जात असल्यामुळें आपल्याच जातीच्या दुर्बलांना खाणें या मत्स्यन्यायानें व्यवहार करीत राहतें. यास्तव अशा चित्तानें मंडित झालेला अज्ञ क्रियांना प्रतिबंध न करितां जन्म-परंपरा--नरकादिरूप दुःख--भोगतो. पण सुज्ञ इष्टानिष्ट वस्तूमध्यें निमग्न होत नाहीं. कारण त्यानें आपल्या इंद्रियाना नियत केलेलें असतें. तो विवेकी व वासनारहित असतो. ज्ञानी अकस्मात् प्रादुर्भूत झालेलीच क्रिया सदा करितो किंवा कांहीं करीत नाहीं. त्याचा कशाविषयींही आग्रह नसतो. विष्णुही अशाच रीतीनें पूर्वी मनुष्य इत्यादि झाला. शिव व ब्रह्मा याच्या व्यवहाराला सुद्धा हाच न्याय लागू आहे. ज्ञानी पुरुषाला कांहीं निंद्य किंवा अनिंद्य नाहीं; ग्राह्य किंवा त्याज्य नाहीं; स्वकीय अथवा परकीय कर्म नाहीं. अग्निप्रभृति पदार्थांचे औष्ण्यप्रभृति धर्म सृष्टीच्या आरंभीं जसे रूढ झाले आहेत, त्याचप्रमाणें हरादिकाचें कर्म व ब्राह्मणादिकाचे वर्ण सृष्टीच्या आरंभापासून रूढ झाले आहेत. अज्ञाची चेष्टा तशी सृष्टीच्या आरंभीं नियतरूपानें निर्माण झालेली नसते. तर सृष्टि झाल्यानंतर निर-निराळ्या विषयानुभवजन्य संस्कारामुळें त्याच्या पृथक् क्रिया होऊं लाग-तात. स्वाभाविक रागादिदोषवशात् ते स्वयं त्याची कल्पना करितात.

असो; रामा, देहयुक्त असलेल्या पुरुषाच्या उपयोगी असलेलें चार प्रकारचें मौन मी तुला सांगितलें. आता विदेहमुक्ताचे मौन ऐक. आका-शाहूनही अतिशय स्वच्छ चिदात्मरूपाची प्राप्ति होणें हेंच परम श्रेय ( मोक्ष ) आहे. पण तो कसा मिळतो तें ऐक. यथार्थ ज्ञानानें, नित्य एकसमाधीनें व विवेकप्रयुक्त राजयोगानें जे आत्मज्ञ झालेले असतात ते सांख्ययोगी होत. प्राणादि वायूची शांति करून युक्तीनें जे त्या पदाला प्राप्त झालेले असतात ते योगयोगी होत. या दोन्ही योग्याना या देहानें प्राप्य निरुपद्रव पद आहे. म्हणून भगवानानें ‘ सांख्यां-

चेंच स्थान योग्यांना मिळतें. यास्तव सांख्य व योग एकच आहे; असें सांगितलें आहे. रामा, ज्यामध्यें प्राण व मन यांच्या वृत्ति मुळींच नसतात व वासनांचाही अभाव असतो, तेंच परम पद आहे, असें समज. अंतःकरण, इंद्रियें व प्राण यांच्या क्रियांना वासनासंघरूप मनच कारण होतें. यास्तव सांख्य व योग यातील कोणत्या तरी एका साधनानेंच त्याचा विलय होणें शक्य आहे. देहाहंकारादि सर्व संसार मनोमूलक आहे. यास्तव मनाची शांति झाली असतां संसाराची शांति होणें योग्यच आहे. आत्म्याला विसरल्यामुळें द्वैताचा प्रतिभास होऊन सर्व संसार पसरला आहे, यास्तव आत्मदर्शनानें ( म्हणजे सांख्ययोगानें ) आत्म्याचें अज्ञान नाहींसें होऊन मनासह सर्व अविद्याविलास बाधित होतो. अहंकार, ममता इत्यादि सर्व मनाचीं कार्यें आहेत. आत्मज्ञानानें मनाबरोबर त्यांचीही निवृत्ति होते. मन क्षीण झालें, कीं कोठला संसार व कोठला मोक्ष. एका परम तत्त्वाचा दृढ अभ्यास, प्राणाचा लय व मनाचा निग्रह यांमध्यें मोक्षशब्दाचा अर्थ येऊन जातो.

**श्रीराम**—प्राणाचा विलयच जर मोक्षाचें कारण असेल तर मेलेले सर्व प्राणी मुक्त झाले आहेत, असें समजण्यास कोणती हरकत आहे ?

**श्रीवसिष्ठ**—या तीन उपायांपैकीं मनःशांति हा उत्तम उपाय आहे. यास्तव सत्वर त्याच कल्याणकर उपायाचें अनुष्ठान करावें. प्राण शांत होऊन घुरघुर शब्द करणारें हें तुच्छ शरीर जेव्हां सोडतात तेव्हां वासना, काम, कर्म इत्यादिकांनीं उत्पन्न केलेल्या भावी देहाचा आकार पाहून जीव बाह्य आकाशांत शिरतो व उत्तर देहारंभास अनुकूल अशा सूक्ष्म भूतांशांशीं संगम पावतो. त्या भूतमात्रा त्या त्या जीवाच्या वासनात्मक होतात. त्यामुळें त्या इतर भूतांशीं मिळत नाहींत. तर घटकांशाप्रमाणें पृथक् होऊनच राहतात. नंतर त्या तसल्या वासनायुक्त मनोविशिष्ट प्राणांशीं संयुक्त होतात. प्राण दुसऱ्या देहांत त्या देहाविषयींच्या वासनेनें युक्त होऊनच उत्पन्न होतात. कारण भाविदेहवासनेसहितच ते पूर्व देहालाही सोडतात, व दुसऱ्या देहांत हृदयाकाशाशीं व त्यांतील स्वभावसिद्ध वायूशीं केवळ दुःख भोगण्यासाठींच संबद्ध होतात, जलयुक्त घट समुद्रांत बुडविला तरी जसा नाहींसा होत नाहीं, नुस्ता बाहेरच्या

लोकांना दिसेनासा मात्र होतो, त्याप्रमाणें वासनासहित मन नुस्त्या मरणानेंच शांत होत नाहीं. प्राण जेव्हां उत्पन्न होतात तेव्हां ते मनासहवर्तमानच उद्भवतात. ज्ञानावाचून मन प्राणांना कधींही सोडीत नाहीं. ज्ञानामुळें तें वासनाशून्य होऊन आपोआप नाश पावतें. मनोनाश झाला कीं प्राणस्पंदही बंद होतो, आणि शेवटीं शांति अवशिष्ट राहते. ज्ञानामुळें सर्व पदार्थ असत् होतात. पदार्थांच्या असत्त्वामुळें वासनानाश होतो व त्यामुळें प्राण व मन यांचा वियोग होतो. त्यानंतर अतिशय शांत झालेलें मन पुनः देहतेस प्राप्त होत नाहीं. तें स्वनाशानें परमपदरूप होतें. वासना हेंच मन आहे. त्यामुळें वासनांचा अभाव म्हणजे परमपदच होय. ज्ञानही वासनेसह सर्वांचा बाध करून आत्मतत्त्वच बनतें. रामा, याप्रमाणें या संसाराचा अंत होतो. एकार्थाचा अभ्यास, प्राणनिरोध व चित्ताचा क्षय, यांतील एक सिद्ध झाला कीं तो इतरांना सिद्ध करितो. पंखा हालविणें बंद केलें कीं त्याचा वारा जसा थाबतो त्याप्रमाणें प्राणवायूचा स्पंद थांबला, कीं मन शांत झालेंच म्हणून समज. शरीराचा अकस्मात् नाश झाल्यास प्राण आकाशांत जातात; तेथें वासनेप्रमाणें भावी देहादि सर्व पाहतात व कर्मामुळें उत्पन्न झालेला जशा प्रकारचा-देव, मनुष्य, पशु इत्यादिसंबंधी- देह ते पाहतात तदनुरूप व्यवहाराचाच अनुभव घेतात. पुष्प व सुवास, तिळ व तेल याप्रमाणें प्राण्याचें चित्त व प्राण एकमेकास न सोडता राहणारीं आहेत. मनाचें स्पंदन हाच प्राण व प्राणाचें स्पंदन हेंच मन. हीं दोन्ही परस्परांचा रथ व सारथि होऊन सतत विहार करीत असतात. त्यामुळें एकाचा बाध झाला असता दुसऱ्याचीही तीच दशा होते, व मोक्षाख्य उत्तम कार्य होतें.

यास्तव रामा, तूं अनंतात्मतत्त्वाचा विचार करून मनाला तन्मय कर. म्हणजे मन स्वयंलीन होऊन तेंच पद होईल. अथवा भाव व अभाव या दोन्ही वृत्ति जेथें शांत होतील तेंच चिन्मात्र असून त्यामध्येंच प्राणधारणेनें स्थिर हो. सर्व एकाकार होईतों एकतत्त्वाचा अभ्यास केला पाहिजे. आहार मिळाला नाहीं म्हणजे देह जसा क्षीण होतो, त्याप्रमाणें मनाला निरोध करणाराचें मन प्राणासह क्षीण होतें व परम तत्त्वच अवशिष्ट राहतें. दीर्घ अभ्यासामुळें एकाग्र झालेलें चित्त क्षणात शांत होतें. हेंच प्रस्तुत

सांख्य व योग यांचें मुख्य व एक फल आहे, अविद्यारहित चित्ताला सत्त्व असें म्हणतात कारण त्यांतील संसारबीज जळलेलें असतें. म्हणून तें पुनः संसारांकुर उत्पन्न करूं शकत नाहीं. अशा सत्त्वामध्यें स्थित असलेला वासनाशून्य पुरुष शून्याचीच ज्याला उपमा आहे, अशा ज्योतीला पाहतो व शांत होतो. तो पुनः कलामलिन पदास प्राप्त होत नाहीं ६९.

**सर्ग ७०—वेताल व राजा यांच्या संवादाचा सुंदर इतिहास.**

**श्रीवसिष्ठ**—विचारसूर्याचा उदय होताच जीव तत्काल अजीव व चित्त तत्काल अचित्त होतें. मन, अहंता इत्यादि सर्व मृगजलासारखें दिसतें संसार ही स्वप्नभ्रांति आहे, याविषयीं वेतालानें केलेले हे शुभ प्रश्न ऐक. या प्रसंगीं मला त्याची सहज स्मृति झाली. विंध्यारण्यांत एक धिप्पाड आकाराचा वेताल आहे. तो मागें एकदा गर्वानें एका देशांत त्याचा विध्वंस करण्याकरितां आला व एका सज्जन राजाच्या देशांत ( किरातराज्यांत राहणाऱ्या कर्कटीप्रमाणें ) अनेक वध्य जनांचा बलि खाऊन व नित्य तृप्त होऊन शांतचित्तानें राहूं लागला. तो क्षुधित असला तरी समोर आलेल्याही निरपराध नराला निष्कारण खात नसे. संत नेहमीं न्यायदर्शक असतात. पुढें वध्य जनच नाहींसे झाल्यामुळें तो तेथून निघून आपल्या अरण्यगृहास गेला. पण तेथें पुढें एकदा पुष्कळ क्षुधा लागल्याकारणानें दुसऱ्या एका राजाच्या राजधानींत न्यायानें मिळालेलें भक्ष्य खाण्याकरिता रात्रीं गेला. तों इतक्यांत रात्रिचर्येकरिता ( रात्रीं वेष बदलून दुष्टजन कोण कोण आहेत तें पाहण्याकरिता व चोरादिकांना मारण्याकरिता राजानें गावांत फिरणें ही रात्रिचर्या होय. ) निघालेला राजा त्याला भेटला. तेव्हां तो निशाचर घनघोरशब्दानें त्यास म्हणाला.

**वेताल**—राजन्, आज तूं मज भयंकर वेतालाच्या हातांत सांपडला आहेस. आतां कोठें जातोस? तुझा नाश झाला आहे, असें समज व आज माझें भक्ष्य हो.

**राजा**—हे रात्रिचरा, अन्यायानें व बलात्कार करून जर तूं मला भक्षण करशील तर तुझें मस्तक शतधा विदीर्ण होईल, यांत कांहीं संशय नाहीं.

**वेताळ**—मी तुला अन्यायानें खाणार नाहीं. माझा न्याय मी तुला सांगतों. तूं राजा आहेस. यास्तव याचकांच्या सर्व आशा तुला पूर्ण केल्या पाहिजेत. राजन्, तूं माझीही याचना पूर्ण कर. ती तुला पूर्ण करतां येण्यासारखी आहे. मी विचारितों त्या प्रश्नाचें उत्तर सांग. १ ब्रह्मांडें कोणत्या सूर्याच्या किरणांचे सूक्ष्म अणु आहेत. २ कोणत्या वायूमध्यें हे अनेक महाकाशरूपी रेणू उडत असतात. ३ एकांतून दुसऱ्यात, दुसऱ्यातून तिसऱ्यात इत्यादि प्रकारें अनेक ( शतशः ) स्वप्नांतून हिंडत असतांनाही आपलें प्रकाशमय स्वरूप कोण सोडीत नाहीं. ४ केळीचा खांब जसा नुस्ता सोपटांनीं वेढलेला असतो त्यात दुसरें कांहीं सार नसतें, त्याप्रमाणें एकांत एक एकात एक असा आंत आत कोण अधिक अधिक सूक्ष्म होत गेला आहे? ५ ब्रह्मांडें, आकाशें, भूतांचे संघ, सूर्यमंडळें, मेरू इत्यादि कोणत्या अणुस्वरूपाचे परमाणु आहेत? ६ कोणत्या निरवयवाची त्रिभुवन ही मज्जा आहे? हे राजा, माझ्या या प्रश्नाचें उत्तर जर न देशील तर तूं दुरात्मा आहेस, असें समजून मी तुला खाऊन सोडीन; कारण तूं आत्मघातकी आहेस, असें कळून चुकल्यावर कृतांत जसा जगाला किंवा एकादा सामान्य पुरुष पिकलेल्या सुंदर फळाला तोंडांत टाकतो, त्याप्रमाणें तुला गट्ट करण्यास मला मुळींच भीति वाटणार नाहीं ७०.

**सर्ग ७१**—अनंतकोटि ब्रह्मांडे हींच फळझाडें इत्यादि रूपकांनीं पाहिल्या प्रश्नाचें सविस्तर उत्तर.

**श्रीवसिष्ठ**—वेताळाचे हे प्रश्न व शेवटचें भाषण ऐकून राजा हंसून म्हणाला, "निशाचरा, तूं, मी व या सर्व जीवानीं ज्याचा आश्रय केला आहे, असें हें ब्रह्मांड अज्ञांच्या दृष्टीनें अजर फळ आहे. त्यावर उत्तरोत्तर दसपट अशा पंचभूतरूपी साली आहेत. अशीं सहस्रावधि ब्रह्मांडफळें ज्यामध्यें आहेत अशी पंचीकृत पंचमहाभूतें ही त्याची शाखा आहे. तिला भुवनें हींच चंचल पानें आहेत. अशा सहस्रावधि शाखा ज्याला आहेत, असा गंधतन्मात्र या नावाचा एक महावृक्ष आहे. तो अतिशय विपुलाकार असला तरी दुर्लक्ष्य आहे. तसले सहस्रावधि वृक्ष ज्याच्यामध्यें आहेत असलें एक मोठें ( रसतन्मात्ररूप ) वन आहे.

त्यांत अनेक ठिकाणीं अनेक वृक्षगुल्म आहेत. अशीं सहस्त्रावधि वनें ज्यांत आहेत असलें एक फार मोठें ( रूपतन्मात्रा ) पर्वतशिखर आहे. तसल्या अनंत शिखरांनीं भरलेला असा एक ( स्पर्शतन्मात्रा ) विस्तृत प्रदेश आहे. ज्यांत तसले अनेक प्रदेश आहेत असें एक अनेक नदनदीयुक्त ( शब्दतन्मात्रा ) द्वीप आहे. तशा सहस्त्रावधि द्वीपानीं भरलेलें एक विचित्ररचनायुक्त पृथ्वीपीठ (हिरण्यगर्भाचें मन) आहे. तसल्या असंख्य पृथ्वीपीठानीं भरलेलें एक ( भूतमात्रांचा समूह ) महाभुवन आहे. तसल्या हजारों महाभुवनांस आपल्या पोटांत सांठविणारें एक मोठें अंड ( कल्पकाल ) आहे. तें आकाशपीठाप्रमाणें भयंकर आहे. तसलीं अनेक अंडीं ज्यामध्यें करंड्यासारखीं रहात आहेत असा एक निश्चल ( ब्रह्मदेवाचा आयुःकाल ) सागर आहे. तसल्या असंख्य सागरांना आपल्या पोटांत सांठविणारा एक निर्मळ महासागर ( विष्णूचा आयुःकाळ) आहे. तसल्या अनेक महासागरांस आपल्या उदरांत सांठविणारा एक पुरुष विष्णु आहे. पण तसल्या लक्षावधि पुरुषाची माळा ज्याच्या उरःस्थलावर शोभत आहे व जो सर्व सत्तांचें मुख्य निमित्त आहे, असा एक (शबलब्रह्म) पर पुरुष (रुद्र) आहे. व तसले सहस्त्रावधि महात्मे पुरुष ज्याच्या मंडलामध्यें जिवंत पुरुषाच्या अंगावरील केंस व रोम, याप्रमाणें उद्भवतात असा एक महा आदित्य आहे. बाह्य दृष्टीनें या ज्या रुद्रापासून ब्रह्मांडापर्यंत कल्पिलेल्या शेंकडों दृष्टि त्या सर्व प्राण्यांस प्रत्यक्ष आहेत व त्या सर्व या सूर्याच्या किरणरूप आहेत. ब्रह्मांडें हे या सूर्याच्या प्रकाशाचे त्र्यसरेणु ( कवडशात दिसणारे बारीक कण ) आहेत. वेताला, अशा रूपकानें मीं तुला हा चिदात्मा सांगितला आहे. तो हें सर्व प्रकाशित करतो. हा विज्ञानात्माच परम भास्कर आहे. यांच्या प्रकाशानेंच सर्व वस्तु प्रकाशमान होतात व याच्या सत्तेनेंच त्यांना सत्ता मिळते. रे वेताला, जो या आत्मज्ञानाचा मुख्य अधिकारी असतो त्याला शास्त्रजन्य अखंडाकार साक्षात्कारानेंच आत्मलाभ होतो. पण जे अधिकारी नसतात त्यांच्याठिकाणच्या अस्फुट प्रत्यगात्म्यामध्यें अग्नि व त्याचीं किटाळें या न्यायानें, जीव, जगत्, भुवनाची पृथक् सत्ता, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि अनेक

भ्रमांच्या छटा असतात; तथापि त्या खऱ्या नव्हेत. यास्तव तूं उगीच प्रश्नांचें अवडंबर करूं नकोस. शांतचित्त होऊन रहा. ७१.

सर्ग ७२—वेतालाच्या राहिलेल्या पांच प्रश्नांचें उत्तर.

राजा—२ कालसत्ता, आकाशसत्ता, स्पंदसत्ता, शुद्धचेतनसत्ता इत्यादि सर्व त्या परमात्ममहावायूतील, पुष्पांतील सुवासाप्रमाणें, कल्पित चंचळ रज आहे. ३ या जगत्संज्ञक महास्वप्नांतच अनेक स्वप्नें पहात असतांनाही शांत ब्रह्म आपलें स्वरूप सोडीत नाहीं. ४ केळीच्या खांबांतील पानांप्रमाणें या ब्रह्मामध्येंच उत्तरोत्तर आंत आंत अशीं अनेक ब्रह्मांडें भरलेलीं आहेत. विवर्तभूत जगाला वाढविणें इत्यादि निमित्तांनींच त्या अनिर्वाच्य तत्त्वाला ब्रह्म, आत्मा, सत् इत्यादि नांवें योजितात. पण तें तत्त्व सर्वधर्मशून्य असल्यामुळें वस्तुतः तें त्यांतील कोणत्याही नावास पात्र होत नाहीं. वस्त्राच्या अस्तित्वाचें पर्यवसान, तंतूंच्या सत्तेत होतें, तंतूंच्या सत्तेचें पर्यवसान कापसाच्या सत्तेत, कापसाच्या सत्तेचा अंत कापसाच्या बोंडांच्या सत्तेत, बोंडांच्या सत्तेचा अत कापसाच्या झाडाच्या सत्तेत व झाडाच्या सत्तेचा अंत सरकी, माती, जल इत्यादिकांच्या सत्तेत होतो; आणि उत्तरोत्तर अशा क्रमाने ज्या ज्या सत्तेची कल्पना करावी ती ती सत्ता अनुभवनिर्मित आकारांस सोडून, केळीच्या खांबाप्रमाणेंच, अनुभवरूप चिन्मात्र सत्तेत पर्यवसान पावते. यास्तव तेंच निर्मळ चिन्मात्र जगाच्या आकारानें पसरलें आहे. हा परमात्मा अतिशय सूक्ष्म व त्यामुळेंच अविषय असल्यामुळें याला अणूहून अणु म्हणतात. व ५ तो अनंत असल्याकारणानें मेरुप्रभृतींचें मूळ झाला आहे. अणुरूप असलेल्याही त्या अनंत पुरुषापुढें हे जगदादि आकार परमाणूसारखे भासतात. पण ते अतिसूक्ष्म चित्कणानें मर्यादित होत असल्यामुळें वस्तुतः निःस्वरूप आहेत. ६ हा पर अणु चक्षुरादि इंद्रियांचा विषय होत नाहीं. पण तो सर्वत्र व्यापून राहिला आहे. यास्तव तो महापर्वत आहे. अध्यारोपदृष्टीनें तो सर्व मूर्त व अमूर्त पदार्थ याच अवयवरूपानें युक्त आहे असें जरी वाटलें तरी अपवाददृष्टीनें अवयवशून्य आहे. जगत्रय ही याच ज्ञप्तिरूप परमात्म्यामध्यें सांठवलेली मज्जा आहे. हे साधो, जगत्रयाचा ( आंतील ) मध्यभाग विज्ञानमात्र, आहे, असें समज. हे बाळा वेताला, जगें हा

विज्ञानमात्राचा प्रकट झालेला मिथ्या विकार आहे. पण तें आत्मतत्त्व तुझ्यासारख्या वेताळांना अलंध्य आहे. यास्तव माझ्या सागण्यावरून तूं आतां अशा स्वभावाच्या आत्म्याचा स्वतः अनुभव घे व दर्प सोडून रहा ७१.

**सर्ग ७३**—भगीरथाच्या वृत्तान्ताचा उपोद्घात.

**श्रीवसिष्ठ**—राजाच्या तोंडचें हें सर्व उत्तर ऐकून व पूर्वींच आत्मज्ञ असल्यामुळें विचारोचित बुद्धीनें त्याचें ग्रहण करून वेताल शात झाला. त्याचें मन अतिशय शात झालें. राजा अगदीं अजिंक्य आहे, असें जाणून व आपल्या असह्य क्षुधेलाही विसरून तो समाधिस्थ झाला. असो; रामा, मी हें तुला वेतालाच्या प्रश्नाचें वर्तमान सागितलें. त्यांत म्हटल्याप्रमाणें चिदणूमध्यें हें सर्व जग राहिलेलें आहे. ते विचारानें विलीन होतें. व परमपद अवशिष्ट राहतें. दृढ निश्चयानें चित्ताला सर्वबाजूनीं प्रतिबंध करून परमात्म्याकडे वळवावें व शातचित्त होऊन निरिच्छ रहावें. हे मननशील राजपुत्रा, मनानेंच मनाला निर्मल करून, परमात्म्यामध्यें सर्व वृत्तींचा लय करून व त्यामुळेंच शातचित्त होऊन सर्वत्र सम ब्रह्मच पहात रहा. तूं स्थिरचित्त व संमोहरहित होऊन प्राप्त होईल त्याप्रमाणें अनुवर्तन करणाऱ्या राजा भगीरथाप्रमाणें वर्तन ठेव. म्हणजे तुला असाध्य कार्यही सुसाध्य होईल. संपूर्ण, शांतचित्त, तृप्त व मनानें नित्य सम सुखमय आत्म्यामध्यें राहणाऱ्या महात्म्याचें गगावतारासारखें अति दुर्लभ इष्टही साध्य होतें ७३.

**सर्ग ७४**—भगीरथाचे गुण, विचारजन्य चिंतन, त्रितलाशीं संवाद व त्यागाची इच्छा.

**श्रीराम**—राजा भगीरथानें कोणत्या चमत्कारिक उपायानें गंगेला खालीं आणून सगर-पुत्रांचा उद्धार केला, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—भगीरथ या नावाचा एक परम धार्मिक व समुद्रवलयांकित पृथ्वीचा मुख्य सौभाग्यालंकार असा राजा झाला. याचकांस नुस्ता संकल्प करितांच त्या राजापासून इष्टार्थाचा लाभ होत असे. ( म्हणजे याचनादि आयास केल्यावाचून त्याचें कार्य होत असे. ) तो नेहमीं प्रसन्नवदन होता. साधूंच्या निर्वाहाकरितां तो सतत धन-दान करीत असे. व आयस्थानीं न्यायानें प्राप्त झालेलें तृणही सोडीत नसे. तो सर्व दुर्जनाच्या

चेष्टा व्यर्थ करून सोडीत असे. त्याची शरीरकांति धूमरहित अग्नीसारखी असे. तो प्रजापालनार्थ सतत परिश्रम करून थकलेला असला तरी लोकांच्या अधर्मप्रवृत्तीस आळा घालण्यास सदा सज्ज राही. तो आपल्या प्रतापाचे किरण सर्वतः पसरून दुर्जनांना भयभीत करीत असे. सुज्ञ पुरुषांना तो चंद्रासारखा आल्हाददायक वाटत असून ते सतत त्याच्या उदयाचीच इच्छा करीत असत. त्यानें गंगाप्रवाहरूप जगद्यज्ञोपवीताचा तिसरा तंतु भागीरथीला भूमीवर उतरवून पुरा केला. अगस्त्यानें शुष्क करून सोडलेल्या सागराला यानें गंगेच्या पाण्यानें भरून सोडलें. त्या लोकबंधूनें गंगारूपी शिडी लावून पातालांतील आपल्या पूर्वजांना ब्रह्मलोकीं धाडलें. आपल्या दृढनिश्चयी मनामुळें ब्रह्मा, शंकर व जह्नु यास तपाच्या योगानें प्रसन्न करीत असताना त्याला वारंवार अनेक क्लेश भोगावे लागले. तारुण्यांत विचार व वैराग्य हीं दोन्हीं फार दुर्लभ असतात; पण भर तारुण्यांत असतानाही या व्याकुल लोकयात्रेचा विचार करणाऱ्या त्या राजाच्या मनांत वैराग्ययुक्त विवेक उद्भवला व त्यानें एकांतात बसून या जगद्यात्रेविषयीं असा विचार केला. हा जगद्व्यवहार अतिशय आकुल आहे. पुनः पुनः दिवस व पुनःपुनः रात्र; पुनः तेंच देऊन तेंच घ्यावयाचें. ज्याचें फल अनेकदा भोगलें आहे व जें भोगानंतर विरस आहे, असें ठरलें आहे तेंच तें कर्म जीव पुनःपुनः करीत असतो. पण मला असें वाटतें, कीं जें प्राप्त झाले असता या लोकीं अप्राप्य असें रहातच नाहीं तेंच सुकृत करावें, बाकीचा व्यर्थ खटाटोप आहे. मूढबुद्धि पुरुषाला पुनःपुनः तेंच तें करीत असताना कांहीं लज्जाही वाटत नाहीं. पण सुबुद्धिमानानें तेंच कसें करावें ? असा पुष्कळ विचार आपल्याशींच करून भगीरथ एकदा उद्विग्नमनानें आपल्या त्रितल गुरूकडे गेला व संसारास भिऊन त्यानें असा प्रश्न केला.

**भगीरथ**—प्रभो, शून्य अपार अरण्यासारख्या या संसारवृत्तीमध्यें दीर्घकाल फिरता फिरतां आम्ही आता अगदीं श्रांत झालों आहों. यास्तव भगवन्, जरा-मरण–मोहादिरूप दुःखाचा अंत कसा होईल ? तें मला सांगा.

**त्रितल**—राजन्, नित्यानित्यवस्तुविवेक, वैराग्य, शमादिसंपत्ति, मुमुक्षा, श्रवण, मनन, इत्यादि उपायांनीं चिरकाळ अभ्यास केला असतां मन विक्षेपरहित होतें. त्यानंतर ब्रह्मात्मबोध होतो व त्याच्या योगानेंच सर्वदु:खांचा क्षय होतो. सर्व हृदयग्रंथी ( अहंकारादि आग्रह ) तुटतात. सर्व संशय नाहींसे होतात. कर्में क्षीण होतात. आत्मस्वरूपच अतिशुद्ध ज्ञेय आहे. आत्मा सर्वगामी आहे, तो कधीं अस्त पावत नाहीं व कधीं उदय पावत नाहीं.

**भगीरथ**—हे मुनिवर्य, चिन्मात्र, निर्गुण, शांत, निर्मळ व अच्युत असा कोणी आत्मा आहे. देहादि आत्मा नव्हे असें मी जाणतों. पण मला तसा साक्षात् अनुभव येऊन चित्त विक्षेपशून्य होत नाहीं, त्याचें काय कारण ?

**त्रितल**—राजा, मी राजा आहें, प्रजापालन हें माझें कर्तव्य आहे. इत्यादि निरनिराळ्या अनेक अभिमानामुळें तुझें चित्त विक्षिप्त होऊन आत्म्यापासून दूर दूर जात असतें. म्हणून तुला आत्म्याचा साक्षात्कार होऊन शांत स्थितीचा अनुभव येत नाहीं. अमानित्वादि ज्ञानसाधनांच्या योगानें चित्त हृदयाकाशात ज्ञेयाशीं एकरूप होऊन जातें. आणि त्यामुळें जीव पूर्णस्वभाव होऊन पुनः जन्म घेत नाहीं; आपल्या पूर्ण स्वभावापासून च्युत होत नाहीं. ज्ञानसाधनें कोणतीं म्हणून विचारशील तर सांगतों. सामान्यतः कोठेंही आसक्ति न ठेवणें, विशेषें करून पुत्र, स्त्री, गृह, द्रव्य इत्यादिकांचे ठिकाणीं नसणें, इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली तरी नित्य समचित्त ठेवणें निरुपाधिक आत्म्याचें अनन्य योगानें चिंतन करणें, एकांतवास, जनसमूहामध्यें अरति ( अप्रेम ), श्रवण, मनन व निदिध्यासन यांचा अभ्यास, तत्त्वज्ञानानें परमात्मतत्त्वाचें दर्शन, इत्यादिकांस ज्ञानसाधनत्वामुळें ज्ञान व याहून विपरीत भावास अज्ञान असें म्हणतात. हें ज्ञान रागद्वेषक्षयाकार व संसारव्याधीचें औषध आहे. अहंभाव शांत झाला असतां तें प्राप्त होतें.

**भगीरथ**—पर्वतावरील वृक्षाप्रमाणें फार दिवसांपासून या शरीरावर आरूढ झालेला अहंभाव कसा टाकतां येतो, तें मला सांगा.

**त्रितल**—दीर्घ प्रयत्नानें विषयांविषयींच्या भावनेचा त्याग करून व निष्कामतेमुळें व्यक्त झालेल्या शुद्ध आत्मरूप सत्तेस प्राप्त होऊन अहंकार लय पावतो. मी राज्य सोडल्यास मला जन फारसा मान देणार नाहींत; शत्रु हंसतील, सर्वांचे मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ असलेल्या मला भिक्षा मागणें किती निंद्य आहे, वाईट अन्न-पानादिकाच्या योगानें मी जिवंत कसा राहीन, इत्यादि चिंताप्रयुक्त लज्जा, अभिमान इत्यादिकांमुळें बनलेल्या गृहासक्तिरूप पिंजऱ्यास तूं सर्वस्वत्यागानें जोंवर तोडलें नाहींस, तोंवर अहंकार उघड उघड विलास पावणारच. पण विवेकयुक्त शुद्धबुद्धीनें तूं हें सर्व सोडून जर निश्चल राहिलास तर अहंकाराचा लय झाला असता तूंच परम पद होशील. ज्यानें सर्व विशेषणांचा त्याग केला आहे, ज्याची सर्व भीति निघून गेली आहे, ज्यानें सर्व एषणाचा त्याग केला आहे, असा तूं अकिंचन हो. शत्रूंच्या ठिकाणीं समग्रश्रीचा त्याग कर. अहंभाव सोड. देहात्मबुद्धीचा त्याग कर. व शत्रूंच्याच घरोघर जाऊन देहनिर्वाहार्थ भिक्षा माग. असें जर करशील तर तूं आपोआप कृतकृत्य होऊन कांहीं विचारावयाचेंच न राहिल्यामुळें मज गुरूचाही त्याग करून तूं स्वयं ब्रह्मच होशील ७४.

**सर्ग ७५**—यज्ञाच्या मिषानें राज्याचा सर्वस्व त्याग. भैक्षचर्या व एका पर्वतावर त्रितलासह स्थिति.

**श्रीवसिष्ठ**—गुरूचें हें भाषण ऐकून भगीरथानें काय करावयाचें तें मनांत ठरविलें व तो आपल्या व्यापारात निमग्न झाला. त्यानंतर कांहीं दिवस लोटले असता त्यानें सर्वस्वत्याग सिद्ध होण्याकरिता अग्निष्टोम यज्ञ केला. त्यात गाई, भूमि, घोडे, सोनें इत्यादि सर्व प्रकारचें धन गुणी व अगुणी याचा विचार न करिता त्यानें ब्राह्मणास व आपल्या दायादास वाटून दिलें. तीन दिवसातच सर्वस्वाचा त्याग करून तो राजा भगीरथ प्राणमात्र शेष राहिला. नंतर ज्यातील सर्व धन संपलें आहे व पौरजन अतिशय खिन्न झाले आहेत असें राज्य, आपल्या राज्यास ज्याची सीमा लागली आहे अशा एका शत्रूला तृणतुल्य दिलें. शत्रूनें राज्याचें आक्रमण केलें असता मुनि भगीरथ लंगोटी व एक अंगवस्त्र यासह आपल्या देशातून निघाला आणि तो धैर्यवान् जेथें आपल्याला कोणी 'हाच भगीरथ' असा

नांवानें ओळखीत नाहीं. व जेथें लोकांच्या तोंडून आपलें नांवही निघत नाहीं अशा स्थानीं अरण्यात जाऊन राहिला. त्या जागीं थोड्याच काळांत त्याच्या सर्व एषणा शांत झाल्या. तो परम शमाच्या योगानें आत्म्यामध्यें विश्रांति पावला. एकदा भूपीठावरील निरनिराळ्या द्वीपांतून फिरणारा तो कालवशात् नाना चमत्कार पाहण्यांत चित्त आसक्त झाल्यामुळें शत्रूनें आक्रमण केलेल्या आपल्याच राजधानीस येऊन पोंचला. तेथें त्यानें कालाच्या प्रवाहात पडलेलीं नानाप्रकारचीं घरें, पौरजन व मंत्री यास पाहिलें व तो शमवान् त्याच्यापाशीं भिक्षा मागूं लागला. नगरवासी जन व मंत्री यानीं त्या भगीरथ राजास ओळखलें, व मोठ्या विषादानें युक्त होऊन त्यानीं त्याचा मोठा सत्कार केला. 'प्रभो, तूं आपलें हें राज्य घे,' असें म्हणून शत्रून त्याची प्रार्थना केली. तथापि भोजनावाचून बाकी सर्वांना तृणाप्रमाणें लेखणाऱ्या त्यानें राज्याचा पुनः स्वीकार केला नाहीं. काहीं दिवस तेथें राहून तो दुसरीकडे निघून गेला. पण तो तेथें असे-पर्यंत लोक 'हाय हाय, हा पहा आमचा राजा भगीरथ,' असें म्हणून त्याच्यासाठीं रडत असत. ज्याची बुद्धि शात झाली आहे व त्यामुळेंच जो अतिशय सुखी आहे, असा तो राजा एकदा आपल्या आत्म्यामध्यें रममाण होणाऱ्या त्रितल गुरूला भेटला. तेव्हा त्याचें स्वागत करून तो काहीं दिवस त्याच्याच बरोबर वन, ग्राम, पुर, इत्यादि स्थानीं राहिला. समतेस प्राप्त झालेले ते दोघेही गुरुशिष्य सम दशेंत राहिले. मनांत अतिशय स्वस्थ असलेले ते देह धारण करणें हा एक विनोद आहे, असें समजत होते. हा देह धारण करून किंवा त्याचा त्याग करून आम्हांला काय मिळवावयाचें आहे ? शास्त्रोक्त क्रम व शिष्टाचा आचार यांस अनु-सरून तो जसा असेल तसाच असूं दे. वनांतून फिरणारे ते दोघे असा निश्चय करून आनंद नाहीं व निरानंदही नाहीं, अशा परानंदास प्राप्त होऊन राहिले. त्याच्यावर संतुष्ट झालेल्या सिद्धानींही समर्पण केलेलें अष्ट-विध ऐश्वर्य, कुजक्या तृणाप्रमाणें तुच्छ आहे, असें ते मानीत असत. प्रारब्ध कर्म क्षीण होईतों हा देह धारण कर्तव्य आहे, असें मानून ते सुखानें राहिले. आपल्या पूर्व आचरणानें प्राप्त होणाऱ्या सुखदुःखांचें

अभिनंदन करणारे ते मुनि अतिसम ब्रह्माशीं अगदीं एकरूपानें मिळून जाऊन स्वतः निरिच्छ व शांत झाले. ७५.

**सर्ग ७६**—भगीरथाला पुन. राज्यप्राप्ति, ब्रह्मादिकाची आराधना, गंगेचें अवतरण.

**श्रीवसिष्ठ**—एकदा कोणा एका देशातील एका श्रेष्ठ नगरस्थ राजाला मृत्यूनें मारलें. त्यामुळें तेथील प्रजा अतिशय खिन्न झाली. त्याचे देशाचार नष्ट होऊं लागले. म्हणून त्यानीं एक विशालगुणसंपन्न राजा मिळविण्यासाठीं पुष्कळ खटपट व शोध चालविला. इतक्यात त्याना हा स्थिरचित्ताचा भगीरथमुनि भेटला. त्याला त्यानीं ओळखलें व त्याची इच्छा नव्हती, तरी सैन्यात नेऊन त्याला राजा केलें. वर्षासमयीं जलाच्या योगानें मेघ जसा एका क्षणात विलक्षण आकार धारण करतो, त्याप्रमाणें भगीरथही मोठ्या सैन्याच्या योगानें काहीं विलक्षण प्रतापास प्राप्त झाला. तो लागलाच एका मोठ्या गजावर आरूढ आला असता, 'जगन्नाथ भगीरथाचा जयजयकार असो' अशा प्रजेच्या मोठ्या जयध्वनीनें सभोंवारच्या पर्वतांच्या गुहा भरून गेल्या. तेथें राहून राज्य करीत असलेल्या त्याच्याकडे त्याची पूर्वीची प्रजा मोठ्या आदरानें आली व म्हणाली,—"राजा, तूं जो अधिपति आम्हाला दिला होतास, त्याला मृत्यूनें भक्षण करून सोडलें आहे. यास्तव आता आमचेंही पालन तूच कर. आमच्यावर हा एवढा अनुग्रह करणें तुला उचित आहे. याचना किंवा इच्छा न करिता आलेल्या वस्तूंचा त्याग करणें उचित नव्हे."

राघवा, भगीरथानें पूर्वप्रजेचें हें प्रार्थनावचन मान्य केलें व त्यामुळें तो सप्तसागरानीं चिह्नित झालेल्या भूमीचा स्वामी झाला. तो सम, शातचित्त, मौनी, निरिच्छ, मत्सररहित, जें प्राप्त होईल तेवढेंच करणारा व ज्याचा सर्व विस्मय नष्ट झाला आहे असा होऊन राहिला. पातालतळीं नष्ट झालेल्या व सागराना खणून अतिशय खोल करणाऱ्या गंगाजलानें पितामहाचा उद्धार होईल, असें त्यानें ऐकलें. त्या वेळीं गंगा भूमीवरून वहात नव्हती. म्हणून त्या निश्चयी व दीर्घ प्रयत्नशील राजानें गंगेला भूमीवर उतरण्याकरिता त्याच दिवसापासून प्रयत्न केला. राज्यभार मन्त्र्यांवर टाकून शमसंपन्न भगीरथ तप करण्यासाठीं निर्जन वनांत गेला. तेथें ब्रह्मा, शंकर व जह्नु यास प्रसन्न करण्याकरिता सहस्रावधि वर्षें तप करून व त्यांची

अनन्य आराधना करून, त्यानें भागीरथीला भूमीवर आणलें. त्या दिवसा- पासून शंकराच्या उत्तम मस्तकावर असलेली ती देवी आपल्या निर्मळ तरंगांनीं भूमीस पवित्र करीत, महात्म्याच्या पुण्यसंततीप्रमाणें पाप्याचा उद्धार करीत व धर्मसंततीप्रमाणें भगीरथाचें शुभ्र यश त्रिभुवनात पसरीत तीन मार्गांनीं संचार करू लागली ७६.

**सर्ग ७७**—उक्तार्थ दृढ होण्यास्तव चूडालाख्यान सांगतात शिखिध्वजाचें माहात्म्य.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, भगीरथाच्या या शुद्ध बुद्धीचें अनुकरण करून तूंही सम व स्वस्थ हो आणि यथाप्राप्त कर्तव्य कर. प्रथम या सर्व वैभवा- वरील आसक्ति सोडून नंतर तूं मनोरूपी पक्ष्याला आपल्या वश करून घे. आणि शिखिध्वजाप्रमाणें अंतःकरण शांत व अचल ठेवून रहा.

**श्रीराम**—शिखिध्वज हा कोण होता ? व त्याला तें परम पद कसें प्राप्त झालें, हें मला बोधवृद्धीकरिता सांग.

**श्रीवसिष्ठ**—एक दांपत्य गेल्या कल्पातील द्वापारांत होतें व तेंच या कल्पातील द्वापरयुगांतही तशाच आकारानें व प्रेमानें पुनः होईल.

**श्रीराम**—भगवन् , जें पूर्वी होतें तें तसेंच आता पुनः का होईल? तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—ब्रह्मदेवाचा जगन्निर्माणाविषयींचा नियतिरूप सत्यसंकल्प अनिवार्य असतो. त्याची स्थिति नित्य अशीच असते. कांहीं पदार्थ पूर्वी पुष्कळ वेळा होऊन पुनः तसेच निपजतात. कित्येक नवीनच उद्भवतात. व कित्येक एकदाच होऊन पुनः निपजत नाहींत; पण या सृष्टींतील पुष्कळसा भाग तर सरोवरातील तरंगाप्रमाणें जसेच्या तसेच उद्भवतात. या नियमास अनुसरून शिखिध्वजराजाही पुनः उत्पन्न होणार आहे. तो आतां मी सांगत असलेल्या कथेचा नायक आहे. त्याचाच वृत्तान्त तूं ऐक.

गेल्या सातव्या मनूच्या चवथ्या सर्गातील चवथ्या चतुर्युगातील द्वापरांत याच जंबूद्वीपांत कुरुकुलोत्पन्न शिखिध्वज राजा विंध्यपर्वताच्या समीप असलेल्या अवंतीदेशातील उज्जयिनींत राहून राज्य करीत होता. तो श्रीमान् मालवेश्वर धैर्य, औदार्य इत्यादि गुणांनीं युक्त, शम, दम यांनीं

संपन्न, शूर, सदाचरणी, मौनी, गुणसमूहाची खाण, सर्व यज्ञ करणारा, सर्व धनुर्धरास जिंकणारा, सर्व कार्ये करणारा, भूमीचा सुंदर भर्ता, मृदु, स्निग्ध, मधुर, चतुर, प्रीतीचा सागर, सुंदर, शांत, सुभग, प्रतापी, धर्मवत्सल, ऐकणारानाही विनयशिक्षण देणारीं वाक्यें बोलणारा, सर्व संपत्ति देणारा, अनिष्ट विषयाचा भोग घेणारा, सत्संग करणारा, सर्व श्रुतींचा चांगला श्रोता, सर्वज्ञ, मानशून्य व स्त्री—व्यसनरहित होता. त्याचा पिता तो लहान असतानाच स्वर्गलोकीं गेला. तेव्हां त्यानें स्वबलानें आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षी दिग्विजय करून, भूमंडलास साम्राज्यसंपत्तीनें भूषित केलें. नंतर तो निर्भयमनानें प्रजेचें पालन करीत राहिला. त्याच्या यशानें सर्व दिशा शुभ्र झाल्या.

काहीं दिवसानीं एकदा वसंतऋतु आला. त्यामुळें फुलांना भर आला. चंद्राचे किरण स्फुरण पावूं लागले. भ्रमर अनेक पुष्पांतील मध पीत व मदानें गायन करीत फिरूं लागले. मधुर वायु वाहूं लागला. त्यामुळें त्या राजाचें चित्त कामवश झालें. सुगंधितारूपी आसवानें—वसंताच्या योगानें विकसित होणाऱ्या वनाप्रमाणें—त्याचें मन कांतापरायण झालें. तरुण व मुग्ध प्रियेला अंकावर घेऊन, मी उद्यानांत झोंपाळ्यावर कधीं बसेन ? कदलीवनांत तिच्यासह विहार केव्हां करीन, ती सुंदरी मजकरितां मदनाग्नीनें दग्ध होत आहे, असें मी केव्हां पाहीन, इत्यादि चिंतनांत अतिशय आसक्त झालेला राजा शिखिध्वज, पुष्पें वेंचण्याकरितां उद्यानांत गेला. तो तेथें वनपङ्क्तींमध्यें, लीलाकमलिनींमध्यें, लतामंडपांतून, विविध-उद्यानभूमींत इत्यादि स्थानीं तरुण कुमारींचें पूजन करूं लागला. त्यावरून मंत्र्यांनीं त्याचा उद्देश जाणला व त्याच्या विवाहाविषयीं विचार करून, सुराष्ट्राधिपतीची तरुण कन्या निश्चित केली. तिच्याशीं त्याचा यथाविधि विवाह झाला. ती राजाला अगदीं अनुरूप भार्या होती. चूडाला असें तिचें नांव होतें. ती भामिनीही त्या भर्त्यास प्राप्त होऊन फुललेल्या कमलिनीप्रमाणें शोभली. त्या उभयतांची प्रीति उत्तरोत्तर वाढूं लागली. त्यांचें चित्त परस्परांचे ठायीं आसक्त झालें. नूतन वेलीप्रमाणें हाव, भाव, व विलास यांच्या योगानें तिनें त्याचें चित्त हरण केलें. त्यामुळें चांगल्या मंत्र्यांवर राज्यभार टाकून तो निरनिराळ्या रम्यप्रदेशीं तिच्याशीं सुखानें

नानाविलास करीत राहिला. त्या उभयतांनाही परस्पराचें प्रत्येक चेष्टित आल्हादक वाटत असे. तीं दोघेंही निरानिराळ्या कलांत निपुण होतीं. त्यामुळें मित्रत्वास प्राप्त झालेल्या त्यांचें स्वरूप एक झालें. एकादा ब्रह्मचारी गुरूपासून बारा वर्षांत सामवेदाचें ग्रहण जसें करतो, त्याप्रमाणें चूडालेनें शिखिध्वजापासून धर्मशास्त्राचें व चित्रादिकलाचें ग्रहण केलें व स्वतः शिखिध्वजानें चूडालेपासून नृत्य-वाद्य इत्यादिकांतील प्रावीण्य संपादन केलें. त्यामुळें तीं दोघेंजणें सर्व विद्या व कला यांत प्रवीण झालीं. एकमेकाच्या हृदयात स्थित होणारीं तीं एकरूपतेस प्राप्त झालीं. ती एकरस होऊन राहिलीं. त्याचें परस्परावर निःसीम व अनुपम प्रेम जडलें. पुष्प व सुवास यांप्रमाणें तीं अभिन्नरूप झालीं. तीं दोघें जणुंकाय भूतलावरील शंकरपार्वतीच होतीं. चातुर्यामुळे त्याची मति फार रमणीय झाली. तीं दोघेही सर्व शास्त्रार्थांत पंडित होतीं. त्यामुळें कांहीं कार्याकरिता कमला व कमलापतिच भूलोकीं याच्यारूपाने आलीं आहेत, असें वाटे. लोकवृत्तान्त व शास्त्ररहस्य त्या दोघांनाही एकसारखेंच समजत असे. असो, रामा, अशा प्रकारचें तें सुखी दांपत्य या लोकीं पूर्वी रहात होतें. ७७.

सर्ग ७८—त्यांचें वैराग्य, शास्त्रार्थनिष्ठा, चूडालेचा विवेक व ज्ञानलाभ.

**श्रीवसिष्ठ**—याप्रमाणें तें जोडपें आपल्या भर तारुण्यात पुष्कळ दिवस अनेक यौवनलीलांनीं रममाण झालें. पण फिरून फिरून आवर्तन पावणें हें ज्याचें शील आहे अशीं पुष्कळ वर्षें निघून गेल्यावर फुटलेल्या मातीच्या घागरींतून जसें पाणी गळतें, त्याप्रमाणें त्याचें तारुण्य हळु हळु क्षीण होत चाललें. तरंगांच्या समूहाप्रमाणें नाश पावणाऱ्या या संसारात मरण येणें, हें अनिवार्य आहे. पिकलेलें फल जसें अवश्य पडतेंच, त्याप्रमाणें जीर्ण देहही अवश्य पडणारच. आयुष्य एकसारखें क्षीण होत असतें. पण पावसाळ्यातील तुंबीच्या वेलीप्रमाणें तृष्णामात्र एकसारखी वाढत जाते. पर्वतावरून वाहणाऱ्या नदीच्या वेगाप्रमाणें यौवन सरकन निघून जातें. तस्मात् जीवन इंद्रजालाप्रमाणें असत्य आहे. धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें सुखें पळून जातात. गृध्र ( गिधाडे ) जसें मांसावर त्याप्रमाणें दुःखें चित्तावर येऊन पडतात. पावसाळ्यातील बुडबुड्यांप्रमाणें

शरीर क्षणभंगुर आहे. व्यवहार केळीच्या खांबाच्या मध्यभागाप्रमाणें असार आहे. अप्रिय कामुकाला सोडून कामिनी जशी जाते त्याप्रमाणें तरुणता पुरुषाला सत्वर सोडते. एकादा वृक्ष जसा सुकून जावा त्याप्रमाणें बलात्कारानें अरति येते. तेव्हा ज्याची प्राप्ति झाली असता चित्त कोणत्याही दशेंत दुःखी होत नाहीं, असें या संसारांत शुभाकार, स्थिर व अतिशोभन काय आहे? असा आपल्याशींच प्रश्न करून त्या जोड-प्यानें संसारव्याधीचें औषध शोधून काढण्याकरिता दीर्घ काल अध्यात्म-संमत शास्त्राचा विचार केला. तेव्हा केवळ एका आत्मज्ञानानेंच ही संसाराख्य महामारी शांत होणें शक्य आहे. दुसऱ्या कोणत्याही उपयानें नाहीं; असा त्यांचा निश्चय झाला. व तीं दोघेंही आत्मज्ञानपरायण होऊन राहिलीं. त्यानीं आपलें चित्त आत्म्यामध्यें लाविलें. सर्व प्राण त्याच्याकडे अर्पिले. तीं तन्निष्ठ झालीं. त्यानीं आत्मवेत्त्याचा आश्रय केला. त्याच्या पूजनामध्यें तीं निमग्न झालीं. त्यांनीं एका आत्मज्ञानाची मात्र इच्छा धरली. व त्या कारणाने तीं दोघें अतिशय शोभूं लागलीं. आत्म्याचाच त्यांनीं पुष्कळ विचार केला. परस्परास त्यानीं त्याचाच बोध केला. आत्म्यासाठीं परस्परावर प्रेम ठेवलें. व एकमेकाच्या उपयोगीं पडलीं.

रामा, नंतर चूडालेनें सतत अध्यात्मवेत्त्याच्या तोंडातून बाहर पडलेल्या व संसारसागरातून तारण्यास योग्य असलेल्या रमणीय शास्त्रार्थास ऐकून आपल्या आत्म्याविषयीं अहर्निश असा विचार केला. मी आपल्या शरीरानें हालचाल करीत असताना अथवा ती सर्व बंद करून एकाग्र बुद्धीनें या शरीरात मी कोण असेन, अशा जिज्ञासेनें आपल्या आत्म्याला पाहतें. हा संसारलक्षण भ्रम कोणाला कसा व कोठें झाला आहे? देह जड व मूढ आहे. यास्तव तो मी नव्हे, हें तर निश्चित आहे. कारण बुद्धि-वृत्ति असली तरच मी स्थूल आहें, मी गोरा आहें, इत्यादि अनुभव येतो. हात, पाय, इत्यादि कर्मेंद्रियाचा समूह तर या शरीराच्याच अवयवरूप आहे. अवयव व अवयववान् यांचा भेद लोकामध्यें नसतो, हें प्रसिद्ध आहे. ज्ञानेंद्रियांचा समूहही जडच दिसतो. काठीनें जसा दगड ढकलावा त्याप्रमाणें मनाकडून ज्ञानेंद्रियांना प्रेरणा केली जाते. संकल्प-शक्तिमान् मनही तसेंच जड असतें, असें मी समजतों. कारण गोफ-

णानें जसा दगड फेंकितात, त्याप्रमाणें बुद्धिनिश्चयांकडून तें आपापल्या विषयाकडे प्रेरिलें जातें. निश्चयरूपा बुद्धिही अशीच जड सत्ता आहे असा माझा निश्चय होतो. कारण पाटातून जसें नदीचें पाणी वाहूं लागतें त्याप्रमाणें अहंकाराच्या द्वारा ती वाहत सुटते. अहंकारही निःसार व जड आहे यात संशय नाहीं. बाळक भ्रमानें जसा यक्षाला उठवितो, त्याप्रमाणें जीव त्या भ्रमात्मक अहंकाराला उत्पन्न करतो. चेतनाकाश व वायुरूप जीव तर हृदयात स्थित आहे. अहो, मला समजलें. साक्षिभावानें विषयप्रकाशन करून दूषितप्राय झालेल्या दुसऱ्याच कोणामुळें हा सुकुमार जीव सजीव होतो. हा जीव अनादि चिद्रूप आत्म्यामुळें चैतन्ययुक्त असल्यासारखा भासतो. तादात्म्य व संसर्गाध्यासामुळें, चित्स्वभाव, असेंही तें आत्मतत्त्व जड असल्यासारखें झालें आहे. तापलेल्या जलातील अग्नि जसा आपलें प्रकाश पाडणारें स्वरूप सोडतो, त्याप्रमाणें चिदात्मा देहसंसर्गामुळें जडसा होतो. पण जे जें सत् किंवा असत् ( म्हणजे आहे किंवा नाहीं ) असें भासतें तें सर्व त्या चैतन्यामुळेंच होय. चित्तवृत्तींबरोबर येऊन विषयास व्यापणारें चैतन्यच तें सर्व होतें. तें आपलें स्वरूप सोडून एका क्षणात विषयाकार होतें. अशा रीतीनें परमार्थतः चिद्रूपही अविद्येचें आवरण पडल्यामुळें अध्यासपरंपरेनें जड, शून्य व असत्सारखें झालें आहे. तें या जगदाकारास प्राप्त झालें आहे. पुनः चैतन्यच अंतःकरणाच्या वृत्तीला व्यापून व तिच्या द्वारा अविद्या—आवरणाचा भंग करून आपल्याच विकाररूप जगाला पाहतें. असा बराच विचार करून—तरमग ही ब्रह्मचित् कोणत्या उपायानें मूलाविद्यावरणभगानें दृश्यस्वप्नाला सोडून बोधवती होईल बरें ?—असेंही चिंतन करूं लागली. तेव्हा पुष्कळ वेळानें तिला आत्मतत्त्व कळलें. ज्याचें ज्ञान झालें असता कोणताही पुरुष पुरुषार्थापासून च्युत होत नाहीं त तत्त्व तिला कळलें व ती म्हणाली:—

मन, बुद्धि, इंद्रियें इत्यादि सर्व चिद्विलासास मर्यादित करणारीं आहेत. कायहो सांगावें, हे सर्व उपाधिभूत विकार दुसऱ्या चंद्राप्रमाणें असत् आहेत. महाचित् ही एकच वस्तु या जगांत आहे. तिलाच महासत्ता असें म्हणतात. ती निष्कलंक, सम, शुद्ध, निरहंकाररूपिणी, शुद्ध ज्ञाना-

कार, शिव, सन्मात्र, अच्युत, एकदांच प्रकाशमान झालेली, विमळ व नित्य उदित आहे. तिचाच ब्रह्म, परमात्मा, इत्यादि नावानीं निर्देश केला जातो. विषय, चित्तवृत्ति व ज्ञाता यातील एकही या चितूहून भिन्न नाहीं, कारण ती साक्षिरूपानें अनुभवास येते. अंतःकरणाचा उदय होऊन त्रिपुटीचा आकार होण्यापूर्वीच ती सिद्ध असते. म्हणून तिला आद्य चित् असें म्हणतात. विषयरहित अथवा इंद्रियादि दुसऱ्या कोणाचाही विषय न होणारें असें जें हें चित्त्व तेंच तिचे अक्षय रूप होय. ती आद्य चित्च मन, बुद्धि, इंद्रियें व विषय या रूपानीं विकास पावते. मन, बुद्धि इत्यादि विवर्तांनीं चिदात्म्याच्या ठिकाणीं प्रमातृ-भाव आणला असतां त्यामध्यें तरंगादिकासारखी जगद्रूप भूत–भौतिक पदा-पदार्थांची सत्ता उदय पावते. हें जें प्रसिद्ध जगत्सत्तेचें रूप आहे ते त्या महाचितीचेंच रूपान्तर होय. कारण तीच चित् असंग राहूनच स्फटिक-मणीप्रमाणें जगत्प्रतिबिंब धारण करते व जगाचा सत्ता व्यावहारिक व प्रातिभासिक पदार्थामध्यें आपापल्या अधिष्ठानाच्या अनुरोधानेंच उदय पावलेली असते म्हणूनच जगत्सत्ता अधिष्ठानसत्तेहून भिन्न आहे, असें निरूपण करिता येत नसल्यामुळें आम्हीं जगाला मायामात्र म्हणतों. कारण एकाद्याची पृथक् सत्ता नसताना ती पृथक् आहे, असे वाटणें हेच मायामात्रत्व होय एवढ्यासाठींच नामरूपादि विशेषाचा प्रलय झाला असता जगत्सत्ता मायाशबल ब्रह्मसत्तारूपानेंच अवशिष्ट राहते व मायेचा बाध झाला असतां चित् आनद–एकरस व सन्मात्ररूप अशा स्वतःला आपणच अनुभविते. स्वप्न, इंद्रजाल इत्यादिकामध्यें द्रवरूपानें परिणाम पावलेल्या स्वचित्तानें समुद्रादि जल सिद्ध होऊन त्यात, वस्तुतः उत्पन्न न होणारे, तरंगही जसे उद्भवतात त्याप्रमाणें महाचितीब्रह्मामध्येंही समष्टि चित्तापासून वस्तुतः न होणारें जगही उद्भवतें. तात्पर्य स्वप्रात चिन्मात्र आत्माच चित्तकल्पित जलरूपानें रूपवान् होऊन जसा तरंगादिभेदांस प्राप्त होतो व त्यात आत्मव्यतिरिक्त दुसरें काहीं नसतें, त्याप्रमाणें मीही ( चिन्मात्रच ) जगद्भानातील रूपादि भेदांनीं परिणत झालें आहें. वस्तुतः मज पूर्ण चिदात्म्याहून अणुमात्रही दुसरें काहीं भिन्न नाहीं. त्यामुळें अहंभावाचाही अवशेष रहात नसल्यामुळें अहंभावरहित चिन्मात्रच सर्वत्र

पसरल आहे. त्याला जन्म-मरण नाहीं. सत् व असत् गती (स्वर्ग-नरक) नाहींत. या चिन्मात्र-आकाशाचा कधीं ध्वंसही संभवत नाहीं. हा चित्सूर्य छेद न करितां येण्याजोगा, दाह न करितां येण्याजोगा व अति निर्मळ आहे. अहो काय सांगूं? फार दिवसांनीं आज मी शांत झालें. आज माझ्या मनाला विश्रांति मिळाली आहे. मी आता भ्रमरहित होऊन राहिलें आहें. एक त्रिविध परिच्छेदशून्य आत्माकाशच आहे. सर्व कर्में व त्याचीं फळें व्यर्थ आहेत. सर्व द्रष्टृ-दृश्यमयी सत्ता चिन्मात्रमयी आहे. तेव्हां आतां भ्रमाला अवकाश कोठें आहे? मी स्वतः अनंत अनायास व उपशांत होऊन राहिलें आहें. जें काहीं दिसत आहे तें सर्व आत्मरूप आहे. याप्रमाणे चूडाला आपल्याशींच पुष्कळ विचार करून अतिशांत आत्मस्वरूपास साक्षात् जाणती झाली. तिचे राग, भय, मोह, व तमोविलास शांत झाले व त्यामुळें ती स्वस्थ राहिली ७८.

**सर्ग ७९**—चूडालेची अपूर्व शोभा पाहून राजाने तिचें कारण विचारलें व तिनें आत्मबोध हें आपल्या शोभेचें कारण सांगितलें.

**श्रीवसिष्ठ**—याप्रमाणें तिला विचारानें तत्त्वज्ञान झालें. व अभ्यासानें तें प्रतिदिनीं उत्तरोत्तर दृढ होत गेलें. त्यामुळें ती नेहमीं अंतर्मुख होऊन आपल्या स्वाभाविक रूपांत प्रतिष्ठित झाली. ती आसक्तिरहित, इच्छारहित, शीतोष्णादि द्वंद्वरहित, इष्टाचा स्वीकार व अनिष्टाचा मात्र त्याग न करणारी, प्राप्त कार्य आनंदानें करणारी, संदेहशून्य, देह व मन याच्या आंत असलेल्या परमात्म्याचा (प्रत्यगात्म्याचा) महालाभ झाल्यामुळें तृप्त झालेली, परम पदामध्यें विश्रांति घेणारी व सर्व उपमाशून्य झाल्यामुळें वर्णन करण्याच्या स्थितींतून पलीकडे गेलेली, चूडाला थोडक्याच काळांत ज्ञानिनी झाली थोडक्याच अवकाशांत ती तत्त्वज्ञा कशी झाली म्हणून म्हणशील तर सांगतों—अविद्वानांमध्यें अनिर्वचनीय जगद्भ्रम अकस्मात् जसा उद्भवतो, त्याप्रमाणें ज्ञानवानांमध्यें हें सर्व आपोआप व थोड्याच काळांत लीन होतें. ज्यांत द्वैताचें दर्शनही होत नाहीं अशा शांत पदामध्यें विश्रांत पावून चूडाला शरत्काळच्या स्वच्छ अभ्रपंक्तीप्रमाणें शोभूं लागली. ती आनंदपूर्ण स्थानीं पोंचून शांतमनानें राहिली. आत्मविवेकाच्या दृढ अभ्यासामुळें आत्मसाक्षात्कार होऊन ती फुललेल्या नूतन वेलीप्रमाणें अतिशय शोभली.

तेव्हां तिची ती प्रत्यहीं वाढणारी अपूर्व शोभा पाहून आश्चर्यचकित झालेला राजा शिखिध्वज तिला म्हणाला, 'सुंदरि, तूं फिरून तरुण झाल्यासारखी अतिशय मंडित व भूषित झाल्याप्रमाणें दिसत आहेस; अमृतपान केल्याप्रमाणे व इष्ट प्राप्त झाल्याप्रमाणें तूं आनंदपूर्ण झाली आहेस. तूं उपशांत व सुंदर शरीरास धारण करीत आहेस. हे रमणि, तूं आपल्या शोभेनें चंद्रालाही तुच्छ करून सोडलें आहेस. हे प्रिये, तुझें चित्त भोगांकरितां कृपण न होणारें, शांत, ऊर्जित, समतेस प्राप्त झालेलें, गंभीर व अतिशय शात, दिसत आहे. हे वल्लभे, तुझें मन सौम्य, अतिशय निश्चित, त्रिभुवनास तृणाप्रमाणें तुच्छ समजणारें व सर्व जगाचा रस पिऊन सोडणारें आहे, असें भासतें. हे महाभागे, तुझ्या चित्ताची कोणत्याही वैभवानंदाशीं तुलना करवत नाहीं. बालकदली किंवा मृणालांकुर याप्रमाणें कोमल अंगांनीं तं उत्तरोत्तर वृद्धि पावत आहेस असें वाटतें. ऋतु बदलताच वेलीचें स्वरूप जसें एकदम बदलतें, त्याप्रमाणें तुझा आकार तोच असतानाही अगदीं बदलल्या सारखा वाटतो. याचें कारण काय? तू अमृत प्यालेस, कीं तुला साम्राज्यच मिळालें, कीं अमृत्यूस प्राप्त झालीस अथवा रसायनादि प्रयोग, मंत्रादि सिद्धि, राजयाग, हठयोग इत्यादिकाच्या योगानें अशी तृप्त झाली आहेस? कमलनयने, राज्य, चिंतामणि, किंवा त्रैलोक्य याहूनही तुला कोणत्या अधिक अपूर्व वस्तूची प्राप्ति झाली आहे?

**चूडाला**—स्वामिन्, मी ह सर्व मूढजनप्रसिद्ध शरीरात्मत्व सोडून नामरूपादिरहित ब्रह्मात्मत्वस तत्त्वबोधाच्या योगानें प्राप्त झालें आहें. मत्ररसायनादिकांच्या योगानें नव्हे. त्यामुळें मी अशी श्रीमती दिसतें. हें सर्व मर्यादित वस्तुजात सोडन मी अबाधित व मूर्तामूर्तप्रपंचरहित, अमर्यादित एका वस्तूचा अंगीकार केला आहे. सर्व कूटस्थभूमानंदस्वभावानें स्थित आहे, असें मी जाणतें. त्यामुळ भोगांचा भोग घेतल्यावांचूनच मी संतुष्ट होतें, मी कधीं हृष्ट होत नाहीं व कधीं कोप करीत नाहीं; ऐकटीच आकाशासारख्या केवळ हृदयांत रममाण होतें. आसन, उद्यानभूमि इत्यादि स्थानीं माझा देह जरी असला तरी मी आत्म्यामध्यें स्थित असतें. त्यामुळें मीं अशी श्रीमती दिसत आहें. मी देहादिरूप

नसून सर्व त्रिभुवनाची प्रभु आहें, असें जाणल्यामुळें आता मी श्रीमती झालें आहें. मी सुख, अर्थ, अनर्थ इतर कोणतीही स्थिति यांतील कशाचीही इच्छा करीत नाहीं. जें प्राप्त होईल त्यात आनंद मानून राहतें. त्यामुळें अशी शोभावती दिसत आहें. ( जिचा राग व द्वेष अल्प झाला आहे अशी ) मी तनुरागा, तनुद्वेषा, प्रज्ञा शास्त्रदृष्टि इत्यादि सख्यांशीं क्रीडा करतें. नेत्रकिरण, इंद्रियें, किंवा चित्त याच्यायोगानें मी जें जें पहातें तें तें कांहीं नाहीं, तर त्यांनीं विरहित असें जें कांहीं सर्वांच्या आत आहे तें एक स्वप्रकाशतत्त्व आहे, असें मी आतल्या आंत पहात असतें व त्यामुळें हे नाथ, मी अशी नित्य उदित आहें ७९.

**सर्ग ८०**—अज्ञ राजाला तिचे भाषण विपरीतसें वाटलें व तिला यक्षादिकाची बाधा झाली असावी, असे त्यानें अनुमान केलें.

**श्रीवासिष्ठ**—याप्रमाणें आत्म्यामध्यें विश्रांति पावून उदार भाषण करणाऱ्या तिच्या म्हणण्याचा आशय न जाणता राजा हसून म्हणाला, “ हे मुग्धे, तूं असा असंबद्ध प्रलाप काय करतेस ? तुला खूळ लागलें आहे कीं काय ? राजकन्ये, तं हें सर्व वेड सोडून राजविलासांनीं जशी आजवर रममाण होत होतीस तशीच यापुढेंही हो. सर्व शोभा साकार वस्तूंच्याच ठायीं असते. तेव्हा आकारसामान्याचा त्याग करून जो निराकारतेस प्राप्त होतो तो शून्यप्राय झालेला जीव कसा शोभणार ? विषयाचा भोग न घेता तुष्ट होणें मुळींच शक्य नाहीं. पण तसें खोटेंच समजून जो मूर्ख जणुं काय रागावूनचसा आसन-शय्या इत्यादि सुखसाधनाचा त्याग करतो तो कसा शोभणार ? साक्षात् विषय व त्यांचीं साधनें यांस सोडून जो एकटाच शून्य हृदयात रममाण होतो तो अभाग्यवान् पुरुष कसा शोभणार ? मी देह नव्हे, दुसरेंही कांहीं नव्हे, अथवा मीच सर्व आहें, इत्यादि कांहींतरी बोलून वस्त्र, भोजन, शय्या इत्यादिकांचा त्याग करून जो केवळ धैर्यबलानें शीत, उष्ण, क्षुधा, तृष्णा इत्यादि दुःखें सहन करीत राहतो तो मुळींच शोभत नाहीं. जें समोर दिसणारें तें मी कांहींच पहात नाहीं. तर त्याच्या आंत गूढ असलेलें दुसरेंच कांहीं पहात आहें, असे प्रलाप करणारा मूढ कसा शोभणार ? तस्मात्, हे सुंदरि, तू वेडी आहेस, तुला भूतबाधा झाली आहे. तूं भोळी आहेस.

अथवा तूं सामान्य स्त्रीसारखी चपल आहेस. हे सुंदरि, तुझ्या या नानाप्रकारच्या आलापविलासानें माझ्या मनाची चांगली करमणूक होत आहे."

रामा, शिखिध्वज राजा असें बोलून व मोठ्यानें हंसून मध्याह्नसमयीं प्रियेच्या गृहांतून निघून स्नान करावयास गेला. तेव्हां चूडाला ' अरेरे, फार वाईट गोष्ट झाली. 'राजाला माझें म्हणणें कळलें नाहीं; व त्यामुळें तो आत्म्याच्या ठिकाणीं विश्रांति पावला नाहीं ' असें म्हणून खिन्न झाली व आपल्या व्यवहारांत निमग्न झाली. असो, त्यानंतर ज्यांचे अभिप्राय अगदीं परस्पर विरुद्ध आहेत अशा त्या उभयतांचा पुष्कळ काल राजविलासांनीं गेला. एकदा नित्यतृप्त व निरिच्छ अशाही चूडालेला लीलेनें आकाशांतून गमनागमन करण्याची इच्छा झाली. आकाशांतील संचार सिद्ध होण्यास्तव ती राजकन्या सर्व भोगाचा अनादर करून एका निर्जन वनांत गेली. तेथें एकटीच एका एकांत स्थानीं उत्तम आसनावर बसून व प्राणायाम करून दीर्घ काल अभ्यास करीत राहिली.

**श्रीराम**—भगवन्, हें जें सर्व स्थावर–जंगमात्मक जगत् आहे तें क्रियेच्या योगानेंच निष्पन्न झालेलें असलें पाहिजे. कारण कर्ता, करण, इत्यादि कारकांच्या स्पंदा ( हालचाली ) वांचून कशाचीही उत्पत्ति होत नाहीं. तेव्हां आकाशगमनादिक सिद्धि हें कोणत्या स्पंदविलासाचें फल आहे ? आत्मज्ञ लीलेकरितां व आत्मज्ञ खरोखरच त्या त्या सिद्धीकरितां कसा प्रयत्न करितो व त्यांना त्यांची प्राप्ति कशी होते, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, या जगांत साध्य तीन प्रकारचें संभवतें. एक उपादेय ( ग्राह्य ), दुसरें हेय ( त्याज्य ) व तिसरें उपेक्ष्य. स्वतःला जें अनुकूल असतें तें प्रयत्नानें मिळविलें जातें. जें प्रतिकूल असतें त्याचा त्याग केला जातो. व जें अनुकूल किंवा प्रतिकूल नसतें त्याची उपेक्षा केली जाते, पण आत्मज्ञाला सर्वच आत्ममय भासत असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं हे तीन पक्ष संभवत नाहींत, तर तो सर्व उपेक्षापक्षांत घालतो. ज्ञान्याला जें उपेक्ष्य म्हणून वाटतें तेंच अज्ञाला ग्राह्य किंवा त्याज्य भासतें. कारण एकच वस्तु ज्ञानी, रागी व विरागी यांना उपेक्ष्य, ग्राह्य अथवा त्याज्य वाटत असते. वसंत जसा भूतलास आह्लादित करतो त्याप्रमाणें

देश, काल, क्रिया व द्रव्य यांच्या योगानें सिद्ध होणाऱ्या सिद्धी जीवास आह्लादित करतात. पण या चारी साधनांतील क्रिया हें प्रधान साधन आहे. कारण सर्व उपाय क्रियेच्या अधीन आहेत. उत्तम देशादि असूनही क्रिया न केल्यास त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं व देशादि अनुकूल नसताना तीव्र क्रिया केल्यास सिद्धि मिळते, असा अनुभव आहे. क्रियेच्या उत्कर्षाप्रमाणें फलाचाही उत्कर्ष होत असतो. आकाशगमनादि सिद्धींची सिद्धगुटिका, सिद्धांजन, सिद्ध खड्ग, सिद्ध पादुका इत्यादि अनेक साधनें तंत्रशास्त्रात प्रसिद्ध आहेत. आता त्याची सिद्धि कशी होते, म्हणून तूं विचारलें आहेस. पण त्याचें निरूपण करूं लागल्यास पुष्कळ विस्तार होईल; कारण तें थोडक्यात समजण्यासारखें नाहीं. बरें त्याचें सविस्तर वर्णन करावें तर तुझ्यासारख्या विरक्ताला जरी नाहीं तरी या अनेक श्रोत्यांतील एकादयाला तरी त्याविषयीं अभिलाष उत्पन्न होईल व त्यामुळें तो त्यात प्रवृत्त झाल्यास मोठाच दोष घडेल. शिवाय तंत्रोक्त सिद्धींच्या साधनाचेंच निरूपण करूं लागल्यास तुझ्याही प्रस्तुत आत्मश्रवणांत तें एक विघ्नच होईल. यास्तव त्याचें निरूपण मी करीत नाहीं, हाच न्याय मणि-मन्त्र-औषधि-देश-काल इत्यादिकाचे ठायींही लावावा. बा कृतार्थ रामा, तुझ्यासारख्या महाविरक्ताना त्या सिद्धि तुच्छच वाटणें साहजिक आहे. यास्तव शिखिध्वजाच्या कथाप्रसंगानें प्राप्त झालेली प्राणादि वायूंच्या अभ्यासाची ही योजना तू ऐक.

आपल्याला जो साध्य अर्थ असेल त्यावाचून इतर वासना व सर्व कर्में यांचा परिहार करून यम, नियम, आसन, इत्यादिकास साधावें. आहार व विहार नियत व शुद्ध करावा. यम-नियमाचें ज्ञान होण्यास्तव धर्मशास्त्राचें अवलोकन करावें व तदनुरूप उत्तम आचरण ठेवावें. सुजनाचा समागम करावा. सर्वस्वाचा त्याग करावा. सुखासनावर बसावें. प्राणायामाचा पुष्कळ अभ्यास करावा. पूरक, कुंभक व रेचक याच्या योगानें ज्ञानी योगी प्राणावर आपलें प्रभुत्व चालवूं शकतो. लौकिक भृत्यांप्रमाणें प्राण त्याच्या स्वाधीन होऊन राहतात. प्राण स्वाधीन झाले म्हणजे कोप, क्षोभ इत्यादि सर्व शिथिल होतात. भोगाविषयीं विरक्ति येते. राघवा, प्राण स्वाधीन झाल्यानें योगी पुरुषाला राज्यादि-मोक्षान्त सर्व संपत्ति

अनायासानें साध्य होतात. शरीरांत सुषुम्ना या नांवाची एक नाडी आहे. ती देहभर पसरलेल्या सहस्त्रावधि नाड्यांचें मूळ आहे. मूलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत जीं सात चक्रें आहेत त्यातून ती बाहेर पडलेली असते. ती मंडलाकार आहे. तिनें सर्व मर्मस्थानाचा आश्रय केलेला असतो. वीणेच्या दंडाला लाविलेल्या खुंटीप्रमाणें ती असते. अथवा पाण्याच्या भोंवऱ्याप्रमाणें तिचा आकार आहे. तिचा आकार लिहून दाखवावयाचा झाल्यास अर्ध्या ओंकारासारखा तो लिहिता येतो. ती देव, असुर, मनुष्य, पशु, मत्स्यादि जलचर, पक्षी इत्यादि सर्वांमध्यें असते. थंडीनें काकडून व वेटोळें करून बसलेल्या सापाप्रमाणें तिची आकृति असते. ती शुभ्र वर्ण आहे. उरःस्थल व भ्रूमध्य यांना ती स्पर्श करते. ती चित्तवृत्तींमुळें चंचल होते. ती सतत वायूच्या योगानें स्पंदन करीत असते. तिच्या केळीच्या गाभ्याप्रमाणें अतिशय कोमल अंतःप्रदेशीं वीणावेगाप्रमाणें सुंदरगतीनें युक्त असलेली अशी जी एक सर्वोत्तम शक्ति स्फुरत असते तीच कुंडाकाचा आकार धारण करणारी कुंडलिनी आहे. सर्व शक्तींस वेग देणारी तीच प्राणाची परम शक्ति आहे. ती रागावलेल्या भुजंगी-सारखी एकसारखी श्वास सोडीत असते. वर तोंड करून असलेली ती प्राण व अपान याच्या स्पंदास ( म्हणजे प्राणाला बाहेर सोडण्यास व अपानाला आत ओढून घेण्यास ) कारण होते. जेव्हा हृदयस्थ प्राण-वायु कुंडलिनीनें आकर्षण केलें असता अपानवृत्तीनें कुंडलिनीपदास जातो, तेव्हा अपंचीकृत ( सूक्ष्म ) भूतेंच ज्याचें उपादान कारण आहे, अशा अंतःकरणात जीवसंवित्, स्मृति, संकल्प, निश्चय, अभिमान व राग, द्वेष इत्यादि भिन्न भिन्न वृत्तीच्या योगानें आत उदय पावतो. कमलांतील भ्रमरीप्रमाणें कुंडलिनी देहात जशी स्फुरण पावते त्याप्रमाणें त्या त्या इंद्रियाच्या योगानें त्या त्या विषयाची स्फूर्ति, त्याचा फलभोग इत्यादि-लक्षण संवित् उदय पावते. कुंडलिनी मृदु चक्षुःप्रभृति इंद्रियाशीं विषय-स्पर्श प्रथम उदय पावेल, अशा रीतीनें वेगानें देहात स्फुरण पावते. त्यानंतर प्रमाता ( जीव–अंतःकरणावच्छिन्न चैतन्य ) त्याच इंद्रियविषयस्पर्शरूप वृत्तींच्या द्वारा बाहेर निघून बाह्य विषयांस व्यापतो. वृत्तिव्याप्तीनें विषया-वरण नाहींसें झालें असता घटादि ज्ञान ( अनुभव ) उत्पन्न होतो. त्या-

मूळाधारस्थ कुंडलिनीमध्यें हृदयकोशातील सर्व नाड्या संबद्ध आहेत. त्याच्या द्वाराच ती ( कुंडलिनी ) चक्षुरादि इंद्रियांस प्रवृत्त करीत असते. ती प्राणरूपानें ऊर्ध्वगमन करण्यास व अपानरूपानें खालीं प्रवेश करण्यास नेहमीं उत्सुक असते व त्यामुळें ती सर्व ज्ञानाचें कारण होते.

**श्रीराम**—गुरुराज, अमर्याद चितीचा मूळाधारांतील मर्यादित व आपल्याच अंशभूत अशा कुंडलिनीपासून उद्भव कसा व का होतो ?

**श्रीवसिष्ठ**—हे निष्पापा, चित्संविद् सर्वदा सर्वत्र व सर्वच आहे. पण भूतमात्रामुळें तिचा अतःकरणादि काहीं विशेष स्थानींच उद्भव होतो. कारण सर्वत्र असणारीही ती ( चिती ) केवल देहामध्येंच व्यक्त होते कीं नाहीं ? सर्व आकाशभर पसरलेला सूर्याचा प्रकाश भिंतीवरच व्यक्त होतो कीं नाहीं ? त्याचप्रमाणे उपाधीच्या योग्यतेप्रमाणें व्यापी वस्तु कमी-अधिक प्रमाणानें व्यक्त होते. चैतन्य अतिशय स्वच्छ उपाधींत अगदीं स्पष्टपणें उदय पावतें. व उपाधींचे मालिन्य जसें जसें वाढत जातें तसें तसें तें कमी व्यक्त होत जातें. माती, शिला, इत्यादि वस्तूंमध्यें चिद्वस्तु व्यक्त होत नाहीं. कारण त्यांतील जाड्य त्याच्या अभिव्यक्तीला प्रतिबंध करतें. त्यामुळें तापलेल्या पाण्यांत अग्नीचें रूप जसें व्यक्त होत नाहीं व त्यातील शैत्यही नष्ट होतें. त्याप्रमाणें माती, पाषाण इत्यादिकांत चैतन्य व्यक्त होत नाहीं, तर तें नष्ट झाल्यासारखेंच होऊन राहतें. पण तेंच देव, मनुष्य इत्यादिकांच्या लिंगशरीरांत व्यक्त होतें. वृक्षादिकांच्या लिंगांत तें असतें व त्याला बाह्य ज्ञान नसल्यासारखें होऊन राहतें; तथापि त्याला वृक्षादिकांमध्यें आतल्या आत विषयविज्ञान होत असतें. पण कोणत्याहि सृष्ट वस्तूमध्यें तिच्या सत्तांशाचा न्यूनाधिक भाव नसतो. म्हणजे उपाधींमध्यें जाड्यांश जसा जसा कमी किंवा अधिक असेल त्या त्या प्रमाणें चितीचा चिदंश अधिक किंवा कमी व्यक्त होतो, पण चितीचा सत्तांश तसा न्यूनाधिक होत नाहीं तर तो सर्वत्र सम असतो. कारण आब्रह्मस्तंभपर्यंत सर्व उपाधींमध्यें त्या परमात्म्याची सत्ता एकसारखी अभिव्यक्त झालेली असते. आता हीच गोष्ट आणखी अधिक स्पष्ट करून सांगतों.

रामा, कोणतेंही भूत, मग तें चर असो कीं अचर असो, तें चिन्मात्र व सन्मात्र असतें. पण भूतवर्ग उत्पन्न होण्यापूर्वी सर्व प्रपंचाधिष्ठानभूत आत्मतत्त्व सच्चिदेकरस, सर्वप्रपंचधर्मशून्य आकाशाप्रमाणें असंग, विभु व सूक्ष्म असतें. पण तेंच सन्मात्र, चिन्मात्र, अविकार व अनामय असलेलें तत्त्व तसेंच स्वरूपामध्यें स्थित असतानाच त्याच्या मायाकल्पित एकदेशामध्यें आकाशादि सूक्ष्म भूताचा अध्यास होऊन तेंच भूतमात्रारूप होऊन राहतें. नंतर परिणामक्रमानें तेंच भूतमात्रापंचक प्राण, मन, बुद्धि, ज्ञानेंद्रिय, व कर्मेंद्रियपंचक अशा पाच प्रकारचें होऊन लिंगशरीर बनतें. त्यात त्याचाच आभास ( चिदाभास ) उत्पन्न होऊन ज्यांत अनेक प्रकारचे विकार व जाग्रदादि अवस्था आहेत अशा जीवभावास प्राप्त होतें. एका दिव्यापासून जसे शंभर दीप व्हावे त्याप्रमाणें एकाच चित्तत्त्वापासून असंख्य जीव होतात. भूतांच्या सात्त्विक व राजस अंशापासून लिंगशरीर झाल्यावर अवशिष्ट तामस अंशापासून जीवाच्या वासनाप्रमाणें देवादि—कीटस्थावरान्त शरीरांचा उद्भव होतो. याप्रमाणें पंचीकृत भूतांपासून होणारीं स्थूल शरीरें नानाआकारांचीं व विविध जातींची असतात. साराश जगत् म्हणजे पांच भूताचा विकार आहे. हें यावरून सिद्ध झालें. हे रघुनंदना, या सर्वामध्यें चित्संविद् विद्यमान असते. ‘असें जर आहे तर घटादिपदार्थ सचेतन का होत नाहींत ? ते अचेतन कां ? ’ म्हणून विचारशील तर सागतो. चैतन्यास अभिव्यक्त करणाऱ्या प्राणादिकाच्या योगानें झालेल्या लिंगशरीराच्या प्राधान्यामुळेंच मनुष्यादि देहास खरी चेतनसंज्ञा प्राप्त होते. पशु, पक्षी, कीट, पतंग इत्यादि तिर्यक् प्राण्यामध्यें सूक्ष्म व स्थूल या दोन्ही देहाचें सारखेच प्राधान्य असतें. त्यामुळें त्याना जड-चेतन हें नाव प्राप्त होतें. स्थावरादि अगदीं हीन प्राण्यांमध्यें लिंगशरीराला आतल्या आतच सुखदुःखानुभव होत असल्याकारणानें लोकास बाहेर त्याच्या चेतनत्वाचा अनुभव येत नाहीं, म्हणून त्याना जड म्हणतात. समुद्र शात असला तरी व क्षुब्ध झाला तरी जसा समुद्रच त्याप्रमाणें चित् निर्विकार असली तरी व सविकार झाली तरी चित्च होय. किंवा जड व अजड हा भेद आरोपित भूतपंचकाचाच आहे. तो चित्चा नव्हे. कारण चित् सर्वधर्मरहित आहे. स्वभाववशात्

भूतपंचकाचे ठायीं असले अनेक विकल्प झाले आहेत, व स्वभावाविषयीं प्रश्न करितां येत नाहीं. वासनांप्रमाणें वस्तूंचा स्वभाव बनतो. वासनाही अनादि आहेत. यास्तव ज्याच्यापासून कांहीं फल प्राप्ति होणें शक्य असेल त्याविषयींच प्रश्न करून समाधान करून घ्यावें. अग्नीनें हात कां भाजावा? पाण्यानें शीतच कां असावें, असें म्हणून कितीही कोटी वर्षें विचार करीत जरी बसलें तरी त्यापासून नुस्त्या श्रमावाचून दुसरा कांहीं लाभ होणें शक्य नसतें. यास्तव स्वभावाविषयीं प्रश्न करीत बसणें यासारखा अनुचित व्यापार दुसरा कोणताही नाहीं. आकाशास ठोंसे मारण्या इत-काच तो हास्यास्पद उद्यम आहे. जर विचारच कर्तव्य असेल तर तो स्वभावास कारण होणाऱ्या वासनांविषयीं करावा. कारण वासनाचा विचार-पूर्वक शोध करूं लागलें असतां त्याच्या क्षयाचा उपाय सुचतो व तो करावा अशी इच्छा होते. व उपायानुष्ठानानें शेवटीं परम फल मिळतें. वासनाक्षय होतांच पूर्ण आत्म्याचा लाभ होऊन मेरुप्रभृति सुवर्णाच्या राशीही तृणासारख्या तुच्छ भासूं लागतात. देवादि भोगशाली देहही कीटादिकांप्रमाणें अतिशय तुच्छ होतात. वासनाचा उदय व लय यांच्या न्यूनाधिकतेप्रमाणें पंचभूतामध्यें चराचरादि वैचित्र्य उत्पन्न होतें. तिर्यक्-पश्वादिक वासनामलानें कलुषित झालेल्या चित्तानें युक्त असतात. कित्येक मोक्षगामी पुरुष वासनारहित होतात. वासनावैचित्र्यामुळेंच देव—मनुष्यादि पंचकराशी, आकाशभूमिगमनादि विचित्र व्यवहारास योग्य हस्तपादादि, नरादियोग्य मन, बुद्धि, अहंकार, चित्त, चक्षुः, श्रोत्र, प्राण, इत्यादि अंतर्बाह्य करणें व त्यांच्या त्याच्या उचित संज्ञा निर्माण झाल्या आहेत. पशूंनीं चार पाय, पुच्छ, व शिंगें याचे, पक्ष्यानीं चोंच, पंख, दोन पाय व शेंपुट याचे; सर्पांनीं फणा, मधलें शरीर, शेंपुट याचे व कृमि, कीट, वृक्षादि स्थावर इत्यादि इतर जीवांनींही आपापल्या वासनानुरूप व्यवहारास योग्य अशा अवयवादि-कांचे संकेत केले आहेत. असो; राघवा, याप्रमाणें पचकसंज्ञक लिंगाचे अनेक भेद झाले आहेत. त्यांतील कर्म व उपासना याचें एकाच वेळीं अनुष्ठान केल्यामुळें, समष्टिअहंभावास प्राप्त झालेल्या कोणा एका लिंगाचा एक संकल्पपरमाणु या संसारनभोवृक्षाचें बीज आहे. इंद्रियें हीं त्या

संसारवृक्षाचीं फुलें, विषय हे सुवास, इच्छा या भ्रमरी व चंचल क्रिया या मंजऱ्या आहेत. स्वर्गादि स्वच्छ लोक ह्याच शाखा, मेरुप्रभृति सर्व पर्वत हीं मूलें, नील मेघ हे पल्लव व दश दिशा ह्याच चंचल लता आहेत. रामा, वर्तमान, भूत, भविष्यत्कालचे चतुर्विध प्राणी हींच त्या वृक्षाचीं फलें आहेत. सारांश, हे लिंगवृक्ष भूतपंचकबीजापासून आपोआप स्वभावतःच होतात व कालवशात् स्वयं नाश पावतात. अविवेकामुळे ते उदय पावतात व विवेकदृष्टीनें त्याचा अस्त होतो. रामा, ज्या लिंगदेहाच्या राशी वासनानाश होईतों विवेकवश झालेल्या असतात, त्या या संसारांत पुनः जन्म. मरण, देहधारण इत्यादि संस्थितीस प्राप्त होत नाहींत; पण बाकीच्या लिंगराशी पूर्वींप्रमाणेंच यथेच्छ भ्रमण करीत राहतात ८०.

**सर्ग ८१—कुंडलिनीच्या प्रसंगाने रागोद्भव व शम यांचा क्रम. सिद्धीचा उपाय.**

श्रीवसिष्ठ—स्थूलदेहात्मकपंचकात मूलाधारीं असलेल्या पूर्वोक्त कुंडलिनींत या लिंगात्मक पंचकाचें उपादान ( भूतसूक्ष्म ) प्रथम प्राणपंचक रूपानें स्फुरण पावतें, नंतर तीच प्राणरूपानें आत स्फुरण पावणारी कुंडलिनी वायुधर्मानें व स्वधर्मानें स्पंद, स्पर्श व संवित् अशी तीन प्रकारची कल्पना होऊन कला, चित्, जीव, मन, संकल्प, बुद्धि, अहंकार, पुर्यष्टक, लिंग इत्यादि नांवें, कल्पना, चेतन, जीवन, मनन, संकल्प, बोध, अहंकार इत्यादि व्यापारामुळें धारण करिते. तीच या देहांतील उत्तम जीवशक्ति होय. तीच अपानतेस प्राप्त होऊन, सतत अधोप्रदेशीं राहत असते. नाभीमध्यें राहून तीच समाना होते. उदाना होऊन कंठप्रदेशीं निवास करते. ती एकटीच अपानादि अनेक रूपानें शरीरांत स्थित आहे, म्हणूनच या शरीराचें जीवन होतें. नाहींपेक्षां ती केवळ अधोगामिनीच झाली असती, तर अधोमार्गानेंच खालीं निघून जाऊन शरीर मेलें असतें. पण समान व उदान तिच्या अपानवृत्तीलाही नियमित अधोभागाच्या पलीकडे जाऊं देत नाहींत. त्याचप्रमाणें अपानवृत्ति इतर वृत्तींचें नियमन करीत असते. सारांश अशा परस्पर उपकारक व प्रतिबंधक व्यापारांनीं ती या शरीराचें सतत संरक्षण करीत असते. या शरीरांत मुख्य नाड्या एकशें एक आहेत, व त्यांच्या

शाखांना सामान्य नाड्या म्हणतात. त्या असंख्य असून सर्व शरीरभर पसरल्या आहेत. त्यांमध्यें जेथें अन्नरस पोंचविणाऱ्या समानवृत्तीचा व्यापार कफ, वात व पित्त यांच्या वृद्धीमुळें बरोबर होत नाहीं तेथेंच इतर वायु विषम तऱ्हेनें अन्नरसाचें आकर्षण करितात व त्यामुळें अल्परोग व महारोग यांचा संभव होतो.

**श्रीराम**—मुनीश्वरा, या शरीरांत रोगांचा उद्भव व विनाश कोणापासून होतो, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, आधि व व्याधि असें दोनप्रकारचें दुःखाचें कारण आहे. त्याची निवृत्ति हें सुख होय. व ज्ञानाच्या योगानें त्याचा आत्यंतिक ( समूळ ) क्षय, हा मोक्ष आहे. ते दोन्ही ( आधि व्याधि ) कदाचित् क्रमानें उद्भवतात व कदाचित् एकदम उत्पन्न होतात. कदाचित् एकदां आधि व एकदां व्याधि अशा पर्यायानें उद्भवतात. देहदुःखाला व्याधि व वासनामय दुःखाला आधि असें म्हणतात. पण त्या दोघांचेंही कारण मौर्ख्यच (अज्ञान) आहे, यास्तव तत्त्वज्ञानानें त्यांचा सर्वथा क्षय होतो. तत्त्वज्ञान नसल्यामुळें इंद्रियांचा निग्रह करितां येत नाहीं त्यामुळें हृदयांतील स्वास्थ्य नाहींसें होऊन राग—द्वेषांचा उद्भव होतो. मला हें मिळालें आहे, पण हें मिळालें नाहीं अशा चिंतेमुळें महाव्याधि उद्भवतात. त्या भय, शोक इत्यादिकांचें निमित्त प्राप्त झालें असतां त्याच्या प्रतीकाराचा उपाय न सुचणें एतद्रूप घन मोह देतात. आतां शरीरव्याधि कशा उत्पन्न होतात, तें सांगतों ऐक. निरोध करून स्वाधीन न ठेवलेल्या मनात अनेक इच्छा व गाढ अज्ञान यांचा प्रादुर्भाव झाला असतां ( हीं शारीरव्याधीचीं आंतर निमित्तें आहेत ), वाईट ( अपथ्यकर ) अन्न खाल्लें असतां, श्मशानादि वाईट प्रदेशीं गेलें असतां, मध्यरात्र, प्रदोष ( तिनीसांजा ) इत्यादि दुष्ट समयीं भोजनादि व्यवहार केले असतां, वाईट क्रिया केली असतां दुर्जनाची संगति धरली असतां, विष, सर्प, व्याघ्र, चोर, इत्यादिकांची दुर्भावना ( शंका ) मनात आणली असतां, नाड्यांतून अन्नरस न गेल्यामुळें अथवा वायु, अन्नरस इत्यादि दुष्पट गेल्यामुळें कफादिकाचा प्रकोप होऊन प्राण व्याकुल होतात. आघातादिकांमुळें देह व्याकुळ होतो आणि त्याकारणानें अस्वस्थतेचें

कारण व्याधि देहाच्या आकारास बदलून सोडतो. पावसाळा व उन्हाळा यांच्या योगानें नद्यांच्या आकारात जसा फरक पडतो, त्याप्रमाणें स्वास्थ्य व व्याधि यांच्या योगानें देहांत फेरफार होतो. पूर्व जन्मांतील अथवा या जन्मांतील शुभ अथवा अशुभमति जशी असेल त्याप्रमाणें स्वास्थ्य अथवा व्याधि यांची उत्पत्ति होते. शुभमति अधिक असल्यास तिच्या योगानें स्वास्थ्य मिळतें व अशुभमति अधिक असल्यास व्याधि अधिक होतात. हे रघुकुलदीपका, याप्रमाणें भूतपंचकात आधि व व्याधि होतात. आता त्या नष्ट कशा होतात तें ऐक.

व्याधि दोन प्रकारच्या असतात. एक सामान्य व दुसऱ्या अतिशय दृढ. क्षुधा, तृषा, स्त्री, पुत्र इत्यादिकाची लालसा याला व्यवहार म्हणतात. व तीच सामान्य व्याधि होय. जन्मादि विक्रियांना कारण होणाऱ्या व्याधीला सार ( अतिदृढ ) व्याधि म्हणतात, त्यांतील व्यावहारिक व्याधि अन्न, पान, स्त्री, पुत्र इत्यादि इष्ट पदार्थ मिळाले असतां निवृत्त होतात. मानसिक आधींचा क्षय झाला आसता आधिजन्य व्याधिही क्षीण होतात. पण राघवा, सार ( दृढ ) आधि व व्याधि आत्मज्ञानावांचून क्षीण होत नाहीत. कारण रज्जूचें ज्ञान झालें तरच रज्जुसर्प निवृत्त होतो. त्यावांचून निवृत्त होत नाहीं. पावसाळ्यातील नदी जशी कांठावरील सर्व वृक्षांस व वेलींस उपटून नेते, त्याप्रमाणें सारव्याधींचा नाश सर्व आधि व व्याधि यासही नाहींसें करून सोडतो. सामान्य व्याधींतील ज्या व्याधि आधिजन्य असतात त्या द्रव्य, मंत्र, शुभ आचरण, वैद्यशास्त्रोक्त अथवा अनुभवी वृद्धानीं सांगितलेले उपाय याच्या योगानें नष्ट होतात. लोलार्कतीर्थातील स्नान, मंत्र, औषधें, इत्यादि तर सर्व तुला माहीतच आहे. तेव्हां त्याविषयीं आणखी काय सांगावयाचें राहिलें आहे ?

**श्रीराम**—आधींपासून व्याधींचा जन्म कसा होतो व त्या औषधांहून निराळ्या अशा मंत्र-पुण्यादि युक्तींनीं नष्ट कशा होतात ?

**श्रीवसिष्ठ**—आधींच्या योगानें चित्त व्याकुल झालें म्हणजे देह अतिशय क्षुब्ध होतो. ज्याच्या नेत्रांत धूळ गेली आहे अशा पुरुषाला पुढचा मार्गही दिसत नाहीं. त्यामुळें, बाणानें आर्त झालेला हरिण जसा प्रकृत मार्ग सोडून अमार्गानें धावूं लागतो, त्याप्रमाणें तोही अमार्गानें जाऊं

लागतो. नदींत हत्ती शिराला असतां नदीचें जल जसें काठांवर जोरानें उसळूं लागतें, त्याप्रमाणें क्षोभामुळें प्राण देहात साम्य सोडून वाहू लागतात. प्राण विषमगतीनें वाहूं लागले म्हणजे नाड्या कफादि-दोषांच्या क्षोभानें विषमावस्थेस पोंचतात. म्हणजे राजा धर्मावर योग्य रीतीनें आरूढ नसला म्हणजे वर्णाश्रमक्रम जसे संकर पावतात, त्याप्रमाणें नाड्याची दशा होते. काही नाड्या रस, वायु इत्यादिकांच्या योगानें अधिक भरतात व कित्येक अगदीं रिकाम्या होतात. प्राणसंचाराचा क्रम बिघडला असतां कुजीर्ण, अजीर्ण, अतिजीर्ण इत्यादि सर्व प्रकारचें अन्न दोषालाच कारण होतें. गंगेचा ओघ काष्ठाना जसा पूर्वेकडे नेत असतो त्याप्रमाणें प्राणवायु सर्व प्रकारच्या अन्नास आपल्या आश्रयास नेतो. जीं अन्नें निरोधानें शरीरात राहतात तींच परिणामस्वभावानें व्याधित्वास प्राप्त होतात. याप्रमाणें आधींपासून व्याधि होते. व आधीच्या अभावीं ती नाश पावते. आतां मंत्राच्या योगानें व्याधि कशा नाहींशा होतात तें ऐक—

ज्याप्रमाणें हिरडे स्वभावतःच रेच करितात त्याप्रमाणें य-र-ल-व इत्यादि वायु, अग्नि-भू-जल इत्यादिकाचे बीजात्मक मंत्रवर्ण मांत्रिकांच्या भावनेमुळें नाडींमध्यें व्याधींच्या आकारानें परिणाम पावलेल्या अन्नरसांचें उत्सारण, पाचन इत्यादि कार्य करितात. हे साधो, शुद्ध व पुण्यकारक क्रियेनें, साधूच्या सेवेनें, मन निर्मळ होतें. त्यामुळें राघवा, देहातील शुद्ध चित्तांत आनंद वाढतो. पूर्णचंद्राचा उदय झाला असतां या भूलोकीं जशी निर्मळता उत्पन्न होते, त्याप्रमाणेंच हा प्रकार होतो. चित्तशुद्धि झाली असतां हे प्राणवायुही क्रमानें वाहूं लागतात. ते अन्नाला चांगलें पक्क करितात. त्यामुळें देहव्याधि नष्ट होतात. राघवा, याप्रमाणें आधि व व्याधि यांच्या नाशोत्पत्तीचे क्रम मी तुला सांगितले. आता कुंडलिनीची कथा चाललेली असल्यामुळें त्याविषयींच आणखी कांहीं ऐक.—

प्राणनामक कुंडलिनी पुर्यष्टक नामक लिंगात्म्या जीवाची आधारभूत आहे, असें तूं जाण. पूरक प्राणायामाच्या अभ्यासानें कंठछिद्राच्या खालच्या उरांतील कूर्माकार नाडींत प्राणाचा निरोध करून राहिलें असता शरी-राला मेरुसारखें स्थैर्य व गुरुत्व ह्या सिद्धी प्राप्त होतात. पूरकाच्या योगानें

शरीर पूर्ण झालें असतां मूलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत लांब करून प्राणवायु वर ओढल्यासारखा होईल, असें करून प्राणनिरोधजन्य ऊष्म्यामुळें होणारे शारीर श्रम व मानस श्रम यांस अभ्यासपटुत्वामुळें व अमृतानें भरून सोडल्यामुळें सहन करण्याचें सामर्थ्य येण्यासाठीं कुडलिनी जेव्हां वर नेली जाते, त्यावेळीं वर नेली जाणारी ती आकर्षणामुळें दीर्घ होते व अभ्यासपटुत्वामुळें सर्पीप्रमाणें सत्वर वर जाते. वेलींच्या ज्यांना उपमा आहेत अशा देहास बाधणाऱ्या सर्व नाड्यांना वेऊन ती वर जाते. त्या वेळीं नाड्यांच्या द्वारा अवकाश मुळींच रहाणार नाहीं, अशा रीतीनें वायूनें ज्याला अगदीं हलकें करून सोडलें आहे, असा हा आपादतलमस्तक देह पाण्यानें भरलेली मोट जशी कूपांतून वर ओढली जाते त्याप्रमाणें वर उचलून नेल्यासारखा होतो. हेंच त्याचें आकाशगमन आहे. अभ्यासविलासानें आणि शरीर व आकाश यांच्या संबंधसंयमनरूपयोगानें एकाद्या दीनाला जसें इंद्रत्व प्राप्त व्हावें त्याप्रमाणें योगी आकाशगामी होतो. आतां सिद्धदर्शनाचा उपाय सांगतों. जेव्हा रेचकप्रयोगानें वर आकर्षण केली गेलेली कुंडलिनी शक्ति सुषुम्नेंतील प्राणप्रवाहाच्या योगानें मस्तकसंबंधी दोन कपालाचा संधि, याच द्वाराच्या बाहेर बारा अंगुलप्रमाण षोडशांत नावाच्या स्थानीं स्थितीस प्राप्त होते तेव्हा आकाशगामी सिद्धांचें दर्शन होतें.

**श्रीराम**—गुरुराज, पण त्या अवस्थेंत नेत्र नसतात. मग त्यांवांचून आकाशगामी सिद्धांचें दर्शन कसें होतें ?

**श्रीवसिष्ठ**—राघवा, वायुस्वरूप सिद्ध या लौकिक दृष्टीनें दिसणार नाहींत, तसेंच ते दुसऱ्या दिव्य उपायानींही दृग्गोचर होणार नाहींत, हें खरें आहे; पण योगाभ्यासानें संस्कृत झालेल्या मनानें म्हणजेच दूर असलेल्याही बुद्धिनेत्रानें आकाशगामी सिद्ध दिसतात. हें सिद्धांचें अवलोकन स्वप्नावलोकनासारखेंच असतें. स्वप्नापेक्षा सिद्धदर्शनामध्यें विशेष इतकाच असतो कीं, त्यांत सिद्धांशीं संभाषण, वरप्राप्ति, इष्टफलाचा लाभ इत्यादि सत्य व्यवहार घडतात. आता परकायाप्रवेश कोणत्या युक्तीनें करतां येतो, तें सांगतों. तोंडाच्या बाहेर बारा अंगुलप्रमाण प्रदे-

शांत रेचकाभ्यासाच्या युक्तीनें प्राणांना चिरकाल स्थिर केलें असतां योगी दुसऱ्या शरीरात प्रवेश करूं शकतो.

**श्रीराम**—ब्रह्मज्ञ महाराज, आपण मागें सर्व जग मायामय आहे, त्यामुळें त्याला नियतस्थिति नाहीं, असें पुष्कळ प्रकारें वर्णन केलें आहे. तेव्हां एका स्वभावाचीच नियतस्थिति कशी होते? आपल्यासारखे वक्ते मोठे दयाळु असतात. कोणी दुष्प्रश्न केला तरी ते खेद मानीत नाहींत. म्हणून मी आपल्याला असा वारवार त्रास देत आहें.

**श्रीवसिष्ठ**—सत्यसंकल्प ईश्वरानें सृष्टीच्या आरंभीं केलेल्या संकल्पामुळें ठरलेला वस्तुस्वभाव सृष्टि असे तों कायम राहतो. म्हणून आत्म्याची स्वभावाख्य शक्ति सर्गाच्या आरंभीं जशी स्फुरते तशीच ती शेवटपर्यंत टिकते, असें म्हणण्यास काहीं प्रत्यवाय नाहीं. पण तोच वस्तुस्वभाव प्रलयकाळीं रहात नाहीं. कालभेदाप्रमाणें देशभेदानेंही वस्तुशक्ति अनियत असल्याचा अनुभव येतो. नाना व अनाना रूपानें स्थित असलेलें हें सर्व ब्रह्मच आहे. तें ब्रह्मस्वभावानेंच नियत एकरूप आहे. दुसऱ्या कोणत्याही स्वभावानें नाहीं. प्राण्याचें कर्म व त्याचा फलभोग यांच्या व्यवहाराकरितां अज्ञात ब्रह्मच कांहीं काल नियतस्थिति होऊन विकास पावतें.

**श्रीराम**—प्रभो, अणिमा व महिमा या नावाच्या सिद्धि कशा प्राप्त होतात. ?

**श्रीवसिष्ठ**—काष्ठ व करवत याच्या संघर्षणानें जसें छेद हें कार्य होतें, त्याप्रमाणें प्राण व अपान याच्या संघर्षणापासून स्वभावतःच अग्नि प्रवृत्त होतो. प्राण व अपान हे एकमेकांस आकर्षण करीत असतात. या निंद्य देहयंत्राच्या उदरांत नाभीच्या खालीं व वर परस्परांच्या तोंडास तोंड लावून आमाशय व पक्काशय नांवाच्या दोन मांसाच्या पिशव्या असतात व त्या दोन विरुद्ध प्रवाहामुळें एकसारख्या हालत राहणाऱ्या पाण्यातील वेताप्रमाणें एकसारख्या हालत असतात. त्यातील खालच्या पिशवीच्या मूलाशीं असलेली कुंडलिनी जपाच्या वेळीं फिरविल्या जाणाऱ्या रुद्राक्षादिकांच्या माळेप्रमाणें सतत प्राण व अपान यांच्या उद्गरण-निगरणाच्या योगानें कांपत व सूक्ष्म शब्द करीत असते. तीच सर्व क्रियारूप व ज्ञानरूप आहे. दंडाचा प्रहार केलेल्या भुजंगीप्रमाणें ती तोंड वर करून परतत

असते. ती आंतील वायूंनीं सर्व नाडीजाल कांपविते. त्यामुळें आंतील वायु अन्नादिकांस जिरवितात. वायूंच्या संघर्षामुळें उष्णता उत्पन्न होऊन ती देहाला उष्ण करते. योगी त्याच जाठर अग्नीची हृदयकमलांत उपासना करितात. त्याचेंच चिद्रूपानें चिंतन केलें असता दूरच्या व जवळच्या सर्व पदार्थांचें दर्शन होणें, ही सिद्धि मिळते. हा देह अग्नीषोमात्मक आहे, असें योगी समजतात ( याचा पूर्वीही निर्देश केला आहे. ) या देहांत जें जें म्हणून कांहीं उष्णात्मक अथवा प्रकाश, विद्या, ज्ञान इत्यादि रूप आहे, तें तें सर्व सूर्य किंवा अग्निरूप आहे व जें जें शीतात्मक, असत्, व जड आहे तें तें सोमरूप आहे, अशी ते कल्पना करितात.

**श्रीराम**—वायूंच्या संघर्षामुळें अग्नि उत्पन्न होतो, असें आपण नुक्तेंच सांगितलेंत व बाह्य सृष्टींतही आम्हांला त्या गोष्टीचा अनुभव येतो. यास्तव वायुरूप सोमापासून अग्नि उद्भवतो, हें म्हणणे मला कळलें. पण सोमाची उत्पत्ति कशी होते, तें कळलें नाहीं. यास्तव तें मला अगोदर समजून सागा.

**श्रीवसिष्ठ**—अग्नि, व सोम परस्परांचें कार्य व कारण झाले आहेत. ते एकमेकावर आपली उपजीविका करतात. बीज व अंकुर, यांप्रमाणें त्यांची परस्परापासून उत्पत्ति होते, रात्र व दिवस याप्रमाणें ते दोघे परस्परांचें निमित्त होतात, पण त्यांची स्थिति मात्र छाया व प्रकाश यांप्रमाणें एकमेकाचा विघात करणारी आहे. एकाच वेळीं त्या दोघांचा अनुभव घ्यावयाचा असेल, तर त्याची स्थिति छाया व प्रकाश यांप्रमाणें भासते व एकदा अग्नीचा आणि दुसऱ्या वेळीं सोमाचा, अशा पर्यायानें अनुभव घ्यावयाचा असेल, तर दिवस व रात्र यांप्रमाणें त्याची स्थिति भासते. यांचा कार्यकारणभावही दोन प्रकारचा सांगितलेला आहे. एक सद्रूपपरिणामापासून झालेला व दुसरा विनाशपरिणामापासून झालेला. बीजापासून जसा अंकुर, त्याप्रमाणें एकापासून दुसऱ्याची उत्पत्ति होणें हा सद्रूपपरिणामजन्य कार्यकारणभाव आहे. व दिवसाचा क्षय झाल्यावर रात्रीचा उदय होणें, याप्रमाणें एकाचा नाश झाल्यावर दुसऱ्याचा नाश होणें हा विनाशपरिणामजन्य कार्यकारणभाव आहे. यांतील पहिल्या प्रकारांत कार्यदशेमध्यें कारणाचें सत्त्व ( अस्तित्व ), हा घट मातीचा

आहे, इत्यादि प्रकारें प्रत्यक्ष प्रमाणानेंच सिद्ध होतें. म्हणून अनुमानादिकांचा तेथें फारसा उपयोग नसतो. दुसऱ्या प्रकारांत कार्यदशेमध्यें कारणाचा अभावच असल्यामुळें, आम्हांला दिवसां रात्रीचा अनुभव येत नाहीं. म्हणून अनुपलब्धि ( अनुभव न येणें ) या सहाव्या प्रमाणावरूनच त्याची सिद्धि होते. याविषयीं अनेक वादी अनेक शंका घेऊन श्रद्धावानाच्या श्रद्धेचा नाश करीत असतात. पण ज्याला आपलें हित व्हावें असें वाटत असेल, त्यानें त्यांच्या दुर्युक्ति मोठ्या प्रमाणभूत युक्ति आहेत असा भास होत असला, तरी अनुभवाच्या विरुद्ध असल्यामुळें अग्राह्य आहेत, असें जाणावें; व त्याचा तिरस्कार करावा. कारण प्रत्यक्षाप्रमाणें एकाद्या वस्तूचा अभावही ती वस्तु नाहीं, असें ठरविण्यास प्रमाण होतोच. अमुक एका स्थानीं अग्नि नाहीं, त्याअर्थी तें स्थान शीत असलें पाहिजे. असें ज्ञान एकाद्या अज्ञालाही होत असतें. अग्नि धूमरूपानें बाहेर जातो व तो धूमच जलरूप होतो. यास्तव वर सांगितलेल्या कार्यकारणभावांतील पहिल्या सद्रूप परिणामानें अग्नि सोमाचें कारण होतो. त्याचप्रमाणें अग्नि नष्ट होऊन वायुभावास म्हणजेच शीततेस प्राप्त होतो. या उदाहरणांत अग्नि अभावपरिणामानें सोमाचें कारण झाला आहे. सात समुद्रांचें जल पिऊन वडवाग्नि धुक्याच्या आकारानें पुनः त्यालाच निर्माण करतो. सूर्य चंद्राला पुनःपुनः कृष्णपक्षांत सुकवून शुक्लपक्षांत परिपूर्ण करतो. शरीरांतील प्राण अपानाख्य सोमाच्या तोंडांतून अन्नपानादिक उदरांत आले असता, त्याचा अमृततुल्य रस पिऊन मेघाप्रमाणें पुष्ट होतो व सर्व नाडयांत शिरून शरीरास तृप्त व पुष्ट करतो. आकाशांतील सूर्यकिरणें पृथ्वीवरील जलाचें प्राशन करितात; वायु नाहीं, अशी जरी कल्पना केली तरी जल सद्रूपपरिणामानेंच किरणरूपास प्राप्त होतें. कारण जलाचें शुक्लरूप त्यात अनुभवास येत असतें. सारांश सर्व सृष्टिच अग्नीषोमात्मक आहे व सूक्ष्मदृष्टि पुरुष या दोन शक्तींचा अनुभव प्रत्येक पदार्थांत व प्रत्येक क्रियेंत घेत असतात. ब्रह्म सर्वांमध्ये अनुगत असतें. भूलोकीं अंधकार व प्रकाश यांच्या योगानें जशीं रात्र व दिवस होतात, त्याप्रमाणें चैतन्य व जाड्य या दोन धर्मांच्या योगानें सर्व भूतें स्फुरण पावत असतात. चिद्रूप व जडरूप यांच्या योगानें ही जगाची

स्थिति आरंभलेली आहे. त्यांतील चिद्रूप हा अग्नि व जडरूप हा सोम होय. सूर्योदय होतांच जसा रात्रींचा अंधकार नष्ट होतो, त्याप्रमाणें निर्मल चित्प्रकाश उदय पावला असतां संसार नष्ट होतो. प्रत्यगात्म्यामध्यें जडाचें भान झालें असतां, त्याच्याशीं तादात्म्य पावून स्फुरण पावणारीही चित् जणुं काय जडत्वासच प्राप्त होऊन, आपल्या सत्तेनें असत् असल्यासारखी होते. सारांश, देहामध्यें जीवभावानें प्रविष्ट झालेली चित् देहाचें आयुष्य असेपर्यंत त्यांत अहंभावादि उत्पन्न करीत राहते. अशा रीतीनें अन्योन्याध्यासानें चित् मी मनुष्य आहें, चेतन आहें, इत्यादि स्वानुभवानुसारी देहस्वरूप होते. स्वतः चित् क्रियारहित व नामरहित आहे. त्यामुळें ती नुसतीच कधीं उपलब्ध होत नाहीं; तर प्रकाश जसा दिव्याच्या योगानें तशी ती देहानें व्यक्त होते. अज्ञानानें आवृत झालेली चित् विषयरूपी उपाधीकडे जावयास तयार झाली कीं, अनर्थप्राप्ति होते. तात्पर्य, अशा रीतीनें देही व देह हे अग्नीषोमात्मक आहेत. त्यांच्या परस्पर संसर्गानें परस्पराचा अनुभव येतो. उपाधीची निवृत्ति होऊन आनंदाचा अतिशय आविर्भाव झाला म्हणजे केवल अग्नीची स्थिति होते व जाड्य अतिशय वाढलें म्हणजे केवल सोमाची स्थिति होते. प्राण उष्णप्रकृति असतो म्हणून तो अग्नि व अपान शीतल असतो म्हणून तो सोम होय. शीत अपानांत उष्ण प्राणवायु व प्राणवायूंत शीत अपान सत्ता पावतो. चिदग्नि वाचात्मक सोम होतो. ज्याप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं मायाशबल ब्रह्मसंवित् शीतोष्णरूपिणी होऊन ब्रह्मांडाकारास प्राप्त होते, त्याप्रमाणें मनुष्यांच्या व्यष्टिदेहाच्या उत्पत्तीच्या वेळींही ती शीतोष्णरूपिणी होऊन अग्नीषोमसंज्ञेस प्राप्त होते. ( अर्थात् ब्रह्मांडाप्रमाणें शरीरही अग्नीषोमात्मक आहे.) हे दोन्ही देव जेथें शुद्ध चिद्रूप ध्रुवाख्य कलेनें स्थित असतात, त्या हृदयाकाशांत कुंभकानें स्थिर हो. म्हणजे तूं अतिशय शोभूं लागशील ८१.

**सर्ग ८२—अणिमा इत्यादिकांचे उपाय, परकायाप्रवेश.**

**श्रीवसिष्ठ**—योग्यांच्या देहाला अणिमा व लघिमा कशी प्राप्त होते तें ऐक:—हृदयकमलकोशाच्या वर अग्निकण उडतो. तोच संविद्रूपानें सत्वर वाढतो. तो सकाळीं अगदीं आरंभीं उदय पावलेल्या सूर्यासारखा असतो. तो हस्तपादादि अंगांसह देहाला गलितशक्ति ( शक्तिहीन ) करतो. तो

शरीराचें काठिन्य व गंधभाग यांना उपादानभूत जळभागांत मिळवितो. नतर तो अग्नि नखशिखान्त द्रवरूप झालेल्या देहाला शोषून सोडतो. अशा रीतीनें देहाच्या बाहेर होऊन जीव आतिवाहिक देहरूप होऊन राहतो. नंतर तो अग्निरूप जीव प्राणानें क्षोभ उत्पन्न केला असतां कोठेंसा लीन होऊन जातो. त्यावेळीं कुंडलिनी शक्तिही मूलाधारस्थ सुषुम्ना नाडीनें हीन होत्साती तिच्या संस्कारांनीं शोभणाऱ्या आतिवाहिक देहाकाशांत राहते. तिच्यामध्यें मन, बुद्धि, अहंकार, चित्प्रकाश, स्वेच्छाविहारशक्ति इत्यादि सर्व सामग्री गूढ असते, त्यामुळें अतिसूक्ष्म अथवा अति स्थूल प्रदेशीं प्रवेश करून तिला जेथें पाठवावी तेथें ती जाते. त्याचप्रमाणें ती कुंडलिनी ( योग्यांची जीवशक्ति ) प्राणापानांस पूर्णपणे स्वाधीन करून घेतल्यामुळें योग्याच्या केवल संकल्पानेंच पाहिजे तितका मोठा आकार धारण करूं शकते. अर्थात् प्राणापानाना अधीन करून घेतल्याने ह्या दोन्ही सिद्धी सुसाध्य होतात. आता ज्ञानसाध्यसिद्धि ऐक.

या सृष्टींत एक चिन्मात्र आहे. तें शुद्ध, सौम्य, अलक्षित, सूक्ष्माहून सूक्ष्म, जगही नव्हे व जगत्क्रियाही नव्हे, असें आहे. तें आपणच आपल्या ठिकाणीं अध्यास करून सकल्पोन्मुख झाले असता जीव होतें. तें जीवदशेंत मलिन झालेलें असतें. नतर तो मूढात्मा जीव संकल्पभ्रमानें हें खोटेंच शरीर पाहतो. पण ज्ञानदीपानें त्याला जेव्हा सर्वोत्तम प्रकाश मिळतो तेव्हा जीवाचा संकल्पमोह शरत्कालच्या अभ्राप्रमाणें क्षीण होतो. सर्व संकल्पाचा क्षय झाल्याकारणानें हा देह शांतीस प्राप्त होतो. निद्रा गेली असतां जीव जसा स्वप्न पहात नाहीं, त्याप्रमाणें सत्य आत्म्याची भावना झाली असतां जीव या देहास पहात नाहीं. अतत्त्वाला तत्त्व जाणल्यामुळेंच तो देहावृत होऊन राहिलेला असतो. पण तोच एका परम तत्त्वाची भावना केल्यामुळें निर्देह, श्रीमान् व सुखी होतो. रामा, शरीरादि अनात्म पदार्थांस आत्मा समजणें हेंच हृदयस्थ तम (अंधकार) आहे. त्याचा नाश सूर्यादि दुसऱ्या कोणत्याही प्रकाशाला करता येत नाहीं. तें खऱ्या आत्म्यालाच आत्मा समजणें, मी सर्वव्यापी, चिन्मात्र व अमल आहें, असें साक्षात् जाणणें याच एका उपायानें नष्ट होतें. ही ज्ञानसिद्धिही दृढ झाली असतां जीवन्मुक्त विनोदाकरिता स्वेच्छेनें

जशी जशी स्थूल, सूक्ष्म किंवा प्रातिभासिक देहाची कल्पना करितात त्याप्रमाणें ती सिद्ध होते. सामान्य प्राकृत पुरुषही जर दृढभावनेनें विषाला अमृत व अमृताला विष करूं शकतात, तर ज्ञानी पुरुषांना दृढ भावनेप्रमाणें फल मिळाल्यास त्यांत नवल कोणतें ? सारांश, या लोकीं दृढ भावनेनें ज्याची ज्याची भावना करावी तें तें सिद्ध होतें, असें पुष्कळदा पाहिलेलें आहे. हा देह सत्य आहे, अशी भावना केल्यास तो सत्य होतो व असत्य भावनेनें त्याच्याकडे पाहिल्यास तो ब्रह्माकाशरूप होतो. अणिमादि सिद्धि मिळण्यास ज्ञान हा उपाय आहे, असें तूं ऐकलें आहेस. आतां दुसरी एक युक्ति ऐकः—पुष्पातील वास जसा हुंगून नाकांत घातला जातो, त्याप्रमाणें रेचकाभ्यासाच्या योगानें जीवाला कुंडलिनीगृहांतून काढून परदेहामध्यें जो योजिलें जात आहे, तो पूर्वदेहाचा स्पंद बंद पडून तो काष्ठाप्रमाणें होऊन पडतो. नंतर ज्याप्रमाणें झाडाला पाणी घालणारा पुरुष हातातल्या घागरींतील पाणी पाहिजे त्या वृक्षाला अथवा वेलीला घालूं शकतो, त्याप्रमाणें योगी आपल्या अधीन असलेल्या प्राणाला दुसऱ्याच्या देहात व मतींतही त्याच्या संपत्तीचा भोग घेण्यासाठीं स्वच्छेनें घालूं शकतो. तो त्याला आपल्या इच्छेप्रमाणें स्थावर अथवा जंगम पदार्थांत शिरकवून व सिद्धीचें फल भोगून पूर्व शरीर स्थित असल्यास त्यांत अथवा त्याचा नाश झाला किंवा केला असल्यास वाटेल त्या दुसऱ्या शरीरांत घालतो. किंवा तो योगी स्थावर—जंगम देहादि प्रतिबिंबोपाधि, त्यांतील प्रतिबिंब जीव, त्याचे बिंबोपाधिभूत सत्त्वादि गुण, त्यानीं मर्यादित झालेलीं चित्—रूप बिंबें इत्यादि सर्वांना व्यापणाऱ्या आत्मसंवेदनानें संपूर्ण होऊन राहतो. सारांश, योगैश्वर्यसंपन्न जीव चित्प्रकाश, निर्दोष व नित्य स्वप्रकाश, स्वतत्त्व जाणून जें जें इच्छितो तें तें त्याला थोड्याच अवकाशांत प्राप्त होतें. पण तत्त्वज्ञ महात्मे अल्प सिद्धांना फारसा मान देत नाहींत. तर अज्ञानाचें आवरण नष्ट होणें यासच निरतिशयानंद सम्यक् पद जाणतात ८२.

**सर्ग ८३**—चूडालेच्या सिद्धीचें वैभव, राजाचा अबोध, गुरूपदेश, त्याचें साफल्य आणि किराटाख्यान.

**श्रीवसिष्ठ**—रामा, चूडालाही अशारीतीनेंच प्राणधारणादिकांच्या दृढ अभ्यासानें अणिमादिगुणैश्वर्ययुक्त झाली. गंगेप्रमाणें, निर्मल व शीतल

झालेली ती आकाशमार्गानें गेली. सागरात शिरली व पृथ्वीच्या पाठीवरून संचार करती झाली. ती पतीच्या वक्षःस्थलापासून व चित्तांतून एक क्षणभरही दूर न होतां अनेक शरीरांनीं लक्ष्मीप्रमाणें सर्व राष्ट्र व भुवनें यांत राहिली. आकाशात काळ्या मेघमालेप्रमाणें व भूमीवर पर्वतांच्या रांगेप्रमाणें ती भ्रमण करीत राहिली. दोरा जसा अनेक मोत्यांमध्यें, त्याप्रमाणें ती काष्ठ, तृण, पाषाण, प्राणी, आकाश, वात, अग्नि, जल इत्यादि सर्वांमध्यें निर्विघ्नपणें शिरली. ती मेरूवरील शृंगें, लोकपालांचीं पुरें, आकाश व दिशा यांचीं रंध्रें इत्यादिकांतून खुशाल विहार करीत राहिली. तिनें तिर्यक् प्राणी, भूतें, पिशाचें, नाग, देव, असुर, विद्याधर, अप्सरा, व सिद्ध यांच्याशीं संभाषणादि व्यवहार केला. त्या साध्वीनें आपल्या सिद्धीच्या बलावर इकडे हें सर्व ऐश्वर्य भोगीत असतांना तिकडे आपल्या मुख्य शरीरानें पतीला ज्ञानामृताविषयीं पुष्कळ बोध केला; पण त्याला कांहीं ज्ञान झालें नाहीं. कलांमध्यें चतुर असलेली ही माझी अबला भार्या भोळी आहे, असेंच तो समजत असे. एकादा मूढ बालक विद्येला जसा जाणत नाहीं, त्याप्रमाणें इतक्या दिवसांच्या सहवासानेंही त्या राजानें त्या गुणशालिनीस ओळखलें नाहीं. शूद्राला जसें यज्ञकर्म दाखवीत नाहींत, त्याप्रमाणें तिनेंही आत्मविश्रांतीस प्राप्त न झालेल्या राजाला आपली सिद्धि दाखविली नाहीं.

श्रीराम—प्रभो, मोठ्या सिद्धयोगिनीच्या यत्नानेंही जर शिखिध्वज ज्ञानी झाला नाहीं, तर दुसरा सामान्य पुरुष कसा ज्ञानसंपन्न होणार ?

श्रीवसिष्ठ—राघवा, उपदेश करणें किंवा घेणें ही केवळ मर्यादा आहे. पण केवळ उपदेश काहीं करूं शकत नाहीं. अधिकारी नसलेल्याही शिष्याला बलात्कारानें ज्ञान करून देण्याचें सामर्थ्य गुरूपदेशामध्यें नसतें. तर शिष्याची शुद्धबुद्धि हेंच ज्ञानाचें मुख्य कारण आहे. नुसत्या शास्त्रज्ञानानें किंवा नुसत्या काम्यादि कर्मानुष्ठानानें आत्मज्ञान होत नाहीं; तर शुद्ध पुण्यानें विचार उत्पन्न झाला असतां, सर्पाचीं पावलें जशीं सापच ओळखतो, त्याप्रमाणें आत्माच आपल्याला जाणतो.

श्रीराम—तर मग गुरूपदेशनामक उपाय स्वात्मज्ञानाचें कारण आहे, ही समजूत या जगात रूढ कशी झाली ?

**श्रीवसिष्ठ**—अतिसूक्ष्म असलेली अरुंधतीची तारा एकदम दिसत नसल्यामुळें प्रथम तिच्या जवळची दुसरी मोठी तारा अरुंधती म्हणून दाखवून नंतर जशी खरी अरुंधती दाखवितात, त्याप्रमाणें गुरूपदेश, शिष्याच्या बुद्धीला प्रत्यगात्म्याकडे वळण्याचें व्यसन लावून ज्ञानकारण होतो ( म्हणजे तो शिष्याच्या बुद्धीला आत्मविचाराची गोडी लावून देतो व त्यामुळें शेवटीं आत्मसाक्षात्कार होतो. ) म्हणून तो साक्षात् ज्ञानकारण नसून परंपरेनें ज्ञानकारण आहे. याविषयीं मी तुला एक कथा सांगतों ती ऐक. विंध्यारण्याच्या एका खोऱ्यांत किराट या नावाचा एक अतिशय कृपण वैश्य होता. तो धनधान्यसंपन्न असून कुटुंबी ब्राह्मणाप्रमाणें रहात असे. विंध्याच्या जंगलांतून जात असतांना एकदां त्याची एक कवडी खालीं कोठें गवतात पडली. तो स्वभावतः कृपण असल्यामुळें तीन दिवस तेथील सर्व गवत हालवीत व तिला शोधीत राहिला. ती कवडी मिळाली म्हणजे मी तिच्यावर व्यापार करीन. त्यामुळें एकीच्या चार, आठ, वीस शंभर कवड्या होतील, इत्यादि मनोराज्य करीत तो दीन होऊन अहोरात्र जंगलांत कवडी शोधीत राहिला. त्यानें लोकांच्या हजारों उपहासांकडे लक्ष्य दिलें नाहीं. तीन दिवसानीं त्याला त्या जंगलात पूर्णचंद्रबिंबासारखा मोठा चिंतामणि सापडला. त्याला पहाताच त्याचें हृदय अतिशय संतुष्ट झालें. तो आपल्या घरीं परत आला व सर्व जगाचें ऐश्वर्य प्राप्त झाल्यामुळें शांतमनानें राहिला.

रामा, ज्याप्रमाणें सांडलेली कवडी अहोरात्र अखिन्न मनानें शोधणाऱ्या किराटाला जगाच्या मोलाचें महारत्न मिळालें, त्याप्रमाणें गुरूपदेशानें शाब्दज्ञान होतें. पण त्याविषयींच अखिन्नचित्तानें अहोरात्र विचार केल्यानें अपरोक्ष साक्षात्कार होतो. किराटानें कवडीचा जर शोध केला नसता, तर त्याला महारत्न कसें मिळालें असतें ? त्याचप्रमाणें ज्याला गुरूपदेशच झालेला नाहीं, त्याला विचार तरी कसा करतां येणार, व विचाराच्या अभावीं आत्मसाक्षात्कार कसा होणार ? तात्पर्य, उपदेशामुळें शाब्दवृत्ति उत्पन्न होतात. त्यांतील शेवटच्या अति स्वच्छ वृत्तींत नित्य अपरोक्ष ब्रह्म स्फुरतें. पण त्याचें खरें कारण शिष्याची अति स्वच्छ बुद्धि व ब्रह्माचा स्वभाव हेंच आहे. गुरूपदेश हें साक्षात् कारण नव्हे. तें परंपराकारण

आहे. तथापि गुरूपदेश शाब्दवृत्ति उत्पन्न करण्यासाठीं आवश्यक आहे. राघवा, ही मोठमोठ्यांनाही मोह पाडणारी माया कशी आहे ती पहा.

एकाचा शोध करीत असताना दुसरेंच हातीं लागतें. पुरुष करतो एक व त्याला प्राप्त होतें दुसरेंच, असें या त्रिभुवनांत दिसत असल्यामुळें व शास्त्रही तसेंच सांगत असल्याकारणानें आत्मलाभानंतर प्रारब्धप्राप्त जगद्भ्रमाची अनिच्छेनें उपेक्षा करणेंच श्रेयस्कार आहे ८३.

**सर्ग ८४**—शिखिध्वजाचें वैराग्य, चूडालाश्वासन, रात्रीं एकट्याचेंच निघणें, व मंदिरांतील स्थिति.

**श्रीवसिष्ठ**—त्यानंतर शिखिध्वजराजा तत्त्वज्ञानरूप विश्रांतिस्थान प्राप्त झालेलें नसल्यामुळें अतिशय अलंघ्य मोहास प्राप्त झाला. ज्याचें मन दुःखाग्नीनें पोळत आहे असा तो अनायासानें प्राप्त झालेल्या इष्ट उपभोगांमध्यें थोडासुद्धा रममाण झाला नाहीं. व्याधानें ज्याच्या अंगांत बाण मारला आहे, अशा हरिणाप्रमाणें गुहा, झऱ्याचें तीर, एकांत स्थान इत्यादिकांतील कोठेंही त्याला चैन पडेना. रामा, तुझ्याप्रमाणेंच त्याचेही भृत्य त्याला वारंवार मधुर प्रार्थनावचनांनीं प्रेरणा करून त्याच्याकडून कशीं तरी दिवसकृत्यें करवीत. त्याचें वैराग्य उत्तरोत्तर वाढत चाललें. संन्याशाप्रमाणें तो शांतबुद्धि झाला. त्यामुळें महाभोग व राज्यलक्ष्मी याचा उपभोग घेण्यास तो तयार नसे. गाई, भूमि, सुवर्ण इत्यादिकाचें त्यानें पुष्कळ दान देव, ब्राह्मण व आप्त यांस दिलें. कृच्छ्र चांद्रायणादि तप करण्यास्तव तो तीर्थें, वनें, देवालयें इत्यादिकांतून हिंडला; तथापि निधान नसलेल्या भूमीला खणणारा पुरुष जसा निधीस प्राप्त होत नाहीं त्याप्रमाणें त्याचा शोक थोडा सुद्धा कमी झाला नाहीं. तो अहोरात्र संतापाग्नीनें संतप्त होत असे. त्यानें आपल्याशींच संसारव्याधीवरील औषधाविषयीं पुष्कळ विचार केला. चिंतापरवश व दीन झालेल्या त्यानें आपलें वैभवपूर्ण राज्यही विषासारखें लेखिलें. पुढील विषयोपभोगांनाही तो खिन्न मनानें तुच्छ मानीत असे. एकदा एकांतात समीप आलेल्या चूडालेस शिखिध्वज राजा मधुर वाणीनें असें म्हणाला.

**शिखिध्वज**—मी पुष्कळ दिवस राज्य भोगलें. वैभवाचा अनुभव घेतला. आतां मी विरक्त झालों आहें. यास्तव अरण्यांत जातों. हे कृशांगि,

सुखें, दुःखें, आपत्ति, संपत्ति इत्यादि वनवासी मुनीला परतंत्र करूं शकत नाहींत. वनवासाला राष्ट्रभंगामुळें संमोह होत नाहीं. संग्रामांत त्याच्या लोकांचा क्षय होत नाहीं. अर्थात् आमच्यापेक्षां त्या ( विरक्तां ) ना अधिक सुख होतें, असें मी समजतों. प्रिये, येथें तूं जशी मला रममाण करीत आहेस, त्याप्रमाणें सर्व स्त्रीसामग्रीनें युक्त असलेल्या वनपंक्ति विरक्तांना रममाण करितात. निर्जन एकांतांत जसें मन सुखी होतें त्याप्रमाणें तें चंद्रबिंब, ब्रह्मा, इंद्र इत्यादिकांचीं गृहें इत्यादि रम्य स्थानींही होत नाहीं. यास्तव मी एकांत स्थानीं तप करावयास जातों. तूं माझ्या सन्मंत्रामध्यें विघ्न करूं नकोस. कुलस्त्रिया स्वप्नांतही भर्त्याची इच्छा भग्न करीत नाहींत.

चूडाला—हे नाथ, योग्य काल आला असतां केलेलें कार्य शोभतें; इतर शोभत नाहीं. वसंतांत पुष्प शोभतें व शरत्कालीं फल शोभतें. ज्याचे देह जरेनें जरठ झालेले असतात त्यांनींच वनाचा आश्रय करणें उचित आहे. तुमच्या सारख्या तरुणांना तो शोभत नाहीं. म्हणून मला तुमचें गमन रुचत नाहीं. पुष्पाच्या समूहानें जसे वृक्ष त्याप्रमाणें हे महाराज, तारुण्यानें जोंपर्यंत आम्हांला सोडलेलें नाहीं तोंपर्यंत आम्हीं गृहांतच शोभत आहों. हंस जसे सरोवरास जोडून जातात त्याप्रमाणें आम्हीं दोघें मिळूनच जरेसहवर्तमान घर सोडून वनांत जाऊं. हे नृपते, उचित काल प्राप्त झालेला नसतांना प्रजापालन कर्म सोडणाऱ्या क्षत्रियाला मोठाच दोष लागेल. अकालीं एकादें कृत्य करणाऱ्या राजाला प्रजाजन प्रतिबंध करीत असतात. राज-भृत्यही प्रजेला अकार्यापासून हटवीत असतात.

शिखिध्वज—सुंदरि, माझ्या मनोरथास विघ्न करणारें हें तुझें भाषण पुरे झालें. मी दूर एकांत अरण्यांत गेलोंच म्हणून समज. तूं सुकुमार आहेस यास्तव वनांत येऊं नकोस. कारण वनवास पुरुषांनाही असह्य वाटत असतो. कठिन स्त्रियाही वनवास करण्यास समर्थ नसतात; कारण अरण्यांतील पुष्पमंजऱ्या शस्त्रांचे घाव कशा सहन करूं शकतील ! तूं येथेंच राज्याचें रक्षण करीत रहा. कारण पति कोठें गेला असतां सर्व कुटुंबाचें पालन करणें हें स्त्रियांचें व्रत आहे.

श्रीवासिष्ठ—असें बोलून तो राजा स्नान करावयास उठला. त्यानें सर्व दिन-कृत्य केलें. नंतर शिखिध्वज जसा प्रजेस सोडून सर्व जनांना दुर्गम असलेल्या वनांत जाणार होता, तसा सूर्य सर्व प्रजेचा त्याग करून सर्व लोकांस अगम्य असलेल्या अस्ताचलास गेला. घरांतून निघालेल्या नाथाच्या मागोमाग जशी अनुरागिणी चूडाला, त्याप्रमाणें आपलें सर्व विस्तृत रूप एकत्र करून प्रभा सूर्याच्या मागोमाग गेली. आकाशगंगेला धारण करणाऱ्या व भस्मानें धूसर झालेल्या शंकरास आलिंगन देणाऱ्या यमुने-प्रमाणें काळी यामिनी ( रात्री ) भस्मासारख्या धूसर भुवनास आलिंगन द्यावयास आली. कांहीं वेळानें चंद्रोदय झाला. दिनश्री व दिननाथ याचें जोडपें देवोद्यानमय मेरूच्या अपर प्रदेशीं रममाण व्हावयास गेलें व निशा आणि निशानाथ यांचें जोडपें मेरूच्या अलीकडील उत्तमस्थानीं आलें. आकाशरूपी फरशीवर तारागणरूपी रत्नें पसरून टाकल्याप्रमाणें शोभत होतीं. रात्र उत्तरोत्तर वृद्धि पावून तरुण झाली व निशानाथ सर्व लोक निजले असता एकांतात तिचा उपभोग घेऊं लागला. राजा शिखि-ध्वजही सायंसंध्या, भोजन, कथाश्रवण इत्यादि करून आवडत्या चूडाले-सह शय्येवर निजला.

पण त्याला त्या रात्रीं झोंप आली नाहीं. मध्यरात्र झाली असता सर्व लोक स्वस्थ घोरत पडले आहेत, असें पाहून तो राजा निद्रासुखात निमग्न झालेल्या प्रियेला शय्येवरच सोडून उठला व मंदिराच्या बाहेर जाऊं लागला. तेव्हां कांहीं अनुचर जागे होऊन त्याच्या मागोमाग जाण्यास तयार झाले. पण ‘ मी वीरचर्येसाठीं नगरांत जात आहें. तुम्ही कोणी माझ्या मागून येऊं नका,’ असें सांगून तो एकटाच तेथून निघाला. आपल्या राजधानीच्या वेशीवर येताच त्यानें नगरांतून बाहेर जाण्याचा निश्चय केला. व ज्याची बुद्धि सर्वथा तृप्त आहे, असा तो ‘ हे राजलक्ष्मि, तुला नमस्कार असो !’ असें बोलून वेशीच्या बाहेर पडला. एकादा महा नद जसा समुद्रांत प्रवेश करतो, त्याप्रमाणें तो एकटाच एका महा अरण्यांत प्रविष्ट झाला. फार दूर गेल्यावर भयंकर रात्रीप्रमा-णेंच भयंकर असलेल्या अरण्यांत तो कांहीं वेळ विश्रांति घेण्याकरितां बसला व उजाडतांच पुढें चालला. तो राजा सूर्याप्रमाणेंच सर्व दिवसभर

मार्ग चालत होता. शेवटीं सूर्यास्त झाला असतां तो एका सुंदर सरोवराच्या कांठीं उतरला. स्नानादि दिनकृत्यें करून त्यानें फलाहार केला व ती रात्र तेथेंच घालविली. पुनः दुसऱ्या दिवशीं उजाडताच तो पुढें चालला. अनेक नगरें, देश, पर्वत, नद्या इत्यादिकांचें उल्लंघन करीत त्यानें बारा दिवस एकसारखा प्रवास केला. तेव्हा तो एका मंदरपर्वताजवळील सुंदर अरण्यांत जाऊन पोंचला. त्यात अनेक जलप्रवाह झुळ झुळ ध्वनि करीत वहात होते. शब्द करणाऱ्या पक्ष्यांनीं व्यापलेले अनेक वृक्ष त्यास सुशोभित करीत होते. तेथें अनेक ब्राह्मणाचे आश्रम मोडून पडलेले असून त्यांत पूर्वीं कोणी महात्मे रहात असावे, असें अनुमान होत होतें. त्यात क्षुद्र प्राणी फारसे नसून सिद्धानीं लतागृहांचा आश्रय केला होता. फलझाडें व वेली यांची तेथें समृद्धि असून त्यावर तापसाची वृत्ति चांगली चालण्यासारखी होती. असो; अशा त्या उचित अरण्यांतील एका सम, शुद्ध, जलपूर्ण, शीतल, कोमळ, तृणयुक्त व फळझाडानीं भरलेल्या प्रदेशीं त्यानें रहाण्याचा निश्चय केला. पर्णशाला बांधण्यासाठीं काठया, झाडांचीं पानें इत्यादि सामग्री जमविली. पर्णकुटी स्वतःच बांधली. वेळूचा दंड, फलाहार पात्र, अर्घ्यपात्र, पुष्पपात्र, अक्षमाला, कमंडलु, शीतनिवारणार्थ कंथा, अजिन, आसन इत्यादि तापसकर्मास अवश्य असलेले पदार्थ संपादन केले. व नंतर तो तप करूं लागला.

सकाळीं पहिल्या प्रहरीं तो संध्या व जप करी. दुसऱ्या प्रहरीं फुलें वेंचून आणणें, स्नान व देवपूजन; तिसऱ्या प्रहरीं वनांतील फलें, कंद, बिसादि यांचा आहार व चवथ्या प्रहरीं किंचित् विश्रांति घेऊन तो सायंसंध्या करी, आणि नंतर रात्रभर तो जितेंद्रिय जप करीत राही. मालवेश शिखिध्वज याप्रमाणें मंदरपर्वतासमीप पर्णशाळा बांधून राहूं लागला. त्यानें तेथें असे अनेक दिवस अखिन्न मनानें घालविले. पूर्वीं अनुभविलेल्या राजविलासाचें त्यानें स्मरणही केलें नाहीं. हृदयामध्यें विवेक स्फुरण पावत असतांना राज्यलक्ष्मी कोणाला आकर्षण करूं शकणार ? ८४.

**सर्ग ८५**—जागृत्या झालेल्या राणीनें राजाचा शोध केला. मार्गांत त्याचें दर्शन. भावी अर्थाचें दर्शन व योग्यकालीं बोधन.

श्रीवसिष्ठ—याप्रमाणें शिखिध्वज राजा वनांतील आपल्या मठींत आनंदानें राहूं लागला. आतां तिकडे त्याच्या चूडाला भार्येनें काय केलें, तें सांगतों. मध्यरात्रीं उठून शिखिध्वज दूर निघून गेला असतां चूडाला एकाएकीं भयभीत होऊन उठली व पाहते तों तिला आपली शय्या पतिविरहित आढळली. लागलीच ती खिन्नमनानें उठली. ती साध्वी मनांत अतिशय उद्विग्न होऊन क्षणभर आपल्या मनाशींच विचार करूं लागली. आपला प्रभु राज्य सोडून वनांत गेला असावा, असें तिला वाटलें, व त्यामुळें तिच्या मनाला थोडें दुःखही झालें. पण ती सुज्ञ पतिव्रता लागलीच आपल्याशीं म्हणाली, "मला तरी आता येथें राहून काय करावयाचें आहे? मीही त्यांच्याच समीप जातें. विधीनें स्त्रियांची गति पति हीच एक सांगितली आहे." असा विचार करून ती साध्वी भर्त्याच्या मागोमाग जावयास निघाली. ती वातायनांतून निघून आकाशांत आली. ती योगिनी आकाशमार्गानें भ्रमण करीत चालली. कांहीं वेळानें रात्रीं एकटाच हातांत खड्ग धरून जात असलेला राजा तिला दिसला. तेव्हा तिनें आकाशांत राहूनच भर्त्याच्या पुढील वृत्तान्ताचें चिंतन केलें. त्याला पुढें कोणत्या प्रकारानें, कोणत्या निमित्तानें, कोणत्या वेळीं, कोणत्या प्रदेशीं, कोणत्या व किती क्रिया केल्यानें शांति मिळणें शक्य आहे, तें तिनें पाहिलें. सिद्धीच्या सामर्थ्यानें भर्त्याचें अवश्य भवितव्य पुढें असल्याप्रमाणें पाहून तदनुरूप आचरण करण्यासाठीं ती तेथूनच परत फिरली. त्याच्यापाशीं माझें गमन आजच व्हावयाचें नसून तें पुढें कांहीं दिवसांनीं व्हावयाचें आहे. कारण नियतीचा तसा निश्चय आहे. असा विचार करून व पुनः अंतःपुरांत परत येऊन चूडाला स्वस्थ निजली. ती अंगना राजा कांहीं कारणानें येथून गेला आहे, असें प्रजाजनास सांगून व सर्वांचें आश्वासन करून तेथें राहिली. सर्वत्र समदृष्टि ठेवून तिनें भर्त्याचें राज्य उत्तम प्रकारें चालविलें. एखादी शेतकऱ्याची स्त्री शरत्कालीं पिकलेलें शेत जशी राखते, त्याप्रमाणें तिनें त्याचें रक्षण केलें. याप्रमाणें राज्य व अरण्य यांचें पालन करणाऱ्या व परस्पराचें मुख न पाहणाऱ्या त्या दोघांचा काल भराभर जाऊं लागला. अशा रीतीनें स्वराज्यांत राहणाऱ्या चूडालेचीं व वनगुच्छांत तप करणाऱ्या शिखिध्वजाचीं अठरा वर्षे गेलीं. तेव्हा महा-

पर्वताच्या समीप पर्णशालेंत राहणाऱ्या राजाला जरेनें जर्जर केलें. तेव्हां ज्ञान-दृष्टीनें तें जाणून व आतां मला आपल्या प्राणनाथापाशीं जाणें अवश्य आहे, असें समजून चूडाला एके रात्रीं मंदिरांतून निघाली. आकाशात आली. पक्ष्याप्रमाणें वायुमार्गानें वेगानें चालली. तिनें जातांना मार्गांत अनेक सिद्धांना पाहिलें. त्यांच्या अंगावरून येणाऱ्या सुगंधि वायूच्या सुखस्पर्शाचा अनुभव घेतला. चंद्रसंज्ञक महाअमृतसागराची तरंगपरंपराच, अशा निर्मल चांदण्याचें सुख भोगलें. ती मेघाच्या वरून जात असतांना आपल्या विद्युद्रूपी भार्यांशीं वियोग न पावलेल्या अनेक विलासी मेघांस वारंवार पाहती झाली. व आपल्याशींच म्हणाली, “ पहा, हा काय चमत्कार आहे ? देहवानांचा स्वभाव कधीं शांत होत नाहीं. कारण या अवियुक्त जोडप्यांना पाहून माझेंही मन उत्कंठित होत आहे. तें विवेकानें संपन्न असूनही मी त्या सिंहस्कंध, प्रेमपूर्ण कांताला केव्हां पाहीन, असें म्हणून पुनः अतिशय उत्कंठित झालें आहें. या मंजरीसमूहानें युक्त असलेल्या वेली आपल्या वृक्षरूपी पतीस एक क्षणभरही सोडीत नाहींत, असें पाहून माझें मन चंचल होत आहे. जशी ही सिद्धांगना आपल्या प्रियाकडे जात आहे, तशी मी आपल्या कांतापाशीं केव्हां जाईन असें म्हणून माझें मन खिन्न होतें. हे मंद वायु, हे चंद्राचे किरण, व या वनपंक्ति, मलाही उत्कंठित करितात, तेव्हा आता आणखीं अधिक आश्चर्य कोणतें असणार ! अरे खुळ्या चित्ता, तूं व्यर्थ आंतल्या आंत तांडवनृत्य करीत कां राहिलें आहेस ? अरे भल्या मना, ती तुझी आकाशासारखी निर्मळ विवेकिता कोठें आहे ? अथवा हे चित्ता, तूं आपल्या भर्त्याविषयीं जर उत्कंठित होत असशील तर खुशाल हो. मला तुझ्या बरोबर मूढ होऊन काय करावयाचें आहे ? बा शरीरा, तूं व्यर्थ कशाला उत्कंठित होतेंस ? तुझा भर्ता आतां जराजर्जर झाला असेल. तो तपस्वी असल्यामुळें कृश व तुझी इच्छा न करणाराही झाला असेल. मला वाटतें कीं त्याचें मन राज्यादिकांचा भोग न घेण्यासाठीं निश्चय करून राहिलें असेल. त्याची वासनालता पावसाळ्यांतील नदीस जाऊन मिळालेल्या ओहोळाप्रमाणें तद्रूप होऊन गेली असेल. तो आतां एकांतांत रत, एकात्मा, निरिच्छ, वासना-

रहित झाला असेल. माझ्या भर्त्याची स्थिति शुष्कवृक्षासारखी झाली असेल. तथापि अरे चित्ता, तूं व्यर्थ चिंता कशाला करतेस ? मी पुढील उपायानें भर्त्याच्या बुद्धीला तत्त्वज्ञानसपन्न करून अवशिष्ट राहिलेल्या प्रारब्ध कर्माच्या भोगोत्कंठेनें युक्त करीन व तुझ्याशीं त्याचा संयोग करून देईन. मुनीसारख्या मननशील भर्त्याच्या मनाला संकल्पशून्य करून मी राज्य करण्यामध्येंच नियुक्त करीन व त्याकारणानें आपण दोघें दीर्घकाल सुखानें राहूं. अहाहा ! तत्त्वबोधानें संपन्न झालेल्या पतीसह मी आनंदाचा उपभोग घेत तेथेंच राहीन, हा माझा फार दिवसाचा शुभ मनोरथ पूर्ण होण्याची वेळ समीप आली आहे. समान मनोवृत्तीच्या माणसाशीं होणाऱ्या समागमाचें सुख सर्व आनंदांत श्रेष्ठ आहे. असें चिंतन करणारी चूडाला आकाशमार्गानेंच पर्वत, देश, नद्या, नगरें इत्यादिकांचें उल्लंघन करीत चालली व शेवटीं मंदरपर्वतास येऊन पोंचली. तेव्हां आकाशात अदृश्य राहूनच ती, वायूच्या लहरीप्रमाणें, वनांत शिरली. त्यामध्यें एकीकडे बांधलेल्या पर्णकुटींत असलेल्या पतीला तिनें पाहिलें. पूर्वी हार केयूरादि भूषणांनीं भूषित होणारा तोच आता तपानें कृश, कृष्णवर्ण व जीर्ण झाला आहे, असें तिनें शांत मनानें पाहिलें. निःस्पृह, फाटकीं वस्त्रें धारण करणारा, शांत व एकांतवासी राजाला पाहून मनांत किंचित् खिन्न झालेली चूडाला आपल्याशींच म्हणाली,—" हरहर, आत्म्याला न जाणणें, हेंच महा मौर्ख्य असून तें अतिशय कठिण आहे. त्या मूर्खपणाच्या प्रसादानेंच असल्या दुर्दशा प्राप्त होतात. कारण हा माझा प्रिय पति महा लक्ष्मीवान् राजा असूनही घोर मोहामुळें या दुर्दशेस प्राप्त झाला आहे. असो; मी आता याला आजच ज्ञानसंपन्न करितें. त्याच-प्रमाणें त्याला भोग व मोक्षश्रीचा साक्षात् अनुभव घ्यावयास लावतें. पण हें रूप सोडून मला दुसऱ्या कोणत्या तरी रूपानेंच उत्तम बोध करण्या-साठीं त्याच्यापाशीं गेलें पाहिजे. कारण ही माझी खुळी, अज्ञ कांता आहे, असें समजून तो माझें तत्त्वज्ञानही ऐकणार नाहीं. यास्तव मी आता तापसवेषानें याला एका क्षणात बोध करतें. याचे राग-द्वेषादि मनोदोष तर दीर्घ तपामुळें क्षीण झाले आहेत. यास्तव आता याच्या शुद्ध चित्तांत आत्मतत्त्व अनायासानें प्रतिबिंबित होईल.

असा आपल्याच मनाशीं पुष्कळ विचार करून चूडाला ब्राह्मणपुत्र झाली. थोडेंसें ध्यान करूनच तिनें आपलें स्वरूप पालटलें. नंतर तो तेजस्वी व स्मितमुख ब्राह्मणपुत्र राजाच्या पुढें गेला. राजानेंही समोर येणाऱ्या त्या महात्म्याला पाहिलें. दुसऱ्या वनांतून येणाऱ्या, साक्षात् तपोमूर्तीप्रमाणें असणाऱ्या, सोन्याच्या रसाप्रमाणें पिंवळ्या व स्वच्छ वर्णाच्या, मोत्यांच्या हारानें भूषित झालेल्या, शुभ्र यज्ञोपवीत धारण करणाऱ्या, दोन शुक्ल वस्त्रांनीं सुशोभित झालेल्या व हातांत कमंडलु घेतलेल्या, सुंदर ब्राह्मणबटूस शिखिध्वज पाहता झाला. त्याच्या मनगटांत दुहेरी अक्षमाला अडकविलेली होती. तो फारसा उंच नव्हता. त्याचें मस्तक केसांनीं भरलें होतें. तो आपल्या अंगकांतीनें त्या प्रदेशास प्रकाशित करीत होता. नुकत्याच उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें त्याचें मुख कर्णांतील कुंडलांनीं भूषित झालें होतें. त्यानें आपल्या शेंडींत मंदारपुष्प खोवलें होतें. त्याचें शरीर जसें अतिशय सुंदर तसेंच अतिशय ऊर्जित होतें. त्यानें सर्व इंद्रियांस जिंकलें होतें. त्यानें शुभ्र भस्माचा ठळक टिळा लावला होता. असो; अशा प्रकारच्या त्या अलौकिक ब्राह्मणपुत्राला पाहून, राजा शिखिध्वजाला हा कोणी देवपुत्रच आला आहे, असें वाटलें व तो लागलाच पादुका काढून उठला आणि ‘ हे देवपुत्रा, तुला नमस्कार असो. हें आसन आहे. यावर बैस ’ असें बोलून त्यानें आपल्या हातानें तेथलेंच एक पान त्याला बसावयास दिलें, व हातांत पुष्पांची अंजली अर्पण केली. तेव्हां ‘ हे राजर्षे, तुला नमस्कार असो; असें बोलून ब्राह्मणपुत्रानें तीं पुष्पें घेतलीं व आसनपरिग्रहही केला.

**शिखिध्वज**—हे महाभाग देवपुत्रा, कोठून आगमन केलेंस ? तुला पाहिल्यामुळें मला आजचा हा दिवस सफल झाल्यासारखा वाटत आहे हे मानवा, हें अर्घ्य, हें पाद्य, हीं पुष्पे व या गुंफलेल्या माळा तूं घे. तुझें कल्याण होवो.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, असें बोलून राजानें पाद्य, अर्घ्य इत्यादि सर्व त्या वेषधारी भार्येला समर्पण केलें. तेव्हां—

**चूडाला**—राजन्, मीं या भूतलावरील अनेक उत्तम स्थानांतून भ्रमण केलें, पण आज तुझ्यापासून जशी पूजा मला प्राप्त झाली आहे. तशी दुसऱ्या कोणापासूनही झाली नाहीं. या तुझ्या प्रशंसनीय विनयानें

'तूं खचित चिरजीवी होशील' असें मला वाटतें. हे साधो, तूं उदार मनानें सर्व संकल्पांचा त्याग करून निर्वाणासाठीं तप केलें आहेस काय ? बा सौम्य पुरुषा, महाराज्य सोडून या असल्या वनाचें सेवन करणें, हेंच तुझें शांत व्रत असिधाराव्रतासारखें आहे.

शिखिध्वज—हे देवा, हे भगवाना, तूं दिव्यदृष्टि आहेस. तेव्हां माझें सर्व वृत्त तूं जाणतोस, यांत नवल तें कोणतें ? लोकोत्तर सौंदर्यलक्ष्मीवरूनच तुझें देवत्व व्यक्त होत आहे. हीं तुझीं अंगें चंद्राच्या अवयवांनीं तयार केलेलीं आहेत असें मला वाटतें. अथवा पुष्कळ बोलून काय करावयाचें आहे. तूं आपल्या अवलोकनानें व अंगकांतीनें अमृतवृष्टीप्रमाणें मला तृप्त करीत आहेस. हे सुंदरा, माझी प्रिया भार्या माझें राज्य रक्षण करीत आहे. तिच्यासारखीं तुझीं अंगें मला आज दिसत आहेत. यास्तव हे महात्मन्, मीं दिलेल्या या माळेनें तूं आपलें नखशिखान्त शरीर झाकून घे. कारण सूर्याच्या तेजानें हें तुझें पुष्पाच्या पाकळीसारखें सुकुमार अंग, निष्कलंक चंद्राप्रमाणें, म्लान होत आहे, असें मला वाटतें. ही शुभ्र माळ मीं देवपूजेकरितां तयार केली आहे. पण ती आतां तुझ्या अंगसंगानें कृतार्थ होवो. अभ्यागत जन देवाहूनही पूज्य असतो. यास्तव तूं कोण, कोणाचा पुत्र व मजवर कृपा करून कां आला आहेस? तें सांग.

ब्राह्मण—राजा, मी तुझ्या प्रश्नांचें उचित उत्तर देतों तें ऐक. प्रश्न करणाऱ्या नम्र पुरुषाला कोणता सज्जन ठकवील ? या जगत्कोशामध्यें शुद्धात्मा नारदमुनि आहे. त्याच्या सुंदर मुखावर पुण्यलक्ष्मी चमकत असते तो महात्मा एकदां गंगानदीच्या रम्य तटावरील गुहेंत ध्यान करीत बसला होता. तो ध्यान सोडून उठला असतां एकदां तेथें ककणांचा ध्वनि ऐकता झाला. तेव्हां हा ध्वनि कशाचा बरें आहे ? असें म्हणून त्यानें कौतुकानें समोर पाहिलें तों नदींत त्याला रंभा, तिलोत्तमा इत्यादि स्त्रियांचा जलक्रीडा करणारा विलासी संघ दिसला. सर्व स्त्रिया त्या पुरुषरहित स्थानीं वस्त्रें काठावर सोडून ठेवून स्नानें करीत होत्या. भागीरथीच्या निर्जन प्रवाहांत त्यांच्या अनेक उद्दाम लीला चालल्या होत्या. त्यांना पाहून नारदमुनींचें चित्त चंचल झालें. त्याचा सर्व विवेक पार नाहींसा होऊन

त्या सच्छिद्र मनांत कामाचा प्रादुर्भाव झाला. त्याचें सर्व धैर्य नष्ट झालें. व वीर्य स्वस्थानापासून सुटलें.

शिखिध्वज---तसला बहुश्रुत, सर्वज्ञ, जीवन्मुक्त, निरिच्छ, अहंभावरहित, व अनुपम मुनिही कामपरवश कसा झाला ?

चूडाला---हे राजर्षे, त्रिभुवनातील सर्व देवादि जातींचा देह स्वभावतःच दोन प्रकारचा आहे. यास्तव कोणी अज्ञ असो कीं सुज्ञ असो; अतिप्रबल प्रारब्धानें विवेकांशाचा निरोध केला असता प्रत्येकाला देहधर्माचें अनुवर्तन अवश्य करावें लागतें. मरणापर्यंत या जगांतील प्रत्येक शरीर सुख-दुःखमय असतें. तृप्तीसारख्या कांहीं पदार्थांनीं सुख वाढतें. क्षुधा, तृषा, इत्यादि कांहींनीं दुःख वाढतें. याचें कारण स्वभाव हेंच एक आहे. सत्य निर्मल स्वरूपाला एक क्षणभरही विसरलें असता दृश्य उल्लास पावते. सतत त्याचें ( दृश्याचें ) च अनुसंधान केल्यास चित्तात हें दृश्यपिशाच दृढ होऊन राहतें. अंधकार व प्रकाश याच्या योगानें रात्र व दिवस याची जशी स्थिति होत असते त्याप्रमाणेच दुःख व सुख याच्या योगानें शरीराची स्थिति होते. पण या न्यायानें अज्ञ व ज्ञानी याच्या प्रारब्धभोगामध्यें साम्य असलें तरी त्यांत आसक्त होणे व न होणें यामुळें दोघाच्या स्थितींत फरक पडतोच. शुभ्र वस्त्राला जसे कुंकु चिकटतें त्याप्रमाणें अज्ञाच्या चित्तात वासना दृढ होत जातात व ज्ञानी पुरुषाच्या चित्तास त्या मुळींच स्पर्श करूं शकत नाहींत. स्फटिकमण्यापाशीं ज्या ज्या रंगाचा पदार्थ न्यावा तत्तन्मय तो ( स्फटिक ) झाल्यासारखा वाटतो; पण वस्तुतः तो त्या रंगाचा होत नाहीं; त्याप्रमाणें ज्ञानी सुखादिकानीं सुखादिमान् झाल्यासारखा भासतो; पण ज्ञानप्रभावानें जीवन्मुक्त झालेला तो वस्तुतः तद्रूप होत नाहीं. केवळ पदार्थाच्या संसर्गानें अज्ञाप्रमाणें त्याची बुद्धि अतिशय रंजित होत नाहीं. केशरादि पदार्थ जरी दूर केले, तरी त्याचा वस्त्राला लागलेला रंग जात नाहीं त्याप्रमाणें मूढ पुरुषाची बुद्धि विषय दूर झाले तरी, विषयरंजन, सोडीत नाहीं. बंध व मोक्ष याच कारणानें व्यवस्थित ( निश्चित ) झाले आहेत. भावनांचा क्षय हा मोक्ष व भावनांची दृढता हाच बंध होय.

**शिखिध्वज**—प्रभो, पुत्र-राज्यादि दूरस्थ व लाभ-नाशादि समीपस्थ विषयांच्या योगानें सुख व दुःख याच्या उत्पत्तीचें कारण झालें असता 'तीं माझीं आहेत,' असा अभिमान धरणाऱ्या जीवाला तीं ( सुख व दुःख ) कोणत्या क्रमानें होतात, तें मला सांग. तुझें मधुर वचन श्रवण करीत असताना माझ्या चित्ताची तृप्ति होत नाहीं.

**चूडाला**—राजन्, समीपस्थ विषयातील सुख शरीर व इंद्रियें याच्या द्वारा व दूरस्थ विषयातील सुख शब्द व अनुमान याच्या द्वारा जाणून अमर्यादित आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झालेला नसल्यामुळें ही बुद्धिस्थ आत्मसुखसंवित् बुद्धिक्षोभामुळें क्षुब्ध होते. व कुंडलिनी-गत जीवास आविर्भूत करते. हृदयामध्ये स्थित असलेल्या भोक्त्याला नेत्र, जिह्वा, कर्ण इत्यादि नियत स्थानीं येण्यासाठीं नाड्या हा मार्ग योजलेला आहे. स्फुरण पावणारा जीव प्राणवायूने भरलेल्या नाड्यांचें आक्रमण करतो. मुळाशीं घातलेल्या जलाचा रस जसा झाडाच्या सर्व शाखातून अनायासाने एकसारखा संचार करीत राहतो, त्याप्रमाणें विषयस्पर्श होताच जीवाचा तद्रूप प्रवाह सतत सुरू होतो. जीवाला सुखा-नुभव घेण्यासाठीं व दुःखानुभव घेण्यासाठीं शरीरात अनेक नाड्या केलेल्या आहेत. त्यामुळें सुखाचा अनुभव घेण्यास प्रवृत्त झालेल्या जीवाची स्वस्थता स्फुरण पावते. दुःखानुभव घेण्यास प्रवृत्त झालेल्या जीवाची नाहीं. तो आपल्याला अस्वस्थ, चंचळ, व संतप्त होत असल्यासारखें पाहतो. यास्तव जीवाचे सुखकर मार्ग व दुःखकर मार्ग निरनिराळे आहेत, असें अनुमान होतें. राजा, श्रीमान् इत्यादि सुवेषसंपन्न पुरुषाचे मार्ग निराळे व कुवेष धारण करणाऱ्या पामराचे मार्ग निराळे. जेव्हा जेव्हा हा जीव 'मी सुखी, दुःखी इत्यादि स्फुरण न पावता अतिशय शांत अवस्थेंत राहतो, तेव्हा तेव्हा तो मुक्तच आहे व जेव्हा जेव्हां आणि जितका अधिक तो प्राणवायूच्या क्षोभामुळें स्फुरण पावतो, तेव्हां तेव्हा तितकाच बद्ध आहे, असें तूं जाण. सुखदुःखाचा अनुभव हाच बंध आहे; दुसरा कोणी नव्हे. अर्थात् त्याच्या अभावीं मोक्ष. अशी या जगातील प्राण्याची द्विविध स्थिति आहे. जोंवर शठ इंद्रियांनीं सुखदुःखदशा आणल्या नाहींत तोंवर जीव सुखरूप, सौम्य व शांत असतो. चंद्राला पाहून जसा समुद्र त्या-

प्रमाणें सुख किंवा दुःख यांतील कशाचा तरी अनुभव घेऊन अतींद्रिय ( स्वप्रकाश ) जीव चंचलरूप होतो. बा भूपाला, मास पाहताच जसें मांजर त्याप्रमाणें सुख, सुखसाधन विषय, त्याचे उपाय धनादि यांच्या योगानें जीव क्षुब्ध होतो. निरतिशयानंद–आत्मतत्त्वाचें अज्ञान हेंच त्याच्या क्षोभाचें कारण आहे. पण शुद्ध आत्मबोधानें सुखदुःखादिक नाहींतच असें कळल्यानें जीव सौम्य होतो. सुखादि वस्तूच नाहींत व त्या माझ्या नव्हेत, ' मी ' हा भाव व्यर्थ उद्भवला आहे, जसें जाणणारा जीव शांत होतो. तो निर्वाणास प्राप्त होतो. सुखादि वस्तु मिथ्या आहेत, अशा बोधानें जीव त्याच्यापासून पराङ्मुख झाला कीं तो केवळ शांत होतो. सर्व पदार्थजात चिदाकाश ब्रह्म आहे, असा दृढ निश्चय झाला असता तैलरहित दीपाप्रमाणें जीव शांत होतो. सुखादि स्नेह (तेल) संपला असतां जीवदीप विझतो. सर्व जगत् चिन्मात्र आहे, असें ज्ञान झालें असता व अद्वैताची भावना केली असता जीव सर्व दृश्य शून्य आहे, असें समजून त्याकरित क्षुब्ध होत नाहीं. ब्रह्म व आत्मा यांचें ऐक्य आहे, अशा दीर्घ भावनेने पृथक्ताशून्य व बंधशून्य झालेल्या जीवाला क्षोभ कसा होणार ? तर मग आरंभीं तरी त्याला तो कसा झाला, म्हणून विचारशील तर सागतों- हिरण्यगर्भ नावाच्या असल्याच कल्पित आद्य जीवानें ' मी जीवरूपाने संसार करीन व अशा रीतीनें आत्मतत्त्वबोधानें मुक्त होईन. ' अशा स्वकल्पनेनेच बंध-मोक्ष मार्गांची योजना करून तदनुरूप वर्तन चालविलें आहे.

**शिखिध्वज**—बा देवपुत्रा, सुखानें संचार करण्यास योग्य असलेल्या नाड्यातून संचार करीत असताना जीव स्ववीर्यापासून च्युत कसा होतो ?

**चूडाला**—स्त्रीचें दर्शन होताच रागवासनेनें क्षुब्ध झालेला जीव अंकुरित रागादि वृत्तींचें अनुकरण ह्याच आज्ञेनें प्राणादि वायूंस क्षुब्ध करतो मेद, अस्थि इत्यादिकाच्या आंतून संचार करणाऱ्या व्यान वायूच्या प्रेरणेने सर्वांगात असणारा साररूप शुक्रधातु स्वस्थानापासून च्युत होतो. नंतर देहातील नाडीरूपी मार्गानें तो बाहेर वहात येतो.

**शिखिध्वज**—देवतनया, तूं महाज्ञानी आहेस. तुला सर्व पूर्वापर स्थिति अवगत आहे. तुझ्या भाषणावरूनच तुझी योग्यता कळत आहे. आतां स्वभाव कशाला म्हणतात, तें सांग.

**चूडाला**—सृष्टीच्या आरंभीं सृष्टि करण्यास सज्ज झालेलें ब्रह्म, प्राक्तन प्राण्याच्या कर्मानुरोधानें जशा जशा धर्मांचें होऊन पदार्थरूपानें ज्या ज्या स्वरूपांत स्फुरण पावलें त्या त्या पदार्थांनीं तशा तशा धर्मानेंच नियमानें प्रलयापर्यंत राहणें यास स्वभाव म्हणतात. हल्लींच्या स्वभाववैचित्र्याचें कारण दृष्टसामग्रीचें वैचित्र्य आहे, असेंही म्हणतां येणें शक्य आहे. पण सृष्टीच्या अगदीं आरंभीं दृष्टसामग्री संभवतच नाहीं. यास्तव त्या वेळचे कार्यवैचित्र्य अदृष्टवैचित्र्यामुळेंच होतें, असें सांगण्याकरितां आद्य सर्गाचा दृष्टान्त येथें दिला आहे. सांप्रतकालचें स्वभाव-वैचित्र्यही केवळ दृष्टसामग्रीनेंच झालेलें नाहीं, तर तें पाण्यावरील बुडबुड्याच्या उत्पत्ति-नाशाप्रमाणें दृष्ट व अदृष्ट अशा उभयविध कारणा-मुळें झालेलें आहे. अथवा सर्वच मायामात्र असल्यामुळें घुणाक्षराप्रमाणें स्वभाव निष्कारणच उद्भवलेला आहे, असें सुज्ञ समजतात. साराश, हे राजा, स्वभाववशात् हें जग रूढ झालें असता नाना आकारांचे ( अंडजादि चतुर्विध ) देह भ्रमण करूं लागतात. पण त्यातील कित्येक ज्ञानदेह वासनारहित होऊन पुनः जन्म घेत नाहींत व दुसरे अज्ञदेह भोगाविषयीं निबिड आस्था धरल्यामुळें पुनः जन्म घेतात ८५.

**सर्ग ८६**—कुंभांतून कुंभाचा जन्म, वृद्धि, ब्रह्मसमागम व सर्वज्ञता.

**चूडाला**—राजन्, वर वर्णन केलेल्या प्रकारचा स्वभाव सर्व वस्तूंमध्यें प्रलयापर्यंत असतो. त्याचप्रमाणें मायाशबल आत्म्याचा सृष्टिस्वभावही श्रुतिप्रसिद्ध आहे. त्या द्विविध स्वभावामुळें हें मोठें जग झालें आहे. वासनाच्या योगानें त्याची स्थिति होऊन तें धर्म व अधर्म याच्या अधीन होऊन राहिलें आहे. पण वासनाचा ऱ्हास ( ज्ञानाभ्यासानें क्षय ) केला असता धर्म व अधर्म जीवाला बद्ध करूं शकत नाहींत व त्यामुळें जीव उत्पन्न होत नाहीं, असा आमचा अनुभव आहे.

**शिखिध्वज**—हे वक्त्यातील श्रेष्ठा, तूं अति उत्कृष्ट व महा अर्थसंपन्न भाषण करीत आहेस. स्वतः अनुभव घेतलेलें गूढ परमार्थतत्त्व तू सांगत आहेस. हे सुदरा, तुझें हें वाक्यामृत श्रवण करून अमृत प्राशन केल्याप्रमाणें मी आंतल्या आंत शीतल झालों आहें. यास्तव आतां अगोदर संक्षेपतः आपली उत्पत्ति मला सांग. नंतर मी तुझी ज्ञानपूर्ण

वाणी श्रवण करीन. त्या ब्रह्मपुत्र नारदानें आपलें वीर्य कोणत्या आधारांत स्थापिलें, तें मला सांग.

**चूडाला**—त्यानंतर मनोरूपी मत्त गजाला शुद्ध बुद्धिरूपी बंधन-रज्जूनें विवेकस्तंभास बांधून ठेवणाऱ्या त्यानें आपलें चंद्रद्रवासारखें शुभ्र वीर्य जवळच्याच कुंभांत ठेवलें. तें पारा, सुवर्ण, रुपें इत्यादि शंभूच्या वीर्याचें अनुकरण करणारें होतें. तदनंतर नारदानें तो अति दृढ कुंभ संकल्पित दुग्धानें भरून सोडला. तें दुग्ध अमृताप्रमाणें त्या वीर्याची वृद्धि करूं लागलें. एका महिन्यातच तें चंद्राप्रमाणें पूर्ण अगांनीं युक्त झाले. वसंत जसा पुष्पाला पसरतो, त्याप्रमाणें त्या घटातून सुंदर पुत्र निघाला. त्याची अंगकांति पूर्णचंद्रासारखी होती. थोड्याच दिवसांत मुनीच्या शुभ संकल्पानें तो मोठा झाला. शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें त्याची कांति प्रत्यहीं वृद्धि पावत होती. योग्यसमयीं नारदानें त्याचे सर्व संस्कार केले. धन एका भांड्यांतून काढून जसें दुसऱ्या भांड्यांत ठेवावें त्याप्रमाणें मुनीनें आपलें विद्याधन त्या आपल्या पुत्राचे ठायीं अनायासानें स्थापलें. थोडक्याच दिवसांत त्याला सर्व वाङ्मयाचें ज्ञान झालें. मुनिश्रेष्ठानें त्या प्रिय बालकाला आपल्या प्रतिबिंबाप्रमाणें केलें.

नंतर एकदा तो मुनिराज त्या पुत्रास बरोबर घेऊन ब्रह्मलोकास गेला. नारदानें आपल्या पित्यास अभिवादन केलें असता त्याच्या पुत्रानेंही पिता-महास वंदन केलें. तेव्हां त्याचें ग्रहण–धारण–पटुत्व कितपतसें आहे. हें कळण्यासाठीं ब्रह्मदेवानें अगोदर त्याची परीक्षा घेतली व नंतर तो वेदादि सर्व विद्यांचें स्थान आहे, असें जाणून त्या आपल्या पौत्राला प्रीतीनें मांडीवर बसवून घेतलें. ( आपला पुत्र किंवा पौत्र महा विद्वान् झालेला पाहून अतिशय आनंदित न होणारा पिता अथवा पितामह या जगांत दुर्लभच होय ) आणि केवळ आशीर्वादानेंच त्याला सर्वज्ञ व ज्ञानपारग केलें. ब्रह्मदेवानें त्या पौत्राचें नांव कुंभ असें ठेवलें. हे साधो, तोच कुंभ मी आहें. मी नारदाचा कुंभांतून झालेला पुत्र आहें. मी आपल्या जनकासह पद्मज ब्रह्मदेवाच्या लोकीं सुखानें राहतों. चार मूर्ति-मान् वेद हेच माझे खेळगडी मित्र आहेत. गायत्री ही माझी मावशी व सरस्वती माता आहे. माझें घर ब्रह्मलोकीं आहे व मी तेथें सुस्थित आहें.

मी सहज लीलेनें स्वेच्छेनें या त्रिभुवनांत विहार करीत असतों. पण मला काहीं कर्तव्य नाहीं. मी भूमीवरून सचार करीत असलों तरी माझे पाय भूमीस स्पर्श करीत नाहींत. धूळ माझ्या अंगास लागत नाहीं. माझें शरीर ग्लानीस प्राप्त होत नाहीं. आज आकाशमार्गानें जात असतांना मी तुला खालीं पाहिलें व त्यामुळेंच येथें आलों. हे वनवासज्ञा राजा, माझें सर्व वृत्त मी तुला सांगितलें आहे. श्रेष्ठजन जें जें काहीं विचारतात तें तें सर्व संत निरभिमानानें सांगत असतात. यास्तव तुला आणखीं काहीं विचारावयाचें असल्यास तें ही विचार. ( पण चूडालेनें आपल्या देवतुल्य पतीला असें मिथ्या वृत्त का सांगितलें ! असत्य भाषणासारखें घोर पाप नाहीं व सत्य भाषणासारखें उत्तम पुण्य नाहीं असें वेदादि सर्व प्रमाणग्रंथांत सांगितलेलें आहे. तेव्हा साध्वी व धर्मज्ञ राजकन्या चूडाला असत्य कसें बोलली ? अशी शंका येथें येण्याचा संभव आहे. पण ती घेण्याचें काहीं कारण नाहीं. सत्य व असत्य हें नेहमीं परिणामावरून ठरत असतें. ज्याचा परिणाम शुभ होतो, तें असत्यही सत्य असून ज्याचा परिणाम अशुभ होतो, तें सत्यही वस्तुतः असत्य होय. चूडालेनें राजाला तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यासाठीं, त्याचा आपल्यावर पूर्ण विश्वास बसावा म्हणून, असें असत्य वर्तमान सांगून त्याचा विश्वास संपादन केला. असें करण्यांत राजाचें कोणत्याही प्रकारें अहित करण्याचा तिचा उद्देश नसून परमहित करण्याचा मुख्य उद्देश होता. त्यामुळें तिला असत्य दोष लागण्याचा मुळींच संभव नाहीं. )

**श्रीवाल्मीकि**—मुनि वासिष्ठ इतकें सांगत आहे तों दिवस मावळला. सर्व श्रोते स्वस्थानीं गेले व नेहमींप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं सभेंत येऊन बसले. ८६. दिवस १८.

**सर्ग**—८७ राजानें केलेली कुंभाची प्रशंसा, आपलें दुःखनिवेदन, शिष्यत्व, व उपदेश्य अर्थावर विश्वास.

**शिखिध्वज**—जन्मपरंपरालक्षण संसार स्फुरण पावत असतांना माझ्या संचित पुण्यामुळें तूं आज येथें आला आहेस. हे साधो, आज मी सर्व धन्य पुरुषाच्या अग्रभागीं बसलों आहें. कारण अमृतासारखें मधुर भाषण करणाऱ्या तुझ्याशीं माझा समागम झाला आहे. साधुसमागमाप्रमाणें

राज्यलाभादि दुसरे कोणतेही भाव मला आनंद देऊं शकत नाहींत. कारण साधुसमागमामध्यें दरिद्रादि सर्व जनांस एकसारखाच अपरिच्छिन्न ब्रह्मानंद होऊं शकतो. त्यांत राग, द्वेष इत्यादिकाचा गंधही नसतो. पण राज्यलाभादिकाची स्थिति त्याहून अगदीं निराळी असते. त्यापासून होणारें सुख अनेक दुःखमिश्रित असल्यानें तुच्छ होय. शिवाय राज्यादि लाभ सर्वसाधारण नसतो, तर तो काहीं विशेष पुरुषानाच होणें शक्य असतें.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, असें बोलणाऱ्या त्या राजाच्या भाषणास मध्येंच प्रतिबंध करून ती मुनिपुत्ररूपिणी चूडाला त्यास पुनः म्हणाली.

**चूडाला**—राजन्, ही तुझी प्रशंसा पुरे झाली. तूं विचारलेलें सर्व मी तुला वर्णन करून सांगितलें आहे. आतां हे साधो, तूं कोण ? या पर्वतावर काय करीत आहेस ? ही तुझी वनवासिता कधीं संपणार ? व कोणत्या फलाच्या उद्देशानें तूं हें सर्व करीत आहेस, तें मला खरें सांग. मजपासून काहीं लपवून ठेवूं नकोस. कारण तुझ्यासारखे तापस असत्य भाषण कसें करावे, तें जाणतच नाहींत.

**शिखिध्वज**—साधो, तूं देवपुत्र आहेस. सर्व यथार्थ वृत्त तूं जाणत आहेस. तूं सर्व लोकवृत्तान्त जाणणारा आहेस. तेव्हां आतां मी आणखी तुला अधिक काय सांगूं ? संसारभयानें व्याकुल होऊन मी वनांत रहात आहें. तूं सर्व जाणतच आहेस. तथापि मी संक्षेपतः सांगतों. मी शिखिध्वज राजा आहें. मी राज्य सोडून येथें येऊन राहिलों आहें. हे तत्त्वज्ञा, मी या संसारांत जन्माला अतिशय भ्यालों आहें. कारण सुख, दुःख, जन्म, मरण हे भाव पुनः पुनः होतात. त्यामुळें मी अतिशय संतप्त होतों. वनांत येऊन राहण्याचें कारण हेंच आहे. निर्धनाला जसें धन मिळत नाहीं त्याप्रमाणें दिशामध्यें भ्रमण करणाऱ्या व वनांत राहून तप करणाऱ्या मला विश्रांति मिळत नाहीं. हे साधो, मी येथें प्रयत्नशून्य, फलरहित व एकाकी रहात आहे; तथापि कीड लागलेल्या वृक्षाप्रमाणें शुष्क होत आहें. मी ही तपःक्रिया अखंडित रीतीनें करीत आहें. तथापि मला सुख होत नाहीं. उलट दुःखच होत आहे. मला अमृतही विषवत् झालें आहे.

चूडाला—मी पूर्वी एकदां आपल्या पितामहाला 'प्रभो, क्रिया व ज्ञान यांतील जें एक श्रेयस्कर असेल तें मला सांग' असें विचारलें. तेव्हां तो मला, म्हणाला, "ज्ञानच परम श्रेयस्कर आहे. त्याच्या योगानेंच कैवल्याचा लाभ होतो. सर्व क्रिया वेळ जावा व चित्तविनोद व्हावा, म्हणून सांगितल्या आहेत. पण हे पुत्रा, ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झालेली नसते त्यांना क्रियाच परम आधार आहे. कारण ज्याच्यापाशीं रेशमी वस्त्र नसतें तो आपलें कंबल ( कांबळें, घोंगडी ) टाकीत नाहीं ! कांहीं ज्ञानीही लोकसंग्रहार्थ आपल्या वर्णाश्रमाला उचित असलेल्या क्रिया करीत असल्याचें अनुभवास येतें. पण कर्मफलाच्या वासनेनें कर्म केलें तर तेंच आपलें शुभ अथवा अशुभ फल देऊं शकतें, असा नियम असल्यामुळें वासनावान् अज्ञाच्या क्रिया जशा सफल होतात, तशा वासनाशून्य ज्ञान्याच्या होत नाहींत. पाणी न घातल्यास वेली जशा पुष्प-फलशून्य होतात, त्याप्रमाणे वासनाच्या अभावीं सर्व शुभाशुभ क्रिया नाश पावतात. दुसरा ऋतु लागला असता पूर्व ऋतूंचीं चिन्हें जशीं लुप्त होतात त्याप्रमाणें वासनाक्षय झाला असता क्रियाफल नाश पावतें. दुःखवासनेनेंच दुःखाचा अनुभव घडतो. वासनाशून्य क्रियेनें निष्फळ होणें हा तिचा स्वभावच आहे, खरोखर पाहता मी कर्ता, मी भोक्ता, इत्यादिरूप वासना नाहींच. तर ती अज्ञदशेंत अज्ञानामुळेंच मृगजलाप्रमाणें उत्पन्न झालेली असते. त्यामुळेंच सर्व ब्रह्म आहे, अशा भावनेनें ज्याचें अज्ञान क्षीण झालेलें असतें, त्याच्या मनात वासनाच उठत नाहीं. केवळ वासनेचा त्याग केल्यानेंच जीव आंतल्या आत जरामरणरहित, जन्मशून्य पदास प्राप्त होतो. वासनायुक्त मन हेंच मन असून वासनारहित मन हें ज्ञान आहे. असल्या ज्ञानाच्या योगानें ज्ञेयास पोंचून जीव पुनः जन्म घेत नाहीं. राजन्, ब्रह्मदेवानें मला असें सांगितलें. तेव्हां हे राजर्षे, तूं आता असा अज्ञान्याप्रमाणें कां राहिला आहेस? ब्रह्मादि महा पुरुषानीं सांगितलेल्या ज्ञानाचा आश्रय कां करीत नाहींस ? कमंडलु, दंडकाष्ठ, आसन, इत्यादि या सर्व अनर्थ विलासांत कां रममाण होतोस? राजन्, मी कोण, हें सर्व झालें कसें ? व शांत कसें होईल ? याचा विचार कां करीत नाहींस ? असा अज्ञासारखा कां राहतोस ? बंध कसा होतो व मोक्ष कसा होतो

लागतो, इत्यादि प्रश्न करीत तत्त्वज्ञाच्या चरणकमलाचा आश्रय का करीत नाहींस ? या असल्या क्षुद्र फल देणाऱ्या क्रियेंत आपलें आयुष्य का घालवितोस ? समदृष्टि साधूंच्या समागमानें, त्यांना प्रश्न केल्यानें व त्याची सेवा केल्यानें मुक्त करणारी युक्ति हातीं लागते. यास्तव शुभ पुरुषा, तपःक्लेशादि बहिर्मुख दुश्चेष्टाचा निरोध करून गुरूच्या बरोबरच आहारादि करीत, त्याच्या सेवेमध्यें परायण होऊन त्यानें सांगितलेल्या शुभ धर्माचें आचरण करीत, निश्चळ रहा. म्हणजे तूं या सर्व अनर्थांतून पार पडशील.

**श्रीवसिष्ठ**—त्या देवरूपिणी कांतेनें असा उत्तम बोध केला असतां शिखिध्वज नेत्रांत अश्रु आणून असें म्हणाला.

**शिखिध्वज**—बा देवसुता, खरोखर आज फार दिवसांनीं तूं मला हा असला सदुपदेश केळास. मी केवळ अज्ञानामुळें श्रेष्ठाचा समागम सोडून या निर्जन वनांत येऊन राहिलों आहें. अहाहा, माझें सर्व पापच आज क्षीण झालें आहे, असें मी समजतों. त्यामुळेंच अनायासानें तुझा समागम घडून तूं मला बोध करीत आहेस. हे सुंदरा, तूं माझा गुरु, पिता व मित्र आहेस. मी तुझा शिष्य आहे. मी तुला नमस्कार करतों, मजवर कृपा कर. जें अतिश्रेष्ठ तत्त्व तुला ज्ञात आहे, ज्याचें ज्ञान झालें असतां शोक करण्याचा प्रसंगच येत नाहीं. व ज्याच्या योगानें मी सुखामध्यें विश्रांति पावेन तें ब्रह्म मला सांग. घट, वस्त्र इत्यादिकाचें ज्ञानही ज्ञानच आहे. पण त्या सर्ववृत्तिज्ञानाहून अतिश्रेष्ठ ज्ञान कोणतें ? भवसागरांतून तारणारें ज्ञान मला कसें होईल ?

**चूडाला**—राजन्, माझें वचन ग्राह्य आहे, असें जर तुला वाटत असेल, तर मी तुला यथामति सांगेन. कारण अश्रद्धालु पुरुषांना केलेला उपदेश खांबापुढील कावळ्याच्या शब्दाप्रमाणें व्यर्थ होत असतो. शिवाय तसें करणें निंद्यही आहे. यास्तव अंधकारानें व्यापलेल्या प्रदेशीं नेत्राचा उपयोग करूं लागल्यास तो जसा व्यर्थ होतो, त्याप्रमाणें अश्रद्धालु व अनास्थेनें विचारणाऱ्या पुरुषास उत्तर देणें व्यर्थ आहे, असें जाणत असतांना मी तेंच करण्यास तयार नाहीं. यास्तव तूं प्रथम श्रद्धावान् हो, तुझा मजवर जर पूर्ण विश्वास असेल तर मी तुला ज्ञानाचा उपाय व स्वरूप सांगेन.

**शिखिध्वज**—भगवन्, वेदविधीप्रमाणें तूं मला जें सांगशील तें मी काहीं विचार न करिता मानीन. हें मी सत्य सत्य सांगत आहें.

**चूडाला**—ज्याप्रमाणें एकादा बालक आपल्या पित्याचें वचन, त्या विषयीं अगदीं साशंक न होता, मानतो, त्याप्रमाणें तूं हें माझें वचन ऐक. नंतर तें शुभच आहे, अशी भावना कर. तर्कबुद्धि शिथिल करून कानाना सुखावह वाटणाऱ्या गायनाप्रमाणें तें प्रेमानें ऐक. तुझ्यासारखें ज्याचें चरित्र आहे, अशा चिंतामणि, काचमणि व हत्ती याचें कथानक मी सांगतों तें तू अगोदर ऐक. मंदमतीच्या बुद्धीस फार दिवसानीं व महामतीच्या बुद्धीस ऐकताच बोधयुक्त करणारें हें कथानक देहादि अभिमानाचा त्याग करावयास लावणारे आहे. ८७.

**सर्ग ८८**—एका पुरुषानें मूर्खपणामुळें प्राप्त झालेला चिंतामणि टाकून दीर्घतपानें मणिभ्रांतीनें कांचमणि घेतला.

**चूडाला**—नित्य विरुद्ध असणाऱ्या अग्निजलाचें स्थान जसा समुद्र, त्याप्रमाणे नित्य विरुद्ध असलेल्या गुण व लक्ष्मी याचें स्थान असा मोठा श्रीमान् पुरुष होता. तो विविध कलाना जाणणारा, अस्त्रामध्यें अत्यत कुशल, व्यवहारामध्यें चतुर व सर्व मनोरथाच्या सीमेस प्राप्त झालेला होता, पण तो तें परम पद मात्र जाणत नव्हता. तो एकदा अनत यत्नानीं साध्य होणाऱ्या तपोरूप चिंतामणीच्या साधनांत प्रवृत्त झाला (म्हणजे चिंतामणि संपादन करण्याकरिता तप करूं लागला.) त्या दृढ निश्चयवानाच्या मोठ्या आयासानें थोड्याच कालात चिंतामणि सिद्ध होऊन त्याच्यापुढें येऊन उभा राहिला. दृढोद्योगाचें फल अवश्य प्राप्त होतें, असा नियम आहे. खिन्न न होता प्रवृत्ति, उद्यम व प्रज्ञा याचा जर योग्य उपयोग केला तर एकादा अकिंचन ( दरिद्री, दुर्बल ) ही निर्विघ्नपणें समर्थ होतो, मेरूच्या उदयशृंगावरील एकादा मुनि उदय पावलेल्या चद्राला जसा पाहतो, त्याप्रमाणें त्याने पुढें असलेल्या व हातास येणाऱ्या चिंतामणीस पाहिलें. पण एकाद्या पामर व दीन पुरुषाला अकस्मात् राज्य प्राप्त झालें असतां त्याला जसें तें खरें वाटत नाहीं. तर हा स्वप्नभ्रम आहे, असें वाटतें त्याप्रमाणें अगदीं जवळ आलेल्या चिंतामणीला समीप पाहूनही तो खरा मणिच आहे, असें त्याला वाटलें नाहीं.

त्यानें त्या सर्वोत्तम रत्नाची उपेक्षा करून विस्मित मनानें असा विचार केला. काय हा मला इष्ट असलेला मणीच असेल ? छे; हा मणि नव्हे. कारण तो जर मणि असता तर तो माझ्या सारख्या अभाग्याच्या दृष्टीं पडला नसता; तर मग मी याला हात लावून पाहूं काय? छेः नको. कारण तो जर खराच मणि असला तर माझा स्पर्श होताच गुप्त होईल. कारण इतक्या थोड्याशा तपानें चिंतामणि सिद्ध होणें शक्य नाहीं. त्याच्या करितां दीर्घ व फार मोठें तप करावें लागतें. प्राणान्त प्रयास केले तर तसलें सर्वोत्तम रत्न कदाचित् प्राप्त होतें, असें शास्त्रें व शास्त्रज्ञ सांगतात. तस्मात् मी कृपण असल्यामुळें, भ्रांतीनें संकुचित झालेल्या दृष्टीनें या मणिभ्रमास पहात आहे. इतक्यातच सर्व सिद्धि देणारें असलें रत्न मला मिळेल एवढें माझें पुण्य कोठचें ? थोडयाशाच कालानें व प्रयासानें ज्यांना लक्ष्मी प्राप्त होते असे कांहीं थोडेसेच महा भाग्यवान् असतात. मी अगदीं अल्प तपस्वी दीन मानुष आहें. तेव्हा मज अभाग्याला असल्या सिद्धि कशा प्राप्त होणार ! राजन्, अशा अनेक विकल्पसंकल्पांनीं बराच वेळ व्याकुल झालेल्या त्यानें अज्ञानानें मोहित होऊन रत्नग्रहणाविषयीं प्रयत्न केला नाहीं. जें ज्याला मिळावयाचें नसतें तें त्याला कधीं मिळत नाहीं, हेंच खरें आहे. त्या मूर्खानें प्राप्त झालेल्या महामणीचीही उपेक्षा केली. तेव्हा तो आपला संग्रह करीत नाहीं, असें पाहून चिंतामणि उडून गेला. धनुष्यापासून सोडलेला बाण जसा गुणा ( दोरी ) ला सोडून दूर जातो, त्याप्रमाणें सिद्धिही अवज्ञा करणाऱ्या पुरुषास सोडून दूर जातात. तो पुरुष मोठा व्यवहारचतुर होता, असे मी आरंभींच सांगितलें आहे. सिद्धि आल्या असतां त्या पुरुषाला अधिक चतुर करितात. परंतु त्यांचा तिरस्कार अथवा उपेक्षा केल्यास त्या त्याच्यापासून निघून जातांना त्याची असलेली शुभ मतिही घेऊन जातात. असो; खरा चिंतामणि निघून गेला असतां त्या पुरुषानें पुनः उत्तम रत्नप्राप्तीसाठीं प्रयत्न चालविला. कारण निश्चयी लोक स्वकार्याविषयीं उद्विग्न होत नाहींत. असो; समीप आलेल्या श्रेष्ठ रत्नाचा अव्हेर करणाऱ्या त्याला पाहून हंसणाऱ्या सिद्धांनीं स्वतः अदृश्य राहून कांहीं दिवसांनीं त्याच्या पुढें एक कांचेचा तुकडा ठेविला. त्याला पाहून तो मूढ हा चिंतामणि आहे, मला हा प्राह्य आहे, असें समजला.

मोहित झालेला अज्ञ अशा रीतीनेंच मातीला सोनें समजत असतो. मोहा-मुळें असले आणखी अनेक भ्रम होत असतात. कोणी आठाला सहा समजतो, शत्रूला मित्र जाणतो, रज्जूला सर्प म्हणतो. स्थलाला जलाप्र-माणें अवलोकन करतो. चंद्र एकच असताना दोन आहेत, असा अनुभव घेतो व चित्तगत मोहामुळें तो अमृताला विष करतो. असो; त्या मूर्खानें त्या काचमणीचा स्वीकार करून, 'या चिंतामणीपासून मला सर्व प्राप्त होईल, आता ही माझी मागची संपत्ति मला काय करावयाची आहे ?, असें म्हणून सर्व संपत्तीचा त्याग केला. 'हा माझा देश स्निग्धजनरहित, त्यामुळेंच सुखशून्य व पापी जनांनीं भरलेला आहे. यास्तव हें जीर्ण गृह व हे माझे बांधव याना घेऊन मला काय करावयाचें आहे ? मी आतां येथून निघून दूर जातों व या चिंतामणी पासून प्राप्त झालेल्या संपत्तीवर सुखानें राहतों ' असा निश्चय करून, संपत्ति, गृह, आप्त इत्यादिकास सोडून व काचमणि घेऊन तो एका शून्य अरण्यात आला. तेथें त्याला त्या रत्नापासून संपत्ति तर नाहींच पण मरणरूप महा आपत्ति मात्र भोगावी लागली. साराश मूर्खतावैभवानें जीं दुःखें प्राप्त होतात तीं सर्व-स्वनाश, जरा, मरण इत्यादिकामुळें प्राप्त होणाऱ्या दुःखाहून अधिक असह्य असतात. मनुष्याच्या शरीरावर अगदीं अग्रभागीं जसें केशजाल असतें तसें मौर्ख्य ( अज्ञान ) हें सर्व आपत्तींच्या मस्तकावर रहाणारें आहे. ८८.

**सर्ग ८९**—बद्ध झालेला विंध्यगजेंद्र यत्नानें बंध तोडूनही शत्रूस न मारल्यामुळें पुनः खळग्यात पडला.

**चूडाला**—राजा, आतां हा दुसरा रम्य वृत्तान्त ऐक. हे साधो, तो तुझ्या चरित्रासारखाच असून बुद्धीला शुभ बोध करणारा आहे. विंध्य-पर्वताजवळच्या एका मोठ्या अरण्यात एक महा यूथपति ( गजेंद्र ) होता. अगस्त्य गुरूंची आज्ञा मानल्यामुळें ज्याची बुद्धि अतिशय शुद्ध झाली आहे अशा विंध्य पर्वतानें स्वतः आपल्यासारख्या त्याला (अति उंच ) निर्माण केलें होतें. वज्राच्या दोन ज्वालांप्रमाणें त्याचे दोन्ही दांत अतिशय तीक्ष्ण, दीर्घ व शुभ्र होते. ते कल्पाग्नीच्या ज्वालांसारखे सुमेरूचें उन्मूलन करण्यासही समर्थ होते. पण उपेंद्रा ( वामना ) नें जसें बलीला अथवा

अगस्त्यानें विंध्य पर्वताला सर्वतः निरुद्ध करून ( बांधून ) ठेवलें होतें, त्याप्रमाणें हत्तींना धरणाऱ्या एका महातानें त्याला लोखंडी शृंखलांनीं चोहोंकडून बांधून सोडलें. त्यामुळें त्याला मोठे क्लेश झाले. त्याचा शत्रु हस्तिपक त्या खळग्याजवळच्याच एका ताडवृक्षावर उंच चढून बसला होता. त्यामुळें तो हत्तीला दिसला नाहीं. तो महागज जाळ्यांत तीन दिवस अडकून पडला. त्याला फार क्लेश झाले. पण शेवटीं त्यानें मोठ्या क्लेशानें व दीर्घ प्रयत्नानें दोन्ही दाताचा उपयोग करून चार घटिकांत त्या शृंखला तोडल्या. त्याच्या शत्रूनें त्याचें हें कृत्य ताडावरून पाहिलें. व तेथूनच त्या महापशूच्या मस्तकावर उडी टाकली. पण दैववशात् तो अचुक त्याच्या डोक्यावर न पडता पाय घसरून खालीं भूमीवर पडला. तो आपला शत्रु आपल्या समोर पडला आहे, असें पाहूनही महागजाला त्याची दया आली. पशु, पक्षी इत्यादि तिर्यक् जातींमध्येंही उत्तम गुणवान् सत असतात. आपण होऊन पुढें पडलेल्या याला मारण्यात माझा पुरुषार्थ तो काय आहे, असें समजून त्या हत्तीनेंही महाताला मारलें नाहीं. पाणी जसें बांधाला ( धरणाला ) फोडून पुढें निघून जातें त्याप्रमाणें केवळ शृंखला तोडून तो निघून गेला. तो पशु आपल्या मार्गानें निघून गेला असता हस्तिपक उठला. त्याचा देह सुरक्षित होता. गजाबरोबरच त्याची व्यथाही दूर गेली. ताडाच्या उंच शिखरावरून पडलेल्याही त्याचें शरीर छिन्न भिन्न झालें नाहीं. दुरात्म्याचे देह असेच दुर्भेद्य असतात, असें वाटतें. पावसाळ्यात जसें अभ्र, त्याप्रमाणें कुकर्मात असंताचें बल वाढत असतें. शरीराला काहीं इजा झालेली नाहीं, असें पाहून त्याला हत्तीच्या मागें लागण्यास अधिक उत्साह वाटला. आपला उपाय व्यर्थ झाला व त्यामुळें हातचा हत्ती निसटून गेला, याबद्दल त्याला फार दुःख झालें. तो पुनः त्याच हत्तीच्या मागें लागला. त्याच्या दृष्टीं न पडता तो झाडाच्या व वेलींच्या आडून जाऊ लागला. पुष्कळ वेळानें त्याला तोच श्रांत झालेला हत्ती एका वृक्षाखालीं बसून भर दुपारीं विश्रांति घेत आहे, असें आढळलें. त्याबरोबर त्या दुष्टानें राजानें बरोबर दिलेल्या लोकांच्या व सामग्रीच्या सहायानें त्या हत्तीच्या सभोंवार दूर मोठा खंदक खणला. काहीं दिवसानीं विहार करिता करिता तो हत्ती त्यात पडला. नंतर हस्तिपकानें फार

खोल खळग्यांत पडलेल्या त्याला वर काढणें अशक्य झाल्यामुळें तेथेंच सोडून स्वनगरास गमन केलें. राजा, अशा रीतीनें घोर खळग्यांत पडलेला तो महागज बलीप्रमाणें अद्यापि क्लेश भोगीत राहिला आहे. त्यानें जर आपल्या समोर पडलेल्या शत्रूला तेव्हाच मारलें असतें तर त्याला हें असह्य दुःख भोगावें लागलें नसतें. तात्पर्य, जो मनुष्य अज्ञानानें वर्तमान कर्मांनीं पुढें ओढवणाऱ्या अनिष्ट कालाला प्रतिबंध करीत नाहीं तो या विंध्यगजा-प्रमाणें दुःख भोगतो. मी लोखंडी शृंखला–जालांतून मुक्त झालो आहे, असें समजून हत्ती संतुष्ट झाला. पण पुढें फार दूर असतांनाही अज्ञाना-मुळें पुनः बद्ध झाला. तात्पर्य हे महात्मन्, अज्ञानच बंध आहे. यास्तव तूं त्यातून मुक्त होण्याकरितां आत्मज्ञान संपादन कर. त्रिभुवन आत्ममय आहे, असें जाण. कारण असे न जाणता मूर्खतेमध्यें स्थित असलेल्या पुरुषाचा आत्माच सर्व दुःखबीजें अंकुरित होण्याची सुपिक भूमि आहे ८९.

**सर्ग ९०**—चिंतामणीच्या कथेचें तात्पर्य.

**शिखिध्वज**—बा देवपुत्रा, या कथांच्या योगानें सूचित होणारें तात्पर्य मला स्पष्टपणें सांग.

**चूडाला**—राजन्, तुझ्या हृदयगृहांतील चित्त–भिंतीवर कथांच्या योगानें काढलेलें रेखामय चित्र व्याख्यारूपी रंगानीं अगदीं स्पष्ट करतें. पहिल्या कथेंतील शास्त्रार्थकुशल व तत्त्वज्ञानशून्य रत्नसाधक तूंच आहेस. तूं शास्त्रार्थांत महा निपुण आहेस; पण तत्त्वार्थांत विश्रांति पावलेला नाहींस. हे साधो, स्वाभाविक सर्वत्याग हाच चिंतामणि असून सर्व दुःखाचा अंत करणाऱ्या त्याला तूं शुद्धबुद्धीनें साधीत आहेस. हे निष्पापा, शुद्ध सर्व त्यागानें सर्व प्राप्त होतें. सर्वत्याग हेंच साम्राज्य आहे. तीच आत्यंतिक पूर्णकामना आहे, ज्यानें हिरण्यगर्भाच्या स्थानापर्यंत जगत्प्रसिद्ध उत्तरोत्तर शतगुण अधिक ऐश्वर्यास तुच्छ केलें आहे असा हा विद्यारूप निरतिशया-नंदाख्य अभ्युदय करणारा सर्वत्याग आहे. ब्रह्मदेवाची रात्र झाली असतां तो जसा जगाला निर्माण करण्याचा व्यापार सोडतो, त्याप्रमाणें तूं स्त्री-धन-बांधवासह सर्व राज्य सोडलेंस. आपल्या देशापासून अतिशय दूर असलेल्या या आश्रमास प्राप्त झालास. पण इतकें सर्व करूनही तूं केवल (एक) अहंमति सोडली नाहींस. अहंमतीचा त्याग केल्यावर अवशिष्ट

राहणारा पूर्णानंदरूप परम पुरुषार्थ पुरुषाच्या हृदयांत स्वतःच साक्षात् स्फुरण पावतो. अर्थात् अहंकारापर्यंत सर्वत्याग करणें हा चिंतामणि तुझ्या अग्रभागीं उपस्थित असताना तूं त्याची उपेक्षा केलीस व त्यामुळें स्वार्थापासून भ्रष्ट झालास. त्याग व अत्याग याविषयींच्या विकल्पानीं तुझ्या पूर्णतेस प्रतिबंध केला. सर्वत्याग हाच परानंद व महोदय नव्हे तर तो दुसराच कोणी दीर्घकालानें साध्य होणारा आहे, अशा कल्पनेनें तुला कुंठित केलें असता तो प्राप्त त्यागही तुजपासून दूर गेला. जो थोडीशीही चिंता करतो त्याला त्याग कसा करिता येणार? चिंताच चित्त आहे. त्यालाच संकल्प हे आणखी एक नाव आहे, तेव्हा चिंता स्फुरण पावत असताना चित्ताचा त्याग कसा होणार? चित्त चिंतामय झालें असता त्रिभुवन दिसू लागतें. तेव्हा त्या दशेंत निरंजन सर्वत्याग कसा घडणार? तूं संकल्प करूं लागताच तुजपाशीं आलेला त्याग, शब्द ऐकताच उडून जाणाऱ्या ग्रामपक्ष्याप्रमाणें, तुजपासून दूर निघून गेला. निश्चिंतत्व हें सर्वत्यागाचें फल आहे. तें त्याग घेऊन गेला. दक्षानें शंकराला आपल्या यज्ञात बोलाविलेंही नाहीं व त्याचें पूजन केलें नाहीं, तथापि त्याला मोठा अनर्थ भोगावा लागला, मग हजारों प्रार्थनांनीं बोलावून एकाद्याची पूजा न केल्यास त्याला क्रोध नाहींका येणार? बा कमलनयना, अशा रीतीनें सर्वत्यागरूपी चिंतामणि निघून गेला असता तूं संकल्पनेत्रांनीं तपोरूप काचमणि पाहिलास. तो दुःखमय तपःकाचमणीच तुला ग्राह्य वाटला. पूर्वी वासनाशून्य मनानें व अनासक्तीनें तूं सर्वत्यागास आरंभ केलास, पण शेवटीं वासनायुक्त तपःक्रिया स्वीकारलीस. पण बाबारे, तपःक्रिया पूर्वी गृह, स्त्री, धन इत्यादिकांचा त्याग करताना, मध्यें वनवास, शीतवातादि सहन करणें इत्यादि प्रसंगीं व शेवटीं फलाची आसक्ति सोडताना, अतिशय विषम वाटते. जो शठ सुसाध्य अमितानंद सोडून दुःसाध्य मित वस्तूच्या मागें लागतो त्याला आत्मघाती म्हणतात. भूपते, तूं सर्वत्यागाला आरंभ करून तो साधला नाहींस. दुःखदायी अज्ञानानें बद्ध होऊन वनगृहांत खितपत पडलास. पसरणाऱ्या दुःखानें भरलेल्या राज्यबंधापासून मोठ्या धैर्यानें निसटून हे असाधो, या वनवाससंज्ञक दृढबंधनानीं पुनः बद्ध झाला आहेस. वनवासाचा ज्याना पूर्वी कधींच अनुभव आलेला

नसतो, अशा तुजसारख्या सुकुमारांना बंधनापेक्षां वनवासाचें दुःख अधिक असह्य वाटत असावें. मला तप हा मोठा चिंतामणिच मिळाला असें समजून तूं मोठा आनंदित होत आहेस, हें खरें; पण वस्तुतः तुला स्फटिकाचा तुकडाही मिळालेला नाहीं, हें तूं निश्चयानें जाण. तात्पर्य हे कमलनयना, तुझें चरित्र मणिकथेसारखें कसें आहे तें मी तुला सांगितलें. आतां तूं आपल्याच शुद्धबुद्धीनें विचार करून सर्वत्याग व तप यातील तुला जें कल्याणकर वाटेल त्याचा आश्रय कर, आणि त्याच्या योगानें स्वहित साधून घे ९०.

सर्ग ९१—विंध्यगजाच्या कथानकाचा साराश.

चूडाला—आता हे राजेंद्रा, विंध्यगजेंद्राच्या वृत्तान्ताचा साराश वस्तु—( ब्रह्म ) ज्ञानासाठीं तूं ऐक. मी विंध्यगज म्हणून जो सांगितला तो तूच भूतलावरील महाराज आहेस. विवेक व वैराग्य हेच त्याचे दोन शुभ्र दात होत. त्याला धरण्याकरितां प्रयत्न करणारा हस्तिपक ( महात ) म्हणजे तुला दुःख देणारें अज्ञान होय. राजन् , अशक्त हस्तिपकही जसा अतिशक्तिमान् हत्तीला अतिभयांत व अतिदुःखांत पाडूं शकला, त्याप्रमाणें मूर्खता तुला महासंकटात पाडण्यास समर्थ झाली. हत्तीला लोखंडाच्या वज्रासारख्या बळकट शृंखलानीं जखडून सोडलें, याचा अर्थ असा कीं तुला आशारूपी पाशानीं आपादतल—मस्तक बाधून सोडलें. कारण आशा लोखंडी शृंखलेहून फार कठीण व दृढ आहे. लोखंडी शृंखला जसा जसा अधिक काळ लोटेल तसतशी झिजत जाते; पण तृष्णा उत्तरोत्तर वाढते. एकातीं बसून अज्ञानरूपी वैरी बद्ध होऊन पडलेल्या तुला पहात होता. पण तूं मात्र सूक्ष्म चैतन्याच्या आधारानें व म्हणूनच फार उच व दूर असलेल्या त्याला पाहूं शकला नाहींस. हत्तीनें तीन दिवस क्लेश भोगून शेवटीं आपल्या दातानीं शत्रूचें शृंखलाबंधन तोडलें, या वचनानें तू काहीं दिवस राज्य-विलास भोगून निष्कंटक राज्य सोडलेंस, या गोष्टीचा उल्लेख केला आहे. बा साधो, तरवारी सारख्या तीक्ष्ण शस्त्रांच्या पिंजऱ्यातूनही त्याला तोडून निघून जातां येईल; पण मनाची भोगाशा शांत करितां येणें शक्य नाहीं. हत्तीनें बंधनाचा छेद करितांच ताडावर बसलेल्या त्याच्या शत्रूनें त्याच्या डोक्यावर उडी टाकली, याचा अर्थ तूं राज्यत्याग केलास

पण अज्ञान तुझ्या बोकांडीं बसण्याचा प्रयत्न करूं लागलें. कारण विरक्त पुरुष भोगाशेचा त्याग करण्याची इच्छा करूं लागला म्हणजे अज्ञान भयभीत होतें व विवेकी भोगाशा सोडून निश्चयानें स्थिर झाला कीं तें त्याच्यापासून पळून जातें. वृक्ष करवतीनें कापला असतां जसें त्यावरील पक्ष्यांचें घरटें त्याच्याबरोबरच खालीं पडतें, त्याप्रमाणें भोगसमूहाचा त्याग केला म्हणजे अज्ञानस्थिति पडते. तूं जेव्हां वनात गेलास तेव्हांच अज्ञानाचा पराभव केलास. व तो तुझा शत्रु पाय चुकून तुझ्या समोर पडला. पण तू त्याचवेळीं निर्मनस्कतालक्षण महा खड्गानें त्याला मारलें नाहींस, तर त्याची उपेक्षा करून घोर वनात गेलास. त्यामुळें त्या तुझ्या अज्ञान-शत्रूनें पुनः उठून व मोठ्या उत्साहानें तुझा पाठलाग करून संसार-तापानें सतप्त होऊन वृक्षाखालीं विश्रांति घेत बसलेल्या तुझ्या सभोंवार पूर्वीच्या पराभवाला आठवून तपःप्रपंचरूप खोल खदक खणला. तूं जर राज्यत्यागरूपी शृंखला-भंगसमयींच त्याला मारलें असतेंस तर त्यानें तुला अशा पेंचात पाडलें नसतें. पण तूं तें उचित कर्महीं दयावश होऊन केलें नाहींस. म्हणून त्यानें हें तपोदुःखरूपी खात तुझ्या सभोंवार अविवेक, भोगैश्वर्य इत्यादि राजसामग्रीनें निर्माण करून त्यात तुला पाडलें. आतां अज्ञानवैऱ्यानें तें खात कोमल वेलींनी झाकून सोडलें होतें, म्हणून जें म्हटलें आहे त्याचा सारांश असा कीं, तपोरूप दुःख शांति, दांति, सज्जन-संगति इत्यादिकांनी काहींसें युक्त असतें. हे राजा, पातालात पडलेल्या बलिराजाप्रमाणें तूं अद्यापि या अतिदारुण व दुःखकर तपःखातांत पडला आहेस. सारांश हे भूपते, विंध्यगजाच्या आख्यायिकेंतील गज तूंच आहेस. तुझ्या आशा ह्या शृंखला आहेत. मोह हाच महावैरी आहे. उग्र तपा-विषयींचा आग्रह हाच मोठा खंदक व भूतल हाच विंध्य पर्वत होय. या-प्रमाणें कल्पना करून मी तुझा वृत्तान्त हत्तीच्या आख्यायिकेनें सांगितला. आतां तुला जें उचित वाटेल तें कर ९१.

**सर्ग ९२**—कुंभवचन ऐकून सर्वत्यागपरायण झालेल्या राजानें आपली तपः-सामग्री जाळली.

**चूडाला**—राजन्, न्यायानें व ज्ञानानें शोभणाऱ्या तुझ्या चूडाला प्रियेनें तुला जें पूर्वीं तत्त्वज्ञान सांगितलें तें तूं त्याचवेळीं स्वीकारतास तर

तुला इतके कष्ट झाले नसते. ती तुझी भार्या असली तरी तत्त्वज्ञानी जीवांतील एक श्रेष्ठ जीव आहे. ती जें जें करते व बोलते तें तें सर्व सत्य आहे. यास्तव बा राजा, तूं मोठ्या आदरानें तसेंच आचरण करावयाचें होतेंस. पण ' स्त्रीबुद्धिः प्रलयंकरी , या लौकिक न्यायास अनुसरून तूं तिच्या सांगण्याची उपेक्षा केलीस व " आत्मबुद्धया चिरंजीवेद्गुरुबुद्धया विशेषतः " म्हणजे आपल्या बुद्धीनें व विशेषेंकरून गुरुबुद्धीनें चालणारा पुरुष दीर्घ काल जिवंत राहतो, या न्यायानें तूं सर्वत्यागालाच श्रेष्ठ मानलेंस. पण तोच त्याग तूं स्थिर कां केला नाहींस.

**शिखिध्वज**—बा देवपुत्रा, मी राज्य सोडलें, गृह सोडलें, तसला श्रीमान् देश सोडला व चूडालेसारख्या गुणवती भार्येचा त्याग केला. तथापि सर्वत्याग केला नाहीं, असें म्हणतोस, याचा अर्थ काय ?

**चूडाला**—राजा, धन, स्त्री, गृह, राज्य, भूमि, छत्र, बांधव, हें सर्व तुझें कधींही नव्हतेंच. तेव्हा जें तुझें नव्हे त्याला सोडल्यानें सर्वत्याग कसा झाला ? त्या सर्वांना सोडल्यावरही स्वतः तुझा व सर्वांहून उत्तम असा एक न सोडलेला भाग तुजपाशीं अजून आहे. त्याचा जर तूं पूर्णपणें त्याग करशील तरच निःशोक होशील ?

**शिखिध्वज**—राज्य हें जर माझें सर्व नव्हे तर पर्वत, वृक्ष, गुल्म इत्यादिकांनीं भरलेलें हें वन माझें सर्व आहे. तेंही मी सोडतों.

**श्रीवसिष्ठ**—हे रामा, कुंभाच्या वाक्यानें प्रेरित झालेला जितेंद्रिय वीर शिखिध्वज एका निमेषातच वनाविषयींची आस्था सोडता झाला. त्यानें मनांत दृढनिश्चय केला आणि 'मी या सर्वाविषयींची वासना सोडलेली असून, माझा परित्याग स्थिर झाला आहे' असें स्पष्ट बोलून दाखविलें.

**कुंभ**—पण बा राजा, हें वन व यांतील तट, खळगे, वृक्ष, वेली इत्यादिकांतील एकही वस्तु तुझी नव्हे. तेव्हां त्याची आस्था सोडून सर्वत्याग कसा होणार ? स्वतः तुझा न सोडलेला असा एक उत्तम भाग आहे. त्याला सोड म्हणजे तूं शोकरहित होशील.

**शिखिध्वज**—मुने, हें सर्व जर माझें नव्हे तर ही वापी व भूमीवरील पर्णशाला यानीं युक्त असलेला हा आश्रम माझा आहे. त्याचा मी संकल्पपूर्वक त्याग करितों.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, असें बोलून त्या राजानें स्वाश्रमाविषयींची आस्था सोडून तशी प्रतिज्ञा केली. पण त्यावर कुंभ पुनः पूर्वीप्रमाणेंच 'यांतील तुझें कांहींच नव्हतें. तेव्हां त्याचा त्याग करून काय होणार? यापेक्षांही उत्तम असा भाग तूं अजून आपल्यापाशीं ठेवून घेतला आहेस त्याचा त्याग कर, म्हणजे आनंदानुभव घेशील.' असें म्हणाला. तेव्हां राजानें 'तर मग मजजवळ असलेलें हे पात्रादिक सर्व मी सोडतों,' असें म्हणून त्याविषयींची आस्था सोडली व लागलीच तशी प्रतिज्ञाही केली. नंतर लागलाच तो शमवान् आसनावरून उठला. त्यानें आपल्या अंगावरील अजिन काढून ठेवलें. पादुका दूर केल्या, कमंडलु व दंड यांना स्पर्श करावयाचा नाहीं, असा निश्चय केला. कुंभ आपल्या पर्णासनावर बसून विस्मित मनानें त्याच्या प्रत्येक क्रियेकडे पहात होता. 'हा जें जें करीत आहे तें तें करूं दे. कारण हें सर्व याला परम पवित्र करणारें आहे.' असें मनांत म्हणून तो मुकाट्यानें बसला. शिखिध्वजानें आपल्या आश्रमांतील सर्व पात्रादि तपःसामग्री आश्रमाच्या बाहेर एकत्र जमविली. व त्यावर शुष्क इंधन घालून आग लावून दिली. त्यानंतर तो शान्त राजा पुनः दर्भासनावर बसला आणि आपल्या जपाच्या माळेचा त्याग करण्याच्या इच्छेनें, केलेले उपकार विसरणें, हा दोष येऊं नये म्हणून, तिला उद्देशून म्हणाला, "हे स्वामिभक्ते, म्यां स्वार्थसाधूनें इतके दिवस तुला एकसारखी फिरवून जे महा क्लेश दिले ते आतां पुरे झाले, तुझी तितकीच सेवा पुरे आहे. आतां तप, जप, इत्यादि अवश्य कर्तव्य आहे, अशी जी माझी भ्रांति होती ती पार निघून गेली आहे. यास्तव या पुढें तुझा मला कांहीं उपयोग नाहीं. मी तुला आणखी अधिक श्रम देऊं इच्छित नाहीं. तूं आता विश्रांति घे. तुजबरोबर मीही जपाच्या भ्रमानें नाना मंत्ररूपी अरण्यांत आजवर फिरत होतों. क्रियांच्या योगानें साध्य होणाऱ्या क्षुद्र सिद्धिमार्गांमध्यें मी दीर्घकाल भटकत राहिलों. तपोवन, सिद्धिक्षेत्र, इत्यादि धर्मस्थानें पाहिलीं. आतां हे सखि, मी विश्रांति घेतों."

इतकें बोलून शिखिध्वजानें स्फटिकाची अक्षमालाही त्या पेटलेल्या अग्नींत टाकली. नंतर तो आपल्या जवळच्या कृष्णाजिनास म्हणाला, "म्यां नरपशूनें अपमृगाच्या शरीरावरून गळलेल्या तुला अज्ञानानें फार

दिवस दर्भासनावर घातले, आतां तूं मूलकारण-मायारूपास प्राप्त हो; जा. तुझा मार्ग तुला सुखावह होवो." राघवा, असें म्हणून त्या राजानें ज्यावर विचित्र बिंदु आहेत असें तें उत्तम अजिन आपल्या दोन्हीं हातानीं अग्नींत टाकलें. नंतर कमंडलूचा त्याग करण्याच्या इच्छेनें तो म्हणाला, "बा वर्तुलाकार कमंडलो, बा साधो, मजकरितां आजवर आपल्या उदरांत निर्मळ जल धारण करीत होतास. पण मी तुजवर कोणताही प्रत्युपकार केला नाहीं. खरोखर सुंदर सौहृद, स्थिर सौजन्य व सर्व साधुत्व यांचें परम स्थान तूंच आहेस. ज्या अग्नीनें आपला देह शुद्ध करून तूं मजपाशीं आलास त्याच अग्नीनें पुनः स्वदेहशुद्धि करून घेऊन तूं दुसऱ्या सज्जनापाशीं जा. तुझे मार्ग तुला सुखकर होवोत. असें बोलून त्यानें तेथल्या एका श्रोत्रियाला कमंडलु दिला. (यावरून राजानें तो कमंडलु दुसऱ्या कोणा तपस्व्यापासून शुद्ध करून घेतला व आतां पुनः अग्नींत शुद्ध करून दुसऱ्या कोणास दिला, असें अनुमान होतें ) कारण जें जें उत्तम साधन असेल तें तें अग्नीला अथवा एकाद्या महात्म्याला द्यावें, असें शास्त्रवचन आहे. ज्याप्रमाणें मूर्खाची मति अधोगतीस कारण होणाऱ्या गुप्त पापामध्यें पडते त्याप्रमाणें हे दर्भासना, तूंही सदा साधकाच्या खालीं पडतेस. यास्तव मूर्खमतीप्रमाणें तुलाही संतापच ( दाहच ) उचित आहे. तूं भस्मरूप होऊन जा." असें बोलून शिखिध्वजानें त्या मृदु दर्भासनालाही अग्नींतच टाकलें. शुद्ध होऊन ब्रह्मामध्यें विश्रांति घेण्यासाठीं त्यानें तें सर्व केलें. आणि कुंभास म्हटलें—हे साधो, जें त्याज्य असेल तें सत्वर सोडावें कारण पात्रादि उपकरणें असलीं म्हणजे दुसरींही तसलीं असावीं, असें वाटतें व लोक अधिकाधिक संग्रह करूं लागतात. यास्तव मी हीं सर्व पात्रादि उपकरणें शीघ्र अग्नींत टाकतों. अग्नीनें सर्व सामग्रीला एकदम जाळून सोडलें म्हणजे मला सर्वत्यागाचा संतोष होईल. बा कुंभा, माझ्या या सर्वत्यागाविषयीं तूं खेद करूं नकोस. कारण अयोग्य वस्तूंना कोण धारण करतो? मज निष्क्रिय पुरुषाला हीं क्रियांचीं उपकरणें अयोग्य ( निरुपयोगी ) आहेत.

असो; रामभद्रा, राजा शिखिध्वज असें बोलून काल कल्पान्ताग्नींत जसें जगत् एकदम टाकतो त्याप्रमाणें वनवासास योग्य असलेलीं भोजनपात्रादि सर्व भांडीं झटकन अग्नींत टाकता झाला ९२.

**सर्ग ९३**—उपकरणे जाळून देहत्याग करण्यास तयार झालेल्या राजाचें निवारण करून कुंभ चित्तत्यागाकरितां बोध करतो.

**श्रीवसिष्ठ**—नंतर राजानें उठून आपल्याच मनानें वृथा ममता संकल्पानें कल्पिलेलें तें शुष्क कुटीरूप तृणमंदिर जाळलें. आणखींही दुसरें जें कांहीं राहिलेलें होतें तेंही सर्व त्या अक्षुब्धचित्त मौनी शिखिध्वजानें क्रमानें समचित्तानें अग्नींत टाकले. फार काय पण आपलें नेसावयाचें वल्कल व पांघरावयाची कथाही फाडून अग्नींत फेकली. त्याचा आश्रम पूर्वीं दिसून लागलीच नष्ट होणाऱ्या जनस्थितीप्रमाणें झाला. वीरभद्राच्या सैन्यानें जाळून विध्वंस केलेल्या दक्षाच्या यज्ञमंडपाप्रमाणें तो शून्य दिसू लागला. त्याच्या आश्रमांतून सर्व जातींचीं हरणें भीतीनें रवंथ करावयाचें सोडून निघून गेलीं. अग्नि इंधनासह त्या सर्व उपकरणाना जाळूं लागला असतां ज्याचा केवळ देहमात्र अवशिष्ट राहिला आहे असा निःस्नेह व तुष्टिमान् राजा म्हणाला,–“ अहाहा, देवपुत्रानें बोध केल्यामुळें फार दिवसांनीं या सर्व उपकरणांच्या ठिकाणची ममता सोडून मी आज सर्वत्यागी होऊन राहिलों आहें. मी आता केवल, शुद्ध व ज्ञानी झालों आहें. ममतेमुळेंच आपलेंसें वाटणारें हे सर्व–उपकरणजात कांहीं नाहीं. त्यांत सार ग्राह्यांश कांहीं नाहीं. जसे जसे विविध बंधहेतु ( विषय ) क्षीण होऊं लागतात तसें तसें मन परम शातीस प्राप्त होतें. अहाहा, मी आतां अतिशय शांत व सुखी झालों आहें. माझा विजय झाला आहे. सर्व बंध क्षीण झाले आहेत. मी सर्व त्याग केला आहे. हा मी दिगंबर व दिक्सदन, ( म्हणजे नग्न व दिशा हेंच गृह समजणारा ) झालों आहें. मी दिशांसारखाच शून्य झालों आहें. हे देवपुत्रा, आतां आणखीं महात्यागांतील काय अवशिष्ट राहिलें आहे ?”

**कुंभ**—राजा शिखिध्वजा, तूं अद्यापि सर्वत्याग केला नाहींस. यास्तव सर्व त्यागापासून होणाऱ्या आनंदाचा अभिनय ( हावभाव ) व्यर्थ करूं

नकोस. तूं न सोडलेला असा अजुनी उत्तम भाग तुजपाशीं तसाच आहे. त्याचा त्याग केलास म्हणजे तुला अशोक दशा प्राप्त होईल.

श्रीवसिष्ठ—राघवा, कुंभाचें हें भाषण ऐकून राजानें थोडा वेळ आप-ल्याशींच विचार केला व म्हटलें,—" समजलों. हे देवपुत्रा, आता माझ्या ध्यानात आलें. इंद्रियसर्पांचें बिळ व रक्त-मांसादिकाची पिशवी असा हा माझा देह सर्वत्यागांतून राहिला आहे. यास्तव आतां येथून उठून या पर्वताच्या शिखरावरून निर्विघ्नपणें त्याला विनाशरूपास पोंचवून मी सर्वत्यागी होतों." इतकें बोलून तो निश्चयी पुरुष समोरच्या पर्वत-शिखरावर चढण्याकरितां म्हणून जों वेगानें उठत आहे तों कुंभ त्यास म्हणतो—राजन्, या निरपराधी देहाला महाश्वभ्रात कां पाडतोस? अज्ञ बैल रागावला असतां जसा आपल्याच वत्साला मारतो त्याप्रमाणें तूं हें अकृत्य करीत आहेस. हा बिचारा जड, मूढ देह तुझा कोणी नव्हे. उगीच त्याचा घात करूं नकोस. हा बिचारा दगडासारखा आपल्याच जागीं पडलेला असतो. तरंग जसे काष्ठाला त्याप्रमाणें दुसऱ्याच कोणा-कडून हा चालविला जातो. दुसराच कोणी याला क्षुब्ध करतो. तोच निग्रहास योग्य आहे. वस्तुतः त्यालाच योग्य दंड केला पाहिजे. फल-वान् वृक्ष हालतो व त्यामुळें त्यावरील फळें पडतात. पण त्यांत वृक्षाचा जसा कांहीं अपराध नाहीं त्याप्रमाणें सुखदुःखांच्या उत्पत्तीचें नुस्तें स्थान असलेल्या शरीराचा कांहीं अपराध नाहीं. वायूच वृक्षाला जोरानें हालवून त्याचीं फळें, पानें व पुष्पें पाडवितो. यास्तव तो अपराधी आहे. तसाच शरीराला हालविणारा कोण आहे, तें पहा. तो खरा अपराधी आहे. त्याला तूं कठिण शिक्षा कर. या दीन व निर्बल शरीराला कशाला मारतोस? शिवाय बा सुंदरा, तूं जरी शरीराचा त्याग केलास तरी तुझा सर्वत्याग सिद्ध होणार नाहीं. कारण हें शरीर गेलें म्हणजे दुसरें असलेंच अधिकारी शरीर मिळेल कीं नाहीं याची शंका आहे. यास्तव असलेलें योग्य शरीर टाकल्यानें सर्वत्याग अधिक दुर्लभ मात्र होईल. तूं आतां या शिखरावरून या गरीब शरीराला टाकशील, हें मी जाणतों. कारण तुझ्यामध्यें तितकें धैर्य व निश्चय आहे. पण त्याच्या त्यागानें सर्वत्यागिता सिद्ध होणार नाहीं. यास्तव मत्त हत्ती जसा झाडाला त्या-

प्रमाणें या तुझ्या शरीराला क्षुब्ध करणारा कोण आहे, त्याला हुडक व याचा निग्रह कर. त्या पाप्याचा जर त्याग केलास तर तूं महात्यागवान् होशील. भूपते, त्याचा त्याग केलास कीं, देहादि सर्वांचा त्याग केलास असें होईल. पण त्याचा त्याग न करिता देहादि दुसऱ्या सर्वांना तूं कितीही जरी जाळलेंस व पाण्यांत बुडविलेंस तरी तें वारवार तुला प्राप्त होईल.

शिखिध्वज—हा देवतनया, या देहाला कोण चालवितें, जन्मकर्माचें बीज काय आहे ? व कशाचा त्याग केला असता सर्वत्याग सिद्ध होतो ?

कुंभ—हा साधो, राज्यत्यागानें, देहाला मारल्यानें व झोंपडें जाळल्यानें सर्व–त्याग होत नाहीं. जें सर्ववासनाचें स्थान असल्यामुळें सर्व विषयांमध्यें पसरलेलें असल्यामुळें सर्वतः व सर्वांचें जनक असल्यामुळें एक कारण आहे त्याचा त्याग केला असता सर्वत्याग केलासें होईल.

शिखिध्वज—प्रभो, असें सर्व, सर्वतः व सर्वकारण काय आहे ?

कुंभ—हे साधो, चित्तच सर्वाकार, जीव, प्राण इत्यादि नांवाचें, जडही नव्हे व अजडही नव्हे असें व सर्व म्हणून म्हटलेलें आहे. ( येथें चित्त म्हणजे लिंगशरीर समजावें. ) तेंच भ्रम, व्यवहारी पुरुष व जगज्जाल आहे. राजा, वृक्षाचें कारण जसें बीज त्याप्रमाणें राज्यादि, देहादि, आश्रमादि या सर्वांचें बीज मन आहे. बीजाचा त्याग केला म्हणजे सर्व कार्यांचा त्याग केलासें होतें. धर्म, अधर्म, राज्य, अरण्य इत्यादि सर्व सचित्त पुरुषाला परम दुःखद व निश्चित्त पुरुषाला परम सुखद होतात. चित्तच जगद्रूपाने विवर्त ( मिथ्या परिणाम ) पावतें. बीज जसें वृक्षाकारास त्याप्रमाणें चित्तच देहादि-आकारास पात्र होतें. वृक्ष वायूकडून, पर्वत भूकंपाच्या योगानें व लोहाराचा भाता लोहाराकडून जसा हालविला जातो, त्याप्रमाणें देहाला चित्त चंचल करतें. सर्वभूतांस ठाऊक असलेल्या उपभोगाचा, जरा-मरणादि देहधर्मांचा व महामुनींच्या शमदमादि धर्मांचा आश्रय वासनायुक्त चित्तच आहे, असें तूं जाण. अशान्त चित्तच मननामुळें मनोमय, आतील प्राणचेष्टेमुळे जीव, व बाहेर स्थूलदेह आणि त्याचा व्यवहार होतें. तेंच आंत शान्त होऊन राहिलें म्हणजे महत् , अहंकार, प्राण, प्रज्ञात्मा इत्यादि क्रियानुरूप नांवांनीं बोललें जातें. वास्तव

हे भूपते, सर्व चित्तच आहे, असें म्हणतात त्याचा त्याग केला असतां सर्व आधि व व्याधि यांच्या नाशरूप सर्वत्याग सिद्ध होतो. महात्यागी महात्मे चित्तत्यागालाच सर्वत्याग म्हणतात. तेव्हा त्याची सिद्धि झाली असतां सत्य वस्तूचा अनुभव आल्यावांचून कसा राहील ? चित्ताचा त्याग केला कीं, द्वैत व ऐक्य लीन होतें, आणि परम शांत, स्वच्छ, एक व अनामय तत्त्व अवशिष्ट राहते, चित्त हें या संसाराचें सुपिक क्षेत्र आहे. तेव्हा क्षेत्रालाच अक्षेत्र केल्यावर साळींचें शेत कसें उगवणार ? जल जसें ऊर्मिरूप होतें त्याप्रमाणें विचित्रवासनायुक्त चित्तच अहंभावादि विलासानें विवर्त पावतें. लौकिक साम्राज्यानें जसें सर्व महत्त्व प्राप्त होतें, त्याप्रमाणें चित्तोत्सादनरूप सर्वत्यागानें सर्व प्राप्त होतें. हे त्यागिन् राजा, ज्याप्रमाणें मर्यादित असलेल्या तुझ्या त्यागाचा विषय दुसरा पदार्थ होतो त्याप्रमाणें तूंही दुसऱ्याला त्याज्य होशील. अर्थात् तुझ्या भ्रांत दृष्टीनें जरी नाहीं जरी इतराच्या दृष्टीनें त्याज्य असलेल्या देहालाच तूं आत्मा समजत आहेस. त्यामुळें तुझा सर्वत्याग सिद्ध होत नाहीं. पण तेंच, तूं अमर्याद सर्वव्यापी आत्म्यालाच आत्मा समजलास कीं तूं सर्वांचा आत्माच होशील. त्यामुळें तूं कोणालाही त्याज्य वाटणार नाहींस. आणि तुझा सर्व त्याज्याचा त्याग सिद्ध होईल. सर्वत्याग केल्यावरही जगाचा आधार आत्मा अवशिष्ट असतोच. यास्तव तद्रूप झालेल्या त्यागी पुरुषानें शून्याचा आश्रय केला आहे असें म्हणता येत नाहीं. सर्व त्यागानें सर्वांचा बाध होतो, पण सर्वांस सत्ता व स्फूर्ति देणारा आत्मा अवशिष्ट राहतोच. तो स्वप्रकाश आहे. त्यामुळें व्यवहारदृष्ट्या तो जरी तैलरहित दीपाप्रमाणें अदृश्य झाला तरी पारमार्थिक दृष्टीनें सर्व व्यवहारास प्रकाशित करणारा तो तैलयुक्त दीपाप्रमाणें भासतो. सर्व वस्तूंचा त्याग केल्यावरही जसा तूं राहिला आहेस त्याप्रमाणें या देहाचा त्याग केल्यावरही तुझा विज्ञानात्मा राहील. सर्व प्रत्ययांचा आश्रय हा शून्यात्मा सर्वत्याग आहे. सर्वत्यागरूपी अमृतरसाचें प्राशन केल्यावर जरामरणादि भीति बाधा करीत नाहींत. सर्वत्याग सर्व महत्त्वाचें कारण आहे. तूं जर मी म्हणतों तसला सर्वत्याग केलास तर तुला सर्वोत्तम बुद्धिस्थैर्य प्राप्त होईल. सर्वत्याग हाच परानंद असून बाकी सर्व अति

दारुण दुःख आहे. तस्मात् भूपाला, आता तुला योग्य वाटेल तें कर. सर्वत्यागानें सर्व मिळतें. सर्वत्यागातच आत्म-प्रसादजन्य ज्ञान राहतें. कारण रिकाम्या भाड्यांतच रत्नादि पदार्थ असतात, हें प्रसिद्ध आहे. अतिपापिष्ठ कलिकालात वेदबाह्य नास्तिक शाक्यानेंही जर सर्वत्यागवशात् महासिद्धि मिळविली आहे तर पुण्यरूप द्वापर युगात तुज वेदमार्गावलंबी आस्तिकाला ती निःशंकपणें का प्राप्त होणार नाहीं? हे महाराज, सर्वत्याग हें सर्व संपत्तींचें आश्रयस्थान आहे. कारण आपण व्यवहारातही नेहमीं असेंच पाहतों कीं, जो कांहीं घेत नाहीं त्याला सर्व आपण होऊन देतात. तस्मात् हे महात्मन्, सर्व सोडून, तूं ज्या अहंकाराच्या योगानें सर्व सोडणार त्याचाही त्याग करून, 'मी त्याग केला,' हा अभिमानरूप मलही टाकून विमुक्तरूप हो ९३.

**सर्ग ९४**—चित्तत्यागाकरितां मूलशोधन.

**श्रीवसिष्ठ**—कुंभ असें बोलला असता सौम्य राजा मनात वारंवार चित्तत्यागाचा विचार करीत असें वचन बोलला—

**शिखिध्वज**—प्रभो, हृदयाकाशातील पक्षी अथवा हृदयवृक्षावरील मर्कट असें हें मन घालविलें तरी फिरून फिरून येतें. हें चित्त माझें आहे, असें म्हणून माझ्याप्रमाणें त्याचें ग्रहण करण्यास मी जाणता, पण द्रव्याप्रमाणें त्याचा त्याग करवत नाहीं. यास्तव भगवन्, मला अगोदर चित्ताचें यथार्थ स्वरूप सांग व नंतर चित्ताचा परित्याग कसा करावयाचा ते शिकीव.

**कुंभ**—हे महाराज, वासना हेच चित्ताचें स्वरूप आहे. चित्त हा शब्द वासनेचा पर्याय आहे. त्याचा त्याग केवळ औदासीन्यानें सिद्ध होणारा असल्यामुळें श्वासोच्छ्वासाहूनही सुखकर व सुसाध्य आहे. तो राज्याहूनही अधिक आनंद देणारा आहे, व पुष्पाहूनही अधिक हृदयंगम आहे. पण राजा, मूर्खाचा चित्तत्याग पामराच्या राज्याप्रमाणें किंवा तृणाच्या मेरुत्वाप्रमाणें दुःसाध्य आहे.

**शिखिध्वज**—प्रभो, चित्ताचें स्वरूप आकुल वासनामय आहे, हें मी जाणलें. पण त्याचा त्याग वज्रभक्षणाहूनही दुःसाध्य आहे. यास्तव संसाररूपी सुवासाचें पुष्प, दुःखदाहाचा आधार अग्नि व शरीररूपी

यत्रास वाहणारें अशा या ( चित्ता ) चा त्याग अनायासें कसा होईल तें मला सांग.

कुंभ—हे साधो, या चित्ताचा सर्वनाश हाच संसारक्षय आहे व संसारक्षयच चित्तत्याग आहे, असें दीर्घदर्शी जन सांगतात.

शिखिध्वज—भगवन्, खरें आहे. मलाही असेंच वाटतें. चित्ताच्या त्यागाहून त्याचा नाश करणेंच अधिक श्रेयस्कर आहे. केवळ 'ही व्याधि माझी नव्हे, मी हिचा त्याग केला आहे, असें शेकडों वेळा जरी म्हटलें तरी तिचा क्षय होत नाहीं. तर तिच्या नाशाकरिता औषध योजनाच करावी लागते. यास्तव प्रभो, मला या चित्ताचा विस्तार कितीसा आहे, तें सांगा.

कुंभ—राजन्, या चित्तवृक्षाचें बीज अहं आहे. त्याला शाखा, फळें व पल्लवही आहेत. त्याचें समूळ उन्मूलन करून तूं आकाशहृदय हो.

शिखिध्वज—हे मुने, चित्ताचे मूळ, अंकुर, शाखा, स्कंध इत्यादिकाचें सविस्तर वर्णन करून मला सांग.

कुंभ—अज्ञात आत्म्यापासून उदय पावणारा जो हा चित्तज्ञानरूप प्रसिद्ध अभिमानी तेंच चित्तवृक्षाचें बीज आहे, असें जाण. परमात्म्याचें घरटें जी माया तेंच याचें क्षेत्र आहे. ( ज्या अर्थी माया सर्व मायामय प्रपंचाची उत्पत्तिभूमि आहे त्या अर्थी चित्ताचेंही तेंच क्षेत्र होय. ) या प्रथम उत्पन्न झालेल्या मायामय मूळापासून 'मी' असा मर्यादित निश्चयात्मा व चिदाभासानें व्याप्त असल्यामुळें अनुभवात्मक अंकुर उत्पन्न होतो. त्याचीच वृद्धि होऊन चित्तवृक्ष बनतो. देहादि आकाराच्या स्मरणानें तो चित्त या नावास व मननानें मन या संज्ञेस पात्र होतो. त्याच्या निश्चयरूप निराकार अवस्थेस बुद्धि असें म्हणतात. परमार्थतः सर्वविकारशून्य असलेला पण मिथ्याभूत चित्त व त्याचे धर्म यास जाणणारा साक्षी या वृक्षाचा जीव आहे, शरीर हाच त्याचा मूळापासून शाखापर्यंतचा स्तंभ आहे. वासना हा त्यातील शाखा पल्लवादि इतर अंकुरांस निर्माण करणारा रस आहे. या चित्तवृक्षाच्या ज्या लांब लांब व विस्तृत शाखा तींच इंद्रियें आणि जन्ममरणादि सहस्रावधि अनर्थास कारण होणारे भोग, हाच त्याच्या लहान लहान डाहळ्या आहेत. त्याच्या

या लहान डाहळ्यांचा समूह फार मोठा असून तोच शुभाशुभ फळ देणारा आहे. राजा, असल्या या दुर्वृक्षाच्या शाखा व मूळ यांस तोडण्याकरिता असंग व अद्वितीय आत्मदर्शनरूप शस्त्र संपादन करण्याचा दीर्घ प्रयत्न कर.

**शिखिध्वज**—मुने, चित्तवृक्षाच्या शाखाचा व मूळाचा उच्छेद करण्यास कोणता उचित उपाय आहे?

**कुंभ**—राजन्, या वृक्षाच्या फलानीं भरलेल्या विविध वासनाशाखा केवळ अनासक्ति व अंतर्विचार याच्या योगानेंच भराभर तुटून पडतात. जीवन्मुक्त असंसक्तचित्त, मौनी, वाद व विचार यानी रहित, व प्राप्त कार्य करणारा असतो व त्यामुळेंच त्याच्या हृदयातील चित्तलता तुटून जाते, जो दृढ पौरुषानें चित्तवृक्षाच्या अनेक शाखा एकसारख्या कापीत राहतो तो त्याचें मूल कापून टाकण्यासही समर्थ होतो. शाखाना तोडणें हा गौण उपाय असून मूळ कापणें हा मुख्य उपाय आहे. यास्तव तूं मूलच्छेदाविषयींच दृढ प्रयत्न कर. भूपाला, पात्राना जसें जाळलेंस त्या प्रमाणें या चित्तवृक्षाच्या मूलानाही जाळून टाक म्हणजे तुला अचित्तता प्राप्त होईल.

**शिखिध्वज**—हे मुने, अहंभावरूप चित्तवृक्षाच्या बीजाला कोणत्या अग्नीनें जाळणें उचित आहे?

**कुंभ**—मी कोण आहें? असा प्रश्न करून आपल्या स्वरूपाचा विचार करणें, हा चित्तदुर्वृक्षाच्या बीजाला जाळणारा अग्नि आहे.

**शिखिध्वज**—मुने, मी आपल्या बुद्धीनें पुष्कळ विचार केला. त्यामुळें मी जगत् नव्हे, पृथ्वी नव्हे, वनमंडल नव्हे, पर्वत नव्हे, देहादि, मासादि, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, मन, मति, अहंकार, इत्यादि सर्व जड असल्यामुळें त्यांतील कोणी नव्हे तर सोन्यामध्यें जसें कडेंपण तसें अहंत्व चिदात्म्यामध्यें आहे. पण तें जड व असत् आहे, यास्तव ब्रह्मांडादि जड वर्गाचा आधार व शब्दादि सर्व विषयाचें आद्य कारण अशा चिदात्म्याचे ठिकाणीं तें ( अहंत्व ) असणें शक्य नाहीं. कारण तो विभक्तस्वभाव नाहीं; तर भेदशून्य सत्तासामान्यरूप आहे–इत्यादि मला कळलें. पण काय करूं? अहंत्वमळ घालविणारें साक्षिचैतन्याचें ज्ञान मला साक्षात् होत नाहीं.

**कुंभ**—राजा, अहंकारापर्यंत असलेलें सर्व दृश्य जड असल्यामुळें जर तू नव्हेस तर मग तूं कोण, तें मला सांग पाहूं ?

**शिखिध्वज**—हे विद्वद्वरा, मी चिन्मात्र, शुद्ध संवेदन आहें. मी आनंदैकरस चिन्मात्र असलों तरच शब्दादि जडरूप भाव अनुभवास येतात. मी चित्तवृत्तीवर आरूढ होऊन त्यांच्या इष्ट-अनिष्टपणाचा निर्णय करतों. विवेकदृष्टीनें पाहिलें असता अशा स्वरूपाच्या मला देहादि तादात्म्य मल लागला आहे, असें वाटतें. पण तो सकारण आहे कीं अकारण आहे, हें मला माहीत नाहीं. त्याचप्रमाणें परब्रह्म कोठें आहे, तेंही कळत नाहीं. मुने, आत्म्यास लागलेला हा असत् मलही घालविता न आल्यामुळें मी अधिकच दुःखी होत आहें.

**कुंभ**—महाराज, तर तूं कोणत्या सत्य किंवा असत्य मलानें संसारी होऊन राहिला आहेस ते मला सांग.

**शिखिध्वज**—चित्तवृक्षाचें बीज असा जो अहंभाव तोच माझा मल आहे. त्याचा त्याग कसा करावा तें मला कळत नाहीं. त्याला टाकलें तरी तो फिरून फिरून येतो.

**कुंभ**—पण राजा, कोणतेंही सत्य ( सर्व अवस्थेंत दिसणारें ) कार्य कारणापासून होत असतें. कारणावाचून झालेलें इतर ( दोन चंद्र, रज्जु-सर्प इत्यादि ) कार्य असत्च असतें. संसारांकुर अहंभावापासून झाला आहे, असें सर्वत्र दिसतें. यास्तव आपल्याच बुद्धीनें विचार करून तूं मला अहंभावाचें कारण सांग.

**शिखिध्वज**—( बराच विचार करून ) मुने, देहादि आकाराचें ज्ञान होणें हेंच अहंभावाचें कारण दिसतें. कारण त्या ज्ञानाभावीं अहंभाव उद्भवत नाहीं. यास्तव त्याची शांति होईल असें कांहीं मला सांग. अहं विषयोन्मुख होऊन दुःख देण्यास कारण होतो. यास्तव त्या दुःखाच्या शांतीकरिता मला विषयशमनाचा उपाय सांग.

**कुंभ**—राजन्, तूं मोठा कारणज्ञ आहेस, यास्तव मला आतां वेदनाचें ( विषयज्ञानाचें ) कारण सांग. म्हणजे तुझें इष्ट कारणच अकारण कसें होईल तें मी सांगेन.

शिखिध्वज—मुने, देहादि ( बाह्य व आध्यात्मिक ) पदार्थसत्ताच वेदनाचें कारण आहे. कारण वेदन शरीरादिवस्तूंच्या सत्तेच्या निमित्तानें मुशींत ओतलेल्या धातुरसाप्रमाणें स्वतः देहाद्याकार होतें. पण अमूर्त वेदनानें मूर्तरूप होणें उचित नसल्यामुळें तो त्याचा आकार मिथ्या आहे. पण देहादि वस्तूंची सत्ता असत् कशी आहे, तें मला माहीत नाहीं. यास्तव तूं मला अगोदर त्याचाच उपदेश कर.

कुंभ—पण राजन्, देहादि दृश्य जर असतें तर त्याची सत्ता तुझ्या वेदनाचें निमित्त झाली असती. पण ती दृश्यसत्ताच दुर्लभ आहे. तेव्हां तुझें ज्ञान निर्विषयच नाहीं का झालें ?

शिखिध्वज—पण प्रभो, ज्याचें काहीं तरी स्वरूप अनुभवास येत आहे त्याला असत् कसें म्हणता येईल ? प्रकाश अंधकार होणें शक्य आहे का ? हात, पाय इत्यादि अवयवानीं युक्त, क्रिया, फळ इत्यादि विलास करणारा व सदा अनुभवास येणारा हा देह नाहीं कसा ?

कुंभ—भूपते, ज्या कार्याचें योग्य कारण नसतें तें कार्य वस्तुतः असत नाहीं. त्याचा अनुभव हा शुद्ध भ्रम आहे. कारणावांचून झालेलें शरीरकार्य कधींही सत् नव्हे. ज्याला बीजच नाहीं तें द्रव्य होणार कसें? मृगजलादि पदार्थ कारणशून्य असूनही अनुभवास येतात. म्हणून त्यांना व्यवहारात भ्रम म्हणतात.

शिखिध्वज—तर मग काय हे देहादि दृश्य वंध्यापुत्राच्या देहादिकां-प्रमाणें असत् आहे, असें म्हणता !

कुंभ—होय. कारणावाचूनच झालेलें हें शरीरादि अस्थिपंजररूप कार्य अविद्यमानच आहे, असें समज.

शिखिध्वज—हे मुनीश्वरा, हात, पाय इत्यादिकांनीं युक्त असलेल्या व नित्य दिसणाऱ्या या शरीराचें कारण त्याला निर्माण करणारा पिता कां नव्हे ?

कुंभ—राजन्, कारणाचा अभाव असल्यामुळेंच पिताही असत् आहे. असत्–पासून झालेलें कार्य असत्च असणार ! पदार्थ व कार्यें यांचें कारणच बीज आहे, असें म्हणतात व जगात बीजावांचून अंकुर संभवत नाहीं. यास्तव कारणरहित कार्य असंभवनीय आहे व अशा

वस्तूचा प्रत्यय भ्रामक आहे. ' पुत्र, बाप, आजे, पणजे इत्यादिकांचें कारण आद्य पितामह ब्रह्मा आहे, ' म्हणून म्हणशील तर बा भूपाला, तो आद्यपितामहही कारणाभावीं असत्च आहे. त्याचा तरी योग्य उत्पादक आहे कोठें ? अर्थात् तो स्वतः व त्याचे सर्व प्रपंच अनुभवास येत असले तरी मिथ्या आहेत. तस्मात् हे भूपते, चित्हून भिन्न असलेलें सर्व निष्कारण व म्हणूनच असत् आहे. त्यामुळें देवदेव परमात्मा हिरण्यगर्भादि स्तंभपर्यंत सृष्टिपरंपरारूपानें जो विकास पावतो तो स्वरूपातच विकास पावतो. तो आपल्याहून भिन्न असें दुसरें कांहीं करीत नाहीं अथवा होत नाहीं. तस्मात् पितामह ब्रह्माही स्वयं आत्माच आहे, असा सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असता सर्व द्वैत शांत ब्रह्मच होतें ९४.

**सर्ग ९५**—राजाच्या अविद्येच्या उपशमाचा क्रम व बोधानें विश्रांति,

**शिखिध्वज**—भगवन्, ब्रह्मापासून स्तंभपर्यंत भासणारा हा सर्वच जर भ्रम आहे तर तो अर्थक्रिया करण्यास समर्थ कसा होतो ? व दुःखाचें कारण कसा झाला आहे ?

**कुंभ**—हा जगद्रूप भ्रम प्राण्याच्या कर्मभोगाकरिता निर्माण केलेला असल्यामुळें तू म्हटल्याप्रमाणें त्यामध्ये अर्थक्रिया करण्याची शक्ति आहे व तो प्राण्याच्या दुःखालाही कारण होतो; कारण सत्यसंकल्प ईश्वराची भावनाच त्या त्या अर्थक्रियादिरूपानें पसरली आहे. ज्याप्रमाणें थंडीमुळें दगडाप्रमाणें कठिण झालेल्या पाण्याला रूक्षता, स्फटिकादि आकार, तुळतुळीतपणा इत्यादि अर्थक्रियात्व प्राप्त होतें. त्याप्रमाणें या सत्यसंकल्प भावनेनें दृढ केलेल्या मिथ्या जगालाही अर्थक्रियाकारित्व व दुःखहेतुत्व आहे. ज्ञानाभ्यासाच्या परिपाकानें मूळ अज्ञानाचा नाश होतो. तें शिथिल झालें असता जगही हळु हळु सूक्ष्म होऊन त्याच्या बरोबरच नाश पावतें. अज्ञानाच्या नाशावाचून मात्र जगद्रचनेला बाध येत नाहीं. चित्तनिरोधाचा अभ्यास करून बाह्य बुद्धिवृत्तींना कृश करणें हा अज्ञानास शिथिल करण्याचा उपाय आहे. त्यामुळें ज्ञानाची उत्पत्ति होऊन क्रमानें परम पदाचा साक्षात्कार झाला असतां संसाराचा समूळ नाश होतो. म्हणूनच व्यवहारात सुद्धां अपक्षय नावाचें सूक्ष्मत्व प्राप्त

झाल्यानेंच स्थूल भावांचा नाश होतो, असें आपण पाहतों. साराश राजा, या क्रमानें अज्ञान शिथिल होऊन जगाचा बाध झाला असतां तुझी नित्यसिद्ध पूर्णतारूप पुरुषस्वभावस्थिति सिद्ध होईल. असो; याप्रमाणें पितामहाच्या अभावींही ही अशी असत् भूतसंतति पसरली. जें असिद्ध वस्तूपासून होतें तें कधींही सिद्ध नसतें. हा भूतप्रपंच मृगजलासारखा उदय पावला आहे. शुक्तीच्या ठिकाणीं भासलेल्या रुप्याप्रमाणें तो विचारानें नाहींसा होईल. योग्य कारण नसताना, कार्य पूर्वी नसून जर झालें, तर त्याचें स्वरूप मिथ्याज्ञानाहून अन्य काहीं असणें शक्य नाहीं. म्हणून तें मिथ्या आहे, असे पाहिलें असता, अर्थक्रियेसह निःस्वरूपतेस प्राप्त होतें.

शिखिध्वज—मुने, आद्य स्रष्ट्याचें कारण अनंत, अज, अव्यक्त शांत व आपल्या स्वभावापासून कधीं च्युत न होणारें ब्रह्म का नव्हे ?

कुंभ—ब्रह्म कोणाचें कार्य नाहीं व कारण नाहीं, असे म्हणून श्रुतीनें त्याच्या कार्यकारणत्वाचा निषेध केलेला असल्यामुळे व कूटस्थाचा परिणाम होणें योग्य नसल्यामुळें सर्व प्रंपचाहून पृथक् विलक्षण व असंग असलेला शुद्ध ब्रह्मात्मा कशाचें कार्य नाहीं व तो कशाचें कारण नाहीं. जें कर्ता, कर्म, करण नव्हे, जें अकारण व अबीज आहे (म्हणजे निमित्त-उपादानकारणरहित आहे) ज्याच्याविषयीं काहीं तर्क करता येत नाहीं व जें इंद्रियाना ज्ञात न होणारें आहे, तें ब्रह्म क्रियाचें कर्तृ कसें होणार ? ब्रह्म सर्वधर्मरहित असल्यामुळें वस्तुतः अकार्यत्व, अकारणत्व इत्यादि धर्मांनीं ही रहित आहे. यास्तव कार्यकारणात्मक जगत् झालें असें जर तुला समजावयाचें असेल तर तें द्वैत–ऐक्य इत्यादि वस्तुकृत परिच्छेदानें आणि आद्यन्तरूप देश–कालकृत परिच्छेदानें रहित व चिदेकरस ब्रह्मच झालें आहे अशी संभावना कर. अशाच विचारानें त्याच्या ठिकाणीं जीवभावभ्रांतीनें प्राप्त झालेल्या कर्तृत्व–भोक्तृत्वाचाही निरास करावा. तस्मात् जगदादि हें काहीं विद्यमान नाहीं. तें कोणी केलेलें नाहीं. तू कर्ता नाहींस व भोक्ता नाहींस तर सर्व शांत शिव व अज आहे. योग्य कारण नसल्यामुळेंच हें जगत् कोणाचें कार्य नव्हे. कारणाभावीं जगत्कार्याचा भास हा भ्रम आहे. असें तूं जाण. अर्थात् हा सर्ग ( सृष्टि ) नाहीं. त्यांतील

सर्व पदार्थ असिद्ध आहेत. तेव्हा वेदन कशाचें होणार ? व वेदनाच्या अभावीं अहंपणाचें कारण कोठें राहिलें ? यास्तव तूं शुद्ध व अत्यंत मुक्त आहेस. बंध व मोक्ष याचें नाव तरी कशाला घेतोस ?

**शिखिध्वज**—भगवन्, मी आता सर्व समजलों. खरोखर तूं हें फार उत्तम व युक्तियुक्त भाषण केलेस. कारणच नसल्यामुळें ब्रह्म कर्तृ नव्हे हें मी आतां जाणलें. कर्ता नसल्यामुळे जग नाहीं. जग नाहीं, म्हणून पदार्थदृष्टि नाहीं; त्यामुळेंच चित्तादि त्याचें बीज नाहीं. अहंतादिक ही काहीं नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें मी विशुद्ध आहें, विबुद्ध आहें, शिव आहें, मला नमस्कार असो. चित्स्वरूपाहून भिन्न दुसरें चेत्य ( चिद्विषय ) नाहीं, असें तूं मला सांगितलें आहेस. पदार्थज्ञानामुळें हें असत्च भासत आहे. अध्यारोपसमयीं मीच याचा आदि व अपवाद-कालीं मीच याचा अंत आहे. मी आकाशाप्रमाणें शांत असून त्यांतील अभ्राप्रमाणें हें सर्व होतें व जातें. अहाहा ! फार दिवसांनीं हा माझा भ्रम जाऊन आज मी शांत ब्रह्म होऊन राहिलों आहें. मी अतिशय सुखी आहें, मी पूर्णरूप आहें, तुझा आत्मा तोच माझा आत्मा असल्यामुळें मला आतां भेदभाव दिसतच नाहीं. मी आता निर्भय झालों आहें. मी शुभ व शिव मौन आहें. भगवन्, मी आता जसा आहें तसाच सुखांत राहणार ! ९५.

**सर्ग ९६**—ज्ञानी राजाच्या दृश्य सत्तेचें निःशेष परिमार्जन कसे होईल, तें येथें कुंभ सांगतो.

**श्रीवसिष्ठ**—याप्रमाणें ब्रह्मामध्यें विश्रांतीस प्राप्त होऊन तो शिखिध्वज दोन घटिका निवाऱ्याच्या जागेंतील दिव्याप्रमाणें अतिशय शांतचित्त होऊन राहिला; पण निर्विकल्प समाधानपरायण कुंभानें आपल्या लीलेनेंच त्याला झटकन सावधान केलें; कारण त्याला दृश्यमार्जनाचा उपाय सांगावयाचा होता.

**कुंभ**—राजन्, आतां तूं अज्ञाननिद्रेंतून जागा झाला आहेस. शिवरूप होऊन राहिला आहेस. अज्ञान असेपर्यंत तो आनंदसागर दुर्लभ असतो, पण त्या ( अज्ञाना ) चा नाश झाला म्हणजे मग सर्व दृश्याचा अस्त होवो कीं न होवो स्वप्रकाश स्वात्मस्वरूप—आनंद सदा सुलभ होतो. बा राजा, तूं आतां सर्वसंकल्पशून्य व त्यामुळेंच जीवन्मुक्त झाला आहेस.

**श्रीवसिष्ठ**—कुंभानें असा बोध केला असता राजा अतिशय शोभूं लागला. एका क्षणात त्याची बुद्धि विश्रांति पावली. नंतर तो मुक्तात्म-दृश्य वस्तूची असत्ता पहात लीलेनें असें म्हणाला.—

**शिखिध्वज**—हे मानद व मोदद देवपुत्रा, मला प्रायः सर्व ज्ञान झालें आहे. तथापि पुनः बोध दृढ होण्याकरिता मी विचारतों तें सांग. शान्त व शिवस्वरूप आत्म्यामध्यें हा द्रष्टृ-दर्शन-दृश्य नावाचा सर्वरूप प्रत्यय कोठून आला ?

**कुंभ**—महाराज, चागलें विचारलेंस. तुला हेंच कळावयाचें राहिलें आहे. यास्तव आतां ऐक. हें दिसणारें सर्व स्थावरजंगमात्मक जग कल्पान्तीं नाश पावेल. त्यानंतर स्तिमित, गंभीर ज्याला तेज किंवा तमही म्हणता येत नाहीं, असें सद्रूप सार अवशिष्ट राहतें. तें चिन्मात्र, निर्मल व शांत असतें. तें परमतत्त्व सूक्ष्माहून सूक्ष्म, स्थूलाहून स्थूल, गुरूहून गुरु ( जड भारी ) सर्वश्रेष्ठ, अशा प्रकारचे असतें. त्याच्या पुढें हें आकाश अणूच्या अपेक्षेनें जसा महामेरु तसें स्थूल दिसतें. त्याचप्रमाणें तें इतके स्थूल आहे, कीं त्याच्या पुढें हें सर्व जग परमाणूसारखें सूक्ष्म भासतें. सोन्यात जसें कटकादि भूषण त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें जग. अशा प्रकारचें तें तत्त्व सर्वांत वरिष्ठ आहे. कारण त्याच्या पुढें हें सर्व जगद्राज्य तृणाच्या लहानशा अंशासारखे भासतें. राजा, तें इतकें श्रेयस्कर आहे कीं त्याच्या सत्तेनें सर्वपदार्थश्री सत्तायुक्त होते. तेंच एक सार सर्वत्र पसरलें आहे. तें अद्वितीय व पूर्ण आहे. ते सर्वदा सर्वाकार आहे. तें प्रत्यक्षादि प्रमाणाचा विषय होत नाहीं. त्या अकारणापासून काहीं उत्पन्न होत नाहीं. तें स्वप्रकाश आहे सर्व जगत् ब्रह्म आहे. तें त्याहून पृथक् नाहीं. जगाला यथार्थ जाणलें असतां तें स्वतः शिवस्वरूप होतें. यथार्थ ज्ञानाच्या महात्म्यानें विषही अमृत होतें. भावनेप्रमाणें फल. यास्तव वस्तुतः ब्रह्मभिन्न नसलेल्या जग अहंकार इत्यादिकाविषयीं प्रश्न करणेंच उचित नव्हे. जी वस्तु विद्यमान असते तिच्याविषयीं प्रश्न केलेला शोभतो. ज्याला तुल्या विचारपूर्वक दृष्टीनें पाहिलेलेंही खपत नाहीं त्याविषयीं काय प्रश्न करावयाचा आहे ? सर्व पूर्ण चिन्मात्र आहे; व भासतें तेंही सर्व पूर्ण होय. सारांश हे राजा, स्वभावतः शान्त, नामरूपरहित व स्वप्रकाश, असा

जो अनुभव तेंच आत्मतत्त्व असून तेंच मायाचमत्कारामुळें विस्तृत जगसें होऊन राहिलें आहे ९६.

**सर्ग ९७**—येथें दृश्याच्या ज्ञानाचें मार्जन करतात.

**कुंभ**—शांत तत्त्वापासून कांहीं होत नाहीं व त्यात काहीं लीन होत नाहीं. ब्रह्म स्वसत्तेमध्यें स्थित आहे, तें कशाचेंही उपादान अथवा निमित्तकारण नाहीं. तें शुद्ध अनुभवमात्र आहे, व त्याच्याहून दुसरें काहीं नाहीं.

**शिखिध्वज**—मुने, त्या शिवाच्या ठिकाणीं जगत्, अहंता इत्यादि दुसरें काहीं नाहीं हें मीं जाणतों. पण हें सृष्टिज्ञान कसें भासतें तें साग.

**कुंभ**—तें अधिष्ठानभूत सन्मात्रच आपल्या ठिकाणीं आरोपित केलेल्या वस्तूचें ज्ञान होतें. एवढ्यासाठींच त्याच्यावर आरोपिलेलें जग तन्मात्र आहे, असें आम्हीं कंठरवानें सागत असतों. त्या एका नित्य वस्तूवांचून दुसरें क्षणिकविज्ञान, शून्य, प्रकृति, परमाणु इत्यादिकातील काहीं एक सत्य नाहीं. जलाचें जसें द्रवत्व त्याप्रमाणें वेदना हेंच सर्वांचें सार आहे; वेदनेवाचून कोणत्याही जीवाला कशाचीच कल्पना करतां येत नाहीं. यास्तव त्या वेदनेस शून्य, क्षणिक, जन्य, विनाशि, परिणाम इत्यादि कसें कोण म्हणणार? तिच्या सिद्धीनंतरच जर सर्वव्यवहार सुरू होणार, तर तिचा उद्भव व नाश पाहणारा कोण? शिवाय तें चित्सारच जर नाहीं, असें म्हटलें तर जगत् आहे किंवा नाहीं हें तरी कोणाला कसें समजणार? यास्तव आम्हीं पुष्कळ विचार करून स्वानुभवानें असें ठरविलें आहे कीं, चिद्रूप—स्वरूपात जगदाकारानें अथवा परमार्थचिन्मात्ररूपानें प्रकट होण्यास—स्वमायाशक्तीनें समर्थ आहे. यास्तव तें जसें सदोष अथवा निर्दोष असेल तसेंच प्रतीत होतें. पण स्वच्छ व अस्वच्छ अशा दोन्ही प्रकारच्या पदार्थस्थितीस जर तें याप्रमाणें समर्थ आहे तर त्याची केवळ स्वच्छभावव्यवस्थाच कां करिता? म्हणून विचारशील तर त्याचेंही कारण सागतों. केवळ सत्त्वाचा स्वच्छता हाच स्वभाव आहे. अस्वच्छता हा त्याच्या विरुद्ध व म्हणूनच आगंतुक भाव आहे, त्यामुळें त्याचें निमित्त गेलें कीं अस्वच्छतेचाही अभाव होऊन स्वाभाविक स्वच्छभाव राहतो. चित् निर्विकार व अद्वय आहे, असें

श्रुति सांगते; विद्वानांचा अनुभवेंही तसाच आहे यास्तव त्याच्याशीं विरोध येऊं नये म्हणून आम्हीं स्वच्छ चिद्रूपामध्यें जगद्रूप होण्याची योग्यता आहे, असें म्हणत नाहीं. तर अनुभवसिद्ध अस्वच्छभावाची कल्पना करून शेवटीं तिचा निरास करतों.

तस्मात् वस्तुतः शुद्ध ब्रह्म कोणत्याही कार्याचे कारण नव्हे. त्यामुळें निष्कारण सृष्टि खरी नाहीं. हिची उपपत्ति दुसऱ्या कोणत्याही रीतीनें लागत नाहीं. चिन्मात्रावाचून जड संसार नाहीं. यास्तव हें जें कांहीं दिसत आहे, तें चिद्घनच उदय पावलेलें आहे. बा सज्जना, प्रमाणशून्य व अनुभवरहित जगाला मानण्यापेक्षा व त्याचे उत्पत्तिविनाश खरेच आहेत, असें समजण्यापेक्षा श्रुति व विद्वानाचा अनुभव यानीं सिद्ध झालेलें चिदेकरूप ब्रह्मच सत्य आहे, असें समजणें किती उत्तम आहे? सर्व ब्रह्मच जर आहे तर जंगम व स्थावर हा भेद का भासतो? म्हणून विचारशील तर सागतों. हा सर्व चित्ताचा विलास आहे. पण त्या सर्वाला चिन्मात्राची सत्ताच कारण आहे. यास्तव चित्तचमत्कार बंद होऊन पदार्थसत्ता क्षीण झाली म्हणजे तुझी अहंभावना राहणेंही संभवनीय नाहीं. अहभावनेचा असंभव झाल्यावर चित्त आणखी कशाला म्हणणार? कारण तें अहंरूपच आहे. तस्मात् जीवब्रह्मभेद, चिद्-अचिद्भेद, चित् व दृश्यवेदना याचा भेद इत्यादि काहीं नाहीं. शुद्ध चित्-दृष्टीचा लाभ झाला असता जड पदार्थांची सिद्धि कधींच होत नाहीं. त्यामुळें त्याच्या भावनेमुळें होणारें 'अहं' असें जीवरूपही रहात नाहीं. तर स्वय आत्माच अवशिष्ट राहतो. व तोच एक वेदार्थरूप सत्य पदार्थ असल्यामुळें कोणत्याही प्रकारची चिंता रहात नाहीं. यास्तव हे राजा, सर्व द्वैताचा बाध झाल्यामुळे तूं निर्मल, अकारण, आदिमुक्त शाश्वत ब्रह्मच आहेस. जगही ब्रह्म आहे. त्याविषयींची प्रतिभासरूप चित्‌ही निरामय व निर्विकार ब्रह्मच आहे. ९७.

**सर्ग ९८**—चित्त नाहीं हा बोध दृढ करण्यासाठीं विस्ताराने उपदेश.

**शिखिध्वज**—भगवन्, चित्त नाहीं हा माझा बोध दृढ होईल, अशा प्रकारची पूर्वीचीच अथवा दुसरी युक्ति मला सांग.

**कुंभ**—हे राजन्, चित्त कधींही काहींही नाहींच. पण हें जें चित्ता-

सारखें भासत आहे, तें अव्यय ब्रह्म आहे. यास्तव चित्तादि सर्व अज्ञानात्मक जगत् नाहीं. (या प्रश्नोत्तराचा भावार्थ असा–ज्याप्रमाणें प्रकाश असला तरच रूपादिकाचा अनुभव होतो, त्याप्रमाणें चित्त असलें तरच चित् व तदितर चेत्य (विषय) याची प्रसिद्धि होते. त्यावाचून होत नाहीं. यास्तव ब्रह्माकारवृत्ति झालेलें चित्त जर बाधित होईल तर दिवा विझल्यावर जसा, त्याप्रमाणें सृष्टींत पुनः अंधकार (अप्रकाश आध्य) पसरेल. शिवाय या जगात जे सचित्त असतात त्यानाच सचेतन व जे अचित्त असतात त्यांना अचेतन म्हणतात. तेव्हा जीवन्मुक्त जर अचित्त (नष्टचित्त) झाले तर मृत्तिका, पाषाण इत्यादिकाप्रमाणे ते अचेतन होतील. पण तसा अनुभव येत नाहीं. तसेंच चित्त असलें तर निरतिशयानंदलक्षण परम पुरुषार्थ व शास्त्रफल याचा अनुभव येणें शक्य आहे; नाहीं तर नाहीं. कारण ज्याचा अनुभव येत नाहीं तो पुरुषार्थच नव्हे. शिवाय ब्रह्माकार चित्तच चित्ताचा बाध करितें कीं दुसरें काहीं? चित्त चित्ताचा बाध करूं शकणार नाहीं. कारण पदार्थाची क्रिया स्वतःवरच होणें योग्य नाहीं. दाह्य पदार्थांस जाळणारा अग्नि आपल्यालाच जाळूं शकत नाहीं, बरें चित्ताहून दुसरेंच काहीं चित्ताचा बाध करील म्हणून म्हणावें तर चित्ताच्या योगानें बाधित होणारें जगत् त्याचा बाध करूं शकणार नाहीं. व चित्तवृत्तींवाचून दुसरें कोणीही कशाचा बाध करूं शकतें, असा लोकात अनुभव नाहीं. अनादि ब्रह्म तर सर्वसाधक आहे तें कोणाचेंही बाधक नाहीं. तस्मात् चित्ताचा बाध निरर्थक, दुष्कर, व सर्वांच्या अनुभवानें असिद्ध आहे. इत्यादि आशंकाचें निवारण होऊन बोध दृढ व्हावा या इच्छेनें राजानें वरील प्रश्न केला. तेव्हां कुंभरूपी चूडाला म्हणाली–राजन्, तूं म्हणतोस तशा शंका आल्या असत्या. पण अज्ञानाचा नाश होणें याहून चित्तनाशादि भिन्न नाहीं. तर अज्ञानबाधच अज्ञानाचीं कार्यें, त्याचा संबंध, आवरण, विक्षेप इत्यादि सर्वांच्या निवृत्तिरूप आहे. यास्तव अज्ञानाचा बाध झाला, कीं चित्त नाहींच हा प्रतिज्ञात अर्थ अर्थात् सिद्ध होतो. त्यामुळें पुनः अंधकार पसरण्याचें कारण रहात नाहीं. कारण सर्व प्रकारच्या अंधकाराचें कारण जें अज्ञान त्याचा नाश झाल्यामुळें स्वप्रकाश पूर्णानंद अवशिष्ट राहतो, आणि अशा

रीतीनें अनायासानें परम पुरुषार्थ सिद्धि होते. चेतनता चित्ताच्या अधीन नसते तर ती अभिव्यक्त झालेल्या चित्च्या अधीन असते. अंतःकरण-घटित लिंगशरीरांत अभिव्यक्त झालेली चित् तर लिंगशरीराचा एकदेश, अशा चित्ताचा नाश झाला तरी लिंगशरीर असेपर्यंत राहतेच. यास्तव लिंगास अचेतन होण्याचा प्रसंग येत नाहीं 'चित्ताचा नाश झाला कीं त्याच्या मुळेंच होणारी चित्ची अभिव्यक्ति ही लुप्त होते.' म्हणून म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण चित्ची अभिव्यक्ति न होण्याचें कारण अज्ञानाचें आवरण आहे. यास्तव अज्ञान गेलें म्हणजे त्याचें आवरणही नष्ट होऊन चित्ची स्वाभाविक अभिव्यक्ति जशीच्या तशीच राहते. शरत्कालीं वायु ढगाना घालवून व सूर्याला व्यक्त करून मग जरी बंद झाला तरी तो सूर्य व्यक्तच राहतो. वायु नाहीं म्हणून त्याची व्यक्तता ही नाहींशी होत नाहीं. साराश याप्रमाणे सर्व शंकाचा निरास करता येणें शक्य आहे. मग जगत्च जर नाही तर मी, तूं तो इत्यादि कल्पना कोठच्या ? त्याच्या उपादानादि कारणाचा अभाव आहे. त्यामुळें तें कधीं-झालेलें नाहीं. येथें तें हें इत्यादि सर्व नावानीं मी जो जगाचा निर्देश करीत आहे तो तुझ्या बोधाकरितां आहे, वस्तुतः भासणारें सर्व ब्रह्म आहे. त्या नामरूपरहित वस्तूच्या ठिकाणीं जग असणें युक्तिशून्य आहे. निराकार स्वात्मस्वरूप देव हें सर्व करतो, असें म्हणणेंच हास्यजनक आहे. याच कारणानें चित्तही नाहीं. बा साधो, जगत्च जर सत् नव्हे तर त्यातील चित्तादि सत् कसें असणार ? कारण चित्त वासनामात्र आहे. ज्याच्या विषयींची वासना करावयाची तें वास्य [ वासनाविषय ] असेल तर वासना होणार. वास्य जगत् तर असत् ( मिथ्या ) आहे. तेव्हा चित्ताची अस्तिता कोठची ? अर्थात् मायोपहित ब्रह्मच चित्तादिव्यवहाराचा विषय आहे. योग्य कारणाच्या अभावीं जगाची उत्पत्ति सिद्ध होत नाहीं. जग नाहीं. म्हणजे वासनेचा विषय नाहीं. वासनाविषयाच्या अभावीं वासना नाहीं व त्यामुळेंच वासनामय चित्त नाहीं, तर सर्वांच्या बाधानंतर अवशिष्ट राहणारें एक चिदाकाश मात्र आहे. अर्थात् मीं, तूं इत्यादि प्रकारें येणारा हा अनुभव खरा नव्हे. मिथ्या स्वप्नाप्रमाणें तो केवळ भासतो. अप्रबुद्ध जन त्यालाच सत्य समजून बसतात व त्यामुळेंच नरक-

प्राय दुःख भोगतात. पण साकार व ज्याचें स्वरूप प्रतीघातास योग्य आहे अशा या जगाचे—लोक, शास्त्र व अनुभव यावरून सिद्ध होणारे—महाप्रलयादि विकार नाहींसे करितां येत नाहींत. कारण त्यांचें निराकरण करितां येण्यासारखें एकही उचित कारण नाहीं. आतां ज्याला लोकप्रसिद्धि, शास्त्र व अनुभवरूप वेदही प्रमाण वाटत नाहींत तो असज्जनाहूनही अति मूढ आहे. सज्जनानीं त्याचा आश्रय करूं नये. जगाचें तात्त्विक स्वरूप ब्रह्म आहे, हें सागण्याकरिताच वेदान्तशास्त्रात कार्य व कारण यांचें ऐक्य ठरविलें आहे. अशा रीतीनें जगाला ब्रह्ममात्र पाहिलें तरी जगाचा मूर्त आकार जात नसल्यामुळें तें जगद्व्यवहारासहीं समर्थ असतें व जग परमार्थतः ब्रह्मरूप असल्यामुळें तें वस्तुतः जसें दिसतें तसेंही नसतें. त्यामुळें लोकप्रसिद्धि व वेद यातील एकाशींही ब्रह्मात्मज्ञानाचा विरोध येत नाहीं. साराश हे राजन्, सर्व जग निराधार, अज, अतिशात व अनादि ब्रह्मच आहे. यास्तव तूं आपल्या प्राप्त स्थितीप्रमाणें व्यवहार करीत तत्त्वतः वागादिव्यापारशून्य होऊन रहा ९८.

**सर्ग ९९**—राजाला ज्ञान झालें होतें तरी कुंभ तेंच दृढ करण्यासाठीं पुनः बोध करतो.

**शिखिध्वज**—महामुने, माझा मोह नष्ट झाला, व मी निःसंदेह होऊन राहिलों आहें. माझी मति शात झाली आहे. मला सर्व ज्ञेय कळलें आहे. मी मायामहासागराचे उल्लंघन केलें आहे. मी महामौनी झालों आहें, मी शांत व अहंकारशून्य झालों आहें. अरेरे! मी फार दिवस भवसागरात भटकलों. आता मात्र मला अक्षुब्ध व अक्षय स्थान प्राप्त झालें आहे. हे मुने, मूर्खांनाच खरें वाटणारें हें अहंतादि त्रिभुवन ब्रह्ममय आहे हें मीं जाणतों.

**कुंभ**—राजा, खरें आहे. जेथें जगतच नाहीं तेथें मीं, तूं इत्यादि भावना कोठच्या? गंधर्वनगराप्रमाणें ज्याचा व्यवहार आहे. असा हा संसार कशाच्या आधारानें राहणार? यास्तव यदृच्छेनें प्राप्त व्यवहार करीत मौनी, शातचित्त व मननशील होऊन रहा. चिच्चमत्कार या नावाचें जें आत्माकाश तेंच अहं, जगत् इत्यादि रूपानें चमकत असतें.

विचारानें उपळ्या नीलवर्ण कढईच्या आकाराचा भास शांत झाला असता जसें शून्य आकाश अवशिष्ट राहतें, त्याप्रमाणें जगत् इत्यादि पदार्थ-भावना शात झाली असतां ब्रह्मच राहतें. बंध व मोक्ष ' मी बद्ध आहें ' व ' मी मुक्त आहें ' अशा समजुतीच्या अधीन आहेत. ' अहं ' हा संकल्पच बंधास कारण होणारा आहे, व नाहं हा संकल्प शुद्ध मोक्षास कारण होतो. क्रमानें उद्भवणाऱ्या बंध—मोक्षसंकल्पांच्या साक्षिभूत संवेदनासच सद्ब्रह्म व केवलत्व म्हणतात, अनहंवेदन हीच महा-सिद्धि व अहंवेदन ही महा आपत्ति होय. यास्तव अनहंभावनेनें तूं शुद्धबोधस्वरूप व आत्मवान् हो. केवल यथार्थज्ञानोदयरूप असंकल्पाने संकल्प क्षीण होतो. अतर्क्य शिवस्वरूपात कारणता नसते व कारणाच्या अभावामुळें कार्यपदार्थही नसतो. पदार्थांचाच अभाव सिद्ध झाल्यावर त्याविषयींचें वेदन ( ज्ञान ) कसें उपपन्न होईल.

कारणाच्या अभावामुळें अहंभावाचा उदय होणें कधींही शक्य नाहीं. तेव्हा संसार कोणाचा व कशा प्रकारचा असणार ? संसाराच्या अभावीं सर्व परब्रह्म राहतें. यास्तव हें भासणारें सर्व पर सत्च आहे. ज्ञानानें जगाचा बाध झाल्यावर ज्याचा वाणीनें निर्देश करिता येत नाहीं तें ब्रह्मच रहातें. साराश हे राजन्, हें सर्व जग जशाप्रकारचे आहे तसेंच जरी तें असलें तरी परब्रह्मस्वरूपच आहे. त्याचप्रमाणें तें ज्ञानानें जरी शात झालें तरी सर्वात्मक स्वस्वरूप आहेच. म्हणजे त्या दोघाचीही एकसत्ता आहे ९९.

**सर्ग १००**—जगाच्या सत्त्वाचें निवारण. जन्मादिविक्रियारहित ब्रह्मच सत्.

**शिखिध्वज**—मुने, ब्रह्म व जग याची जर एकच सत्ता आहे तर त्या सत्तेनें ब्रह्माप्रमाणें जगही परमार्थ सत्य कां नव्हे ! मिथ्यावस्तूच्या कारणाचें निरूपण करिता येत नाहीं. सत्यवस्तूचें कारण सत्य ब्रह्मच संभवतें. यास्तव जगत् सत्य आहे, असें मी समजतों.

**कुंभ**—राजन्, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण मायाशबल ब्रह्म शुद्ध ब्रह्माच्या सत्तेनें जगत्समसत्ताक ( जगाच्या सत्तेसारख्या सत्तेनें युक्त ) झाल्यामुळें जगाचें कारण जरी होऊं शकलें तरी अकारण निर्गुण ब्रह्म निर्विकार असल्याकारणानें त्याचें कारण होत नाहीं. आतां मायाश-

बलच जगाचें कारण आहे म्हणून म्हणावें तर निर्विशेष ब्रह्माच्या आधारानें मायाशबल कारण व जगत्कार्य याचें तरी अस्तित्व कसें होणार! कारण माया, तिच्या योगानें शबल झालेले ब्रह्म व त्याचीं कार्यें या सर्वांचा सद्भाव मायादृष्टीनेंच मानला जातो. परमार्थदृष्ट्या हें सर्व शांत अज ब्रह्मच आहे. जें होतच नाहीं त्याचें नित्य सिद्ध वस्तूशीं सादृश्य कसें असणार? ज्याला बीजच नाहीं ते होणार कसें? जें अतर्क्य व नामरूपरहित त्याला बीजता कोठची? प्रमाणसिद्ध उचित देशकालादिकांच्या अभावीं ब्रह्म बीज कसें होणार? शिवाय तें अकर्तृ असल्यामुळें सर्व प्रकारच्या कारकाच्या विरुद्ध आहे. तस्मात् तें कारण नाहीं. जगच्छब्द व त्याचा अर्थ याचे ज्ञान ब्रह्मरूप आहे. तूं ब्रह्मस्वरूप आहेस. यास्तव राजन्, तूं आपल्या स्वरूपास धारण कर, त्याला विसरूं नको. चित्ताचा अन्यथा–( विपरीत )–भाव हाच नाश ( ब्रह्मस्वरूपापासून भ्रंश ) आहे. विद्वान् त्याचा अनुभव घेतात. चित्त नाशस्वभाव व नाशात्मक आहे. एकक्षणभरही स्वरूपविस्मरणरूप नाश कल्पकालापासून विसरलेल्या चित्त शब्दानें सांगितला जातो. तें चित्त संकल्प सोडल्यामुळें उदय पावलेल्या यथार्थ आत्मज्ञानानें क्षीण होतें. संकल्परूप चित्ताचा क्षय झाला असता जग मिथ्या असल्यामुळें आपोआप परमात्म्यामध्यें प्रवेश करतें, तें भिन्न वस्तुरूपानें अवशिष्ट रहात नाहीं. बाधित होऊन आपल्या अधिष्ठानात शिरणारें विश्व विद्यमान कसें असणार! जो मी शूद्र आहें, असें आपल्या तोंडानें सांगतो, तो विप्र कसा होईल? तात्पर्य अज्ञानच चित्त आहे. तें असत् असूनही सत असल्यासारखा भ्रम होतो. पण चित्त, अहंकार, मन, इत्यादि कांहींएक नाहीं, अशी भावना केली असता तें सर्व नाहींसें होतें. संकल्पानेंच झालेलें तें असंकल्पानें नाहींसें होतें. एका सर्वव्यापी आत्मसत्तेनें हें सर्व दृश्य व्यापलें आहे. त्यामुळें जन्म, मरण, मी तूं इत्यादि या सर्व कुकल्पना आहेत. मित्रा, तूं सत्य आहेस. या इंद्रियगणाच्या समूहांत तूं सत्च राहतोस. तूं दुःखांनीं संतप्त होत नाहींस व पुण्यपापांनीं लिप्त होत नाहींस, प्रिय मित्रा, तूं नाश पावत नाहींस व वृद्धि पावत नाहींस, इच्छा, अनिच्छा, क्रिया इत्यादि सर्वशक्ति तूंच आहेस. यास्तव तुका

कांहीं इष्टानिष्ट संपादन करावयाचें नाहीं. तूं अज, अमर, अनादि, सन्मात्ररूप आत्मतत्त्व आहेस १००.

सर्ग १०१—ज्ञान दृढ झाल्यामुळे राजाची कृतकृत्यता, जीवन्मुक्तांत अचित्तत्व व तत्त्वाची स्थिति.

**श्रीवसिष्ठ**—कुंभाच्या ह्या अकृत्रिम वचनाची भावना करीत राजा स्वयं त्या आत्मपदामध्यें क्षणभर विश्रांत झाला. त्याचे नेत्र व त्याबरोबरच मन मिटलं ( चंचलतारहित झालें. ) वाणी शांत झाली, तो पाषाणावर रेंगदलेल्या मूर्तीप्रमाणें निश्चलाकार झाला. दोन घटिका तो त्याच अवस्थेंत राहिला. नंतर बा रामा, राजा किंचित् सावध होऊन त्यानें नेत्र उघडले आहेत, असें पाहून कुंभरूपिणी चूडाला त्याला म्हणाली—

**कुंभ**—महाराज, या विस्तृत, शुद्ध व योग्याच्या सुखशय्यारूप पदामध्यें तूं सुखानें विश्राम पावला आहेस काय? तुला आतल्याआत बोध झाला आहे का? तू सर्व भ्रांतीचा त्याग केलास ना? तुला सर्व ज्ञेय ज्ञात झालें का? तूं सर्व द्रष्टव्य पाहिलेंस का?

**शिखिध्वज**—भगवन्, तुझ्या महाप्रसादानें मीं निरतिशयानंदलक्षण भूमिका व महा पदवी पाहिली. मी आता हिरण्यगर्भापर्यंत उत्तरोत्तर शतपट आनंदाच्या परम सीमेवर जाऊन बसलों आहें. अहाहा! ज्ञानी महात्म्यांचा संग अपूर्व अमृतमय असून साररूप फल देणारा आहे. जें महा अमृत मला अनेक जन्मानींही मिळालें नव्हतें तें आज तुझ्या समागमानें आपोआप प्राप्त झालें आहे. पण हे कमलनयना, हें अनंत आद्य अमृत मला या पूर्वीं का मिळालें नाहीं?

**कुंभ**—राजा, मन शांत होऊन, तें भोगेच्छारहित झालें असता चित्ताचे रागद्वेषादि दोष पक्क झाले असतां व सर्व इंद्रियसमूह विषयविमुख झाला असतां, गुरूच्या शुद्ध उक्ति चित्तात स्थिर होतात असा नियम आहे. त्यास अनुसरून आजवर तुला बोध झाला नाहीं. अनेक शरीरांनीं संपादन केलेले वासनारूप अनंत कषाय तुझ्या चित्तात भरले होते. इतक्या दिवसांच्या तपश्चर्येनें ते आतां परिपक्क झाले आहेत. बा साधो, फळें पिकलीं म्हणजे तीं जशीं वृक्षावरून गळून पडतात त्याप्रमाणें

लिंगदेहापासून रागादि कषाय व पापें गळतात. नंतर गुरु जें जें सागतो तें तें त्या शुद्ध चित्तात दृढ बसतें. तुझ्या कषायांचा परिपाक झाला आहे, असें जाणूनच मी तुला आज बोध केला. त्यामुळें आजच तुझ्या अज्ञानाचा क्षय झाला. कषायपाक, ज्ञानकथा, उपदेश व साक्षात्कार हीं चारी तुझीं आज झाली आहेत. सत्संगाच्या मिषानें आज तुझ्या सर्व शुभाशुभ कर्माचा क्षय झाला आहे. आजच माध्याह्न-काल होईतों तुझें चित्त अहं व मम या अज्ञानजन्य भावनांनीं युक्त होतें. पण आतां माझ्या बोधानें चित्त क्षीण झालें असता, तोच तूं प्रबुद्ध झाला आहेस. हृदयात मन असेपर्यंत अज्ञानाची स्थिति होते. आणि चित्ताचा चित्तरूपानें त्याग केला म्हणजे ज्ञानाचा अभ्युदय होतो. द्वित्व व एकत्वदृष्टि हेंच चित्त व हेंच अज्ञान. आणि त्या दृष्टींचा त्याग हेंच ज्ञान व तीच परागति होय. हे राजा, तू चित्ताचा त्याग केलास व त्यामुळें प्रबुद्ध व मुक्त झाला आहेस. सदसद्रूपत्व हेंच चित्त असून तूं त्या असत्पदाचा त्याग केला आहेस, याविषयीं मला आता संशय मुळींच राहिलेला नाहीं. महाराज, आता यापुढें तू शोकरहित, निरायास, निस्संग, अनन्य, आत्मवान् (सावधान) महोदयमुनि व मौनी होऊन आपल्या निर्मळ स्वरूपांत स्थिर हो.

शिखिध्वज—भगवन्, खरें आहे. मूर्खाची चित्तभू असते. पण प्रबुद्धाला चित्त म्हणजे काय तें माहीतही नाहीं. देवपुत्रा, तुमच्यासारखे मनोरहित जीवन्मुक्त व्यवहार कसे करूं शकतात तें मला साग. आणि तशाच आणखी दुसऱ्याही उत्तम वचनांनीं तूं माझ्या हृदयातील अवशिष्ट तमही काढून टाक.

कुंभ—तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच जीवन्मुक्त महात्म्याना चित्त नसतें. पुनर्जन्म देण्यास कारण होणारी जी घन वासना तिलाच चित्त म्हणतात, पण तशा प्रकारची वासना आत्मज्ञाला नसते. तत्त्वज्ञ ज्या विरळ वास-नेनें कर्मामध्यें विहार करितात तिला सत्त्व असें नांव आहे. ती पुनर्जन्म-रहित आहे. सत्त्वस्थ व जितेंद्रिय जीवन्मुक्त महात्मे सर्वसंग सोडून विहार करितात. ते कधींही चित्तस्थ होत नाहींत. मूढचित्ताला चित्त व प्रबुद्धचित्ताला सत्त्व म्हणतात. अप्रबुद्ध चित्तस्थ असतात व ज्ञानी

सत्त्वस्थ असतात. चित्त पुनः पुनः उत्पन्न होतें, वारंवार उदय पावतें. सत्त्व पुनः उत्पन्न होत नाहीं. त्यामुळें राजा, अप्रबुद्धाला बंध आहे. प्रबुद्धाला नाहीं. तूं सत्त्ववान् झाला आहेस. महात्यागी होऊन राहिला आहेस. तूं आज आपलें चित्त निश्शेष करून सोडलें आहेस, असें मी समजतों. महाराज, तू सर्व वासनारहित होऊन आज अतिशय शोभत आहेस. वा मुने तुझें मन आकाशासारखें निर्मळ व निर्लेप झालें आहे, असें मी समजतों. तू परम शमास प्राप्त झाला आहेस. तुझी स्थिति ब्रह्मसम झाली आहे. हाच तो महात्याग आहे. कारण आता तू सर्व सोडलें आहेस. स्वर्ग, मोक्ष, वित्तादि, तप, दान, फळ इत्यादि सर्वांचा तूं परम बोधयुक्त बुद्धीनें त्याग केला आहेस. तप दान इत्यादिकाचे फळ अगदींच क्षुद्र आहे. तें अगदीं थोड्याशा दुःखाचाच मात्र क्षय करीत असतें. पण जें क्षय व अतिशय यानीं रहित (ज्याचा कधीं क्षय होत नाहीं व ज्याच्याहून अधिक दुसरें नाहीं) व समतामय सुख तेंच सत्य व तेंच नित्य निरतिशय सुख होय. बाकी स्वर्गादि सर्व सुखें तुच्छ आहेत; क्षणभंगुर आहेत, आविर्भाव व तिरोभाव यानीं ग्रासलेलीं आहेत आणि पूर्वोत्तर कालीं नसून केवळ वर्तमान समयीं स्वप्नाप्रमाणें अवगत होणारीं आहेत. त्यातील प्रत्येकाकरिता किती आयास करावे लागतात. पण ते करूनही नित्य सुख मिळतें का नाहीं. यास्तव तुच्छ स्वर्गादि सुख अज्ञानाच बहुमत होतें. तत्त्वज्ञाना नाहीं, पण उपवासापेक्षा जशी भिक्षा काहीं अंशीं बरी, त्याप्रमाणें स्वर्गसंज्ञक तुच्छ आनंदाकरितांही अनात्मज्ञानीं यथेच्छ आचरणापेक्षा कर्मकाडाप्रमाणें अनुष्ठान करणें बरें. कारण ज्याला सोनें मिळालेलें नाहीं त्यानें जवळ असलेली पितळ टाकावी हें म्हणणें योग्य नव्हे. असो; हे राजन्, चूडालादिकांच्या समागमानें तुझें ज्ञान अनायासानें स्थिर झालें असतें, असें असताना तूं या तपोमय कष्टांत कशाला पडलास? तपादिकाचा अनुष्ठानकाल कष्टकर असतो. अंतही क्षयादिकामुळें दुःखावह होतो. मध्यें स्वर्गादि फळभोगसमयीं मात्र थोडेसें सुख होतें. पण किंचित् काळ टिकणाऱ्या त्याला आम्ही सुख म्हणतच नाहीं. तथापि तुझें तपश्चरण व्यर्थ झालें नाहीं. त्याच्या योगानें रागादि कषायांचा परिपाक होऊन तुजमध्यें माझा उपदेश ग्रहण

करण्याची योग्यता आली. आता हे शुभ भूपाला, सर्व कार्याकार्य-विकल्प सोडून तूं पूर्ण परब्रह्माचा आश्रय कर. कारण इष्टानिष्ट विकल्प ब्रह्म-सागराचेच जरी बिंदु असले तरी ते तुच्छ फल देणारे आहेत. यास्तव त्याची उपेक्षा करून त्यांचा ज्यात अंतर्भाव होत आहे, अशा समुद्राला संपादन करणेंच उचित होय. असो, शिखिध्वजा, प्राज्ञ महात्मे असल्या संकल्परचित पदार्थांची भावना करीत नाहींत. यास्तव तूही चित्तस्पंद बंद करून स्वरूपात स्थित हो. ज्याचें चित्त स्पंदरहित असतें त्याच्या मागें संसार लागत नाहीं. चित्त–चापल्यामुळेंच सर्व दुःखें उद्भवतात. ज्याचें चित्त स्थिर, शात व स्पंदरहित असतें तो सदा महा आनंदी व साम्राज्याचें पात्र होतो. यास्तव तूं स्पंदास्पंदाना एकरूप करून तसाच एकरूप रहा.

शिखिध्वज––प्रभो, स्पंदास्पंद एकरूप कसे होतील?

कुंभ––त्याचा स्वरूपतः विरोध असला तरी अधिष्ठान-साक्षिचिन्मात्र रूपानें मुळींच विरोध नाहीं. यास्तव स्वरूपदृष्टि सोडून अधिष्ठानदृष्टि स्थिर केली असता एकरूप होता येणें शक्य आहे. कारण मूढ चित्त-स्पंदालाच जग म्हणत असतात; चित्तस्पंदच संसार व संसारसर्वस्व आहे, इत्यादि पूर्वी पुष्कळ बोध केला आहे. स्पंदयुक्त चित्‌च चित्त व निःस्पंद चित्‌च ही विस्तृत तुर्यातीत अवस्था आहे. तिचें वाणीनें वर्णन करिता येत नाहीं. शास्त्र, सज्जनसंपर्क व अभ्यास याच्या योगानें फार दिवसांनीं चित्त अमल झालें असता आत्मस्वरूप स्पष्ट अनुभवास येतें. महाराज, तूं आदि-अंत-मध्यरहित सारस्वरूपास प्राप्त झाला आहेस. यास्तव आता या स्वपदामध्येंच स्थिर हो. प्रभो, तूं भेदरहित महा चिदात्मा झाला आहेस. बा साधो, तूं आता निःशोक अवस्थेचा अनुभव घ १०१.

सर्ग १०२—कुंभाचें गमन. विस्मित राजाची विचारपूर्वक समाधींत विश्रांति.

कुंभ—बा राजा शिखिध्वजा, हें सर्व जग कसें उद्भवलें आहे व तें लीन कसें होतें, तें सर्व मी तुला सांगितलें आहे. आता हे मुनिनायका, याचा चागला विचार करून मनन व निदिध्यासन याच्या योगानें परम पदाचा यथेच्छ अनुभव घे. अथवा तुला जसें योग्य वाटेल तसें कर.

आता मी स्वर्गास जातों, कारण या पर्वसमयीं नारदमुनि ब्रह्मलोकाहून देवसभेंत आला असेल, त्यानें मला जर तेथें पाहिलें नाहीं तर तो मजवर कोप करील. पण निरिच्छ व संकल्पशून्य भव्य पुरुषानें गुरूंस कधींही उद्विग्न करूं नये, अशी नीति आहे. तूं आता येथेंच रहा. उपदेशिलेली ही बुद्धि अतिशय पवित्र आहे.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, हें ऐकून शिखिध्वज हातांत पुष्पें घेऊन प्रणामपूर्वक काहीं प्रतिवचन बोलणार होता, पण इतक्यात तो देवकुमार गुप्त झाला. साध्वींना भर्त्याचा प्रणाम अग्राह्य असल्यामुळें चूडाला त्वरेने गुप्त झाली, तेंव्हा त्याचाच विचार करीत विस्मित झालेला राजा चित्रासारखा स्तब्ध राहिला. विधीच्या याच विचित्र विलासाचें त्यानें चिंतन केलें. काय चमत्कार आहे ? कुंभाच्या मिषाने मला नित्य उदित आत्म्याचा उपदेश फार दिवसानीं लाधला आहे. नारदपुत्र कुंभ कोठें व मी शिखिध्वज कोठें ? पण केवळ भाग्योदयवशात् मला हा ज्ञानलाभ झाला आहे. अहाहा, देवपुत्रानें मला सर्व युक्तियुक्त तत्त्व सांगितलें आहे. फार दिवस मोहनिद्रेनें आकुल होऊन राहिलेल्या मला त्यानें चागलें जागें केलें. क्रियासमूहरूपकुकर्दमात मी निमग्न होतों. हें कार्य आहे व हें अकार्य आहे, या मिथ्याभ्रमचक्रात मी पडलों होतों; पण आताचा हा निजमार्ग शीतल, शुद्ध व शात आहे. माझें निर्वासन मन मला शीतल करीत आहे. तें विषयभोगाकरिता उदय पावत नाहीं. मी आतां शात होत आहें. मी केवळ सुख भोगीत आहें. मी तृणाग्राचीही इच्छा करीत नाहीं. मी जसा आहें, तसाच राहतों.—असा विचार करणारा वासनाशून्य राजा लाकडाच्या किंवा दगडाच्या मूर्तीप्रमाणें निश्चल राहिला. त्याच निःसंकल्प, निराश्रय मौनात निश्चल प्रतिष्ठेस प्राप्त होऊन तो पर्वतशिखराप्रमाणें राहिला, त्यावेळीं त्याचें सर्व भय शात झालें होतें, मति शात व सम झाली होती, त्याला तें आपलें निजस्वरूप फार दिवसानीं प्राप्त झाले होतें, त्यामुळें तो महात्मा योगनिद्रेचा अनुभव घेत राहिला १०२.

**सर्ग १०३**—चूडालेचें तीन दिवसानीं पुनरागमन व यत्नानें; राजाला सावधान करणें.

श्रीवसिष्ठ--रामा, याप्रमाणें निर्विकल्प समाधानामुळें राजा शिखिध्वज त्याच अरण्यांत काष्ठ किंवा भिंत यांप्रमाणें निश्चल राहिला. आतां चूडालेचें पुढचें वर्तमान ऐक. वर सांगितल्याप्रमाणें कुंभवेषानें आपल्या शिखिध्वज भर्त्याला उपदेश करून ती साध्वी तेथून आकाशमार्गानें निघाली, मार्गांत ( आकाशातच ) तिनें आपला मायिक वेष सोडून सुंदर स्त्रीवेष धारण केला. ती आकाशमार्गानेंच आपल्या नगरास प्राप्त झाली. एका क्षणात अंतःपुरात गेली असता ती स्थूल आकारानें तेथील सर्व लोकास दृश्य झाली. राजाचें काम करूं लागली. तीन दिवसांनीं ती पुनः आकाशात आली. आकाशातच योगसामर्थ्यानें कुंभवेष घेऊन ती शिखिध्वज राजाच्या वनाकडे निघाली. थोड्याच निमिषात वनभूमींत उतरून तिनें निर्विकल्प समाधिस्थ राजाला चित्राप्रमाणें पाहिलें. आणि मोठया हर्षानें ' अहाहा, मोठी संतोषाची गोष्ट आहे कीं हा आत्म्यामध्यें विश्रांति घेत आहे. तो आता सम, स्वस्थ व शांत होऊन राहिला आहे. ' असें वारंवार म्हटलें. नंतर कांहीं वेळ त्याची ती निश्चल स्थिति प्रत्यक्ष पाहून ती आपल्याशींच पुनः म्हणाली-" आता मी याला या परम पदापासून सावध करतें. प्रारब्ध कर्म अवशिष्ट असतांना त्याला असा देहत्याग करणें उचित नव्हे. याला कांहीं काल राज्यांतील किंवा अरण्यातील भोग भोगीत राहू दे. नंतर आम्ही दोघेंही एकाच वेळीं देहत्याग करून कैवल्यास प्राप्त होऊं. यानें आताच देहत्याग केल्यास मी केलेला उपदेश सप्तमभूमिकेपर्यंत परिपक्व होणार नाहीं, व त्यामुळें याला जीवन्मुक्तीचे सुख मिळणार नाहीं. यास्तव त्या दृष्ट सुखाचा अनुभव घेण्याकरिता मला याला उठविलें पाहिजे. "

असा विचार करून चूडालेनें आपल्या प्रभूच्या पुढें वनेचरांनाही भयभीत करणारा मोठा सिंहनाद वारंवार केला. पण तो पर्वतावरील शिलेप्रमाणें चंचल झाला नाहीं. तेव्हा वारंवार केलेल्या घोर नादानेंही तो देहभानावर येत नाहीं, असें पाहून तिनें त्याला हातानें चाळविलें. यामुळें तो भूमीवर पडला, पण जागा झाला नाहीं. तेव्हां कुंभरूपिणी चूडाला मनांत म्हणते-अहाहा, हा साधु, भगवान्, आत्मस्वरूपीं पूर्ण परिणत झाला आहे. तेव्हा आता याला मी कोणत्या युक्तीनें जागें करूं ?

अथवा या महात्म्याला जागें करून तरी मला काय करावयाचें आहे ? हा विदेहकैवल्यास प्राप्त होऊनच सुखानें राहो. मीही या स्त्रीशरीरास सोडून पुनः जन्मपरंपरेंत न पडण्याकरिता याच्या सहवर्तमानच गमन करतें. कारण आता येथें जिवंत राहण्यांत कोणतें अधिक सुख आहे ?

इतकें बोलून ती साध्वी चूडाळा देहत्याग करण्यास उद्यत झाली. पण इतक्यात तिच्या मनात काहीं विकल्प येऊन ती आपल्याशींच बोलली-" पण आधीं मला या राजाच्या देहास चागलें पाहूं दे. म्हणजे याच्या हृदयात बोधाचें बीज जें सत्त्व तें आहे कीं नाहीं तें कळेल. तें जर असलें तर हा भगवान्, मूळात लीन असलेल्या व कालातरीं वृक्षावर प्रकट होणाऱ्या पुष्पाप्रमाणें, काहीं कालानें देहभानावर येईल. त्यानंतर यदृच्छेनें विहार करणारा हा जीवन्मुक्तदशेचा अनुभव घेईल. पण त्याचें सत्त्व जर हृदयाकाशास सोडून गेलें असेल तर मीही देहत्याग करून मुक्त होईन." असा विचार करून चूडालेनें पतीच्या शरीराला हात लावून त्यात सत्त्वगुण ऊष्मा आहे कीं नाहीं तें पाहिले. तेव्हा तो जिवंत आहे, अशी शंका येऊन 'याच्या हृदयांत देहभानावर येण्याचें कारण सत्त्व तर आहे,' असें ती म्हणाली,

**श्रीराम**-- भगवन्, काष्ठाप्रमाणें अत्यंत शान्त व निश्चल होऊन राहिलेल्या ध्यानशाली पुरुषाच्या चित्तात बीजातील पुष्पफलाप्रमाणें सत्त्व अवशिष्ट आहे, हें कसें कळतें ?

**श्रीवसिष्ठ**—फुगणें, कुजणें, फुटणें, सडणें इत्यादि विकार देहास न होणें हेंच देहात सत्त्व आहे, हें ओळखण्याचें चिह्न आहे चित्तस्पंदरहित, द्वित्वैकत्वशून्य, सम व अचल स्थित असलेल्या पुरुषाचें शरीर म्लान होत नाहीं, हृष्ट होत नाहीं, अस्त पावत नाहीं, उदय पावत नाहीं. तर तें सदा सम राहतें. द्वित्व व एकत्व इत्यादि कल्पनांनी युक्त असलेल्या ज्या पुरुषाचें मन चंचल होतें त्याचा देह स्थिर रहात नाहीं. त्याची स्थिति क्षणोक्षणीं बदलते. कारण चित्तस्पंद हेंच जगत्स्थितीस कारण होणाऱ्या [ जन्म, अस्तित्व, वृद्धि, परिणाम इत्यादि ) भावविकाराचें कारण आहे. एवढ्यासाठींच पुनर्जन्माचें बीज असल्यास या देहांतून दुसऱ्या देहांत जाणाऱ्या चित्ताचें वारंवार मोठ्या यत्नानें नियमन करूं

लागलें तरी तें करतां येत नाहीं. त्याचे हर्ष, कोप व संमोह काहीं केल्या पुरुषाच्या अधीन होत नाहींत. त्यावरूनच त्याला पुनर्जन्म अवश्य प्राप्त होणार, असें निश्चयानें म्हणता येतें. पण चित्तातील हर्षादि विकार शांत झाले म्हणजे देहांतील विकारही निवृत्त होतात. सम जलामध्यें तरंगादिक जसे उठत नाहींत, त्याप्रमाणें मन वासनारहित झालें म्हणजे देहांत राग—द्वेषादि व तारुण्य वृद्धत्वादि दोष दिसत नाहींत. शरीर शांत झाल्यावाचून सत्त्व शांत होत नाहीं, असा नियम आहे. यास्तव जीवन्मुक्त प्रारब्धक्षय होईतों सत्त्वाचा अनुभव घेत असतात. ज्या देहात सत्त्वही नसते व चित्तही नसतें तो देह मरणानें लीन होतो. शिखिध्वजाचा हा देह निश्चित्त पण ऊष्मा या सत्त्व गुणानें युक्त होता. तो सत्त्वांशानें ही युक्त होता म्हणूनच म्लान झाला नाहीं किंवा त्याच्यामध्यें दुसरे काहीं विकार झाले नाहींत. असो; आपल्या पतीचा देह सत्त्वयुक्त आहे, असें पाहून त्या श्रेष्ठ अंगनेनें स्वदेहाचा त्याग केला नाहीं. तर तिनें आपल्याशींच असा विचार केला.—मी आता याच्या शरीरातील सर्वग व शुद्ध चित्तत्त्वांत प्रवेश करून व तेथेंच स्थित होऊन पुढें देहभानावर येणाऱ्या या कांताला आजच जागा करितें. मी जरी याला आताच जागें न केलें तरी हा पुष्कळ दिवसानीं पुढें जागा होईल. पण तोंवर मी एकटीनेंच कसें रहावें? आताच याला उठवितें.

असा विचार करून चूडालेनें इंद्रियांचा जणुं काय पिंजराच अशा देहास सोडून आद्यन्तरहित चित्तत्वात स्थिति केली. तेथें आपल्या सत्त्व-युक्त प्रभूच्या चेतनेस चलन देऊन ती, एकादी पक्षीण जशी घरट्यात शिरते, त्याप्रमाणें स्वशरीरांत परत शिरली. कुंभाकार होऊन पुष्पमय स्थलावर बसली. आणि मंजुल स्वरानें सामगान करूं लागली. तिचा सामध्वनि ऐकून भूपतीच्या शरीरांतील सत्त्वगुणशालिनी चित् सावधान झाली. राजानें लागलेच आपले नेत्र उघडले आणि श्रेष्ठ शरीरानें युक्त व सामगायनात तत्पर असलेल्या कुंभाला पुढें पाहिलें. त्याबरोबर 'अहाहा, आम्ही मोठें धन्य आहों, कारण हा मुनि आपण होऊन पुनः येथें आला आहे.' असें म्हणतच त्या उत्तम शिखिध्वजानें त्याला पुष्प दिलें. आणि म्हटलें, "भगवन्, आमच्या मोठ्या भाग्यामुळेंच तुमच्या

चित्तांत आम्हाला पुनर्दर्शन देण्याचें स्मरण झालें. अथवा कोणते महा उदार परानुग्रहास नित्य सज्ज नसतात? आम्हाला पवित्र करणें हेंच आगमनाचें कारण असावें. पण त नसल्यास दुसरें कोणतें तें सांग.

**कुंभ**—राजन्, जेव्हांपासून मीं येथून गेलों तेव्हांपासून माझें चित्त येथें तुजपाशींच राहिलें आहे, त्यामुळें मीही रम्य स्वर्गांत न राहतां आतां तुजजवळ आलों आहें. हे सज्जना, अनेक रम्य वस्तूंतील जी एकादीच वस्तु चित्ताला अतिशय अभीष्ट वाटत असते तीच प्राणी मोठ्या उद्योगानें मिळवतो. तुझ्यासारखा बंधु, आप्त सुहृत्, मित्र, सखा व विश्वासभूमि, शिष्य मला या जगांत दुसरा कोणी आढळला नाहीं.

**शिखिध्वज**—खरोखर, ज्या अर्थी तूं असंग असूनही आमच्या संगतीची इच्छा करतोस, त्या अर्थी आमचे पुण्यवृक्ष फळास आले, असें मी समजतों. प्रभो, आपणाला स्वर्ग जर आवडत नसेल तर हें वन, हे येथले वृक्ष व हा मी आपल सादर भृत्य या सामग्रीनें संपन्न असलेल्या ह्या स्थानीं निवास करा. कारण तुम्हीं दिलेल्या युक्तीनें मी जसा विश्रांत झालों आहें, तशी विश्रांति स्वर्गांत तरी असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. यास्तव त्याच योगयुक्तीनें येथें आनंदाचा उपभोग घेत रहा.

**कुंभ**—पण राजा, मी तुला विचारतों तें आधीं सांग, तूं महानंद परमपदीं विश्रांति पावला आहेस काय? हें भेदमय दु.ख सोडलें आहेसना? विचार करीपर्यंतच रम्य वाटणाऱ्या संकल्पास सोडून तुझी रति अगदीं निर्मूल झाली आहेना? तुझें मन ग्राह्याग्राह्यशून्य, शांत, व अनुद्विग्न झाल आहेना?

**शिखिध्वज**—होय, स्वामिन्, तुझ्या प्रसादानें दृश्याच्या पलीकडची गति मी पाहिली आहे, संसारसीमेच्या अंतास पोंचलो आहे. माझा प्राप्य वस्तूविषयींचा निश्चय झाला आहे. फार दिवसानीं मीं शांत व विश्रांत झालों आहें. सर्व प्राप्तव्य मला प्राप्त झालें आहे, मी सतत तृप्त होऊन राहिलों आहें, आतां कोणत्याही प्रकारचा उपदेश आमच्या उपयोगाचा नाहीं, मी सर्वत्र अतितृप्त झालों आहें, मी संतापशून्य होऊन राहिलों आहें, सर्व अज्ञात वस्तुजात मला ज्ञात झालें आहे. सर्व त्याज्याचा त्याग केला आहे. माझ्या वासनाशून्य चित्तानें आत्म्याचा आश्रय केला आहे.

आणि त्यामुळें मी आतां संसारशून्य, मोह–भयरहित, रागरहित सम, सर्वात्मक, संकल्पशून्य, व सौम्य होऊन राहिलों आहें. मी आता आकाशासारखा निर्लेप आहें १०३.

**सर्ग १०४**—कुंभाची राजाशीं विलास करण्याची इच्छा, स्वर्गाच्या मिषानें नगरगमन, व खिन्न होऊन पुनः परत येणें.

**श्रीवसिष्ठ**—याप्रमाणें विचित्र गोष्टी बोलत ते दोघे ज्ञानी तेथें सहा घटिका बसले. नंतर तेथून उठून ते एका पर्वताच्या शिखरावर गेले व तेथाल सुदर सरोवरावर, रम्य उपवन व दाट अरण्य यांतून यथेच्छ विहार करूं लागले. याप्रमाणें तेथें त्याचे आठ दिवस गेले. नतर ' आपण आता दुसऱ्या रम्य पर्वतावरील वनात जाऊं या. ' असें कुंभ म्हणाला. राजानें यावर ' बरें आहे ' असे म्हणून आपलें अनुमोदन दिलें. तेव्हा ते दुसऱ्या पर्वतावर गेले. तेथील रम्य स्थलाचा अनुभव घेऊन तशाच दुसऱ्याही—अनेक वृक्ष, वनें, सरोवरें, नद्या, पर्वत, तीर्थें, आश्रम, ग्राम, नगरें अरण्यातील गोपालाचे घोष–इत्यादिकास पहात, ठिकाठिकाणीं देव, पितर इत्यादिकाचें उचित पूजन करीत, संताचें दर्शन घेत, नाना स्थानातून संचार करूं लागले. त्या दोघाचा समान स्नेह, समान सत्त्व व तुल्य अवस्था यास पाहून त्यास व इतरासही मोठें कौतुक वाटत असे. वस्तुतः तें दापत्य असूनही लोकदृष्ट्या उत्तम सुहृदासारखें शोभत होतें. त्याच्या मनाला हे गृह आहे, व हें नव्हे, हा व असेच दुसरेही विकल्प शिवलेही नाहींत. ते दोघे मित्र केव्हां धुळीनें शरीरें मलिन करून, कधीं अगास चंदन लावून, कधीं भस्मानें शुभ्र होऊन, एकादे वेळीं विचित्र वस्त्रें नेसून क्वचित् पानानीं देहाचे गुप्त भाग झाकून व कधीं कधीं पुष्पानीं मंडित होऊन विहार करीत असत. समचित्तता व सत्त्वाची उत्कृष्टता याच्या योगानें थोड्या कालांतच राजा कुंभाप्रमाणें शात व परिपक्क झाला.

एकदा ( मित्रभावानें रहावयास लावणारें कर्म संपून दंपतीभावानें रहावयास लावणारें कर्म उदय पावलें असतां ) देवपुत्राप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या शिखिध्वजाला पाहून चूडाला मनात म्हणाली, " हा माझा अदीनस्वभाव पति आहे. या रम्य वनभूमि आहेत. ही अनायास स्थिति असून रागानें हिला दूषित केलेलें नाहीं, पण अनायासानें प्राप्त होणाऱ्या

भोगस्थितीस मान न देता केवळ निवृत्तिधर्मामध्येंच आग्रह धरून बसणें जीवन्मुक्ताच्या मतीला शोभत नाहीं. कारण आस्था सोडून प्राप्त स्थितींत समाधानानें राहणें, ही आहे जीवन्मुक्त दशा. तेव्हां तिच्या उलट केवळ भोगनिवृत्त होण्यांत काय पुरुषार्थ आहे ? हा माझा उदारात्मा पति आधिरहित आहे. आम्हां उभयतांचेंही नूतन वय आहे. पुष्पयुक्त वेलींच्या जाळ्या हींच येथें रम्य गृहें आहेत. मग अशी सर्व सामग्री असतांना जी भर्त्याची इच्छा करीत नाहीं ती अजीवन्मुक्ता असली तर भर्त्याच्या उपभोगाचा विघात करणें या पापानें दूषित होते व जीवन्मुक्ता असली तर लोकसंग्रहाचा भंग केल्यामुळें लोकनिंदेस पात्र होते. यास्तव भर्ता स्वाधीन असताना वनपुष्पलतागृहांत जी सुखी स्त्री रममाण होत नाहीं तिला धिक्कार असो. रम्य व विवाहित पतीस एकांतात प्राप्त होऊन जी साध्वी स्त्री रममाण होत नाहीं त्या दुःस्त्रीला धिक्कार असो. अनायासानें प्राप्त विषयालाही सोडणें म्हणजे एका प्रकारें द्वैतबुद्धिच धारण करणें नव्हे काय ? जीवन्मुक्ताला सर्वथा त्याग करून काय मिळवावयाचें आहे ? यास्तव मी आता या वनांत अशी कांहीं रचना करतें, कीं तिला पाहून हा माझा भर्ता माझ्या ठायीं आसक्त होईल ?

असा विचार करून कुंभवेषधरा चूडाला पतीस म्हणाली, " महाराज, आज हा चैत्रमासाचा प्रथम दिवस उगवला आहे. इंद्राच्या सभेंत आज मोठा समारंभ व्हावयाचा आहे, यास्तव त्यावेळीं मला तेथें पित्यापाशीं असलें पाहिजे; कारण सुज्ञानीं नियतीचा त्याग करूं नये, अशी नीति आहे. एवढ्याकरिता मी आतां जातों. तूं याच वनभूमींत माझी वाट पहात रहा. पुष्पाची क्रीडा करीत राहिलास म्हणजे तुला उद्वेग वाटणार नाहीं. आज सायंकाळींच मी येथें पुनः परत येईन; कारण मला स्वर्गाहून तुझी संगति अति प्रिय वाटते."

असें बोलून व त्या आपल्या मित्राला आपल्यासारखीच सुंदर कल्पवृक्षाची पुष्पमंजरी देऊन, ' पण तूं सत्वर परत ये ' असें राजा म्हणत आहे तोंच ती वेषधारी स्त्री आकाशात उडून गेली. शिखिध्वज ती अगदीं दिसेनाशी होई तों वर टक लावून बघत होता. कारण प्रेम हें मोठें कठीण आहे. त्याचा सहसा त्याग करवत नाहीं. असो; राजाच्या

दृष्टीच्या पलीकडे गेल्यावर तिनें कुंभशरीर सोडलें. आपलें रम्य रूप धारण केलें. नंतर ती एका क्षणांतच आकाशमार्गानें स्वनगरात येऊन अंतःपुरांत शिरली. स्वस्थानीं जाताच ती सर्वांना दिसली. तेथील सर्व राजकार्यें करून सायंकाळीं ती पुनः कुंभवेषानें पतीकडे आली व वृक्षावरून जसें फळ पडतें त्याप्रमाणें आकाशांतून अकस्मात् राजापुढें पडली. पण त्यावेळीं जिचें मन अगदीं अखिन्न आहे, अशा तिनें आपलें मुख थोडेंसें खिन्न व निस्तेज केलें होतें. त्याकडे पाहून राजाही खिन्न होऊन एकाएकीं उठला, व आदरानें म्हणाला, देवपुत्रा, तुला नमस्कार असो. असा खिन्नसा का दिसतोस ? बा कुंभा, तूं क्षोभ सोड व या आसनावर बैस. पद्में जशीं जलाची आर्द्रता घेत नाहींत त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष हर्षविषादजन्य स्थितीचा आश्रय करीत नाहींत.

**श्रीवासिष्ठ**—राजानें असें म्हटलें असता आसनावर बसणारा कुंभ खिन्न वाणीनें म्हणाला, " देह असेपर्यंत जे निरनिराळ्या अवस्थामध्यें कर्मेंद्रियाच्या योगानें समचित्त होऊन रहात नाहींत ते शठ तत्त्ववेत्ते नव्हेत राजन्, अतत्त्वज्ञ मूढच मूर्खपणामुळें इंद्रियाचा हठानें निग्रह करून अवश्य भोग्य दशापासून पळून जाण्याची खटपट करीत असतात. पण बाबारे, जसें तिळ असेपर्यंत तेल असतेंच त्याप्रमाणे देह असेपर्यंत दशा असतातच. जो देहदशेचें अनुकरण करीत नाहीं तो खड्गानें आकाशाचा छेद करण्याचाच प्रयत्न करतो. राजन्, देहदशापासून होणाऱ्या दुःखाचा त्याग करणें फार उत्तम आहे. व चित्ताच्या समस्थितीनेंच तो सिद्ध होणें शक्य आहे; कर्मेंद्रियाच्या निग्रहानें नव्हे. यास्तव भूपाला, तुज्ञानें देह असेपर्यंत कर्मेंद्रियाच्या द्वारा सदाचरणानें प्राप्त दशामध्यें रहावें, आणि मनःप्रभृति ज्ञानाना मात्र समस्थितींत ठेवावें. त्याना विषम होऊं देऊं नये. ब्रह्मदेवादि सर्व जीवन्मुक्त कर्मेंद्रियांच्या योगानें अनिषिद्ध आचरणामध्यें सदा तत्पर असतात. ते प्राप्त देहावस्थाचें उल्लंघन करीत नाहींत. कारण हा नियतीचा निश्चय आहे. शिवाय त्यांनींही जर प्रारब्धानुरूप शुद्ध आचरण केलें नाहीं तर ही सृष्टि चालणार कशी ? तात्पर्य कोणी अज्ञ असो कीं तत्त्वज्ञ असो, प्रत्येक देहधारी जीवाला प्रारब्धकर्मरूप नियतीचें उल्लंघन करता येत नाहीं. म्हणूनच तत्त्वज्ञ पुरुष

बुद्ध्यादिकास सम ठेवून हातापायाच्या चलनरूप क्रियेनें देह असेपर्यंत नियतीचें अखंडित अनुवर्तन करितात आणि अज्ञ सर्व अंतर्बाहिरिंद्रियास क्षुब्ध करून सुख-दुःखदशांनीं पराहत होत्साते लक्षावधि देह घेऊन विखंडित नियतीचें अनुवर्तन करितात. सारांश, या प्राण्यानें अशारीतीनें सुखामध्यें रहावें व अशा रीतीनें दुःखामध्यें रहावें, अशाप्रकारचें प्रत्येक जीवानें आपापल्या कर्माप्रमाणें जें जें ललाटाक्षर संपादन केलें असेल त्या त्याप्रमाणें त्याला भोगावें लागतें. मग तो अज्ञ असो कीं सुज्ञ असो. अशा रीतीनें हा प्रारब्धविलास दुर्लंघ्य आहे १०४.

**सर्ग १०५**—कुंभानें दूर्वासशापानें रात्रीं प्राप्त होणारें आपलें स्त्रीत्व राजाला सांगितलें. आणि ते दोघे तेथें समाधानानें व प्रेमानें राहिले.

**शिखिध्वज**—महाभागा, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण तुज देवालाही अशा उद्वेगाचें कारण काय झालें, तें मला सांग.

**कुंभ**—राजन्, आज स्वर्गांत काय झालें तें सर्व मी तुला सांगतों, ऐक. कारण आपलें दुःख मित्राला सांगितलें असतां थोडेसें हलकें होतें. मित्रा, आज मी तुला पुष्पमंजरी देऊन आकाशमार्गानें स्वर्गास गेलों. इंद्राच्या सभेंत जाऊन पित्यापाशीं बसलों. सभेंतील सर्व कार्य झालें व सभाविसर्जनानंतर पित्याची आज्ञा घेऊन मी लागलाच इकडे यावयास निघालों. वायुमार्गामध्यें मी सूर्याच्या घोड्याबरोबर चाललों होतों; पण पुढें भगवान् सूर्य एका मार्गानें गेला व मी खालीं अधर दिशेंत उतरूं लागलों. कांहीं वेळानें मी मेघांनीं आच्छादित केलेल्या आकाशभागापर्यंत येऊन पोंचलों. इतक्यांत पाण्यांनीं भरलेल्या मेघाच्या खिंडारांतून त्वरेनें येत असलेल्या दूर्वासमुनीला मीं पाहिलें. मेघरूपी वस्त्रानें आच्छादित झालेला, विद्युद्वलयांनीं भूषित झालेला व जलबिंदूंनीं ज्याचें अंग व त्यावरील चंदन भिजविलें आहे असा तो मुनि मला आपल्या प्राणनाथाकडे आपण होऊन जाणाऱ्या अभिसारिकेसारखा भासला. तो आपल्या प्रिय तपोलक्ष्मीकडे वेगानें जात असावा, असें माझ्या मनांत आलें व मी समोर आलेल्या त्या कोपी मुनीला नमस्कार करून आकाशांतून जात असतांनाच म्हटलें, " मुने, तूं यावेळीं नीलाभ्ररूप वस्त्राच्या योगानें अभिसारिकेसारखा दिसत आहेस "

हे मानदा, हें माझें भाषण ऐकताच त्या निर्दयानें "मूर्खा, या दुर्वचनामुळें, तूं रात्रीं स्तनकेशवती व हावभावविलासिनी स्त्री होशील" असा शाप दिला. त्या जराजर्जर विप्राच्या तोंडून निघालेलें हें अशुभ वाक्य ऐकून मी जों मनांत कांहीं विचार करीत आहें तों तो मुनि गुप्त झाला. त्यामुळें हे साधो. मी असा उद्विग्न झालों आहें. राजन्, घडलेलें हें वृत्त मी तुला सांगितलें आहे. आतां मी काय करूं? मी रात्रीं स्त्री होणार हें तर ठरलेंच आहे. पण मी स्तनवती स्त्री होऊन रात्री कशा घालवूं? आपल्या पित्याला काय सांगूं हर हर! या संसारांत भवितव्यतेची गति कशी विषम आहे, ती पहा!! दैववशात् मी आज तरुणाची उपभोग्य स्त्री होणार!!! त्यामुळें स्वर्गांतील कामाकुल देवकुमारांचा माझ्यासाठीं (माझा अपहार करून) मोठा कलह होणार व मला मोठें दुःख भोगावें लागणार! आता रात्रीं स्त्री होणारा मी लज्जावश होऊन गुरु, देव व ब्राह्मण याच्यापुढें उभा तरी कसा राहूं?

श्रीवसिष्ठ—राघवा, असें बोलून चूडाला एक क्षणभर मुनिस्थितींत चिंतन करीत स्तब्ध बसली व लागलीच कुंभरूपी ती धैर्य धरून म्हणाली, "अरे, पण मी एकाद्या अज्ञाप्रमाणें शोक का करीत आहें? दूर्वासाच्या शापामुळें माझा देह जरी बदलला तरी त्यामुळें माझी (आत्म्याची) कोणती हानि होणार?" तें ऐकून शिखिध्वजही कुंभाला म्हणाला, "देवपुत्रा, उगीच शोक करीत बसण्यात काय अर्थ आहे? देहाला जें व्हावयाचें असेल तें होवो. त्यामुळें आत्मा लिप्त होणें शक्य नाहीं. जीं कांहीं सुखें अथवा दुःखें होत असतात तीं सर्व देहाला होतात. आत्म्याला कांहीं होत नाहीं. पण असें असतांना तूं जर त्याकरिता खिन्न होऊं लागलास तर इतराची काय वाट? खेदप्रसंगीं लोकाचें अनुवर्तन करण्यासाठीं खेदयुक्त भाषण करावें, असें तुझें म्हणणें आहे, व त्याप्रमाणें एवढा वेळ तूं खेद केला आहेस. आतां त्याचा सर्वथा त्याग करून व समतेस प्राप्त होऊन अखिन्न होऊन रहा."

राघवा, अशा समाधानपूर्ण वाक्यांनीं त्यांनीं परस्परांचें आश्वासन केलें. व ते दोघेही सुहृत् प्रेमानें व आनंदानें तेथें राहिले. इतक्यांत कुंभास स्त्रीत्व देण्यासाठींच जणुं काय जगद्दीप सूर्य, तेल संपताच दिवा

जसा विझतो त्याप्रमाणें, अस्त पावला. लोकांच्या सर्व व्यवहारासह कमळें संकुचित झालीं. अंधकारामुळें मार्ग चांगलेसे दिसेनातसे झाले. त्यामुळ मार्गाप्रमाणेंच पांथ व त्याच्या स्त्रिया याचीं हृदयेंही वियोगजन्य दुःखान्धकारानें व्याप्त झालीं. कोळी व व्याध यांच्याप्रमाणें मासे व पक्षी यांस एकत्र करणारें भुवन साम्यतेस प्राप्त झालें. नक्षत्रांनीं भरलेलें अंतरिक्ष जणुं काय हसतसें राहिलें. तेव्हां ते दोघे सुहृद् तेथून उठले. जवळच्याच सरोवरावर गेले. संध्योपासना करते झाले, व बराच वेळ जप करून झाल्यावर ते दोघेही महा स्नेही जवळच्याच एका वृक्षाच्या गुल्मात जाऊन बसले. इतक्यात स्त्रीशरीर धारण करणारा कुंभ जवळच बसलेल्या शिखिध्वजास विह्वल वाणीनें म्हणाला. “ राजन्, मी जणुं काय पडत आहें; माझ्या अंगास कंप सुटला आहे; माझ्या गात्रांचें जणुं काय पाणी होत आहे. राजन्, माझ्या शरीरात काहीं बदल होत आहेसें वाटतें, होय; खरेंच हे पहा माझे केंस लांब होत आहेत. भूपाळा, मला आता तुझ्या पुढें बसण्याचीही लाज वाटत आहे. कारण माझ्या शरीरातील प्रत्येक पुरुष–अवयव जाऊन स्त्री–अवयव उत्पन्न होत आहे. केवल शरीरच नव्हे तर वस्त्रें, भूषणें व इतर उत्तम स्त्रीसामग्रीही मला अनायासानें प्राप्त होत आहे, हरहर, मोठी कष्टाची गोष्ट आहे. मला फार खेद वाटत आहे, मी सर्वथा स्त्री झालों आहें. हा धिक्, आतां मी काय करूं ! माझ्या मनात सर्व स्त्रीभावना उद्भवल्या आहेत. ”

रामा, इतकें बोलून कुंभ मुकाट्यानें बसला. त्याच्या शरीरांत झालेला तो विलक्षण भेद प्रत्यक्ष पाहून राजाही खिन्न व विस्मित झाला. पण काहीं वेळानें तो म्हणाला, अरे अरे, मोठें दुःख आहे. हा महा सत्त्वशील देवपुत्र सुंदर स्त्री झाला आहे ! बरें असो, हे साधो, तूं महा ज्ञानी आहेस, तुला नियतीची गति माहीत आहे. अवश्य होणाऱ्या या गोष्टींविषयीं खिन्न होणें बरें नव्हे. ज्ञान्याच्याही केवल देहास नानाप्रकारच्या दशा प्राप्त होतात. पण त्याच्या चित्तात त्या उतरत नाहींत. अज्ञाची गोष्ट मात्र याहून अगदीं पृथक् आहे, कारण त्यांचें चित्त देहरूप होत असतें. ”

राजाचें हें सुंदर भाषण ऐकून कुंभ म्हणाला, बरें आहे. मीही रात्रीं प्राप्त होणाऱ्या स्त्रीत्वाचा अनुभव घेऊन तदनुरूप व्यवहार करतों.

मी खिन्न होत नाहीं. कारण नियतीचें उल्लंघन कोण करणार ? असो, दाशरथे, असा निर्णय करून त्या दोघांनीं आपला खेद कमी केला. नंतर त्यांनीं एका शय्येवरच निर्विकार चित्तानें पडून ती रात्र घालविली. दुसऱ्या दिवशीं प्रभात होतांच तें तरुण स्त्रीरूप सोडून कुंभ पहिल्यासारखा झाला. याप्रमाणें ती सिद्धिमती चूडाला दिवसा कुंभ व रात्रीं स्त्री होऊन पतीपाशीं राहू लागली. रात्रीं ती तेथें कुमारीधर्मानें रहात असे. ती योगसामर्थ्यानें संपन्न असलेली ज्ञानी नारी प्रिय व सुहृद् अशा शिखिध्वजासह कैलास, मंदर इत्यादि पर्वताच्या शिखरादिकावरून यथेच्छ विहार करीत राहिली १०५.

सर्ग १०६—महेंद्र पर्वतावर त्याचा अग्नीच्या समक्ष विवाह व सुवर्णगुहेंतील पुष्पशय्येवर समागम.

**श्रीवसिष्ठ**—याप्रमाणें बरेच दिवस गेल्यावर कुंभरूपिणी चूडाला भर्त्यास असें म्हणाली, “ कमलनयना राजा, माझें हें भाषण लक्ष लावून ऐक मी तर प्रतिरात्रीं स्त्री होऊन राहतेंच. यास्तव मी आता आपला स्त्रीधर्म पूर्ण करण्याची इच्छा करतें. मी विवाहविधीनें कोणातरी योग्य पतीला आत्मसमर्पण करतें. पण या त्रिभुवनात मला तुझ्यासारखा दुसरा कोणीही प्रिय नाहीं. यास्तव हे मानदा, रात्रीं माझें तूं पाणिग्रहण कर. बा साधो, प्रयत्न व इच्छा यावाचून प्राप्त झालेल्या या स्त्रीत्वाचें सुख मी तुज सुहृदाच्या बरोबर घेण्याची इच्छा करीत आहें. यास्तव तूं मला विघ्न करूं नकोस. जगाच्या उत्पत्तीपासून आजवर देव, ऋषि इत्यादिकामध्यें प्रवृत्त असलेलें शुभ सुख साध्यच आहे. इच्छा, अनिच्छा, व त्याचें फल याचा त्याग करून प्रकृत विवाहकार्य करणाऱ्या तुला कोणता दोष लागणार आहे ? कारण आम्ही इच्छावान् नाहीं व अनिच्छावान्ही नाहीं. तर यदृच्छाप्राप्त व्यवहार समदृष्टीनें करणार आहों.

**शिखिध्वज**—मित्रा, हें कार्य केल्यानें शुभ किंवा अशुभ कांहींच होणार नाहीं, हें मला माहीत आहे. यास्तव तुला जसें वाटेल तसें कर. मी समचित्तानें हें त्रिभुवनस्वरूप आहे, असेंच पहात आहें; यास्तव तुझी जशी इच्छा असेल तसें कर.

कुंभ—राजन्, असें जर असेल तर आजच शुभ लग्न आहे. आज श्रावणाची पूर्णिमा आहे. मी कालच सर्व गणित करून ठेवलें आहे. यास्तव आज रात्रीं चंद्रोदय झाला कीं महेंद्रपर्वताच्या मनोरम शृंगावर आमचा विवाह होईल. तें स्थान रत्नदीपाच्या प्रकाशानें संपन्न आहे. त्याच्या रत्नजडित गुहा हींच आमचीं सुंदर मंदिरें होतील. त्या पर्वताचें शृंग पुष्पफलयुक्त विविध वृक्षांनीं फारच सुशोभित झालेलें असतें. तेथील वाऱ्यानें हालणाऱ्या वनपुष्पलता नर्तकींप्रमाणे एकसारखें नृत्य करीत असतात. आज रात्रीं अंतरिक्षांतील तारा आपल्या पूर्णचंद्र भर्त्यासह आम्हां उभयतांनाही आपल्याप्रमाणेंच आनंदांत पाहोत. असो; तर हे भूपाला, आतां तूं ऊठ. विवाहाकरितां आपण सामग्री सिद्ध करूं या.

इतकें बोलून कुंभ राजाबरोबर अरण्यांत गेला. त्यांनीं पुष्पें व रत्नें गोळा केलीं. एका मुहूर्तांतच त्या सम व शुभ रत्नशिखरावर देवता, अग्नि, कामदेव इत्यादिकांच्या पूजनाकरितां पुष्पांच्या राशी गोळा केल्या. दुसऱ्या समप्रदेशीं हार, वस्त्रें, मणी इत्यादिकांचे ढीग घातले. याप्रमाणें एका सुवर्णगुहारूप मंदिरापाशीं विवाहसाहित्य जमवून ते दोघे महामित्र मंदाकिनींत स्नान करावयास गेले. तेथ हत्तीच्या कुंभाप्रमाणें ज्याचे खांदे आहेत अशा त्या महाराजास कुंभानें आदरानें मंगल स्नान घातलें. नंतर राजानेही पुढें स्त्रीरूप व भार्यारूप होणाऱ्या चूडालेलाही तसेंच उत्तम स्नान घातलें. तेथें स्नान केलेल्या त्या दोघांनींही देव, पितर व मुनि यांची पूजा केली. ते दोघेही महात्मे क्रियाफल व क्रियात्याग या दोन्ही विषयीं इच्छारहित होते. जगद्व्यवस्थेविषयीं ते नित्यज्ञानरसानें तृप्त होते. एकमेकांस इष्ट असलेलें अन्न सिद्धिबलानें निर्माण करून त्यांनीं भोजन केलें. कल्पवृक्षांनीं दिलेलीं शुभ्र रेशमी वस्त्रें नेसून व सुंदर फळें खाऊन ते विवाहस्थानीं परत आले इतकें होईतों विवाहविषयीं उत्सुक झालेल्या त्या दोघांचें जणु काय प्रिय करण्याकरितांच सूर्य अस्ताचलास गेला. तेव्हां त्या भव्य पुरुषांचा संध्यावंदनादि अनुष्ठानक्रम आटोपून रात्र पडली असतां त्यांच्या विवाहाचें कौतुक पाहण्यासाठीं जणुं काय तारा आकाशांत येऊन उभ्या राहिल्या. स्त्रीपुरुषांचें प्रिय करणारी व म्हणूनच त्यांची एक सखी अशी रात्र विकसित

पुष्पांच्या योगानें हसत व दवाचा वर्षाव करीत त्याच्या पाशीं आली. कुमानें आपल्या सिद्धीनें सर्व शिखरभर रत्नदीप लावले. राजाला विविध वस्त्रें, भूपणे, अंगराग इत्यादिकाच्या योगानें भूषित केलें. इतक्यात तो स्वतः स्त्रीरूपी झाला. सर्व प्रशस्त अवयव व उत्तम वस्त्रभूषणादि याच्या योगानें तो अप्रतिम शोभा धारण करता झाला. नतर मनात म्हणाला, "हा मी आता स्त्रीरूपी झालो आहे. मला आता हा आपला देह कामाला (कामरूप वराला) अर्पण करावयाचा आहे, यास्तव मी या कालास उचित असेंच कार्य करतों. 'बा कामा, ही मी सुंदर वधू झाले आहें, व तू माझा भर्ता मजपुढें उभा आहेस. यास्तव ये; माझें ग्रहण कर' असें मनात म्हणून चूडाला अग्रभागीं बसलेल्या व उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें दिसणाऱ्या भर्त्यापाशीं गेली व म्हणाली, "हे मानदा, मी मदनिका, या नावाची तुझी भार्या आहें मी तुझ्या चरणावर हा प्रणाम मोठ्या स्नेहानें करीत आहे."

रामा, असे बोलून जिचे केस वाऱ्यानें हालत आहेत अशी ती सुंदरी लज्जेने तोंड खालीं करून पतीच्या पायावर नम्र झाली व पुन. म्हणाली, "हे नाथ, या भूपणानीं मला भूपित कर. आणि क्रमाने अग्नि प्रदीप्त करून माझें पाणिग्रहण कर. हे राजन्, तूं अतिशय शोभत आहेस. मला मदनातुर करीत आहेस. रतीच्या विवाहप्रसंगीं दिसणाऱ्या मदनाहून तूं मला अधिक सुंदर दिसतोस. हे प्रभो, तुझ्या अंगावरील पुष्पें चंद्राच्या किरणासारखीं दिसत आहेत. तुझ्या उरावरील हा हार मेरूवरून पड-णाऱ्या मदाकिनीच्या प्रवाहाप्रमाणें दिसत आहे. हे नृपते, केसात गुफ-लेल्या फुलाच्या योगानें तू फारच शोभत आहेस. अगावरील रत्नसमूहानें तू या मेरूलाही तुच्छ करून सोडलें आहेस" राघवा, तिचे हे रम्य बोल ऐकून राजाला आनद झाला. त्यानेंही तिच्या सौंदर्याचे असेंच वर्णन केलें. त्यामुळें ज्याचा पूर्वीचा दांपत्यभाव गुप्त आहे. अशीं तीं दोघें फार सतुष्ट झालीं. महाराज शिखिध्वजानें काचनपाषाणरूपी पर्यकावर बसून मदनिका महाराणीला वस्त्रें, भूषणें इत्यादिकाच्या योगानें भूषित केलें. तेव्हा ती कामिनी रतीसारखी अथवा गौरीसारखी दिसली. भूषण-विधि आटोपल्यावर तो महाराज म्हणाला, "हे बालहरिणाक्षि, तूं आता

नूतन उदय पावलेल्या लक्ष्मीप्रमाणे शोभत आहेस. इंद्रासह शचीचें, हरीसह लक्ष्मीचें व शंकरासह गौरीचें जें मंगळ झालें तेंच मंगल मजसह तुला प्राप्त होवो. हे रमणि, तूं मला यावेळीं कामकल्पतरूच्या शाखेसारखी दिसत आहेस. तुला पाहताच मला अवर्णनीय आल्हाद होत आहे. यास्तव हे सुंदरि, आता ऊठ व विवाहवेदीवर चल.

श्रीवसिष्ठ—राघवा, कुंभानें सुंदर शास्त्रोक्त वेदी पूर्वींच तयार करून ठेविली होती. त्यात राजाने अग्नि प्रज्वलित केला. त्याच्या शुभ ज्वाला निघाल्या असता पूर्वाभिमुख बसलेल्या राजानें यथाविधि हवन करून प्रियेचें अग्नीसमक्ष पाणिग्रहण केलें. नंतर एकमेकाचा हात धरून अग्नीस प्रदक्षिणा घातल्या. त्यानी त्याप्रसंगी परस्परास प्रेमरूपी धन समर्पण केलें. अग्नींत लाजाचा होम केला. दोघानाही मोठा आनंद झाला. नंतर त्यानीं एकमेकाचा हात सोडला. आनंदानें प्रफुल्लित झालेलीं त्याची मुखें नुकत्याच उगवलेल्या चंद्राप्रमाणें दिसलीं. काहीं वेळानें तीं दोघेंही पूर्वींच तयार करून ठेवलेल्या नव्या पुष्पशय्येवर जाऊन बसलीं, तों चंद्र आकाशाच्या चतुर्थभागाचें आक्रमण करून जणुं काय त्याची क्रीडा पाहण्यासाठींच वर आला होता. काहींवेळ तेथें बसून तीं सुवर्णगुहेंत गेलीं. तेथेंही रम्य पुष्पशय्या तयार होती. मंदारादि दिव्य पुष्पाचा घमघमाट त्या सर्व गुहाभर पसरला होता. असो, त्या एकांतस्थळीं अनेक प्रिय भाषणे व रम्य विलास करण्यात त्याची ती रात्र क्षणार्धाप्रमाणे, त्याना न कळताच, निघून गेली १०६.

**सर्ग १०७**—नाना पर्वतादिकावरील विहार, मायिक इंद्राचे दर्शन, व अनासक्तीची परीक्षा पाहण्यासाठीं स्वर्गात येण्याविषयीं इंद्रानें केलेली प्रार्थना.

श्रीवसिष्ठ—दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्यसंज्ञक रंगानें भूवनोदरास रंगित केलें असता शिखिध्वजाची भार्या कुंभरूप झाली. रामा, याप्रमाणें तीं दोघें महेंद्राच्या दरीमध्यें स्वयं विवाह करून इष्ट दंपती झालीं. नंतर तीं प्रत्यहीं विचित्र वनपंक्तींमध्यें विलास करूं लागलीं. दिवसा अतिशय प्रिय मित्र व रात्रीं इष्ट दंपती अशा नात्यानें राहणारीं तीं प्रभा व दीप यांप्रमाणें एकमेकापासून क्षणभरही दूर झालीं नाहींत. सह्य, कैलास, महेंद्र

मलय, गंधमादन इत्यादि पर्वताच्या गुहा व नाना प्रकारचीं गहन वनें यातून त्यांनीं विचित्र विहार केला. चूडाला प्रिय राजा निजला म्हणजे प्रतितिसऱ्यादिवशीं आपल्या राजधानीस जाऊन व राजकार्यें करून परत येत असे. एक महिनाभर महेंद्रावर, पंधरा दिवस शुक्तिमानाच्या पृष्ठभागीं, इत्यादि प्रकारें तीं सर्व रम्य व नाना विचित्र वस्तूंनी चमत्कारिक दिसणाऱ्या प्रदेशीं राहून आपला काल समचित्तवृत्तींनीं घालवीत राहिलीं.

काहीं दिवस गेल्यावर देवपुत्ररूपिणी चूडालेनें असें चिंतन केलें.—मी आतां अनेक सुखरूप व रम्य भोगसाधनांची आशा दाखवून या राजाच्या अनासक्तीची परीक्षा पाहतें. कारण एकदा याची अनासक्ति दृढ झाली कीं पुनः हा कोणत्याही विषयामध्यें आसक्त होणार नाहीं. असा मनात विचार करून त्या योगिनीनें त्या वनात देव व अप्सरा यासह इंद्राला आणून दाखविलें. भगवान् देवेंद्र सपरिवार आला आहे असें पाहताच वनवासी शिखिध्वज त्याची यथाशास्त्र पूजा करता झाला आणि म्हणाला, ‘ भगवन्, देवराज, आपण स्वत इतक्या दूर येण्याची खटपट कशाला केली. आपला काय उद्देश आहे तो मला कृपा करून सांगा.

इंद्र—राजन्, तुझ्या उत्तम गुणांनीं अतिशय संतुष्ट होऊन तुला स्वर्गलोकीं नेण्यासाठीं हे आम्हीं आलो आहों. यास्तव ऊठ व आमच्याबरोबरच चल. कारण तुझे गुण ऐकून देवांगनासह दुसरेही सर्व तेथें तुझी वाट पहात राहिले आहेत. तुला आकाशगमनादि सिद्धि जरी प्राप्त झालेली नसली तरी विमान, दिव्य अश्व, पादुका, तोंडांत धरावयाची औषधाची गोळी, खड्ग, रस इत्यादिकांतील कोणत्याही एकाद्या उपायानें तुला आमच्या उत्कृष्ट लोकीं जाता येईल. तेथें येऊन तुझ्यासारख्या जीवन्मुक्ताला विविध भोग भोगणेंच उचित आहे साधुपुरुष अनायासानें प्राप्त झालेल्या लक्ष्मीचा तिरस्कार करीत नाहींत व अप्राप्त ऐश्वर्याची आकांक्षा धरीत नाहींत. भगवान् विष्णूच्या आगमानें जसें त्रिभुवन त्याप्रमाणें तुझ्या शुभ आगमनानें व निर्विघ्नपणें होणाऱ्या सुखकर विहारानें स्वर्ग पवित्र होऊ दे.

शिखिध्वज—हे देवनायका, स्वर्गासारख्या सर्व सुखावह प्रदेशास मी जाणतों. मला तर मी असतों तेथेंच स्वर्ग भासतो. हे प्रभो, तुमच्या स्वर्गांत सुख व समाधान यापेक्षां अधिक काय आहे? पण मला तर तें

येथेंही मिळत आहे. हे प्रभो, मी सर्वत्र संतुष्ट होतों, सर्वस्थळीं रममाण होतों. मनाला कशाची इच्छाच नसल्यामुळें मी सर्वत्र आनंदवान् आहें. मग एकाद्या नियतस्थानींच जाऊन राहण्यात काय अर्थ आहे? व एकाद्याच स्थानीं राहणाऱ्या मर्यादित सुखाला घेऊन मला काय करावयाचें आहे? यास्तव देवराया, मला क्षमा कर. तुझी ही आज्ञा माझ्याने मान्य करवत नाहीं.

इंद्र—पण बा साधो, ज्याना सर्व वेद्य कळलेलें असते व ज्याची बुद्धि परिपूर्ण असते त्याना भोगाचें सेवन व असेवन हीं दोन्हीं सारखींच असतात. तथापि प्रारब्धक्षयाकरिता सज्जनाऱ्या मार्गाचे अवलबन करणें (म्हणजे प्राप्त अनिषिद्ध भोग भोगणें) प्रशस्त होय.

श्रीवसिष्ठ—रामा, देवेंद्र असें पुष्कळ बोलला. पण त्यावर कांहीं एक उत्तर न देता राजा स्वस्थ बसला आहे, असें पाहून तो 'मग काय, तूं येथून निघून आमच्या बरोबर नाहीं येत?' असें विचारू लागला असता 'नाहीं, मी आजच नाहीं येत. पुढें येईन,' असें शिखिध्वज पुनः म्हणाला. ते ऐकून व 'हे कुंभा, तुझें अभीष्ट सिद्ध होवो, असें बोलून इंद्र तेथेंच गुप्त झाला. वायु शांत झाला असता समुद्रातील कल्लोळ जसे तत्काल क्षीण होतात त्याप्रमाणें देवेंद्राच्या मागोमाग देव व अप्सरा याचा संघही अदृश्य झाला १०७.

सर्ग १०८—कोधाची परीक्षा करण्याकरितां मदनिकेचा, एका विद्याधरीं मग रार्णीनें राजाला आपले स्वरूप दाखविलें

श्रीवसिष्ठ—त्या मायेला शांत करून चूडालेनें पुनः मनांत म्हटलें, "मोठीच भाग्याची गोष्ट आहे, कीं हा माझा नाथ भोगेच्छापरवश होत नाहीं. इंद्राच्या समागमकालींही हा शांत व निर्विकार होता. यानें व्यावहारिक अर्घ्यपाद्यादि उपचारानीं त्याची पूजाही केली, त्यावरून हा शिष्टाचाराचें उल्लंघन न करिता विषयतृष्णेला तुच्छ समजत आहे, हें उघड झालें. आता पुनः मी चित्तक्षोभ उत्पन्न करणाऱ्या रागद्वेषप्रधान प्रपंचान याची परीक्षा पाहते." असा निश्चय करून रात्रीं चंद्रोदय झाला असता वनांत तिनें आपलें स्त्रीरूप घेतलें. ती मदनिका झाली व राजा शिखिध्वज नदीच्या तीरावर जप करीत बसला असता व सुगंध, शीतल

आणि मंद वायु वहात असता मदयुक्त राणी संतानकलतागृहांत गेली. दाट पुष्पगुच्छांनीं आच्छादित झालेलें तें ( लतागृह ) वनदेवींच्या अंतःपुरासारखेंच होतें. त्यातील पुष्पांनीं अलंकृत झालेली ती संकल्पनिर्मित पुष्पशय्येवर संकल्पानें बनविलेल्या अतिशय तरुण विटास आलिंगन देऊन बसली. जप आटोपताच राजा नदी–तीरावरून उठला व प्रियेला शोधीत तेथें आला. तो मनोहर परपुरुषास घट्ट आलिंगन देऊन बसलेली ती तरुणी त्याला दिसली. यावेळीं तीं दोघेंही एकमेकाकडे पाहून हंसत होतीं. शय्येवर लोळल्यामुळें मदनिकेचे केंस विखुरले होते. तीं दोघेही मदनातुर व त्यामुळेंच निर्भय व निर्लज्ज झाली होतीं. पण तीं उभयताही अगदीं आनंदाच्या भरात आली आहेत असें पाहून राजा शांत चित्तानें तेथून परतला व म्हणाला, " बिचारीं हीं दोघें सुख भोगीत आहेत. त्यात आपण विघ्न करूं नये. त्याना आपापले मनोरथ पूर्ण करून घेऊ दे. "

इतकें बोलून क्रोधाला जिंकणारा राजा त्या लतागृहाच्या बाहेर जाऊन स्वस्थ मनानें बसला. त्यानंतर थोड्याच वेळानें मदनिका विलासामुळें आकुल झालेल्या शरीराला घेऊन राजापाशीं आली. तों तो एका शिळेवर शांतमनानें बसला आहे, असें तिला दिसलें. तेव्हा तीही खिन्न व लज्जितशी होऊन त्याच्यापाशीं येऊन मुकाट्यानें उभी राहिली. कांहीं वेळानें राजा ध्यान सोडून तिला मधुर वाणीने म्हणाला, " सुंदरि, आपल्या, रतिसुखात विघ्न करून तूं अशी त्वरेने कशाला आलीस ? सर्व भूतें आनंदासाठींच यत्न करीत असतात. यास्तव तूं जा व अगदीं निर्भयमनानें व पूर्ण प्रेमाने आपल्या कांताला पुनः संतुष्ट करून ये. कारण परस्परास इष्ट असलेला स्नेह ( अकृत्रिम प्रेम ) या त्रिभुवनांत दुर्लभ आहे. हे मानिनि, मी एवढ्याच करिता उद्विग्न होत नाहीं. विद्वानानें जें जें अतिशय इष्ट असेल तें तें असेच तुजप्रमाणें दुसऱ्याच्या उपभोगास योग्य आहे, असें जाणावें. हे सुंदरि, मी व कुंभ असे आम्ही दोघेही विरक्त आहों. व दूर्वासाच्या शापामुळें झालेली तूं आम्हाहून अगदीं निराळी आहेस. यास्तव तुला जें वाटेल तें कर.

मदनिका—महाराज, स्त्रियांचा स्वभाव असाच अतिशय चंचळ असतो. त्यांचा काम पुरुषाहून अष्टगुण अधिक असतो. यास्तव मजवर कोप करूं नको. मी अबला गहन वनांत एकांतात बसलें असतां तूं संध्याजपपरायण झाला आहेस, असे पाहून त्यानें माझी प्रार्थना केली. तेव्हां मी काय करूं ? स्त्रीस्वभावास अनुसरून माझ्या हातून हा अपराध झाला आहे. यास्तव मला क्षमा कर. साधु-पुरुष नेहमींच क्षमाशीळ असतात.

शिखिध्वज—बाळे, आकाशांतील वृक्षाप्रमाणें माझ्या मनांत क्रोधाचा अत्यंत अभाव आहे. केवळ साधु-पुरुष ह्या गोष्टीला निंद्य समजत असल्यामुळें मी तुला आपली भार्या समजत नाहीं. बाकी आपण दोघेजणें यापुढेंही मित्रत्वानें वनांतून खुशाल संचार करूं.

श्रीवसिष्ठ—असें बोलून शिखिध्वज तेथें समचित्तानें राहिला असतां चूडाला त्याच्या रागद्वेषशून्य चित्ताला पाहून मनांत फार हृष्ट झाली. व आपल्याशींच म्हणाली,–'अहाहा, हा भगवान् परम समतेस प्राप्त झाला आहे. रागद्वेषरहित झालेला हा जीवन्मुक्ताच्या पूर्ण दशेचा अनुभव घेत आहे. याला भोग, मोठमोठ्या सिद्धि, सुखें, दुःखें, आपत्ति, संपत्ति इत्यादिकांतील कोणीही परतंत्र करूं शकत नाहीं. मला वाटतें कीं मला इष्ट असलेल्या शांति, क्षमा, धृति, तृप्ति इत्यादि सर्व जीवन्मुक्ताच्या लक्षणभूत अनिंद्य महर्षि साक्षात् नारायणासारख्या याच एकाचा आश्रय करून रहतात. असो; तर आतां मी कुंभरूपाचा त्याग करून व चूडाला होऊन याला आपल्या सर्व वृत्तांताचें स्मरण करून देतें.' असा विचार करून चूडालेनें आपलें मूळ रूप राजाला दाखविलें. तेव्हां एकाद्या संपुटांतून निघालेल्या पदार्थाप्रमाणें ती मदनिकेच्या देहांतून निघाली. राजानें त्या आपल्या पूर्व प्रियेला विस्मित नेत्रांनीं पाहिलें. वसंत ऋतूंत उत्पन्न झालेल्या मालिनीप्रमाणें अथवा अकस्मात् आविर्भूत झालेल्या माधवाच्या कमळयुक्त लक्ष्मीप्रमाणें त्याने तिला आपल्यासमोर अवलोकन केलें १०८.

**सर्ग १०९**—चूडालेला पाहून, सर्व हकीकत विचारून व ध्यानानें सर्व जाणून अतिशय विस्मित झालेला राजा प्रसन्न झाला व भार्येला आलिंगन देऊन रात्र तेथें घालविता झाला.

**श्रीवसिष्ठ**—नंतर त्या दयितेला पाहून ज्याचे नेत्र विस्मयानें विकास पावले आहेत असा शिखिध्वज आश्चर्याकुलित वाणीनें म्हणाला,–'हे कमलनयने, तूं कोण? कोठून आलीस? का आलीस? येथे किती दिवस आहेस? शरीराची ठेवण, व्यवहार, स्मित, विनय, व विलास यावरून तू माझ्या भार्येसारखी, निदान तिच्या छायेसारखी दिसतेस.

**चूडाला**—प्रभो, आपण म्हणता तें खरें आहे. मी चूडालाच आहें, यांत संशय नाहीं. या सहज ( स्वाभाविक ) देहाने मी आपणास आज प्राप्त करून घेतले आहे. आपणास बोध करण्याकरिता मी कुंभादिदेहाचें ग्रहण केले होतें. व या वनात आपल्या बरोबर अनेक युक्त्या योजून राहिलें. आपण मोहाने राज्य सोडून जेव्हा वनात तप करावयास आलां, तेव्हापासूनच मी तुम्हास बोध करावयास उद्यत झाले होतें. या कुंभशरीरानें मीच आपणास बोध केला. त्याकरिताच मी मायेनें कुंभदेह–निर्माणादि सर्व खटपट केली. राजन्, कुंभ, स्वर्गगमन त्याचा शाप, स्त्रीत्व, विवाह इत्यादिकांतील काहीं खरे नाहीं. आपण ज्ञानी झाला आहां. यास्तव आतां ध्यानानें अवलोकन करा म्हणजे सर्व अखंडित ज्ञात होईल.

**श्रीवसिष्ठ**—चूडालेनें असे सांगितलें असता राजानें परिकर ( कंबर ) बांधून ध्यानानें आपला सर्व वृत्तान्त विशेष रीतीने पाहिला. राज्याचा त्याग केल्यापासून आता एका घटिकेपूर्वी चूडालेचें दर्शन होईतों घडलेला आपला सर्व वृत्तान्त दोन घटिकेच्या ध्यानात त्याला दिसला. नंतर त्यानें ध्यान सोडलें. मोठ्या हर्षानें नेत्रांतून शीत अश्रु ढाळीत प्रियेला आलिंगन दिले. त्याप्रसंगीं त्या उभयतांना जो आनंद झाला त्याचें वर्णन शेषाच्या दोन सहस्र जिह्वांनींही करता येणें शक्य नाहीं. त्या दोघांच्या शरीरास कंप सुटला, दरदरून घाम आला. नेत्रांतून आनंदाश्रु वाहू लागले. कंठ सद्गदित झाला. व तीं दोघेंही तशींच एकमेकास घट्ट कवटाळून दोन घटिका खांबाप्रमाणें स्तब्ध बसलीं. नंतर राजा प्रियेच्या हनुवटीस हात लावून म्हणाला, " प्रिये, तू इतकी सुकुमार असतांना माझ्यासाठीं किती क्लेश सहन केलेस हे ? ज्या अलौकिक बुद्धीने तू मला या दुरुत्तर संसारगुहेतून पार पाडलेंस तिला कशाची उपमा द्यावी. तुझ्या गुणांना पाहून अरुंधती, शची, गौरी, गायत्री, श्री, सरस्वती,

इत्यादि सर्व लज्जित होतात. धी, श्री, कांति, क्षमा, मैत्री, करुणा, इत्यादि दिव्य स्त्रियांहूनही तू श्रेष्ठ दिसतेस. खरोखर मोठ्या दृढ निश्चयानें तूं मला बोध केला आहेस. पण मी आता कोणत्या प्रत्युपकारानें तुझे उपकार फेडूं ? कारण तूं कृतार्थ असल्यामुळे ज्याच्या योगानें तुझें मन संतुष्ट होईल असा उपकारच मला दिसत नाहीं. अनादि गहन मोहामुळे पतित झालेल्या पतीला निश्चयी कुलस्त्रिया जशा तारतात, त्याप्रमाणे शास्त्रार्थ, गुरुमंत्र इत्यादि तारीत नाहींत. जशा या कुलस्त्रिया पतीवर प्रेम करितात तसें प्रेम मातापितरावाचून दुसरें कोणी करीत नाहींत. कुलस्त्रीच पतीचा–सखा, भ्राता, सुहृद्, भृत्य, गुरु, मित्र, बांधव, धन, सुख इत्यादि सर्व आहे. यास्तव सर्वदा सर्व प्रयत्नाने कुलांगनाची पूजा ( आदर ) करावी. कारण दोन्ही लोकातील सर्व सुख त्याच्या अधीन असते. यास्तव सुंदरि, संसारसागराच्या पार गेलेल्या व निरिच्छ अशा तुझ्या उपकाराची फेड कशी करावी ? या लोकांत तूंच एक कुलांगना आहेस, असें मी जाणतो. तूं इतर कुलांगनांना जिंकलें आहेस. स्त्रियांच्या सौजन्यादि गुणांची चर्चा जेथें जेथें चालेल तेथें तेथें तुझें नाव प्रथम निघेल. आपल्याहून अधिक गुणयुक्त अशा तुला निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवावर अरुंधतीप्रभृति इतर गुणवती स्त्रिया अतिशय रागावलेल्या असतील, असें मला वाटतें. सौजन्य, गुण इत्यादिकांचा जणु काय आधार अशा प्रकारचे हे भामिनि, तूंच खरी पतिव्रता आहेस. ये, तुझ्या गुणाविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या मला पुनः आलिंगन दे.

**श्रीवसिष्ठ**—असें बोलून राजानें त्या हरिणाक्षीला पुनः आलिंगन दिलें. तेव्हा चूडाला म्हणाली,–'देव, आपण आकुलचित्त होऊन शुष्क क्रियासमूहांत जेव्हा तत्पर झाला होता तेव्हा मला वारंवार फार दुःख होत होतें. व त्याकारणानें मी आपला आत्मबोधरूप स्वार्थ संपादन केला. यांत माझें एवढें गौरव करण्याचें कांहीं कारण नाहीं.

**शिखिध्वज**—सुंदरि, खरोखर तं जसा हा आपला शुभ स्वार्थ संपादन केला आहेस तसाच सर्व कुलांगना आपापला स्वार्थ साधूं शकतात का ? मुळीच नाहीं. म्हणून तूं याहूनही अधिक गौरवास पात्र आहेस.

**चूडाला**—हे कांत, जगद्रूपी जाळ्याच्या परम अवधीमध्यें बसून विश्रांति घेत असतांना आपणाला तत्त्वबोध होत आहेना ? त्या पूर्वीच्या व्रत–उपवासादि एकाद्या मोहास पाहतां का ? बुद्धीच्या 'मी हे करतों पण हें मला प्राप्त होत नाहीं.' इत्यादि क्षुद्र स्थितीस आपण मनातल्या-मनात हंसतांना ? हे देव, आकाशांत जसे पर्वत त्याप्रमाणें त्या तुच्छ तृष्णा, त्या संकल्पकुकल्पना आतां तुमच्याठायीं दिसत नाहींत ना ? हे प्रभो, आतां आपण कोणत्या स्थितीस प्राप्त झालां आहां ? आपली निष्ठा कशामध्यें आहे. आपण कसली इच्छा करीत आहां. मागची देहचेष्टा कशी पाहतां ? सत्य कीं तुच्छ ?

**शिखिध्वज**—हे सुंदरि, मी काय सांगूं ? माझ्या प्रत्यगात्मभूत तूंच आहेस. यास्तव ती तूं मोह, तत्त्वदर्शन व विवेक यांतील ज्याची ज्याची अंतःप्रकाशिका होऊन राहिली आहेस, त्या त्यामध्यें मीही अत्यंत समीप ( आत्मरूपानें ) स्थित आहें. अर्थात् आतां तूं जसें सर्व पहातेस तसेंच मीही पहातों. म्हणजे माझी स्थिति काय आहे तें तूं आपल्या अनुभवानें जाण. मी निरिच्छ, निरंश, व आकाशाप्रमाणें स्वच्छ आहें. मी शान्त परमार्थ सत्स्वरूप आहें. देहादिकांच्या ठिकाणचा अहंभ्रम सोडून फार दिवसांनीं मी ' खरा मी ' झालों आहे. मी आतां त्या प्रत्यगात्मोन्मुख चित्तमार्गामध्यें राहून त्या निरतिशयानंद दशेस प्राप्त झालों आहें कीं जिचा हरिहरादिक महाप्रभाववान् देवही निरास करूं शकत नाहींत. कोणत्याही प्रकारच्या विकल्पानें रहित असलेल्या केवल चिन्मात्र ब्रह्मा-मध्यें निष्ठा ठेवून मी ( तद्रूप होऊन ) स्वस्थ राहिलों आहें. मी संसार-भ्रमरहित झालों आहें. मी तुष्ट, खिन्न, स्थूल व सूक्ष्म नाहीं. हे पतिव्रते, मी कसा आहे, व काय आहें हें मला सांगतां येत नाहीं. हे सुंदरि, तूं माझा गुरु आहेस. तुला मी नमस्कार करतों. तुझ्या अनुग्रहानें मी संसार-सागरांतून तरून गेलों आहें. आतां पुनः मी मलिन होणार नाहीं.

**चूडाला**—प्राणनाथ, फार चांगलें झालें. आपल्या या स्थितीचें वर्णन ऐकून मी तृप्त झालें आहें. हे प्रभो, आपली आतां काय इच्छा आहे ?

**शिखिध्वज**—प्रिये, माझी कांहीं इच्छा नाहीं, व मी कांहीं जाणत नाहीं. तुला जसें वाटत असेल तसें कर. मला कांहीं चिंतन करतां येत

नाहीं, व माझ्यानें कांहीं करवत नाहीं. प्रतिबिंबाप्रमाणें मी तुझें अनुकरण करीन. माझें सर्व इष्ट गळून गेलें आहे. मी तुझ्या कोणत्याही आचरणाची निंदा करणार नाहीं व स्तुतिही करणार नाहीं.

**चूडाला**—प्रभो, असें जर असेल तर मी सांगतें तें ऐका. व त्याप्रमाणें करा. सर्वत्र ऐक्यज्ञान व अज्ञानाचा क्षय याच्या योगानें आपण निरिच्छ व आकाशाप्रमाणे स्वच्छ होऊन राहिलो आहों. आमची इच्छा व अनिच्छा सारखीच आहे. शिवाय अज्ञाप्रमाणें आम्ही देह, इंद्रियें, इत्यादिकांच ठायीं तादात्म्य बुद्धि ठेवीत नाहीं. तेव्हां इंद्रिये व प्राण यांच्या उचित व्यापाराचा निरोध केल्यानें आमच्या आत्म्यामध्ये असा काय मोठा अतिशय उत्पन्न होणार आहे ? यास्तव आपण आतां प्राप्त भोगाच्या योगानें केवळ प्रारब्धाचा क्षय करीत राहिलेलें आयुष्य घालवूं या. आमच्या आदि, अंत व मध्य अवस्थेप्रमाणें पाहिल्यास राज्य करणें, हें आपले जन्मप्राप्त कर्तव्य आहे. यास्तव तें करून आपण योग्य समयीं विदेहतेस प्राप्त होऊं.

**शिखिध्वज**—सुदरि, आम्हीं आद्यन्तमध्यावस्थेंत कसे होतो ? व आयुष्याचा अवशिष्ट भाग कसा घालवीत राहणे उचित आहे ?

**चूडाला**—स्वामिन्, आम्ही आद्यन्तमध्य दशेत राजे होतों व आहों. यास्तव केवळ एका मोहाचा त्याग करून पुन: तेच होऊं. आपण आपल्याच नगरांत आपल्या प्राचीन राजासनावर बसून राजे व्हा. मी तुमची मुख्य राणी होईन. या निमित्तानें आपल्या राजधानींत महोत्सव होऊं दे.

**श्रीवसिष्ठ**—दशरथतनया, चूडालेनें असें सांगितलें असतां शिखिध्वज राजा हंसून अक्षुब्ध चित्तानें म्हणाला, " प्रिये, तुझी भोगेच्छा जर इतकी तीव्र असली तर इंद्रानें प्रार्थना केल्याप्रमाणें स्वर्गांत जाऊन दिव्य भोगच भोगण्यास काय अडचण आहे ? मग हे क्षुद्र मानुष भोगच कशाला पाहिजेत ?

**चूडाला**—प्राणनाथ, मला भोगाची किंवा विभूतींची इच्छा नाहीं. तर स्वभावप्राप्त भोगानें राहण्याची ही स्थिति आहे. स्वर्ग, राज्य किंवा क्रिया माझ्या सुखाला कारण होत नाहींत. तर त्यांतील कोणत्याही दशेंत मी अक्षुब्ध असतें. हें सुख व हें दुःख या भावनाच क्षीण झाल्यावर मी सम पदास सोडून कशी राहूं शकेन ?

शिखिध्वज—प्रिये, खरें आहे. सुख–दुःखचिंता सोडून व मत्सर-रहित होऊन आम्ही यथाप्राप्त दशेत स्वस्थ राहिल्यास राज्याचा त्याग केला काय व स्वीकार केला काय एकच.

श्रीवसिष्ठ—याप्रमाणे मधुर भाषण करणाऱ्या त्या रम्य दंपतीचा तो दिवस क्षणार्धाप्रमाणें निघून गेला. तेव्हा त्यांनीं उठून उचित आचार केला. तीं दोघेंही स्वर्गसिद्धीचा अनादर करून पूर्ण चित्तानें राहिलीं. एकाच शयनावर निजून त्यांनीं ती रात्र घालविली. ज्ञान-पूर्ण वाणीच्या विलासानें परस्पराचे चित्तरंजन करणाऱ्या त्या उभय-तांनाही रात्र केव्हा संपली, ते सुद्धा कळलें नाहीं. १०९

सर्ग ११०—संकल्पानें उत्पन्न केलेल्या सैन्यासह गजावर आरूढ होऊन तीं दोघे आपल्या नगरीत गेलीं व पुष्कळ दिवस राज्य करून मुक्त झालीं.

श्रीवसिष्ठ—त्यानंतर सूर्योदय होऊन आकाश अंधकाररहित झालें असता सर्व प्राण्यांचे व्यवहार सुरू झाले. राजा व राणीही उठून स्नान-संध्यादि करून एका सुंदर गुहेच्या तोंडाशीं पर्णासनावर बसलीं होतीं. काहीं वेळानें चूडालेनें आपल्या समोर एका रत्नकलशाची कल्पना केली व त्यांत संकल्पानें सप्तसागराचें जल भरून राजाला स्वराज्यावर मंगल अभिषेक केला. नंतर संकल्प करिताच जवळ आलेल्या उचित आस-नावर बसलेल्या राजाला देवरूपिणी चूडाला म्हणाली,—"हे प्रभो, मुनींना योग्य असलेलें हें शांत तेज सोडून शासन करण्यास योग्य असलेलें इंद्रादिकांचें तेज धारण करा." राणीच्या या प्रार्थनेस मान देऊन 'बरें आहे' असें म्हणताच तो राजश्रीनें शोभूं लागला. नंतर पट्टाभिषेक झालेला नसल्यामुळें द्वारपालाच्या स्थानीं विनयानें स्थित असलेल्या राणीला तो महाराज म्हणाला,—"प्रिये, आता मी तुला महाराज्ञी-पदावर अभिषेक करितों." नंतर त्यानें तिला सरोवरांत स्नान करावयास लावून बोलल्याप्रमाणें पट्टराणी केलें आणि पुनः "सुंदरि, महावैभवपूर्ण उद्दाम सैन्य सज्ज कर." असें म्हटलें, त्याबरोबर त्या रमणीनेही भयंकर चतुरंग सैन्याची कल्पना केली. त्यांतील पताकांनीं आकाशकोटर भरून गेलें. त्यांतील एका मत्त गजावर तें दांपत्य आरूढ झालें. राजानें आपल्या महा सैन्याला निघण्याची आज्ञा केली. त्याबरोबर वाऱ्यानें प्रेरणा केलेल्या सागरावरील तरंगसंघाप्रमाणें सैन्यांतील रथ, अश्व, गज

व पदाति जाऊं लागले. मार्गामध्यें त्यानें आपल्या विविध विलास विविध स्थानेंच, असे अनेक पर्वत, गुहा, अरण्यें, नद्या, सरोवरें इत्य प्रियेला दाखविली. थोड्याच कालानें राजा शिखिध्वज आपल्या स्व सारख्या सुशोभित राजधानीस येऊन पोंचला. आपला कृतकृत्य म राज चूडाला देवीसह ससैन्य आला आहे, असे ऐकताच त्याचे साम राजे संतुष्ट झाले व मोठ्या आदरानें जयघोष करीत नगराबाहेर निघा समोरासमोर येणारीं दोन्हीं सैन्यें जवळ येताच संगम प णाऱ्या दोन नद्यांच्या प्रवाहाप्रमाणे एकमेकांत मिळून गे दोन्ही पक्षामध्यें वाजणाऱ्या मंगलवाद्यांचा ध्वनि एकरूप झा नंतर सर्व उत्तम अधिकाऱ्यांचा सन्मान करून राजा सर्वां नगरात प्रविष्ट झाला नगरातील स्त्रियांनीं त्याच्यावर लाह्या व पुष्पाज यांचा वर्षाव केला. तो महाराज पताकादिकांनीं उत्तरोत्तर अधिक सु भित केलेल्या राजमार्गास व ठिकठिकाणीं चाललेल्या नृत्यगायन विलासास पहात आपल्या भव्य मंदिरीं गेला. तेथे पोंचल्यावर त्य आपल्या नम्र प्रधानादिकांचा उचित सन्मान केला. सात दिवस उ नगरोत्सव करविला. अंतःपुरात बसून समाधिभोगादिक अभिमत व केलीं. नंतर रामा, चूडालेसह दहासहस्र वर्षे (दीर्घकाळ) राज्य क त्या महा उदार पुरुषानें देहत्याग केला. तैलरहित दीपाप्रमाणें तो नि पावला. रामा, पुनः जन्म न घेण्यासाठीं तो महात्मा स्वरूपात जा मिळाला. राज्य करीत असतानाही समदृष्टीपासून न्युन न झाले त्याला निर्विघ्नपणे निर्वाणपद प्राप्त झालें. सारांश, चूडालेसह विविध भोगीत असतानाही ज्याची बुद्धि विषयरागरहित व अत्यंत सम आहे, भय, विषाद, मान, मात्सर्य यानीं रहित आहे,व जो केवळ प्राप्त कर्म क आहे असा भूलोकच्या सर्व राजाचा राजा शिखिध्वज ऐहिक अनेक दीर्घ काळ भोगून वासनाशून्य चित्तानें अवशिष्ट राहिल्यामुळें अमृत पदास प्राप्त झाला. रामा, तूंही प्रारब्धप्राप्त सर्व करीत समाध वृत्तीनें रहा. किंवा पाहिजे तर स्वतः भोगमोक्षलक्ष्मीचा अनुभव व्यवहारदर्शीत रहा. या दोन प्रकारच्या स्थितींतील कोणत्याही स्थितींत जरी तूं राहिलास तरी तुझी कांहीं हानि होणार नाहीं ११०

चूडालोपाख्यान समाप्त.

सर्ग १११—राणीनें जसा राजाकडून तसाच पित्यानें कचाकडून सर्वस्व-त्याग करविला व शेवटीं अहंकारत्यागानें तो परिपूर्ण झाला.

**श्रीवसिष्ठ**—हें मी तुला शिखिध्वजाचें सर्व आख्यान सांगितलें. याच मार्गानें जर तू गेलास तर सर्व खेदापासून निवृत्त होशील. राग व द्वेष यांचा विनाश करणाऱ्या या दृष्टीचा आश्रय करून निश्चित मनानें पूर्णानंद पदाला धरून रहा. रामा, शिखिध्वजाप्रमाणें राज्यव्यवहार करीत तूं भोगमोक्षमय हो. त्या महाराजाप्रमाणेंच बृहस्पतीचा पुत्र कचही ज्ञानी झाला. त्याप्रमाणें तूंही ज्ञान संपादन कर.

**श्रीराम**—हे भगवन्, देवगुरूचा पुत्र कच कसा ज्ञानी झाला हें मला सर्व सक्षेपतः सांगा.

**श्रीवसिष्ठ**—बरें आहे, राजपुत्रा, मी तुला तें वर्तमान सांगतों ऐक. कचाचें बालपण संपून तो चांगला विद्वान् झाला असतां एकदां संसारास तरून जाण्याच्या उद्देशानें आपल्या पित्यास म्हणाला, “ भगवन् आपण सर्वधर्मज्ञ आहां. यास्तव प्राणी या संसारपिंजऱ्यांतून कसा सुटूं शकतो, तें सांगा. ” तेव्हां त्याचा पिता देवाचार्य त्यास म्हणतो—पुत्रा, अनर्थरूपी महामकरांचें जणुकाय घरच अशा या संसारसागरांतून सर्वत्याग याच एका उपायानें सहज निघून जातां येतें. राघवा, पित्याचें हें भाषण ऐकून सुज्ञ कच सर्वांचा त्याग करून अरण्यांत गेला पण बृहस्पतीला त्याच्याकरितां मुळींच वाईट वाटलें नाहीं. कारण महात्मे संयोग–वियोग दोन्ही प्रसंगीं मेरूप्रमाणें स्थिरचित्त असतात. नंतर आठ वर्षे गेलीं असतां एकदां कचाचें चित्त कितपत परिपक्व झालें तें पाहून त्याप्रमाणें बाकीच्या साधनाचा उपदेश करण्यासाठीं भगवान् बृहस्पति तो ज्या अरण्यांत तपादि करीत राहिला होता तेथें आला. तेव्हां पित्याला अभिवादन करून त्या सत्पुत्रानें त्याचें पूजन केलें, व नंतर प्रसन्न मनानें आलिंगन देणाऱ्या त्यास पुनः म्हटलें “ बाबा, मी सर्वत्याग केला त्या गोष्टीस आज आठ वर्षे झालीं तथापि मला अजून प्रशस्त विश्रांति मिळत नाहीं याचें कारण काय ? ”

प्रिय पुत्राचें आर्त भाषण ऐकून गुरूने ‘ सर्वांचा त्याग ’ एवढेंच त्याला उत्तर देऊन तेथून प्रयाण केलें. पिता गेला असतां कचानें

शरीरावरील वल्कलादिकाचा त्याग केला. शरदतूंत सूर्योदयापूर्वी आकाश जसें सूर्य, चंद्र, नक्षत्र, मेघ इत्यादिकानीं रहित असतें तसा तो झाला. त्यानें तें अरण्यही सोडलें. पुनः तीन वर्षांनीं दुसऱ्या अरण्यात खिन्न मनानें राहणाऱ्या त्याच्यापाशीं त्याचा पिता आला. तेव्हा पूर्वीप्रमाणेंच सत्कार केल्यावर कच सद्गदित वाणीनें त्यास म्हणाला, "बाबा, मी तुमच्या उपदेशाप्रमाणें सर्वांचा त्याग केला. दंड, कथा इत्यादिकानाही आपल्यापाशीं ठेवलें नाहीं, तथापि स्वपदीं मला विश्रान्ति मिळत नाहीं काय करूं?" ते ऐकून बृहस्पति म्हणाला,—'पुत्रा, चित्ताला सर्व असे म्हणतात. यास्तव त्याचा त्याग केलास म्हणजे तू अतिशय शोभशील. कारण त्यागवेत्ते पुरुष चित्त-त्यागालाच सर्वत्याग समजतात.' राघवा, इतकें सांगून वाचस्पति सत्वर आकाशात उडून गेला. तेव्हा कच अखिन्न मनाने चित्ताचा त्याग करण्याकरिता त्याला हुडकू लागला. पण पुष्कळ विचार व शोध करूनही त्याला तें सापडले नाहीं. तेव्हा त्यानें आपल्या पित्याचें स्मरण केलें. देह, इंद्रियें, विषय इत्यादिकाचा त्याग केल्यानेंच चित्तत्याग सिद्ध होईल, असें म्हणावें तर देहादि पदार्थ हें चित्त नव्हे. तेव्हा मी त्याचा व्यर्थ त्याग कसा करावा? मला या गोष्टीचा निर्णय करण्यासाठीं पित्याकडेच गेलें पाहिजे. त्यावाचून त्या महा शत्रूस ओळखून, सोडता येणार नाहीं.

रामा, असा विचार करून कच स्वर्गास गेला, व एकांतांत आपल्या पित्याला म्हणाला,—'भगवन्, चित्त म्हणजे काय तें मला सांगा. त्याचें स्वरूप मला आपण सांगितलेत म्हणजे मी त्याचा खचित त्याग करीन' पुत्राची ही प्रार्थना ऐकून गुरु म्हणाला,—'पुत्रा, चित्तज्ञ जन आपल्या अहंकारालाच चित्त समजतात. यास्तव प्रत्येक प्राण्याच्या हृदयात हा जो अहंभाव आहे, तेंच चित्त, असे तू जाण.' त्यावर कच म्हणाला,—"हे तेतीस देवाच्या गुरो, अहंभावच चित्त कसें तें मला सांग. कारण लोकामध्यें 'अहंकार हाच आत्मा,' अशी समजूत असल्यामुळें त्याचा त्याग केल्यास आत्मत्याग केल्यासारखेंच होणार! यास्तव हा त्याग करिता येण्यासारखा नाहीं. असें मला वाटतें." राघवा, पुत्राचें हें भाषण ऐकून बृहस्पति हंसून म्हणतो—बाळा, तूं असें काय म्हणतोस? मला तर चित्तत्याग पुष्पाला

खुडण्यापेक्षा व डोळे मिटण्यापेक्षा सुकर वाटतो; कारण अहंकाररूप चित्ताचा त्याग करणे झाल्यास त्यात थोडासाही क्लेश भोगावा लागत नाहीं. तो कसा म्हणून विचारशील तर सागतों—बाळा, केवल अज्ञानानें सिद्ध झालेली वस्तु ज्ञानानें नाश पावते. पुत्रा, वस्तुतः अहंकार म्हणून कोणी नाहीं. तर तो मिथ्या भ्रम आहे. खरोखर असत् असताना तो सत् असल्यासारखा भासतो. बालकानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणे. रज्जूच्या ठायीं भासलेल्या सर्पाप्रमाणें, माळभूमीवर दिसणाऱ्या मृगजलाप्रमाणें सत्–आत्म्याच्या ठिकाणीं प्रतीत होणारा अहंभाव मिथ्या आहे. तो सत्यही नव्हे व असत्यही नव्हे. एक आद्यन्तरहित, शुद्ध चिन्मात्रच सत्य असून सर्व ज्ञान त्याच्या अधीन आहे. सर्व प्राण्यामध्ये राहून सर्वप्रकाश करणारें तेंच आहे. सर्व जलतरंगात जसें जळच असतें, दुसरें काहीं नसते.त्याप्रमाणे सर्व प्राण्याच्या वृत्तींत तें चिन्मात्रच असते दुसरें काहीं नसते.अशी वस्तुस्थिति असल्यामुळे, बाळा कचा, अहंकार हा कोण, कोठून आला. त्याचा संभव तरी कसा आहे? तस्मात् 'हा मी,' हा अभिमान सोड. कारण तो अभिमान तुच्छ, मर्यादित व दिशा, काल इत्यादिकांच्या योगानें परवश झालेला आहे. पण तुझें खरें स्वरूप मात्र तसें नाहीं. तू दिशा, काल इत्यादिकांनीं मर्यादित झालेला नाहींस. स्वच्छ नित्य उदित, व्यात, सर्व विषयमय, व अमल चिन्मात्र आहेस. बा पुत्रा, सर्व दिशामध्यें असलेलीं पुष्पें. फळें, पानें इत्यादि सर्वांचें कारण जसा त्या त्या वृक्षातील साररूप रस त्याप्रमाणें सर्व जगाचें कारण हा अतिशुद्ध आत्मा आहे तो सर्व पदार्थामध्यें सदा स्थित असतो. तो अनंत चिदात्माच तूं आहेस. कचा, अखंड, अद्वय व सन्मात्रस्वरूप अशा तुला हा मर्यादित अहंभाव मुळींच शोभत नाहीं. यास्तव तूं त्या असत् निश्चयाचा त्याग कर १११.

सर्ग ११२—मिथ्यापुरुषाचें आख्यान.

श्रीवसिष्ठ—पित्यापासून असा परमयोगरूप उपाय प्राप्त झाला असता त्याच्या योगानेंच देवाच्या गुरूचा पुत्र जीवन्मुक्त झाला यास्तव रामा, कचाप्रमाणेंच तूही निर्मम, निरहंकार, अध्यासरहित, शांतचित्त, व निर्विकार होऊन रहा. अहंकार असत् आहे, असें समज. याचा तूं आश्रय करूं नकोस व त्यागही करूं नकोस. कारण जगात मुळींच

नसणाऱ्या शशाच्या शिंगाचा त्याग किंवा स्वीकार कसा करता येणार ? अहंकाराचाच जर असंभव आहे, तर तुझा मरण व जन्म कोठचे ? आकाशक्षेत्रात पेरलेल्या बीजाचें फल कोण घेणार ? (अर्थात् अहंकाररूपी क्षेत्रात पेरलेल्या पुण्यपापरूप अनेक बीजाचे अनेक वृक्ष होऊन त्याला फळें लागतात. अहंकाररूपक्षेत्राचाच बाध झाल्यावर त्याचा संभव नसतो.) अहंकाराचा बाध झाला, तो मिथ्याभ्रम आहे, असे कळलें, म्हणजे निरंश, शान्त, सर्वसंकल्पशून्य, सर्वभावात्मक, परम अणूंहूनही सूक्ष्म, चिन्मात्र, अमनोमय, आत्मस्वरूप अवशिष्ट राहतें जलतरंगादि न्यायानें तेच अज्ञानाने जगद्रूप भासतें. पण हे निष्पापा, ज्ञानाच्या योगानें सर्व ब्रह्मरूप होतें. यास्तव दशरथतनया, द्वित्व-एकत्वमति सोडून अवशिष्ट आत्म्यामध्ये रहा व सुखी हो. मिथ्या पुरुषाप्रमाणें व्यर्थ दुःखित होऊं नकोस. ही संसारसंबंधिनी गाढ माया बोधानें (आत्मज्ञानाने) कृश होते.

**श्रीराम**—गुरुवर्य तुमच्या या ज्ञानामृतानें मी परम तृप्तीस प्राप्त झालों आहें. आपण जसा काहीं मजवर अमृताचा वर्षाव केला आहे. त्यामुळें मी मनातल्या मनात अतिशय शीतल होत आहे, खरोखर मी आता हिरण्यगर्भाच्या संपत्तीपर्यंत ज्या उत्तरोत्तर अतुल संपत्ति आहेत त्याच्या अग्रभागीं (मस्तकावर) आरूढ झालो आहें. पण आपलीं हीं रम्य वचनें ऐकून मात्र मी अजून तृप्त होत नाहीं. यास्तव हे मुनिश्रेष्ठ, ज्या मिथ्या पुरुषाने आत्मवस्तूला अवस्तु (असत्य) व अवस्तू (जगा) ला सत्य केलें त्याची कथा मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—बरें आहे, राघवा, तुझी फारच इच्छा असल्यास ही हास्यकारक कथा ऐक. हे महाबाहो, कोणीएक मायायंत्रमय पुरुष होता. त्याची बुद्धि एकाद्या बालकाप्रमाणे थोडी असून तो मूर्ख अज्ञानानें आच्छादित झालेला होता. कोठें शून्य-एकातांत झालेला तो तेथेंच राहिला. त्याच्या वसतिस्थानी त्याच्याहून दुसरें काही नव्हतें व जे काहीं होतेंसें वाटत होतें तें तोच होता. तो दुसरें जें काहीं पहात होता तें सर्व त्याच्या भ्रांतीनेंच भासणारें होतें. पण मीच हें सर्व आहें असें त्या दुर्बुद्धीस कळलें नाहीं. उत्तरोत्तर वृद्धिंगत होणाऱ्या त्याचा "मी आकाशाचा उपजीवक आहें, आकाश माझें उपजीव्य आहे, यास्तव

आकाशच मी आहें. असल्या आकाशाला आच्छादित करून मी राखतों ” असा संकल्प झाला. ‘ त्याबरोबर आपल्या या इष्ट आकाशवस्तूला स्वतः कोणत्या तरी उपाधींत घालून मी स्वतः आदराने त्याचें रक्षण करतों ’ असा विचार करून त्यानें आकाशाच्या रक्षणाकरिता घर बांधलें. त्याच्या आतील भागावर हें माझें आहे अशी आस्था ठेविली. मी याचें उत्तम प्रकारें रक्षण केलें आहे, असे त्याला वाटलें, आणि रघुनंदना, त्या गृहाकाशानें तो संतुष्ट झाला. पण कांहीं दिवसांनीं तें त्याचें घर नष्ट झालें. तेव्हा ‘ हाय हाय हे माझ्या गृहा, तू इतक्यात कोठे गेलेस ? अरेरे! तुझा नाश कसा झाला. तुझा भंग कसा झाला ? ’ असा पुष्कळ शोक करून त्याने पुनः तेथेंच आकाशाच्या रक्षणाकरिता एक कूप ( विहिर ) केला व त्यावर ‘ हा माझा आहे ’ अशी आस्था ठेविली. पण कांहीं दिवसांनीं तो त्याचा कूपही नष्ट झाला. तेव्हा तो पुनः शोकमहासागरात पडला. बराच वेळ पुष्कळ रडून त्याने लागलाच एक कुंभ ( घागर ) निर्माण केला. व त्यावर पूर्वीप्रमाणेंच आस्था ठेविली त्यामुळें त्याला मोठें सुखसें वाटलें. पण कांहीं दिवसांनी तो कुंभही फुटला. कारण दुर्भाग्यवान् पुरुष ज्या दिशेस जातो ती दिशाच नाहींशी होते. तेव्हा त्याच्याकरिताही त्यानें पुष्कळ आक्रोश केला व आकाशरक्षणार्थ एक कुंड तयार केलें. पण तेजाच्या योगानें जसें तम तसें कालाच्या योगानें त्याचे प्रिय कुंडही नाश पावलें. पण त्याच्यासाठीं पुष्कळ शोक करून त्या मूर्खानें चौसोपी घर बांधलें व त्यावर हें माझें आहे, असा अभिनिवेश ठेविला, पण वायु जसा वाळलेल्या पानाचा त्याप्रमाणें सर्वप्रजेचा ग्रास करणाऱ्या कालानें त्याचाही योग्यवेळीं अपहार केला. तेव्हा त्या मोठ्या घराकरिता पुष्कळच शोक करून आपल्या आकाशासाठीं एकप्रकारचें धान्यावरील आवरण निर्माण केलें, व त्याच्यावर दृढ आस्था ठेविली. पण त्यालाही कालानें गिळलें, तेव्हा त्या धान्यावरणासाठीं तो अतिशय व्याकुळ झाला. रामा, तो मिथ्या पुरुष अशा रीतीनें वारवार निरनिराळीं घरें करून, त्याच्यावर असामान्य आस्था ठेवून व कालानें त्याचा अपहार केला असता असह्य दुःख भोगून पुनः दुसरें घर करीत असे. त्याचा सर्व काळ या

अशा विचित्र व त्याच त्या व्यवहारात जात होता. तो मूर्ख अतिशय दुःखी व परतंत्र होऊन राहिला ११२.

**सर्ग** ११३—मिथ्या पुरुषादि शब्दांचा अर्थ.

**श्रीराम**—भगवन्, या आख्यायिकेंतील मायापुरुष कोण ? आकाशरक्षण कोणतें ? व या कथेचा मथितार्थ काय ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, मिथ्यापुरुषाच्या कथेने सुचविलेला सर्व अर्थ मी आता तुला स्पष्ट करून सांगतों. रामभद्रा, मी या कथेंत मायायंत्रमय पुरुष म्हणून जो सांगितला आहे तोच हा अहंकार आहे असें समज तो शून्य ( माया ) आकाशात उत्पन्न झाला हे साधो, ज्या या आकाशात हें जग आता स्थित आहे तें सृष्टीच्या पूर्वी असत् व शून्य असते ते सत् ब्रह्माच्या आधाराने राहते. पण ब्रह्मही अतिशय सूक्ष्म असल्यामुळें सदा दुर्लक्ष्य असतें. वायूपासून जसा स्पंद त्याप्रमाणें त्याच्यापासून अहंकार उदय पावतो. तो वस्तुतः अनात्मा असतानाच भ्रांतीने आत्मतेस प्राप्त होऊन आपल्या कारणरूप आकाशात वृद्धि पावतो व सहस्त्रावधी कल्पनांनीं हे माझें इष्ट आहे व हें अनिष्ट आहे, इत्यादि कल्पना करतो. त्या काल्पितच अहं अशा आपल्या नावानें तो इष्टानिष्टप्राप्तिपरिहारार्थ यत्न करतो. नंतर तो त्या अनात्मभूत आत्म्याच्या रक्षणार्थ प्रवृत्त झालेला अहंकार काम—कर्म—वासनाप्रमाणें पूर्व पूर्व देहाचा नाश झाला असता उत्तरोत्तर अनेक देह निर्माण करतो. रामा, तो अहंकारच मायापुरुष व मिथ्या पुरुष आहे. तो मायेमुळे व्यर्थ असत् उत्पन्न झाला आहे. कूप कुंड, घर इत्यादि सर्व देह आहेत. त्यातील प्रत्येकावर तो हा माझा अशी भावना ठेवीत असतो. त्यातील प्रत्येक देहाच्या योगानें आत्म्याचे रक्षण झालें, असें तो समजतो. रामा, ज्याच्या योगानें तो आत्म्यास मोह पाडतो तीं याचीं नावें ऐक. जीव, बुद्धि, मन, चित्त, माया, प्रकृति, संकल्प, कलना, काल, कला, इत्यादि अनेक नावानीं तो बहुत्वास प्राप्त झाला आहे. तो व्यर्थ स्वसंकल्पानेंच दुःख भोगीत असतो. पण रामा, ज्याप्रमाणें हा मिथ्या पुरुष आत्म्याच्या शंकेनें आकाशाचें रक्षण करीत घटादिकांमध्यें क्लेश भोगीत राहतो, त्याप्रमाणें तू भोगू नकोस. कारण आकाशाहू-

नही अतिशय विस्तृत शुद्ध, सूक्ष्म, शिव व शुभ आत्म्याचें ग्रहण किंवा रक्षण कोण कसें करणार ? नुसत्या हृदयाकाशास धारण करणाऱ्या शरीराचा क्षय झाला असता आत्माच नष्ट झाला अशा शंकेनें भूतें व्यर्थ शोक करितात. पण घटादि फुटले तरी त्यांतील आकाश जसें अखंडित असतें, तसें देह नष्ट झाले तरी देही नित्य निर्लेप असतो. कारण तो शुद्ध चिन्मात्र अणु आकाशाहूनही अणु व स्वानुभवरूप आहे. रामा, या सृष्टींत कांहीं उत्पन्न होत नाहीं व कांहीं नष्ट होत नाहीं. तर केवळ ब्रह्म जगद्विवर्तरूपानें विकास पावतें. यास्तव हे सावो, सर्व अनर्थांचे मुख्य कारण अशा या अहंकारास सर्वथा सोडून बाकी राहिलेल्या उत्तम पदीं विश्रांति घे. म्हणजे तूंही उत्तम होशील ११३.

**सर्ग ११४**—अनेक दृष्टान्तांनी सदसद्रूपाचें विवेचन व असद्रूपाच्या निरासानें सद्रूपामध्यें स्थैर्य.

**श्रीवसिष्ठ**—पूर्वी पर ब्रह्मापासून मन उत्पन्न झालें. मनन हेंच त्याचें स्वरूप आहे. ज्याप्रमाणें पुष्पांत वास, सागरांत महा कल्लोल, व आदित्यांत किरण त्याप्रमाण ब्रह्मामध्यें तें ( मन ) असतें. आत्मस्वरूपाचें अनुसंधान सुटणें याच अज्ञानामुळे तें सर्व जगत्कल्पनेचें मूळ होऊन राहिलें आहे. सूर्याला विसरून किरणाची भावना करणें, सोन्याला विसरून कड्याकडे पहाणें, जलाला विसरून तरंगाला खरें मानणें, अग्नीला विसरून ज्वालेचीच भावना करणें, इत्यादि हे सर्व मूळाला विसरून शाखेला महत्त्व देण्याचे जसे प्रकार आहेत तसाच आत्म्याला विसरून मनाला महत्त्व देण्याचा हा अनुचित व्यवहार आहे. पण कार्य अथवा परिणाम सोडून कारणाकडेच जो दृष्टि ठेवतो त्याला कार्य व कारण या दोघांचीही प्राप्ति होते. उदाहरणार्थ अग्नीची ज्वाला अग्नीहून पृथक् नसून अग्निरूपच आहे, असें जो पाहतो त्याची एक अग्निबुद्धि स्थिर होते. यास्तव त्या सूक्ष्मदृष्टि पुरुषाला निर्विकल्प म्हणतात. जो निर्विकल्प तोच महात्मा. कारण तो कारण व परिणाम यांना भिन्न पहात नाहीं त्यामुळे तो ग्राह्यग्राहक विकल्पशून्य असतो. कारणाच्या प्राप्तीनेंच सर्व प्राप्तव्य त्याला प्राप्त झालेलें असतें. त्याची मति कार्य अथवा परिणामभूत विकारामध्यें निमग्न होत नाहीं. यास्तव राघवा,

तूंही विकारांना असत् व अधिष्ठानाला सत् समजून सद्रूप होऊन रहा. स्वप्रकाश आत्म्याच्या योगाने जेव्हा अहंकार आपली संकल्पनांवाची शक्ति व्यक्त करतो, तेव्हा मन होतें व नंतर केवळ संकल्पानेंच पूर्वी अनेकदा सांगितल्याप्रमाणें हें सर्व भ्रमात्मक जग उद्भवतें. पण ते स्वप्न, तरंग इत्यादिकाप्रमाणें मिथ्या आहे, सत्य नव्हे. या जगात अपूर्व असें कांहीं उद्भवत नाहीं. यास्तव तूं भेददृष्टि सोड. जात, येत, खात, ऐकत, बसत असताना या जगात अपूर्व कांहीं नाहीं जें आहे तें सत् ब्रह्म आहे, असें जाण. सर्व व्यवहाराचें सार संवित आहे. ती चिन्मात्र संवित्च हें सर्व जग आहे. संवित्स्फुरणरूप अशा या सृष्टींत हे निराळें व हें निराळें, ही भावना कोठची ? विषयही जर संवित्हून भिन्न नाहींत तर बंध व मोक्ष कोठचे ! यास्तव त्याविषयींच्या कल्पना सोडून तूं मौनी, जितेंद्रिय, व मान–मदरहित होऊन प्राप्त कार्य करीत रहा. अहंकार मात्र करूं नकोस ११४.

**सर्ग ११५**—शंभूनें भृंगीस सांगितलेलीं जीवन्मुक्ताचीं लक्षणें.

**श्रीवसिष्ठ**—हे निष्पापा, तूं सर्व शंका सोडून व धैर्य धरून महाकर्ता, महाभोक्ता व महात्यागी हो.

**श्रीराम**—प्रभो, महाकर्ता, महाभोक्ता व महात्यागी कोणाला म्हणतात ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, हें त्रिविध व्रत शंभूने पूर्वी भृंगीला सांगितलें व त्याच्या योगाने तो सुखी होऊन राहिला. तोच वृत्तान्त मी तुला आता सांगतों. एकदा अग्नीसारख्या दीप्त सुमेरुपर्वतावर शंकर सपरिवार बसला होता. तेव्हा त्याच्यापाशीं जाऊन व प्रणाम करून भृंगी म्हणाला,– "हे भगवन् देवदेवेश परमेश्वर, मी जें विचारीत आहें तें मला कृपा करून सांग. हे नाथ, तरंगासारख्या नाशवंत संसार-रचनेस पाहून, तत्त्वज्ञान झालेलें असलें तरी भोगासक्तीमुळें विश्रांति मिळत नसल्याकारणानें मी मनात अतिशय भयभीत होत आहें. यास्तव कोणता निश्चय दृढ केला असता मी या जगद्रूपी जीर्णगृहात सुखानें राहू शकेन तें सांग.

**ईश्वर**– भृंगिन्, तूं सर्व शंका सोडून व धैर्य धरून महाभोक्ता, महाकर्ता व महात्यागी हो.

भृंगी—महाभोक्ता इत्यादि कोणाला म्हणतात?

ईश्वर—हे महाभागा, जो सदेहशून्य पुरुष प्राप्त होतील तेवढेच धर्माधर्म समबुद्धीनें करतो, जो राग, द्वेष, सुख, दुःख, धर्म व अधर्म याना व्यक्त करणाऱ्या व इष्टानिष्ट फळ देणाऱ्या क्रिया निष्काम मनाने केवळ लोकसंग्रहार्थ करितो, जो मौनी, अहंकाररहित, निर्मळ, मत्सरशून्य व उद्वेगरहित होऊन कर्तव्य करतो, शुभाशुभ कार्यामध्ये धर्म, अधर्म व इतर कुशंका याच्या योगानें ज्याची मति लिप्त होत नाहीं, जो साक्षी-प्रमाणे सर्वत्र गतस्नेह असतो, कोणत्याही कार्यामध्ये निरिच्छ रहातो, जो सम व स्वच्छ मतीने उद्वेग व आनंद यानी रहित असतो, जो शोक व हर्ष मानीत नाही, प्रारब्धप्राप्त उचित फळ भोगताना जो कार्यानुरूप आचरण करतो व असंसक्तचित्त राहतो, जो कर्माकर्म करतानाही उदासीन स्वभावतःच शांत व सम असतो तो महाकर्ता होय. जो कोणाचा द्वेष करीत नाही, कशाची आकांक्षा करीत नाहीं, जो सर्व प्राप्त फळ भोगतो, जो इंद्रियांच्या योगानें विषयग्रहण करीत असतानाही अद्वय, असंग पूर्णात्म्यामध्यें प्रतिष्ठित असल्यामुळे वस्तुतः ग्रहण करीत नाहीं, कोणतीही क्रिया बुद्धिपूर्वक करीत नाही, भोगप्रसंगीही मति आत्ममय झालेली असल्यामुळे जो भोगीत नाहीं, जो साक्षीप्रमाणें सर्व लोकव्यवहार अखिन्न मनाने पहातो, सुख, दुःख, जय-पराजय देणारे क्रियायोग, लाभ, अलाभ इत्यादिकांच्या योगाने ज्याची मति विक्षिप्त होत नाहीं जरा, मरण, आपत्ति, राज्य, दारिद्र्य, या सर्वांनाच जो रम्य समजतो, सागर जसा जलप्रवाहास. त्याप्रमाणें मोठमोठ्या सुख-दुःखास जो समदृष्टीने आपल्या आशयात साठवितो, अहिंसा, समता, तुष्टि, इत्यादि ज्याच्या पासून कधीं दूर होत नाहींत, कडु, आंबट, खारट, तिखट, तुरट, मिष्ट इत्यादि सर्व जो एकाच भावनेनें खातो, सरस, विरस, रम्य, अरम्य शुभ, अशुभ इत्यादिकांना जो सम पाहतो तो महाभोक्ता होय. धर्म, अधर्म, दुःख, सुख, मरण, जन्म, सर्व इच्छा, सर्व शंका, सर्व चेष्टा, सर्व निश्चय, देह, मन, इंद्रियें, इत्यादिकांची सत्ता, याना हीं सर्व असत्य आहेत, अशा भावनेनें, ज्याने सोडले आहे, देह माझा नव्हे, मला जन्म नाहीं, मला युक्तायुक्त क्रिया कर्तव्य नाहीं, असा

ज्याचा आंतल्याआंत निश्चय आहे, फार काय पण ज्यानें ही सर्व दृश्य कल्पनाच सोडली आहे तो महात्यागी होय.

राघवा, देवेशानें भृंगीशाला पूर्वी असे सांगितले. या दृष्टीचा आश्रय करून तूं रहा. सर्व ब्रह्ममय आहे अशी भावना कर. शांतवृत्ति हो. ब्रह्मेतर हें दुसरें कांहीं नाहीं, असा निश्चय तूं निःशंकपणें कर, तूं अंतर्मुख होऊन सर्व बाह्य कार्ये कर. म्हणजे खिन्न होणार नाहींस व निरहंकारस्थितीस प्राप्त होशील ११५.

सर्ग ११६—गलित होणाऱ्या व झालेल्या चित्ताचीं लक्षण.

**श्रीराम**—हे सर्वधर्मज्ञ ब्रह्मन्, अहंकार नावाचें चित्त गलित होत असतां किंवा झालें असतां अवशिष्ट राहणाऱ्या सत्त्वाचें लक्षण काय आहे?

**श्रीवसिष्ठ**—रामभद्रा, ज्याच्या सर्व वासना क्षीण झाल्या आहेत, अशा मनाचें मुख्य लक्षण कोणी कितीहि प्रयत्न केला तरी लोभ–मोहादि दोष न उद्भवणें हे आहे. वास्तव सत्त्ववान् पुरुषाच्या शुद्ध मनाला ते दोष लिप्त करीत नाहींत, अहंकारमय चित्त व विषादास कारण होणारे पाप क्षीण होऊं लागलें असतां मुदितादि ( सुखप्रसादादि ) शोभा त्याच्या मुखास कधींहि सोडीत नाहींत. वासनाग्रंथी तटातट तुटून जातात, कोप उत्तरोत्तर कृश होऊं लागतो, मोह मंद होतो, काम म्लान होतो व लोभ कोठल्या कोठें पळून जातो. इंद्रियें वेगानें विषयोन्मुख होत नाहींत, खेद स्फुरण पावत नाहीं, सुखें व दुःखें वृद्धि पावत नाहींत, सर्व संतापास दूर करणारी निवृत्ति हृदयांत उदय पावते. केव्हा केव्हा ज्ञानी पुरुषाच्या मुखावरही सुखदुःखादि भाव दिसतात. पण प्रारब्धाच्या बळानें उद्भवणाऱ्या त्यांना ज्ञानी लागलेंच तुच्छ समजून मनाला त्याच्या ठिकाणीं आसक्त होऊं देत नाहींत. त्यामुळे ते भाव फार वेळ टिकत नाहींत. थोड्याच अवकाशांत त्याच्या तोंडावरील शांतीची छटा पुनः व्यक्त होते. चित्त गळलें म्हणजे तो साधु देवगणाच्या प्रशंसेस पात्र होतो. शीतल चंद्रिकेसारखी समता त्याच्या हृदयांत उदय पावते. त्याचें मोठें शरीर शांत, रम्य, नम्र, व अहिंसक तेज धारण करतें. संतांचा संसारभ्रम हा संपत्ति व विपत्ति यांच्या योगानें अति विरुद्ध व विचित्र जरी असला तरी तो त्यास आनंद किंवा खेद देऊं शकत

नाहीं. राघवा, केवल बुद्धीला आत्म्याकडे लाविल्यानेंच प्राप्त होणाऱ्या व आपत्तिरहित अशा परमात्म्यामध्यें जो आसक्त होत नाहीं, त्याला धिक्कार आहे. बा सत्पुत्रा, दु:खरत्नाचा जणुं काय निधिच, अशा जन्म-मरणमय संसारसागरास तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला त्या सागराच्या पार ( पलीकडे ) असलेल्या परमात्म्यामध्ये दीर्घकाळ उचित विश्रांति घेण्यास्तव मी कोण, हें जगत् काय आहे, परमात्मतत्त्व कसें आहे, व या तुच्छ भोगाच्या योगानें काय होणार? असा निरंतर विचार करून विवेक व वैराग्य यांना अतिशय पुष्ट करणें ( पराकाष्ठेस पोचविणें ) हाच एक उपाय आहे. ११६.

सर्ग ११७—मी कोण व हें जग कसें झालें, या विचाराचें दिग्दर्शन करण्यासाठीं मनूनें इक्ष्वाकूला सांगितलेला विचार.

**श्रीवसिष्ठ**—हे इक्ष्वाकुवंशजा रामा, तुमचा आदिपुरुष इक्ष्वाकु राजा कसा मुक्त झाला, तें मी सांगतो ऐक. तो महा भूपाळ राज्य करीत असतां एकदा एकांतांत बसून असा विचार करूं लागला या जरा-मरण-क्षोभ-सुख दु:ख इत्यादि भ्रमस्थितीचा म्हणजेच या दृश्य प्रपंचाचा हेतु (कारण) काय बरें असावा? पण पुष्कळ विचार करूनही त्याला तें कळलें नाहीं. म्हणून त्यानें एकदा ब्रह्मलोकाहून आलेल्या मनूची उत्तम पूजा करून, त्यास असें विचारलें.

**इक्ष्वाकु**—हे भगवन्, तुमचा हा अनुग्रहच मला तुम्हाला कांहीं विचारण्याचें धैर्य देत आहे. यास्तव हे दयासागरा, मी विचारतो, तें मला सांगा. ही सृष्टि कोठून आली, हिचें स्वरूप कसें आहे? या जगाची संख्या व परिणाम काय आहे? याचा भोक्ता स्वामी कोण? याला कोणी केव्हां रचलें, म्हणून श्रुति सांगतात. जाळ्यांतून जसा पक्षी तसा मी या विषम संसृतिभ्रमांतून कसा सुटेन?

**मनु**—पुत्रा, फार दिवसांनीं तुझा विवेक विकास पावून तूं हा अनर्थनाशक उत्कृष्ट प्रश्न केला आहेस, असें मी समजतो. राजन्, हें जें कांहीं दिसत आहे तें नाहीं. जसें आकाशांत दिसणारें गंधर्वनगर व मरुस्थलावरील मृगजल तसेंच हें आहे सांख्य उपादान कारणामध्यें अति सूक्ष्मरूपानें असलेलें कार्यच निमित्तांच्या योगानें आविर्भूत केलें जातें,

असें म्हणतात. पण साक्षी किंवा इंद्रियें यांना जें प्रतीत होत नाहीं तें आपल्या उपादानांत नसतें. कारण प्रतीतीच्या अभावीं तें असतें, असें म्हणण्यास काहीं प्रमाण नाहीं. मन व ज्ञानेंद्रियें यास विषय न होणारें सर्व असत् आहे, इतकेंच नव्हे तर तें संभवतही नाहीं. आम्ही वेदान्ती सद्ब्रह्मच जगाच्या आकारानें सृष्टिसमयीं होतें, असें म्हणतों, व तें अविनाशी तत्त्वच या सृष्टींत आहे. त्यालाच सत् आत्मा असें म्हणतात. हे राजन्, ही सर्व दृश्यांनीं संपन्न असलेली सर्गपरंपरा त्या महाआरशांत प्रतिबिंबरूप झाली आहे. प्रकाशस्वभाव आत्म्यापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्माच्या स्फुरण शक्तींतील काहीं ब्रह्माण्डरूप स्थूल समष्ट्यभिमानी झाल्या आहेत काहीं भूतरूप (पृथिव्यादि देवतारूप) झाल्या आहेत. दुसऱ्या काहीं शक्ति जरायुजादि चतुर्विध प्राणिरूप झाल्या आहेत. याप्रमाणें ही जगत्स्थिति होते. वास्तव वस्तुत. पाहता बंध नाहीं व मोक्ष नाहीं. तर निरुपद्रव ब्रह्मच आहे. ऐक्य नाहीं व द्वित्व नाहीं, तर संवित्सारच विकास पावत आहे. एकच जल तरंगरूपानें जसे अनेक होते त्याप्रमाणें एक चित् जगद्भेदानीं स्फुरण पावते. पण सर्व विकास मायामय आहे व त्यामुळें तो वस्तुतः काहीं नाहीं. यास्तव तूं बंध-मोक्षभ्रम दूर सोडून भवभयरहित हो. निर्भय ब्रह्मरूप हो ११७.

सर्ग ११८ इक्ष्वाकूच्या इतर प्रश्नांचीं उत्तरें.

मनु—शुद्ध चैतन्याच्या अविद्यासंस्कारानीं विचित्र झालेल्या अविद्येंत प्रतिबिंबरूपानें उद्भवलेल्या ज्ञानशक्ति संस्काराच्या अंतःकरणरूप परिणामांत त्या (अंतःकरणा) नें परिच्छिन्न होऊन जीवरूप होतात. नंतर ते जीव उपाधिरूपानें पूर्वीच उत्पन्न झालेल्या संसारांत अनेक दशांचा अनुभव घेत राहतात. अर्थात् सुखदुःखदशा व त्याविषयींचा मोह मनामध्येंच असतो. आत्म्याच्या ठिकाणीं नाहीं. चंद्राचा ग्रास करितांच अदृश्य राहूही जसा दृश्य होतो, त्याप्रमाणें दृश्य अंतःकरण व त्याचा शेवटचा साक्षात्काररूप परिणाम यांच्या योगानें आत्मा अनुभवास येतो. तो परमेश्वर शास्त्र व गुरु यांच्या साह्यानें प्राप्त होत नाहीं. तर अहंममतारहित सत्त्वस्थ बुद्धीनें तो अनुभवास येतो. जसे वाटसरू वाटेनें जात असतांना दिसणाऱ्या अनेक पदार्थांस रागद्वेषरहित बुद्धीनें पाहतात

त्याप्रमाणें आपल्या देहेंद्रियादिकास पाहावें. त्यांचा फारसा आदर करू नये व उपवासादि क्लेशांनीं अनादरही करू नये. ते इतर साधारण पदार्थांप्रमाणें जसे असतील तसे खुशाल असोत. आपल्या सत्त्वशील बुद्धीनें देहादिकास सामान्य पदार्थाप्रमाणें दूर सोडून तू अत्यंत शीतलचित्त व आत्ममय हो. मीच देह, ही बुद्धि संसारबंधन उत्पन्न करणारी आहे. मुमुक्षूंनीं या बुद्धीचा आदर कधींही करूं नये मी ज्यात काहीं नाहीं असे चिन्मात्रस्वरूप व गगनाहूनही अणु ( सूक्ष्म ) आत्मा आहें, ही स्थिरबुद्धि संसारनाशक आहे. ज्याप्रमाणे निर्मल जलाच्या आत व बाहेर तेज राहते त्याप्रमाणे जड जगाच्या आत व बाहेर असंग चित् आहे. जसे सोन्याचे भिन्न भिन्न आकार म्हणजेच कडें, कुंडल इत्यादि अलंकार, त्याप्रमाणें आत्म्याचे मिथ्या विकार म्हणजेच चराचरजगद्रूपता. यास्तव राजन्, तूं सत्त्वारूढ होऊन आत्म्यामध्येंच गूढ रहा. कडेवरील मुलाचें भान न राहिल्यामुळें एकादी माता जशी त्याला शोधूं लागते व अतिशय दु:खी होते त्याप्रमाणें सर्व मूढ हृदयस्थ आत्म्याला विसरून त्याच्यासाठीं रडतात. त्या अजर व अमर स्वरूपास न ओळखता शरीर मरताच " हाय हाय मी मेलो, मी अनाथ झालो, माझा सर्वस्वी घात झाला, " इत्यादि प्रकारें अज्ञ जीव विलाप करतो, जल स्पंदामुळें जसें नाना आकाराचें दिसतें त्याप्रमाणे ब्रह्म संकल्पामुळें कार्यपरंपरेनें वाढतें यास्तव हे पुत्रा, तूं संकल्पमलांनी रहित असलेलें चित्त आत्म्यामध्यें स्थिर करून, समूल संसारोच्छेद झाला असताही प्रारब्धभोगाच्या उपयोगी असलेले आभासयुक्त चित्त मात्र अवशिष्ट ठेवून व्यवहारसमर्थीही अगदीं शांत राहून, स्वास्थ्य व सुख याचा अनुभव घे व हें राज्यही कर ११८.

सर्ग ११९—पुरुषाचें बंध-मोक्षाविषयीं विद्याविद्याकृत स्वातंत्र्य

**मनु**—तो प्रभु, एकाद्या बालकाप्रमाणें सृष्टिरूप स्पंदांनीं खेळतो व संहाररूप शक्तीनें पुनः सर्वांचा लय करून आपल्या स्वरूपात राहतो. आसक्तीनें प्रवृत्त झालेल्या त्याची सर्गशक्ति जशी उदय पावते त्याप्रमाणें वैराग्याने निवृत्त झालेल्या त्याची संहारशक्तिही स्वाभाविकपणेंच उदय पावते. चंद्र, सूर्य, अग्नि, तापलेलें लोखंड, व रत्नादिक याच्या ज्वाला, वृक्षाचीं पानें व पाण्याचे कण जसे कल्पित आहेत तसें जगाचें वैचित्र्य

ब्रह्मामध्यें कल्पित आहे. तें अज्ञाना दुःखप्रद असलें तरी तज्ज्ञांना सुखरूप भासतें. बाबा इक्ष्वाको, सर्व विश्वास मोह पाडणारी ही माया विचित्र आहे. तिच्या योगानें सर्व अंगभर खिळून राहिलेला आत्मा जीवाला दिसत नाहीं. चिद्ब्रह्मरूप आरशांत जगत् हें प्रतिबिंब पडलें आहे, असें जो समजतो व त्याचीच भावना करीत सर्व इच्छा सोडून राहतो, तो सुख भोगतो. कारण त्या वीरानें आपल्या अंगांत ब्रह्माचें कवच घातलेलें असतें, त्यामुळें त्याला मोहरूपी बाण पीडा देऊं शकत नाहींत. यास्तव अहंकाररहित मनानें सर्व शून्य व निराधार ब्रह्म आहे, असें चिंतन करावें. हें रम्य आहे व हें रम्य नाहीं, असें समजणें हेंच दुःख-संततीचें बीज आहे. पण साम्यरूप अग्नीनें तें जळून गेलें असतां दुःखाला अवकाशच कोठून राहणार? यास्तव बा राजा, समाधीच्या अभ्यासानें रम्यारम्यविभागाचा मोठ्या धैर्यानें नाश करून, कर्मारण्याला समूळ तोडून व आकाशाहूनही अति सूक्ष्मभावास प्राप्त होऊन निःशोक स्थितींत रहा. पुत्रा, तूं अगोदर विवेक–विलासवान् हो. समाधीच्या योगानें बाह्यकल्पनाभास सोड. पूर्णरूप हो. परानंदाचा अनुभव घे, आणि उत्तरोत्तर भूमिकाजय करीत अपरिच्छिन्न चैतन्याकार हो ११९.

**सर्ग १२०**—तीन मुमुक्षुभूमिका, चवथी मुक्त होत असलेल्या साधकाची भूमिका व शेवटीं तीन मुक्ताच्या भूमिका.

**मनु**—प्रथम शास्त्र व सज्जन यांच्या संपर्कानें प्रज्ञा वाढवावी. योग्याच्या योगाची ही प्रथम भूमिका आहे. विचारणा ही दुसरी भूमिका, असंगभावना ही तिसरी, वासनालयरूप विलापिनी चवथी, शुद्ध संविन्मय आनंदरूपा पांचवी, या अवस्थेंत जीवन्मुक्त अर्धा जागा व अर्धा निजलेला असा राहतो. स्वसंवेदन या नावाची सहावी भूमिका असून ती आनंदघनाकार आहे. त्या अवस्थेतील जीवन्मुक्ताची स्थिति निद्रित पुरुषासारखी असते. ही अतिशांत अवस्थाच तुर्या होय सौम्य समता व स्वच्छता हीच सातवी भूमिका आहे. तिला तुर्यातीता, असेंही म्हणतात. ही सातवी भूमिका अतिशय परिपक्व झाली असतां योगी जिवंत राहूं शकत नाहींत. पहिल्या तीन अवस्थांना जाग्रत् असें म्हणतात. चवथीला स्वप्न म्हणतात. कारण त्या अवस्थेंत योग्याला जग स्वप्नाप्रमाणें

भासतें. आनंदघनभावामुळें पाचवी अवस्था सुपुप्त या नांवाची आहे. साहव्या व सातव्या अवस्थांना क्रमानें तुर्या व तुर्यातीता म्हणतात, हें आताच सांगितलें आहे सातवी भूमि सर्वोत्तम व वाणीनें बोलता न येण्यासारखी आहे, सर्व दृश्याचा अभाव झाल्यामुळें खरी जीवन्मुक्तता त्याच दशेंत अनुभवास येते. त्यावेळीं योग्याला मी मरत नाहीं, जिवंत रहात नाहीं, सन् नाहीं, असन् नाहीं, असे वाटतें. तो त्यासमयीं आत्माराम होऊन राहतो. तो व्यवहार करीत असो, शांत बसलेला असो, गृहस्थ असो कीं एकाकी असो, मी कांहीं नाहीं, असें जाणूनच शोक करीत नाहीं. तो आपल्या अति शुद्ध स्वरूपाविषयीं निश्चित असतो. या जगांत जी जी वस्तु सुखकर आहे, असे वाटते तिचा नाश झाला असतां तीच दुःखकर होते. पण या अवस्थेत गेलेल्या जीवन्मुक्ताला, त्याच्या सर्व वासना क्षीण झालेल्या असल्यामुळें, कांहीएक सुखकर वाटत नाहीं. तो चंद्रासारखा शीतल असतो. यास्तव बा पुत्रा, तूंही वासनादि मलांचा त्याग करून सर्वत्र सत्ताशरूप मीच आहें, अशी भावना स्थिर कर १२०

सर्ग २२१—जीवाचा उत्कर्ष व अपकर्ष करणारी भावना

**मनु**—इक्ष्वाको, जोंवर विषयभोगाशा असते तोंवर आत्म्याला जीवता असते. ती आशाही अविवेकामुळें झालेली आहे, वस्तुतः नव्हे. वास्तव विवेकवशात् ती जेव्हां क्षीण होते, तेव्हां आत्मा जीवत्व सोडून ब्रह्मतेस प्राप्त होतो. यास्तव पुत्रा, रहाटगाडग्याच्या मोऱ्याप्रमाणे खालीं, वर व तिरकस जात राहूं नको. निग्रहानें आपल्या त्या चक्राकार गतीचा निरोध कर. हा मी व हें माझें, असे जे समजतात ते शठ उत्तरोत्तर अधोगामी होतात. पण हा अहंममरूप मोह सोडणारे साधु उत्तरोत्तर ऊर्ध्वगामी होतात. राजा, तू स्वप्रकाश आत्म्यास आपल्या शुद्धबुद्धीनें जाणून परिपूर्ण होऊन रहा व मग सर्व जगास खुशाल पहा. सर्व चिद्रूप पसरलेलें आहे, असें कळताच संसाराचें उल्लंघन होतें. ब्रह्मा, इंद्र, वरुण इत्यादि जें जें करितात तें सर्व मींच चिदात्मा करितों अशी भावना करावी. बा राजा, ज्या ज्या दर्शनामध्यें जें जें सांगितलें आहे तें सर्व सत्य आहे. कारण चिद्विलास निरंकुश आहे. चिन्मात्र झालेल्या व मृत्यूचें उल्लंघन करून गेलेल्या चित्तरहित पुरुषास जो

आनंद होतो तो निरुपम होय. यास्तव भुवन शून्य नाहीं, अशून्य नाहीं, चिद्रूप नाहीं, अचिद्रूप नाहीं, आत्मरूप नाहीं व अनात्मरूप नाहीं, असें चिंतन करीत रहा. या असल्या स्वरूपास प्राप्त होतांच प्रकृति शांत होते. मोक्ष या नावाचा कोणी पृथक् देश, काल किंवा इतर स्थिति नाहीं. तर भावना नावाचा प्रकृतीचा अहंकाराच्या क्षयानें विलय होणें, हाच मोक्ष होय. अशाप्रकारचा सर्वोत्तम मोक्ष प्राप्त झाला असता त्या जीवन्मुक्ताचें सर्व कौतुक नष्ट होतें. त्याला काव्यादिकाचें परिशीलन करावेंसें वाटत नाहीं. अनेक शास्त्राचा विचार करण्याची इच्छा रहात नाहीं व त्याचे सर्व विकल्प क्षीण होतात. तो नित्यस्वरूप होऊन रहातो १२१.

सर्ग १२२—तुर्यातीत पदीं स्थित झालेल्या मुक्ताच्या स्थितीचें वर्णन.

मनु—मिळेल ते पांघरून राहणारा, कोणी काय संतोषानें देईल तें खाणारा व वाटेल तेथें शयन करणारा जो असतो तो एखाद्या सार्वभौमासारखा शोभतो. जो पिंजऱ्यातून बाहेर पडणाऱ्या एखाद्या बलाढ्य सिंहाप्रमाणें वर्ण-धर्म व आश्रम याच्या आचाररूप शास्त्रयंत्रातून निघतो तो काहीं विचित्र शोभेस प्राप्त होतो. तो महासरोवराप्रमाणें गंभीर व प्रसन्न असतो, तो परमानंदरसानें आत्मस्वरूपातच रममाण होतो. सर्व कर्मफलाचा त्याग करणारा तो नित्य तृप्त असतो. पुण्यपापानें लिप्त होत नाहीं. स्फटिकमणि प्रतिबिंबाच्या योगानें जसा खरोखरच रंगित होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी कर्मफलानें आतून अतिरक्त ( आसक्त ) होत नाहीं. आरशातील प्रतिबिंबाला कापलें, तोडलें किंवा काहीं केलें तरी बिंबाला जसा त्यामुळें काहीं खेद होत नाहीं त्याप्रमाणें ज्ञानी लोकसमूहात विहार करीत असला तरी त्याला खेद व आल्हाद होत नाहीं. तो कोणाची स्तुति करीत नाहीं. कोणी त्याची स्तुति किंवा निंदा केली तर तो हृष्ट अथवा क्रुद्ध होत नाहीं. कोणी आदर केला अथवा निरादर केला तरी त्याला त्याचें काहीं वाटत नाहीं. लौकिकदृष्ट्या तो सर्व आचार व नीति याचें अनुकरण करीत असला तरी आपल्या दृष्टीनें काहीं करीत नाहीं. त्याच्यापासून लोक उद्विग्न होत नाहींत व लोकांपासून तो उद्विग्न होत नाहीं. ज्ञानी राग, द्वेष, भय आनंद इत्यादिकास कारण होणाऱ्या विषयाचा प्रारब्धवशात् कदाचित्

संग्रह करीत असला तरी सदा त्याचा त्यागच करतो. अतिशय कुशल-बुद्धि पुरुषही त्याला तत्त्वतः जाणूं शकत नाहीत. पण व्यवहारदृष्ट्या एकादा बालकही त्याला ओळखूं शकतो, व थोड्याशा अनुकूल आचरणानेंही वश करूं शकतो. कारण तो शुद्धचित्त असल्यामुळें त्याचा स्वभाव सरळ असतो. व सरळ स्वभावाच्या माणसाना हवा तो अधीन करून घेतो. आत्मज्ञान होताच त्याला मुक्ति प्राप्त झालेली असते व त्याच्या देहादिकाचा बाध झालेला असतो. त्यामुळें त्याला पुन. मुक्तीकरिता तीर्थाटनादि किंवा देहत्यागादि यांची चिंता करावी लागत नाहीं. कारण अहंभ्रांति हाच बंध व ज्ञानानें त्याचा क्षय होणें हाच मोक्ष होय, असें वर सांगितलेंच आहे. इक्ष्वाको, ज्याला ज्ञानविभूतीची इच्छा असेल त्या साधकानें अशा महात्म्याचें दर्शन घ्यावें, त्याची पूजा करावी, त्याची स्तुति करावी, त्याला नमस्कार करावा, व मोठ्या प्रयत्नानें त्याचा समागम करावा. पुत्रा, यज्ञ, तप, तीर्थ, दानें इत्यादिकांच्या योगानें तें परम पवित्र पद मिळत नाहीं तर ज्याचा संसाररोग जीर्ण झाला आहे, अशा आत्मज्ञ संताच्या भक्तीनेंच तें प्राप्त होतें.

**श्रीवसिष्ठ**—रामचंद्रा, असें सांगून तो भगवान् मनु ब्रह्मलोकीं गेला. इक्ष्वाकुही त्या दृष्टीचा आश्रय करून स्थिर झाला १२२.

**सर्ग १२३**—ज्ञानी अणिमादि सिद्धींविषयीं निरिच्छ असतो.

**श्रीराम**—भगवन्, वर सांगितलेल्या लक्षणांनी युक्त असलेल्या जीवन्मुक्तामध्यें इतर योग्याप्रमाणें आकाशगमनादि सिद्धि असतात कीं नाहीं?

**श्रीवसिष्ठ**—राघवा, आत्मज्ञाची बुद्धि इतर योग्यास अगम्य असलेल्या परमात्मतत्त्वामध्येंच अतिशय आसक्त असते. त्यामुळें तो नित्य तृप्त, प्रशांतात्मा, व सतत आत्मनिष्ठ असतो. मंत्र, तंत्र व तप याच्या योगानें सिद्ध होणाऱ्या आकाशगमनादि सिद्धींत काहीं विशेष आहे, असें त्याला वाटत नाहीं. अणिमादि ऐश्वर्याविषयीं इच्छा करणारे असंख्य असतात. त्याकरिता प्रयत्न करणारे त्याहून थोडे व ज्यांना तें मिळालें आहे, असे तर फारच थोडे योगी या जगांत आढळतात. एवढ्यासाठीं त्या ( ऐश्वर्या ) ला अपूर्व असें म्हणण्याचा जरी परिपाठ आहे तरी ज्ञानी पुरुषाला तेंही एक जगाचाच भाग दिसत असतो आणि जग मिथ्या

असल्यामुळें त्याबरोबर अज्ञाना अतिशय प्रिय वाटणारेंही ऐश्वर्य त्याला तृणासारखें तुच्छ भासतें. ज्ञानी व अज्ञ याच्यामध्यें हाच विशेष आहे. ज्ञान्याचें मन सर्वास्थाशून्य असल्यामुळें नीराग व निर्मल असतें. तो कोणत्याही पदार्थामध्ये आसक्त होत नाहीं. ज्याचा संसारसंज्ञक दीर्घ भ्रम शांत झाला आहे अशा त्या महापुरुषाचें काम, क्रोध, विषाद, मोह, लोभ व दुःख याचा उत्तरोत्तर क्षय, हेंच मुख्य लक्षण आहे. त्याच्या इतरचिह्नरहित आकारात याहून अधिक दुसरें कोणतेंही लक्षण आढळत नाहीं १२३.

**सर्ग १२४**—जीवाचें निष्कारणत्व, प्राप्त रागानें बद्धत्व, तीन रूपें, तीन अवस्था, तुर्य व मृगव्याधाख्यान.

श्रीवसिष्ठ—जसा एकादा शूद्रा स्त्रीची इच्छा करणारा ब्राह्मण तिचा संभोग, सहवास इत्यादि दुरिच्छेनें आपल्या वर्णास व आश्रमास उचित असलेल्या सात्त्विक धर्माची हळू हळू उपेक्षा करून काहीं दिवसानीं शूद्रत्वाचा अंगीकार करतो, त्याप्रमाणें ईश्वरही बुद्ध्यादिकाच्या संगतीने तिच्यापासून मिळणाऱ्या भोगाच्या आशेनें आपल्या नित्य शुद्ध पूर्णानंदस्वरूपाची उपेक्षा करून जीवत्वाचा अंगीकार करतो. हिरण्यगर्भात्मक आद्य स्पंदापासून मायानगराप्रमाणें झालेली भूतें भोग्य व भोक्तृरूपानें दोन प्रकारचीं आहेत. उपाधिप्राधान्यानें भोग्यरूप व उपहितप्राधान्यानें भोक्तृरूप भूतें होतात. पण त्याच्या उत्पत्तीला अवश्य असलेली कारणसामग्री नसतानाच तीं उत्पन्न होतात. म्हणून उचित सामग्रीवाचून उत्पन्न होणाऱ्या स्वप्नातील गजाप्रमाणें तीं मिथ्या आहेत. जन्म व कर्म याचा बीज व अंकुर याप्रमाणे अनादि ( स्वाभाविक ) परस्पर कार्यकारणसंबंध आहे. तेव्हा आद्यसृष्टींत कर्मशून्य ईश्वराचा जीवभावानें जन्म कसा होतो, म्हणून विचारशील तर सांगतो. ईश्वराला जीवभाव प्राप्त होण्यास कर्माची अपेक्षा नसते. तर त्याला जीवभाव प्राप्त झाल्यानंतर देहादिकाना उत्पन्न करण्याच्या वेळीं पूर्वपूर्व देहादिकानीं केलेल्या कर्माची अपेक्षा असते. ज्याप्रमाणें सूर्याला जलात प्रतिबिंबित व्हावयाचें असता चलनादि क्रियाची अपेक्षा नसते, पण निरनिराळ्या तरंगात प्रतिबिंबरूपानें जावयाचें झाल्यास उपाधीच्या क्रियेची अपेक्षा

असते, त्याप्रमाणें हा प्रकार जाणावा. अर्थात् ईश्वरापासून उत्पन्न होऊन भूतें आपल्याच ( म्हणजे उपहित चिदाभासाच्या ) कर्मांनीं दुसरे अनेक जन्म घेतात. सारांश जन्म व कर्म याचा हा असा कार्यकारणभाव आहे. पण सर्व जीव परमपदापासून निष्कारण उत्पन्न होतात, नंतर त्यांचींच कर्मे त्यांच्या सुखदुःखास कारण होतात. जो कोणी आपणाला जसा जाणतो तसाच संकल्प करतो व संकल्पाप्रमाणे कर्म करतो. आपण नेहमीं पाहतों कीं मनुष्य देहच आत्मा ( मी ) आहें अशा समजुतीवाचून पुण्यपापाचा संकल्प अथवा त्याचें आचरण करूं शकत नाहीं. देहाध्यासही संकल्पाच्या द्वाराच पुण्यपापप्रवृत्तीचें कारण आहे. यास्तव संकल्पाला सोड. निःसंकल्पत्व हाच मोक्ष आहे. त्याच्याच अभ्यासांत तत्पर हो. हे अमुक विषय ग्राह्य आहेत व मी ग्राहक आहें. हा भेदभ्रम असला म्हणजे ग्राहकाला ग्राह्यांतील अमुक अनुकूल आहे, अमुक प्रतिकूल आहे, इत्यादि अनुसंधान आणि तदनुरूप ग्रहण व त्याग करण्याविषयीं संकल्प होतो. पण तो भेदभाव सोडून त्याच्या साक्षीचे ठायीं ऐकाग्र्यलक्षण सावधानत्वाचा अभ्यास केला असतां संकल्पाचें मूळच तुटतें. यास्तव रामा, तूं ग्राह्यग्राहकरूप होऊं नको. तर सर्व भावना सोडल्यानंतर जें अवशिष्ट राहील तत्परायण हो. इंद्रियांच्या विषयामध्यें आसक्ति ठेविली कीं प्राणी बद्ध झालाच. तुला कोणत्याही पदार्थाची रुचि लागली कीं बद्ध झालासच म्हणून समज. जगांतील कांहींएक न आवडणें हेंच मुक्ताचें चिह्न आहे. यास्तव रामा, तूं या सृष्टींतील तृणापासून ब्रह्मलोकापर्यंत जे असंख्य चराचर पदार्थ आहेत, त्यांतील एकाचीही इच्छा करूं नकोस. तूं सर्व करीत व भोगीत असलास तरी वस्तुतः कर्ता किंवा भोक्ता नाहींस. तूं मुक्तचित्त व शांत हो. संत झालेल्या गोष्टीविषयीं पश्चात्ताप करीत नाहींत व होणाऱ्याविषयीं संकल्प करीत नाहींत. तर कर्माप्रमाणें प्राप्त होणारें वर्तमान मात्र ग्रहण करितात. तृष्णा, मोह, मद इत्यादि भाव मनामध्यें ग्रथित आहेत. हे रामा, विद्वान् पुरुषानें विवेकयुक्त मनानेंच विक्षिप्त मनाचा छेद करावा. लोखंडाच्या अरीनेंच जशा लोखंडाच्या कांबी व गजही तोडतां येतात, त्याप्रमाणें तुला तीक्ष्ण विवेकानें मनाचा उच्छेद करतां येणें शक्य

आहे. सुज्ञ लोक क्षारादि मलानेंच वस्त्रातील मल घालवितात, अस्त्राचें निवारण अस्त्रानें करितात व विष विषानें मारतात, हें प्रसिद्धच आहे. स्थूल, सूक्ष्म व पर अशीं जीवाचीं तीन रूपें आहेत. त्यातील याच्या पर रूपाचें सेवन कर व दुसरीं दोन्हीं टाक. हात-पाय इत्यादिकांनीं युक्त असा जो हा देह आहे तो भोगाकरिता चेष्टा करीत असतो. अर्थात् तेच त्याचें या जगातील भोगार्थ स्थूलरूप आहे तसेंच हे रामा, संसार असेपर्यंत राहणारें व स्वसंकल्पमयाकार असें जें चित्त हेंच जीवाचें आतिवाहिक रूप आहे. आद्यन्तरहित, सत्य, चिन्मात्र, निर्विकल्प व सर्व जगाला सत्ता व स्फूर्ति देणारें असें जे त्याचें तिसरें रूप तेच शुद्ध तुर्यपद आहे. त्यात तू स्थिर हो. पहिल्या दोन शरीरात आत्मबुद्धि ठेवूं नकोस.

**श्रीराम**—प्रभो, जाग्रत्स्वप्न व सुषुप्ति यामध्यें अनुभवास न येणारें म्हणजेच गुप्त असलेलें तुर्यपद मला विशेष स्पष्ट करून सांगा.

**श्रीवसिष्ठ**—जाग्रत् व स्वप्न यामध्यें 'अहं' असा भाव असतो, त्यालाच विक्षेप म्हणतात. सुषुप्तींत तो नसतो. पण त्यावेळीं मूळ आवरण असतें व्यष्टिरूप जीवाच्या याच दोन उपाधि आहेत. उपनिषदांत सत् व असत् या शब्दांनीं सांगितलेल्या ज्या दोन दशा त्या समष्टि उपाधि होत. त्यास सोडून जे असक्त, सम, स्वच्छ तत्त्व राहतें तेच तुर्य होय. जी स्वच्छ व शांत समता, जीवन्मुक्ताची स्थिति व व्यवहारसमयीं साक्षीची अवस्था ती तुर्यकलना होय. तें तुर्य म्हणजे जाग्रत् किंवा स्वप्न नव्हे. कारण त्यात संकल्पाचा अभाव असतो. त्याचप्रमाणें सुषुप्तभावही नव्हे. कारण त्यात अज्ञानाचा (जडदशेचा) अभाव असतो. जीवन्मुक्तांना हे जग जसें आहे तसेंच जरी दिसत असलें तरी तें ज्ञानानें बाधित झालेलें असतें व अज्ञानां तें स्थिर वाटतें. अहंकाराचा त्याग केला, समतेचा उदय झाला व चित्त विलीन झालें म्हणजे तुर्यावस्था आपोआप उपस्थित होते. रामा, आता मी तुला दृष्टान्त सांगतों तो ऐक. म्हणजे तुला झालेलें ज्ञान आणखी परिपक्व होईल.

कोणा एका अरण्यात हरणास बाणानें वेध करून, जीव घेऊन पळणाऱ्या त्याच्या मागोमाग आलेला एक लुब्धक महामौन धारण करून

बसलेल्या एका मुनीला पाहून असा अद्भुत प्रश्न करूं लागला.–मुने. माझ्या बाणानें विद्ध झालेला एक मृग येथें आला; पण तो कोणीकडे गेला आहे? येथें दिसत नाहीं! तेव्हा मुनि त्यास म्हणतो–साधो, आम्ही वनवासी समशील मुनि आहों. आम्हाला व्यवहारास अत्यंत अवश्य असलेला अहंकार नाहीं. हे मित्रा, मन सर्व इंद्रियकर्मे करीत असतें, पण माझें अहंकारमय ( अहकारप्रचुर ) मन फार दिवसापासून विलीन झालें आहे. मी जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या नावाच्या दशा जाणतहि नाहीं. तर एका तुर्यामध्ये राहतों. तेथें दृश्य नसते.

हें त्याचें वचन ऐकून त्याचा भावार्थ न समजताच लुब्धक इष्ट दिशेस निघून गेला. यास्तव विद्वानाचा अनुभव व श्रुति यांच्या योगानें बाधित झाल्यामुळें जाग्रदादि व स्थूलादि दशा नाहींत निर्विकल्प चित्च तुर्य आहे, व तेंच एक आहे दुसरें काहीं नाहीं. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति हे चित्ताचें रूप आहे, ते घोर, शांत व मूढ असतें. घोरचित्त हीच जाग्रदवस्था, शांतचित्त स्वप्न, व मूढचित्ताला सुषुप्ति म्हणतात, या तिन्ही दशानीं रहित असलेल्या चित्ताला मृत ( मेलेलें ) चित्त म्हणतात मेलेल्या चित्तामध्यें एक सम सत्त्व असतें. सर्व योगी मोठ्या यत्नानें त्याचेंच संपादन करितात, यास्तव तूं तुर्यपदीं स्थित हो. कारण त्या परमपदीं स्थित असलेले महात्मे मुनि सदाच मुक्त असतात, १२४

**सर्ग १२५**—ज्याविषयीं वादाना भ्रम पडतो त्या तुर्यामध्ये स्थिर होण्याचे उपाय

**श्रीवसिष्ठ**—आत्मभिन्न वस्तूंचा निषेध करणें हा सर्व अध्यात्म शास्त्राचा सिद्धान्त आहे अविद्या नाहीं, माया नाहीं, तर शांत सर्वव्यापी ब्रह्म आहे. पण हा सिद्धान्त न समजल्यामुळेंच आपापल्या बुद्धिवैभवाप्रमाणें जगाचें मूळ शोधण्याविषयीं प्रयत्न करणाऱ्या विचारी लोकानीं या सर्वशक्तिसंपन्न मायाशबल ब्रह्माविषयीं बुद्धिदोषामुळें नानाप्रकारच्या कल्पना केल्या आहेत. कोणी तें मूळ शून्य आहे, असा निर्णय केला. कोणी केवल विज्ञान आहे, असें ठरविलें व कोणी ईश्वराचें स्वरूपच जगाचें मूळ आहे असा निश्चय केला. नंतर ते आपापलें मत स्थापण्याकरिता एकमेकाशीं अनेक युक्तिप्रयुक्ति योजून विवाद करूं लागले. यास्तव तूं आता सर्वत्याग करून महामौनी हो. कारण वादात पडणें,

म्हणजे आपल्या शांतीचा भंग करणें आहे. तूं मननरहित, क्षीणचित्त व शांतबुद्धि हो. आत्म्यामध्येंच स्थिर होऊन मूक अंध व बधिर याप्रमाणें नित्य अंतर्मुख रहा. रामा, जाग्रतींतच सुषुप्तीसारखा राहून कर्म कर. आतून सर्वत्याग करून बाहेरून प्राप्त कर्तव्य कर. चित्ताची सत्ता हें परम दुःख व चित्ताची असत्ता हें परम सुख आहे. यास्तव कशाचाही संकल्प न करितां चित्तशत्रूचा क्षय कर. रम्य किंवा अरम्य वस्तु पाहून पाषाणाप्रमाणें सम रहावें एवढा स्वप्रयत्न केला म्हणजे संसार जिंकल्यासारखा होतो. सुख, दुःख व त्यांचे उपाय यांचें चिंतन करूं नये. एवढ्या यत्नानेंही अनंत दुःखनाश प्राप्त होतो १२५.

**सर्ग १२६**—योगभूमिच्या अभ्यासाचा क्रम व लक्षणें, मध्येंच मेल्यास भोग व जन्मांतरीं जय.

**श्रीराम**—प्रभो, सात योगभूमींचा अभ्यास कसा करावा ? व प्रत्येक भूमिकेंतील योग्याचीं चिन्हें काय आहेत ?

**श्रीवसिष्ठ**—पुरुष स्वर्ग व मोक्ष यामध्यें प्रवृत्त व निवृत्त असा दोन प्रकारचा असतो, त्यांचें लक्षण ऐक. निर्वाण हें काय आहे? मला संसारच चांगला वाटतो; असें म्हणून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कर्मानुष्ठान करणारा पुरुष प्रवृत्त होय. तो अनेक जन्मानंतर विवेकी होतो. संसाराची व्यथा असार आहे. मला ती बस झाली. त्याच त्या कर्माचें प्रतिदिवशीं अहोरात्र अनुष्ठान करीत असल्यानें कोणता लाभ होणार आहे ? यापेक्षा सर्वक्रियारहित व अत्यंत विश्रांतियुक्त असें काय बरें असेल ? असा मनांत विचार करून कांहीं झालें तरी मी तेंच संपादन करणार, असा निश्चय करणारा पुरुष निवृत्त होय. पूर्ण विरक्त होऊन मी संसारसागरास कसा बरें तरून जाईन, या विचारांत जेव्हां एकादा सद्बुद्धिमान् निमग्न होतो, तेव्हां तो प्रत्यहीं भावनारहित व उत्तरोत्तर निरिच्छ होत जातो. उत्तमोत्तम क्रिया करतो. प्रतिदिवशीं आनंदित होतो. ग्राम्य मूढ चेष्टांचा नित्य तिरस्कार करतो. दुसऱ्याच्या गुप्त दोषांचें आविष्करण करीत नाहीं. पुण्य कर्मेंच करतो. मनास उद्विग्न न करणाऱ्या मृदु कर्मांचेंच सेवन करतो. नेहमीं पापास भितो. भोगाची अपेक्षा करीत नाहीं. स्नेह व प्रेम.

यानीं भरलेलीं, मृदु, देशकालोचित, व योग्य भाषणें बोलतो. राघवा, निवृत्त पुरुष या दशेस प्राप्त झाला, हे सर्व गुण त्याच्यामध्यें आले म्हणजे तो प्रथमभूमिकेस प्राप्त होतो. शरीर, मन व वाणी यांच्या योगानें जो सज्जनाचें अनुसेवन करतो, ज्ञान शास्त्रे मिळतील तेथून संपादन करून त्याचा विचार करतो, व अशा रीतीनें संसाराचें उल्लंघन करण्यास जो सज्ज झालेला असतो त्या सज्जनास भूमिकावान् म्हणतात. बाकीचे सर्व नुस्ते श्रवणादि करीत असले तरी स्वार्थी होत. विचार नांवाच्या दुसऱ्या भूमिकेस प्राप्त झालेला अधिकारी योगी श्रुतिस्मृतिप्रोक्त सदाचार, यम, नियम व आत्मानुभव यांनी युक्त असलेल्या उपदेशकुशल गुरूचा आश्रय करतो. स्वतः व्याकरणादिकांच्या योगानें पद–पदार्थज्ञान संपादन करतो. त्याच्या योगानें कार्याकार्याचा निर्णय करतो. लोकमर्यादेकरितां म्हणून प्रथम धारण केलेली मद, क्रोध इत्यादि वृत्ति सोडतो आणि शास्त्र, गुरु व सज्जन यांच्या सेवनानें सर्व रहस्य जाणतो. त्यानंतर तो असंसक्ति नांवाच्या तिसऱ्या भूमिकेंत प्राप्त होतो. शास्त्रार्थामध्यें निश्चल बुद्धि ठेवून तापसाच्या आश्रमांत न राहणें, अध्यात्मसंबधी विचार करणें, संसाराची निंदा करून वैराग्य उत्पन्न करणाऱ्या गोष्टी बोलणें, व शिळेला शय्या समजून व त्यावर बसून आयुष्य घालविणें, हे व्यवहार तो करतो. चित्त-शांतीनें अतिशय शोभणाऱ्या, वनवासविहारानें व असंगसुखानुभवानें तो आपला काल नेतो. शास्त्राच्या उत्तम अभ्यासानें व पुण्य कर्मांच्या अनुष्ठानानें प्राण्याची वस्तुदृष्टि प्रसन्न होते. तिसऱ्या भूमिकेस प्राप्त झालेला ज्ञानी स्वतः दोन प्रकारच्या असंसंगाचा अनुभव कसा घेतो, तें ऐक. असंसंग सामान्य व श्रेष्ठ असा दोन प्रकारचा आहे. मी कर्ता, भोक्ता, बाध्य व बाधक नव्हे, असें समजून विषयांत आसक्त न होणें, हा सामान्य असंसंग होय. सुख, दुःख, इत्यादि सर्व पूर्वकर्मनिर्मित व म्हणू-नच ईश्वराधीन आहे, त्यांत माझें कर्तृत्व कसलें, भोग व अभोग हे दोन्ही महारोग आहेत, संपत्ति परम आपत्ति आहेत, संयोग वियोगासाठींच होतात, यास्तव त्या आधि व व्याधि आहेत, काल सर्व पदार्थांस एक सारखा खावयास तयार आहे, इत्यादि समजून अनास्थेनें मनांत पदार्थांची भावना न करणें, हा सामान्य असंसंग आहे. याचें अनुष्ठान पहिल्या दोन

भूमिकातच करावें. अध्यात्मशास्त्राचें श्रवण व मनन वारंवार करावें. नंतर आत्मवस्तु अशीच आहे, असा विश्वास बसला असता श्रेष्ठ असंसंग उदय पावतो. मी कर्ता नव्हे, ईश्वर कर्ता आहे, माझें प्राक्तन किंवा आताचें क्रियमाण कर्म नाहीं, इत्यादि कल्पना सोडून मौन धरून शान्त राहाणें हा श्रेष्ठ असंसंग आहे. निदिध्यासनाचा परिपाक झाला असता निर्विकल्प समाधीनें असणें हाच श्रेष्ठ असंसंग होय, ही तिसरी भूमिका म्हणजे विवेकवृक्षास लागलेलें मधुर फळच आहे. अनेक जन्मातील संचित पुण्याच्या परिपाकामुळें व ऐहिक पुण्यसंचयामुळें दैववशात् प्रथम भूमिका उत्पन्न झाल्यास तिचेंच विवेक जलसेकादि मोठ्या यत्नानें रक्षण करावें. कारण तिचें रक्षण केलें असता पुढें अनायासानें तिचाच द्वितीयादि भूमिकामध्यें परिणाम होतो. यास्तव उत्पन्न झालेल्या प्रथम भूमीचेंच सरक्षण करावें. तिचाच अधिक विस्तार होईल अशा रीतीनें तिची विचारानें वृद्धि करीत रहावें. कारण वृक्षाच्या मूळाप्रमाणें ही चागली पुष्ट झाली म्हणजे पुढच्या भूमिका आपोआप सिद्ध होत जातात. पहिल्या भूमीपासून दुसरी व दुसरीपासून तिसरी भूमिका मोठ्या यत्नानें प्राप्त होते. वर सागितलेली श्रेष्ठ असंसगता हीच तिसरी भूमिका होय. हिच्यामध्यें पुरुष सर्वसंकल्परहित असतो.

**श्रीराम**—प्रभो, मूढ, असत्कुलात उत्पन्न झालेला, अध्यात्मकथेपासून विमुख असलेला, कर्मभोगार्थ प्रवृत्त होणारा व अधम, अशा पुरुषाला दुसऱ्या एकाद्या उपायानें मोक्ष मिळू शकतो कीं नाहीं ? त्याच प्रमाणें एकादा श्रद्धाळु साधक योगभूमिकामध्यें प्रवृत्त झाला आहे. पण पहिल्या तीन भूमिकातील कोणत्या तरी एका भूमिकेत असतानाच मेला, तर त्याला कोणती गति मिळते ? कारण चवथ्या भूमींत जाई तों साधकाला अपरोक्ष ज्ञान नसते, म्हणून विचारतों.

**श्रीवसिष्ठ**—दोषानीं भरलेल्या मूढाचा संसार तर उत्तरोत्तर विस्तार पावत जातो. कारण त्याला असाधूचीच संगत मिळणार, हें उघड आहे. त्यामुळें त्याच्या मनात वैराग्याचा उदयच होत नाहीं. वैराग्यावाचून भूमिकाप्रवेश होणें अशक्य आहे. पुरुषाला वैराग्य झालें कीं भूमिकाचा उदय झालाच पाहिजे. त्याचा उदय झाल्यानें संसार नष्ट होतो, असा शास्त्रनिश्चय

आहे. योगभूमिकेमध्यें आरूढ झाल्यावर ज्याचा देहान्त होतो त्याचें पूर्व पाप भूमिकेच्या अंशाप्रमाणें नष्ट होतें. पापाचा क्षय झाल्यामुळें तो पुण्यवानाच्या उत्तम लोकीं गमन करतो. त्यात तो विमानें, लोकपालाचीं नगरें, यातील उत्तम भोग्यपदार्थ इत्यादिकाचा उपभोग घेतो. नंतर पुण्य क्षीण झाल्यावर पुनरपि तो या लोकीं गुणवान् श्रीमानाच्या अथवा विरक्त दरिद्राच्या घरीं जन्म घेतो. असला जन्म दुर्लभ आहे. त्यानंतर पूर्वीच्या, योगवासनेनें युक्त असलेला तो पुनः भूमिकाचा अभ्यास करूं लागतो, व क्रमानें शेवटच्या भूमिकेस पोंचतो. रामा, पहिल्या तीन योगभूमिकास जाग्रत् अवस्था म्हणतात. कारण या भूमिकेतील योग्याला जगाचा अनुभव येत असतो शिवाय या भूमिकाचा अभ्यास करणाऱ्या योग्याचे ठायीं उत्कृष्ट सद्गुण उत्पन्न होऊन ते इतरास पूज्य होतात. त्याच्याकडे पाहून मंदबुद्धि पुरुषानाही मुक्त होण्याची इच्छा होते. कारण ते श्रेष्ठ पुरुष आपलीं सर्व नित्य, नैमित्तिक कर्मे पूर्णपणें करितात व सर्व अकृत्ये सोडतात तो वृद्धाच्या शास्त्रीय आचाराप्रमाणें आपलें चित्त प्रसन्न होईल, अशा रीतीनें सर्व लौकिक व्यवहारही करितो. म्हणून असल्या श्रेष्ठाला आर्य म्हणतात. त्याचें आर्यत्व पहिल्या शुभेच्छा नावाच्या भूमिकेंत नुस्तें अंकुरित होतें. दुसऱ्या विचारणाभूमिकेंत विकास पावतें व तिसऱ्या भूमीत फळास येतें. साराश, असल्या या आर्यतेमध्ये मेलेला योगी शुभसंकल्पामुळें प्राप्त झालेल्या भोगाचा चिरकाल अनुभव घेऊन पुन योगवान् होतो. पहिल्या तीन भूमिकाच्या उदयामुळें अज्ञान क्षय पावलें असता, व यथार्थ ज्ञानाचा उदय होऊन चित्त पूर्ण चंद्रोपम झालें असता, योगी चवथ्या भूमीत जातो. तेथें आदिअंतरहित सर्व सम तत्त्व पाहतो. रामा, अद्वैत स्थिर झालें असता व द्वैत शात झालें असता या चवथ्या भूमींत गेलेले योगी लोकास स्वप्नाप्रमाणें पाहतात. म्हणूनच पहिल्या भूमींना जशी जाग्रत् तशी या भूमीला स्वप्न ही सज्ञा आहे. हिचा पुष्कळ दिवस सतत अभ्यास केला असता पाचव्या भूमीस प्राप्त झालेला योगी सत्तामात्र स्वरूपानें अवशिष्ट रहातो. सर्व विशेष शात झाल्यामुळें तो केवल अद्वैतांत असतो. त्याला आतल्या आत अतिशय आनंद होतो. बाह्य हालचाल करीत असतानाही

निद्रित पुरुषाप्रमाणें तो अंतर्मुख असतो. अति शांत स्वभावामुळें तो निद्राळूसारखा असतो. या अवस्थेचा अभ्यास करणारा तो वासनाशून्य पुरुष सहाव्या तुर्या नावाच्या भूमीस जाऊन पोंचतो. त्या अवस्थेत सत्-असत्, अहं नाहं इत्यादि कल्पना मुळींच नसून तो केवळ मननरहित व द्वैतक्यशून्य असतो. त्याच्या सर्व हृदयग्रंथी ( आशादि पाश ) नाहींशा झालेल्या असतात. तो सागरांतील कुंभाप्रमाणें आंत बाहेर परिपूर्ण ( तृप्त ) असतो. या तुर्यसंज्ञक सहाव्या भूमीत कांहीं काल राहून तो शेवटच्या सातव्या भूमीस जातो. सातवी योगभूमि हीच विदेहमुक्ति होय. तिचें वाणीनें वर्णन करवत नाहीं. ही संसारभूमीची सीमा आहे. कोणी ( शैव ) तिला शिव म्हणतात, कोणी ( वेदान्ती ) ब्रह्म म्हणतात. कोणी ( सांख्य व योगज्ञ ) पुरुष व प्रकृति यांचा विवेक म्हणतात, आणखी दुसरेही निरनिराळे विचारी लोक या अवस्थेलाच निरनिराळीं नांवें देतात. हिचा उल्लेख शब्दांनीं करतां येत नाहीं. असो, रामा, मी या सात योग-भूमि तुला सांगितल्या आहेत. यांचा अभ्यास केल्यास दुःखाचा अनुभव येत नाहीं. रामा, एक अतिशय मदोन्मत्त दंताळ व धिप्पाड हत्तीण आहे. ती अनेक अनर्थ करीत असते. तिला मारणें हा मोठाच पुरुषार्थ आहे. रणभूमींत तिला न जिंकणारा पुरुष खरा वीर आहे असें मी तरी निदान समजत नाहीं.

**श्रीराम**—ती मत्त हत्तीण कोण आहे ? रणभूमि कोणत्या ? तिला कसें मारलें जातें ? व ही दीर्घ काल कोठें रममाण होते ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, हें मला असावें अशा प्रकारची इच्छा हीच ती मी सांगितलेली हत्तीण आहे, ती मत्त होऊन शरीररूपी अरण्यांत मोठा कल्लोळ करून सोडते, मत्त इंद्रियें हींच तिचीं पोरें असून जिह्वेच्या मार्गानें ती मधुर ध्वनि करते. मनोरूपी किर्र झाडींत ती राहते. पुण्य व पाप कर्म यांच दोन दातांनीं ती युक्त असते. सर्व प्रकारें वृद्धि पावत जाणारा वासनाव्यूह हाच तिचा मद आहे. संसारदृष्टि याच तिच्या समरभूमि आहेत. त्यामध्यें नर वारंवार जय व पराजय यांचा अनुभव घेत असतो, ही हत्तीण विषयाकरितां कृपण होणाऱ्या जीवसमूहास

मारते. निरनिराळ्या वृत्तींवरून हिला वासना, इच्छा, मन, चित्त, संकल्प, भावना, स्पृहा इत्यादि भिन्न भिन्न नांवें प्राप्त होतात. हिला धैर्य नामक श्रेष्ठ खड्गानेंच मारता येणें शक्य आहे. जगत् सत्य आहे. ही वासना मनांत असेपर्यंत दुष्टसंसार राहतोच. मन 'मला हे हवें' इतकें जोंवर म्हणत असतें तोंवर संसार असतो. फार काय पण त्याला असें वाटणें हाच संसार आहे. या वाटण्याचा क्षय होणें हाच मोक्ष होय. कारण राग-द्वेषादि पुरुषापराधानें चित्त मलिन झालें असता श्रुति व आचार्य यांची उपदेश-वाणी कमलपत्रास जसें पाणी, तशी त्याला स्पर्श करूं शकत नाहीं. पण तेंच चित्त वैराग्यादि साधनसंपन्न झालें असता ती (उपदेशवाणी) चित्तांत दृढ बसते. तिच्या योगानें चित्तमळ निघून जातो. तें प्रसन्न होतें. विषयस्मरण सोडल्यानेंच इच्छारूप भवांकुर उदय पावत नाहीं. थोडीशी उत्पन्न झालेलीही अनर्थकारिणी इच्छा अस्मरणरूप खड्गानें तोडावी. इच्छेनें व्यापलेला पुरुष भोगाकरिता कृपण होतो. मनांत विषयचिंतन न करता स्वस्थ असणें हेंच अस्मरण आहे. त्याच्या प्राप्तीकरिता निरोधाचा अभ्यास केला पाहिजे. म्हणजे अभ्याससमयीं तें सावधानतारूप व परिपाकसमयीं अवधानरहित आपो-आप होतें. उत्तम लोक हें मला असो, या वेगालाच कल्पना म्हणतात. आणि विषयाचें चिंतन न करणें हा कल्पनात्याग आहे, कारण स्मरण हाच संकल्प आहे व अस्मरण हेंच कल्याण आहे. स्मरणामध्यें म्हणजे व संकल्पाचे वेळीं पूर्वी ज्याचा अनुभव घेतला आहे तें व ज्याचा अनुभव घेतलेला नाहीं, तें अशीं दोन्हीं मनांत येतात. यास्तव त्याचा त्याग करून काष्ठाप्रमाणें रहा. सर्व विसरून गूढ रहा. असंकल्प हेंच परम श्रेय आहे असें मी हात वर करून व ओरडून सांगत आहें, मग तुम्ही त्याचा आश्रय आतून कां करीत नाहीं. बा रामा, जेथें परम साम्राज्यही तृणासारखें होतें. तें परम पद तूष्णीं स्थितींत राहिल्यानेंच मिळतें. इष्ट प्रदेशाकडे निघालेल्या वाटसराचे पाय त्याच्या संकल्पावाचून चालत असतात, त्याप्रमाणें प्रारब्धाच्या जोरानें संकल्परहित पुरुषाचाही व्यवहार होऊं शकतो. याविषयीं उगीच अधिक बोलून काय करावयाचें आहे? मी थोडक्यांत सांगतों, तें ऐक. संकल्पन हा पर बंध व असंकल्पन हा

मोक्ष आहे. यास्तव सर्व अज, शांत, अनंत, ध्रुव, अव्यय, चिद्रूप आहे, असें पहात तुला सुख होईल त्या रीतीनें शान रहा. अस्मरण, या योगामध्यें स्थित होऊन तूं पाहिजे तर लोकसंग्रहार्थ कर्मे कर. अथवा तुला लोकसंग्रहाचीहि गरज आहे, असें वाटत नसल्यास समाधिपरायण होऊन रहा. पण स्वरूपास प्राप्त झाल्यावर तूं स्वाभाविकदशेत स्थित हो. रामा, केवल त्या एक, सर्वगत, शांत व शुभ ज्ञानस्वरूपाची भावना करणें, हाच सर्वत्याग आहे, असें सुज्ञ जाणतात. यास्तव मनांत त्याची भावना करीत आपलें कर्तव्य कर्म कर. 'मी व माझें' असें जाणणारा कोणीही दुःखापासून मुक्त होत नाही, व न जाणणारा मुक्त होतो, असा नियम आहे. आता तुला वाटेल तसें कर १२६.

सर्ग १२७—रामाची विश्रांति, भरद्वाजाच्या उत्सुक उक्ति, जाग्रदादिकांचें लक्षण व तुरीय.

श्रीभरद्वाज—भगवन्, वासिष्ठ महर्षानें असा महोपदेश केला असतां हें ज्ञानसार पुराण ऐकून श्रीरघुकुलातील अग्र्य रामानें जिज्ञासेनें आणखी कांहीं विचारलें कीं, एवढ्याच उपदेशानें संदेहरहित होऊन, साक्षात् आत्मसुखानें परिपूर्ण झाला? आपण कदाचित् म्हणाल कीं, तूंही रामानें ऐकलेलाच ग्रंथ ऐकला आहेस, तेव्हां आपल्यावरून तूं त्याच्या स्थितीचें अनुमान कां करित नाहीस? पण माझ्यामध्यें व राममध्यें मोठें अंतर आहे. तो परमयोगी, विश्ववंद्य, सुरेश, जन्ममरणरहित, शुद्ध बोधस्वरूप, सकलगुणनिधान, रमेचा आधार, व त्रिभुवनाचा उदय व रक्षा करणाऱ्या अधिकारी जीवाचा अधिपति आहे. म्हणून विचारतों.

श्रीवाल्मीकि—वेदान्तसंग्रहरूप, असें वसिष्ठाचें वाक्य ऐकून ज्याला सर्व ज्ञान झालें आहे, असा कमलनयन राम क्षणभर स्वस्वरूपीं विकास पावला. कारण तो स्वतः चैतन्यानंदसागरच होता. तो प्रश्नोत्तरादिकांस अत्यंत अवश्य असलेल्या—मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या व्यापारानें रहित झाला. त्याचे प्राण आनंदामृतानें परिपूर्ण झाले. त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. तो महा सामान्यरूप झाल्यामुळें चिद्व्यापक होऊन राहिला. सतत अष्टगुणैश्वर्यसंपन्न असूनही तो आपल्या मनोरथास तृणाप्रमाणें तुच्छ जाणूं लागला. निरतिशय आनंदरसात एकरूप होऊन गेलेला तो

महात्मा आणखी काहीं बोलला नाहीं. ( याप्रमाणे उत्तमाधिकारी रामाला नुसत्या श्रवणानेच ब्रह्मप्राप्ति झाली, असे सांगून मंद व मध्यम अधिकाऱ्याच्या चित्तशुद्धीकरिता विशेष प्रकारची उपासना व तीन अवस्थांचा विवेक, दृश्याचा विलाप, इत्यादि मननोपाय सांगण्याकरिता वाल्मीकिमुनि भारद्वाजाचे औत्सुक्यादि राजा अरिष्टनेमीस सांगतात ).

**श्रीभारद्वाज**—भगवन्, खरोखर रामाला केवळ श्रवणानेंच महत्पदाची प्राप्ति झाली, याचे मला मोठें आश्चर्य वाटतें. हे मुनिश्रेष्ठा, आम्हाला त्या दशेची प्राप्ति कशी होईल? कारण माझ्यासारखे मूर्ख, स्तब्ध, किंचिज्ज्ञ व पापी कोठें व ब्रह्मदेवादिकांकडून प्रार्थना केली जाणारी रामाची दुर्लभ स्थिति कोठें? हे मुनीश्वराच्या गुरो, मी विश्रांत कसा होईन? या अपार सागराच्या पार कसा पोचेन? ते मला सत्वर सांगा.

**श्रीवाल्मीकि**—वसिष्ठाने रामाला पहिल्यापासून शेवटपर्यंत काय सांगितलें आहे, त्याचा चांगला विचार कर. कारण मी झालो तरी त्याला तेंच सांगणार! हा सर्व अविद्येचा प्रपंच आहे. त्यात सत्याचा अंशही नाहीं. सुज्ञ त्याचेंच विवेचन करितात. पण अविवेकी त्याविषयी नुसता वाद करीत सुटतात. चितूहून काही भिन्न नाहीं. तूं व्यर्थ प्रपंचानें निरुद्ध का होतोस? मित्रा, प्रणव, महावाक्यें व उपासना इत्यादि सर्व रहस्याचा अभ्यास करून स्वच्छ हो. प्रपंचाविषयींची वृत्ति वस्तुतः निद्राच आहे. कारण ज्याच्या चित्तात निरंजन चित्प्रदीप तेवत असतो, त्याला तत्त्वज्ञ ' जागा झालेला ' म्हणतात, मित्रा, हा प्रपंच शून्यमूल व शून्यशिखर आहे. त्याच्या मध्येंही ( म्हणजे वर्तमान दशेतही ) काहीं सार नाहीं. म्हणजे विवेकी त्या निःसार ( प्रपंचा ) वर आस्था ठेवीत नाहींत. अनादि वासनादोषामुळें हा नसतानाच भासतो. कल्याणकर चैतन्यवल्लीचा परिचय न करिता मोहित का होतोस? तत्त्वदर्शनानें निरालंब ज्ञान झालें कीं जाग्रत्—दशा अज्ञानअवस्थेत पडते. कारण तुर्यमध्यें जाग्रदादि तिन्ही दशा नाहींत. आत्मरूप होईतों सर्व प्रपंच. मित्रा, या दृश्यातील एकही वस्तु उत्पत्तीपूर्वी व नाशानंतर नसते. यास्तव तो मध्येंही नाहीं, असें समज. हें जगत् स्वप्नसदृश आहे. बुडबुड्यांप्रमाणें हे सर्व भेद अविद्येमुळें होणारे आहेत. ते क्षणभर ( कांहीं

काळ ) राहून पुनः ज्ञानैकसागरांत लीन होतात. यास्तव ती सुशीतळ जलयुक्त नदी आहे, असें जाणून त्यात ज्ञानी यथेच्छ स्नान करोत. पण बा सज्जना, अज्ञान हा क्षारसमुद्र आहे. अहं ही त्या ( समुद्रा ) ची पहिली मोठी लाट आहे. अनादि वासना हाच वायु तिला उत्पन्न करतो. चित्तस्खलनास कारण होणारे रागादिक त्या त्याच्या लहरी आहेत. ममता हाच त्यातील मोठा भोंवरा आहे. राग व द्वेष हे मोठे मकर आहेत. त्यांच्या जबड्यात सापडलेले जीव अनर्थरूप पाताळात पडल्यावाचून कसे राहतील? यास्तव बा शिष्या, तुला जर समुद्रमज्जन करण्याची इच्छाच असेल, तर तें या दुःखद सागरात करू नकोस. शात अमृतसागरात कर. विवेकी हो. माझा ससार तसाच आहे, रामाचा गेला, इत्यादि मोहात पडूं नकोस. अज्ञ ब्रह्माच्या या विवर्तास सर्व जग म्हणत असतात. पण कृतकृत्य पुरुष आनंदामध्यें विवर्त न करिता जसेच्या तसे असतात. अविवेकी जन बालकाप्रमाणें निष्कारण रडतो व हसतो. पण तत्त्ववेत्ता नेहमीं हसतच असतो. तत्त्वज्ञानाही कधी कधीं मोह असल्यासारखें भासतें, पण ते त्याचें नुसते अज्ञाच्या चेष्टाचें अनुकरण आहे. तें सूक्ष्म आत्मतत्त्व अविवेकें आच्छादित झालें आहे. त्यामुळें अज्ञाना जलाच्या ठिकाणीं स्थलाचा व स्थलाच्या ठिकाणीं मृगजलाचा भास जसा होतो, तसा आत्म्याविषयीं प्रायः सर्व जीवाना भ्रम झाला आहे. सर्व जग परमाणुमय आहे इत्यादि म्हणणाऱ्या वाद्याच्या मतानेंही जर विवेकानंतर शोकाचा असंभव आहे; तर जग मायामय आहे, असें म्हणणाऱ्याच्या मतें तो अवश्य असणारच. असत्चा संभव ( उत्पत्ति ) नाहीं व सत्चा अभाव ( नाश ) नाहीं, हा जर अबाधित सिद्धान्त आहे तर शोक कसा होणार? कारण प्रिय वस्तूचा नाश झाल्यानेंच शोक होण्याचा संभव. पण प्रिय वस्तु जर खरोखरीच सत् असली तर ती असत् होणार कशी? ( तिचा नाशच होणार कसा ? ) बरें ती जर असत् असली तर नाश होणें साहजिकच आहे. कारण मुळींच नाशवान् अथवा नाशरूप पदार्थांचा नाश सिद्धच असतो. बरें, ही जगद्रचना मायिक आहे, असें म्हटल्यास ती शोकमोहादि सहस्रावधि अनर्थांत का पाडते! लौकिक मायेप्रमाणें उदासीन कां भासत नाहीं? असा प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर सागतों.

वस्तुतः तिनें जीवाना अनर्थांत पाडूं नये, हें खरें. कारण तसें करण्याचें तिला कांहीं प्रस्तुत कारण नाहीं. पण मागचें पुण्यपापप्रवृत्तिरूप कारण असल्यामुळें ती अनर्थ उत्पन्न करते. त्यामुळेंच अध्यात्मज्ञानाचा उपदेश शतशः जरी केला तरी पापवशात् तो हृदयांत स्थिर होत नाहीं. यास्तव मित्रा, पापक्षयार्थ सगुण ईश्वराची उपासना कर. बा शिष्या, ज्या अर्थी तुझें समाधान होत नाहीं, त्याअर्थी तुझीं पापें अद्यापि क्षीण झालेलीं नाहींत हें उघड आहे. पूर्वी केलेलें पाप हेंच त्या पशुपति देवाचे पाश आहेत. यास्तव भरद्वाजा, तूं चित्त अगदीं शुद्ध होईतों साकारब्रह्माची उपासना कर. चित्त शुद्ध झाल्यावर निराकार परतत्त्वामध्ये तुझी स्वाभाविक स्थिति होईल. ईश्वराच्या उपासनेनें झालेल्या चित्तशुद्धीच्या बलानें सहस्रावधि व्यामोहानें उद्दाम झालेल्या अज्ञानाच्या प्रलयांत व्यामोहशक्तीस जिंकून अतिशय शांत हो. गुरु व शास्त्र यांच्या वचनांवर विश्वास ठेव व श्रद्धा-युक्त चित्तानें मन, इंद्रियें इत्यादिकांचें नियमन कर. अर्थात् योगमार्गाचें अनुकरण कर. तूं एक अर्धी घटिका तरी समाधि लावून प्रत्यगात्म्याला पहा. म्हणजे बा शिष्या, या आत्मदर्शनानें तुझी पूर्वी तमानें आवृत झालेली बुद्धिरात्र खचित उजाडेल.

सत्कर्मानुष्ठानानेंच जर चित्तशुद्धि होत असेल तर ईश्वरोपासना करण्याचें प्रयोजन काय ? म्हणून विचारशील तर सांगतों. पुरुषाच्या केवल प्रयत्नानेंच सिद्ध होणारी कर्में पुरें कर. कारण महेश्वराच्या अनुग्रहानेंच नरांना सर्व इष्ट प्राप्त होत असतें. उत्तम, सदाचरण, नीति, पराक्रम, यांतील कोणी खरें बलवान् नाहीं, तर केवल प्राक्तन कर्में बलवान् आहेत. यास्तव ईश्वराचें साहाय्य मिळवावें. पण उपासनेनें ईश्वरसाह्य मिळविलें म्हणजे झालें, दुसरें कांहीं करावयास नको, असेंही भलतेंच समजूं नकोस. कारण पुरुषाच्या नुसत्या तर्कांना गम्य न होणाऱ्या केवल श्रुतिप्रोक्त धर्मादिसहित ज्ञानरूप प्रतीकारास ( समूल कर्मोच्छेदनोपायास ) तूं असा भितोस कां ? बाबारे, उपासनेच्या योगानें प्रसन्न करून घेतलेला परमेश्वरही प्राण्याच्या कपाळीं लिहिलेलीं अक्षरें साक्षात् आपल्या हातानें पुशीत नाहीं, तर ज्ञानाच्या योगानें मूलोच्छेद करूनच तो त्याचें मार्जन करितो. गुरु व शास्त्र यांच्या ठिकाणची

शिष्यास बोध करण्याची शक्ति, चित्तशुद्धि व ऊहापोहकुशलता यांच्या योगानें शिष्याची जाणण्याची शक्ति, रागादिकांस समूल उच्छेद पावण्याची योग्यता येणें इत्यादि सर्व सामग्री एकत्र होणें, हेंही ईश्वरेच्छारूप नियतीच्या अधीन असतें. कारण नाहीं तर, वाङ्मनसातीत चित्-विषयीं वक्ता गुरु कोठचा? त्याचा उपदेश कसा होणार? त्यामुळे मोह कसा जाणार? खरोखर ईश्वराचा प्रभाव अचिंतनीय आहे. यास्तव हे भरद्वाजा, तूं विवेकानें मोहाचा त्याग कर. उत्साह धर, म्हणजे तुला असाधारण ज्ञान निःसंशय प्राप्त होईल. कारण तुला सर्व सामग्री प्राप्त झाली आहे. ज्याच्यापाशीं उचित सामग्री नसते तो जर महत्कार्य करावयाची वेळ आली असता शोक करूं लागला तर तें त्याचें करणे अयुक्त आहे, असे कोणी म्हणणार नाहीं पण एकाद्या महाराजाप्रमाणे सर्व अनुकूल सामग्रीनें युक्त असलेल्या तुला शोक करणे योग्य नाहीं. जीवन्मुक्ताकडे पाहून पुण्यसामग्री असल्यास मलाही बोध होईल असे अनुमान कर व उत्साहानें पुण्यसामग्री संपादन करण्याकरिता प्रथम प्रवृत्त हो. आसक्ति असल्यास जें कर्म शत्रूसारखें अनर्थांत पाडण्यास कारण होतें, तेंच आसक्तीवाचून केल्यास मित्राप्रमाणे अत्यंत अनुकूल होऊन मोक्षाचें निमित्त बनतें. पुण्याच्या आधिक्यामुळें प्राक्तनपापाचा नाश झाला असता शम-दमादि अमृतानें तृप्त झालेल्या पुरुषाच्या त्रिविध तापाचा नाश होतो. यास्तव पुण्य संपादन कर. त्यामुळें वैराग्य दृढ होईल. नंतर कर्मांचा त्याग करून श्रवणादि उपायानीं तूं ब्रह्मामध्यें आसक्त हो. म्हणजे तू या समारंभमास शांत करूं शकशील. अनात्मवस्तूकडे जोंवर मनाची प्रवृत्ति असते तोंवर हें विकल्पजन्य जग भासतें. मित्रा, तूं ह्या अविवेकी बनविणाऱ्या शोकाचा अंगीकार कशाला करतोस? तुला ज्ञानदृष्टि प्राप्त होईतों तू तुमच्या सद्बुद्धिरूपी यष्टीचा आश्रय कर. जलतरंग जसे गवताला त्याप्रमाणें हर्ष-शोक ज्याना वाहून नेऊं शकतात, त्याची गणना श्रेष्ठामध्यें होत नाहीं. सर्व जग विविधदशारूपी झोपाळ्यावर बसलें आहे व काल त्याला क्षुधा, तृषा इत्यादि सहा ऊर्मि, सहा ऋतु किंवा कामादि षड्रिपु यांच्या योगानें झोके देत असतो. तो क्रीडाकौतुकी काल जगातील पदार्थांस व स्वतः विविध जगास उत्पन्न करतो,

संहार करतो, पुनः उत्पन्न करतो व पुन मारतो. यास्तव इतर प्राण्या-प्रमाणेंच आपलें शरीरही कालाचें अन्न असल्यामुळे व जे ज्याचें अन्न असते त तो अवश्य खातोच, असा नियम असल्याकारणानें आपल्या या शरीरा-ं तो खाईलच, असे जाणून त्यावरील अहंतादि अभिमानाचा त्याग करावा. म्हणजे शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं. अरे बाबा, देवाची शरीरेंही जर त्या दुष्ट कालाच्या भक्ष्यस्थानीं पडतात, तर काहीं निमेषातच मरणाऱ्या मनुष्यांच्या पिंडाची गोष्ट काय सांगावी ? तू क्षणात संतुष्ट होतोस व क्षणात विपत्ति आली असता व्याकुळ होतोस ? पण तें का ? आपल्या साक्षिरूपानें निश्चल होऊन हें ससारनाटक का पहात नाहींस ? भरद्वाजा, सुज्ञ विवेकी या क्षणभंगुर अनेक तरंगयुक्त जगाकरिता थोडा-सुद्धा खिन्न होत नाहीं. यास्तव तूही हा अशुभ शोक सोड व मंगलाचे चिंतन कर. चिदानंदघन स्वच्छ आत्म्याची भावना कर. ज्याचे चित्त देव, द्विज व गुरु यांच्या श्रद्धेने भरून गेल्यामुळें सुंदर झालेलें असतें, व ज्याना वेद प्रमाण असतात त्यावर महेशाचा अनुग्रह होतो.

**भारद्वाज**—भगवन्, आपल्या अनुग्रहाने सर्व रहस्य मला कळलें. वैराग्याहून अन्य बंधु नाहीं व संसाराहून दुसरा शत्रु नाहीं. आता भगवान् वसिष्ठानीं एवढ्या मोठ्या ग्रंथसमूहानें प्रतिपादिलेलें तत्त्व मला थोडक्यात सांगा.

**श्रीवाल्मीकि**—भरद्वाजा, ज्याच्या नुसत्या श्रवणानेंच तूं भवसागरात बुड-णार नाहींस, ते हें मुक्ति देणारें महाज्ञान तूं ऐक. जो एक असतानाही उत्पत्ति, स्थिति, व नाश या भेदानीं अनेकधा स्थित आहे, त्या चिदा-नंदमूर्तीस नमस्कार असो. प्रपंचाचा विलय केला असता तत्त्व कसें प्रकाशित होतें त्याचा उपाय मी संक्षेपतः श्रुतीच्या अनुरोधानेंच सांगतों. पण पूर्वापर विचार करण्यास समर्थ असलेली तुझी स्मृति नष्ट कशी झाली ? कारण तसल्या स्मृतीच्या योगानेंच सर्व साक्षात् ज्ञात होते. यास्तव प्रत्येकानें स्वतःच आपल्याशींच विचार करून तें तत्त्व प्राप्त करून घ्यावे हा उत्तम मार्ग आहे. कारण तें विचारपूर्वक प्राप्त झालें म्हणजे पुनः शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं. पण सत्संग व सच्छास्त्रविवेक याच्या योगानें विरक्त पुरुषानेंच त्याची भावना करणे उचित होय १२७.

सर्ग १२८—जगद्विलययुक्तीनें भरद्वाज कृतार्थ झाला, ज्ञान्याचें कर्तव्य, रामाचें व्युत्थान.

श्रीवाल्मीकि—शांत, दांत, निषिद्ध व काम्य कर्मांपासून व विषयेंद्रियसंयोगजन्य सुखापासून उपरत, श्रद्धावान्, मृदु आसनावर बसलेला, इंद्रियांच्या चलनादि क्रियांस जिंकणारा, अशा मुमुक्षूनें मन प्रसन्न होईतों ओंकाराचा उच्चार करावा. त्यानंतर अंतःकरणशुद्धीकरितां प्राणायाम करावे. नंतर इंद्रियांना हळू हळू विषयांपासून परतवावें. देह, इंद्रियें, मन, बुद्धि व क्षेत्रज्ञ ( जीव, अहंकार ) यांचा उद्भव कोणाकोणापासून होतो तें जाणून त्यांतील प्रत्येकाला त्याच्या त्याच्या कारणांत लीन करावें. ( अर्थात् प्रत्येक कार्य आपापल्या कारणरूप आहे, असें जाणून शेवटीं जीवाला प्रत्यगात्म्यामध्यें लीन करावें. ) याप्रमाणें आध्यात्मिक देहेंद्रियादि भाव सोडून प्रथम मी विराडात्मा आहें, इत्यादि भावना करीत क्रमानें परमकारणरूप व्हावें. मांसादि पार्थिव भाग पृथ्वीमध्यें लीन करावा. ( तो पृथ्वीचा आहे, अशी दृढ भावना करावी ) त्याचप्रमाणें रक्तादि जलांश, तेजोंश इत्यादि भूतांश त्या त्या भूतांमध्यें लीन करावेत. नंतर श्रोत्रादि इंद्रियांनाही आपापल्या कारणांत लीन करावें. भौतिक कायाचा लय सिद्ध झाला, म्हणजे पृथिव्यादि भूतांस आपापल्या कारणरूप भूतांत मिळवावें. ( उदाहरणार्थ—पृथ्वीला जलांत, जलाला तेजांत, इत्यादि ) म्हणजे योग्याचें लिंगशरीर मात्र अवशिष्ट राहतें. वासना, सूक्ष्मभूतें, कर्म, अविद्या, दहा इंद्रियें, मन, व बुद्धि, यांच्या समूहास लिंगशरीर म्हणतात. याप्रमाणें विवेक व भावना यांच्या योगानें स्थूल उपाधींचा विलय केल्यामुळें अर्धरूप झालेल्या जीवानें मी ब्रह्मांडरूप आहें, हा अभिमान सोडावा व त्यामुळें ब्रह्मांडांतून बाहेर पडून सूक्ष्मभूतात्मक लिंगसमष्टि देहांतील अधिष्ठाता हिरण्यगर्भ मीच आहें, असें चिंतन करावें. हा हिरण्यगर्भाभिमानीच स्थूल ब्रह्मांड लीन होण्याच्या पूर्वी ब्रह्मदेव होऊन राहिला होता. असो; हिरण्यगर्भाविषयींची भावना दृढ झाल्यानंतर अपंचीकृत भूतांहूनही सूक्ष्म अव्यक्तामध्यें लीन व्हावें. ( येथें अव्यक्त म्हणजे उपाधीच्या आकारानें अव्याकृत मायांश व उपहित चिदाकारानें अव्यक्त ब्रह्म घ्यावें,

म्हणजे जडांशाचा जडांत व चिदंशाचा चितीमध्यें विलय करितां येईल.) तें अव्यक्त नामरूपरहित आहे व जग त्याच्यामध्येंच राहतें. त्याला कोणी प्रकृति म्हणतात, कोणी माया म्हणतात, कोणी अणु म्हणतात व कोणी केवल तर्कामुळें भ्रांत झालेले बौद्ध अविद्या म्हणतात. त्या अव्यक्तामध्ये प्रलयसमयीं सर्व पदार्थ सहाव्या भावविकारास (नाशास) प्राप्त होऊन व अव्यक्तस्वरूप होऊन त्याच्या सत्तेनेच सत्तावान् होऊन राहतात. ते त्या अवस्थेत परस्परसंबंधशून्य व चिद्भो-ग्यतारूप आस्वादरहित होऊन राहतात व प्रलयकाल संपल्यावर त्या प्रकृतिभूत अव्याकृतापासूनच उद्भवतात. आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी या क्रमानें सृष्टि होते व उलट क्रमानें म्हणजे पृथ्वीपासून तिचा उत्तरोत्तर लय होतो. यास्तव विराट्, हिरण्यगर्भ, इत्यादि त्रिविध-स्थाने व जाग्रदादि त्रिविध अवस्था याचा त्याग करून अव्यय तुरीय पदाचें ध्यान करावें. त्याच्या प्राप्तीकरितां लिंगाचा विलय करून घट फुटल्यावर महाकाशांत मिळणाऱ्या त्यातील आकाशाप्रमाणें निरति-शयानन्द ब्रह्मामध्यें प्रवेश करावा. अव्यक्तापर्यंत लिंगशरीर हाच मोठा थोरला खोडा असतो. यास्तव त्यांतून मुक्त होऊन परतत्त्वांत मिळावें.

**भरद्वाज**—गुरुवर्य, आतां मी या लिंगरूपी खोड्यांतून सर्वथा मुक्त झालों आहें. चिदंश असल्यामुळें मीं चैतन्यानंदसागरांत प्रवेश केला आहे. अभेदसाक्षात्कार झाल्यामुळे मी सर्वोपाधिरहित परमात्मा आहें. मी निर्विकार, केवळ (सर्वधर्मशून्य), व्यापी व चिदाचिच्छक्ति-मान् आहें. अनेक श्रुति मोठ्या आदरानें चिदैक्य सांगत आहेत. जसा एका अग्नींत टाकलेला दुसरा अग्नि त्याच्यासारखाच होतो, त्याला तेंच नांव व तेंच रूप प्राप्त होतें, ज्याप्रमाणें स्वच्छ जलांत टाक-लेलें दुसरें स्वच्छ जल जलरूप होतें, त्याप्रमाणें माझें व ब्रह्माचें ऐक्य झालें आहे. ज्याप्रमाणें खारटणींत टाकलेलें गवत मीठ बनतें, त्याप्रमाणें चैतन्यांत टाकलेलें अचेतन जगत् चेतन होतें, समुद्रांत टाकलेला मिठाचा खडा आपलें नांव व रूपही सोडून जसा समुद्रमय होतो, त्या-प्रमाणें मीही नामरूपशून्य होऊन ब्रह्मामध्यें एकरूप होऊन राहिलों आहें. दुधांत घातलेलें दूध अथवा तुपांत घातलेलें तूप जसें नाहींसें तर होत

नाहीं, पण पृथकही दिसत नाहीं त्याप्रमाणें मीही सर्व भावानें सत् चेतना-मध्यें प्रविष्ट झालों आहे. 'निष्कळ, निष्क्रियं, शांत, निरवद्य, निरंजनं०' इत्यादि श्रुतीनें जसें सांगितलें आहे, त्याप्रमाणेंच मला त्या क्षादितत्त्वाचा साक्षात् अनुभव येत आहे. मी अद्वितीय परंज्योति, आनंद, अव्यय, ब्रह्म आहें. मी सत्त्वादि मायागुणानीं रहित आहे यास्तव भगवन्, आपल्या उपदेशाप्रमाणें साधकानीं अभ्याससमर्थीही सर्वव्यापी ब्रह्माचें ध्यान करावें. श्रवणादि, गुरुशुश्रूषादि व स्ववर्णाश्रमधर्म यांच्या-मध्यें परायण (तल्लीन, निमग्न) झालेलाही पुरुष त्याचें सतत चिंतन करूं शकतो. मन अस्त पावलें कीं स्वत. आत्मा प्रकाश पावतो. त्याच्या प्रकाशानें सर्व दुःखाची हानि व आत्मसुखाचा लाभ होतो. साधकाला स्वसंवेद्य आनंद मिळतो. त्याला मजहून दुसरा कोणी चिदा-नंदमय प्रभु नाहीं, मी एक परब्रह्मच आहें,—असा आतल्याआत अनु-भव येतो. भगवन्, आपण सांगितलेलें सर्व ज्ञान मला प्राप्त झालें आहे. माझी बुद्धि निर्मल झाली आहे. संसार मला बाधा करीत नाहीं. पण आता ज्ञानी पुरुषाचें कर्म कसें असते, त्यानें प्रवृत्त कर्म करावें कीं निवृत्त व्हावें, तें मी जाणण्याची इच्छा करतों.

**श्रीवाल्मीकि**—भरद्वाजा, ज्याअर्थी तूं सर्वकर्मसंन्याससहित ब्रह्मनिष्ठ होणें हा संसारभ्रमनिवर्तक ज्ञानाचा उपाय आहे, असें मीं सांगितलेलें रहस्य जाणत आहेस, त्याअर्थीं आता हेंही आणखी जाण. जें कर्म केलें असता श्रवणादिकामध्यें विघ्न येणें हा दोष व विक्षेप, मालिन्य, पातक, इत्यादि दोष घडत नाहींत. तेंच कर्म मुमुक्षूनीं करावें. विशेषतः काम्य व निषिद्ध कर्म करूं नये. जेव्हा जीव मनोगुणाचा त्याग करून ब्रह्म-गुणांनीं युक्त होतो व त्याचा इंद्रियसमूह अतिशय शांत होतो, तेव्हा तो स्वतः सर्वगामी प्रभु बनतो. देह, इंद्रियें, मन व बुद्धि यांच्या पलीकडे असलेला जो आनंदमय कोश त्याच्याही पलीकडे असणारा कूटस्थ मी आहे, असें ध्यान जीव जेव्हा करतो तेव्हा तो थोड्याच दिवसांत कर्तृ-भोक्तृभावाहून निर्मुक्त, सर्वउपाधिशून्य, व सुखदुःखरहित, होऊन संसारापासून मुक्त होतो. जीव सर्व भूतें आत्मरूप आहेत, व माझा आत्माच सर्व भूतामध्यें आहे, असें अभेदरूपानें जेव्हा पहातो तेव्हा

मुक्त होतो. तो जेव्हां जाग्रदादि तीन स्थानें सोडून तुरीय आनंदांत प्रवेश करतो तेव्हा मुक्त होतो. ही जीवाची तुर्याख्य स्थिति परम सुखरूप आहे. ती योगाची परानिष्ठा आहे. पुरुषाचें मन अस्त पावलें असतां त्याला दुसरें कांहीं उपलब्ध होत नाहीं. तो प्रशांत अमृतसागरांत निमग्न होतो. यास्तव बा मुने, तूंहि त्यांतच निमग्न हो. द्वैतग्रहरूप क्षारसागरात कशाला बुडतोस ? सर्वव्यापी जगद्गुरु परमेश्वरास भज. असो; पुत्रा, मी हें तुला वसिष्ठाच्या सर्व उपदेशाचे सार सांगितलें आहे. या ज्ञान व योगमार्गानें गेलास तर तुला खचित सर्व रहस्य कळेल. शास्त्रविचार, गुरुवाक्यार्थज्ञान व अभ्यास यांच्या योगानें सर्व सिद्धि होते. यास्तव तू इतर सर्व साधनें सोडून केवळ अभ्यासामध्यें आपलें मन स्थिर कर.

**भरद्वाज**—भगवन्, ( वर सांगितल्याप्रमाणें ) राम आत्म्यामध्यें परम-योगास प्राप्त झाला असता वसिष्ठदेवानें त्याला व्यवहारतत्पर कसें केलें, ते सांगा. म्हणजे मीही अभ्यासाकरिता तसाच प्रयत्न करीन व व्युत्थान-समयीं माझा व्यवहारही तसाच होईल.

**श्रीवाल्मीकि**—जेव्हा तो महा उदार साधु स्वस्वरूपीं स्थिर झाला तेव्हा विश्वामित्र वसिष्ठास म्हणाला, " हे महाभाग ब्रह्मपुत्रा, धन्य आहेस, तू श्रेष्ठ आहेस तू आपलें गुरुत्व शिष्याचा शक्तिपात करून तत्क्षणीं प्रकट केलें आहेस. ( गुरूनें आपलें शरीर सोडून शिष्याच्या शरीरात प्रवेश करणें व त्याच्या कुंडलिनीचा संचार वगैरे करणें यास शक्तिपात म्हणतात, पण वसिष्ठ तर सर्वांबरोबर बाहेर बसलेच होते म्हणून विश्वामित्र म्हणतात ) नुसत्या पहाण्यानें, स्पर्शानें एका शब्दानें किंवा केवळ कृपेनें शिष्याच्या शरीरात जो शुद्ध ब्रह्माचा समावेश करतो तोच गुरु होय. रामही स्वतः शुद्ध व विरक्त होता. त्याला केवळ चित्तविश्रांतीची आकांक्षा होती. त्यामुळें नुसत्या संवादानेंच तो परम पदास पोंचला. गुरूच्या वाक्यापेक्षा शिष्याची शुद्ध प्रज्ञाच बोधाचें मुख्य कारण आहे. आत्मज्ञान प्रत्यक्ष आहे. तें गुरु व शिष्य यांच्या संबंधानें प्राप्त होतें. यास्तव ते दोघेही योग्य असल्यास असल्या सर्वोत्तम

पुरुषार्थासही पात्र होतात. असो; भगवन् वसिष्ठ मुने, आतां कृपा करून रामाला देहभानावर आण, कारण तूं कृतकृत्य झाला आहेस व आम्ही कार्यामध्यें गुंतलों आहों. ज्या कार्याच्या उद्देशानें मी येथें आलों व मोठ्या कष्टानें राजा दशरथाची प्रार्थना केली ती व्यर्थ होऊं नये, या गोष्टीचें स्मरण असूं दे. राम देवकार्याकरिता येथें अवतार घेऊन आला आहे. मी याला सिद्धाश्रमांत नेलें असतां हा तेथें राक्षसांना मारील; अहल्येला जडभावापासून सोडवील, तो कृतनिश्चयी धनुष्याचा भंग करून सीतेशीं विवाह करील, जामदग्न्यरामाची गति नष्ट करील, पैत्रिक राज्य सोडून तो निःस्पृह निर्भयपणें वनवास पतकरील, दंडकारण्यातील राक्षसास मारील, तीर्थांचा व साधूंचा उद्धार करील, सीताहरणशोकाच्या मिषानें वानरांशीं मैत्री करून रावणादि लोककंटकांना मारील. सीताशुद्धीनंतर अयोध्येस परत येऊन, स्वतः जीवन्मुक्त व निःस्पृह असूनही कर्मकांडपरायण होऊन राज्य करील. ज्यानीं त्याला पाहिलें आहे, त्याचें स्मरण केले आहे व त्याचे गुण ऐकले आहेत, त्या सर्वांस हा जीवन्मुक्ति देईल. हे प्रभो, या महात्म्याला त्रिभुवनाचें एवढें मोठें कार्य करावयाचें आहे. यास्तव त्याला देहभानावर आण. अहो सभेंतील भाग्यवान् लोकांनो, तुम्ही रामाला नमस्कार करा. केवळ याला नमस्कार केल्यानेच तुम्ही कृतकृत्य व्हाल. तुमच्यामधील काही श्रेष्ठ पुरुषानाही अशी सुखकर दशा प्राप्त होवो.

**श्रीवाल्मीकि**—विश्वामित्राचें हें भाषण ऐकून सर्व सिद्धांनीं व योग्यानीं श्रीरामास वंदन केलें. त्या महा पुरुषाचे उत्तरचरित्र ऐकून त्याना परम संतोष झाला. त्या गुणनिधीच्या गुणश्रवणानें त्या सभेंतील कोणाही सज्जनाची तृप्ति झाली नाहीं. तर ते आणखी ऐकावे, अशी सर्वांना उत्कट इच्छा होती, म्हणून सर्व सभासदांचा उद्देश जाणून वसिष्ठ विश्वामित्रास म्हणाला, "मुने, हा कमलनयन राम पूर्वी कोण होता देव कीं मनुष्य?" तेव्हां विश्वामित्र बोलला, "अहो जनांनो, तुम्ही या रामावरच 'हा साक्षात् भगवान् वासुदेव आहे, पुराणपुरुष आहे, असें जाणून विश्वास ठेवा. ज्यानेंच सर्व विश्वाकरिता क्षीरसागराचें मंथन केलें. तो केवळ

उपनिषत्प्रमाणांचा विषय होतो. तो सर्व पुरुषार्थांचा दाता, परिपूर्ण व परानंद आहे. तो विश्वाचें कारण, सृष्टीचा जनक, पोषक, स्वामी, मह सुहृत् व सर्वशक्तिमान् आहे. महाविरक्तच या महा सिंधूमध्यें प्रवेश करूं शकतात. हा नित्यमुक्त, मायेचा नियंता, ज्ञानमुक्त व मायेमध्यें बद्ध आहे. हा वेदमय, त्रिगुणरहित, शिक्षाप्रभृति सहा अंगानीं विजयी होणारा, वेदाच्या पारमार्थिक स्वरूपभूत, अद्भुत पुरुष, चतुर्बाहु, चतुर्मुख व संहर्ता त्रिलोचन महादेव, आहे. हा अज असूनही जन्म घेतो. योग-सामर्थ्यानें सर्वदा जागरूक असतो. हा भगवान् रूपरहित असूनही सर्वरूपवान् होऊन सर्व जगाचें धारण करतो. पराक्रमावरून जसा अवश्य होणारा विजय तर्कानें पूर्वीच कळतो, तेजावरून प्रभेचें अनुमान होतें, शास्त्राभ्यासावरून बुद्धीचा उत्कर्ष कळतो, त्याप्रमाणें सुपर्ण (गरुड) हें याचें चिह्न आहे. त्यावरून याचें ज्ञान होतें. खरोखर हा परम पुरुष ज्याचा पुत्र झाला तो हा दशरथ धन्य आहे. हा ज्याचें चिंतन करणार तो दशकंठ ( रावण ) ही धन्य होय. याच्या येथें येण्यानें स्वर्ग व पाताळ याची योग्यता कमी होऊन हा मध्य लोक श्रेष्ठ झाला आहे. हा क्षीरसागरात शयन करणारा पुरुष राम या नावानें येथें आला आहे. हा राम चिदानन्दघन अव्यय परमात्मा आहे. ज्यानीं आपल्या इंद्रियगणाचें नियमन केलें आहे, ते योगीच याला जाणूं शकतात. आम्ही बाह्यदृष्टि पुरुष याचें नुस्तें स्थूल रूपच पाहण्यास समर्थ आहों. रघूच्या वंशात उत्पन्न होऊन यानें त्या महात्म्याचाही उद्धार केला आहे. यास्तव बा वसिष्ठा, कृपा करून याला आता व्यवहारपरायण कर."

असें बोलून विश्वामित्र मुकाट्यानें बसला असता महातेजस्वी वसिष्ठ मुनि रामचंद्रास म्हणाला, "हे रामा, बा चिन्मय, महाबाहो, महापुरुषा रामा, तुझा हा विश्रांति घेण्याचा काल नव्हे. यास्तव लोकाना आनंद देणारा हो. लोकाचा परामर्श रूढ होईतों योग्याची समाधि निर्मल होतच नाहीं. यास्तव राज्यादि विषय नश्वर आहेत असें मनात जाणून आपल्यावरील देवकार्याचा भार कमी कर आणि हे पुत्रा, सुखी हो.

**श्रीवाल्मीकि**—पण वसिष्ठाच्या इतक्या भाषणानेंही आत्म्यामध्यें लीन झालेला राम जेव्हां कांहीं बोलत नाहीं, तेव्हा तो मुनिही सुषुम्नेच्या

द्वारा हळुच त्याच्या हृदयात शिरला व प्रथम प्राणादिबीजभूत आधार-शक्तीमध्यें नंतर प्राण, मन इत्यादिकांमध्यें जाऊन त्यानें त्याच्या जीवास बाहेर ओढलें. तेव्हां रामाचीं इंद्रियें पुष्ट झालीं. त्यानें नेत्र उघडले. वसिष्ठप्रभृति सर्व उत्कृष्ट विद्वानास पाहिलें. तो सर्व इच्छांनीं रहित झाला. त्यानें कृत्य व अकृत्य यांचा विचार सोडला, आणि पूर्वोक्त अर्थाचें वसिष्ठाचें वाक्य ऐकून तो म्हणाला,–"तुमच्या प्रसादाने मी विधि व निषेध यांचा किंकर नाहीं. तथापि आपलें वचन मला सर्वदा करण्यास योग्य आहे. कारण वेद, शास्त्र, पुराणें, स्मृति इत्यादिकांमध्यें गुरुवाक्य हा विधि व तें न मानणें हा निषेध होय, असें सांगितलें आहे" असे बोलून व महात्म्या वसिष्ठाचे चरण मस्तकावर धरून तो दयानिधि सर्वात्मा सर्वास म्हणाला.—

**श्रीराम**—अहो सर्व सत्पुरुषांनो, मी तुम्हांला हें स्वानुभवानें निश्चित केलेलें तत्त्व तुमचें कल्याण व्हावे म्हणून सांगतो, कीं आत्मज्ञान व आत्मवेत्ता गुरु याच्याहून जगात श्रेष्ठ वस्तु नाहीं.

**श्रीसिद्धादि**—रामा, तूं म्हणतोस तें खरें आहे. आम्हां सर्वांचाही हाच निश्चय झाला आहे. तुझ्या प्रसादानें हा संवाद ऐकून आमचें पूर्वीचें ज्ञान दृढ झालें आहे. हे महाराज रामचंद्रा, सुखी हो. तुला नमस्कार असो. वसिष्ठानेंही अनुज्ञा दिल्यास आम्हीं स्वस्थानीं जाऊं.

**श्रीवाल्मीकि**—भरद्वाजा, असें बोलून सर्व सिद्ध रामाची स्तुति करीत गेले. त्या राजपुत्राच्या मस्तकावर पुष्पवृष्टि पडली. हें सर्व रामचंद्राचें आख्यान मी तुला सांगितलें आहे. याच क्रमानें तूं सुखी हो. मी सांगितलेली ही रघुपतीची सिद्धि गुरुकृपेनें मुक्तिमार्ग देणारी आहे. ही श्रेष्ठ मुनीच्या वचनरूपी रत्नाची विचित्र माळा सर्व कवि-वर्यांना व योग्यांना सेव्य आहे. जो राम व वसिष्ठ याचा हा संवाद नित्य ऐकतो तो कोणत्याही अवस्थेंत असला तरी सर्वदोषरहित होऊन मुक्त होतो व परब्रह्मास प्राप्त होतो १२८.

निर्वाण प्रकरणाचा पूर्वार्ध समाप्त झाला.

ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीची ग्रंथमाला.

ग्रंथ ५३ वा.

# बृहद्योगवासिष्ठसार.

## भाग ४ था.

(निर्वाणप्रकरण-उत्तरार्ध)

सार लेखक

वे. शा. सं. विष्णु वामन बापट शास्त्री.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

प्रिंटर्स, पब्लिशर्स आणि कमिशन-एजंट्स, ठाकुरद्वार-मुंबई.

हे पुस्तक रा. रा. दामोदर सावळाराम यंदे यांनी नं. ४२४, ठाकुरद्वार रोड, मुंबई, येथे 'इंदुप्रकाश' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १९१२ इ०.

किंमत २॥ रुपये.



# प्रस्तावना.

ज्याप्रमाणें आमच्या व्याकरणमहाभाष्यादि शास्त्रांत–ग्रंथारंभीं, त्याच्या मध्यें व शेवटीं मंगलाचरण करावें, म्हणजे ग्रंथाची निर्विघ्नपणें समाप्ति होते, तो विद्वान् लोकांत प्रख्यात होतो, त्याच्या पठन–पाठनाची परंपरा अव्याहत चालते; व त्याचें पठन केलेले लोक वीर्यवान् निपजतात,—असें सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच आधुनिक समयीं ग्रंथारंभीं, व तो मोठा असल्यास मध्यें व शेवटींही प्रस्तावना घालण्याची पद्धति रूढ झाली आहे. आणि ग्रंथकार व प्रकाशक ह्यांचे उद्देश व ग्रंथासंबंधीं कांहीं अवश्य गोष्टी त्यावरून ज्ञात होत असल्यामुळे ती बरीच उपयुक्तही ठरली आहे. परमेश्वराच्या निःसीम अनुग्रहामुळे तीन वर्षांपूर्वी हातीं घेतलेलें हें मोठें काम आज समाप्त होऊन तें वाचकांच्या पुढें सादर समर्पण करण्याचा सुयोग आला, याबद्दल लेखक व प्रकाशक या दोघांनाही अतिशय आनंद होत आहे. वाचकांनांही समग्र ग्रंथ हातीं आलेला पाहून त्याच्याप्रमाणेंच आनंद होईल, यांत शंका नाहीं. कारण आपल्या या देशांत (महाराष्ट्रांत) विद्येसाठींच विद्या शिकणारे लोक थोडे, त्यामुळें असल्या तात्त्विक ग्रंथांचे वाचकही परिमित, योग्यतावान् लेखक फारच थोडे, पण त्यांच्यांतही भयंकर चढाओढ, लेखकाच्या श्रमाचा योग्य मोबदला देऊन धैर्यानें असले विस्तृत ग्रंथ प्रकाशित करणारे (प्रकाशक) तर फारच थोडे, पण त्यांनाही धनाढ्य जनांचें फारसें साह्य नसल्यामुळें ग्रंथ खपतो कीं अंगावर पडतो, म्हणून भीति! सामान्य जनसमूहाच्या श्रद्धेविषयीं विचार करावा तर तिकडूनही निराशा, भाषेसंबंधीं विचार करावा तर तीही अद्यापि अप्रबुद्ध, शास्त्रीय रूढ शब्दांचा फारसा भरणा नसलेली, अशी अनेक प्रकारची प्रतिकूल स्थिति असूनही एकाच लेखकाच्या हातून अथपासून इतिपर्यंत एकाच पद्धतीनें लिहिलेला हा महाभारताच्या तृतीयांशाएवढा ग्रंथ सोप्या मराठी भाषेंत झालेला पाहून वाचकवर्गाला, विशेषतः आचार्यभक्तांना लेखकादिकांइतकाच आनंद होणें, अगदीं साहजिक आहे. ईश्वरानें साह्य केल्यास प्रस्तुत लेखकाच्या हातून षड्दर्शनें व

विशेषतः वेदान्त यांवरील सर्व उत्तमोत्तम ग्रंथ याच पद्धतीनें ( साररूपानें ) मराठींत क्रमानें उतरतील.

प्रस्तुत पुस्तकांत बृहद्योगवासिष्ठाच्या निर्वाण-प्रकरणाच्या उत्तरार्धाचें समग्र सार आलें आहे. यांत पूर्वीप्रमाणेच मूळ ग्रंथांतील कोणताही महत्त्वाचा भाग सोडलेला नसून, ग्रंथ शक्य तितका सुलभ करण्याचा प्रयत्न केला आहे. सर्व ग्रंथाचा मथितार्थ स्पष्ट कळावा, म्हणून ग्रंथाच्या शेवटीं मागच्या भागांच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें एक परिशिष्ट जोडून त्यांत तो दिला आहे व कांहीं पारिभाषिक शब्दांचा स्पष्टार्थ सांगणारा अक्षरानुक्रमानें कोशही जोडला आहे. त्यामुळें वाचकांना प्रस्तुत ग्रंथाचें प्रमेय व शब्दार्थ समजण्यास फारशी अडचण पडणार नाहीं. स्वतः वसिष्ठांनींच रामाला सांगितल्याप्रमाणे या अद्वैताच्या सुंदर ग्रंथांत आख्यायिकांचें प्राचुर्य असल्यामुळें तो अधिक रमणीय होऊन विषय सुलभ झाला आहे. मूळ ग्रंथांतील पुनरुक्त्यांना संक्षेप देण्याचा जरी लेखकाचा पहिल्यापासूनच उद्देश होता, व तो पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत व्यक्त करून त्याप्रमाणेंच शेवटपर्यंत जरी त्यानें ग्रंथ लिहिलेला आहे, तरी कांहीं दृष्टान्त पुनः तेच ते देणें भाग पडल्यामुळें त्याची पुनरुक्ति झाली, असें कोणाला वाटेल. पण ती ( पुनरुक्ति ) अनन्यगतिका आहे. अद्वैताचें प्रतिपादन निरनिराळ्या युक्तींनीं केलेलें असल्यामुळें व युक्तीला नेहमीच दृष्ट ( लोकप्रसिद्ध ) दृष्टान्ताची अपेक्षा असल्यामुळें स्वप्न, गंधर्वनगर, इत्यादि दृष्टान्तांची आवृत्ति झालेली असली तरी ती कंटाळवाणी वाटण्यासारखी नाहीं, हें ग्रंथ वाचल्यावर कळेल.

अद्वैताचें प्रमेय इतक्या सुलभ व मार्मिक रीतीनें प्रतिपादिलेलें दुसऱ्या ग्रंथांत क्वचितच आढळेल. भगवान् वसिष्ठांनीं जिज्ञासूंना अन्य शास्त्राचा अभ्यास न करितां प्रथम याच शास्त्राचें परिशीलन करावयास सांगून याच्या चांगल्या अध्ययनानंतर दुसरा कोणताही ग्रंथ वाचूं लागल्यास त्याला याचें भोजनांतील व्यंजनाप्रमाणें ( दहीं, तूप, दूध, भाजी इत्यादि मुख्य अन्नास अधिक रुचि देणाऱ्या पदार्थांप्रमाणें ) साह्य होईल, असें जें सांगितलें आहे, किंबहुना प्रतिज्ञा केली आहे, तें अगदीं अन्यथा नव्हे. अद्वैतशास्त्राचें तत्त्व बरोबर समजून न घेतां त्यावर मनसोक्त आक्षेप करणारे पुष्कळ आढळतात, पण त्या आक्षेपाचें निरसन निरपेक्ष यतींनीं व अनुभवी महात्म्यांनीं कसें व कोठें कोठें केलें आहे, व तें आक्षेपसमाधानास पुरेसें आहे कीं नाहीं, हें पाहणारे फारसे कोठें दिसत नाहींत. कोणताही आक्षेप संशयामुळेंच उद्भवत असतो, व स्वतः संशय वस्तूविषयीं नेहमींच द्विधा अनिश्चित भान करणारा असतो. त्यामुळें आक्षेपाच्या मुळाशीं अनिश्चितपणा असणें अगदीं साहजिक आहे. नुसत्या आक्षेपाबद्दल कधींच कोणी कोणाला दोष देणार नाहीं. पण आक्षेप करणारे त्यालाच ज्ञान समजतात व आम्हीं सर्वज्ञ आहों, असेंच साक्षात् म्हणण्याचें सामर्थ्य जरी त्यांच्यामध्यें नसलें, तरी त्या-

सारखी कृति मात्र ते आक्षेप घेतांना करून दाखवितात; आणि पूर्व दुरितामुळें त्यांना आपलें परिमित ज्ञान किती संकुचित आहे, याचें भान न राहून अद्वैतासारख्या तत्त्वज्ञानावर आम्ही आक्षेप घेतला, एवढ्यातच ते आपणाला कृतार्थ समजतात. त्यामुळें आक्षेपाचें मूळ अज्ञान आहे, त्याच्या निरसनार्थ आपल्यास विचार केला पाहिजे, आपण या संसारात कोठूनसे आलो, येथें कांहीं दिवस यदृच्छेनें राहणार आहो व येथून आपणाला जावयाचें आहे, हें खास, पण तें कोठें ? व कशाकरिता ? आपले जीवितदशेतील कर्तव्य काय आहे ? सर्व जग ज्या मार्गानें जात आहे, तोच निष्कंटक आहे कीं दुसरा एकादा याहून सुखावह रस्ता आहे ? इत्यादि प्रश्न त्यांच्या चित्तांत स्फुरत नाहींत, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. तत्त्वज्ञान होई-पर्यंत तत्त्वाविषयीं साशंकवृत्ति असणें ह्यात कांहीं कोणाचा अपराध नाहीं. कारण तो निसर्गच आहे. पण आलेल्या संशयाचें निरसन न करणें, त्याकरितां प्रयत्नही न करणें, निदान कौतुकानें तरी तज्ज्ञ लोक काय म्हणतात तें न पाहणें, यासारखी संशयिताची दुसरी अपरिहार्य हानिच नाहीं.

पण ज्याना आचार्यांच्या प्रसादानें अद्वैताचा साक्षात्कार झालेला असतो, ते महाजन असल्या सामान्य संशयग्रस्त पंडितमन्यांचे आक्षेप स्वतः घेऊन त्यांचें निरसन योगवासिष्ठासारख्या ग्रंथात करून ठेवितात. त्याचा उपयोग स्वतः रागद्वेषप्रधान आक्षेपकाला जरी फारसा न झाला, तरी वेदान्तशास्त्रावर श्रद्धा ठेवून स्वोद्धाराकरिता त्याचा अभ्यास मोठ्या प्रेमानें करणाऱ्या तत्त्वजिज्ञासूला फार होतो. शक्य शंकाचें निरसन केल्यावाचून सिद्धान्ताची शुद्धि होत नाहीं. ती व्हावी म्हणून अद्वैततत्त्वज्ञांनीं फार श्रम करून स्थूणानिखननन्यायानें स्वमतप्र-तिपादनार्थ अनेक विस्तृत ग्रंथ लिहिले आहेत. योगवासिष्ठ हाही अशा अनेक ग्रंथांपैकीच एक महाग्रंथ असून तो सर्वांगांनीं संपन्न आहे. वेदान्तशास्त्र फार कठिण आहे, असें म्हणून गौडपादाचार्यांच्या उक्तीप्रमाणें 'अभये भयदर्शिनः', म्हणजे अभयवस्तूला भिणारे काही लोक त्याच्यापासून दूर पळत असतात. पण कोठेंही पळून गेलें तरी मृत्यु जसा कोणाला कधीं टाळतां येत नाहीं, त्याप्रमाणें जेथे जेथें विचारशक्ति आहे, तेथें तेथे प्रसंगीं अद्वैतवेदान्ताचा अंशतः तरी अंगीकार केल्यावाचून मानवाचें चालण्यासारखें नाहीं. कारण वेदान्त म्हणजे विचारच. त्यालाच एक विशिष्ट रूप आलें, कीं तेंच वेदान्तशास्त्र होतें. आमच्या पूज्य आचार्यांनीं आम्हां त्यांच्या भक्ताना अशी एक गुरुकिल्ली देऊन ठेविली आहे कीं, तिच्या योगानें आम्ही सर्व मतें व शास्त्रें यांचा आपल्या अद्वैतात समावेश करूं शकतों. इतर मताना व शास्त्रांना मात्र असें करितां येणें शक्य नाहीं. अद्वैत व द्वैत यांतील मुख्य भेद हाच आहे. अद्वैताचें खरें सौंदर्य जर कोठें असेल, तर तें या समरसतेंतच आहे. शिवाय अद्वैतप्रतिपादक शास्त्र कठिण होण्याचें कारण स्वतः शास्त्रकर्ते किंवा

शास्त्रप्रतिपाद्य तत्त्व नसून विरुद्ध आचरण व त्याचे संस्कार यांमुळें ज्यांच्या चित्तांतील विक्षेप अतिशय वाढला आहे, ते पामर जन व बाह्यदृष्ट्या विचार करणारे चार्वाकादि शास्त्रकारच होत. स्वतः अद्वैत तत्त्व ' ब्रह्म सत्य जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ' या एका वाक्यांत सांगता येते. पण चित्त विक्षेपप्रचुर व म्हणूनच मलिन असल्यामुळें त्याचा अपरोक्षानुभव येत नाहीं. विचार हेंच त्याला एकाग्र व संशयमलशून्य करण्याचें मुख्य ( अंतरंग ) साधन असून कर्म, उपासना, इत्यादि बहिरंग साधनें आहेत. त्यांचा यथाधिकार उपयोग केल्यास व चांगली योग्यता आल्यावर अद्वैतसिद्धान्त समजून घेण्याचा प्रयत्न केल्यास, तो रूक्ष किंवा कठिण ( आकलन न करितां येण्यासारखा ) वाटणार नाहीं. त्यांतल्या त्यांत या ग्रंथासारखा ग्रंथ तर साधकाला बराच उपकारक होईल, यांत कांहीं संशय नाहीं !

असो, ज्या सर्वशक्तिमान् मायावी प्रभूच्या लीलाविलासानें हें कृत्य शेवटास गेलें, त्याचें व आचार्यचरणाचें स्वहृदयांत स्थिर अनुसंधान करून लेखक ही आपली कृति त्याच परमपदीं अनन्यमनानें समर्पण करीत आहे.

अधिक आषाढ शुद्ध १४
गुरुवार शके १८३४
वाई.

सर्व आचार्यभक्तांचा भक्त,
**विष्णु वामन बापट.**



# विषयानुक्रमणिका.

———— *0*: ————

## ६. निर्वाणप्रकरण उत्तरार्ध पृष्ठें ११८९—१६५०.

| सर्ग | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|

| सर्ग. | विषय | पृष्ठ |
| --- | --- | --- |

॥ श्रीः ॥

# अथ षष्ठं निर्वाणप्रकरणम् ।

## ( उत्तरार्ध. )

**सर्ग १**—निर्मम व निरहंकार मुक्त कसे जिवत राहतात ती युक्ति.

**श्रीराम**—प्रभो, देह, प्राण, इत्यादिकाच्या ठिकाणचा अहंभाव सोडल्यानें नैष्कर्म्यसिद्धि होते. पण त्यामुळें सर्व क्रियाचा उपरम होत असल्यामुळें देहधारक प्राणादिकाची चेष्टाही होणे शक्य नाहीं. त्याकारणानें प्राण्याचा देह सत्वर पडतो. तेंव्हा आपल्या सागण्याप्रमाणें त्याचा व्यवहार व जिवंत असणें, कसें संभवेल ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, जीवन जीवाच्या कल्पनेच्या अधीन नाहीं. तर तें प्रारब्धाधीन आहे. त्यामुळें नुस्त्या कल्पनात्यागानें देहपात होत नाहीं. शिवाय कल्पनात्यागही जीवनाच्या अधीन आहे. त्यामुळें तो जीवनाला ( आपल्या कारणाला, जनकाला ) बाधा करूं शकत नाहीं. यास्तव या कल्पनात्यागाचें स्वरूप जीवनाच्या विरुद्ध कसे नाहीं तेंच मी आता तुला सागतों, ऐक. देहादि मर्यादित पदार्थास ‘ मी ’ म्हणणें हीच कल्पना आहे. व सर्वव्यापी ब्रह्माला ‘ मी ’ म्हणणें हा तिचा त्याग आहे. कारण आपल्या पारमार्थिक स्वरूपाचें अनुसंधान केल्यानें मर्यादित अध्यास नाहींसा होतो. म्हणूनच त्यागवेत्ते विषयसंकल्प, विषयेच्छा, इत्यादिकास कल्पना व सतत आत्मानुसंधानास कल्पनात्याग म्हणतात. देहादि हें सर्व दृश्य सत्य आहे, या अभिमानास कल्पना करणें, व आत्मभावनेस तिचा त्याग म्हणतात. स्मरण हेंच संकल्पन व अस्मरण हें शिवस्वरूप आहे. तें मागच्या अनुभविलेल्या वस्तूंविषयीं व पुढच्या इष्ट वस्तूंविषयीं असूं शकतें. यास्तव जीवन व प्रस्तुत त्याग याचा काहींच विरोध नाहीं. उलट जीवित असल्यासच तो होऊं शकतो. एवढ्यासाठीं हे रामा, तूं मागचें सर्व विसरून काष्ठाप्रमाणें रहा. मागें होऊन गेलेल्या कर्मांविषयीं

सर्वांस विसरून रहा व वर्तमानकालचें प्राप्त कर्म केवळ शरीरानें, पूर्वीच्या अभ्यासबलानें, कर. प्रयोजनावांचून कुंभाराचें चाक जसें घट झाल्यावरही वेग संपेपर्यंत फिरत राहतें त्याप्रमाणें हे निष्पापा, तू पूर्वीच्या संस्काराच्या बळानें स्वकर्मामध्यें तत्पर रहा. त्यात आपलें चित्त मात्र लावूं नकोस ! ज्याचें चित्तच नाहींसें होऊन सत्वसंस्कार मात्र राहिले आहेत, असा तूं प्रवाहप्राप्त स्वकर्में कर. मी अगदीं हात वर करून व ओरडून सागत आहें, कीं असंकल्प हेंच परमश्रेय आहे; पण माझें कोणी ऐकत नाहीं ! केवढें हें मोहाचें माहात्म्य कीं लोक आपल्या हृदयात असलेल्याही विचारसंज्ञक सर्वदुःखनाशक चिंतामणीला टाकून देतात !! दृश्य वस्तूंना पाहणें, त्याविषयीं विचार करणें, ह्या संकल्पाला सोडून असंकल्पमय व्हावें. परम श्रेय म्हणून जें काहीं आहे, तें एवढेंच. त्याचा स्वतः अनुभव घ्यावा. केवळ देह व अंतर्बाह्य इंद्रियें याना निश्चल केल्यानेंच तें परम पद प्राप्त होत असतें. रामा, त्यापुढें मोठें साम्राज्यही तृणासारखें तुच्छ वाटतें, सज्जना, तूं संकल्पावाचून वाटतील तितकीं कर्में कर; पण मनातून त्याविषयींची आसक्ति धरू नको. यंत्राच्या बलानें फिरणाऱ्या काष्ठाच्या बाहुलीप्रमाणें तूं संचार कर. तुझ्या सर्व इंद्रियसंविद् ( ज्ञानें ) नीरस होवोत. चित्ताला आत्मविमुख होऊं देऊं नकोस. कारण चित्ताची आसक्ति हाच महा अनर्थ आहे. निःसंकल्प व नीरस मनानें व्यवहार करणें, हेंच जन्मज्वराला घालविणारें उत्तम धैर्य आहे; आपल्या कर्मांचा वासनारहित कर्ता हो. कर्माच्या फलाविषयीं आसक्ति धरूं नकोस. रामा, पुष्कळ वेळां जरी मी हें रहस्य सागितलें आहे, तरी पुनः सागतों, तें लक्षात ठेव. संकल्प करणें हा मनोबंध व तो सोडणें, हा मोक्ष होय. या जगात आत्म्याकरितां काहीं करावयाचें नाहीं व शरीराकरिता काहीं अकार्य नाहीं; पण तूं मात्र तात्त्विक बुद्धीनें कर्म शरीर करीत आहे, व मी अकर्ता आहें, असें समजून शात रहा. अवेदन हाच योग व चित्तक्षय आहे, यास्तव तन्मय हो. त्या सम, शात, शिव व द्वैतैक्यरहित तत्त्वामध्यें खेद कोणाला होणार ? शात आत्म्याला जगणें, मरणें, कार्य, अकार्य, कर्म, निष्कर्म, इत्यादिकांतील कांहीं नाहीं. या अहं—मम—

अभिमानानें सर्व सृष्टीला दुःखांत पाडलें आहे. यास्तव राघवा, तूं त्याचा सर्वथा त्याग कर. संकल्प न करणें, हाच त्याच्या त्यागाचा उपाय आहे १.

सर्ग २—सर्व जग शिवमय आहे. त्याच्या कर्माचा शोध व त्यामुळें समूल निवारण.

श्रीवसिष्ठ—अद्वैतैक्य, मननरहित व शांत अशा मोठ्या निष्कंप सैन्याप्रमाणें जग शिवमय आहे. मन, बुद्धि, अहंकार, चित्त, काळ, आकार, क्रिया, शब्दशक्ति, इत्यादि सर्व वस्तु जणुं काय शिवरूपी पंकानें घडलेल्या आहेत. प्रमाता, प्रमाण, प्रमेय, इत्यादि सर्व त्रिपुटी, देश, काळ, दिशा, भाव, अभाव इत्यादि शिवपंकमय आहेत. जगांतील सर्व विवर्तांस अहं व मम यांतील कोणत्या तरी एका भावनेनें व्यापून मग त्याच्याकडे पाहूं लागलें असता चैतन्य हेंच त्याचें सार मिळते. यास्तव रामा, चैतन्य-प्रधान होऊन, मौन धरून स्वस्थ रहा.

श्रीराम—भगवन्, नाम व रूप शिवमय आहे, असें जाणून व त्यांचा बाध करून स्वरूपांत स्थिर होणें सुकर आहे. पण पुण्यपापलक्षण कर्में अनंत असल्यामुळें व तीं नामरूपाप्रमाणें प्रत्यक्ष नसल्यामुळें त्यांना शिवमय समजून त्यांचा बाध करिता येणें शक्य नाहीं. यास्तव त्याच्या निवारणाकरिता मरणपर्यंत निश्चेष्ट असणें हेंच उपाय दिसतो.

श्रीवसिष्ठ—बा सुज्ञा, मी एक तत्त्व विचारतों तेवढं सांग. कर्म कशाला म्हणतात. त्याचा विस्तार कसा आहे व मूळ काय आहे ? व त्याचा अत्यंत नाश कसा होतो ?

श्रीराम—भगवन्, ज्याचा अत्यंत नाश करावयाचा असतो त्याला मुळापासून उपटावें लागतें. नुसत्या शाखा कापून त्याचा अत्यंत नाश होत नाहीं. बुद्धिमानास आपलें शुभाशुभ कर्म नष्ट करावयाचें असतें. यास्तव त्याचा समूळ नाश करणेंच इष्ट आहे. ज्याच्या नाशानें कर्मवृक्ष समूळ नष्ट होणें शक्य आहे तीं कर्मवृक्षाचीं मूळें मीं सांगतों, ऐका. देह हाच कर्मवृक्ष संसार-अरण्यांत उगवला आहे. कर्म हें त्याचें बीज आहे त्यावर सुखदुःख या फळाची रास लागली आहे. तो शाखा, पानें, छाया इत्यादि वृक्षांच्या दुसऱ्या सर्व अंगांनीं युक्त आहे कर्मेंद्रियें हीं त्या कर्मांची मूळें आहेत. वासनारसानें तीं पुष्ट होत असतात. कर्मेंद्रियांचीं मूळें ज्ञानेंद्रियें आहेत. ज्ञानेंद्रियांचें मूळ मन असून त्यानें जगास व्यापलें आहे. त्याचें

मूळ जीव आहे, विषयांचें मूळ चेतन असून तें सर्व मूळांचें एक कारण आहे. चितीचें मूळ आहे ब्रह्म, ब्रह्माचें मूळ काहीं नाहीं. तें अनंत अनिर्वाच्य, शुद्ध व सत्यस्वरूपी आहे. याप्रमाणें सर्व कर्मांचें उत्तम बीज वेदन आहे. तें आंत स्वरूपास चेतित करते. त्यानंतर स्पद प्रवृत्त होतो. मुने, चेतनच कर्मांचें आद्य बीज आहे, तें असलें म्हणजे महाशाखावान् देहरूपी शिवरीचा वृक्ष उत्पन्न होतो. तें चेतन शब्द व अर्थ यांच्या भावनेनें युक्त झालें असता कर्मांचें बीज होतें व त्या भावनेने रहित असतें तेव्हा तेच सत् परम पद होतें. तस्मात् वेदनच कर्मांचें कारण आहे, व आपणच तें मला सांगितलें आहे.

श्रीवसिष्ठ—रामा, या वेदनात्मक सूक्ष्म कर्मांचा त्याग नुसत्या मौनानें होणें शक्य नाहीं. अर्थात् तूं म्हणतोस तशा रीतीनें कर्मनिवृत्ति संभवत नाहीं. देह असेपर्यंत भावना, बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादिकांची प्रवृत्ति दुर्निवार आहे. चित्तादिकांचा त्याग कसा करिता येणार? यास्तव त्याविषयींची भावना सोडावी, म्हणजे मी अमुक करतों, ही भावनाही नाहींशी होऊन कर्मांचा अनिष्ट परिणाम होणार नाहीं. सर्व चैतन्य ब्रह्म आहे, असें ज्ञान झाल्यानें विषयवेदन आपोआप क्षीण होतें. व त्याचा क्षय झाला असता जगाचा त्याग आपोआप होतो, अशाप्रकारचा त्याग हाच मोक्ष आहे. कारण वेदन असलें तर वेद्यदृष्टि उत्पन्न होणार. पण मुमुक्षूनें त्यालाच प्रतिबंध केला म्हणजे विषयदृष्टि व त्यापासून होणारे सुखदुःखादि परिणाम होत नाहींत. विषयोन्मुखत्व सोडल्यावर वेदनाचें जें शुद्ध स्वरूप तें वेदन किंवा कर्म नव्हे; तर तें शांत ब्रह्मच आहे. यास्तव देह असेपर्यंत चेष्टारूप कर्म होणारच. पण त्या कर्मांच्या ठिकाणची ' हें माझें इत्यादि आसक्ति सोडणें, हा त्याच्या त्यागाचा उपाय आहे. जे कर्मांचा आदर करितात त्याना त्याचें मूळ ( भावना ) सोडवत नाहीं. वासनायुक्त मनाची मननरूप भावना हेच कर्ममूल आहे. यास्तव अभावनेनें त्याचा नाश करावा. देह असतांनाही कर्मत्याग करण्याचा उपाय हाच एक आहे. २

**सर्ग ३—विषयांचें अत्यंत मार्जन केलें असतां निष्क्रिय तत्त्व कसें अनुभवास येतें त्याचा विचार.**

**श्रीराम**—हे मुनींद्रा, पण सत्चा अभाव व असत्चा भाव होणें अशक्य आहे, असें आपलेंच म्हणणें आहे. तेव्हां वेदनाचें अवेदन कसें केलें जातें ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, सत्चा अभाव व असत्चा भाव होणें, अशक्य आहे, म्हणूनच वेदनाचे अवेदन आपोआप होणें शक्य आहे. वेदन (पदार्थज्ञान) हा शब्द व त्याचा अर्थ हे दोन्ही रज्जुसर्पाप्रमाणें भ्रमरूप आहेत. ते मृगजलाप्रमाणें असत्य उत्पन्न झाले आहेत. त्यांचा अबोध श्रेयस्कर असून बोध दुःखकर आहे. यास्तव सत्लाच जाण; असत्ला जाणू नकोस. दुःखावह विषयबोधातील शुद्ध बोध मात्र घेऊन जसा राहशील तसा रहा. त्रिपुटिबोधसमयींही कूटस्थ चिन्मात्र तत्त्वाची भावना करून शात असावें. काहीं झालें तरी विवेकी पुरुषानें शुभाशुभात्मक कर्माचा क्षय करावा. तें मुळीं नाहींच, अशा भावनेनें व कूटस्थ—आत्मज्ञानानें सिद्ध होतें. कर्माचें मूल कापून टाकलें म्हणजे संसार सुकून जातो. भूलोकातील जंबूद्वीपादि प्रदेश जसा भूलोकाहून पृथिक् नाहीं त्याप्रमाणें आकाशादि दुसरा सर्व प्रपंच परमात्म्याहून पृथक् नाहीं. जल व द्रवत्व याचा जसा अभेद तसा चित्तत्त्व व चित्त याचा अभेद आहे. तथापि चित्ताचें हेतुरहित कर्म होत असतें. देह हा कर्माचा विस्तार आहे. तोच अहंतारूप ससार आहे. यास्तव मी अचेतन नव्हे, अशी दृढ भावना केल्यानें तो शात होतो. चिदाभासाचा क्षय झाल्यानें आत्मनाश होईल अशी शंकाही मनात आणूं नकोस. कारण ब्रह्मभावनेनें तो अनंतात्मा होत असतो. यास्तव देहाभिमान सोडून तूं आत्माभिमान धर त्याच्या योगानेंच तुला संसारमूलाचा छेद करता येईल. शात पुरुष पदार्थाचें मानसिक ग्रहण व त्याग हीं दोन्ही करीत नाहींत. त्यामुळें त्याना संसारभयही नसतें. प्रवाहप्राप्त कर्म ते शांत चित्तानेंच करितात. निजलेल्या बालकाच्या हालचालीप्रमाणें त्यांचीं फक्त कर्मेंद्रियें, चेष्टा करीत राहतात. तो विषयरहित रस प्राप्त झाला असतां इतर सर्व रस नीरस होतात. सतत आत्मचिंतन हाच कर्मत्याग आहे. तो सिद्ध झाल्यावर आत्म्याहून भिन्न झालेल्या देहानें आपल्या जीवनाकरितां केलेल्या चांगल्या किंवा वाईट कर्माचा लेप आत्मज्ञाला कसा लागणार ?

शरीरेंद्रियांचा संघात ( देह ) चेष्टा करीत असतांनाही मी कांहीं करीत नाहीं, असें जाणणें, अहंभाव न धरणें, हाच कर्मत्याग आहे व तो जीवदवस्थेंतच होऊं शकतो. मनात स्तंभाकार राहणें, हा कर्मत्याग होय. मूलाचा त्याग न करिता नुस्त्या कर्मेंद्रियाचें नियमन करून जे मूर्ख आम्ही त्यागी झालों आहों, असें समजतात ते त्यागफलास पात्र होत नाहींत. पण मूलासह कर्मत्यागानेंच जे शात होतात त्यानीं कांहीं केलें काय व न केलें काय सारखेंच. मोक्षलक्ष्मीशीं विलास करणारे निर्व्यसनी साधु अर्धे जागे व अर्धे निजलेले असल्यासारखे व्यवहार करितात. खरोखर त्याच्या दशेचें वर्णन करवत नाहीं. ज्याचा समूल त्याग केलेला असतो तेच खरें त्यागिलेलें होय. नाहींपेक्षा मूलापासून पुनः अकुर होणें अपरिहार्य असतें. तोच न्याय या कर्मवृक्षाला लागू आहे. यास्तव त्याचा समूल छेद करण्यांतच पुरुषार्थ आहे. कर्मत्याग न करिता दुसरे उपाय करित बसणें, हा व्यर्थ खटाटोप आहे. कर्मांचा त्याग केल्यावर वासनारहित जीवन्मुक्त घरात राहो कीं अरण्यांत जावो; शात असो कीं व्यवहार करो; सर्व सारखेंच. शात पुरुषाला त्याचें घरच निर्जन अरण्य आहे. पण अशान्त पुरुषाला निर्जन अरण्यही लोकानीं भरलेली पुरी आहे. ज्याची मति शात असते, त्या ज्ञानी पुरुषाला हृदयातच सुंदर, निर्जन वनभूमि प्राप्त होते. ज्याला दृश्य जग सत्य भासत नाहीं, त्याला तें शून्य अरण्यच होतें. अज्ञाला सर्व दृश्य खरें वाटतें व त्याच्याकरिता हे सर्व आकार स्थित आहेत. ते त्या अहं–ममाभिमानवानाला दुःख देतात. कारण चित्त मलिन असल्यावर जग सुखकर कसें होणार ? व तें सर्वभावनाशून्य आणि अत्यंत निर्मळ झाल्यावर दुःखाचा तरी भास कसा होणार ? १.

**सर्ग ४**— अहता हेंच संसाराचें मूल, अनहंभाव व आत्मबोध याच्या योगानें त्याचा त्याग.

**श्रीवसिष्ठ**—अहंतादिकासह जगाची शाति झाली असता व आत्मसाक्षात्कार झाला असता त्याग आपोआप सिद्ध होतो. त्यावांचून मात्र तो होणें शक्य नाहीं. पण शरीर व इंद्रियें यांना बांधून ठेवणें म्हणजे त्याग नव्हे; तर आत्म्याचा स्वभाव जाणणें हा त्याग आहे. ' हा मी व हें माझें ' या कल्पना तैलरहित दीपाप्रमाणें शांत झाल्या म्हणजे एक

बोधात्मा राहतो. पण त्या कल्पना ज्याच्या शांत झालेल्या नसतात त्याला ज्ञान, शांति, त्याग व सुख यांतील कशाचाही लाभ होत नाहीं. ' हा मी व हें माझें ' याचा क्षय झाला असतां शांत, शिव, आत्म्यावाचून दुसरें कांहीं नसतें. ज्ञानप्रभावानें अहं हा अंश क्षीण झाला असता सर्वांचा क्षय होतो. पण हा क्षय म्हणजे सर्वस्वनाश नव्हे, तर सर्व पारमार्थिक सत्य-स्वरूप होणें, होय. ' मी जीव नव्हे, मी परब्रह्म आहें, ' या विरुद्ध भावनेनेंच अहंबुद्धि क्षीण होते. ' अहं व अनहं ' ही भ्रांति चित्–वाचून नाहीं. चित् तर आकाशासारखी निर्लेप आहे. तेव्हा हा भ्रम तरी कसा झाला, हें मोठेंच गूढ आहे. यास्तव सर्वांना मौनच धरावें लागतें. पण आपण ज्या चित्सामर्थ्यानें ' अहं ' अशी भावना करितों त्याच्याच साह्यानें ' न अहं ' अशी भावना करावी. म्हणजे शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं. स्वाभाविक अज्ञानप्रयुक्त अहंभावाला जिंकण्याचें सामर्थ्य ज्याच्यामध्यें नाहीं त्या पशुतुल्य मानवाला उत्तम पदप्राप्ति कशी होणार? ज्या उत्तमज्ञाने स्वतः पूर्वीच सहा शत्रूंना जिंकलें आहे तोच महा अर्थास पात्र होय. ज्याच्या मनातील वृत्ति पराभूत झाली आहे, अथवा होत आहे, त्यालाच पुरुष असें म्हणतात. मी देहादि नव्हे, कर्ता, भोक्ता नव्हे, अशा भावनेनें आपलें ज्ञप्तिस्वरूप जाणणें, हें महाभाग्याचें चिह्न आहे. लोभादि दोषाना जिंकल्यावाचून कोणीही या अनर्थात पडूं नये. कारण मलानें आच्छादित झालेल्या आरशाप्रमाणें या दोषानीं व अहंभावानें मलिन झालेल्या चित्तात शांत आत्म्याचा उदय होत नाहीं. यास्तव अहंकार व लोभादि यांचें मार्जन करून नंतरच आत्मचिंतनात प्रवृत्त व्हावें. चित्ताचे हे मल उपासना, निष्काम कर्मे, श्रवणादि यांच्या योगानें जातात. त्यातल्या त्यात अहं या महाशत्रूला मारण्याचा यत्न प्रथम केला पाहिजे. कारण तोच सर्व जगाचें बीज आहे. त्याला जाळण्याचा उपायही फारसा कठिण नाहीं. तर केवळ अभावना, हाच त्याच्या दाहाचा उचित अग्नि आहे. पण एका निश्चयाच्या अभावीं तो अतिशय दुर्लभ होतो. या जगातील सर्व उच्चनीच फलें या अहंबीजापासून झालेल्या संसारवृक्षावर फार चांगलीं शोभत आहेत. अहं-चाच हा सर्व विस्तार आहे. एका क्षणांत तो ( अहंभाव ) जगाला

निर्माण करतो. ब्रह्मरूप जलामध्यें तो तेलाप्रमाणें पसरतो, व त्यामुळें विवेक घृताप्रमाणें संकुचित होतो. अहं विस्तार पावला म्हणजेच त्यांत जग दिसतें. यास्तव सर्व अनर्थांच्या या बीजाला नित्य–आत्मज्ञानानें शांत करावें म्हणजे खेद व भ्रम होणार नाहींत. ‘ मी देह नाहीं, व या बाह्य-वस्तु माझ्या नव्हेत. ’ अशी भावना करावयाची झाल्यास पुरुषाच्या मनात मोठें धैर्य असावें लागतें, हें खरें. पण अहंनिवृत्तीचा तोच रामबाण उपाय आहे. त्याला दुसऱ्या कोणाचें साह्य लागत नाहीं, व तो केवळ साधकाच्या निग्रहानेंच प्राप्त होण्यासारखा असतो. राघवा, अनहंभावने-वाचून दुसरें कोणतेंही श्रेयःसाधन मला आढळत नाहीं. यास्तव तूं माझ्या या वचनावर पूर्ण विश्वास ठेवून अहं–ला विसर व स्वस्थ, शांत, शोकरहित, इंद्रियमलशून्य, निष्प्रपंच व निःसंचार होऊन रहा. हा वेदान्तशास्त्राचा परम सिद्धान्त आहे ४.

**सर्ग ५**—शास्त्र जितेंद्रिय पुरुषाच्या ठायींच सफल होतें विद्याधराची कथा.

**श्रीवसिष्ठ**—मनासह इंद्रियांचा आपापल्या विषयाकडे धावण्याचा स्वभाव प्रथम जिंकून नंतर जो नित्यानित्यवस्तुविवेकादि साधनामध्यें प्रवृत्त होतो, त्याच्याच ठायीं शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाचें सर्व फल सिद्ध होतें. पण ज्या अधमबुद्धिमानानें इंद्रियांचा स्वभाव मुळींच जिंकलेला नसतो, त्याला उत्तमपदाची प्राप्ति होणें वाळूंतील तेलाप्रमाणें दुर्लभ आहे. शुद्ध चित्तामध्यें थोडासा उपदेशही दृढ आरूढ होतो. याविषयीं पूर्वी मेरूवर भुशुंडानें मला सांगितलेला एक सुंदर इतिहासच मी सांगतों, तो ऐक. पूर्वी एकदा तो चिरजीवी महात्मा मला एक कथा सांगत होता; पण इतक्यांत मध्येंच मी त्याला म्हटलें, “ साधो, कोणी अज्ञ व अजितें-द्रिय पुरुष फार दिवस जिवंत राहिलेला तुला आठवतो का ? ” तेव्हां तो बोलला “ होय, एक विद्याधर असा होता. तो आत्म्याला न जाणणारा, इंद्रियांमुळें अतिशय व्याकुल होणारा, विश्रांतिहीन आयुष्यवृद्धीस कारण होणारें सदाचरण मात्र करणारा, व विचारवान् विद्याधर पूर्वी चार कल्प लोकालोकपर्वताच्या शृंगावर राहत होता. अनेक प्रकारचे तप, यम व नियम यांच्या योगानें त्याचें आयुष्य दीर्घ झालें. चवथ्या कल्पाच्या शेवटीं त्याच्या चित्तांत विवेक उत्पन्न झाला. कारण दीर्घ काल अभ्यासिलेल्या

तपादिकांच्या योगानें विवेकाचा उदय होणें साहजिक आहे. पुनः जरा, पुनः मरण व पुनः जन्म येतो, याचा अर्थ काय? खरोखर मला पुनः त्याच त्या अवस्थेंत जाण्याची वाटत आहे लज्जा, यास्तव एक व स्थिर स्थिति कोणती बरें असावी! असा विचार करून तो मला विचारावयास आला. दहा इंद्रियें, पाच प्राण, मन, बुद्धि व देह या अठरा वस्तूंचा समूह, अशा या पुरीला दीर्घकाल वागवून कंटाळलेला व संसाराविषयीं नीरस झालेला तो विरक्त विद्याधर मजपाशीं येऊन व मला नमस्कार करून मी उलट आदर केला असता मला म्हणाला, "भगवन्, आपापल्या विषयांत शीघ्र प्रवेश करीत असल्यामुळें मृदु, नंतर संताप देणारीं, पाषाणाहूनही दृढ, व शराप्रमाणें शरीरात प्रवेश करून राहणारीं हीं इंद्रियें मला व्याकुल करून सोडीत आहेत. तीं प्राण्याला मलिन करितात; विपत्तींत पाडतात; गुणाना जाळून टाकतात, दुःख देतात; हृदयात गहन अंधकार पसरतात, व तीं स्वतः तमोमय असतात. यास्तव अशा त्या सर्व बाह्य इंद्रियाना व आतील मनाला जिंकल्यासच सुख होणें शक्य आहे; यास्तव मला आपल्या विद्याधरसंबंधीं अर्थाचेंही काय प्रयोजन आहे? मी परम पदास जाणण्याच्या इच्छेनें आपणास शरण आलों आहें.

**सर्ग ६**—विषय व इद्रियें यांचे दुर्नय.

**विद्याधर**—यास्तव, हे महात्मन्, उदार, अनायास, क्षयदोषरहित, व आद्यन्तशून्य असें परम पावन पद मला सत्वर साग. एवढा वेळ मी निजलों होतों. पण हे मुने, आता आत्म्याच्याच प्रसादानें जागा झालों आहें. मन कामानें संतप्त झालें आहे. दुर्वासनामध्यें क्षुब्ध झाले आहे. त्याच्या दुष्ट कर्मांना प्रतिबंध करतां येत नाहीं. कारण ते 'अहं' अशा रीतीनें आत्म्याच्या ठिकाणीं अनात्म्याचा आरोप करून राहिलें आहे. मी विद्याधर असल्यामुळें मला अनेक विद्या व सिद्धि जरी अनुकूल असल्या तरी आत्मविद्याशून्य असल्यामुळें मजवर काम, क्रोध, ईर्ष्या, असूया, व भितरेपणा इत्यादि दोष येऊन पडतात. कारण मी जितेंद्रिय नाहीं. ज्ञानाच्या अभावीं देवयोनीमध्यें उत्पन्न झालेले आमच्यासारखे प्राणीही चिखलांतील मशकांप्रमाणें जीर्ण होतांच केवळ जन्म घेतात व मरतात. पण तें त्यांचें जन्म-मरण धर्म व मोक्ष यांतील कशाच्याच

उपयोगीं नसतें. त्याच त्या भावांनीं शब्दादि विषयानीं आम्हीं वारंवार खिन्न होत असतों. आम्हीं सुखाकरितां त्यांच्या मागें लागून खरोखर फसतों. अगदीं अविश्रांत मनानें क्षणभंगुर भोगांमध्यें भ्रमण करणाऱ्या मला या संसारमार्गाचा अंत लागत नाहीं, व स्थैर्यावस्थाही प्राप्त होत नाहीं. सर्व भोगभूमि विचार करीपर्यंतच रम्य दिसतात. पण त्या क्षणिक, संसारास कारण होणाऱ्या, थोड्याच वेळांत विकार पावणाऱ्या व म्हणूनच भयंकर आहेत. प्रभो, मानावमानपर व दुरहंकारयुक्त, अशा या दुष्ट विद्याधरलक्ष्मीनें माझ्या मनाचें समाधान होत नाहीं. चैत्ररथ उद्यानातील पुष्पासारख्या कोमल भूमि मी अवलोकन केल्या. कल्पवृक्षाच्या शाखांनीं मला सर्व वैभव दिलें आहे. मेरुकुंजातील विद्याधरपुरांत मी विहार केला, देवसैन्यांत सुखानें राहिलों; अप्सरांच्या आलिंगनाचें सुख भोगलें, अनेक भूषणें, वस्त्रें, उटया, तेलें, इत्यादिकांनीं शरीरास शोभित केलें; त्या त्या वेळेपुरतें त्यापासून सुख होत होतें. पण आतां विवेकाचा उदय झाल्यामुळें तें सर्व मानसदुःखाग्नीनें जळल्यासारखें भासत आहे. रूपाची आकांक्षा करणाऱ्या व बाह्यान्तर प्रकाशयुक्त नेत्रांनीं मनाला दूषित करण्याकरितां मला दुःखांत पाडलें आहे. पण काय करावें ते ( नेत्र )—स्त्रीशरीरादिकामध्यें वस्त्र, आभरण, अनुलेपन इत्यादिकच शोभा आणणारें आहे, रक्त, मांस, हाडें, केंस इत्यादि नव्हे; या गोष्टीचा विचार न करितांच त्यांत आसक्त होतात ! इंद्रियांच्या मागोमाग जाणारें चित्त अनर्थांत पडून व्याकुळ होई तों विषयाविषयीं विरक्त होत नाहीं. त्याचप्रमाणें घ्राणादि इतर इंद्रियेंही मोठ्या वेगानें मनाला घेऊन आपापल्या विषयाकडे जात असतात. माझ्यानें त्यांना प्रतिबंध करवत नाहीं. मला या दुष्ट वैऱ्यांनीं ठकविलें आहे. आतां मी त्यांना चांगलें ओळखून सोडलें आहे. व्याधांप्रमाणें हे प्रथम मोठा विश्वास दाखवून शेवटीं मनुष्यमृगास अनर्थांत पाडतात. मी आजवर अनेक भोग भोगले. मोठमोठे अधिकार चालविले, व या ब्रह्मांडांतील एकही उत्तम विषय उपभोग घेतल्यावाचून ठेवला नाहीं. पण त्यानें माझी तृप्ति झाली नाहीं. ज्यांना मी नित्य समजत होतों ते इंद्रादिकही माझ्या समक्ष नाश पावले; ज्यांना; मी सुखी म्हणत होतों तेही मजप्रमाणेंच व्याकुळ झाले.

ज्यांना मी मोठे अधिकारी व समर्थ समजत होतों त्यांच्या अधिकाराचा सामर्थ्याचा नाश झाल्याचें व ते दीन झाल्याचें मी प्रत्यक्ष पाहिलें आणि त्यावरून जगातील सर्व दृश्य अनित्य आहे, असें ठरविलें. या विषय व इंद्रियरूप भयंकर विषारी सर्पांनीं ज्याना दंश केला नाहीं व त्यामुळें जे जळून नाश पावले नाहींत, असे दोन–तीनच महापुरुष मी या जगात पाहिले आहेत. या इंद्रियांच्या सेनेला अवश्य जिंकलें पाहिजे. त्यावाचून कोणालाही महाशूर ही पदवी प्राप्त होणार नाहीं. त्या सेनेला अहंकारसेनापति नित्य पाळीत असतो. ती चेष्टारूपी घोड्यानीं सतत व्याप्त असते. ती शरीरनगराचें आक्रमण करून राहते. यास्तव या इंद्रियसेनेला जिंकण्यास जे तयार होतात तेच महायोद्धे होत. मत्त ऐरावताचें गंडस्थल फोडणेंही सुकर आहे; पण उन्मार्गानें जाणाऱ्या इंद्रियाचा निग्रह करणें सुलभ नाहीं. इंद्रियाचें आक्रमण करणें ही महात्म्याच्याही पौरुषाची, महत्त्वाची, सत्त्वाची व मोठ्या शांतीची पराकाष्ठा आहे. कृपण इंद्रियें पुरुषाला तृणाप्रमाणें जोंवर आकर्षण करून नेत नाहींत, तोंवरच तो देवाहूनही उत्तम असतो जे जितेंद्रिय व महासत्त्व असतात तेच या लोकीं खरे नर होत. बाकीच्यांना मी हालचाल करणाऱ्या मांसाच्या बाहुल्या समजतों. मन हा जिचा सेनापति आहे अशा इंद्रियपंचकरूप सेनेस जिंकावयाचा प्रयत्न जर मी केला तर त्याना खचित जिंकीन. या इंद्रियरूप रोगावर भोगाची आशा सोडणें या वाचून दुसरें कोणतेंही उत्तम औषध नाहीं. तीर्थें, मंत्र इत्यादिकांच्या योगानें त्याची शांति होत नाहीं. सतत बाहेर धावणारीं इंद्रियें मला व्याकुल करितात. अरण्यात चोराच्या हातीं लागलेल्या एकाद्याच श्रीमानाची जी दशा होते ती माझी झाली आहे. इंद्रियें अनेक प्रकारें प्राण्याना दुःख देतात. पण तींच विवेकी पुरुषाशीं मित्रासारखीं वागतात. अविवेकी पुरुषाला मात्र तीं गहन अरण्यासारखीं भयंकर, असार, मलिन, जड, विजेसारखीं क्षणभंगुर व अभ्रासारखीं चंचल भासतात. असो; मुने, मला या महानिर्दय शत्रूंनीं जर्जर केलें आहे. त्यामुळें मी आपत्तींत निमग्न झालों आहें. हे दयाळो, माझा उद्धार कर. इंद्रियांना

जिंकणाऱ्या संतांचा समागम शोकाचा अत्यंत नाश करीत असतो, असें विद्वान् सांगतात ६.

सर्ग ७—एक ब्रह्मच आहे. जगत् व दुःख नाहीं अहंबीजापासून जगद्वृक्ष उत्पन्न झाला आहे.

भुशुंड—हे ब्राह्मणा, त्याचें हें उत्तम भाषण ऐकून मी स्पष्ट वाणीनें उलट त्यास म्हटलें, "शाबास, बा विद्याधराधीशा, तूं कल्याणासाठीं जाग्रत् झाला आहेस, ही मोठीच अभिनंदनीय गोष्ट आहे. तूं या संसाररूप अंधकूपांतून फार दिवसांनीं वर निघण्याची इच्छा करीत आहेस. तुझी ही पवित्र मति फार शोभत आहे. विवेकसंपन्न बुद्धि उपदेशार्थ सहज ग्रहण करीत असते. यास्तव तूंही मी जें सांगत आहें तें सर्व विश्वासानें मान्य कर. कारण आम्ही फार दिवसांचा विचार व अनुभव याच्या योगानें हें तत्त्व निश्चित केलें आहे. बाबारे, तुला हृदयांत अहंकारादि जे कांहीं दिसत आहे ते सर्व तूं नव्हेस. कारण जें जें दिसणारें तें तें द्रष्ट्याहून पृथक् असतें. यास्तव दृश्याला सोडून त्याच्या साक्षी आत्म्याला जाण. मी नाहीं व हें जगत् नाहीं, असा निश्चय करणाऱ्या तुला मंगलरूप सर्व प्राप्त होईल. तें तुला सुख देईल. कारण तें केवल सुखरूप आहे. दुःखरूप नसल्यामुळें दुःख देणार नाहीं. दृश्य अबोधरूप आहे, तें कसें म्हणून विचारशील तर सांगतों—सुषुप्तींत प्रसिद्ध असलेल्या अज्ञानापासून जाग्रत्स्वप्नरूप जगत् झालें, कीं पातळ झालेल्या घृताप्रमाणें अथवा लाखेप्रमाणें विलीन झालेल्या जाग्रदादिरूप जगापासून सुषुप्ति झाली. याचा पुष्कळ विचार करूनही निश्चय होत नाहीं. मृगजलाप्रमाणें विश्व नाहीं, तू नाहींस व मीही नाहीं तर केवल शिवस्वरूप आहे. या भासमान विश्वाचें बीज अहंत्व आहे, असें तूं जाण. त्याच्यापासून पर्वत, समुद्र, पृथ्वी, नदी, ईश्वर इत्यादिकांनीं युक्त असलेला हा जरठ जगद्वृक्ष झाला आहे. त्या अणुस्वरूप अहंत्वबीजापासून हा महा वृक्ष उत्पन्न झाला आहे. इंद्रियरसांनीं संपन्न असलेलीं भुवनें हींच त्याचीं मूळें होत. नक्षत्रें ह्या त्यावरील कळ्या, मोठमोठे ग्रह हे फळें, वासना हेच पुष्प–गुच्छ व पूर्ण चंद्र हाच फलांचा घोंस आहे. स्वर्गादिक मोठमोठे लोक ह्याच त्याच्यावरील ढोली व मेरु, मंदरादि पर्वत हींच पानें,

इत्यादि प्रकारें वृक्षाचीं सर्व लक्षणें यामध्यें आढळतात. व त्यामुळेंच कल्पक लोक अहंबीजापासून झालेल्या याला संसारवृक्ष म्हणतात. त्याला 'मी नव्हे' अशा अनहंताभावनेनें जाळतां येतें, व पुनः उद्भवही होत नाहीं ७.

सर्ग ८—संसारवृक्षाचा ज्ञानानें उच्छेद. संसारसंकल्पमंडपासारखा आहे.

भुशुंड—हे विद्याधरा, अहंबीजापासून दश दिशांस व्यापणारा असा हा जगद्वृक्ष झाला आहे. पण त्याचें बीज ज्ञानाग्नीनें जाळून सोडलें असता काहीं होत नाहीं. अहंपणा हें आहे काय ? असा विचार करूं लागलें कीं काहींच आढळत नाहीं. हेंच त्याचे ज्ञान आहे व याच्या योगानेंच संसारवृक्ष जळतो. 'अहं' अशी भावना केल्यानें अहं हें संसाराचें बीज होतें. पण 'नाहं' या भावनेनें अहंपणा घालविला कीं तेंच उत्तम ज्ञान होय. अगदीं सृष्टीच्या आरंभींही याचा अभाव होता. तेव्हा कोठचें अहंत्व, कोठचें त्वत्व, व कोठचा द्वैतैक्यभ्रम ? गुरूचें वाक्य ऐकून जे स्वयत्नानें उद्यम करितात ते समूळ संकल्पत्याग करून परमपदप्राप्ति करून घेतात. स्वयंपाकी स्वयंपाकाच्या पुष्कळ अभ्यासानें जसा आपल्या कर्मात कुशल होतो, त्याप्रमाणे विवेक्यालाही यत्नानेंच विवेकित्व प्राप्त होतें. तूं जगत् हा चैतन्याचा चमत्कार आहे असें जाण. कारण तें बाहेर कोठेंही नसतें. प्रत्येकाच्या हृदयात भासतें. चित्रकाराच्या मनातील चित्रविषयींची कल्पना, तो जशी बाहेर चित्रपटावर व्यक्त करून दाखवितो त्याप्रमाणें प्राणी संकल्पानें बनविलेलें जग बाहेर पाहतो. बा विद्याधरा, एक मोठा मंडप आहे. त्याला मोठमोठे स्तंभ असून तो मोत्यें व रत्नें यांनीं जडविलेला आहे. तो अनेक लक्ष योजनें विस्तीर्ण असून सुंदर सुवर्ण चित्रांनीं चित्रित आहे. त्यात विविध स्त्रिया, पुरुष, व बालक राहतात. क्रीडेकरिता त्यांत नाना विचित्र रचना केलेल्या आहेत. त्यात द्यूतक्रीडा चालते. भूतल हाच प्राणिरूपी सोंगट्या मांडण्याचा पट आहे. चंद्र व सूर्य हे त्यांना चालविणारे फांसे आहेत. शंकर व पार्वती हीं द्यूतकार आहेत. सारांश मी केलेल्या या मंडपाच्या कल्पनेप्रमाणेंच सर्व जगाची कल्पना झाली आहे. संकल्पच दीर्घ भावनेनें सत्य असल्यासारखा झाला आहे. पण तो सत्य नव्हे. तर

वस्तुत: असत्य असतांना सत्य भासतो. हा चिच्चमत्कार विकल्प त्यानें क्षीण होतो. अर्थात् त्याला राहूं देणें अथवा त्याचा नाश हें तुझ्या अधीन आहे. यास्तव आता तुला वाटेल तसें कर. अन्नपानादि ऐहिक व यज्ञ-दानादि पारलौकिक भोगसामग्रीचाही वं आलेला असतो त्याचा हा शेवटचा जन्म आहे, असें निःसंशय सम हे पुण्यात्मन्, तूं विवेकपदवीस प्राप्त झाला आहेस. यास्तव तुझें अधःपतन होणार नाहीं. पण चिन्मात्राचा आश्रय करून मन, इत्यादि दृश्याचा त्याग कर ८.

**सर्ग ९**—जगाचा उदय, अस्त, सत्ता, स्फूर्ति, विवर्त इत्यादि सर्व ि अधीन आहे.

**भुशुंड**—हे निष्पापा, विषयांस न जाणता चिद्रूपामध्यें शांत रहा. अचेतन दृश्य चेतनामध्यें चेतनामुळेंच विद्यमान समुद्रांतील वडवानलाप्रमाणें आपल्यापेक्षा अगदीं भिन्न असले वस्तूंत तें राहूं शकतें, त्याचप्रमाणें अग्नीच्या ज्वालेला उत्पन्न कर व विझविणाऱ्या वायूप्रमाणें सचेतन व अचेतन या दोघांचेंही चित् आहे. मी जड नाहीं, तर चिद्रूप आहें, अशा भावनेनें तुझ चित्-मध्येंच स्थिर होवो. तूं चिद्रूप सर्व वस्तूंच्या आंत व बाहेर आहेस. मी देह नव्हे, या दृढ भावनेनें तुझें चिद्रूप जर चितीमध्यें राहिलें तर तें ब्रह्मरूपच झालें, असें समज. भिंतीवरील चित्र चिद्ब्रह्माच्या ठिकाणीं हें जग निर्विकार आहे. चित्रांतील रंगांनीं दाख अनेक भाव जसे खरे नव्हेत तसे जगांतील व्यवहार सत्य नव्हेत. जसें बनवावें तसें होतें. चित्ताच्या अधीन असलेल्या याला राखणें नाहींसें करणें, हें तुझ्याच हातांत आहे. अहंभावाचा त्याग केव चित्ताला आत्मोन्मुख केलेंस कीं परम सुख तुझ्या हातांत येईल त्याच्या उलट वागलास तर अनर्थांत पडशील ९.

**सर्ग १०**—ब्रह्म जसेंच्या तसेंच निर्विकार व अकारण आहे. जगत् त्यांत व कोठेंही नाहीं.

**भुशुंड**—अा विद्याधरा, अचेतन म्हणून मान्य असलेल्याही स्फुरण चेतनामुळेंच होत असतें, व स्फुरण हेंच चेतनत्व आहे.

जर जगत् स्फुरण करीत आहे तर तें चेतन आहे, असेंच म्हटलें पाहिजे. त्याला अचेतन म्हणणें योग्य नव्हे. जगाला जाड्यच नाहीं, असें म्हणताच जगाचाही निषेध अर्थात् सिद्ध झाला. यास्तव आतां विक्षेपरहित मनानें राहणेंच उचित होय. अक्षुब्ध व निर्मळ जळाच्या ठिकाणीं सत्तारूपानें राहणाऱ्या भावी फेंसाप्रमाणें मायाशबल ब्रह्माचे ठिकाणीं सर्व शक्ति असल्यामुळें अचित्त्वही असतें. कारणावांचून जलांतून फेंस जसा निघत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मापासून ही सर्व सृष्टि कारणावांचून झालेली नाहीं. पण वस्तुतः पाहिल्यास या सृष्टीचें योग्य निमित्त आढळत नाहीं. यास्तव ती उत्पन्न होत नाहीं व नाश पावत नाहीं, तर ब्रह्मच मिथ्या भ्रमदृष्टया जगत् भासतें. विद्याधरा, तू अज व निरवयव ब्रह्म आहेस ! तू नित्यानंदरूप आहेस. यास्तव जगाच्या उत्पत्तिविनाशाचा विचारच करू नकोस. जेथें जेथें, जग तेथें तेथें, परब्रह्म. तृण, काष्ठ जल, भिंत इत्यादि सर्व ठिकाणीं परब्रह्म स्थित आहे. ब्रह्माचा हा असा काय विचित्र स्वभाव आहे, तें सागताच येत नाहीं. कारण अद्वय ब्रह्माच्या ठिकाणीं सद्वयता, असणे संभवत नाहीं. पण तिचा अनुभव तर येतो. पण त्याची उपपत्ति लावता येत नाहीं. बा साधो, कितीही जरी बुद्धि क्षीण केली तरी अहंपणाचा थाग लागत नाहीं. तो असत्च कोठूनसा उत्पन्न झाला आहे. त्याला सोडलें म्हणजे परतत्त्व अवशिष्ट राहतें. म्हणून ते त्याचें अनिर्वाच्य मूळ आहे, असें समजतात. या दृष्टीनें पाहिल्यास जडत हा जसा चैतन्याचा स्वभाव तसाच जीव–जगद्भेदही अभेदरूप होय. सोनें व कडें याचा जसा संकल्पमात्र भेद असून वस्तुतः अभेद, तसाच ब्रह्म–जगाचाही संकल्पमात्र भेद व वस्तुतः अभेद.

**सर्ग ९२**—इंद्रियाना जिंकल्यावर निर्विकार मनःस्थिति, व देहादि दृश्याची अदृष्टि दृढ करावी.

**भुशुंड**—ज्याच्या उघड्या अंगावर लागलेलीं तीक्ष्ण शस्त्रें व तरुण स्त्रीच्या स्तनादि अवयवांचे स्पर्श हीं दोन्ही ज्याला एकसारखींच वाटतात तो ब्रह्मपदीं स्थित आहे, असें जाणावें. कारण दुःखनिमित्तें व सुखनिमित्तें झालीं असतां दुःखी व सुखी न होणें, ही काहीं सामान्य गोष्ट नव्हे. देहादिकांच्या ठिकाणचा आत्माध्यास पूर्णपणें सोडल्याशिवाय व ब्रह्मा-

मध्यें स्थिर झाल्याशिवाय समचित्तता प्राप्त होणें शक्य नाहीं. यास्तव दीर्घ प्रयत्न करून धैर्यानें सुषुप्तता उत्पन्न होई तों अभ्यास करीत रहावें. ( शस्त्र, तरुणी इत्यादि बाह्य पदार्थांच्या योगानें मनांत विकार उत्पन्न न होईल, अशा रीतीनें मिथ्यात्वबुद्धि स्थिर करून केवळ स्वात्मसुखामध्यें विश्रांति घेणें हीच सुषुप्तता आहे, ) मानसिक व्यथेचा स्पर्शही न होणें हें तत्त्वज्ञानाच्या स्थिरतेचें लक्षण आहे. कोणी शस्त्राचे घाव केले अथवा सुंदर तरुणीनें आलिंगन दिलें, तरी जणुं काय तीं दोन्हीं शरीराला लागलींच नाहींत, अशा रीतीनें जो पाहतो तो खरा आत्मसाक्षात्कारवान् आहे. भ्रांतीनें प्राप्त झालेल्या जीवभावानें आत्म्याचा वास्तविक निर्विकार स्वभाव लुप्त होत नाहीं. यास्तव त्या भ्रांत जीवभावाचा बाध होताच स्वरूपाचा लाभ होणें साहजिक आहे. जसें विष आपल्या विषस्वभावापासून च्युत न होताच घुणकीटादि विकारास प्राप्त होतें. पण त्याची घुणता विषाहून निराळी नव्हे, त्याप्रमाणें ब्रह्मही केवळ आत्मतत्त्वज्ञानानेंच बाधित होणाऱ्या जीवतेस प्राप्त होतें. पण त्याची जीवता वस्तुतः निराळी अवस्था नव्हे. अमरणस्वभावच जड विष आपल्या स्वभावाचा त्याग न करितां जसें मरणस्वभाव कीटजीवरूप होतें. त्याप्रमाणें चित् आपलें स्वरूप न सोडता जडरूपास प्राप्त होते. जीवाप्रमाणें जगत्‌ही घुणकीटाप्रमाणेंच ब्रह्मामध्यें उत्पन्न झालें आहे. विषस्वभावदृष्टीने पाहिल्यास जन्म किंवा मरण नाहीं; पण कीटदृष्ट्या पाहिल्यास दोन्हीं आहेत. त्याप्रमाणें ब्रह्मदृष्ट्या जन्म व मरण नाहीं, पण जीवदृष्ट्या आहेत. देह, इंद्रियें, विषय इत्यादिकाचे ठायीं अहं व मम अशी आसक्ति ठेवल्यानें आत्मस्वरूप गुप्त होतें. यास्तव ती सोडून श्रवणादि उपायांच्या योगानें आत्मसाक्षात्कार संपादन केला असतां जीव संसारसागरातून आपणच तरतो. नुस्त्या दैवावर विश्वास ठेवून नाहीं. सर्व दृश्य भावाचा बाध होऊन एकात्मभाव राहिला असता अत्यंत दरिद्रावस्थाच प्राप्त होणें अवश्य असल्यामुळें विश्रांति मिळण्याचा फारसा संभव नाहीं, असें तुला कदाचित् वाटेल, पण तें बरोबर नाहीं. कारण ज्यामध्यें सर्व अत्यंत प्रिय भावाची सारसुखावस्था व सर्वतापनिवृत्तीमुळें अंतःशीतलता असते, त्या पूर्णत्वस्वभावांत दारिद्र्यादि दीन

दशा कोठून असणार? जगाची सत्ता सन्मात्र ब्रह्मरूप आहे, अशी भावना स्थिर झाली असतां मन, अहंकार, बुद्धि इत्यादि मळ कसा रहाणार? ज्याप्रमाणें तूं घटवस्त्र इत्यादि इतर बाह्य वस्तूंना पहातोस त्याप्रमाणेंच शरीर, मन, अहंकार, बुद्धि इत्यादिकास पहा. त्यानंतर तूं सर्वसाक्षिरूप व अतर्बाह्य पदार्थास न जाणणारा ज्ञप्तिस्वभाव होऊन स्वाभाविक स्थितीनें रहा. त्या स्थितींत संपत्ति, विपत्ति, त्यामुळें होणारें सुख, दुःख इत्यादि कोणत्याही निमित्तानें कोणालाही केंव्हांही दोष व गुण लागत नाहीं, कारण कर्तृता नाहीं व म्हणून भोक्तृताही नाहीं ११.

**सर्ग १२**—अहंभाव भ्रांतिमात्र आहे. जगद्भ्रम चैतन्याचा विवर्त आहे. त्याचें मूळ अविद्या त्याच्या क्षयाचा क्रम.

**भुशुंड**—खां ( आकाशा ) त व्योम ( आकाश ) झाल, असें म्हणणें ही जशी शुद्ध कल्पना, त्याप्रमाणें अहंभावाची भावना भ्रांतिमात्र आहे. आकाशात आकाश झालें, या भ्रातीचा कल्पक जसा अहं त्याप्रमाणें अविद्येनें आच्छादित झाल्यामुळें असत्—सें झालेलें व त्यामुळें शब्दानें व्यवहार न करिता येण्यासारखें आत्मतत्त्वच या जगद्भ्रमाचें कल्पक आहे. हें सर्व अद्वय आत्मरूप आहे. भेदाचा भास अविद्येमुळें आत्मसत्तेनेंच होतो, दृढ भावनेमुळें तो सद्रूप भासतो, सर्व अवस्थांमध्यें व सर्वत्र त्याचा अनुभव येतो. दिशा काळ, इत्यादि सर्व विकल्प रज्जुसर्पांप्रमाणें भासणारे आहेत, वस्त्रावरील चित्राप्रमाणें ही सर्व विविध सृष्टि चित्—वर रहात आहे. ती वर वर चागली दिसत असली तरी आतून निःसार आहे, मन, अहंभाव इत्यादिक अविद्याच आहे, ती मोठ्या यत्नानेंच नाश पावते. विनय, प्रणाम, दान,सन्मान, इत्यादिकाच्या योगानें वश करून घेतलेल्या तत्त्ववेत्याशीं संभाषण केल्यानें प्रथमभूमिकेची योग्यता आणून देणारें वैराग्यादिसाधनचतुष्टय प्राप्त होतें. त्यामुळें पुत्र, स्त्री, धन इत्यादिकाच्या ममतेस कारण होणारा अविद्यांश नष्ट होतो. शास्त्रश्रवणादिकांच्या योगानें प्रमाणाविषयींची असंभावना, प्रमेयाची असंभावना, देहात्मभाव इत्यादिरूप अविद्येचा विक्षेपशक्तिमय चतुर्थांश नष्ट होतो. ब्रह्मच आत्मा आहे, असा साक्षात्कार झाला असता व चतुर्थभूमिकेपासून पुढें तो उत्तरोत्तर वाढत चालला असतां अविद्येचा राहिलेला आवरणशक्तिरूप

चवथा भाग हळू हळू निवृत्त होत जातो. याप्रमाणें अविद्येचा क्षय झाल्यावर जें राहतें तें नामरूपरहित सन्मात्रच परम पुरुषार्थ आहे.

**श्रीराम**—प्रभो, आपला संक्षेपतः सांगितलेला हा अविद्याक्षयाचाच प्रकार मला विस्तारपूर्वक सांगा.

**श्रीवसिष्ठ**—संसारांतून तरून पार जाण्याची ज्याची इच्छा असेल त्या विरक्त सुजनानें आत्मज्ञाबरोबर संसाराचा विचार करावा. विरक्त, निर्मत्सर, सज्जन व आत्मज्ञ विद्वानाला मोठ्या यत्नानें शोधावें. त्याची देवाप्रमाणें आराधना करावी. साधूचा समागम लाधला असतां अविद्येचा अर्धभाग नष्ट झाला आहे, असें समज. कारण इतर भूमिकाहून ज्येष्ठ व साधनचतुष्टयसंपत्तीनें श्रेष्ठ अशा प्रथमभूमिकेच्या प्रतिष्ठादशेचा उदय त्यापासून होत असतो. सज्जनाच्या संपर्कानेंच अर्धी अविद्या नष्ट होते. नंतर बाकी राहिलेल्या अर्ध्या अविद्येंतील अर्धा भाग ( म्हणजे चतुर्थांश अविद्या ) शास्त्रविचारानें जाते व राहिलेला चतुर्थ भाग आपल्या प्रयत्नानें ( म्हणजे भूमिकाभ्यासानें) घालवितां येतो. मुमुक्षा (म्हणजे मुक्त होण्याची इच्छा ) हा एकच उत्कट अभिलाष जरी उत्पन्न झाला तरी तो पुरुषाला तीव्र वैराग्यादि देऊन भोग व त्यांचीं साधनें यापासून निवृत्त करतो. ( कारण ममतारहित पुरुष अवश्य संन्यासच करणार, हें उघड आहे. ) साधुसमागम, सच्छास्त्रार्थ व स्वयत्न याच्या योगानें क्रमानें अथवा त्याचा एकाच कालीं लाभ झाल्यास एकदम चित्ताचा मल शांत होतो. याप्रमाणें अविद्येचा क्षय झाल्यावर अवशिष्ट राहणारें एकात्मतत्त्व व्यवहाराच्या उपयोगी नसल्यामुळें असत्, व अबाध्य परम पुरुषार्थरूप असल्यामुळें सत् आहे. तस्मात्, हे रामा, तें अवशिष्ट तत्त्व आनंदघन, जरामरणादिविकारशून्य ब्रह्मच आहे. जीव व जगत् याचें रूप संकल्पमात्र असल्यामुळें अविद्यमान आहे. यास्तव तूं अशा आत्मतत्त्वास ओळखून, मानादित्रिपुटिमोहरहित होऊन निर्वाण ब्रह्मस्वरूप बनून, निःशोक होऊन रहा १२.

**सर्ग १३**—इंद्राच्या सूक्ष्म उदरांत राज्यकल्पना.

**भुशुंड**—आकाशांत पसरलेल्या प्रकाशाला जसा कांहीं आधार लागत नाहीं, त्याप्रमाणें मायिक सृष्टीला धारण करावयास, पूर्वींच सिद्ध असलेला देश किंवा काळ लागत नाहीं. कारण अकस्मात् एकाच वेळीं उत्पन्न

होणाऱ्या जगाला त्यांचा कांहींच उपयोग नसतो. रामा, हें त्रिभुवन मनाच्या केवळ मननानें उत्पन्न झालें आहे. तें अति शांत, सूक्ष्म, अगदीं हलकें व स्वच्छ आहे. हे साधो, चिच्चमत्कारमात्र असलेल्या या जगदणूच्या अपेक्षेनें वायूच्या आंत असलेला सुगंधही मेरूसारखा स्थूल भासतो. मनोरथानें उत्पन्न झालेला पदार्थ जसा मनोरथ करणारालाच मात्र दिसतो, स्वप्नांतील वस्तु जशी स्वप्न पाहणारालाच मात्र दिसते, त्या प्रमाणें ज्याच्या कल्पनेनें ही सृष्टि उदय पावते, त्यालाच ती दिसते. याविषयीं एक प्राचीन इतिहास सांगत असतात. त्यांत पूर्वी देवराज इंद्राच्या त्रसरेणमध्यें काय घडलें, तें सांगितलें आहे.

कोठें, केव्हांसे, कोणा एका कल्पवृक्षाच्या कोणत्याशा शाखेवर एक जगदुदुंबर नावाचें फळ होतें. त्यांत सुर, असुर इत्यादि प्राण्याचे संघरूपी मशक घुमघुमत होते. पर्वताच्या योगानें दृढ झालेल्या स्वर्ग, भू व पाताळ या कपाटांनीं तें युक्त होतें. चैतन्याच्या रचनाशक्तिवैचित्र्यानें सुंदर, फार मोठें, वासनारसानें पुष्ट, नानाप्रकारच्या अनुभवरूप सुगंधानें युक्त चित्तरसानें मनोहर, जगत्सत्तारूपी असंख्य वेलींनीं वेष्टित, अहंकार देंठानें दृढ, साक्षिचैतन्यानें उज्ज्वल, मोक्षद्वार ( ज्ञान ) हेंच ज्याचें मोठें द्वार आहे असें, नद्या, समुद्र इत्यादि शिरांनीं आच्छादित झालेलें, पंचतन्मात्ररूप कोशांत राहणारे, वरील नक्षत्रें हेंच ज्यावरील दवाचे बिंदु आहेत, व महाकल्प संपला असता पिकून खालीं पडावयास होणारें तें उदुंबरफल नंतर ( महा कल्पानंतर ) असच्छास्त्ररूप कर्कशवाणीचे काक, अथवा सच्छास्त्ररूप मधुर वाणीच्या कोकिला, यांच्या भक्ष्यस्थानीं पडतें. आणि त्यामुळें वासनाशेषरूप नाश व वासनारहित ब्रह्मभाव यांस त प्राप्त होतें. असो, रामा, मधाच्या घागरीवर बसलेल्या मधमाशाच्या नायकाप्रमाणें त्या विचित्र फळावर देवाधिपति त्रिभुवनेश्वर इंद्र होता. गुरूपदेश व उत्तम अभ्यास याच्या योगानें त्याचें आवरण नष्ट झालें होतें. त्या महात्म्यानें मनांत आत्म्याची चांगली भावना केली होती. त्यामुळें अतिवीर्यशाली नारायणादिक कोठं जाऊन गुप्त राहिले असता तो एकटाच सुराधिप शस्त्रांनीं असुरांशीं युद्ध करूं लागला. पण त्या महा मायाव्यानीं त्याला जिंकिलें. तेव्हां तो रण सोडून पळाला. देवाचा अधिप

रण सोडून पळत आहे असें पाहून त्याचे शत्रु महादैत्यही त्याच्यामागें लागले. पापी पुरुषाला जशी परलोकीं विश्रांति मिळत नाहीं त्याप्रमाणें इंद्रालाही शत्रु पाठलाग करीत असल्यामुळें एक क्षणभरही विश्रांति मिळाली नाहीं. पण असुर किंचित् भ्रांतचित्त झाले आहेत असें पाहून इंद्रानें स्थूल शरीराविषयींचा संकल्प सोडून त्याला सूक्ष्म भूतामध्यें लीन करून ( म्हणजे स्वतः अणुरूप होऊन ) तो सूर्यकिरणामध्यें असलेल्या एका बाह्य त्रसरेणूमध्यें संकल्पज्ञानरूपानें शिरला. दैत्याच्या दृष्टिआड झालेल्या त्याला तेथें फार वेळानें विश्रांति मिळाली. त्यामुळें त्याला जरा बरें वाटलें. तो संग्रामास विसरला. त्यानें पुनः बाहेर पडण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्याला तेथेंच एका क्षणांत कल्पित गृह दिसलें. त्यात कमलासनावर तो आपल्या लोकातील सिंहासनाप्रमाणें रममाण झाला गृहात रहाणाऱ्या त्याने भव्य रम्य मंदिरादिकानीं युक्त असलेलें कल्पित नगर पाहिलें. नगरात असलेल्या त्यानें त्यानंतर तेथें संकल्पामुळें झालेलें मोठें राष्ट्र पाहिलें. तें नाना ग्राम, पर्वत, गाईचे व्रज, नगरें, अरण्यें, इत्यादिकानीं रमणीय झालें होतें. नंतर इंद्रानें भूलोकाचा संकल्प केला. नद्या, राजे, चतुर्विध प्राणी, देशांच्या सीमा, इत्यादिकानीं युक्त असलेल्या भूलोकच्या कल्पनेनंतर त्यानें त्रिभुवनाची कल्पना केली. त्यांत तो इंद्र होऊन राहिला. त्याला तेथें कुंद या नावाचा एक वीर्यवान् पुत्र झाला. शेवटीं आयुर्मर्यादा संपली असता इंद्र देह सोडून निजधामास गेला. तेव्हा त्याचा पुत्र कुंद त्रिभुवनाचा अधिप झाला. त्यालाही पुत्र झाला. आयुष्य संपल्यामुळें तो कांहीं दिवसानीं परलोकीं गेला. त्याच्या पुत्रानेंही आपल्या वाडवडिलाप्रमाणेंच कांहीं दिवस त्रिभुवनाचें राज्य केलें व शेवटीं पुत्राला सिंहासनावर बसवून परलोकीं गमन केलें. हे सुंदरा, याप्रमाणें आजवर इंद्राचे सहस्रावधि वंशज झाले. त्या कल्पित त्रिभुवनाचें आधिपत्य अजूनही त्याच्याकडेच क्रमानें चाललें आहे. आकाशप्रदेशातील सूर्यकिरणाचा तो पवित्र त्रसरेणु आजपर्यंत पुष्कळ वेळां नष्ट झाला. पण इंद्राचें राज्य त्याबरोबर नष्ट झालें नाहीं ११.

**सर्ग १४**—त्याच्या कुलांतील एका इंद्राला बिसतंतूमध्यें जगाचें भान झालें.

**भुशुंड**—त्या पहिल्या इंद्राच्या कुलांत झालेला कोणी एक उत्तम गुण-

वान् व श्रीमान् इंद्र होता. त्याचें तें शेवटचें शरीर होतें. बृहस्पतीच्या उपदेशानें त्याला आत्मतत्त्वसाक्षात्कार झाला. त्यामुळें त्याला सर्व वेद्य ज्ञात झालें. जें जें प्राप्त होईल त्या त्या प्रमाणें तो अनुवर्तन करीत असे. देवांच्या त्या ईश्वरानें दानवांशीं युद्ध केलें. सर्व शत्रूंना जिंकलें. शंभर यज्ञ केले व त्याचें मन अज्ञानांतून पार निघून गेलें. काहीं कारणानें तो कमलनालांतील सूक्ष्म तंतूमध्यें दीर्घ काल राहिला. त्याला तेथें अनेक विचित्र गोष्टींचा अनुभव आला. त्या ज्ञानी इंद्रवंशजाला 'ध्यान लावून आपण ब्रह्मतत्त्वाचें दर्शन घ्यावें अशी इच्छा झाली. व त्याप्रमाणें एकांतांत बसलेल्या त्यानें केलें. शांत मनानें त्यानें सर्वशक्ति परब्रह्मास पाहिलें. सर्वगामी, ज्याला सर्वतः कान, हात, पाय, मुख, इत्यादि आहेत; पण जें स्वतः सूक्ष्म असल्यामुळें अविज्ञेय, सर्वइंद्रियगुणांनीं रहित, निर्गुण इत्यादि आहे अशा तत्त्वाला त्यानें साक्षात् पाहिलें. तें सर्वत्र चंद्रसूर्यमय सर्वत्र पृथ्वीमय, सर्वत्र पर्वतमय, सर्वत्र सागरमय व सर्वत्र चिन्मय दिसलें. घट, वस्त्र, वट, भिंत गाडी, वानर, घर, आकाश, वृक्ष, पर्वत, वायु, जल, अग्नि इत्यादि सर्वांत त्याला तें तत्त्व आढळलें. त्यानें परमाणूच्या अंशामध्येंही नाना शारीर आचार व मानस विचार यांनीं युक्त असलेले प्राणी व स्वर्ग–नरकादिकांतील जन्म–मरणादि भाव यांनीं भरलेलीं असंख्य त्रिभुवनें पाहिलीं. मिरचीमध्यें जशी तीक्ष्णता व आकाशांत शून्यत्व त्याप्रमाणें चिन्मय आत्म्यामध्यें जगाचा आविर्भाव व तिरोभाव त्याला दिसला. याप्रमाणें अनेक अपूर्व गोष्टी पहाणारा तो देवेंद्र जीवभावरहित शुद्धभावनेनें तसाच ध्यान करीत बसला. ध्यानाच्या योगानें सर्व एकेजागीं पहाणारा तो उदारबुद्धि या आमच्या सृष्टीस पाहता झाला. त्यानंतर या सर्गांत संचार करणाऱ्या त्यानें सर्व लोकाची कल्पना केली व शेकडों वृत्तांतांनीं सुंदर असलेल्या त्रिभुवनाचें राज्य आरंभिलें. हे विद्याधरकुलाधीशा, याप्रमाणें त्रसरेणूंतील इंद्राच्या कुलांत झालेल्या तो इंद्र यावेळीं या ब्रह्मांडामध्येंही देवराज होऊन राहिला आहे, असें तूं जाण. तो या ब्रह्मांडाचा इंद्र झाल्यावर हृदयामध्यें बीजरूपानें (संस्काररूपानें) स्थित असलेल्या मुख्य ज्ञानयोगाभ्यासाच्या योगानें त्याला आपला पूर्व वृत्तान्त आठवला. तात्पर्य सर्वशक्तिसंपन्न ब्रह्माच्या

ठिकाणीं सर्व असल्यामुळें असले सहस्रावधि इंद्र सर्वत्र असणें शक्य आहे, असें जाण. अशाच प्रकारचे अनेक इंद्र आजवर झाले आहेत व पुढें होतील. हा प्रवाह सतत चालला आहे. चवथ्या भूमिकेपासून सहाव्या भूमिकेपर्यंत ब्रह्मपद अर्धें रूढ झालें असतां व अर्धें रूढ झालें नसतां ही सर्व माया आहे हा अनुभव येतो. सृष्टि मायामय असल्याकारणानेंच तिच्यांतील वैचित्र्याचे विशेष हेतु पाहण्याचें कारण नाहीं. मेघापासून जशी वृष्टि त्याप्रमाणें अहंभावचमत्कारापासून सृष्टि होते. जी विचारपूर्वक पाहूं लागतांच क्षीण होते. यास्तव सर्व पदार्थांचा बाध होताच एक अद्वितीय चिन्मात्र अवशिष्ट राहतें १४.

**सर्ग १५**—अहंभाव जगद्भ्रांतीचें बीज; त्याचें रूप, त्याच्या निराकरणानें जगाचें निराकरण व शुद्ध तत्त्वाच्या शेषामुळें कृतार्थता.

**भुशुंड**—जेथें जेथें मी, तू व हें जगत् भासतें तेथें तेथें (म्हणजे अगदीं नव्या स्वप्नांतही) तें पूर्वीचेंचसें भासत असतें. या जगद्भ्रमाचें मूळ अहंभाव आहे. ब्रह्मपर्वतावरील आकाशारण्यांत अहंबीजकणापासून वासनारसाच्या सेकामुळें हा जगद्वृक्ष उत्पन्न होतो. अहंरूपी जलाचा जगत् हा स्पंद आहे. (त्याचें अनेक प्रकारें रूपक करतां येतें. पण व्यर्थ विस्तार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं). अहं व जग हीं एकमेकांच्या आश्रयानें राहतात, यास्तव आत्मज्ञानानें अहंभावाचा निरास झाला असतां, जगाचाही निरास आपोआप होतो. अहंपणा तत्त्वतः नाहींच असें जाणणें हेंच त्याचें मार्जन आहे. कारण अति विस्तृत, अनंत, संकल्परहित, ब्रह्मामध्यें अहंत्वाचें कारणच नसल्यामुळें निष्कारण झालेलें तें सत् नाहींच. अहंत्वाच्या अभावीं जगत्ही नाहीं. जगत् व अहं यांना सोडल्यावर राहणारें जें निर्वाण तेंच शांत ब्रह्म आहे. यास्तव तूं त्यामध्येंच स्थिर रहा. जें अकारण व त्यामुळेंच असंभवनीय आहे, तें त्रिकालीं नाहींच. त्यावांचून बाकी राहिलेलें नित्य व शांत ब्रह्म तूं आहेस. विद्याधरा, आतां तूं जागृत झाला आहेस. यास्तव पुनः अशी निर्मूळ भ्रांति होऊं देऊं नकोस. कारण तूं सर्वकल्पनाशून्य, शुद्ध, शिवस्वरूप, शांत व नित्य ईश्वर आहेस. आरोपप्रसंगीं आकाशही पर्वतासारखें होतें व अपवादप्रसंगीं ब्रह्मांडही परमाणुरूप बनतें १५.

**सर्ग १६**—भुशुंडाचा उपदेश ऐकून विद्याधराची समाधि, व अहंभावाच्या प्रशंसेनें कथेची समाप्ति.

**भुशुंड**—मी असें सांगूं लागलों असतां तो विद्याधर शांतचित्त झाला. दुधामध्यें जसें पाणी मिळून जातें, त्याप्रमाणें तो समाधीच्या योगानें ब्रह्मामध्यें मिळून गेला. मीं त्याला पुनःपुनः हाक मारून सावध करूं लागलों; पण निर्वाणास प्राप्त झालेला तो त्याच्या पुढें असलेल्या शब्दादि विषयामध्येंही आसक्त झाला नाहीं. मुने, तो मुख्य अधिकारी असल्यामुळें तेवढ्याच बोधानें ज्ञानी झाला. त्याला श्रवणादि इतर प्रयत्नांची आवश्यकता राहिली नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—रामा, एवढ्यासाठीं मीं तुला म्हटलें, कीं शिष्याचें चित्त जर शुद्ध असेल तर उपदेश तत्काल ठसतो. बाबारे, अहं नाहीं. यास्तव तूं आपल्या मनात त्याची भावना करूं नको. म्हणजे तुला शांति मिळेल. थोडक्यांत एवढाच उपदेश करता येण्यासारखा आहे. पण तो अशुद्ध मनामध्यें पडल्यास तापलेल्या तव्यावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणें लीन होतो; पण तोच अतिशुद्ध मनात पडल्यास स्थिर होऊन विचाराख्य ज्योत उत्पन्न करतो. दुःखसंज्ञक शिवरीच्या वृक्षाचें अहंभावनच बीज आहे. 'हे माझें' 'मी यांचा' अशा भावना हीं त्याचीं अवांतर मूळें आहेत. त्यापासूनच त्या वृक्षाचा विस्तार होतो. बीजस्थानीं अहं; वृक्षस्थानीं मम (माझें) व शाखास्थानीं इच्छा राहते. तीच असंख्य अनर्थ करणारी आहे. असो; अशा प्रकारचे पुष्कळ मूढही चिरायु होतात. कारण दीर्घायुष्याचें तत्त्वज्ञान हेंच कारण आहे, असा कांहीं नियम नाहीं. शुद्ध पुरुषास थोडासा उपदेशही पुरतो. ते तो कानीं पडतांच अभयप्रद परमपदीं प्राप्त होतात. असो; दशरथसुता, भुशुंड काक मेरुशिखरावर मला असें सांगून मुकाट्यानें बसला. मीही त्या मुक्तात्म्याला व सिद्ध विद्याधराला विचारून पुनः मुनिमंडलानें मंडित असलेल्या स्वस्थानीं परत आलों. या गोष्टीस आज अकरा महायुगें झालीं १६.

**सर्ग १७**—अनहंभावानें अहंभाव गळला कीं देहादिसंसाराचें मिथ्यात्व सिद्ध होतें.

**श्रीवसिष्ठ**—सर्व संसार कामनामूलक आहे. त्यामुळें मी देहादि नाहीं, मी नाहीं, या भावनेनेंच त्याची निवृत्ति होणें शक्य आहे. या अनहं-

भावनेचा अभ्यास केल्यानें पुरुष विरक्त होतो. त्याला मातीचें ढेकूळ, दगड व सोनें एकसारखेंच भासतें. त्यामुळें त्याला पीडा मुळींच होत नाहीं. आत्मसाक्षात्कार होतो. त्यानंतर गोफणींतून उडालेल्या दगडाप्रमाणें अहंभाव कोठें जातो व त्याचें काय होतें तें मला कळत नाहीं. अहंकार गेला म्हणजे शरीर, इंद्रियें, मन, इत्यादि सर्व क्षीण होतात. निर्बल होतात. शरीररूपी पानातील अहंभावरूप रसासव काढून घेतला असतां तो परब्रह्मरूप होतो. पण तत्त्वज्ञानावाचून केव्हांही व कोणत्याही अवस्थेंत देह व अहंकार यांचा अत्यंत (सकारण) उच्छेद होत नाहीं. कारण ज्ञानाग्नीनें त्याचा बीजभाव दग्ध न झाल्यास तीं दोन्ही परस्पराच्या उत्पत्तीस कारण होऊन संसार अविच्छिन्नपणें करितात. विचार हेंच आत्मज्ञानाचें उत्तम साधन आहे. त्याच्या अभावीं बंध हें फल जसें अवश्य मिळतें, त्याप्रमाणें श्रवणादि योग्य मार्गानें पूर्ण व शुद्ध विवेक केल्यास आत्मज्ञान होऊन त्याचें मोक्ष हें फलही अवश्य लाभतें १७.

**सर्ग १८**—आकाशांत सर्व बाजूंनीं वायूकडून वाहून नेल्या जाणाऱ्या मृत जीवांच्या मनांतील असंख्य जगांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, अविवेकी जन मन, बुद्धि, अहंकार, इत्यादि सर्वांचा नाश होणें, हेंच मरण होय, असें म्हणतात; पण तें बरोबर नव्हे. कारण सर्व-नाशरूप मरण म्हणून कांहीं नाहींच. तर एक प्रारब्ध संपून दुसरें प्रारब्ध उत्पन्न झालें म्हणजे तदनुरूप अन्य स्थानीं (शरीरांत) जाण्यासाठीं लिंगशरी-रानें पूर्वस्थान सोडून जाणें, हेंच मरण आहे. अर्थात् अदृष्टक्षय झाला असतां पूर्वभावास विसरून उत्तरभावाचें स्मरण होणें, यावाचून मरण शब्दाचा आणखी कांहीं अर्थ नाहीं. राघवा, अशी स्थिति असल्यामुळें त्या त्या जीवाच्या संकल्पानें कल्पिलेल्या जगांतील मंदर, मेरु इत्यादि पदार्थ वायु सर्व दिशांमध्यें वाहून नेत आहे, असें मला दिसतें. तूंही पहा; केळीच्या खांबांतील सोपटाप्रमाणे या सर्व सृष्टि आकाशांत एकावर एक व एकांत एक अशा रीतीनें कवटाळून राहिल्या आहेत. त्या कशा म्हणून विचारशील तर सांगतों. प्राणांच्या आंत चित्त असतें. चित्तांत बीजांतील वृक्षाप्रमाणें, नाना आकाराचें जग राहतें. पुरुष मेला म्हणजे त्याचे प्राणवायु आकाशांतील महावायूशीं मिळतात. ते वायूबरोबर इत-

स्ततः फिरूं लागतात. त्यांत जीवसंकल्पानें कल्पिलेलीं जगें असतात. त्यामुळें वायूबरोबर संचार करणाऱ्या अनंत जीवांच्या प्राणवायूंतून अनंत जगें मला सूक्ष्मदृष्टीनें दिसणें, अगदीं सुशक्य आहे. माझ्याप्रमाणें तुलाही त्याचें दर्शन होईल. पण तुला बुद्धिदृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें पाहिजे. आकाशातील वायूंत मृतांचे प्राण आहेत. प्राणांमध्यें मन आहे. यास्तव तिळातील तेलाप्रमाणें प्रत्येक मनात पृथक् जग आहे, असें तूं जाण. आतां अतिजड जगांना वायु कसा उडवितो म्हणून म्हणशील तर सागतों—आकाशातील वायूशीं मिळालेले मनोमय प्राण आकाशासारखेच सूक्ष्म असतात. त्याच्याप्रमाणें त्याच्या अंगभूत जगेंही तशींच सूक्ष्म असतात. अर्थात् त्या हलक्या जगाना वायु वाहूं शकतो. पुष्पाच्या गधाप्रमाणेंच तो चतुर्विध प्राण्यासह जगाना सहज उडवून नेतो. पण त्या वाऱ्यातून वाहणाऱ्या जगदणूंना ज्ञानदृष्टीनें पाहता येतें. तीं अतिसूक्ष्म व सर्वत्र आहेत. तीं सर्व कल्पनामात्र असल्यामुळें वस्तुतः नाहींत व त्यामुळेंच वायु त्याना उडवीतही नाहीं. तथापि त्या त्या जीवभोग्य स्वर्ग–नरक–भूमिप्रभृति लोकामध्यें जीवाच्या दृढ भावामुळें तीं सुखदुःखादि भोगरूप सत्य क्रिया करीत असल्यासारखा भास होतो. म्हणून तीं सत्यच आहेत. कारण त्यांना सत्यता देणारें अधिष्ठानचैतन्य सर्वगामी आहे. म्हणजे ज्याप्रमाणें तूं आमच्या दृष्टीनें श्रवण, धारण इत्यादि अर्थक्रिया करण्यास समथ, आम्हांपुढें बसलेला व सत्य आहेस, त्याप्रमाणेंच तीं जीवाचीं संकल्पजगेंही सत्य आहेत. त्यात जीं वासनामात्र व त्यामुळें अव्यक्त असतात त्यांना वायु प्राणांबरोबर वाहून नेतो आणि जीं व्यक्त असतात त्यांना वाहून नेत नाहीं. सूक्ष्म वस्तूंना वायु कसा नेऊं शकतो तें मी वर पुष्पाच्या सुगंधाचा दृष्टान्त देऊन सागितलेंच आहे. घागर कोठें ही जरी नेली तरी त्यातील आकाशात जसें अंतर पडत नाहीं, त्याप्रमाणें जगद्भ्रमरूपानें चित्ताचा स्पंद व भेद जरी होत असला तरी आत्म्याच्या स्वरूपात कांहीं विकार होत नाहीं. ज्याप्रमाणें मृतांचीं जगें संकल्पमात्र असल्याकारणानें असत् त्याप्रमाणें तुझेंही जग त्याच कारणामुळें असत् आहे. ती केवळ भ्रांति आहे. त्यामुळें वस्तुतः तिचा नाश व उदय होत नाहीं. ती केवल ब्रह्मरूपिणी आहे. आमची

ही पृथ्वीही वायूकडून परमाणूंप्रमाणेंच वाहिली जाते; पण नावेंत बसलेल्या लोकाना जशी नांव चालत आहे असें वाटत नाहीं त्याप्रमाणें आम्हांला तिची गति कळत नाहीं. चित्रकार चित्रांत फार मोठा प्रदेशही जसा सूक्ष्म-प्रदेशांत काढून दाखवतो त्याप्रमाणें सूक्ष्मतम परमाणूंतही सूक्ष्मदृष्टया जगाचा अनुभव येतो. अथवा परमाणूचें प्रमाण फार मोठें आहे अशी कल्पना करून त्यांत मोठ्या जगाचा समावेश झाला आहे अशी कल्पना करावी. कारण प्रत्येक जीव आपापल्या सामर्थ्याप्रमाणें व बुद्धीप्रमाणें वस्तूला महत्त्व देत असतो. ज्यांचा धनाशीं मुळींच कांहीं संबंध नाहीं असे उंदिर एकाद्या रत्नाच्या भांडारगृहात शिरल्यास ते अमूल्य रत्नानाही तुच्छ समजून पसाभर तांदुळांनाच अधिक महत्त्व देतात. किंवा अल्प बालक बहुमूल्य व चागलीं घडविलेलीं आभरणेंही टाकून मातीचें चित्र घेतात, हें प्रसिद्ध आहे. शिवाय खऱ्या अल्पवस्तूमध्यें मोठ्या वस्तूचा समावेश खरोखरी न का होईना, पण भ्रांतीनें तो होण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? सर्वज्ञालाही व्यवहाराकरितां प्रारब्धक्षय होई-तों लेशतः मूढतेचा अवलंब करावा लागतो. म्हणूनच सर्वज्ञ असाही समष्टि जीव हिरण्यगर्भ आपल्या स्वरूपात अवयवाप्रमाणेंच त्रिजगत् पाहतो. साराश, अहंत्व व जगत् याचा भेद नाहीं. अहंपणा सोडला कीं, जगत् सुटलें. अहं व जगत् याचा इतका निकट संबंध असला तरी त्या मिथ्या भावांचा खरा एकात्मभाव नाहीं. त्या दोघांच्या अधिष्ठानाला मात्र नित्य ऐक्यभाव असतो. यास्तव अहंभाव सोडून अनहंभाव संपादन कर. म्हणजे देहादि संसार मिथ्या व त्या दोघाचेंही अधिष्ठान सत्य आहे, असें तुला स्पष्ट कळेल १८.

**सर्ग १९** जीवाचें स्वरूप, समष्टिव्यष्टि देहाचें तत्त्व, स्थान, करण व भोग.

**श्रीराम**—गुरुवर्य, जीवाचें शास्त्रीयव्यवहारोपयोगी व पारमार्थिक स्वरूप, त्याचें शरीरग्रहण, परमात्मत्व व बाह्यव्यवहारद्वार मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—जें अनंत चेतनाकाश ब्रह्म तेंच ' मीच जीव होतों ' अशा श्रुत्युक्त संकल्पानें जीव होतें. त्याचेंच चेतन हें दुसरें नांव आहे. चिन्मात्र हें त्याचें पारमार्थिक रूप आहे. अणु, स्थूल शून्य, इत्यादि दुसरें काहीं नव्हे. अनुभव हें त्याचें स्वरूप आहे. तें अणूंहून अणु व

स्थूलाहून स्थूल आहे. ज्या ज्या पदार्थाचा जो जो भाव ( मूळ स्वरूप ) असतो, त्या त्या ( रूपा ) नेंच तें सर्वत्र स्थित असतें असें जाण. समष्टि जीव सत्यसंकल्प असल्यामुळें तो जसा जसा संकल्प करतो तसें तसें होतें, व व्यष्टि जीव जेथें जसा असतो तेथें तसा अनुभव घेतो. अर्थात् वायूच्या स्पंदाप्रमाणें सर्ववस्तुवैचित्र्यचेतनात्मकसर्ग समष्टिजीवाचा स्वानुभव सिद्ध स्वभाव आहे. त्यामुळें मुक्ति, सुषुप्ति व प्रलय ( मरण ) यामध्यें बाह्य व आंतर अर्थाचें ज्ञान होत नसल्याकारणानें त्याचें जीवत्वही शांत होतें. जीव चिद्घनरूप असल्यामुळें व अहं असें जाणत असल्यामुळें देश, काल, क्रिया, द्रव्य इत्यादि शक्ति निर्माण करून राहतो. तो स्वप्नांतील स्वमरणाप्रमाणें स्वचित्तानें जीवता, कर्तृता, भोक्तृता इत्यादि पाहतो. आपली नित्य चेतनसत्ता विसरून तो ( समष्टि जीव ) स्थूल विराट्रूप होतो. तो स्वतःच ब्रह्म, विष्णु, रुद्र इत्यादि होतो. पण हा सर्व कार्यभाव मिथ्या असल्यामुळें स्वकारणरूप आहे. तो मनोमय भाव परम कारणापासून क्षणांत होतो व क्षणांत जातो. पण परम कारणापासून विकाररूपानें झालेला तो वस्तुतः आकाशाप्रमाणें शुद्ध, शांत व नित्य आनंदमय आहे. तो स्वतःच आपोआप होतो, आपणच शांत होतो, स्वतःच पसरतो व स्वयं संकोच पावतो. त्याचें रूप केवळ मनोमात्र आहे. तो सर्वोपादानभूत ईश्वराचा देह आहे. त्यालाच पुर्यष्टक म्हणतात. कारण तोच व्यष्टिभावानें सर्व जीवांचा आतिवाहिक भेद आहे. कीडी, मुंग्या, इत्यादि सूक्ष्म देहांमध्यें तो सूक्ष्म होतो. परमार्थतः तो कांहीं नाहीं, पण व्यवहारतः परिच्छिन्न आहे. रामा, पंच ज्ञानेंद्रियें, ( कर्मेंद्रियें ) प्राण मन, अहंकार, अशीं आठ त्याचीं अंगें आहेत. त्यानेंच चतुर्मुख ब्रह्मदेव होऊन वेद गायले. शब्द व अर्थ यांची कल्पना केली. नियति स्थापिली व तीच अद्यापि जशीच्या तशी चालली आहे. त्याचे मस्तक वर अति उंच पसरलें आहे व पाय खालीं खोल गेले आहेत. आकाश व पाताळ यांच्या मधला अंतराळ प्रदेश हें त्या विराडात्म्याचें उदर असून, ब्रह्मांड त्याचें शरीर आहे. लोकांतर हे त्याचे आजूबाजूचे अवयव आहेत. जल हेंच त्याचें रक्त आहे. पर्वत ह्याच मांसपेशी आहेत. नद्या ह्या रक्तवाहिन्या शिरा आहेत. समुद्र

हे रक्ताचे आधार आहेत. द्वीपें हीं आंतडीं आहेत. दीर्घ दिशा हेच विस्तीर्ण बाहु आहेत. नक्षत्रें ही रोमपंक्ति आहे. एकूणपन्नास वायु हे प्राण आहेत. सूर्यमंडल हा प्रखर चक्षु आहे. वडवानल हा जठराग्नि आहे चंद्रमडल हाच जीव, श्लेष्मा, शुक्र, बल, वपा व संकल्पात्मक मन आहे. परमामृत ब्रह्म हेंच ह्याचें सार आहे. रामा, याचें मन हेंच या शरीरवृक्षाचें मूल व कर्मवृक्षाचें बीज आहे. उत्पन्न होणाऱ्या सर्व भावाचें हेंच पोषक द्रव्य आहे. तो चंद्रमा विराडाच्या शरीरातील जीव आहे. कारण अन्नरूप अशा त्याच्याकडून समष्टि प्राणाचे धारण केलें जातें. त्याचप्रमाणें 'चंद्रमा मन होऊन हृदयात प्रवेश करता झाला,' अशी श्रुति असल्यामुळें तो अन्नमय कोशसंज्ञक व्यष्टिशरीराचें बीज, प्राणामुळें होणाऱ्या सर्व कर्माचें मूल व व्यष्टि मनाचें कारण आहे. याच चंद्रमा नावाच्या विराट् जीवापासून त्रिभुवनांत जीव, मनें, कर्में, भोग व मोक्ष उद्भवतात. ब्रह्मदेव, विष्णु, हर इत्यादि हे सर्व विराट्-जीवाचे संकल्प आहेत. देव, असुर व आकाशचर हे त्याच्या चित्ताचे चमत्कार आहेत. चित्स्वभाव विराडात्मा प्रजापति साक्षी असल्यामुळें जेव्हा सृष्टीच्या आरंभीं चंद्रामध्यें अति सूक्ष्म अमृतकलेची व देवतादि शरीराकाराची भावना करतो तेव्हां त्यात तो स्वतःच चतुर्मुखादि भावामध्यें स्थित होतो. कारण त्याचा सकल्प सत्य असतो. हें चंद्रमंडलच विराट् जीवाचें शरीर आहे. त्याच्यापासून दंव व वृष्टि या रूपानें व्यष्टि जीवाचीं बीजें पृथ्वीवर पसरतात. तीं औषधि, वनस्पति इत्यादि प्राण्याच्या भोग्य पदार्थांत शिरून जीवांस निर्माण करितात. अशा तऱ्हेचे असंख्य विराट् व महाकल्प आजवर होऊन गेले आहेत व पुढें जातील. हल्लींही असंख्य विराट् आहेत. पण त्या सर्वांना ब्रह्माचीच एक सत्ता आहे. सर्व विराट् पुरुष मायाच्छादित ब्रह्मामध्यें सदा राहतात १९.

**सर्ग २०—समष्टि व व्यष्टि याचें-वासना, काम, कर्म इत्यादिकाच्या अनुरोधानें संकल्पानें उत्पन्न करणें या एका गोष्टींत साम्य आहे.**

**श्रीवसिष्ठ**—पंचभूतरूप संकल्पपुरुष (विराट्) स्वतः जसें जसें व्हावें, म्हणून इच्छितो तसें तसें सर्व होतें. हे रामा, हें झालेलें सर्व जग त्याचा संकल्प आहे, असें विद्वान् जाणतात. कारण ब्रह्मच पूर्व

कल्पांतील विराट् पुरुषाच्या उपासनेनें या कल्पाच्या आरंभीं विराट्‌रूप होऊन समष्टिभोगांविषयीं उन्मुख झालें. कारणासारखींच कार्यें असतात असा नियम आहे व जगांतील सर्व पदार्थांचें कारण विराट् आहे. यास्तव प्रत्येक व्यष्टि जीवही आपल्या स्वरूपांत विराटाच्या सर्व सर्गांचा अनुभव घेऊ शकतो. सर्पापासून शंकरापर्यंत हा सर्व भ्रम असाच उद्भवला आहे. बीजकोशामध्यें जसा वृक्ष त्याप्रमाणें अणूमध्येंही पर्वताचा विस्तार रहातो. सर्व चराचर सृष्टींतील प्रत्येक शरीरात विराट् (स्रष्टा) आहे. त्यामुळें तत्त्वतः व्यष्टिजीव व समष्टि जीव यांचें साम्य सिद्ध झालें. हा सर्व विस्तार विराडात्म्यामध्यें जशा प्रकारचा आहे तशाच प्रकारचा तो मशक, पिसु, भुंगी, इत्यादिकाच्या अति सूक्ष्म शरीरानें मर्यादित झालेल्या जीवातही आहे. वस्तुतः कोठेंही कांहीं स्थूल नाहीं व सूक्ष्म नाहीं तर भ्रांतीनें जें जसें विस्तारलें आहे. तें तसेंच सत्वर अनुभवास येतें. आता कोणी कदाचित् म्हणेल कीं व्यष्टि मन व त्या मन–उपाधीनें उपहित झालेला जीव या दोघांचेही कारण विराट् आहे आणि कारण व कार्य यांच्यामध्यें वैषम्य असल्याशिवाय कार्यकारणभाव उद्भवणेंच अशक्य आहे, तेव्हा विराट व सृष्टि अथवा समष्टि व व्यष्टि यांचें साम्य कसें असणार ? म्हणून कोणी म्हणेल, तर सांगतों–मनापासून चंद्र झाला व चंद्रापासून मन झालें आणि जीवापासून जीव झाला, असें समजावें, अर्थात् बीजांकुराप्रमाणें त्यांच्यामध्यें परस्पर कार्यकारणता आहे. अथवा समष्टि व व्यष्टि यांची सत्ता एकच आहे, त्यामुळें त्यांच्यामध्यें भेद नाहीं, मग भेदाभावीं कारणता कोठची ? प्रथम जीवाची उपाधि रेत हेंच आहे, नंतर त्या उपाधीनें युक्त असलेल्या जीवापासून आनंद प्रवृत्त होतो. ( आईबापाच्या भोगसमयीं पूर्णानंद ब्रह्माच्या भोगाकार वृत्तींत आनंदाचा प्रादुर्भाव होतो, ) ब्रह्माच्या त्या आनंदास जीवाचा संयोगकालीन स्वभाव या नावानें सामान्य लोक ओळखतात. जीव आनंदस्वभाव रेतोधातु होतो, त्यानंतर तो उत्तरोत्तर प्राप्त होणाऱ्या देहादिकाच्या ठायीं ' हा मी ' असा अहंभाव ठेवून मूढ होतो. जात्यंधाप्रमाणें त्याला योग्य मार्ग दिसत नाहीं. स्वतःचें स्वरूपही दिसत नाहीं, अविद्येनें वेष्टित झालेला जीव जगाला पाहतो व द्वैतभाव धारण करतो. पण हा सर्व

व्यवहार अज्ञानानें होत असल्यामुळें कारणशून्य आहे. त्यामुळेंच ज्ञानाच्या योगानें त्याचा बाध होऊन मोक्ष मिळणें शक्य आहे. यास्तव हे रामा, तू अज्ञानरहित व चित्प्रकाशमात्र होऊन सर्व प्रकारें एक व परिपूर्ण हो आणि अतिसुखानें रहा १०.

**सर्ग** २१—दोन प्रकारची बंधुता.

**श्रीवसिष्ठ**—रामा, प्रत्येकानें ज्ञानी व्हावें. पण ज्ञानाच्या निमित्तानें यथेष्ट आचरण करून स्वतः आपणाला व दुसऱ्याला बद्ध करणारा ज्ञान-बंधु होऊं नये.

**श्रीराम**—प्रभो, ज्ञानी व ज्ञानबंधु कोणाला म्हणतात. व त्यांना कोणकोणतें फल मिळतें.

**श्रीवसिष्ठ**—जो एकाद्या शिल्पीप्रमाणे द्रव्यादि भोगसाधनाकरिता शास्त्र पढतो व त्याचें व्याख्यान करतो, पण स्वतः त्याप्रमाणें वागत नाहीं, तो ज्ञानबंधु होय; ज्याचा शास्त्रबोध प्रतिकूल विषय समीप आले असतां वैराग्यादिकाच्या योगानें सफल झाल्याचें दिसत नाहीं. तो ज्ञान-बंधु होय; कारण तो आपल्या भाषणवैचित्र्यानें एकाद्या नटाप्रमाणें श्रोत्यांचें नुस्तें चित्तरंजन करण्यासच कायतो समर्थ असतो. उत्तम वस्त्रें व भोजनादि पदार्थ मिळणें हेंच शास्त्रफल आहे, असें जे जाणतात ते शास्त्रार्थाचा शुद्ध विक्रय करणारे आहेत. पुढील श्रवणादिकास अनुकूल असलेल्या शास्त्रोक्त अग्निहोत्रादि प्रवृत्तिरूप धर्मांत प्रवृत्त होणारे पुरुष शुभ ज्ञानबंधु होत. कारण उचित सत्कर्मांच्या अनुष्ठानामुळें चित्तशुद्धि होऊन त्यांना पुढें लवकरच ज्ञान होतें. आत्मज्ञान हेंच खरें ज्ञान असून बाकीचीं ज्ञानें म्हणजे ज्ञानाभास आहेत. कारण त्याच्या योगानें साररूप तत्त्व कळत नाहीं. आत्मज्ञानाचा अभाव असतांनाही दुसऱ्या क्षुद्र ज्ञानानें जे संतुष्ट होतात व कष्टकर चेष्टा करितात ते अशुभ ज्ञानबंधु होत. यास्तव मुमुक्षूनें सातव्या भूमिकेचा लाभ होईतों संतुष्ट होऊं नये, तर उत्तरोत्तर अधिकाधिक प्रयत्न करून उत्तमोत्तम स्थान मिळविण्याची इच्छा करावी. रामा, तूंही ज्ञानबंधु होऊन भोगरूपी संसार-रोगामध्यें आसक्त होऊं नकोस. हित, मित व पवित्र आहाराकरितां श्रुति, स्मृति व शिष्ट यानीं न निंदिलेलें कर्म करावें. आहार प्राणधारणार्थ करावा.

तत्त्व–जिज्ञासेकरितां प्राणांचें धारण करावें व ज्याच्या योगानें पुनरपि दुःख करण्याचा प्रसंग येणार नाहीं, तेंच तत्त्व जाणण्याची इच्छा करावी २१.

**सर्ग** २२—**प्रथम** ज्ञान्याच्या लक्षणाचें वर्णन; नंतर प्रसंगतः जीव, जगत् व ब्रह्मतत्त्व यांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—जो पुरुष अभ्यासानें ज्ञान परिपक्क झाल्यामुळें, ज्ञेय ब्रह्मामध्यें दृढ प्रतिष्ठित होतो व प्रारब्धफळ भोगीत असतांनाही चित्ताहून भिन्न असणारे शब्दादि विषय चित्तवृत्तिरूप असल्यामुळें चित्तच आहेत व चित्त मिथ्या आहे असें जाणतो, तो ज्ञानी होय. प्रत्येक विषयज्ञानातील साक्षिचित्स्वभावास तत्त्वतः जाणून वासनाशून्य वृत्तीनें जो अवशिष्ट सृष्टीला पाहतो त्याला ज्ञानी म्हणतात. ज्याच्या व्यवहारामध्यें ज्ञानी पुरुषांना चित्तशातीचा अनुभव येतो, त्या स्वाभाविक शांतपुरुषाला ज्ञानी असें म्हणतात. जो बोध पुनर्जन्मास हटवितो, तो ज्ञान या संज्ञेस पात्र होतो. बाकीचें सर्व ज्ञान अन्नवस्त्र देणारें शिल्प आहे. क्रमप्राप्त कार्यामध्यें जो शून्यहृदय पुरुष काम-संकल्परहित होऊन राहतो तो पंडित होय. जगत् अविद्यामात्र असल्यामुळें तें अकारण व असत् आहे, पण ते असल्यासारखें भासतें, त्याचा आविर्भाव व तिरोभाव एकसारखा चालला आहे, त्यामुळेंच सृष्टि व प्रलय यांची भावना होते, पण आरंभीं तें जग निष्कारणच आहे, उत्पत्तीनंतर त्यातील वस्तूंमध्यें परस्पर कार्यकारणभाव उत्पन्न होतो, वृक्ष बीजाचें व बीज वृक्षाचें कारण होतें, मनुष्याच्या शिंगासारखें असत् व विचार करताच नाहींसें होणारें जग सकारण कसें असणार? असत् वस्तूचें कारण जे शोधितात, ते वंध्यापुत्र व पौत्र याच्याच खाद्यावर बसतात, असत्य प्रतिभासांचें अविचार हेंच मुख्य कारण आहे, आणि त्यामुळेंच ते थोडासा विचार करितांच क्षीण होतात. हा जीव जड, अहंकार, देह इत्यादिकास जाणू लागला असता तत्काळ तादात्म्याध्यासाचे संस्कार जागृत झाल्यामुळें आत्म्याप्रमाणें आचरण करूं लागतो हाच बंध होय. पण स्वतःला शुद्ध चिन्मात्र समजणारा जीव निरतिशय अद्वय आनंदच होऊन राहतो, तोच याचा मोक्ष होय. कारण ज्ञानानें जड जगाचा बाध झाला, तें मिथ्या आहे, असें कळलें म्हणजे

जगाचें भान न होणें हें ब्रह्मदर्शनच होतें; त्यामुळेंच ज्ञानानंतर होणाऱ्या क्रियमाण कर्मानें ज्ञानी लिप्त होत नाहीं. मी कर्ता, या अभिमानाच्या अभावीं तत्त्वज्ञान्याच्या सर्व चेष्टा अस्पंदरूपच आहेत. अर्थात् त्याना पारलौकिक कर्मांची मुळींच अपेक्षा नसते, हें सांगणही व्यर्थ आहे. पण अतत्त्वज्ञाना कर्मांचाच आश्रय करणें भाग आहे. कारण तत्त्वज्ञान नसल्यामुळें कर्मावाचून त्यांना इष्टफलभोगाच्या प्राप्तीचा दुसरा उपायच रहात नाहीं. यास्तव हे श्रुतिस्मृतिप्रोक्त आचार करीत राहतात. तथापि नदीच्या काठीं राहणारा पुरुष कूपाची प्रशंसा जशी कधीं करीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी कर्मांची प्रशंसा करीत नाहीं. गृध्र जसा खालीं पडलेल्या मांसावर झडप घालतो, त्याप्रमाणें इंद्रियें अधःपातास कारण होणाऱ्या विषयावर जाऊन पडतात. यास्तव विद्वानानें इंद्रियनिग्रह अवश्य करावा. कारण तो केला तरच स्वरूपप्रतिष्ठा सिद्ध होणार, हें उघड आहे. ज्ञान्याच्या दृष्टीनें जग म्हणून स्वतंत्र पदार्थच नसल्यामुळें त्याला सर्व ब्रह्म भासतें, विषयभान होतच नाहीं, हें खरें; पण ज्ञान तितकें परिपक्व होईतों इंद्रियनिग्रह केल्यावाचून गत्यंतर नाहीं. असो; साराश ज्याप्रमाणें ब्रह्मांडहृदयामध्यें विराट्–जीव–चंद्र स्थित आहे, त्याप्रमाणें प्रत्येक व्यष्टिदेहात रेतोरूपी हिमकणाकार जीव हृदयांत स्थित आहे. आता तो देह-ग्रहण कसें करतो तें सांगतों. पित्याच्या हृदयात रेतोरूपानें स्थित असलेला अहंकारात्मा जीव पितृमातृसयोगप्रसंगानें मातेच्या गर्भाशयात जाऊन तदाकार होतो. तेथील रक्ताशीं मिसळून तो क्रमानें कर्मानुरूप देहास धारण करतो. उचितकालीं सर्व अवयवानीं युक्त झालेल्या पूर्ण देहात तो अडकवून ठेवलेल्या एखाद्या कृमीप्रमाणें अडकून रहातो. पण तेथेंही त्याची ‘ अहं ’ ही भावना असतेच. ती लुप्त किंवा न्यून होत नाहीं. तो त्या नवीन नखशिखांत देहाला ‘ अहं ’ असें म्हणतो. त्यांतील वेदन इंद्रियांच्या द्वारा बाहेर पडून त्रिभुवनास व्यापतें, यद्यपि तें ( वेदन ) या सर्व देहांस व्यापून राहिलें आहे तरी हृदयस्थ शुक्रामध्यें विशेष अभिमान असतो, हें अनुभवसिद्ध आहे. म्हणूनच हृदयांतील संकल्पानंतरच प्राण्याचे बाह्य विषयव्यवहार चालतात. रामा, चित्ताला ब्रह्माकार केल्यावांचून इतर सहस्र उपायांनींही अहंभाव शांत होणें शक्य

नाहीं. यास्तव तूं इतक्यांतच आपल्याला कृतकृत्य मानूं नकोस, तर उत्तरोत्तर भूमिका-जयाचा प्रयत्न करून आकाशोपम हो. आम्हां तत्त्वज्ञांची गोष्ट तुमच्यापेक्षां अगदीं निराळी आहे. विषयाची भावना सर्वथा सोडून, बाह्य व मानस दृश्य—दर्शनाभिमानाचा त्याग करून कर्मेंद्रियव्यापाररहित होऊन बाहुल्यप्रमाणें आम्ही व्यवहार करतों. ज्याला कोणत्याही प्रकारची भावना नसते त्याला मुक्त म्हणतात. ब्रह्मांडांत सूर्यप्रभा जशी पसरते, त्याप्रमाणें शुक्रस्थ ज्ञानशक्ति नखशिखान्त देहात पसरते. तीच दृष्टि व नेत्र, स्वाद घेण्याची शक्ति व जिह्वा; श्रवणेंद्रिय व कान; इत्यादि पाच वासना बांधून त्यात निमग्न होते. भूमीमध्यें रस सर्वत्र असतो, तरी मधामध्येंच तो जसा एकत्र व्यक्त होतो; त्याप्रमाणें अज्ञानानें आवृत झालेल्या चित्—च्या विपरीत भावनाच प्रथम मन होऊन, रेतच मी आहें या अहभावानें त्याच्या अंशापासून इंद्रियरूपानें ती ज्ञानशक्तीच उदय पावते. जो पुरुष या संसारात रूढ झालेल्या मन, अहकार, देह इत्यादि जगाविषयीं असत्-भावना करीत नाहीं, त्या अ-यत्नशील पुरुषाचें दुःख कधीं शांत होत नाहीं. जो प्रसंगीं जें मिळेल त्यानें देहाच्छादन करणारा, मिळेल त्यानें उदरभरण करणारा, वाटेल तेथें निजणारा असतो, तोच या जगात मोठ्या राजासारखा शोभतो. ब्रह्माकार वासनानें यक्त असला तरी जो जगद्वासनांनीं रहित असतो, जो आसन, शयन, स्थान, इत्यादि कोठेंही जरी असला तरी लोकाच्या मोठ्या प्रयत्नानेंही देहभानावर येत नाहीं; कमलांतील सुगंधाप्रमाणें जो सर्व-ग असनही शरीरात संविद्रूपानें राहतो; तो परमेश्वरच होय. केवळ सावद्रूपच जंतु ( प्राणी ) असतो. त्याचें वृत्तिरूपानें बाहेर पसरणें हेंच जगत् आहे, आणि आत्मनिष्ठत्व हेंच अ-जगत् आहे. राघवा, हा सर्वोत्तम रहस्योपदेश आहे. वैभवादिक सव सांसारिक—भावाविषयीं नीरस होऊन व हृदयाला पाषाणासारखें कठोर करून व्यवहार कर, म्हणजे तूं स्वरूपास मिळशील. बा साधो, तुझें हृदय आतां परिपूर्ण होवो. ज्ञानी व अज्ञयांमध्यें निर्वासन व सवासन मन हाच विशेष आहे. चैतन्यसत्ताच वासनांच्या योगानें विकास पावली असतां जगत् होते व ती निर्वासन झाली असतां अपरिच्छिन्न मोक्षाख्य तत्त्व होते. सर्व दृश्य नष्ट होतें, व नाश

पावलेलें तेंच पुनः उदय पावतें. पण जें कधीं नाश किंवा उदय पावत नाहीं तेंच सत् व तेंच तूं आहेस. रामा, असा शुद्धबोध झाला म्हणजे मूळ अज्ञानाचा नाश होतो व मग जगाला जरी हुडकूं लागलें तरी तें हातीं लागत नाहीं. तत्त्वज्ञानानें अहंभावना नष्ट झाली, कीं जग दिसलें तरी भाजलेल्या बीजाप्रमाणें त्याचा अनुभव निर्बीज होतो. एवढ्यासाठींच भावनारहित ज्ञानी पुरुषानें कर्म केलें तरी वाहवा न केलें तरी त्याची मर्जी, असें सुज्ञ म्हणतात. कारण ते मननरहित व त्यामुळेंच अतिशय शांत पुरुष आत्मस्वरूपात स्थिर असतात. ज्याचें चित्त शात झालेलें असतें तेच खरे शांत होत. कारण भोगवासना समूळ क्षीण न झाल्यामुळें चित्त अंशतः जरी राहिलें तरी तें वासनाच्या उदयास कारण होतें. चित्त, देह इत्यादि रूपानें चित्चा घनपणाच जीवांमध्यें भेद उत्पन्न करतो. यास्तव वासना क्षीण झाल्यामुळें तो नाहींसा होणें हाच ब्रह्मरूप मोक्ष आहे. पुरुष एके जागीं बसलेला असताना त्याचें चित्त दुसऱ्या फार दूरच्या प्रदेशीं जातें. अशा वेळीं शरीरापासून त्या दूरच्या प्रदेशापर्यंत जो मधील भाग त्यात चित्चें निर्विषय स्वरूप असतें. तेंच पूर्ण परमात्मस्वरूप आहे. त्या निर्विषय चित्-चाच जगत् हा मायाचमत्कार आहे. असो; याप्रमाणें हें जग तत्त्वज्ञाला शात, भ्रमरहित व अक्षय ब्रह्म दिसतें आणि तेंच अज्ञाला ईश्वर, नियति, कारणकार्यभाव, देश, काल, क्रिया इत्यादिकानीं युक्त व सत्य असल्यासारखें भासतें २२.

**सर्ग २३**—मेरुवरील अरण्यात वसिष्ठ व मंकि यांची गाठ पडली आणि वसिष्ठांनीं विरक्त व जिज्ञासु मंकीला उपदेश केला.

**श्रीवसिष्ठ**—रामा विरक्तीच्या बळानें सर्व संसारवासना सोडून या प्रकृतीपासून ( म्हणजे स्वाभाविक अज्ञानादिरूप संसारापासून ) तत्त्वज्ञानानें दूर होऊन व मंकीप्रमाणें विरक्ताच्या चिह्नानीं युक्त होऊन तूं निर्वाणात्मपदास जा. पूर्वी मंकी या नावाचा एक तीक्ष्ण व्रतें करणारा ब्राह्मण होता. त्याला माझ्या उपदेशानें निर्वाण कसें मिळालें तें ऐक.—तुझ्या पितामहानें ( अजानें ) कांहीं निमित्तानें मला पाचारण केल्यामुळें, मी एकदां आकाश-कोशांतून भूलोकीं आलों व लौकिकमार्गानें तुमच्या राजधानीकडे येत असतांना मी एका मोठ्या अरण्यांत आलों. त्यांत धूळ

एकसारखी उडत असून वाळवंटें निखाऱ्यांसारखीं तापलीं होतीं. रामा, तें अरण्य किती लांब व रुंद आहे, याचा कांहीं थांग लागत नव्हता. मी त्यांतून जों विहार करीत आहें, तों एक श्रांत झालेला व आपणाशींच भाषण करीत असलेला पान्थ मला समोर दिसला. तो म्हणाला,—ज्याप्रमाणें दुर्जनाचा समागम दुःख देण्यास कारण होतो, त्याप्रमाणें हा प्रौढप्रतापवान् सूर्यही जीवास दुःख देणारा आहे. यावेळीं हा निर्दय जणुं काय आपल्या किरणांतून अग्नीचा वर्षावच करीत आहे, त्यामुळें सर्व अरण्य सुकून गेलें आहे. अशा वेळीं येथें रहाणें मुळींच चागलें नव्हे. यास्तव मी आता अगोदर या समोर दिसत असलेल्या गावात जातों. तेथें थोडा वेळ बसून श्रमपरिहार झाल्यावर पुढें जाईन.

इतकें बोलून तो पुढें दिसणाऱ्या गावात शिरण्याची इच्छा करीत आहे, असें पाहून मीं त्यास म्हटलें,—मित्रा, तुझें स्वागत असो; तूं जेथें जाऊन विश्राति घेण्याची आशा करीत आहेस, तेथें तुला विश्राति मिळणार नाहीं. कारण हें असलें क्षुद्र ग्राम म्हणजे अनेक दुर्गुणांचीं घरेंच असतात. त्यात दरिद्रपुरुषाचा अतिथिसत्कार करणारे महापुरुष प्रायः नसतात. यास्तव तू या असल्या असुखावह ग्रामांत जाऊं नकोस. तुला तेथें खरी विश्राति मिळणार नाहीं. कारण बाबारे, लवणपानानें तृषाशांति कशी होणार ? ती अधिकच वाढणार, हें उघड आहे. त्यातील लोक कामक्रोधवश झालेले, विवेकास भिणारे व सद्गुणाच्या वाऱ्यालाही उभे न राहणारे आहेत. ते अशास्त्रीय मार्गानें संचार करीत असतात. दगडाच्या यंत्राप्रमाणें ते विचार करीत नाहींत. अनुभवावर विश्वास ठेवीत नाहींत व दुराचारास भीत नाहींत. त्याचा सर्व पुरुषार्थ रागादि प्रयुक्त अ-कृत्यांमध्येंच आढळतो. ज्याची बुद्धि दग्ध झाली आहे, असे ते सकृ-दर्शनीं रम्य दिसणाऱ्या कर्मांमध्येंच रममाण होतात. ज्याचीं दोन्हीं कुलें शुद्ध आहेत, अशा सज्जनामध्येंच वृद्धि पावणारी, उदार, शीतल व रसशालिनी प्रज्ञा येथल्या लोकांसारख्या लोकावर विश्वास ठेवीत नाहीं. अंधकारानें भरलेल्या गुहेंत सर्प होऊन राहणें, शिलेमध्यें कीट होऊन पडणें, व मरुदेशांत पंगु मृग होणें बरें, पण ग्राम्यजनसंगम बरा नव्हे. असल्या ग्रामातील लोक विष-कणासारखे एक क्षणभरच मधुर वाटतात.

राघवा, माझें हें गूढार्थानें भरलेलें भाषण ऐकून तो मंकी अमृताच्या डोहात स्नान केल्याप्रमाणें तृप्त झाला आणि म्हणाला,– भगवन्, तूं आत्मज्ञ, पूर्णात्मा व महात्मा दिसतोस. यास्तव तूं कोण ? तूं अमृतपान केलें आहेस कीं काय ? इतका तृप्त कसा दिसतोस ? कीं तूं कोणी सर्व ऐहिकवैभवसंपन्न सम्राट् आहेस. अथवा साक्षात् विराट् आहेस ? कारण सर्व प्रकारच्या संपत्तीनें रहित असूनही तूं परिपूर्ण असल्यासारखा भासतोस ! तू अति शात, रम्य व सर्व उत्तमगुणसंपन्न दिसतोस ! ! तुझें स्वरूप मला ओळखता येत नाहीं. तूं विषयामध्यें आसक्त होत नाहींस. शुद्ध चंद्राप्रमाणें तुझें मन शुद्ध आहे. तुझ्या सर्व आकारावरून तूं साक्षात् हिरण्यगर्भ असावास, निदान तुझी व त्याची बरोबरी तरी असावी, असें मला वाटतें. मी कोण, हें जाणण्याची तुलाही इच्छा असेल. यास्तव प्रथम तेंच मी तुला सागतों. मीं एक शाडिल्यकुलात उत्पन्न झालेला ब्राह्मण आहें. माझें नाव मंकि. मी तीर्थयात्रेच्या उद्देशानें घरून निघून फार दूरचा प्रवास केला. नाना तीर्थें पाहिलीं आणि आतां पुष्कळ दिवसांनीं आपल्या घरीं परत जावयास निघालों आहें. पण स्वगृहीं परत जावें असें मला वाटत नाहीं. कारण या भुवनातील विजेसारख्या क्षणभंगुर जीवास पाहून मला संसाराचा कंटाळा आला आहे. यास्तव भगवन्, तूं कोण तें मजवर कृपा करून मला खरें साग. साधूंचीं चित्त-सरोवरें गंभीर व प्रसन्न असतात. त्यांचें दर्शन होताच भूतें त्याच्यावर विश्वास ठेवितात. मीं आपल्यापाशीं पुष्कळ विचार करून पाहिला. पण तेवढ्यानें माझें हे मन मोहजन्य संसारदुःखाचें निरसन करण्यास समर्थ नाहीं, असें मीं पुष्कळ अनुभवानें ठरविलें आहे. पण तुझ्या दर्शनानंतर थोड्याशा उपदेशामृतानेंच तें समर्थ होईल असें वाटत आहे.

**श्रीराम**—रामा, त्यावर मीं म्हटलें,—साधो, मी वसिष्ठ आहें. कांहीं कारणानें अज–राजाच्या अयोध्याराजधानीस जात आहें. महाबुद्धे, तूं खिन्न होऊं नकोस. आता तूं विद्वानांच्या मार्गामध्यें आला आहेस. तूं बहुतेक संसारसागराच्या परतीरास प्राप्त झाला आहेस. तुझी मति व वाणी वैराग्यवैभवानें उदार झाली आहे. आकृतिही शांत दिसते. असलीं चिन्हें अ–महात्म्याचे ठिकाणीं कधींही नसतात. रत्नाला साणेवर घांसलें असतां

तें जसें निर्मळ होतें, तसें रागादि दोष क्षीण झाले असतां चित्त विवेकसंपन्न होतें. शिष्य गुरूनें उपदेशिलेल्या तत्त्वावर विश्वास ठेवून व वारंवार त्याचेंच परिशीलन करून अज्ञातांशाविषयीं पुनःपुनः प्रश्न करून तत्त्वनिश्चय करीत असतो. यास्तव तुला काय जाणावयाचें आहे व तूं संसाराचा कसा त्याग करण्याची इच्छा करीत आहेस, तें मला सांग. कारण ज्याची वासना शुद्ध असते, मन वैराग्यादि साधनांनीं संपन्न असतें, मति नित्यानित्य–सारासारविचारानें युक्त असते, तोच गुरूच्या उपदेशतेजानें शोकरहित आत्मतत्त्वपदास प्राप्त होण्यास योग्य होतो. दुसरा कोणी नाहीं. मीही संभाषणावरून तुझा अधिकार जाणूनच तुला प्रश्न करीत आहें. यास्तव तूं आपला पूर्वोत्तर–वृत्तान्त मला सांग २३.

सर्ग २४—मंकि आपल्या सांसारिक दुःखाचे वर्णन करतो.

**श्रीवसिष्ठ**—तो मंकि असें बोलणाऱ्या माझ्या पायावर पडला. त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. व मार्गांतून माझ्याबरोबर चालत असताना तो मला म्हणाला,– हे भगवन् , नेत्रदृष्टि जशा चोहोंकडे पसरतात, त्याप्रमाणें आपले संशय घालविण्यासाठीं उपदेशकुशल साधूला शोधीत मी दशदिशांमध्यें यथेच्छ हिंडलों. पण आजवर मला कोणी भेटला नाहीं. परंतु तुझें दर्शन झाल्याकारणानें देवादि समस्त देहांतील उत्कृष्ट अशा या ब्राह्मण-देहाच्या लाभाचें फल मला आज मिळालें. भगवन्, संसाररूपी दोष देणाऱ्या दशा पाहून मी अतिशय खिन्न झालों आहें. कारण पुनः जन्म व पुनः मरण आणि सदा सुखदुःखभ्रम होत असतो. मुने, सामान्य लोक ज्याला सुखें म्हणून म्हणतात, तींही मला असह्य दुःखरूप भासतात. कारण त्याचा नाश अवश्य होतो तो व झाला म्हणजे सामान्य दुःखाहूनही अधिक असह्य क्लेश होतात. यास्तव विषयेंद्रियसंयोगजन्य सुखापेक्षा मला दुःखच बरें वाटतें. बा मुने, सुखें मला इतकें दुःख देतात कीं, तीं दुःखेंच सुखरूप आहेत, असें भासवितात. माझें वय शरीरासह जर्जर झालें. उत्तरोत्तर अधिक भोगांचा अभिलाष करणारी बुद्धि परमपुरुषार्थाच्या साधनांचा निश्चय करण्यास समर्थ होत नाहीं. मन कुसंकल्पामुळें अरण्यासारखें आच्छादित होऊन गेल्यामुळें साक्षिविवेकानें प्रगट होत नाहीं. तें दुष्ट वासनांमुळें पापी झालें आहे.

मति कुटिल झाली आहे. आयास देणाऱ्या विषयचिंतेनें माझें आयुष्य क्षीण करून सोडलें आहे. तृष्णा शुष्क—लतेप्रमाणें विवेकरसाचें ग्रहण करीत नाहीं. ती पुनःपुनः व्यर्थ होत असली तरी सर्वथा नष्ट होत नाहीं. तिला पुष्पें व फळें येत नाहींत. कर्माच्या योगानें हित होईल म्हणून म्हणावें, तर जें कांहीं नित्य-नैमित्तिक कर्म करावें तें सर्व प्राक्तन-दुष्कर्मराशींत कोठें नाहींसें होतें, तेंसुद्धा कळत नाहीं. भोगवासना नांवाचें बीज उत्तरोत्तर अनर्थास कारण होणाऱ्या काम्यनिषिद्ध कर्मामध्यें प्रवृत्त करतें. जीवित हें पुत्र, स्त्री, बांधव, भृत्य इत्यादिकांच्या ठिकाणच्या आसक्तीनें जीर्ण झालें आहे. पण मी भवसागरास तरून गेलों नाहीं. भयदायिनी भोगाशा प्रतिदिवशीं वाढत चालली आहे. लक्ष्मी मिळविण्याकरिता प्रयत्न करीत असताना महा आपत्ति येतात. पुत्र, स्त्री इत्यादि संबंधी-जनांनीं घर कधीं पूर्ण असतें, कधी रितें होतें; पण तें रितें झालें असता चिंताज्वराच्या योगानें असह्य पीडा होते. विषयपरायण झालेल्या मला विवेक स्पर्शही करीत नाहीं. मी आजपर्यंत पुष्कळदा मेलों आहें. पण माझें मन अजून मरत नाहीं; इतकेंच नव्हे तर तें इष्ट अर्थास प्राप्त न झाल्यामुळें सदां दुःखाकरितांच चंचल होत असतें. शास्त्र व सज्जन यांचा संपर्क इत्यादि उपायांनीं मनाचा निरोध करावा, म्हणून पुष्कळजण सांगतात. पण विवेकाचा उदय होऊन जोंपर्यंत अज्ञानरात्रि क्षीण झालेली नाहीं. तोंपर्यंत शास्त्रसंपर्कादिकाचा लाभही होत नाहीं. विचारसूर्य उदय पावेतोंपर्यंत वासनारात्र संपत नाहीं. अवस्तु वस्तू (सत्य पदार्था) सारखी भासते. चित्तगज मत्त होतो. इंद्रियें माझ्या चित्ताला व शरीराला एकसारखीं तोडीत असतात. काय होणार आहे, तं कांहीं कळत नाहीं. सुज्ञानीं आपल्या उद्धारासाठीं ज्या दृष्टीचा आश्रय केला, ती शास्त्रदृष्टिसुद्धा माझ्या प्राकृतदृष्टीला दिपवून सोडीत आहे. यास्तव भगवन्, सर्वतः अनर्थावह झालेल्या या संमोहांतून पार पडण्याचा हितकर उपाय मला सांग. उत्तम गुरु मिळाला असता शिष्याचा सर्व मोह क्षीण होतो, सर्व मनोरथ पूर्ण होतात व त्याचें चित्त रागादिमलरहित होतें, इत्यादि पुष्कळ गोष्टी लोकामध्यें प्रसिद्ध आहेत; त्या सर्व आज माझ्या परमकल्याणाच्या योगानें सत्य होवोत, एवढीच माझी आपणापाशीं प्रार्थना आहे २४.

**सर्ग २९—बंधाचीं चार बीजें व त्यांचा नाश करणारी परमात्म विद्या.**

**श्रीवसिष्ठ**—बा मंके, इंद्रियांच्या योगानें विषयांचा उपभोग घेणें, हें संवेदन; विषय दूर झाल्यावर त्यांच्या गुणाचें पुनःपुनः अनुसधान करणें, ही भावना; चित्तांत तिचा अस्पष्ट आकार उमटणें, ही वासना, व मरणादि समयींही उत्तरदेहोत्पत्तीस अनुकूळ असलेली स्मृति होणें ही कलना, हीं चार अनार्थांचीं बीजें आहेत. तीं वस्तुतः अर्थशून्य असलीं तरी या संसारात अविद्येमुळें मिथ्या उत्पन्न होतात. पण या चार प्रकारच्या अनर्थ-बीजातील सवेदन व भावना सर्व दोषाचें निमित्त आहे, असें तूं जाण. कारण सर्व आपत्ति त्यांपासून उत्पन्न होत असतात. पण त्यातल्या त्यात सुद्धा सवेदनापेक्षा भावना अधिक भयंकर आहे. या ससारारण्यांत वासनावेषानें सर्व प्रवृत्ति करणारे लोक उत्तरोत्तर अधिक अनर्थांत पडत असतात पण विवेकी विषयदोषांचें सतत चिंतन करीत असतो व तो अहर्निश ब्रह्मभावना करीत राहतो. त्यामुळें त्याचा संसारभ्रम वासनेसह निवृत्त होतो. कारण पुढच्या संसाराला वासनाच प्रवृत्त करीत असते. अज्ञानाश्रय जीव-चैतन्यामध्यें वासना संसाररूपानें उदय पावते. पण परमार्थदृष्ट्या पाहिल्यास शुद्ध चिन्मात्राहून दुसरें तत्त्वच नाहीं. त्याच्या सत्तेनें व स्फूर्तीनेंच जगत् सत्ता-स्फूर्तियुक्त झालें आहे. पण याप्रमाणें चिन्मात्ररूपात्मा सर्वतः सर्वदा स्फुरण पावत असतानाही तो देहेंद्रियादिकांहून भिन्न नाहीं व भासत नाहीं, असें वाटविणारी जी अनादि स्थिर भ्राति ती आवरणशक्ति-प्राधान्यानें अविद्या, विक्षेपशक्ति-प्राधान्यानें भ्रम, व त्या दोघाच्याही फळरूपानें ससार होते. त्यामुळेंच नुस्त्या अविचारानें सिद्ध झालेला संसार विचारानें क्षीण होतो. भू-पीठावरील अनेक नद्यांचे ओघ समुद्रात मिळाले असता जसे तद्रूप होतात, त्याप्रमाणें परस्पर भेद उत्पन्न करणाऱ्या दृश्यदृष्टि बाधित झाल्या म्हणजे त्या बोधसाररूप असल्यामुळें एकरूप होतात. जसें मृन्मय भांडें मृत्तिकारहित केव्हांही नसतें, त्याप्रमाणें सर्व जग सच्चिन्मय असल्यामुळें सच्चित्-रहित कधींही नसतें. बोधाच्या योगानें ज्ञात होणारी वस्तु बोधरहित असूं शकत नाहीं. म्हणून तिलाही बोधच म्हणतात. ज्याचा बोध नाहीं तें कोणाला कळतही नाहीं, हें सर्वप्रसिद्ध आहे. द्रष्टृ—दर्शन—दृश्यामध्यें केवळ बोधच सार आहे. कारण द्रष्टृप्रभृति त्रिपुटी आरोपित

असून चिन्मात्र तिचें अधिष्ठान आहे. यास्तव त्रिपुटीगत भेद मिथ्या व अधिष्ठानगत अभेद सारभूत आहे. आतां प्रत्येक जीवाची त्रिपुटी भिन्न भिन्न आहे, हें खरें. पण त्यांचें अधिष्ठान एकच आहे. कारण त्रिपुटींच्या दृष्टीनें जरी तें भिन्न भिन्न भासलें, तरी सागरातील जलाशीं नद्यातील जल जसें मिळून जातें, त्याप्रमाणें अधिष्ठान चित् एकाच प्रकारची असल्यामुळें एकरूप होते. किंबहुना ती सदा एकरूपच असते. काष्ठ, पाषाण इत्यादिकाना जर बोधरूपता नसती, तर त्याचा अनुभव केव्हांही आला नसता. ही दृश्य-श्री केवळ बोधरूप आहे, म्हणूनच तर ती वस्तुतः अनन्य असतांनाही अन्य असल्यासारखी होऊन बोधाच्या योगानें ज्ञात होते. साराश वायु जसा स्पंदमात्र व समुद्र जळमात्र त्याप्रमाणें जगातील हें सर्व दृश्य, बोधमात्र आहे. अनुभवाचे वेळीं सर्व दृश्य अनुभवरूप होत असल्यामुळें अनुभवाच्या पूर्वी व नंतर तें जरी भेदयुक्त असल्याचा भास झाला, तरी वस्तुतः अभिन्नच आहे. पाणी व दूध यांचा संयोग झाला असता त्याच्या अन्योन्य तादात्म्याचा अनुभव येतो. तेंच त्याचें ऐक्य होय. त्याचप्रमाणें दृक् व दृश्य याचेंही अन्योन्यवेदनात्मक ऐक्य आहेच. अर्थात् दोन घनपदार्थांच्या संयोगाप्रमाणें दृक् व दृश्य याचा नुस्ता संयोगच होऊन रहात नाहीं, तर तादात्म्यही होतें. याप्रमाणें सर्व दृश्याना चिन्मात्रत्व असल्यामुळें, महावाक्यातील तत् या पदाचा अर्थ अशी जी चिति ती अमर्यादित आहे; व अमर्यादित असल्यामुळेंच नित्यमुक्त आहे; असें सिद्ध होतें. पण त्या नित्यसिद्ध चित्-ला विसरून ' मी ' अशी मर्यादित बुद्धि धारणें, हाच बंध होय. अर्थात् ती क्षुद्रबुद्धि सोडून अमर्यादित चित्-ची भावना करणें, यासारखा मोक्षाचा दुसरा उत्तम मार्ग नाहीं. मंके, बंध काय तो एवढाच आहे. त्याला दृढ करणें अथवा शिथिल करणें, हेंही ज्याच्या त्याच्या अधीन असतें. तेव्हां त्यांतून मुक्त होण्याची जर तुझी इच्छा असेल तर ती काहीं फारशी कठिण गोष्ट आहे, असें नाहीं. तूं मुक्त होण्यास असमर्थ आहेस, असेंही नाहीं. केवळ तुझा दृढनिश्चय पाहिजे. ' अहं हा भाव खोटाच उद्भवला आहे व त्याला सोडणें यातच सर्व पुरुषार्थ आहे; ' असें जाणून तूं अहं-चा त्याग कर. म्हणजे ममभाव आपोआप शिथिल होईल. त्यावांचून ( कर्मकांडानुष्ठानादि ) दुसऱ्या कोणत्याही उपायानें तो

नाहींसा होणें शक्य नाहीं. कर्मकांडी लोक जड व अजड (चित्) यांचें ऐक्य मानीत असतात. पण स्वभावामध्यें बदल होणें शक्य नसल्यामुळें जें जड तें जडच रहाणार; व चित् त्रिकालीं चित्च असणार, हें उघड आहे. तथापि तूं अजड आत्मरूपालाच जडरूपानें पाहतोस, म्हणून तुझ्या दूषित-दृष्टीमुळें तें भिन्न होतें. जडाशानें भासणाऱ्या अनात्म्याचें आत्म्याशीं ऐक्य होणें अगदीं अशक्य आहे. साराश द्वैतदर्शनाला आमचा मिथ्यासंकल्पच कारण आहे. त्याच्या दृढवासनेमुळेंच मोठमोठे बुद्धिमान्‌ही आत्मतत्त्वाविषयीं भलभलत्याच कल्पना करून, आपापल्या समजुतीप्रमाणें निश्चय करीत असतात व आपल्याला जितकें समजलें असेल तितक्यावरच संतुष्ट होऊन 'हाच खरा सिद्धान्त आहे; मी म्हणतों तेवढेंच खरें आहे, बाकी सर्व खोटें आहे,' असें प्रत्येकजण समजतो व बोलून दाखवितो. त्यामुळें या जगातील लोकाची मोठी दुर्दशा झाली आहे. अनेक मतें व असंख्य कल्पना, अनेक आचार्य व असंख्य उपदेश, त्यामुळें तत्त्वाचा निश्चय कोणालाच न होता बहुतेक सर्व पर्वताच्या शिखरावरून घसरलेल्या शिळेप्रमाणें क्षणोक्षणीं अधोगतीस जात आहेत. वासनानीं व्याकुल करून सोडलेल्या प्राण्यावर दुःखें मोठ्या वेगानें येऊन पडत असतात. त्याचें नुस्तें वर्णन करणेंही शक्य नाहीं. मग अनुभवाची गोष्ट तर दूरच राहिली. तात्पर्य, वासनाभिमानानुरूप रागद्वेषादि रसानें अनुरक्त झालेले लोक विलासिनीच्या हातातील क्रीडा-कंदुकाप्रमाणें अनेक क्षणिक उच्चनीच अवस्थाचा अनुभव घेऊन शेवटीं नरकांत पडतात, व तेथें दीर्घकाल असह्य क्लेश भोगून कृमि—कीटादि मनुष्येतर नीच योनींतच पुनःपुनः जन्म-मरणानुभव घेत काल घालवितात २५.

**सर्ग २६—**भावनेमुळें अनर्थ, व विवेकजन्य तत्त्वदर्शनामुळें भावना-शातीच्या योगानें त्यांची (अनर्थांची) शाति.

**श्रीवसिष्ठ—**मके, याप्रमाणें स्थावरादि योनिरूप संसारमार्गामध्यें पडलेल्या जीवावर छेदन-भेदन-दहन-क्षुधा-तृषा-जरा-भय-मरण इत्यादिरूप लक्षावधि वृत्तान्त पुनः पुनः येऊन पडतात. पण त्या सर्वांचें कारण भावना हेंच एक आहे. तीच या सर्व परस्परभिन्न पदार्थांस एकत्र बाधणारी शृंखला आहे. भावनेचें मूळ विवेकरहित, रागद्वेषयुक्त व पूर्व-

वृत्तांतवासनाघन चित्त आहे. हरहर! वासना अतिशय कठिण आहे. तिच्यामुळेंच सर्व जन हा मिथ्याभ्रम पहात आहेत. आल्हाद देणारा, अमृतवान्, शुद्ध, प्रकाश देणारा व शीतल अशा चंद्र आणि ज्ञानी याच्यामध्यें कांहीं अंतर नसतें. त्याचप्रमाणें पूर्वापरविचार न करणारा, पाहिजे त्याची इच्छा करणारा व निर्मर्याद बालक आणि मूढ यांमध्येंही कांहीं अंतर नसते. प्राप्त झालेलें शुभ अथवा अशुभ आमिष प्राणान्त होण्याचा प्रसंग आला तरी न सोडणारा मासा व मूढ यांमध्यें अंतर काय असणार? देह, स्त्री, धन इत्यादि सर्व भाव क्षणभंगुर आहेत. अरे बा मंकीच्या चित्ता, तूं आब्रह्मस्तंबपर्यंत शेंकडों योनींमध्यें जरी फिरलेंस तरी एका निग्रहावाचून तुला शांति मिळणार नाहीं. नुस्त्या विवेकानेंच बंधाचा गंधही लागत नाहींसा होतो. चित्ता, तूं सावधान राहिलेंस म्हणजे काम तुला कांहीं करूं शकणार नाहीं. कारण जागत राहिलेल्या सावधान पुरुषाला पिशाच काय करणार? ज्याप्रमाणें रूप पाहणें हेंच नेत्राचें प्रसरण आहे, त्याप्रमाणें विवेक व अवधान यांनीं रहित असलेलें संवित्प्रसरणच अहंकारयुक्त जगत् आहे. नेत्र मिटणें किंवा दृष्टि फिरविणें म्हणजेच जशी रूपदर्शनाची शांति, त्याप्रमाणें संवित्चा निरोध करणें म्हणजेच सर्व दृश्याचें शमन करणें होय. तस्मात् हे कामादि षड्रिपूंना मारणाऱ्या शूरा, मंके, अहंकारासह जग शुद्ध संवित्च आहे. ती अविवेकजन्य किंचित्प्रसरणानें आवृत स्वस्वरूपाकाशांत पसरली आहे. ब्रह्मसंवित् परमार्थतः दुसऱ्या कशालाही प्रकट करीत नाहीं, ती या मिथ्या जगाला प्रकट करते. जग मिथ्याच आहे म्हणून कशावरून, असें विचारशील तर सांगतों.—मृत्तिकेनें किंवा सोन्यानें आपल्याच स्वरूपांत कल्पिलेलें कुंभत्व जसें मृत्तिका किंवा सोनें याहून पृथक् करून दाखवितां येत नाहीं, त्याप्रमाणें हें जगही चैतन्याहून भिन्न करून दाखविता येत नाहीं. म्हणून तें तद्रूप होय. अर्थात् त्याला स्वतंत्र सत्ता नाहीं, जर असती तर तें पृथक् राहूं शकलें असतें. तस्मात् जग जगद्रूपानें मिथ्या व चिद्रूपानें सत्य आहे. ब्रह्मसत्ता कधींही बाधित होत नाहीं. ब्रह्मच सर्व पदार्थांचें अबाधित स्वरूप आहे. विचारानंतर बाधित होणारें जग तुच्छ आहे. अहंपणामुळेंच हें सर्व भासतें. यास्तव

सर्व कौतुक व अहं यांचा त्याग केला असतां ज्ञानी केवलस्वरूपात राहतो. असो; रामा, माझें हें भाषण ऐकतांच मंकीनें आपला सर्व विशाल मोह टाकला. क्रमानें प्राप्त होणारें कर्म अनासक्तीनें करीत त्यानें आपल्या आयुष्याचीं शभर वर्षे शांतपणें घालविलीं व आता तो मेरुपर्वतावर समाधि लावून बसला आहे. पाषाणाप्रमाणें निश्चल झालेल्या त्यानें आपलीं सर्व इंद्रियें शांत केलीं आहेत. त्या योग्याला दुसरा कोणी जेव्हां हालवून जागा करतो तेव्हांच तो देहभानावर येतो. हे राघवा, तूंही या मंकीच्या उपायानें ज्ञानवान् हो व विवेकसंपन्न-मनानें परम आनदांत विहार करण्यासाठीं शांति धर. तुझी मति रागमयी व विवेकशून्य होऊन दीनतेस प्राप्त न होवो २६.

सर्ग २७—चित्तस्पंदामुळें चित्–तत्त्वाचेंच स्पंदन होत आहे, असा भ्रम होऊन विश्वविभूति भासतात. व चित्तशांतीनें त्याची शांति होऊन स्वरूपस्थितीचा लाभ होतो

श्रीवसिष्ठ—रामा, तूं शांत हो. प्राप्त होईल तेवढेंच कर्तव्य कर. आत्मज्ञानाच्या पूर्वी तुला एकच तत्त्व अनेक रूप झाल्याचा अनुभव येत होता. पण आता आत्मज्ञानानें व्यष्टि-समष्टि-भावाचा बाध झाल्याकारणानें तुझ्या एक व अनेक या भावनाच लोपून जातील. जड सर्गादिरूप क्रीडा हें मनाचें चापल्य आहे. शुभ्र अभ्राकडे पाहून हें शुभ्र वस्त्र आहे, असें जरी कोणी भ्रांतीनें समजलें, तरी तें अभ्र खरोखरच काहीं वस्त्र होत नाहीं. त्याप्रमाणें मी देह आहें, ही भ्रांतीही देहाला सत्य वस्तु करण्यास समर्थ नाहीं. यास्तव वीरा, तूं या अनंत संसार देणाऱ्या अवस्तूंमध्यें निमग्न होऊं नकोस. अनंत सत्य वस्तूंची भावना कर. म्हणजे तुझें नित्य कल्याण होईल. त्या चिदाकाशाला सीमाच नाहीं. 'ती परम वस्तूच मी आहें,' असा तुझा दृढ निश्चय झाला कीं तूंच निरंजन ब्रह्म होशील. ध्याता, ध्यान, ध्येय, द्रष्टा, दर्शन, दृश्य इत्यादि काहीं एक सत्य नसून तूंच सर्वसाक्षी मात्र सत्य आहेस. जगात कोठें काहीं जरी झालें तरी आत्मतत्त्व सर्वत्र सम असतें. जगातील पदार्थ क्षुब्ध होवोत कीं शांत राहोत, आत्मा सदा अक्षुब्धच असतो. त्याची शांति अखंड आहे. नौकास्थजनाच्या तटस्थ-वृक्षचलनभ्रमाप्रमाणें, देह व चित्तही चित्–दृष्ट्या भ्रांति आहे. त्याचप्रमाणें देहदृष्ट्या चित्तही कल्पित आहे. चित्त व देह

यांच्या दृष्टीनें जीव कल्पित आहे. जीवाच्या दृष्टीनें तीं दोन्ही कल्पित आहेत. सारांश, याप्रमाणें शुद्ध चैतन्याच्या ठिकाणीं हे सर्व विवर्त आहेत. पण ब्रह्मदृष्ट्या सर्व एकच आहे. आकाशांतील वनाप्रमाणेंच ब्रह्मांतील जगाचा असंभव आहे. यास्तव क्षत्रियकुमारा, या अविद्यमान जगद्भ्रमाला भिऊं नको. हेंच परम सत्य आहे. जगच आहे, अद्वितीय ब्रह्मसत्ता नाहीं, अशी जी तुझी भ्रांति होती, ती आज माझ्या उपदेशानें शांत झाली आहे. आता बंधाचें कारण काय आहे? घरांतील सर्व मातीचीं भांडीं जशीं केवळ मृन्मय, त्याप्रमाणें सर्व जग चिन्मात्र आहे. पण तें विचारानें क्षीण होतें, तत्त्वज्ञानानंतर प्रमादानें अथवा प्रबल प्रारब्धामुळें हर्षशोकादिकांची अनुवृत्ति झाल्यास तेवढ्याच अपराधानें पुनः बद्ध होण्याचा प्रसंग येईल, अशी भीति बाळगण्याचेंही काहीं प्रयोजन नाहीं. कारण बा सज्जना, तूं ब्रह्मात्मैक्यरूप वस्तूस अपरोक्ष जाणलेंस म्हणजे मग आपत्ति, संपत्ति, उत्पत्ति, नाश, हर्ष, विषाद, इच्छा इत्यादि चित्तसंतापक दोष तुजमध्यें असले तरी व नसले तरी सारखेंच! तूं माझ्या उपदेशाला न विसरता आपल्या स्वाभाविक स्थितींत रहा २७.

**सर्ग २८—बीजांकुरभूत व जन्म देणाऱ्या पुरुषाच्या दैवसंज्ञक कर्माचें तत्त्व.**

**श्रीराम**—गुरुवर्य, दैवसंज्ञक कर्माचें तत्त्व मला सांगा; कारण तें कर्मच पुनर्जन्माचें कारण होत असतें.

**श्रीवसिष्ठ**—रामा, या लोकांमध्यें संवित्स्पंदनच पुरुष झालें आहे. कारण त्यावांचून पुरुषत्व अथवा कर्मत्व कसें होणार? वासनायुक्त संवित्स्पंदापासूनच जगल्लक्ष्मी प्रवृत्त होते, व वासनारहित संवित्स्पंदापासूनच ती निवृत्त होते. कारण संवित्तीचें वासनाशून्य स्पंदन हें अस्पंदनच आहे, असें ज्ञाते समजतात. चित्स्पंदन पुरुष यामध्यें काहीं भेद नाहीं. कारण चित्स्पंदच पुरुषादिकाच्या आकारास प्राप्त झाला आहे. त्यामुळें तो निवृत्त झाला कीं चित् निराकार होते. अर्थात् जल व तरंग यांचें द्वित्व जसें संकल्पजन्य असून वास्तविक नव्हे, त्याप्रमाणेंच चित्स्पंदरूप जीव व त्याचें कर्म ह्यांचें द्वित्व खरें नव्हे. रामा, पुरुष व कर्म एकच आहे, असें तूं निश्चयानें जाण. कारण दैव, कर्म, पुरुष इत्यादि सर्व चित्स्पंदाचेच पर्यायशब्द आहेत. स्पंदामुळेंच संवित् जगाचें बीज होते. ती स्पंदरहित

झाली कीं, बीजभाव जातो. केव्हा केव्हां स्पंदयुक्त होणें व केव्हां न होणें हा चित्-चा स्वभावच आहे. संवित्स्पंद वस्तुतः अकारण असतांनाही वासनावान् झाला असतां देहादिकाचें कारण होतो. तृण, वेली, गुल्म इत्यादि बीजाकारांतही तोच स्थित आहे. पण त्याचें बीज कांहीं नाहीं. असो; बीज व अंकुर याच्यामध्यें काहीं भेद नाहीं. त्याच न्यायानें कर्मच पुरुष आहे, असें समजावें. स्फुरण पावणारी चित्-च भूमिकोशामध्यें स्थावर वस्तूचे स्थूल, सूक्ष्म, मृदु, कठोर इत्यादि विविध अंकुर निर्माण करते. तिच्यावाचून मऊ भूमींतील कठिण अकुर उत्पन्न करण्यास दुसरें कोण समर्थ आहे ? लतेंतील रस ज्याप्रमाणें पुष्पें व फळें यास जन्म देतो, त्याप्रमाणें प्राण्याच्या वीर्यामध्यें असलेली संवित् जंगम पदार्थांस निर्माण करते. ती अतिशय बलवती व सर्वगता सवित् जर नसती तर देव, असुर, राजे इत्यादिकास उत्पन्न करण्यास कोण समर्थ झालें असतें ? सर्व स्थावर—जंगम पदार्थांचें हेंच आद्य बीज आहे. पण त्याचें ( संवि-स्पंदाचें ) बीज कोणी नाहीं. तात्पर्य, बीज-अकुर व जल-तरंग यां-प्रमाणेंच पुरुष व कर्म यानाही परस्पर कार्यकारणता आहे आणि कार्य-कारणामध्यें वास्तविक भेद नाहीं, असाही सिद्धान्त ठरून गेला आहे. तेव्हां जे शहाणे त्यांना भिन्न समजत असतील, त्यांना साष्टाग नमस्कार करण्यावाचून दुसरा कोणता उपाय आहे ? रामा, तूं असल्या लोकाच्या नादीं न लागता मी सागतों तसें कर. असंग-भावनेनें वासनेचा नाश कर. शुभाशुभ कर्म करीत असताना त्यात मनानें आसक्त ( निमग्न) न होणें, हाच असंग आहे. अथवा वासनांचा उच्छेद करणें हा असंग आहे. कोणत्याही युक्तीनें त्याला संपादन कर. चित्ताला वासनाशून्य करणें, यासारखें शुभ कर्मच नाहीं. दीर्घ प्रयत्नानें अथवा तुला वाटेल त्या रीतीनें अहंभावाचें निवारण कर. कारण अहमंशत्याग हाच वासना-क्षय आहे. प्रयत्नावांचून संसारोत्तरणाला दुसरा उपाय नाहीं. आदि—अंत—रहित प्रत्यगात्मसंवित्-च्या सत्तेनेंच अंकुर—बीज इत्यादिकाची सत्ता स्फुरण पावते; स्वतः नाहीं. संवित्सत्ताच कर्म, पुरुष व शुभाशुभ दैव आहे. एक चिदात्माच मिथ्याबीजादि वेषांनीं जगद्रूप बनून नाचत आहे. यास्तव हे रामा, तूं अशा प्रकारच्या आत्म्याचा निश्चय करून व पुरुष-

कर्मादि मिथ्यापदार्थांची भावना सर्वथा सोडून वासनाशून्य हो आणि त्यानंतर आपल्या इच्छेप्रमाणें समाधि लावून अथवा व्यवहार करीत रहा. राघवा, तूं सर्व इच्छारहित, निःशंक, निर्मल चिन्मात्रनिष्ठ, सर्वकार्यकारी, केवल आत्माराम, परिपूर्ण व शांतीच्या योगानें सुंदर हो २८.

सर्ग २९—व्यवहारांत प्राप्तलोकचर्या करीत असतांनाही स्वरूपांत सदा स्थिर रहावें.

**श्रीवसिष्ठ**—रामभद्रा, तूं शत्रु, मित्र व उदासीन यास अनुरूप, असें प्राप्तकर्म करीत असतांनाही नित्य अंतर्मुख, विरक्त व वासनारहित होऊन रहा. देश–काल–क्रमास अनुसरून तूं प्रसंगीं रड, ओरड, हर्ष कर, प्रताप गाजीव, शत्रूंना मार, मित्राचें रक्षण कर, स्त्रियांशीं विलास कर, मुलांशीं खेळ, वृद्धाची पूजा कर, मान्याना मान दे, दुष्टांचा निग्रह कर, दीनांच्या दुःखानें दुःखी हो, त्याच्यावर दया कर. इष्ट वस्तूंचा वियोग झाला असता मूढाप्रमाणें विलाप करीत व अश्रु ढाळीत रहा व अशाच दुसऱ्याही अनेक प्राप्त क्रिया कर. पण आतून वासनारहित व आत्माराम होऊन रहा. कारण बुद्धीला आत्मनिष्ठ करून व शमाच्या योगानें उदार होऊन जो कर्मे करतो तो त्याचा कर्ताच होत नाहीं. बा साधो, तूं आत्मभावनेनें अंतर्मुख झालास म्हणजे तुझ्यावर पडलेलें वज्रही कुंठित होईल. जो संकल्पशून्य संविन्मात्र आत्म्यामध्यें राहतो, तो आत्माराम व महेश्वर आहे. त्याला शस्त्रें तोडीत नाहींत, अग्नि जाळीत नाहीं, पाणी भिजवीत नाहीं व वारे सुकवीत नाहींत. यास्तव धीरा, घर जसें स्तंभाच्या आधारावर राहतें, त्याप्रमाणें तूं आत्म्याच्या आधारानें रहा. अंतर्मुख झाल्यावर वासनाचा उदय होत नाहीं. यास्तव रामा, तूं मनाला निजवून सोड. वृत्तिरहित होऊन सर्व कार्यें कर. झोंपेंत असल्याप्रमाणें व्यवहार कर. चित्ताला शांत केलेंस म्हणजे तुला अवर्णनीय सुख होईल. संकल्पानें कलंकित न झालेल्या संवित्–मध्यें स्थित झाल्यावर तूं पाहिजे तर कर्म कर अथवा नको करूं! याप्रमाणें पुष्कळ दिवस अभ्यास केलास म्हणजे तुला हळू हळू अद्वंद्व-पद प्राप्त होईल. नित्य-विश्रांति मिळेल.

**श्रीराम**—पण प्रभो, सर्व द्वैताचा निषेध केल्यावर 'मी' 'वसिष्ठ', असें, म्हणण्यासही अवकाश रहात नसल्यामुळें आपण वक्ता व मी श्रोता

हा भेद तरी कसा उरणार? व त्यांच्या अभावीं या ज्ञानाचा संप्रदाय कसा चालणार?

श्रीवाल्मीकि—राघव असें विचारूं लागला असतां वसिष्ठ मौन धरून बसला. पण हा महात्मा असा मुकाट्यानें कां बसला? म्हणून सर्व सभा जों विस्मयात पडत आहे, तों राम पुनः म्हणाला,– भगवन्, आपण मजप्रमाणेंच मुकाट्यानें कां बसलां? विद्वान् गुरूंना उत्तर देतां येत नाहीं, असा प्रश्नच शिष्यांपाशीं नसतो.

श्रीवसिष्ठ—रामा, मी बोलण्यास असमर्थ आहें, म्हणून मुकाट्यानें बसलों, असे समजू नको. तर तुझा प्रश्न परमावधीस पोंचलेला असल्यामुळें मौन हेंच त्याचें उत्तर आहे, असें सुचविण्यासाठीं मी काहीं बोललों नाहीं. तत्त्वज्ञ व अज्ञ असे दोन प्रकारचे पृच्छक असतात. त्यातील तत्त्वज्ञाला तत्त्वज्ञासारखें उत्तर दिलें पाहिजे व अतज्ज्ञत्वाला त्याच्यासारखें बोलून शांत केलें पाहिजे. तूं एवढा वेळ अतत्त्वज्ञ होतास. म्हणून मी तुला विकल्पयुक्त उत्तरें देत होतों. पण आता तूं तत्त्वज्ञ झाला आहेस. परमपदीं विश्रांति घेत आहेस. यास्तव तुला आतां सविकल्प उत्तर देणें योग्य नव्हे, असें जाणून मी मुकाट्यानें बसलों. सूर्याचे किरण जसे त्रसरेणूंनीं युक्त असतात; त्याप्रमाणें सूक्ष्मार्थ, परमार्थ, अल्प, बहु इत्यादि जेवढा म्हणून वाग्विलास आहे, तेवढा सर्व विकल्पानें युक्त असतो; आणि हे सुंदरा, तज्ज्ञाला सकलक उत्तर देणें शोभत नाहीं. कोणतीही वाणी कलंकरहित नसते. तू तर महा तत्त्वज्ञ आहेस. यास्तव अशा शिष्याला यथार्थ उत्तर देणेंच उचित आहे, असें जाणून मी मौन धरून बसलो. तत्त्वज्ञ अविचारानें धरलेल्या मौनास काष्ठमौन व विचारपूर्वक धारण केलेल्या मौनास परमपद म्हणतात. यास्तव मींही विचारपूर्वक मौनानेंच तुला उत्तर दिलें. पुरुष ( वक्ता ) जसा ज्ञानी अथवा अज्ञ असतो तसें बोलतो. मी तत्त्वसाक्षात्कारानेंच ज्ञात होणाऱ्या निर्विकल्प वस्तुमय झालों आहें. तेव्हां वाणीचा विषय नव्हे, अशा परमपदीं स्थित असलेला पुरुष वाङ्मळ कसा धारण करील? यास्तव मी अवाच्य तत्त्वाचें निर्वचन करण्यास प्रवृत्त न होतां स्वस्थ बसलों.

श्रीराम—पण भगवन्, वाणीमध्यें जे जे प्रतियोगि–व्यवच्छेदप्रभृति

दोष येतात, त्या सर्वांना सोडून भागत्यागलक्षण–उपायानें आपण कोण तें मला सांगा.

श्रीवसिष्ठ—राघवा, अशी मोठी अडचण असल्यामुळेंच आतां मी कोण, तूं कोण, जगत् काय आहे इत्यादि सर्व जसें आहे तसें सांगतों तें ऐक. मी चिदाकाशमय आहें. मजप्रमाणेंच तूं व हें जगही स्वच्छ चैतन्य आहे. मी प्रत्यगात्म्यावांचून दुसरें कांहीं बोलूच शकत नाहीं. मला दुसरें कांहीं बोलावयाचें ठाऊकच नाहीं. यास्तव तूंही माझ्या सांगण्यावरून अखंड व निर्विकल्प वाक्यार्थ जाण. तर मग अज्ञ बोध व वादिविजय हीं अवश्य कार्यें साधण्याकरितां निरहंकार विद्वानाचा उद्योग कसा होणार? म्हणून म्हणशील तर सांगतों.–शिष्याच्या मोक्षाकरितां, त्याचे संदेह घालविण्याकरिता, व द्वैती–वाद्यास निरुत्तर करण्याकरितांही उद्योग करणारे तत्त्वज्ञ आपल्या ठिकाणीं अहंकारादिकाचा आरोप करितात; पण त्यामुळें अज्ञाप्रमाणें मोहित होत नाहींत. असो; जिवंत असून व्यवहार करीत असतानाही अतिशांत व शवाप्रमाणें निश्चेष्ट असणें हें परमपद होय. त्या शिवस्वरूपाचें वर्णन करवत नाहीं. कारण रामा, अहं असें म्हटलें कीं मुक्तीचा अभाव झाला. तेव्हां अशा विरोधी अहंभावानें त्या परमदशेचा अनुभव कसा येणार? अहंभाव धरून मुक्तीला शोधूं लागणें म्हणजे आंधळ्यानें चित्र पाहण्यास तयार होण्यासारखेंच आहे. पर्वतावरील झाडें, पशु, पक्षी इत्यादि जरी हालचाल करीत असलीं तरी पर्वत जसा स्थिर राहतो, त्याप्रमाणें अहंकार, प्राण इत्यादि जरी चलनवलन करीत असलीं तरी आंतून निश्चळ असणें हेंच चैतन्याचें निर्वाण अजरपद आहे. पण तें दुसऱ्याला कळत नाहीं. ज्याचा त्यालाच अनुभव येतो. कारण त्या ठिकाणीं अहंता, त्वत्ता इत्यादि कांहीं नसतें. केवल केवलीभाव असतो. चित्-नें विषयोन्मुख होणें, हाच संसार व बंध आहे. जगामध्यें यासारखी दुसरी क्लेशकर दशा नाहीं. थोडासा विचार केला असतां चेतनानें विषयोन्मुख होणें, म्हणजे स्वतःला अचेतनसेंच करणें आहे, हें लक्षांत येतें. कारण अमर्यादित शांतस्वरूपांत मर्यादित व क्षुब्ध विषयस्वरूप संभवतच नाहीं. मन, बुद्धि, इंद्रियें इत्यादि सर्व भाव वस्तुतः चिन्मय आहेत. पण मन, बुद्धि इत्यादि रूपानें त्यांची भावना केली

असतां ते जडात्मक होतात. सम शुद्ध संवित्च सबाह्याभ्यन्तर पसरली असतां त्यांत मन, बुद्धि इत्यादि भेदबुद्धि केवळ अनार्थाकरिता उद्भवते. शुद्ध संवित् व शून्य यांत काय अन्तर आहे, व जें कांहीं महत्-अंतर आहे, तें अपरोक्ष आत्मज्ञानी नुसतें जाणतात. बोलून दाखवीत नाहींत. अंधकारात अगदीं टक लावून पाहूं लागलें असतां जसा काहीं तरी भास होतो, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें हें जग दिसतें. वासना शांत केल्यास हा मी आकाशच आहें. तूंही वासनात्याग केल्यास चिदाकाश होशील. सर्व इंद्रियसमुदाय शांत झाला कीं, शांतचित्त पुरुष आंत व बाहेर कशाचाही अनुभव घेत नाहीं. गाढ झोंप लागताच स्वप्न जसें शांत होतें, त्याप्रमाणें समाहितचित्तात सर्व द्वैत, सर्व दृश्य, लीन होतें. हें सर्व मिथ्या आहे, असें निश्चयानें जाणणारा पुरुष वस्तुतः वासनाशून्य असतो. साकल्पिक वस्तूमध्यें स्वप्न–माया–इंद्रजाल इत्यादि जसें अद्भुत, तसेंच जग हें अद्भुत आहे. प्रत्यक्ष स्वप्नामध्येंही ज्याप्रमाणें कोणी आस्था ठेवीत नाहीं, त्याप्रमाणें प्रत्यक्ष जगामध्येंही ती ठेवणें युक्त नव्हे. कारण चित्-दृष्ट्या पाहिल्यास सुख, दुःख, पुण्य, पाप, इत्यादि काहींच नाहीं. कशाचाही नाश होत नाहीं. तर भासणारें सर्व मिथ्या भ्रमरूप आहे, असा निश्चय होतो. यास्तव तूं आपल्या इच्छेप्रमाणें व्यवहार कर. अथवा काष्ठ-पाषाणाप्रमाणें रहा. या अ-मळ चैतन्यामध्यें स्वभाववैचित्र्य संभवत नाहीं. फार काय, पण त्याच्या ठिकाणीं अस्ति-नास्ति इत्यादि कोटिही संभवत नाहींत. यास्तव हे रामा, ब्रह्मवेत्त्यास अत्यंत प्रिय असलेल्या परमार्थसत्य शिवस्वरूपात निष्ठा ठेवून रहा, आणि बाह्यतः लोकाप्रमाणें खा, पी, क्रीडा कर व दुसराही प्राप्तव्यवहार कर. त्याच्या योगानें तुझ्या मुक्तीस बाध येणार नाहीं. कारण सर्वसाधारण बंध तुझ्या ठिकाणीं अंशतःही दिसत नाहीं २९.

**सर्ग ३०**—धीर पुरुष ज्या दृष्टीनें नानात्व-भ्रांति सोडून ब्रह्मामध्यें स्थिर होतो, त्या दृष्टीचा उपदेश.

**श्रीवसिष्ठ**—अहंताच निर्वाणपदास रोध करणारी अविद्या आहे. तिच्यामुळेंच मूढ उन्मत्तासारखें आचरण करितात. अज्ञानापासून उत्पन्न झालेली अहंताच अविद्येचें सूचक चिह्न आहे. शांत तत्त्वज्ञाच्या ठिकाणीं मम व अहं हे भाव नसतात. ज्ञानी अहंता-मळ टाकून सदेह किंवा विदेह

अवस्थेंत निर्बाध राहतो. तो जसा शोभतो तसा चंद्राचा मध्यभाग, स्तिमित-सागर व शरत्कालचें आकाशही शोभत नाहीं. चित्रांतील रणांगणांत उभें असलेलें सैन्य जसें निश्चेष्ट असतें, त्याप्रमाणें व्यवहार-परायणही ज्ञानी आतून निश्चल असतो. ज्ञान्याची प्रतीत होणारी वासनाही बाधित झालेली असल्यामुळें ती खरी वासनाच नव्हे. ज्ञान्याचें चित्त सदा प्रसन्न असतें. यास्तव रामा, केवळ तुलाच नव्हे तर या सर्व श्रोत्यांना माझें इतकेंच सांगणें आहे कीं, तुम्ही विषाद करूं नका तर मीं सांगितल्याप्रमाणें विषादास कारण होणारा हा सर्व प्रपंच संवित्-चा भ्रम (विवर्त) आहे, असें विचारपूर्वक जाणून आपला उत्कर्ष करून घ्या. कारण माझ्या उपदेशानें तुम्ही आतां परोक्ष तत्त्वज्ञ झाला आहां. पूर्वीप्रमाणें अतत्त्वज्ञ राहिलेला नाहीं. बाहेरील विषयसत्ता व आंतील मनःसत्ता अधिष्ठान चित्सत्तेनें सत् असली तरी स्वरूपतः सत् नाहीं; तर मनोरथकल्पित कामिनीप्रमाणें असत् आहे. यास्तव अहो श्रोत्यानो, हें सर्व जग जसें उदय पावतें, स्थित होतें, आपलें कार्य आरंभतें, सुख-दुःखानुभव घेववितें व नाश पावतें, आणि त्याचे देश-काल जशा प्रकारचे असतात, त्या त्याप्रमाणें पूर्वोक्त युक्तींनीं विचार करून व सर्व मिथ्या आहे, असा निश्चय करून शांत रहावें. जीव व जग यांची जडप्रवाहरूपानें सत्ता हाच अनर्थ आहे, अज्ञाला जणुं काय अज्ञान, जाड्य इत्यादि अनुभवापराधामुळेंच चिदेकरसपूर्ण मोक्ष मिळत नाहीं. आतां मोक्षावाचून स्वर्गादि दुसरा एकादा पुरुषार्थ मिळविण्याची आशा धरावी, तर ज्याचा ज्याचा संकल्प केला जातो तें तें संकल्पदोषामुळेंच नाशास पात्र होतें, यास्तव जेथें संकल्पच संभवत नाहीं, असा एक मोक्षच सत्य व अक्षयपद आहे. स्वर्गादि दुसरें कांहींही नित्य नाहीं. हा मी व हा मजहून दुसरा, या भावना सोडून तूं निर्भय हो. ज्याप्रमाणें मूढानें विष समजून टाकलेलें अमृत सुज्ञाला ग्राह्य होतें, त्याप्रमाणें हें अनहंभावन अज्ञ-दृष्ट्या भयंकर व त्याज्य असलें तरी प्रज्ञ-दृष्ट्या सत्य व म्हणूनच संग्राह्य आहे. देहापासून चित्तापर्यंत सर्व जडशरीरांतील प्रत्येक भागाविषयीं चांगला विचार केला असतां अहं कोठेंच मिळेनासा होतो. यास्तव मी नाहीं, असें समजणेंच प्रशस्त आहे. तेंच सत्य होय. म्हणूनच अहंताशांति सर्व शांतीची अवधि

( सीमा ) आहे. तीच मुक्तता होय. थिजलेलें तूप पातळ झालें तरी त्याची जशी यत्किंचित्‌ही हानि होत नाहीं, त्याप्रमाणें अहंताशांतिरूप मुक्तीमध्यें आत्म्याची कांहींएक हानि होत नाहीं. यास्तव अहंतानाश म्हणजे सर्वस्वाचा नाश, असें समजूं नये. या मुक्तीमध्यें विचार, भोग-त्याग व इंद्रिय-मनोनिग्रहरूप पौरुष या तिघांवाचून आणखी कांहीं उपयोगी नसतें. असें जाणून हे मुमुक्षु पुरुषांनो, तुम्ही सर्व अनात्म-वर्गास सोडा व तत्त्वबोधानें आत्म्याचाच आश्रय करा. सारांश अहंते-पर्यंत सर्व द्वैताचा उपशम केल्यामुळें मनानें वासनात्याग करून ब्रह्मरूप होऊन राहणें हाच मोक्ष आहे, असें श्रुति व अनुभवी विद्वान् सांगतात. पण अशा तऱ्हेचें मनन तत्त्वज्ञानावाचून प्राप्त होत नाहीं. जगद्भ्रम सत्य नव्हे, हाच परम बोध आहे. पण त्याच्यावर सर्व मानवाचा विश्वास बसत नाहीं. म्हणून बंधाचीही दीर्घकाल अनुवृत्ति होते. यास्तव शास्त्रा-दिकावर दृढ विश्वास ठेवून जगत् व मी असा हा दोन्ही प्रकारचा प्रत्यय असत् आहे, असें श्रवण—मननादि साधनानीं जाणून, बंधुप्रभृति जन, धन, स्त्री व शरीर याविषयीं निरपेक्ष होऊन व परमार्थतत्त्वास ओळखून, उपाधीनें परिच्छिन्न झालेला चिदाकाशरूप जीव चिन्मात्रस्वरूप होतो; हींच त्याची मुक्ति आहे ३०.

**सर्ग ३१**—चित्-नें अचिद्रूपाला ग्रासलें तरी कांहीं नष्ट होत नाहीं. निर्वाण स्थिति.

**श्रीवसिष्ठ**—रामा, जीव मनातील संकल्पाप्रमाणें बाहेर वस्तु पाहतो. मग ती सत्य असो कीं असत्य असो. याविषयीं स्वप्नाचाच दृष्टांत आहे. हें सर्व चिद्रूप आहे. चित् आकाशाहून स्वच्छ आहे. तूप थिजलें असता जसें घन व कठीण होतें, त्याप्रमाणें चित्-च जगद्वेष धारण करते. यास्तव जगही चित्‌च आहे. अर्थात उत्पत्ति, नाश, जन्म, मरण, अनर्थ, सुख इत्यादि कांहीं नाहीं. तर एक आत्मा आहे. जग, अहं इत्यादि कितीही जरी मिथ्या विकार नाहींसे झाले, तरी कांहीं नष्ट होत नाहीं. कारण असत्‌चा नाश कसा होणार ? स्वप्नादिकांमध्यें खरी उत्पत्ति व नाश कधीं तरी होतो कां ? असें जर आहे तर शास्त्रादिकांमध्यें जगाची निंदा केलेली का आढळते ? म्हणून म्हणशील तर सांगतों.—असत्-वस्तूची निंदा किंवा त्याचें फल ( विचार किंवा निर्णय ) मुळींच संभवत

नाहीं. पण तत्त्वज्ञ स्वाभाविक स्थिति सिद्ध व्हावी म्हणून असतही सत आहे, अशी कल्पना करून त्याची निंदा करितात व तिच्या योगानें वैराग्य, विवेक इत्यादि तत्त्वज्ञानाचा उपाय योजितात. तस्मात् कशाचीही भावना न करणें हाच त्या निंदेचाही सारांश आहे. रामा, तूं शास्त्र व संप्रदाय यांप्रमाणें व्यवहार कर म्हणजे तुला कांहीं भीति उरणार नाहीं. जगातील स्वर्गादि इतर पुरुषार्थ खरे पुरुषार्थ नसून आभास आहेत. कारण ते फार वेळ टिकत नाहींत. सुषुप्ति व मरण यामध्यें सृष्टि आपोआप क्षीण होते; हें खरें, पण तो तिचा स-बीज क्षय नव्हे. म्हणून ती पुनः उत्पन्न होते. सृष्टि चित्-दृष्ट्या सत् आहे खरी, पण ती संकल्पमय असल्यामुळें संकल्पित पदार्थांचा क्षय होताच क्षीण होते. ती संकल्पजन्य असल्यामुळेच आम्हाला तिचा निर्णय करिता येत नाहीं. म्हणूनच तत्त्ववेत्ते तिच्याविषयीं उदासीन व अद्वितीय आनंदामध्यें निमग्न होऊन राहतात. ते आचारसंपन्न अथवा आचाररहित असले तरी निर्वात दीपाप्रमाणें अचल व स्वरूपांत स्वस्थ राहतात. ज्ञानी पुरुषाच्या अंतःकरणातील शीतलता काहीं अपूर्व असते. वासनाच पुरुष आहे. पण तिला पाहूं लागल्यास ती दिसत नाहीं. परंतु तिला कोणी पहातच नाहीं, म्हणून संसार उद्भवतो. कारण अविचारानें सिद्ध होणारी वस्तु विचार करिताच नाहींशी होते. कशा प्रकारचा विचार संसारास घालवितो तेंही सागतों.—महाभूतें, मासादिमय भौतिक देह, बुद्धि, अहंकार, चित्त इत्यादि सर्व पंचीकृत भूताचे विकार आहेत. पण त्यातील बुद्ध्यादिकाच्या योगानें झालेल्या लिंगोपाधींत अहंभावानें प्रविष्ट झालेला चिदात्मा भ्रमानें देहादिकास ' मी ' असें जाणतो. तो त्याचा अभिमानच सर्व अनर्थांचें बीज आहे. इत्यादि निश्चय करून सर्व भूत-भौतिकावरील आसक्ति सोडावी. म्हणजे स्वाभाविक स्थिति प्राप्त होते. परतत्त्वामध्यें विश्रांति घेणाऱ्या समदर्शीत पुरुषामध्यें शांतता व रागद्वेषशून्य व्यवहार हीं दोन्ही दिसतात. अथवा अतिविरक्त पुरुषाच्या ठिकाणीं शांतताच मात्र उदय पावते. कारण वासनारहित तत्त्वज्ञ व्यवहार कसा करणार? वास्तव तत्त्वज्ञाचें निर्वाण चागलें पुष्ट होईपर्यंतच त्याचा रागद्वेषरहित व्यवहार होणें शक्य आहे. राग, द्वेष व भय यांनीं रहित आणि शांतचित्त मुनि पाषाणासारखा निश्चल होऊन राहतो.

परमात्म्याच्या कलंकरहित शांतस्वरूपाच्या भावनेनें पुरुषही तद्रूप होतो; पण त्याची भावना न करिता देहादि जड वस्तूंची भावना केल्यास तो जडाकार होतो. स्वप्नादि शांत ज्ञान झालें असता बाकी जें ईश्वराचें शुद्ध स्वरूप राहतें, तें आहे किंवा नाहीं, असें म्हणता येत नाही. कारण तें वाणीचा विषयच होत नाहीं. जगद्भ्रांतीचा लय झाला असता योगीपुरुषच आत्मस्वरूपास साक्षात् जाणूं शकतो. त्याचा उपदेश करिता येत नाहीं. यास्तव रामा, जडभावना सोडून नित्य आत्मस्वरूप होऊन राहणेंच युक्त आहे ३१.

**सर्ग ३२**—साधुसंगम, सच्छास्त्र, विचार व अभ्यास यांचा आश्रय करणाऱ्या पुरुषास मोक्ष अवश्य होतो. यास्तव तो ज्याच्या त्याच्या अधीन आहे.

**श्रीवसिष्ठ**—अविद्येच्या योगानें चिति पसरली कीं तत्काल अहंतादि जगद्भ्रम होतो. पण तो ब्रह्मतत्त्वरूप आहे असें जाणल्यास खेदकारक होत नाहीं. व जगत्च सत्य आहे, अशी भावना केल्यास महा अनर्थांत पडतो. दृष्टि विषयापर्यंत प्रसार पावूनच रूपाचें जसें ग्रहण करते, त्याप्रमाणें चिति अनात्मपदार्थांपर्यंत पसरून जगद्भ्रम धारण करते. पण ती विषयाचा वस्तुतः अभाव असल्यामुळें व्यर्थ पसरते. यक्षाप्रमाणें ती असत्-जगाचा अनुभव घेते. अहं अशा भावनेनें अहंकारही केवळ दुःख देण्यासाठींच उत्पन्न झाला आहे. पण तीच भावना सोडली कीं अहं गेला. तस्मात् बंध व मोक्ष प्रत्येकाच्या अधीन आहेत. कारण मुक्ति म्हणजे तरी काय ? आत्मसाक्षात्काराच्या योगानें मूळजाड्याचा परिहार करणें, चिदात्मैकरस होऊन मन–बुद्ध्यादिकास अगदीं न जाणणें व आपल्या नित्य आनंदमय स्थितींत राहणें हेंच ध्यान अथवा ध्यानावरून उपलक्षित होणारी मुक्ति होय. हाच चित्त-विश्रांतीस कारण होणारा सिद्धान्त आहे. यास्तव हे पंडितमन्यांनो, तुम्ही मूर्खांप्रमाणें द्वैतादि नाना विकल्प उत्पन्न करून अनेक प्रकारच्या कलहात्मक वाक्यसंदर्भांनीं वृथा क्लेश भोगूं नका, याच परम पुरुषार्थ देणाऱ्या सिद्धान्ताचा आश्रय करा. बहिर्मुख पुरुषाला असत्-विषय जसे दिसतात तसें असत् दुःखही होतें. पण अंतर्मुखाचें प्रारब्धप्राप्त दुःखही फार पीडा देण्यास समर्थ नसल्यामुळें स्वानंदांत मिळून जातें. वासनाच अत्यंत कृश होऊन मुक्तिरूप बनते. अहंभावना सोडतांच वासना क्षीण होते. नाहं हीच मुक्तता आहे. सत्संग व विचार

यांच्या योगानें हें तत्त्व सत्वर कळतें. तत्त्वज्ञाच्या संगतीनें अहं हें बंधन क्षीण होतें. यास्तव सत्पुरुषाचा समागम करून मी कोण हें दृश्य झालें कसें? जीव कोण व जीवन काय आहे? याचा विचार यावज्जीव करावा. गुरुसेवनानें विचार शीघ्र सफल होतो. कारण तत्त्वज्ञसूर्याच्या आश्रयानें जगाचेंच बोधाच्या योगानें पुनरुज्जीवन होतें; त्यानंतर अहभाव जातो व एका क्षणात तत्त्वाचें ज्ञान होतें. यास्तव बा रामा, ज्याच्या ज्याच्या ठिकाणीं बोधाची अधिकता आढळेल त्याची त्याची पृथक् उपासना कर. कारण अनेक संताचें एकत्र सेवन केल्यास प्रतिशरीरात भिन्न भिन्न मति व भिन्न सरस्वती वास करीत असल्यामुळें त्याचा परस्परविरुद्ध युक्तिवाद सुरू झाला असता कलह होण्याचाही फार संभव आहे. तो ऐकून तुज श्रद्धावान् श्रोत्याच्याही मनात कदाचित् तत्त्वभ्रम होणें फारसें अशक्य नाहीं. तत्त्वभ्रम होऊन श्रोत्यानें भलतेंच कांहीं समजणें, यासारखा अनर्थ दुसरा कोणताही नाहीं. यास्तव प्रत्येक तत्त्वज्ञाची पृथक् परिचर्या करावी व त्याना प्रश्न विचारून सर्वांचा आशय जाणावा. नंतर त्यांतील ग्राह्याश घेऊन त्याज्याश टाकून द्यावा. बुद्धीची वृद्धि होण्यासाठीं ज्ञान्याच्या उपदेशाचा चागला विचार करावा. म्हणजे निदिध्यासनानें परमात्म्याशीं चित्ताचें ऐक्य होतें. रामा, याप्रमाणे विद्वानाच्या समागमानें बुद्धि अत्यंत तीक्ष्ण करून अज्ञान-लतेचे तिळा-एवढाले तुकडे करून सोड. मी सांगत आहें हा सिद्धात असंभव आहे, अशी शंकाही घेऊं नको. कारण आमच्यासारखे मुनि आपला अनुभव सांगत असतात. बालका-प्रमाणें उगीच काहीं तरी असंभव भाषण करीत नाहींत. जो मनन करीत नाहीं, त्याच्या दृष्टीनें कांहीं उदय पावत नाहीं व कशाचा नाश होत नाहीं. शात ब्रह्मामध्यें हें सर्व मृगजलाप्रमाणें पसरलें आहे; पण विचार केला असता अहं असेंच जर मुळीं काहीं रहात नाहीं, तर मन-नादि भ्रम कोठून होणार? ३१.

सर्ग ३३—भ्रांतिकल्पना, प्रतिकल्पना व परलोकचिकित्सा.

श्रीवसिष्ठ—रामा, सत्संगमानें विकास पावणारी बुद्धि व स्वपौरुष यांच्या योगानें ज्ञत्व संपादन न केल्यास त्याला अन्य उपायच नसतो. मनानें कल्पना केल्यास पाहिजे तें हित अथवा पाहिजे तें अहित होतें.

वाणी, मन इत्यादिकांच्या योगानें जी जी भावना करावी ती ती तशीच वाढत जाते. यास्तव भावना सोड. कारण ती धरलीस कीं मेलासच म्हणून समज. जगाची रुचि सोड. म्हणजे तूं शांत व सिद्ध होशील. ज्या महात्म्याला हें जग असत् भासतें, त्याला आमचा नमस्कार असो. सृष्टि वस्तुतः असो किंवा नसो; पण तिची भावना केल्यास दुःख होतें व न केल्यास सुख होतें. हा लोक व परलोक ह्या दोन घोर व्याधि आहेत. या लोकच्या क्षुधा, तृषा इत्यादि व्याधींच्या योगानें पीडलेला जीव असह्य दुःख भोगतो. अन्न—पानादिकांच्या योगानें त्याची चिकित्सा करण्यातच त्याचा सर्व काल जात असल्यामुळें, त्याला परलोकच्या नरकादि व्याधींचें भानही राहत नाहीं. काहीं थोडेसे पुरुषोत्तमच सत्संग, विचार इत्यादिकांच्या योगानें परलोकच्या व्याधींची चिकित्सा करूं शकतात. शमशक्तीनें ते मोक्षमार्गरूप महेच्छेंत उत्कर्ष पावतात. जो मूढ या लोकींच परलोकच्या नरक—व्याधीची चिकित्सा करीत नाहीं, तो पुढें सत्संगादि औषधरहित स्थानीं गेल्यावर काय करणार ? यास्तव अहो मूढानो, या लोकच्या चिंतेनेंच तुमचें आयुष्य क्षीण न होवो. तुम्हीं आत्मज्ञानरूप औषधानें परलोकाची चिकित्सा करा. कारण मोठ्या यत्नानें त्या महाव्याधीची चिकित्सा केली असता इहलोकचा व्याधि आपो-आप शांत होतो. भोगरूपी चिखलांत रुतलेल्या आत्म्याचा स्वप्रयत्नानें जर उद्धार न केला तर त्याला दुसरा उपाय नाहीं. आयुष्याचें जसें बाल्य हें प्रथम लक्षण, तसें भोगत्याग हें निर्वाणाचें पहिलें चिह्न आहे. भोगत्यागानें आसक्तीचीही शांति होते. ज्ञानी पुरुषाची जीवितनदी चित्रातील नदीप्रमाणें सदा अक्षुब्ध असते. स्वभावशून्य ब्रह्मापासून जग निर्माण होण्याचें काहीं कारणच दिसत नाहीं. यास्तव अहंकारासह जगाचा विलय करणाऱ्या पुरुषास श्रेष्ठ मुनि म्हणतात. सर्व अनुभव महाचैतन्याचे विकास आहेत. विचार करीपर्यंत भ्रांति राहते. तो केला कीं, ब्रह्मता आली. विचारानंतर केवळ ब्रह्मच अवशिष्ट राहतें. तेंच शांत शिवस्वरूप आहे. रामा, तूंही तद्रूप हो. विकारभ्रांति सोड ३३.

**सर्ग ३४**—दृष्टसृष्टि हेंच जग आहे; त्यास्तव अदर्शनानेंच त्याचा] क्षय होतो, या प्रस्तुत सिद्धान्ताविषयीं उपपत्ति.

श्रीवसिष्ठ—सुख—दुःखादि प्राप्त झालीं असतां जो व्याकुल होतो तो नाश पावतो व जो व्याकुल होत नाहीं तो अविनाशी आहे. त्याला शास्त्रोपदेशादि करणें व्यर्थ आहे. ज्याला इच्छादि असतात त्याला दुःखादि अवश्य होतात. यास्तव ज्याला दुःख—सुखादिकाचा उपाय करावयाचा असेल त्यानें प्रथम इच्छाचा त्याग करावा. परमपदामध्यें अहं, जगत् इत्यादि भ्रांति नाहींच, तर केवल शुद्ध चित् आहे. सर्व एक शांत आत्मा आहे. तेव्हां कर्ता, भोक्ता, इत्यादि शब्दभ्रांति कोठची ? या अशा प्रकारच्या विवेकानें सर्व मिथ्या विषयाचा बाध झाल्यावर एक अबाधित प्रत्यगात्माच अवशिष्ट राहत असल्यामुळे त्याचा बोध होण्यासाठीं कोणत्याही विशेष उपयाची आवश्यकता नाहीं. जगाचा बाध नुस्त्या अदर्शनानेंच सिद्ध होतो, हें मीं पूर्वीं सांगितलें आहे. आतां तो कसा म्हणून विचारशील तर सांगतों. अंतर्धान-शक्तीनें गुप्त झालेल्या सिद्ध-पिशाचादिकाचा संचार भयंकर असला तरी व तो अगदीं समोरून होत असला तरी जसा कळत नाहीं, अथवा एकाच शय्येवर निजलेल्या दोघांतील एकानें स्वप्नांत ऐकलेला मेघाचा गडगडाट जसा दुसऱ्याला ऐकूं येत नाहीं, त्याप्रमाणें मनाला स्थिर करून जगाचा व त्याचा संकल्परूपसंबंध तोडून टाकला म्हणजे इतरांना केवल संकल्पानेंच दिसणारें जग नुस्त्या अदर्शनानें बाधित होतें. सारांश कोणताही द्रष्टा आंपल्या ज्ञप्तींत असलेलाच पदार्थ पहातो. ज्याचा आकार ज्ञप्तींत उमटत नाहीं, त्याला पहात नाहीं. ज्ञप्ति ही आत्मरूपच आहे. यास्तव सर्व तन्मय भासतें म्हणूनच सर्व जग परमात्म्याहून अभिन्न आहे. सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असतां ज्याला सत्ता नाहीं, आधार नाहीं व कारण नाहीं, तो 'मी' या नावाचा यक्ष कोठून आला आहे कोण जाणें ? अशा यक्षानें सर्व पुरुषांना किंबहुना सर्व जीवांना परवश करावें, हें मोठें आश्चर्य आहे. ब्रह्म व जगत् याचा अभेद जल-तरंगादि दृष्टान्तांनीं पूर्वींच प्रतिपादिला आहे. तस्मात् जग, सृष्टि, सर्ग इत्यादि सर्व नुस्त्या शब्दकल्पना आहेत. त्यांना सत्य समजणें हेंच दुःखाचें बीज आहे. यास्तव त्याचा अव्हेर करून ज्याच्या कृपेनें व ज्याच्या स्वरूपांत व्यक्त होऊन तें दिसतें, त्याच्याकडे अंतःकरण लावावें. आंतून शांतचित्त झाल्यावर जगत् नाहीं, मी नाहीं व तुम्हीं कोणी

नाहीं. कारण चित्ताला बहिर्मुख करावें, तेव्हां बाहेरच्या पदार्थांचे आकार त्या ( चित्ता ) त उमटून साक्षीला ते भासणार ! पण सर्व द्वैतानुभवाचा आश्रय अथवा निमित्त अशा चित्ता-लाच आत्ममय केल्यावर बाह्य पदार्थांचा अथवा कल्पनांचा प्रत्यय कसा येणार ? तस्मात् राघवा, मोक्ष पाहिजे असेल, दुःख नको असेल व परम-सुखाचा आस्वाद घ्यावयाचा असेल, तर चित्सत्त्वाच मी आहें, मी देहा-दिकांतील कोणीही नव्हें, अशी दृढ भावना कर. बाह्य पदार्थज्ञान हेंच बंधन व त्याच्या ज्ञानाचा अभाव ( अवेदन ) हाच मोक्ष होय. यास्तव भूमिकांचा अभ्यास न सोडतां तूं शांत व वेदनरहित हो. तत्त्वबोध दृढ झाला म्हणजे जड विषयांचें वेदन होणेंच अशक्य होईल. कारण द्रष्टा कधीं दृश्य होणार नाहीं. व चिति कधीं चेत्य ( चिद्विषय ) होणार नाहीं, हा सिद्धान्त आहे. तेव्हा सर्व एक आत्मा आहे. असें निश्चयपूर्वक ज्ञान झाल्यावर जगाचा प्रत्यय येणार कसा ? यास्तव दृष्ट--दृश्य इत्यादि दशांचा अभाव असल्यामुळें जाग्रतींतच निजल्याप्रमाणे असावें. आपल्या संकल्पानें जें झालेलें असतें, तें सकल्पाच्या अभावीं क्षीण होतें. जगत् स्वप्नांतील नगराप्रमाणें संकल्पजन्य आहे. यास्तव राघवा, तूं सकल्प सोडून ब्रह्मनिष्ठ होऊन रहा ३४.

**सर्ग ३५**--आत्मसाक्षात्काराकरिता सत्य--मिथ्यारूप ब्रह्माचा विस्तार करितात.

**श्रीवसिष्ठ**--दशरथपुत्रा, एका क्षणांत एका देशाहून दुसऱ्या देशास गेलेल्या संविद्-चे मध्यें ( दोन देशामध्यें ) जें निर्मल रूप असतें तें आत्म्याचें स्वरूप होय. गमन, भोजन, श्रवण इत्यादि सर्व क्रिया करीत असतानाही निरायास होण्यास्तव नित्य त्या आत्मरूपमय हो. जीवन्मु-क्ताच्या स्थितीचें उल्लंघन न करितां आपल्या कुलाचारालाही न सोडतां व्यवहार करीत असताना सुद्धा तूं आत्मनिष्ठेपासून च्युत होऊं नकोस. प्रमाणपूर्वक पाहूं लागलें असता न दिसणें, हेंच अविद्येचें लक्षण आहे. अहो ती विचारपूर्वक पाहिल्यावर जर सांपडती तर विद्याच झाली असती. असो; याप्रमाणें अविद्येचाच जर असंभव आहे, तर तिच्या कार्यभूत विषयाचा संभव कसा असणार ? तस्मात् विवेकी पुरुषाच्या दृष्टीनें ब्रह्म व जगत् सत्य, एक व अनंत आहे. पण तेंच आभासदृष्ट्या असत्य,

अनेक व मर्यादित दिसतें. सर्व असर्व असल्यासारखें व शुद्ध अशुद्ध असल्यासारखें भासतें. भ्रांतदृष्टीनें ब्रह्माचे सर्व गुण लुप्त होऊन जगांत त्याच्या विरुद्ध गुणाचा अनुभव येतो. पण रामा, भ्रांति सोडून ब्रह्म सर्व ज्ञानाचा नाथ आहे, तें सर्वज्ञ, कळकरहित, सर्वात्मक व यज्ञ, दान, तप, ब्रह्मचर्य, इत्यादि उत्तम यत्नानेंच लभ्य आहे, असें तूं जाण. तें ब्रह्मांड-रूपानें जगद्रत्नांचें भांडार आहे. तें अतिशय गुरु ( जड, भारी ) आहे, हें खरें. पण विवेकरूपी ताजव्यांत घालून तोलूं लागलें असतां सर्व प्रकारचें गुरुत्व अनृत असल्यामुळें कापसाच्या तंतूहूनही हलकें होतें. तें कालतः अनंत व देशतः अमर्याद आहे. तें कोणत्या एकाच कालीं अथवा देशीं रहात नाहीं. तें शून्यदेशामध्येंही वन, पर्वत इत्यादि निर्माण करण्यास तत्पर असतें. तें स्थूलाहून स्थूल, सूक्ष्माहून सूक्ष्म, गुरूहून गुरु व श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे. तें व्यवहारदृष्ट्या जगाचा करंडा असलें तरी परमार्थतः नित्य शून्य अरण्याप्रमाणें असतें. तें अपरोक्ष असलें तरी अज्ञाना दुर्लक्ष्य असतें. त्याना तें अगदीं हातच्या कांकणाइतकें समीप असतानाही परोक्ष वाटतें. त्रिभुवन या पूर्ण सागराच्याच लहरी आहेत. सृष्टि याच्या योगानेंच भासते. सर्व पदार्थशोभा या भास्वरतत्त्वामध्यें लीन होते व याच्यापासूनच पुनः उद्भवते. चंद्रापासून जसे किरण त्याप्रमाणें या ब्रह्मात्म्यापासून जगद्भाव उत्पन्न होतात. या चिदाकाशरूपी रंगभूमीवर नियती नावाची नर्तकी जगद्भ्रमरूपी अभिनयानीं नृत्य करीत आहे. जगाचे कोट्यवधि कल्प व महाकल्प हेच ज्याचे निमिष व उन्मेष आहेत, असा काल-बालक या आकाशमैदानात क्रीडा करीत आहे. शेंकडों जगें निर्माण होऊन लीन झालीं तरी हा महा—आदर्श निर्विकार असतो. या आत्म्याचा उन्मेष हीच जगल्लक्ष्मी व निमेष ही प्रलयदशा होय. पण उन्मेष—निमेषरहित झालेला हा आत्म्यामध्यंच ( स्वरूपांत ) राहतो. भूत, वर्तमान व भविष्यत् सर्गाचा हा कारणरूप आहे. सारांश, एक ब्रह्मच सत्य असून, जगें हा त्याच्या आधारानें भासणारा मिथ्या भ्रम आहे ३९.

**सर्ग ३६—इच्छेवाचून तुच्छ पदार्थांचा भोग बंध उत्पन्न करीत नाहीं. कारण इच्छाच परम बंध आहे, व त्याच्या त्यागानें मुक्ति मिळते.**

**श्रीवसिष्ठ**—रामा, या जगांतील सर्व पदार्थ परस्पर अविरुद्ध व एकरूप आणि परस्पर विरुद्ध व अनेकरूप भासतात. पण त्यांतील जल-तरंगासारखे अनेकरूप पदार्थ राग-द्वेषाच्या द्वारा दुःखास कारण होणारे असल्यामुळें अनर्थरूप आहेत व एकरूप पदार्थ मोक्षाला कारण होत असल्यामुळें उपयोगी आहेत. तरंगाचें जसें जल हें एक अविरुद्धरूप, त्याप्रमाणें ब्रह्म हें या सर्व पदार्थांचें एक अविरुद्ध रूप आहे. कारण सृष्टींतील कोणत्याही पदार्थाचें तत्त्व विचारपूर्वक पाहूं लागलें असतां चिन्मात्रावाचून दुसरें कांहीं आढळत नाहीं. अर्थात् पुरुषाचें वृत्तिज्ञान हीच जगाची भ्रांति व वृत्तिज्ञानशून्यता हाच सर्व भ्रमाचा उच्छेद होय. त्यामुळें भ्रम व त्याचा उपशम स्मरण व अस्मरण, याप्रमाणें प्रत्येकाच्या स्वाधीन आहेत. चिदाकाश निरवयव असल्यामुळें व वस्तूचा स्वभाव बदलणें अशक्य असल्यामुळें आत्माच साकार जग होणें शक्य नाहीं. ( अर्थात् चित् जड होणार नाहीं व आकाश साकार होणार नाहीं, हा परम सिद्धान्त ध्यानात धरावा. ) त्याचप्रमाणें ब्रह्माचा साक्षात्कार होताच जगाचा बाध होत असल्यामुळेंही जग हा ब्रह्माचा स्वाभाविक विकार नव्हे. अहो, जी नुस्ती पाहूं लागताच बाधित होणारी माया, ती ब्रह्माची कोणी कशी असणार? तिच्यामुळें जग उत्पन्न कसें होणार व त्याची स्थिति तरी कशी होणार? यांतील एकही संभवत नाहीं. यास्तव सर्व चिदाकाशच आहे. विकार, बाध इत्यादि दोष ज्ञप्तीमध्यें नाहींत. त्यामुळें आम्हाला तिच्यामध्यें खरें जाड्य आढळत नाहीं. राघवा, माझें उपदेशवचन व तुझें ज्ञान हीं दोन्ही चिन्मय आहेत. त्यामुळें विषयाचा वस्तुतः अभाव आहे. विषयाच्या अभावीं इच्छा संभवत नाहीं. इच्छेवाचून राहणें, हेंच परम-पद आहे. इच्छा नाहींशी झाल्या-वरही जीवनास कारण होणारा व्यवहार लाकडाच्या बाहुलीप्रमाणें होऊं शकतो. इच्छेवाचून केवळ चेष्टारूप व्यवहार करणाऱ्या पुरुषाला हें जग वेळूप्रमाणें निःसार भासतें. ज्याला दृश्य रुचत नाहीं तर अदृश्य रुचतें, तो सबाह्याभ्यंतर शांत असतो. तो भवसागरांतून पार गेला आहे, असें जाणावें. कारण श्रोत्रादि इंद्रियें शब्दादि विषयांचें ग्रहण करीत असलीं तरी त्याचें चित्त त्यांचें ग्रहण करीत नाहीं. रामा, याप्रमाणें सर्व विषय

नीरस आहेत, असा मनाला बोध करून भोग रोगाची चिकित्सा जर केली नाहीं, तर दुःखशांतीचें नावही घ्यावयास नको. उलट अनर्थपरंपरा प्राप्त होण्याचाच फार संभव आहे. जो भोगविषाचा स्वाद घेत असताना प्रत्यहीं त्यात रममाण होत जातो, तो आपल्या शरीरतृणास सतत दीप्त अग्नींतच टाकतो. यास्तव भोगेच्छात्याग हेंच खरें समाधान असून तोच मनःशांतीचा मुख्य उपाय आहे, असें वेदान्तभूषण ज्ञानी सांगतात; व मन इच्छा सोडल्यानें जसें शांत होतें, तसें शेंकडों उपदेशांनींही शांत होत नाहीं, असा अनुभवही आहे. इच्छामात्र चित्त आहे. यास्तव इच्छाशांति हाच मोक्ष होय. शास्त्रें, तपें, यम, नियम इत्यादि सर्व या इच्छाशांती करिताच आहेत. प्राण्याची इच्छा जितकी व जशी वाढत जाते तितकी व तशीच त्याच्या दुःख—बीजाची मुष्टि उगवू लागते आणि विवेकानें इच्छा जशी जशी क्षीण होत जाते तशी तशी दुःखचिंता कमी होते. इच्छारोगाची चिकित्सा मोठ्या यत्नानें केली पाहिजे. त्यावाचून दुःखचिंताविष शांत होत नाहीं. सर्व इच्छांचें उपशमन एकदम करणें अशक्य झाल्यास क्रमानें थोडथोड्या इच्छा सोडाव्या. कारण सन्मार्गामध्यें प्रवृत्त झालेला पुरुष कधींही क्लेश भोगीत नाहीं. पण जो नराधम आपल्या इच्छांना क्षीण करण्याचा प्रयत्न न करिता त्यांना उत्तरोत्तर वाढवीत जातो, तो आपल्याला प्रत्यहीं अंध-कूपात फेकीत असतो. अनेक दुःखें प्रसवणाऱ्या संसृतीचें बीज इच्छाच आहे तिला ज्ञानाग्नीनें चांगलें भाजून टाकल्यास संसार उगवत नाहीं. यास्तव व्यर्थ भ्रमात न पडता इच्छा उत्पन्न न होईल असा प्रयत्न करावा. त्यावाचून शास्त्रादि सर्व व्यर्थ आहे. इच्छेचें अनुसंधान न करणें, याच चित्तसमाधानाचा आश्रय का कोणी करीत नाहीं! ज्याच्या मतीला इच्छेचें अनुसंधान न करणें, हें एवढेंसें कृत्यही दुःसाध्य वाटत असेल त्याचा गुरूपदेश, शास्त्र-ज्ञान इत्यादि सर्व व्यर्थ आहे. ज्याप्रमाणें व्याघ्रादिकांनीं भरलेल्या जंगलां-तील हरिणीचा जन्म म्हणजे मृत्युच होय, त्याप्रमाणें इच्छाविषविकारिणी संसृतींत मनुष्यांचा जन्म म्हणजे मृत्युच होय. या पुरुषास इच्छेनें जर बालकाप्रमाणें चंचल केलेलें नसतें, तर मोक्षाला अगदीं थोडासाच उपाय पुरला असता. यास्तव इच्छांची निवृत्ति करावी. कारण निरिच्छता

हेंच निर्वाण व सेच्छता हेंच बंधन आहे. यथाशक्ति इच्छाजय करावा. शमरूपी अग्नीनें त्या बीजाला जाळून टाकावें. विवेक, वैराग्यादि उत्तम गुणांची प्राप्ति होईतों मनात उठलेल्या प्रत्येक इच्छेला मारून टाकावें. सेच्छत्वामुळेंच पुण्यपापमय बंधपाश मनुष्याला प्रत्यहीं आवळीत असतात. साधूचा इच्छानिरासावाचून एकादा क्षणही जाणें यासारखी महा हानि नाहीं. इच्छाशांतीबरोबर साधनचतुष्टयरूप कल्याण वाढत जातें. विवेकशून्य चित्ताची इच्छा पुरविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे संसारविष-वृक्षाला पाणी घालणेंच आहे. रामा, या विविध इच्छाच दुष्कृत अज्ञान पुरुष-पशूला जाळीत असतात. यास्तव प्रथम त्यांचा त्याग करावा ३६.

**सर्ग ३७—इच्छा उत्पन्नच कशी होत नाहीं व ती उत्पन्न झाली तरी केवल ब्रह्मच कशी असते, तें उपपत्तिपूर्वक सांगून, ज्ञानयोगाचें वर्णन.**

**श्रीवसिष्ठ**—राघवा, इच्छाची शांति चित्तशांतीनेंच होणें शक्य आहे, व चित्तवृत्तींची शांति हाच योग आहे. यास्तव इच्छामूलक सर्व अनर्थांचा क्षय होण्यास्तव मीं पूर्वी सांगितलेलाच योगाख्य उपाय पुनः सविस्तर सांगतों, तो ऐक. आत्मज्ञानयोग हाच इच्छानिरासाचा उत्तम उपाय आहे. कारण तो इच्छेला कारण होणाऱ्या विषयाचाच अपहार करीत असतो. ( आत्मज्ञान होण्यापूर्वी विषय सत्य आहेत, अशी भ्रांति होत असल्याकारणानें त्याकरिता इच्छा होणें अगदीं साहजिक असतें. पण आत्मज्ञानानंतर तिचा मुळींच संभव नाहीं. कारण आत्मज्ञान विषय असत्य आहेत, असें प्रत्यक्ष दाखवून त्यांचा अपहार करतें; असा याचा भावार्थ. ) यास्तव रामा, आत्म्याहून भिन्न असलेले पदार्थ जर सत्य असले, तर त्याविषयीं तूं खुशाल इच्छा कर. मी तुला प्रतिबंध करीत नाही. पण ते जर असत् असले, तर सत्य आत्म्याला सोडून दुसऱ्या कशाची तूं इच्छा करणार? सर्व सूक्ष्म, निरवयव व शुद्ध चिदाकाशच जर आहे, तर इच्छाविषयच कोठें राहिला? आम्हां अतिशांतचित्त पुरुषाना अज्ञजनप्रसिद्ध ग्राह्य—ग्राहक्,—संबंधच कोणत्याही निमित्तानें अथवा प्रमाणानें आढळत नाहीं. मग तो अज्ञांनाच कसा दिसतो, तें कांहीं कळत नाहीं. ग्राह्य विषय व ग्राहक जीव यांचा संबंध आत्मनिष्ठ असेल म्हणून म्हणावें, तर तसाही प्रकार नाहीं. तेव्हां असत्-

वस्तूचा लाभ कसा होणार ? काळा चंद्र कधीं कोणी पाहिला आहे का ? तात्त्विक आत्म्यामध्यें नसणें हीच ग्राहकादिकांची सत्ता आहे. ते अशास्त्र-दृष्ट्या सत्य असले तरी शास्त्रदृष्टीचा उदय होताच कोठें जातात कांहीं कळत नाहीं. सर्व द्रष्टृ–दृश्याचा क्षय होणें हाच तत्त्वज्ञानाचा स्वभाव आहे. तत्त्वज्ञान होताच सत्य अहंता आत्मस्वरूपात लीन होते. शांति असेल तेव्हां दृश्य नसतें व दृश्य असतें तेव्हां शांति नसते. हा-सुद्धां स्वभावच आहे. प्रकाश व अंधकार यांचा जसा सहवास कधींही कोणाच्या अनुभवास येत नाहीं, त्याप्रमाणें निर्वाण व दृश्य यांचा सहवास कधींही होणें शक्य नाहीं. कारण तीं दोन्ही एकत्र राहिल्यास परस्पराचा बाध करून असत्य होतील. पण तसें होऊं दे, असें म्हणणें म्हणजे विद्वानाच्या अनुभवाच्या विरुद्ध भाषण करणें आहे. कारण निर्वाण (शांति) अजर व अदुःख आहे, असा सर्व विद्वानांचा अनुभव आहे. तसेंच दृश्यादि सर्व भ्रमभूत आहे, त्यांत सुखप्रद कांहीं नाहीं, असाही त्यांचा अनुभव आहे. यास्तव त्या असत्–दृश्याची भावना करूं नका. अज–निर्वाणांत स्थिर रहा. द्वैतव्यवहारी कार्याच्या उपयोगी जरी असलें तरी तें शिंपी-वर भासणाऱ्या रुप्याप्रमाणें मिथ्या आहे. कारण विचार करूं लागलें असतां तें अनुभवाच्या कसोटीस उतरत नाहीं. तें सत्य आहे, अशी भावना केल्यास मोठें दुःख होतें व असत्य आहे, असें चिंतन केल्यास मोठें सुख होतें; अशा प्रकारच्या शाब्द-ज्ञानानें झालेला द्वैताचा बाध मननपूर्वक निदिध्यासन केल्यानें दृढ होतो. तेव्हां अहो अधम अधि-काऱ्यानो, हा निर्विकार आत्मा इतका स्पष्ट व साक्षात् असतांना तुम्हीं त्याला कां पहात नाहीं ? बंध देणाऱ्या दृश्याला जाळून कां टाकीत नाहीं ? तुम्हाला बंधच आवडतो व म्हणून तुम्हीं त्यावरील आसक्ति कमी करीत नाहीं कीं काय ? सर्व कार्यकारणभाव ब्रह्मच आहे, असें जेव्हां तुम्हांला कळेल, तेव्हांच देहादि मर्यादा कुंठित होऊन प्रत्यगात्मा अपरिच्छिन्न होईल; व तो ब्रह्म आहे, असें ठरेल; त्यावांचून नाहीं. द्वैत एक अणुभर जरी अवशिष्ट असलें, तरी ब्रह्मसिद्धि होणें शक्य नाहीं. पण याप्रमाणें हा सर्वात्मा पूर्ण असतां–नाही जे वादी, तार्किक अथवा शिष्य, कार्यकारणभावास सत्य मानून

केवळ अज्ञानासाठींच साधनांना शोधीत राहतात, त्यांच्याशीं आम्हाला कांहीं एक कर्तव्य नाहीं. आता संसाराचा हेतु अवश्य सांगितलाच पाहिजे, असा जर कोणाचा आग्रह असेल तर तो स्वाविद्या ( आत्म्याचें विस्मरण, अज्ञान ) हाच आहे. पण सर्वच ब्रह्म आहे असें कळल्यावर कार्यकारण-भावाची आवश्यकताच काय आहे ? मातीच्या बाहुल्याच्या सैन्यांत माती-वाचून जसें दुसरें कांहीं नाहीं, त्याप्रमाणें या सृष्टींत ब्रह्मावांचून, चिन्मात्र आत्म्यावाचून दुसरें कांहीं नाहीं. मग इच्छेचा उदय कसा होणार ?

**श्रीराम**—मुनिवर्य, असें जर आहे तर इच्छा उत्पन्न झाली तरी व न उत्पन्न झाली तरी ब्रह्मरूपच असल्यामुळें, तिचा विधि किंवा निषेध करण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—ब्रह्मज्ञान झाल्यावर इच्छा जर उत्पन्न झाली, तर तिचें तत्त्व कळलेलें असल्यामुळें कांहीं दोष नाहीं पण विद्वानाला इच्छा होणेंच अगोदर अशक्य आहे. कारण ज्याची इच्छा होणार ते विषय असत्य आहेत, असें समजून तो तत्त्वज्ञानापूर्वीच इच्छारहित झालेला असतो. तेव्हा ज्ञानानंतर आत्मानुभवाचा त्याग करून तो पुनः कोणत्या वस्तूची इच्छा करणार ? सूर्योदय होताच केवळ वस्तुस्वभावामुळें रात्र जशी नाहींशी होते, त्याप्रमाणें आत्मज्ञान होताच इच्छा क्षय पावते. जसा जसा ज्ञप्तीचा उदय होतो, तशी तशी द्वैताची शान्ति होते व वासनाचा लय होतो. तेव्हा पूर्ण ज्ञानानंतर इच्छेचा उदयच कसा होणार ? म्हणूनच ज्ञानी प्रतिषेध शास्त्राचा विषय होत नाहीं. कारण शास्त्र प्राण्यांच्या स्वाभाविक अनुरागानें प्राप्त कर्मांचाच निषेध करीत असतें. व ज्ञान्याच्या सर्व इच्छा शांत झालेल्या असतात, तेव्हां त्यांची कोणत्याही स्वाभाविक रागप्राप्त कर्मांत प्रवृत्तिच जर होत नाहीं, तर मग निषेध त्याला आपला विषय कसा करणार ? इच्छा अतिशय कृश होणें, आनंदानुभव व तृप्ति हीं ज्ञानाचीं लक्षणें आहेत. तत्त्वज्ञ पुरुष सर्व लोकांस अभयदान देऊन आह्लादित करीत असतो. जेव्हां सर्व दृश्य विरस होऊन मनांत रति उत्पन्न करीनासें होतें, तेव्हां इच्छा प्रसार पावत नाहीं. व त्याच वेळीं मुक्ततेचा उदय होतो. या जगांतील भ्रामक पदार्थांच्या योगानें व्यवहार कसा होणार ? सर्व पक्ष व सर्व पदार्थ भ्रमात्मक आहेत. सर्वाधार काळ, त्याच्या

आत असणारीं जगें, ब्रह्मांडें, त्यांतील चवदा भुवनें, त्यांतील अहंत्वादि विशिष्ट भोक्ते, त्याचा भोगसाधनभूत इंद्रियवर्ग, शब्दादि भोग्यपदार्थ इत्यादि ईश्वराच्या मायाशक्तीमुळें उत्पन्न झालेलें सर्व परमार्थतः एक शांत चिदाकाश आहे, असा निश्चय झाला असता रागादिक संभवत नाहींत. इच्छादि सर्व दोषास जिंकण्याचा हाच मुख्य उपाय आहे ३७.

**सर्ग ३८**—येथें चित् व चेत्य यांचा संसर्गभेद निरास करून चित्-च जगत् आहे, असें सत्तर्कांनीं सिद्ध करितात.

**श्रीवसिष्ठ**—चित् मिथ्या जगत् पाहते. ही भ्रांति कल्पित सृष्टि-चित्रातील सृष्टीप्रमाणें मनःकल्पनेनेंच क्षुब्ध झाल्यासारखी भासते. ती वस्तुतः नाहीं. ज्याप्रमाणें भिंतीवरील सृष्टि भिंतीच्या रूपानें भिंतीहून बाह्य वस्तुतः नसते, पण भ्रांतानुभवरूपानें भिंतीहून बाह्य (पृथक्) असते, त्याप्रमाणें ज्ञानामध्यें कल्पिलेला हा सर्गही वास्तवज्ञानरूपानें अबाह्य व भ्रांतानुभवरूपानें बाह्य आहे, असें सिद्ध झालें असता ज्ञान सत्यरूप असल्यामुळें त्याची बाह्यविषयरूपताही सत्य आहे, असें जाण. याप्रमाणें आमचें मत बाह्यार्थवाद व विज्ञानवाद यांच्याशीं विरुद्ध नाहीं. सर्व चिद्रूप असल्यामुळें आकाशादि विकारही वस्तुतः पूर्ण ब्रह्मात्मक आहे. सर्व क्रियाकारक फलरूप जगत् ब्रह्मीभूत असल्यामुळें त्याला माझा नमस्कार असो. व्यवहार-कालींही विषय चित्-शीं ऐक्यरूप होऊन त्या ऐक्यबलानेंच सत्तास्फूर्तिमान् होतो. सर्व त्रिपुटी ब्रह्मात्मक असल्यामुळें अनुभवनमात्रत्व हेंच जगाचें खरें स्वरूप झालें. (आता द्रष्टा व दृश्य यांचें ऐक्य सिद्ध करणारा सत्-तर्क दाखवितात.) द्रष्टा व दृश्य चिदात्मक साक्षीमध्यें जर एकरूप झाले नाहींत, तर ऊंस खावयास प्रवृत्त झालेल्या पुरुषाला त्याच्या माधुर्याचा अनुभव येणार नाहीं. कारण ऊंस जड आहे. त्यामुळें तो रसानुभव घेण्यास समर्थ नाहीं. त्याचप्रमाणें जड रसही त्याना आपला अनुभव देण्यास समर्थ नसतो. यास्तव अनुभवास येणाऱ्या उंसाच्या गोडीची उपपत्ति लावण्यासाठीं ऊंस खाणारा व रस या दोघानाही चिन्मयरूपताच असली पाहिजे. त्यामुळेंच जलाशयात पडलेल्या जल-बिंदूप्रमाणें अनुभव घेणाऱ्या चितीमध्यें विषयाचा प्रवेश होऊन तो त्याच्याशीं मिळून जातो. आणि याप्रमाणें साक्षिचैतन्य, भोक्तृचैतन्य व विषयचैतन्य

यांचें ऐक्य झाल्यावरच माधुर्यादिकाचा अनुभव येतो. त्यावांचून येत नाहीं. एक काष्ठ दुसऱ्या काष्ठाच्या जातीचें जरी असलें तरी चिदैक्याचा अभाव असल्यामुळें जसें त्याला जाणत नाहीं, त्याप्रमाणें द्रष्टाही; जड जर सर्वथा चित्–शून्य असतें, तर त्याला जाणण्यास तो समर्थ झाला नसता, तस्मात् सर्व चिन्मात्र आहे. पण, बुद्धि इत्यादि सर्व भावना कल्पित आहे. त्यामुळें ते सगळे भेद मिथ्या आहेत. सर्व भाव ब्रह्मसत्तेचे विवर्त असल्यामुळेंही मिथ्या आहेत. कारण त्याना स्वतःसत्ता नाहीं. प्रत्येक स्थूल पदार्थाचें बीज अणु व अणुतर असतें. त्या सर्वांचा अतिशय अणुस्वभावच ब्रह्म ( परमात्मा ) आहे. ज्याप्रमाणें पार्थिव पदार्थ कोठेंही असला तरी पृथ्वीरूप आहे, त्याप्रमाणें ब्रह्मविवर्तभूत सृष्ट पदार्थ कोणत्याही लोकीं असला तरी ब्रह्ममय आहे. ज्याला पूर्ण विचारानें सर्व ब्रह्ममय झालें आहे, त्याला जग हें एका रोमाच्या अग्राप्रमाणें वाटत असतें. तेव्हा त्याला इच्छा कशाची होणार ? वैभव व दारिद्र्य याना सम जाणणाऱ्या त्या महात्म्याचा महिम जाणण्यास कोण समर्थ आहे ? बंधुमित्रादिकाच्या जीवन–मरणादिकामुळेंही त्याला हर्ष–विषाद होत नाहीं. कारण तो शुद्ध संविन्मय असतो. त्यामुळें मरण व जन्म हे भाव भ्रांतिमानानाच मृगजळाप्रमाणें भासतात, असें त्याला साक्षात् समजतें. साराश, वर्तमानभोगामध्यें विरस, भाविभोगां-विषयीं निरिच्छ व भूतविषयाच्या वासनानीं रहित, अशा तत्त्वज्ञाला शास्त्रावांचून दुसरा तत्त्वविनोदहेतु कोणता असणार ? यावज्जीव अहं-भाव सोडून शुद्ध शास्त्रीय व्यवहार करणें, हेंच त्याचें शील अथवा लक्षण होऊन राहिलेलें असतें ३८.

**सर्ग ३९**—ज्ञातात्म्यामध्यें विश्रांति घेणाराचें स्वरूप काय असतें व त्याला जग कसें भासतें, त्याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे, असा पुरुष शास्त्रीय-व्यवहार करीत असतांनाही संकल्परहित असतो. अहं हा सर्वानर्थ-भूत अध्यास निवृत्त झालेला असल्यामुळें त्याला संकल्प करण्याचें साम-र्थ्यच नसतें. ज्याचें आवरण व इच्छा नष्ट होऊन परमानंदपूर्णता उदय पावली आहे, तो आत्मसत्तेनेंच विराजमान होतो. एका आत्मलाभानेंच सर्व लब्धव्य व ज्ञातव्य प्राप्त व ज्ञात झाल्याकारणानें ज्ञानाच्या संकल्पाला

काहीं कारणच राहत नाहीं. तो निःसंकल्प, निराधार व शांत पुरुष आपल्या प्रणामादि समागमानेंच लोकांना पवित्र करतो. तो आंतून सदा शीतल राहतो. जगाला मिथ्या पाहतो. स्वर्ग व मोक्ष हे दोन्ही त्याला वंध्या–पुत्राप्रमाणें असत् भासतात. जग ब्रह्मरूपानेंच सत्य, अनिर्मित, व अभावित आहे. आत्मस्वभावविश्रांतीचा अहंतादि, सर्गादि व दुःखादि यांचा उपलंभ न होणें, हा स्वभावच आहे. आत्म्याचें खरें स्वरूप निर्विषय चिन्मात्रत्व हें आहे. त्यांत मिळून गेलेल्या जीवाचा जगद्भास नाहींसा होतो. आत्म्याच्या अस्वाभाविक दशेंत मोठें दुःख असून स्वाभाविक स्थितींत मोठा आनंद व शांति आहे. यास्तव या अबाधित सिद्धान्ताचा चांगला विचार करून स्वभावास जाऊन मिळावें. सूक्ष्म बीजामध्यें स्थूल वृक्ष असतो कीं नाहीं? त्याच दृष्टन्यायानें अमूर्त शिवामध्यें मूर्त जग असतें. विषयाचे अनुभव, संकल्प, अहंता इत्यादि सर्व भाव आत्मस्वरूप-भूत आहेत रामा, या सृष्टींत आत्माच सर्वत्र पसरला आहे. मी या माझ्या देहांतच नसून अंतर्बहिर् व्यापून राहिलों आहें. मी बोलतों तें-सुद्धां तुझ्यासाठीं अहं-चा आरोप करून बोलत आहें. शुद्ध संविन्मय पुरुषाच्या हृदयांत भोगेच्छा, मोक्षेच्छा इत्यादि स्फुरत नाहींत. पण ही वस्तुस्थिति न जाणल्यामुळें मूढांना महादुःख भोगावें लागतें. राघवा, स्वभावभूत अशा या मोक्षामध्यें धन, बंधु, मित्र इत्यादि दुसऱ्या कशा-चाही फारसा उपयोग नाहीं. यास्तव सुज्ञानें जगाला स्वप्नसदृश जाणून आत्मरूप होण्याचा प्रयत्न करावा. आत्मज्ञांना सृष्टि गंधर्वनगराप्रमाणें भासते ३९.

**सर्ग ४०**—सृष्टींत ब्रह्म भासत नाहीं व ब्रह्ममय झाल्यावर सृष्टीचा अनुभव येत नाहीं. पण जीवन्मुक्तावस्थेंत पर्यायानें दोन्हीं भासतें.

**श्रीवसिष्ठ**—अस्वाभाविक बाह्याभ्यंतर् वस्तूंचें वास्तवस्वरूप साक्षि-चैतन्यच आहे. अस्वभावता क्षीण झाली म्हणजे स्वाभाविक स्थिति विस्तार पावते. जेव्हां शमरूप स्वभावविश्रांति उदय पावते, तेव्हा स्वप्न जसें सुषुप्तींत त्याप्रमाणें जगत्–दृश्य त्या स्वभावांत लीन होतें. ज्ञानी पुरुषाला स्वरूपविश्रांतीस विरोध करणारे भोग, महारोग व बंधु दृढ-बंधनें भासतात. द्रव्य, संपत्ति, अनर्थावह वाटते. यास्तव रामा, शुद्ध

विवेकानें आत्म्यामध्य शात व्हावें. अस्वभावरूपता हाच सग व स्वभाव-एकरूपता हाच शिव आहे, हें परम रहस्य जाणून परम आकाशरूप व्हावें. व्यर्थ निराश होऊं नये. ही स्वभावस्थिति ज्याच्या त्याच्या हातची आहे. मी आपल्याला किंवा या जगाला ओळखीत नाहीं; मी शांत ब्रह्मा-मध्यें प्रविष्ट झालों आहें, त्यामुळें शुद्ध, निरामय ब्रह्म आहें; तूं मला जरी वसिष्ठ या त्वं-भावाने जाणत असलास तरी मी शात आकाशाहून आप-ल्याला पृथक समजत नाहीं; 'मी आहें' असें जें तुला भासत आहे, तोही भ्रम आहे, वस्तुस्थिति नव्हे. ज्याप्रमाणें स्वप्न पाहणाराला सुषुप्ति नाहीं व निद्रासुख घेणाराला स्वप्न नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मरूप झालेल्या पुरुषाला सृष्टीचें भान होत नाहीं आणि सृष्टिमय झालेल्या जीवाला ब्रह्म भासत नाहीं. पण जागृत झालेल्या पुरुषाला जसे स्वप्न व सुषुप्ति यातील दोन्ही अनुभवाचें स्मरण असतें, त्याप्रमाणें शातबुद्धि जीवन्मुक्त ब्रह्म व जगत् याचें स्वरूप जाणतो. ज्ञानवान् या सर्व दृश्यादृश्याचे खरें स्वरूप जाणतो, व त्याच-वेळीं अंतःकरणात अतिशय शातही असतो. कारण ही सर्व भ्राति आहे, असें ओळखून तो तिच्याकडे केवळ विनोदाकरिता पाहतो. जगन्माया आत्म्यामध्यें किंवा अत्यंत असत्–शून्यामध्यें नसते. तिला पाहणारा कोणी द्रष्टा जीवही नाहीं. वास्तव शून्य व अशून्य याहून विलक्षण असलेली ही भ्राति व्यर्थ भासते. ती अनिर्वचनीय आहे ४०.

**सर्ग ४१**—त्रिजगत्पुत्रिकेचें अस्वभावस्वभावतः नृत्य व स्वभावस्वभावत. निर्वाण.

**श्रीवसिष्ठ**—हा अविद्यास्वभाव आत्मा सर्व जगद्रूप होऊन अहंतादि त्रिजगत्-पुत्रिकानृत्य जाणतो. त्याचप्रमाणें अविद्यारहित झालेला आत्मा शास्त्रोपायानें आत्मसाक्षात्कारवान् होऊन स्वस्वभावानें निर्वाणरूप होतो. जेथें जेथें सूर्य तेथें तेथें जसा प्रकाश, त्याप्रमाणें जेथें विषयविरक्ति तेथें आत्मसाक्षात्कार. ज्याला कोणी कर्ता, कर्म, करण, द्रष्टा, दृश्य, दर्शन इत्यादि नाहीं, असें हें त्रिजद्रूपी निराधार चित्र उठलें आहे. पण विद्या-दृष्टीनें तें मुळीं उठलेलेंच नाहीं. तर एक, शांत, अनामय, परब्रह्म आहे. चिच्चमत्कारमात्र असलेले जे जीव त्याच्या कल्पनामात्ररूप रंगमंडपांत ज्यांच्या नाना शृंगारचेष्टा चालल्या आहेत, अशा जगच्चित्रपुतळ्याची गणना करण्यास कोण समर्थ आहे? त्या नानाप्रकारचे रम्य अभिनय

करून सतत नृत्य करीत असतात. त्या असत्–पुत्रिकाचें विस्तृत वर्णन करण्यात कांहीं अर्थ नाहीं. डोळ्यांसमोर सतत दिसणारें हें त्रिजगत्पुत्रिका-नृत्य ब्रह्मजलाचें द्रवत्व आहे यास्तव तूं स्वभावाची भावना करीत रहा. त्या नृत्याकडे लक्ष्य देऊं नको. जाग्रदवस्थेंतही अव्यग्रमनानें सावध राहून या जगत्स्वप्नाचा आश्रय करूं नको. जाग्रतींत सुषुप्ताप्रमाणें असणें व वासना सोडणें हाच स्वभाव, मुक्ति अथवा परिणामता आहे. सर्व कार-कादि शून्य ब्रह्मच जगद्रूपानें स्थित आहे. तें सुंदर वस्तूमध्यें सुंदररूपानें, पूर्णामध्यें पूर्णतेनें व द्वित्वैक्यरहित वस्तूमध्यें द्वित्वैक्यरूपानें असतें. तें सृष्टिस्वरूपात सत्यरूपानें व सत्य आत्म्यामध्यें स्वयंशातरूपानें स्थित आहे. त्याच्या समोर गेलेलें मन एकरस होतें. संकल्पानें कल्पिलेलें जग जसें संकल्पास सोडून नसतें, त्याप्रमाणें जगदाभास परमार्थास सोडून राहत नाहीं. तें अनेकाकार भासलें तरी एकरूप आहे. साराश राघवा, सर्व दृश्य ब्रह्माच्या आधारानें भासणारा भ्रम आहे, हें तूं विसरूं नको. म्हणजे स्वभावभूत निर्वाण तुझ्या हातीं लागेल. ज्ञानानंतर तुला दृश्याचा भासही होणार नाहीं व जरी झाला तरी तो मिथ्या आहे, याविषयीं तुला मुळींच शंका राहणार नाहीं ४१.

**सर्ग ४२**—विश्व व विश्वेश्वर याची एकता. विवेकानें स्वात्मरूप परमेश्वराचेंच पूजन करावें.

**श्रीवसिष्ठ**—रामा, चित्तामुळें जगाचा भेद भासतो, पण चित्त तरी चित्तत्वाहून पृथक् आहे कोठें? चित्त अव्यक्त व अमल असल्यामुळें भासणाऱ्या या जगादिकांचा संभव कसा आहे, तेंच कळत नाहीं. प्रत्यगात्माकाश असलें तरच विषयादिकाचें स्फुरण होतें; पण तो चित्तलक्षण सूर्य अस्त पावला म्हणजे विषयादिक सर्व शांत होतात. वाय्वादिकातील स्पंदादिकाप्रमाणें आत्म्यामध्यें हें जग आहे. त्यांत शुद्ध व आद्यन्तमध्य-रहित ज्ञप्तिवाचून दुसरें कांहीं नाहीं. त्याला कोणी शांत शिव, कोणी शाश्वत ब्रह्म, कोणी शून्य, कोणी विज्ञानमात्र इत्यादि अनेक नांवें देतात. तें अनंतरूप चिद्रूप जणुं काय विषयतेची भावना करीत स्वरूपात स्थित असतानाच ज्ञेय होतें. चिद्बलानेंच विषयांची स्फूर्ति होत असल्यामुळें चित्तवाचून विषय नाहींत. अर्थात् सर्व चिन्मय आहे. बा साधो,

वास्तविक तत्त्व जाणल्यानें सव विश्व लीन होतें. बाह्य व आंतर् सर्व चेष्टा सोडून रहाणें, या काउमौनसंज्ञक दशेनें स्फुरण पावणारें ब्रह्म ससाराचें निरसन करून अवशिष्ट राहतें. भावनात्याग केल्यानें वरील दशा प्राप्त होते. मनात चिदेकरसाचा आश्रय करून रहावें. त्या स्थितीला अनुकूल अशा विवेक-वैराग्यादि साधनाचा अभ्यास करणें हीच परमेश्वर-आत्म्याची सर्वोत्कृष्ट पूजा आहे. शुद्धभावनेनें स्वभावरूप परमेश्वराची पूजा त्याच्या साक्षात्काराकीरता करावी. कारण विवेकरूप साधनाने पूजलेला स्वात्मा तत्काल निरतिशय आनंदरूप वर देतो. या पूजेपुढें इंद्र, रुद्र, उपेद्र इत्यादिकांची पूजा तृणासारखी तुच्छ आहे. विचार, सत्सग, शम इत्यादि पुष्पें समर्पण करून पूजलेला स्वात्मा-परमेश्वर तत्काल मोक्षफल देतो. सत्यस्वरूपाचें दर्शन याच एका उपचारानें पूजा केली असता तो महादेव सर्वोत्तम फल देतो. असो; हा आत्मा-ईश्वर इतका सुलभ असतांना त्याला सोडून कोणता सुज्ञ दुसऱ्या तटस्थ ईश्वराचें पूजन करणार आहे ? सत्सग, शम, संतोष व विवेक याच्या योगानें ज्यानें आत्म्याचें सर्वप्रकारें पूजन केलें आहे, त्याला शस्त्रें, विष, अग्नि इत्यादि कोमळ पुष्पांप्रमाणें भासतात. पण अविवेकानें देवार्चन, तप, तीर्थ, दान इत्यादि कितीही जरी केलीं, तरी तीं सर्व निरर्थक होत असल्यामुळें भस्म होतात. अहो, विवेकानेंच जर सर्व कर्मे सफल होतात, तर तोच आतल्याआत का कोणी करीत नाहीं. यथार्थतत्त्व जाणल्याने वासनाची शाति होऊन आत्मप्रसादानें विवेकाख्य यत्न सिद्ध होतो. पण त्याला पुनः भ्रमाच्या योगानें सुकवून सोडूं नये. तर शमामृतसेकानें आतल्या आत वाढवावें. देहसत्तेचा अनादर करून यथार्थ तत्त्वाचा साक्षात्कार झाल्यावर लज्जा, भय, विषाद, ईर्ष्या, सुख, दुःख इत्यादिकास एकाच वेळीं जिकावें. जगत्, शरीर इत्यादि उत्पत्तीच्या वेळींही जर नव्हतें तर तें आज कोठून असणार ? आता छान्दोग्यादि श्रुतीमध्यें सृष्टीच्या पूर्वी सत् होतें व त्याच्यापासून असत् जग हें कार्य झालें इत्यादि वर्णन आहे; हें खरें. पण त्याप्रमाणें जरी पाहिलें तरी कार्यकारणैक्य असल्यामुळें जग ब्रह्ममात्रच आहे. त्याहून भिन्न नाहीं. कार्यकारणैक्यसिद्धान्त जरी मान्य न केला व कार्यजगत् कारणब्रह्मा-

हून निराळें आहे, असें म्हटलें तरी सत्-हून पृथक् असलेलें तें असत् होणार! तेव्हां असत् जगाला अर्थक्रियाकारित्व कोठचें? व तें जर नाहीं तर हा व्यवस्थित व्यवहार कसा होतो? शिवाय असत् जगाची प्रतीति कशी येते? अर्थात् या सर्व अनुपपत्तींचें निरसन करण्याकरिता जगत्सद्रूप ब्रह्मच आहे, असें मानणें भाग आहे. असें जर आहे तर भेदप्रतीति कशी होते, म्हणून विचारशील तर त्याचेंही कारण सांगतों. सद्रूप ब्रह्माच्या दृष्टीनें भेद नाहीं. जगाच्या दृष्टीनें भेद आहे. पण तो प्रातिभासिक असल्यामुळें परमार्थ-अद्वैताची कांहीं हानि होत नाहीं. जगाचा प्रतिभासही ज्ञानरूप आहे, हें आम्ही वर सांगितलेंच आहे. ज्ञेय जग विवेकानें बाधित झालें म्हणजे अवशिष्ट राहणारें ज्ञानच अनिर्वाच्य शाश्वत शिवस्वरूप आहे. या अवस्थेस प्राप्त झालेले विवेकी शांतचित्तानें स्वस्थ राहतात. ते चित्राप्रमाणें निश्चेष्ट असतात. किंवा कांहीं निमित्तानें त्याचे देह चलनादि चेष्टा करीत असले तरी ते आतून ज्ञानरूपच रहातात. असले जीवन्मुक्त प्राप्त कर्म करोत किंवा सर्वत्याग करून शांत अंतःकरणानें उज्ज्वल होऊन एकान्तांत बाहुल्याप्रमाणें राहोत, त्यांच्या आनंदानुभवांत कांहीं विघ्न येत नाहीं. संकल्प शांत झाला असतां संकल्पित वस्तुही जशी शांत होते, किंवा स्वप्न पाहणारा मनुष्य जागृत झाला असतां त्याचें स्वप्न शांत होतें, त्याप्रमाणें आत्मसाक्षात्कारवान् पुरुषाच्या दृष्टीनें जगाचा अस्त होतो. त्यामुळेंच त्याला दुःखादिकांचा स्पर्शही होत नाहीं. कांहीं मूढ भलत्याच एकाद्या क्षणिक स्थितीला निर्वाण समजून त्याचें लांबलचक वर्णन करीत सुटतात. पण त्यापासून त्याच्या अंतःकरणांत आनंदानुभव होत नाहीं. ते आपल्या कल्पनेप्रमाणें कांहीं तरी कल्पून व आतून अकृतार्थ असतानाच कृतार्थ असल्याप्रमाणें दाखवून लोकांना उपदेश करीत सुटतात. पण कल्पनामात्र उपायानें कृतार्थ होऊं पाहणें, यासारखें अज्ञान दुसरें कोणतेंही नाहीं. यास्तव सर्व दुःखद आहे, असें समजून व जगद्भ्रमाचा त्याग करून वासनारहित व विषयाविषयीं विरस होऊन राहणें, हे निर्वाण होय. यास्तव रामा, उपदेशाप्रमाणें प्रयत्न करून नुस्त्या परोक्ष ज्ञानानेंच आपल्याला कृतार्थ न समजतां वासनाशून्य मनानें शांत हो व आत्मानुभव घे. म्हणजे शुद्ध

जगत्स्वरूप पहात असतांनाही तुला निर्वाणविश्रांति घडेल. केवल वेद-वाक्यावरून परमात्म्याचें नुस्तें शाब्दिक ज्ञान होणें यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. कारण अपरोक्षज्ञानास योग्य असलेल्या वस्तूचें परोक्ष-ज्ञान हा वस्तुतः भ्रमच आहे. यास्तव तसल्या बोधाला तुच्छ समजून आतर् अपरोक्ष अनुभवावर झडप घाल. तूं अनुभवरूप हो. तेंच तुझें निर्वाण होय ४२.

सर्ग ४३—मनोरूपी यक्षाचें जणुं काय नगरच, अशा अज्ञानकल्पित जगाचें केवल ज्ञानानें निरसन झालें असता ब्रह्मैक्यस्थिति होते.

श्रीवसिष्ठ—रामा, अहंतादि आतर् व घटादि बाह्य असें हें भोक्तृ-भोग्यलक्षण सर्व जग तत्त्वज्ञानानें असत् होतें. अज्ञान-ज्वरापासून सुटलेल्या व बोधानें शीतल झालेल्या पुरुषाचें विषयजल न रुचणें हेंच लक्षण आहे. वाच्य-वाचक ( शब्द-अर्थ ) भ्रमरूप इतर ज्ञान पुरें झालें. कारण अनहं-ज्ञान हेच निर्वाण आहे. यास्तव त्याची भावना करावी. स्वप्न-पदार्थाप्रमाणेंच ‘ मी, हें ’ इत्यादि मनोमात्र आहे. काल्पनिक यक्षाप्रमाणेंच जीव असत्य जगाला पाहतो. ‘ मी ’ व ‘ हें ’ हा शुद्ध भ्रम आहे, अशी दीर्घकाळ भावना केल्यास चित्तचित्-तत्त्वरूपास प्राप्त होतें. तूंही तशीच भावना कर, व शांत मनानें रहा. सर्व चिन्मात्र आहे. त्यांत द्वित्व व एकत्व कोठचें? सर्व निर्वाण पसरलें आहे. चिन्मय आकाश व्हावें, परम रस प्यावा व निर्वाणानंदरूप नंदनवनात निःशंकपणें रहावें. अहो भ्रांतबुद्धि मानवानों, या अतिशून्य संसारारण्यभूमीमध्यें व्यर्थ का भटकतां ? या त्रिभुवनरूप मृगजलाच्या मागें लागूं नका. आपलें आयुष्य व्यर्थ क्षीण करून घेऊं नका. जगद्रूपी मिथ्यानगराच्या गर्वानें नाश पावत अहां ! व आपल्या नाशाकरितांच सुखरूप दुःखें पाहतां ! ! अहो भल्या पुरुषांनो, गर्भ-शय्येवर असेंच शयन करीत राहूं नका. तर आपल्या स्वभावात-पारमार्थिक ब्रह्मभावांत—सतत स्थिर व्हा. द्रष्टृ-दृश्य-दोषानें स्वभावापासून च्युत होऊं नका. अज्ञानांत ज्ञात होणारा हा संसार वस्तुतः लवभरही नाहीं. यास्तव तृष्णारूपी लोखंडी काड्या मोडून संसार-पिंजऱ्यातून बाहेर पडावें व सिंहाप्रमाणें सर्वोत्तम होऊन रहावें. ‘ मी व माझें ’ ही भ्रांति नष्ट होणें हीच मुक्तता आहे. योगी कसाही जरी राहिला तरी त्याची सत्ता त्याला सदा स्फुरते व तोच आत्मसाक्षात्कार होय. निर्वाणता, अवासनता,

ज्ञता, इत्यादि संसारतापानें तप्त झालेल्या पुरुषांच्या विश्रांतिभूमि आहेत. तत्त्वज्ञाचा जगत्-अर्थ निराळा व मूर्खाचा निराळा. भ्रांति शांत झाली कीं विश्वता उरत नाहीं. जळलेल्या गवताची राख वाऱ्याबरोबर जशी कोठच्या कोठें उडून जाते, त्याप्रमाणें महात्मे आत्मस्वभावास स्थित झाले म्हणजे जग कोठच्या कोठें जातें. अज्ञाप्रमाणें तत्त्वज्ञालाही जगद्रचना भासते, पण ती ब्रह्मरूपानें व म्हणूनच वासनारहित भासते. एवढ्यासाठींच तत्त्वज्ञाची जी रात्र तो अज्ञांचा दिवस व अज्ञाचा जो दिवस ती तत्त्वज्ञाची रात्र; असें वेदवेत्ते म्हणतात. मन व विषय यामध्यें वस्तुतः कांहीं भेद नाहीं. त्यामुळें मन शांत झालें कीं जगाचा भास शांत होतो. ज्ञानानें मनाची शांति होते. ही शांति म्हणजे नाश नव्हे तर बाध आहे. कारण ज्यांना कांहीं स्थूल आकार असतो, त्याचा तो आकार क्षीण झाला म्हणजे नाश झाला असें म्हणतात. पण मन व मनोमय पदार्थ यांना स्थूल आकारच नसतो. त्यामुळें त्यांचा व्यावहारिक नाश होत नाहीं. तर केवळ बाध होतो. बाध झाल्यावर अधिष्ठान अवशिष्ट रहातें, असें आपण व्यावहारिक भ्रमांतही पाहतों. त्याप्रमाणें मन व मनोमय जग यांचा बाध झाला असतां स्वभावरूप ब्रह्मतत्त्व अवशिष्ट राहतें. वीराला जसें कधीं भूत दिसत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञान्याला जगत् आढळत नाहीं. ते आंतील व बाहेरील सर्व भासमान पदार्थांस ब्रह्म जाणतात. असो; याप्रमाणें स्वभावस्थिति निरूढ झाली म्हणजे तिन्ही अवस्था तुरीयाख्य ( चवथ्या ) अवस्थामय आहेत असें कळतें व त्यानंतर मननाला विषयच न राहिल्याकारणानें मनाचें मनस्त्वही नाहींसें होतें. रामा, तूंही सर्व ज्ञेयाचा परिहार करून अनामय स्वभावांत स्थिर रहा. बुद्धिवृत्तिच सर्व विषयाकार धारण करते, हें मीं तुला अनेकदां सांगितलेंच आहे. मनोमय संसार आत्मज्ञानानें बाधित होतो. निर्वाणाहून इतर स्थिति दुःखद आहेत. ज्ञानानें मूल-अज्ञान गळलें म्हणजे अभिमानशून्य देहादि भाव घृताच्या कठिणपणाप्रमाणें गळतात व त्यामुळें भ्रांतिरहित आणि शांत झालेले अधिकारी सतत विश्रांति घेत राहतात. त्यांना पुनः विक्षेप-दुःख अनुभवावें लागत नाहीं ४१.

**सर्ग ४४—समाधान-कल्पवृक्ष-वर्णन. त्याखालीं देहवानाच्या मनोमृगाची विश्रांति.**

**श्रीराम—मुने, समाधान-वृक्षाची यावज्जीव विश्रांति-फलद सत्ता सांगा.**

श्रीवसिष्ठ—रामा, विवेकी जनरूपी अरण्यांत यावज्जीव वाढणाऱ्या समाधान-तरूचें संक्षिप्त वर्णन मी करतों तें ऐक. विरक्ति हें याचें बीज आहे. तें अपमानादिजन्य दुःख व किंवा पूर्व पुण्योदय यांच्या योगानें उद्भवतें. तें एकाग्रचित्तवृत्तींत चांगलें रुजतें. यास्तव ध्यानमय चित्तांत त्याचा प्रादुर्भाव झाला असतां मोठ्या यत्नानें या पुढील शुद्ध, स्निग्ध व पवित्र रसानीं त्याच्यावर सेक करावा. प्रसूतिवैराग्याप्रमाणें भोगासक्त होऊन त्याचा नाश करूं नये. वैराग्यबीजास वाढवावयाचें झाल्यास काम—क्रोधादिकाच्या वेगाना सहन करण्याचें सामर्थ्य धरलें पाहिजे. अगोदर त्याला सत्संगसंज्ञक अमृततुल्य नूतन क्षीरानें शिंपावें. नंतर त्या संताच्या तोंडून आलेल्या शास्त्रार्थरूप अमृतानें सेक करावा. अशा प्रकारचे रस सर्व संसाराचा उच्छेद करणारे, पूर्ण, सर्व तापाची शांति करणारे, अमृताप्रमाणें मधुर व शीतल असतात. महाबुद्धिमानानें आपल्या चित्तभूमींत पडलेलें संसार—निर्वेदरूप ध्यानाचें बीज मोठ्या यत्नानें राखावें. कायिक, वाचिक व मानसिक असें त्रिविध सात्त्विक तप, इच्छादान, अमानित्वादि गुणसंपादन, तीर्थादि पवित्र स्थानीं विश्रांति घेणें, प्रसंगीं प्राप्त होईल त्यावर निर्वाह करणे, इत्यादि सर्व विरक्ति-बीजास वाढविणारे अनुकूल रस आहेत. यांच्या उत्तम सेकानें अंकुरित झालेल्या या बीजाचें रक्षण करावयास मुदिता नामक भार्येसह संतोष नावाच्या रक्षकास ठेवावें. म्हणजे पूर्व वासने-मुळें उद्भवलेल्या आशा, तृष्णा, इत्यादि पक्षिणी, पुत्र, मित्र, धन इत्यादिकाच्या ठिकाणचे प्रणय ( प्रेम ) लक्षण पक्षी व कामक्रोधादि गृध्र याचें निवारण होईल, त्याना त्या अंकुराना खाऊन टाकण्यास अवकाश मिळणार नाहीं. कारण संतोष व त्याची स्त्री मुदिता या दोघानाही ध्यान-बीजाच्या अंकुराचें रक्षण कसें करावें, हें चांगलें माहित आहे. यम, नियम, आसन, प्राणायाम, ईश्वरोपासना इत्यादि सत्क्रियालक्षण मृदु ( अहिंसा-त्मक ) कर्मांच्या योगानें या अंकुरांवरील मळ झाडावा. त्याचप्रमाणें अचिंत्य ब्रह्मलोक देणाऱ्या विवेकरूपी उन्हानें अज्ञानांधकाराचें परिमार्जन करावें. दुष्कर्मरूपी अभ्रापासून उद्भवलेल्या भंगुर संपत्ति, प्रमदा इत्यादि अशनि, या अंकुरावर येऊन पडतात. पण धैर्य, औदार्य, दया इत्यादि

मंत्र; जप, स्नान, तप, दम इत्यादि तंत्र व प्रणवार्थरूप त्रिशूळ यांच्या योगानें त्यांचें निवारण करावें. याप्रमाणें रक्षिलेल्या या ध्यानबीजापासून अतिशय सौंदर्यसंपन्न उच्च व श्रीमान् विवेकसंज्ञक नवा अंकुर उत्पन्न होतो. त्याच्या योगानें चित्तभूमि फार सुंदर दिसते. नूतन पूर्ण चंद्राच्या योगानें जसें आकाश, त्याप्रमाणें ती प्रकाशमय होते. नंतर त्या विवेकांकुराला आपोआप दोन पानें फुटतात. एक शास्त्राभिगमन व दुसरें साधुसंगम. स्वतः विवेक हा त्याचा स्तंभ होतो. त्यांत स्थिरता येते. वैराग्यरसानें पुष्ट झालेला तो पुढें शास्त्रार्थ-वर्षाकालानें युक्त होताच थोड्याच कालांत वाढतो. शास्त्रार्थ, साधुसंपर्क, वैराग्यरस इत्यादिकांनीं पुष्ट झालेला तो, मग राग-द्वेष इत्यादि वानराच्या क्षोभानीं कंपायमान होत नाहीं. विज्ञानानें अलंकृत झालेल्या त्याच्यापासून पुढें ह्या विस्तृत शाखा उत्पन्न होतात. स्वात्मतत्त्वाचा स्फुटपणा, सत्यता, सत्ता, धीरता, निर्विकल्पता, समता, शांतता, मैत्री, करुणा, कीर्ति, आर्यता, इत्यादि अनेक शाखा शांत्यादि पत्रांनीं युक्त असतात. शेवटीं यतीचा हा ध्यानतरु यशःपुष्पानीं पारिजातासारखा भासतो. तो सप्तमभूमिकेपर्यंत उत्तम ज्ञानफळ क्रमानें देतो. तो सर्व दिशास शीतळ करतो. संसारतापाचें निवारण करतो. शम-छाया पसरतो. चित्ताचें स्थैर्य वाढवितो. कुलपर्वताप्रमाणें आपळें पीठ दृढ करतो. कैवल्यसंज्ञक फळाचे घटीयंत्र रचतो. त्यांत शांत्यादि गुण खचून भरलेले असतात. याप्रमाणें पुरुषाच्या हृदयारण्यांत विवेकवृक्ष प्रत्यहीं वाढूं लागला असतां हृदयतापहारिणी शीतलता पसरते. त्या छायेंत संसारप्रदेशामध्यें भटकून थकलेला मनोमृग विश्रांति घेतो. तो जन्मापासून संसारमार्गांत चालणारा जीर्ण वाटसरू आहे. दैववशात् सन्मार्गामध्ये प्रवृत्त झालेल्याही त्याला नाना वाद्यांचा कोलाहळ ऐकून मोठी भीति वाटते व त्यामुळें तो त्या मार्गाला सोडतो. कामादि व्याध त्याच्या मागें लागतात. नानाकार अनेक शरीरामध्यें वारंवार लपून राहून तो त्यांच्या डोळ्याआड होण्याचा प्रयत्न करीत असतो. पण त्यामुळें त्याचें स्वरूप अगदीं जर्जर होतें. संसारारण्यांतून वाहणाऱ्या वासनावायूकडून त्याला प्रेरणा होते. अहंता-नदी त्याला वारंवार अडविते. विकाराचे आघात त्याच्यावर वारंवार होत असतात. मान-सिंहाला पाह-

ताच त्याच्या अंतःकरणासह शरीरही चंचल होतें. मरणरूपी वृक त्याला दुरून पहात असतो. गर्वरूपी कोल्हा त्याला खाण्यासाठीं दूर नेतो. काम-व्याध त्याला भोगरूपी आमिष दाखवून जाळ्यांत अडकविण्याचा यत्न करीत असतो. तारुण्यरूपी स्त्री-सुहृत् त्याला क्षणभर आलिंगन देऊनच दूर करतो. इंद्रियरूपी वायु जणुं काय कुपित होऊनच त्याला दुःसंचार नरक-स्थावरादि अरण्यामध्यें नेऊन टाकतो. हे राजा रामा, याप्रमाणें अनेक क्लेशपरंपरा भोगणारा हा मनोमृग बहुजन्मामध्यें सांचविलेल्या पुण्याचा परिपाक झाला असता, मोठ्या भाग्यानें अधिकारीजन्मास प्राप्त होतो व तेथें शमादि साधनांचें अनुष्ठान करून पूर्वोक्त ध्यानतरूच्या छायेमध्यें बसून विश्रांति घेतो. यास्तव अहो श्रोत्यांनो, ताल-तमाल इत्यादि वृक्षाच्या छायासारख्या भूम्यादि ब्रह्मलोकान्त सर्व लोकामध्यें ज्याचा गंधही प्राप्त होणें शक्य नाहीं, अशा पुनर्जन्मरहित मोक्ष-विश्रांतिसुखास तुमचा मनोमृग प्राप्त होवो. वर सांगितल्याप्रमाणें क्षेत्र व बीज यांना रस-सेकादिकाच्या योगानें शुद्ध करून त्यांत वाढविलेल्या ध्यान-कल्पवृक्षापासून तें सुख मिळणें शक्य आहे ४४.

**सर्ग ४५**——ध्यानवृक्षावर चढण्याचा क्रम व त्यावर आरूढ होणाऱ्या पुरुषास उत्तरोत्तर भूमीमध्ये प्राप्त होणारें उत्तमोत्तम सुख.

श्रीवसिष्ठ——रामा, याप्रमाणें पुष्कळ क्लेश भोगून ध्यानवृक्षाखालीं येऊन बसलेला मनोमृग तेथेंच रममाण होतो. दुसऱ्या वृक्षाकडे जात नाहीं. थोड्याच वेळांत तो विवेकवृक्ष आतील परमार्थरूप फल हळू हळू प्रकट करूं लागतो. त्याच्या खालीं बसलेला मनोमृग तें पाहतो व त्याच्या आशेनें त्यावर चढूं लागतो. तो इतर सर्व प्रयत्न सोडून केवळ त्या फलाला मिळविण्याचीच इच्छा करतो. तो मोठ्या निश्चयानें वर वर जाऊं लागतो. विवेक-वृक्षावर पाय ठेवून इतर सर्व वृत्तींचा त्याग करतो. याप्रमाणें ध्यानवृक्षावरील एकाद्या उन्नत जागीं जाऊन पोंचला म्हणजे मग तो खालीं पाहतही नाहीं. कारण स्वभावतःच त्याला अधःपाताची इच्छा नसते. तो मागचे सर्व संस्कार सोडतो. त्याचें नुसतें स्मरणही करीत नाहीं. पण दैववशात् मागच्या एकाद्या अनुभवाचें स्मरण झाल्यास उंच स्थानीं आरूढ झालेला तो

' मी एवढा वेळ किती कृपण होतों, ' असें म्हणून आपल्यालाच हसतो. भूतदया, अभय, चित्ताचा सरलपणा इत्यादि शाखांवरून संचार करणारा व लोभसर्पांस पायांखालीं तुडविणारा तो एकाद्या सम्राटाप्रमाणें शोभतो. त्याच्या तृष्णादि पोलादी शृंखला तुटतात. तो प्राप्त इष्टानिष्टांची उपेक्षा व अप्राप्तांची आकांक्षा करीत नाहीं. सर्व वृत्तींमध्यें आतून चंद्रासारखा सौम्य व शीतल असतो. तो शास्त्रार्थपर्णांवर आपला देह ठेवून राहतो. जगाच्या सर्व उच्च-नीच गति त्याला तुच्छ भासतात. आपल्या पूर्वीच्या भयंकर दशा पाहून तो आतल्या आत खिन्न व आश्चर्यचकित होतो. त्या शाखांवरून विहार करितांना तो राजासारखा दिसतो. पुत्र, स्त्री, मित्र इत्यादि सर्व मनुष्यें व धनें यांना तो स्वप्नांतील किंवा जन्मांतरींच्या मनुष्यादिकांप्रमाणें पाहतो. त्याचे राग, द्वेष, मान, मद, मोह इत्यादि नटाच्या रागादिकांप्रमाणें दिसतात. समोर दिसणाऱ्या संसार-नदीच्या मत्त व भंगुर तरंगांना पाहून तो हंसतो. अपूर्वपदामध्यें विश्रांति घेणारा तो जीवंतपणींच शवासारखा होतो. लोकादि एषणाचा त्याग करतो. अति उन्नत, केवल, शुद्ध व ज्ञानरूप अशा त्या उत्तमपदावर दृष्टि ठेवून तो त्याच वृक्षावर अधिक उंच जाऊं लागतो. संतोषामृतानें पुष्ट झालेला तो पूर्वींच्या आपत्तींचें पुनःपुनः स्मरण करून अर्थांनाही अनर्थरूप समजतो व त्याच्या नाशानें संतुष्ट होतो. निजलेल्या पुरुषाला कोणीं उठविल्यास निद्रासुखाचा विच्छेद झाल्यामुळें त्याला जसा खेद होतो, त्याप्रमाणें भोग देणाऱ्या व्यावहारिक कार्यांमध्येंही तो उद्विग्न होतो. दीर्घकाल मोठ्यानें श्रान्त झालेला तो एकाद्या पान्थाप्रमाणें अबाधित विश्रांतीची आकांक्षा करतो. इतर जनाप्रमाणेंच त्याचाही श्वासोच्छ्वास चाललेला असल्यामुळें तो जरी इतर प्राण्यांसारखाच आहे, असें वाटलें तरी आंतून अहंभावशून्य असल्यामुळें निरिंधन अग्नीप्रमाणें शांत होतो. पदार्थांविषयीं वेगानें उद्भवणाऱ्या अ-रतींचें तो निवारण करूं शकत नाहीं. याप्रमाणें महापदवीस जाऊन पोंचण्याची इच्छा करणारा तो परमार्थफल देणाऱ्या अनिर्वाच्य अवस्थेस ( म्ह० सहाव्या योगभूमीस ) जाऊन पोंचतो. दैवयोगानें एकाद्या भोगदशेंत तो अनायासानें जाऊन पडला असताही तिच्याविषयीं विरस होतो. ( अर्थात् प्रयत्नावांचून प्राप्त

झालेली भोगावस्थाही त्याला आसक्त करूं शकत नाहीं ) आंतून आनंदी असणारा तो संसारवृत्तीविषयीं निजल्यासारखा होऊन राहतो. त्या मौनी व तृप्त पुरुषाला काहीं विलक्षण सुख होतें. असो; अशा अपूर्व स्वरूपास प्राप्त झालेला तो मनोमृग क्रमानें त्या परमार्थ-फलापाशीं जाऊन पोंचतो. तेथें त्याच्या वासनाचा अत्यंत क्षय व मनोनाश होतो. तो आकाशासारखा स्वच्छ बनतो. भूमानंदब्रह्मफल घेतो. त्याचा स्वाद घेऊन, अनुभवही घेतो व तृप्त होतो. संकल्पार्थाचा त्याग केल्यामुळें प्रत्यहीं विस्तार पावणारी जी शुद्धस्वभाव विश्रांति तीच परमार्थप्राप्ति होय. त्रिपुटीचा भेद झाल्या-मुळें त्यावेळीं अभेदच राहतो. तेंच शुद्ध, एक व आदि–अंतरहित ब्रह्म होय, असें ज्ञानी समजतात. उत्तम लोक, धन व स्त्री–पुत्र इत्यादिकांची इच्छा सोडून राहिलेला तो त्या परमपदीं विश्रांति घेतो. दृश्यतत्त्वाचें शोधन केलें असतां सन्मात्र हा परमार्थ राहतो व द्रष्टृ-तत्त्वाचें शोधन केलें असता चिन्मात्र अवशिष्ट राहतें. त्याचा अखंड–एकरसलक्षण निर-तिशय आनंदरूपानें परिणाम होऊन भेदबुद्धि नष्ट होते. त्यानंतर धनुष्य आकर्ण ओढून सोडलेल्या बाणाप्रमाणें अखंडाकार झालेलें चित्त पुनः पूर्वस्वभावावर येत नाहीं. ज्ञान्याची ती स्थिति अतिशय कोमल आहे. ध्यान जसें पुरुषाच्या अधीन असून त्याला तें पाहिजे तेव्हां करितां किंवा सोडतां येतें. त्याप्रमाणें ती स्वतः ज्ञान्याच्याही अधीन नसते. ज्याप्रमाणें बाहुली पूर्वी काष्ठामध्यें आपले अवयव प्रकट न करितां राहिलेली असते, त्याप्रमाणें ती परमात्म्यातील विश्वस्थितिही सती किंवा अ-सती आहे, असें म्हणतां येत नाहीं. त्या अवस्थेस ध्यान असेंही म्हणवत नाहीं. कारण त्यावेळीं ज्ञानी सर्व वृत्तिरहित होऊन शुद्धस्वरूपात लीन झालेला असतो. ज्याच्या ठिकाणीं दृश्याविषयीं अत्यंत विरसता दिसते, तोच ज्ञानी आहे, असें जाणावें. कारण अज्ञाला दृश्य-त्यागाची शक्ति नसते. दृश्याला जाणणें यालाच व्यवहारात बोध म्हणतात. पण आत्मस्वरूपांत लीन झालेल्या त्या ज्ञानी पुरुषाला तसला बोध होत नाहीं. म्हणून त्या प्रपंच-बोधरहित महात्म्याला समाहित म्हणतात. त्याच्या चित्तस्थितीला समा-धान म्हणतात. मनाचा द्रष्टृ–दृश्य–एकतारूप प्रत्यय जेव्हां होतो, तेव्हां तो आपोआप एकसमाधानामध्यें लीन होतो. दृश्याविषयींचें वैरस्य हाच

तत्त्ववेत्याचा स्वाभाविक धर्म आहे, व दृश्याचें स्वारस्य हेंच अतत्त्वज्ञत्व होय, असें उत्तम म्हणतात. अतत्त्वज्ञालाच विषय स्फुरतात. तत्त्वज्ञाला नाहींत. कारण ज्यानें अमृताचें पान केलें आहे, त्याला कडु कांजी कधींही आवडणार नाहीं. तृष्णारहित, आत्मनिष्ठ झाल्यामुळें तीन एषणांचा त्याग करणाऱ्या निरिच्छ ज्ञानी पुरुषाचें ध्यान आपोआपच प्रवृत्त होतें. कारण तृष्णादि विक्षेपकारणामुळेंच स्वरूपानुसंधानलक्षण ध्यान चंचल होतें, हें प्रसिद्ध आहे. पण ती तृष्णाच ज्याला नाहीं, त्या तत्त्ववेत्याच्या स्वरूपानुसधानास प्रतिबंध कोण कसा करणार? अथवा ज्ञानी पुरुषाची तृष्णा अमर्याद असते. कारण तो स्वतः अमर्याद आत्मरूप झालेला असतो. तेव्हा बाहेरचे क्षुद्र विषय त्याची तृष्णापूर्ति कशी करणार? यास्तव तृष्णाशून्य पुरुषश्रेष्ठाचें अनत ध्यान आपोआप सिद्ध होतें. तस्मात् शुद्धबोधाचा उदय होईतोंच चित्तसमाधानाकरिता यत्न करावयाचा असतो. शुद्ध ज्ञानरूप आत्म्याचा साक्षात्कार झाला म्हणजे समाधानाविषयीं यत्न करणें, हेंसुद्धा ज्ञानित्वाच्या विरुद्ध असल्यामुळें त्याची सर्वथा निवृत्ति होते. कारण अतिशय पेटलेल्या अग्नींत तुपाचा एक थेंब कसा राहील? यास्तव अत्यंत विषयवैराग्य हेंच समाधान आहे. तें ज्यानें संपादन केलें आहे, त्या मनुष्यरूपी ब्रह्माला नमस्कार असो. खरोखर, विषयविरक्ति अतिशय प्रौढ झाली असता, त्या ज्ञान्याच्या ध्यानाचें हरण करण्यास इंद्रासह सर्व सुर व बलिप्रभृति दैत्येंद्रासह असुरही समर्थ नसतात. एवढ्यासाठीं हे रामभद्रा, असलें वज्रतुल्य वैराग्य–ध्यान सपादन कर. बाकीच्या तृणतुल्य देवता-ध्यानाचा काय उपयोग आहे? तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें विश्व हा शब्द व त्याचा अर्थ बाधित झालेला असतो. यास्तव हे ज्ञानी पुरुषानो, जेथे सर्व एकरूप होऊन भासतें, तेथें विश्रांति घ्या. हा एकरूप भासही भूमानंदाच्या अपेक्षेनें आहे. एक या संख्येच्या अभिप्रायानें नव्हे. कारण विवेकी (आरुरुक्षु) पुरुषांच्या मननादि बोध–भूमीमध्यें किंवा सिद्धा (आरूढां) च्या साक्षात्कारादि बोधभूमीमध्यें आत्मातिरिक्त सत्ता व असत्ता द्वैत व ऐक्य यांचा कोणींही निर्णय केलेला नाहीं. असो, अशा त्या विश्रांतीचे उपाय सांगतों. पहिला शास्त्रार्थ, दुसरा ज्ञानी पुरुषाचा समागम व तिसरा ध्यान हा उपाय असून त्यांतील पुढचा

ढचा उपाय निर्वाणाच्या अत्यंत उपयोगी आहे. कारण नुसत्या शास्त्रार्थापेक्षा सत्समागमाचें फळ अधिक आहे व ध्यानाचें फल तर सर्वांत अधिक आहे. विचारजन्य ज्ञान व वैराग्यही निर्वाणाच्या उपयोगी आहे, व त्याची दृढता एकमेकाच्या अधीन आहे. पण ही अमर्यादित चित् आपल्या जीवसंज्ञक प्रतिबिंबाच्या आदर्शभूत अंतःकरण–उपाधीमुळें परस्पर अत्यत भिन्नरूप धारण करते. व जगामध्यें प्रियाप्रिय संबंधामुळें झालेल्या ब्रह्मादिस्तंभपर्यंत विशेषास व्यापून कर्मवैचित्र्यामुळे समविषमशरीरभेदामध्यें उदय पावते. पण याप्रमाणें अनादिकालापासून संसार करीत राहिलेल्या जीवातील कोणा एकाद्याच्याच भाग्योदयामुळें ज्ञानयोग्य उत्तम शरीर प्राप्त होऊन शास्त्र-सज्जनसगादि उपायाचा लाभ झाल्याकारणाने ज्ञान व वैराग्य याचा उदय होतो. हे दोन महादीप असून त्यातील एक सिद्ध झाला असता दुसराही होतो. त्यानंतर ज्ञानाग्नीनें जाळून भस्म करून टाकलेला सर्व जगत्कापूस चिदाकाशात उत्तरभूमिकाभ्यासरूप मतिसंज्ञक वावटळीच्या वेगानें कोठें उडून जातो कांहीं कळत नाहीं. पण ज्याप्रमाणें चित्रांतील अग्नि शीतनिवारण करण्यास समर्थ नसतो, त्याप्रमाणें सामान्य बोध आत्मविषयक अज्ञानाला हटवूं शकत नाहीं. मी मनुष्य आहें, ब्राह्मण आहें, इत्यादि अभिनिवेशा (आग्रहा) त्मक अपज्ञानानें जीवाचा संसारभ्रम जसा वृद्धि पावत जातो व ज्ञान जळत जातें, त्याप्रमाणें तत्त्वज्ञाचें ज्ञान वृद्धि पावतें व उत्तरोत्तर भूमीमध्यें अज्ञान जळतें. त्यानंतर ज्ञानी पुरुषाला जग हा अर्थरहित शब्द भासतो. त्याला जगाचा विविध पदार्थमय भास मुळींच अनुभवास येत नाहीं. तर परम आभासरूपी चित्-चीच कांहीं विलक्षण अवस्था भासते. ज्याला आत्म्याचा अर्धा साक्षात्कार झाला आहे, त्याचें चित्त अर्धवट वाळलेल्या काष्ठाप्रमाणें बोध-अबोधरूप असतें. तें आत्म्याच्या अदृढ साक्षात्कारामुळें एका प्रकारचें व जगद्भावामुळें दुसऱ्या प्रकारचें होतें. तें बोधामुळें सर्व जनांच्या ठिकाणीं मैत्रीची भावना करतें. आपल्या उपमेनें सर्वत्र सुखदुःख पहातें व अबोधाशानें इतर मतवाल्यांशीं विवादादिक करतें. पण त्यांतल्या त्यांतही पुरुषामध्यें अबोध व बोध यांतील ज्याचा भाग अधिक असेल तन्मय तो होऊन राहतो. आतां ज्याचें ज्ञान परिपक्व झालेलें असतें

*

तो जगाचें सत्त्व व असत्त्व यांना सत्यच समजत नाहीं. वासना हेंच मन आहे. ती आत्मविचारानें नष्ट होते. अर्थात् आत्माच मायिक मनोमृगादि वेषानें अनर्थ भोगून थकतो. वर वर्णन केल्याप्रमाणें ध्यान-कल्पवृक्षाच्या खालीं बसून विश्रांति घेतो. त्या वृक्षावरील परम बोधरूप फलाकडे पाहून त्याच्या इच्छेनें वृक्षावर चढतो आणि थोड्याच वेळांत त्या फलाचा रसास्वाद घेऊन तृप्त होऊन राहतो. रामा, मनोहरिण अशारीतीनें पाशांतून मुक्त होतें ४५.

सर्ग ४६—ध्यानवृक्षावरील फलाचा आस्वाद घेतल्यावर होणारी मनाची स्थिति व दृढ वैराग्य.

श्रीवसिष्ठ—राघवा," याप्रमाणें परमार्थफलाचा साक्षात् अनुभव येऊन मुक्तीमध्यें परिणाम झाला असता, अत्यंत साक्षात्काररूप वृत्तीही आपल्या उपादानभूत अज्ञानाचा बाध झाल्याकारणानें असत् होते. आणि मनोमृग परम पुरुषार्थरूप साक्षात्कार होतो. तैलरहित दीपाप्रमाणें तें मृगत्व (विषयतृणाला शोधण्याचा स्वभाव) कोठें तरी नाहींसें होते. स्वप्रकाश अनंत परमार्थच अवशिष्ट राहतो. ध्यानवृक्षावरील फल हातीं लागून बोधत्वास प्राप्त झालेलें मन पर्वतासारखी वज्रस्थिति धारण करतें. त्याचें मनस्त्व कोठें तरी निघून जातें व स्वच्छ बोधता मात्र अवशिष्ट राहते. त्यानंतर मन अनायास व आद्यन्तरहित ध्यानच होतें. जोंवर ब्रह्माचा साक्षात्कार होऊन मन परमपदीं विश्रान्त झालेलें नसतें, तोंवर मननत्वामुळें तें ध्यान होत नाहीं. पण परमार्थाशीं एकरूप होऊन गेलेलें तें कोठें जातें, त्याचें काय होतें, वासना, कर्में, हर्ष, क्रोध इत्यादि भावना काय करीत असतात, तें कांहीं कळत नाहीं. त्यावेळीं योगी पुरुष केवल ध्यानैकनिष्ठ झालेला दिसतो. तो पर्वताप्रमाणे अचल असतो. त्या स्वात्माराम योग्याला सर्व दृश्य नीरस भासतें. त्यामुळें त्याच्या वृत्ति आपोआप गळूं लागतात. त्या बलात्कारानें विश्रांति पावतात. तेव्हां, त्यामुळें अर्थात् सिद्ध होणाऱ्या समाधानाचा विचार कोण करणार? उदार पुरुष चित्रांतील पुरुषाप्रमाणें भोग्य पदार्थ दिसेनासे होईतों विषय विरसतेची भावना करितात. आत्मवान् पुरुष निर्वासनतेमुळें जगांतील पदार्थ पहात नाहीं, व त्यामुळें जसें एकाद्यानें दुसऱ्या एकाद्याला बलात्कारानें एकाद्या

कामांत प्रवृत्त करावें, त्याप्रमाणें तो वज्रासारख्या अभेद्य समाधानांत प्रवृत्त केला जातो. वर्षाकाळीं येणाऱ्या नदीच्या पूराप्रमाणें ओघानें प्राप्त होणाऱ्या समाधानाचा स्वाद घेतल्यावर योग्याचें मन मुंगी जशी गुळाच्या खड्याला सोडून दूर जात नाहीं, त्याप्रमाणें त्याला सोडून दूर होत नाहीं. मन सर्व विषयांविषयीं तृप्त होऊन जेव्हा शीतल बनतें. तेव्हा ध्यानमय होतें. यास्तव ज्ञानामुळें विषयाविषयीं विरस होणें हीच समाधि होय. दृढ विषयविरक्ति हेंच ध्यान होय. तें परिपक्व झालें असता वज्रासारखें दृढ होतें. ध्यानच निर्वाण-पदास प्राप्त होतें. तेंच परमानंद पद होय. यास्तव भोगविरक्ति असल्यास दुसऱ्या ध्यानादि उपायांची फारशी गरज नसते, व तें नसल्यास दुसरे हजारों उपायही व्यर्थ आहेत. दृश्यस्वादरहित ज्ञानी मुनींचें निर्विकल्प-समाधान सतत चालू होते. ज्याला दृश्याची रुचि नाहीं, तोच ज्ञानी होय. ज्याचा स्वभावच शांत झाला आहे, तो भोगी कसा होणार ? कारण भोगित्व हा आत्म्याचा स्वभावच नव्हे. वेदान्तश्रवण, उपनिषत्पाठ, प्रण-वादिकाचा जप इत्यादिकाच्या योगानें चित्तविनोद करून पुनःपुनः समाधीमध्यें तल्लीन व्हावें. अर्थात् विषयचिंतनाला अवकाशच देऊ नये. म्हणजे परमात्मा प्रसन्न होतो. त्यातल्या त्यांत श्रवणादि बाह्य उपायापेक्षां समाधीला अधिक महत्त्व व वेळ द्यावा. सर्व खेद व शंका सोडून रहावें. निजल्याप्रमाणें चित्त शांत ठेवावें. शुद्ध मनानें रहावें ४६.

**सर्ग ४७**—दृढवैराग्यापर्यंत पुनरपि मुक्तीचीं साधनें.

**श्रीवसिष्ठ**—शरीरसंसारभारानें श्रांत होऊन संकटांत लोळत असल्या-मुळें ज्याला विश्रांतीची आकांक्षा असते, त्याचा हा अनुक्रम ऐक. काहीं कारणानें अथवा कारणावांचूनच जेव्हा संसारवैराग्यमयी विवेक-कणिका पुरुषाच्या हृदयात उत्पन्न होते, तेव्हा साधुत्वाच्या योगानें अतिशय प्रख्यात असलेले गुण त्याच्या ठिकाणीं येतात. सूर्याच्या तापानें संतप्त झालेले वाटसरू जसे छायाप्रधान वटादि वृक्षाचा आश्रय करितात, त्या-प्रमाणें ते गुणही त्या महात्म्याच्या आश्रयास येतात. त्यामुळें त्या पुरुषाचें ठायीं यज्ञ-दान-परायणता, देवताराधन इत्यादि गुण प्रथम उदय पावतात. तो अज्ञांची संगति सोडून सुज्ञांचा अनुचर होतो. चंद्रबिंब जसें अमृत धारण करतें. त्याप्रमाणें तो सुंदर. अनुरूप. स्वाभाविक व लोकहितावह

व्यवहार धारण करतो. स्वपक्षाविषयींचा राग, लोभ, अभिमान इत्यादिकाचा अभाव व परहितकारित्व या गुणामुळें तो दुसऱ्यास संतुष्ट करणारा होतो. त्यामुळेंच तो सर्वांस प्रिय होतो. शास्त्रानें निषिद्ध न मानलेल्या पवित्र कर्मांमध्येंच तो आसक्त असतो. त्यामुळें सर्व जनांहून उत्कृष्ट व सौम्य होऊन, तो व्यवहार करूं शकतो. त्याची नूतन संगति लोकांस सुख देते. त्या विवेक्याचीं चरित्रे (आचरण) शीतल व पवित्र असतात. साधूच्या समागमांत जशी निर्भय विश्रांति मिळते, तशी पुष्पाच्या थरांनें आच्छादित झालेल्या उद्यानभूमींतही मिळत नाहीं. मदाकिनीच्या जलाप्रमाणें विवेक्याची संगाते पापाच प्रक्षालन करून शुद्धता देते. संसाराचें उल्लंघन करण्याची इच्छा करणाऱ्या विरक्त विवेकी पुरुषाच्या आश्रयानें राहणाऱ्या सामान्य जनासही शीतलता प्राप्त होते. विवेक पुरुषाची उदारता दुसऱ्या कोणाही जीवामध्यें आढळत नाहीं. क्रमानें निष्काम कर्मानुष्ठान केलें असता बुद्धि प्रसन्न होते. त्यामुळें ज्ञानाची इच्छा उदय पावते. शुद्ध बुद्धि गुरुमुखानें ऐकलेल्या शास्त्रार्थाला हृदयांत साठविते. नंतर विवेक्याच्या ठिकाणीं शास्त्रार्थरसानें शोभणारी सत्प्रज्ञा उन्नत होते. साधुसंगम व शास्त्रार्थ यांच्या योगानें शुद्ध झालेला प्राज्ञ दिव्य वस्त्राप्रमाणे मलरहित होतो. सूर्यतेजानें जसें भुवन, त्याप्रमाणें स्वतेजानें साधु प्रकाशमान होत असतो. सुज्ञ पुरुष शास्त्र व साधुसमागम याचें इतकें उत्तम अनुकरण करतो कीं, अत्यंत अनुषगामुळें तो स्वतः आतल्या आत साधुत्वाचा अनुभव घेऊ लागतो. काहीं दिवसानीं त्याचें साधुत्व बाहेर प्रकट होतें. तो शास्त्रार्थभरानें नम्र व चिह्नित होतो. भोगाना पायाखालीं तुडविणारा तो पिंजऱ्यातून बाहेर पडलेल्या सिंहाप्रमाणें शोभतो. भोगासक्तिरूप दौर्भाग्य प्रत्यहीं सोडणाऱ्या त्याच्या योगानें, चद्राच्या योगानें जसें नक्षत्रमंडल, तसें त्याचें कुल भासतें. अभोगजन्य कृपणता त्याच्या ठायीं मुळींच दिसत नाहीं. त्याच्या तोंडावर काहीं अपूर्वच शोभा येते. त्रिभुवनाला तृण समजणारा तो ' महात्मा ' या संज्ञेस पात्र होतो. प्राप्त झालेल्या भोगांचा परित्याग केल्यामुळ संतुष्ट होणाराही तो ' अरेरे, कोणाचाही द्वेष करावयाचा नाहीं, असा नियम करून पुनः मी प्राप्त भोगांचा द्वेष काय म्हणून केला, '

असें मनांत आणून लज्जित होतो. भोगांच्या अलाभानें तर तो फारच संतोष पावतो. मागच्या आपल्याच रागादिजन्य उत्कट व चंचल क्रियांना आतां आठवून व खेदानें स्मितमुख होऊन मनांत हंसतो. इतर साधु विस्मित होऊन त्याला प्रेमानें पहावयास येतात. उचित बुद्धीनें भोगांचा नित्य अनादर करणारा तो प्राप्त झालेल्या उचित व अनिषिद्ध सिद्धींचाही बहुमान करीत नाहीं. कारण गुरु, शास्त्र इत्यादिकाच्या संपर्कापूर्वींच त्यानें वैराग्यादि साधनांचा दृढ अभ्यास केलेला असतो. नंतर स्वस्थतेची इच्छा करणारा रोगी जसा वैद्याचा आश्रय करितो, त्याप्रमाणें तो आपण होऊन आपल्या कल्याणाकरिता सज्जनाचा संपर्क करितो. त्यामुळें उदार मतिवान् होऊन शास्त्रार्थामध्यें निमग्न होतो. सज्जनाचा मुळीं हा स्वभावच आहे कीं, आपल्या समीप कोणी विपत्तींत पडत असला तर त्याला त्यांतून काढून संपत्तींत सोडावें. त्याप्रमाणें संत स्वसंगतींत आलेल्या विरक्ताचा उद्धार करतात. विवेकी पुरुषाला परधनाविषयीं विरक्ति व स्वधनाविषयीं संतोष पूर्वींपासूनच वाटत असतो. कारण आपल्या धनाचीही उपेक्षा करणारा परधनाची आकांक्षा कशी करणार ? आपल्याला कण्या, भाकरी, भात इत्यादि जें कांहीं वेळीं प्राप्त झालें असेल, तेंही तो याचना करणारास देतो. फार काय, पण त्याच दानाभ्यासाच्या योगानें तो याचकास आपलें मांसही देण्यास तयार होतो. धावणारांना गायींचें पाऊल जसें तुच्छ होतें, त्याप्रमाणें विवेकाच्या मार्गे लागलेल्या चित्तशून्य विरक्तांचें मौर्ख्य अगदीं लघु होतें. सारांश, रामभद्रा, प्रथम परार्थांविषयींची विरक्ति संपादन करून व तिचा अभ्यास करून नंतर विवेकानें स्वार्थाविषयींही विरक्त व्हावें. त्यानंतर भोगासह स्वार्थांचेंही निराकरण करून सर्वोत्तम विश्रांति संपादन करावी. यावज्जीव द्रव्योपार्जन करण्यांत जितकें दुःख आहे, तितकें या जगांतील कोट्यवधि नरकादिकांतही नाहीं. मूढांना व नास्तिकांना पारलौकिक दुःखाचें जरी स्मरण नसलें, तरी बसतां, निजतां, येतां, जातां, क्रीडा करतां, त्यांना असह्य द्रव्य-चिंता अवश्य करावी लागते. पण रामा, खरोखर ज्यांच्याविषयीं विपरीत भावना केली आहे, असे अर्थ अनर्थांनीं भरलेले, संपत्ति विपत्तींनीं व्यापलेली, व भोग संसाररोग आहेत. विषयांची इच्छा करी-

पर्यंत मनुष्य तापत्रयानें पीडित होत नाहीं. ज्या पुरुषाला मोक्षाख्य अत्युत्तम सुख रुचतें, तो धनाला जगद्रूपी तृणाच्या अग्राप्रमाणें लेखितो. अर्थात धनेच्छा-त्याग हाच मोक्षाचा मुख्य उपाय आहे. एक द्रव्य हा अनर्थांचा संघ आहे. या जगातील जरा-मरणशाली प्राण्यांना अजर व अमर करणारें संतोष हेंच उत्तम रसायण आहे. वसंत-ऋतु, नंदन-उद्यान, चंद्र, अप्सरा, इत्यादि एकीकडे व संतोषामृत दुसरीकडे घालून तोलल्यास हें अमृतच अधिक भारी ठरतें. वर्षाकालांतील सरोवराप्रमाणें साधूचें हृदय संतोषानें परिपूर्ण असतें. गंभीर, शीतल, हृदयंगम, प्रसन्न व रसशालिनी ओजस्वितेस प्राप्त होऊन तो महात्मा संतोषानें विराजमान होतो. पण दीनप्रकृति बंधनार्थी पुरुष एका दुःखाहून दुसऱ्या दुःखास प्राप्त होतो. त्याला स्थिर स्थिति मिळत नाहीं. संपत्ति, प्रमदा इत्यादि सर्व मोठाल्या तरंगाप्रमाणें भंगुर आहेत. शहाणा, नागाच्या फणाच्या छायेप्रमाणें, त्याच्या ठिकाणीं आसक्त होत नाहीं. द्रव्याचें संपादन व रक्षण करण्यात किती क्लेश आहेत, हे जाणणाराही जो पुरुष त्याची स्पृहा करतो; त्या मूढाला स्पर्शही करूं नये. जो विरक्तिरूपी कोयतीनें मनाचें बाह्य व आतर कर्म-तृण एकाच वेळीं कापतो, त्याचें क्षेत्र प्रकाशित होतें. जगत् हा अज्ञाचा विषय आहे. पण ज्ञानी त्याला असत् जाणूनही त्याचें ज्ञान परिपक्व झालेलें नसल्यामुळें तें सत् असल्याप्रमाणें पाहतो, व अज्ञाप्रमाणेंच त्याच्याशीं व्यवहार करतो. कारण वर सांगितलेले वैराग्यान्त गुण त्याच्या ठिकाणीं अनभ्यासामुळें आरूढ झालेले नसतात. यास्तव रामा, पुरुष प्रथम संसाराविषयींच्या विरक्तीस प्राप्त होऊन आणि तिच्या प्रेरणेनें सत्समागम व शास्त्राभ्यास यास संपादन करून शास्त्रार्थाच्या दृढभावनेनें सर्व भोगाचें निरसन केल्यावर दृढ वैराग्यामुळें स्वात्मतत्त्वास भूमिकापरिपाक-क्रमानें प्राप्त होतो ४७.

**सर्ग ४८**—पर वैराग्य चांगलें रूढ झालें असतां व ज्ञान स्थिरास्थित झालें असतां पुरुषांची स्थिति ज्या लक्षणांनीं युक्त होते, त्यांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, संसार-वैराग्य रूढ होऊन साधुसमागम स्थित झाला असता, स्वबुद्धीनें शास्त्रार्थाची भावना केली असता, भोगांविषयींची निराशा दृढ झाली असतां, विषयविरक्ति दृढ होऊन सज्जनत्वाचा उदय

झाला असता, आणि चित्त उदयोन्मुख होऊन प्रकाशयुक्त झालें असतां, विवेकी पुरुष धनाची इच्छा करीनासा होतो. तो जवळ असलेलेंही धन सुकलेल्या उष्ट्या पानाप्रमाणें घरातून काढून टाकतो. ज्याप्रमाणें वाटसरूला उपयुक्त असलेलींही भांडीं वाहून नेण्याच्या अशक्ततेमुळें भार वाटतात, त्याप्रमाणें विरक्त संसारी पुरुषाला संसारात अत्यंत उपयुक्त असलेले स्त्री-पुत्रादि बांधव भारभूत होतात. पण तो त्यांना एकाएकीं सोडून जात नाहीं; तर हळू हळू योग्य समयीं त्यातील एकेकाचा त्याग करतो. त्याचें चित्त शांत झालेलें असल्यामुळें, पुनःपुनः इंद्रियाशीं संलग्न झालेलेही भोग त्यास भासत नाहींत. कारण मनाचा अस्त झाल्यामुळें त्याला त्याचा अनुभवच येणें शक्य नसतें. विरक्त व शांतचित्त पुरुष दूरदूरचे एकान्त प्रदेश, सरोवराचे काठ, शून्य अरण्यें, उद्यानें, पुण्यप्रदेश, अथवा स्वतःचें गृह, मित्राशीं क्रिडा, विलास, शुभ शय्या, शास्त्रतर्क-विचार, इत्यादिकातील कोठेंही स्थिर आस्था ठेवून रहात नाहीं. तो शान्त, दान्त, व स्वात्माराम मुनि आपल्या चित्तानें देह, इंद्रिये, बुद्धि इत्यादिकाच्या साक्षात् द्रष्ट्याला शोधतो. त्याहून दुसऱ्या कशाचाही शोध करीत नाहीं. तात्पर्य; याप्रमाणें विवेकी अभ्यासवशात् परम पदीं विश्रांति घेतो. तें पद कसें आहे व मुनींची विश्रांति कशाप्रकारच्या निश्चयानें युक्त असते, म्हणून विचारशील तर तेंही सांगतों.–कोणताही बाह्य अथवा आंतर विषय संभवत नाहीं, अशा निश्चयानें शोभणारी ज्ञता ( अंत्यसाक्षात्कारवृत्ति ) च, जळणास जाळून सोडलेल्या अग्नीप्रमाणें चिदात्म्यामध्यें शांत होते तेंच, परम पद होय. बोधरूपतेवांचून विषयोपलब्धि होत नाहीं व ज्याच्या योगानें विषयानुभव होतो तें शून्यही नव्हे. याप्रमाणे स्वानुभवामध्यें सर्व बाधाची अवधि, या रूपानें जे स्थित असतें तेंच परम पद होय. सर्व पदार्थ एक बोधरूपानेंच अनुभवास येत असतात व बोध्यपदार्थांचा बाध झाला तरी त्यांच्या बाधाचा साक्षिबोध अवशिष्ट रहात असल्यामुळें, तो बोधरूप आहे व शून्यही नव्हे, असें म्हणतां येणें शक्य आहे. केवल आत्मसंवित्-मध्यें विश्राम पावणाऱ्या चित्तरहित संतांस विषय मुळींच आवडत नाहींत. ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें खरोखर पाहतां ज्ञानादि, शून्यादि, अहंत्व, जगत् इत्यादि कांहीं नाहीं. अमलपदीं स्थित

असलेल्या ज्ञानी पुरुषाकडून अंतःकरणांतील तम घालविलें जातें. ज्याचा सर्वांश रजोरहित आहे व जें सत्त्वाच्या पार गेलेलें आहे, त्या नृभास्कराच्या स्वरूपास नमस्कार करावा. सर्व भेददृष्टीचा विलय होऊन चित्त अदृश्य झालें असतां ज्ञानी पुरुषाची जी स्थिति ती वाणीलाही गोचर होत नाहीं. हे महामतिमन्, त्या पुरुषाच्या दीर्घकाल अहर्निश केलेल्या भक्तीनें प्रसन्न झालेला परमेश्वर त्याला निर्वाण देतो.

**श्रीराम**—अहो मुनिश्रेष्ठ, ईश्वर कोण? तो भक्तीनें कसा प्रसन्न केला जातो? हें मला तत्त्वतः सांगा. कारण आपण तत्त्ववेत्त्यातील श्रेष्ठ अहां.

**श्रीवसिष्ठ**—हे महाबुद्धे, ईश्वर दूर नाहीं. तो अतिशय दुर्लभही नाहीं. तो परमेश्वर महाबोधमय, एकरूप व स्वात्माच आहे. तोच सर्व आहे. हें सर्व त्याच्यापासूनच झालेलें असून सर्व त्याच्याकरिताच आहे. तो सर्वांच्या आंत असून सर्वमय आहे. त्या सर्वात्म्याला नित्य नमस्कार असो. या सर्व उत्पत्ति-प्रलय-विक्रिया त्याच्यापासूनच होतात. तो वस्तुतः अकारण असून आपल्या ऐश्वर्यशक्तीनें सर्वांचें कारण होतो. सर्व चराचर भूतजाति आपापल्या इष्ट वस्तूंच्या दानानें नित्य त्याची पूजा करितात. अनेक जन्म जेव्हा याची उत्तम पूजा करावी, तेव्हा तो सर्वेश्वर प्रसन्न होतो. सुकर्मांनीं प्रसन्न झालेला तो महादेव ( स्वतः आत्मा महेश्वर ) तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याकरिता आपल्या शुद्ध दूतास धाडतो.

**श्रीराम**—भगवन्, आत्मरूप परमेश्वर कोणत्या दूतास प्रेरणा करतो व तो दूत बोध कसा करतो?

**श्रीवसिष्ठ**—आत्म्यानें ज्यास प्रेरणा केली आहे, असा विवेक नावाचा दूत हृदयात सदा आनंदानें निवास करतो. तो या वासनात्मक जंतूस क्रमानें बोध करतो. तो या संसारसागरातून अविवेक्यास तारतो. हा बोधात्मा अंतरात्माच परम परमेश्वर आहे, प्रणव हें याचेंच नाव आहे. मनुष्य, नाग, देव, असुर, इत्यादिकाकडून जप, होम, तप, दान, पाठ, यज्ञ, क्रिया इत्यादि क्रमानीं नित्य हाच प्रसन्न केला जातो. आकाश ही याची मूर्धा (मस्तक) आहे. पृथिवी पाय आहेत, नक्षत्रें रोमपंक्ति आहेत. सर्वभूतें हींच हाडे आहेत. व आकाश हेंच या परमात्म्याचें हृदय आहे. हा चिदात्मा असल्यामुळें सर्वत्र जातो, जागतो व पहातो. त्यामुळें त्याला

प्रत्यक्ष कर्णादि अवयव नसले, तरी प्राण्यांच्या त्या त्या शक्तीवरून त्याचे हस्त-पादादि अवयव लक्षिलेले आहेत; यास्तव विवेकदूतास जागृत करून व चित्त-पिशाचास मारून जीवाला काहीं विलक्षण व अपरिच्छिन्न आत्म-पदवीस पोंचविलें जातें. यास्तव सर्व विकल्प—ओघ व अनर्थयुक्त विकार स्वपौरुषानें सोडून आत्मा आत्म्याकडूनच प्रसन्न केला जातो. मनः-पिशाचानें युक्त असलेल्या या संसाराख्य अधाऱ्या रात्रींत आत्मा हाच पूर्ण चंद्र आहे. तात्पर्य, स्वात्मा परमेश्वर जीवाच्या अनेक जन्मांतील निष्काम पूजनानें प्रसन्न होऊन पावन विवेकदूताला प्रेरणा करतो व सच्छास्त्र, सत्संग इत्यादिकाच्या योगानें उत्तम बोध करवून त्याला ( जीवाला ) स्वात्मपदास पोंचवितो. तें एक पद निर्मल व आद्य आहे ४८.

**सर्ग ४९**—ज्यांचा विवेक रूढ झाला आहे, त्यांचें महत्त्व कसें असतें व विश्व कसें असतें, तें सागतात.

**श्रीवसिष्ठ**—ज्यांचा विवेक चागला पुष्ट होऊन वासनामल नाहींसा झालेला असतो, त्याच्यामध्यें काहीं अपूर्व महत्ता उत्पन्न होते. त्याच्या अति उदार मतीस चतुर्दश भुवनाचें ऐश्वर्यही लोभयुक्त करण्यास समर्थ नसतें. सर्व जग ही चित्तभ्राति आहे, असा प्रत्यय रूढ झाला असतां संताच्या मनांतील मोहनक्र शांत होतो. कारण जगद्भ्राति स्फुरत असताना ( ही भ्रांतिच आहे, असा निश्चय असताना ) वासनोदय कसा होणार ? वासनाप्रत्यय नाहींसा झाला म्हणजे शून्य आकाशच राहतें. मनाचा अभाव असल्यामुळें सातव्या भूमींत विवेक्यास प्राप्त झालेली ती वासना-रहित अवस्था कोणत्या कारणानें त्याग करतां येणार ? जाग्रत् , स्वप्न व सुषुप्ति हें अवस्थात्रय तर सर्वांस माहीत आहे. पण त्याहून भिन्न असलेली चवथी अप्रसिद्ध अवस्था एका अभ्यासी आत्मज्ञालाच तेवढी ठाऊक असते. त्या अवस्थेंत दर्शनादि सर्व साधनांचा अभाव असला तरी आत्म्याच्या स्वप्रकाशामुळें तुर्यस्थाला स्वरूपभान होतें. तो महात्मा हें जग विचित्र रत्नाच्या किरण-समूहाप्रमाणें नानारूप व आभासमात्र आहे, असें पाहतो. त्यांतील भूतें, व इतर पदार्थ सत्य नाहींत. तर या ब्रह्मसंज्ञक श्रेष्ठ रत्नाचे किरण आहेत असें त्याला वाटतें. तेव्हा अशा त्या खोट्या जगांतील वस्तूंवर ज्ञान्याची आसक्ति कशी असणार ? पुढें

होणाऱ्या आकाशांतील वृक्षावर पक्षी आज विश्रांति कशी घेणार? जग पिंड-रूप नाहीं, शून्यही नाहीं, तें आसक्तीचा विषयच नसल्यामुळें चित्तही नाहीं, याप्रमाणें विवेकानें सर्वांचा अस्त झाल्यावर केवल सत् राहतें. व विद्यमानता हेंच त्याचें स्वरूप आहे. अशा स्वरूपास प्राप्त झालेला ज्ञानी जाग्रतींतही निजल्याप्रमाणें राहतो. त्याचें अहंपण व विश्व यासह चित्त लीन होतें. केवल उत्तम व अधम दर्शनानीं बुद्धि क्लिष्ट होते. उत्तम युक्तीचा थोडासा अभ्यास केल्यानेंही सत्य अर्थ ज्ञात होतो. ज्याला स्थूल व सूक्ष्म कार्य-प्रपचाचें कारण व सद्रूप उपादान साक्षात् कळतें, तोच ज्ञानी होय. त्या अति-शांत अद्वैतरूपाला विश्व आहे, असें वाटतच नाहीं. पूर्वोक्त सर्व विशेष गुणाचा त्याला स्वरूपांतच अनुभव येतो. ज्याचें चेतन आंत आहे, अशा प्रत्यगात्म्याचें विषयोन्मुख होणें, हाच संसारबोध होय. तो अनर्थावह असून आत्म्याचा विषयोन्मुखत्वानें उदय न होणें हेंच श्रेयस्कर आहे. स्वप्नादिकांतील अर्थाप्रमाणें बोधच अबोधानें पिंडतेस धारण करतो व त्या पिंडग्राहकतेमुळें चित्त होऊन देहास बाधतो. पण त्याच्या सत्तेनें हा एवढा मोठा परिणाम होत असला, तरी बोधस्वरूपात कांहीं फरक पडत नाहीं. जगांतील चिज्जडभेद केवल शब्दकल्पित आहे. मनच विकार पावून आंतर् व बाह्य विषयरूप होतें; बोधात्मा नव्हे. तो प्रत्येक विषयाच्या अनुभवात जरी सदा स्थित असला तरी मन जसें क्षणोक्षणीं निरनिराळे अनेक आकार धारण करतें, त्या-प्रमाणें तो स्वरूपापासून च्युत होत नाहीं. चित् प्रमाणेंच जडही तत्त्व-बोधाने सुद्धां आंतर् चिदाकारानें विकार पावण्यास समर्थ नाहीं. कारण तें अत्यंत विलक्षण स्वरूपास कसें प्राप्त होणार? बोध विवर्तवशात् जड-रूप झाल्यासारखा वाटतो हे खरें. पण तो खरोखर जड होत नाहीं. तो जेव्हा जडाकार भासतो, तेव्हाही अन्य रूपत्वास प्राप्त होत नाहीं. अत्यंत शुद्ध बोधैक-परिणामाचा उदय झाला असतां बोधाबोधार्थ भ्रांतिही अस्त पावते. मनोभावनेनेंच दृश्य दृढ होतें व मनाच्या विरक्तीनेंच तें शिथिल होत जातें. नट जसे रंगभूमीवर कल्पित पिशाचता दाखवितात, त्याप्रमाणें आतिवाहिक चित्तेंच या मिथ्या आधिभौतिकतेची भावना करि-तात. पण अभ्रमणाच्या अभ्यासानें चित्त स्थिर होतांच जगद्भ्रांति शांत

होते. भ्रांतीचें ज्ञान झालें कीं, वासना निवृत्त होते. कारण हें स्वप्न आहे, असें कळल्यावर त्याविषयीं भावना कोण करणार ? वासना क्षीण झाल्यानेंच संसार शांत होतो. भावनेनेंच जसा सूक्ष्म व स्थूल संसार प्रवृत्त झाला आहे, तसा तो सत्य भावनेनेंच लुप्त होणार, हें उघड आहे. यास्तव आत्मतत्त्वाची भावना करावी. विवेकानें पदार्थ-शोधन करावें; चित्त सबाह्याभ्यंतर शांत झालें असतां स्वभावतां भासते. तिचाच आश्रय करून शांत व्हावें. ज्ञानवान् ज्ञान-यज्ञाची दीक्षा घेऊन ध्यानरूप यूप रोंवतो, व सर्वत्यागरूप मुख्य दक्षिणा देऊन जगाला जिंकून सर्वोत्कर्ष पावतो. त्यानंतर अग्नीचा वर्षाव. प्रलयवायूचा प्रवाह व भूतलाचें अधोगमन जरी सुरू झालें, तरी तो आपल्या शांत स्वरूपांत असतो; त्याचें मन वितृष्णेमुळें शांत असतें. निरुद्धाकार होऊन राहतें. पण ही स्थिति वज्रासारख्या दृढ समाधानावांचून प्राप्त होत नाहीं. बाह्यार्थाविषयींच्या वैराग्यानें जसें मन अगदीं शांत होतें, तसें तें शास्त्र-संदर्भ, उपदेश, तप, दम इत्यादिकांनीं होत नाहीं. सारांश, पौरुष-बल संपादन करून, तंद्रा सोडून, वासनासमूहाचा नाश करून, आत्म बलानें संसार-पाशांनीं दृढ झालेल्या या देह-पिंजऱ्यास तोडून सुज्ञानें ज्ञानी व्हावें ४९.

**सर्ग ५०**—वासनादार्ढ्य व शैथिल्य यांच्या योगानें होणाऱ्या सात अवस्था.

**श्रीवसिष्ठ**—या ब्रह्मांडांत हे जितके म्हणून जीव-संघात दिसत आहेत, यांतील कांहीं स्वप्न-जागर, कांहीं संकल्प-जागर, कांहीं केवल-जागर, कांहीं चिर-जाग्रत, कांहीं घन-जाग्रत, कांहीं जाग्रत्स्वप्न व कांहीं क्षीण-जागर अवस्थेंत असतात.

**श्रीराम**—भगवन्, या सात प्रकारच्या जीवांचे भेद कसे झाले आहेत, ते माझ्या बोधाकरितां सांगा.

**श्रीवसिष्ठ**—एकाद्या प्राक्तन कल्पांतील एकाद्या जगांत कांहीं जीव निजलेले असतात. देहानीं जिवंत असतांना जे कांहीं स्वप्न पहातात, त्यांना हें जग स्वप्न होतें. अशा पुरुषांनाच स्वप्न-जागर जीव म्हणतात. केव्हां तरी निजलेलें असतांना त्यांच्या मनांत आपोआप उठलेला जो स्वप्न-प्रपंच तोच समान कर्मवासनावशात् आमचा जेव्हां विषय होतो, तेव्हां आम्ही यांचे स्वप्न-नर होतों. याविषयीं पूर्वी लीलोपाख्यानांत पुष्कळ वर्णन

केलें आहे. त्यांचें दीर्घ स्वप्नच जाग्रदावस्थेस प्राप्त हात. म्हणून त्यांना स्वप्न-जागरक म्हणतात. ते त्या अवस्थेंत असतात. आता आम्हीं त्याचे स्वप्न-नर कसे, म्हणून जर विचारशील तर तेंही सागतों.—आत्मा सर्वज्ञ व सर्वग असल्यामुळें सर्व सर्वत्र असतें. त्यामुळें आम्हीं त्या स्वप्नरानांचे स्वप्न-नर होऊन राहतों.

**श्रीराम—**पण त्याची देशसंबंधी सर्व स्थिति जरी असली तरी अतीतकल्पात वर्तमान वस्तूंची स्थिति संभवत नसल्यामुळें, कालिक सर्व स्थिति संभवत नाहीं.

**श्रीवसिष्ठ—**रामा, ईश्वराच्या या मायिक प्रपंचात असले अनेक चमत्कार घडत असतात. यास्तव त्याच्याविषयीं अधिक विचार करणें जरी व्यर्थ असलें, तरी मी थोडक्यात त्याचें समाधान सागतों.—त्या जीवाना जर आमच्या प्रपंचरूप स्वस्वप्नात दैवयोगानें तत्त्वज्ञान झालें, तर ते मुक्तच होत असल्यामुळें प्रस्तुत दोष येत नाहीं. पण मोक्ष न मिळाल्यास तो अतीत कल्प त्याच्या कल्पाचा शेपच होत नाहीं. यास्तव ते पुनः उद्भवतात. शिवाय कल्पित कालामध्यें जरी भेद पडला तरी कालवान् आत्म्यामध्यें तो कधींच नसतो. एक कल्प संपला तरी ते आपल्या संकल्पाप्रमाणें दुसरे देह घेऊन दुसऱ्या कल्पात उठतात. संकल्पामुळें होणाऱ्या आकाशात संकल्पमय कल्पाची गर्दी मुळींच होत नाहीं. सारांश, याप्रमाणें केवळ संकल्पात्मक जगत्संज्ञक जीर्ण उदुबरातील कीटच हे स्वप्न-जागरक आहेत. आता संकल्प-जागर कोण ते ऐक. मागच्या एकाद्या कल्पामध्यें एकाद्या जगात काहीं जीव निद्रित नसताना म्हणजे जागेपणींच संकल्पपरायण होऊन राहतात अथवा ध्यान करिता करितां त्यापासून भ्रंश पावून मनोराज्य करूं लागतात. त्याविषयींचे त्यांचे संकल्पच दृढ होतात. ते पूर्व अवस्थाचें अनुसंधान करितात. दीर्घ चिंतनानें त्याचा संकल्पच जाग्रत्-रूप होतो. त्यात त्याच्या चंचल चेष्टा चालतात. म्हणून ते संकल्प-जागर पुरुष होत. त्या संकल्पाचा उपशम झाला असता ते पुनः त्याच अथवा दुसऱ्या व्यवहाराचा आश्रय करितात. त्यांच्याच दृष्टीनें आम्ही संकल्प पुरुष आहों. कारण आम्हीही त्याच्याच सारख्या संकल्पामुळें उत्पन्न झालों आहों. याप्रमाणें हे संकल्प-जागर

जीव होत. आतां केवल—जागर जीव ऐक. सृष्टीविषयींच्या संकल्पानें विकसित स्वरूप झालेल्या ब्रह्मदेवाच्या संकल्पापासून या कल्पात प्रथम झालेल्या जीवांस केवल-जागर म्हणतात. उत्तरोत्तर जन्म-परंपरेमध्यें पडलेले व जाग्रत् स्वप्नांच्या कारणभूत सुषुप्तींत संचार करणारे जे जीव त्यांना चिर-जागर म्हणतात. दुष्कर्मांच्या आवेशानें जड स्थावर-तेस प्राप्त होऊन जाग्रत्-दशेमध्यें अज्ञानांधकारात पडणारे तेच जीव घन-जागर होत सच्छास्त्र व सत्संग याच्या योगानें ज्यांना बोध झाला आहे, असे ज्ञानमान् जाग्रदवस्थेस स्वप्नाप्रमाणें पहातात. ते जाग्रत्स्वप्न होत. जे बोधास प्राप्त होऊन परमपदीं विश्रांति घेत असतात आणि ज्यांच्या जाग्रत्-प्रभृति अवस्था क्षीण झालेल्या असतात, ते तुर्यभूमिकेस प्राप्त होतात. असा हा जीवाचा सात प्रकारचा भेद आहे. त्यांतील पहिले पाच प्रकारचे जीव बद्ध होत. रामा, या जीवभेदांचें चांगलें ज्ञान करून घेऊन तूं कल्याणपरायण हो. तूं जगाची द्वैतादिरूप गणनाभ्रांति सोड. कारण तूं पूर्ण बोधैकरूप घनतेस प्राप्त झाला आहेस. तूं शून्या-शून्यरहित व द्वैतैक्यरहित आद्य तत्त्व आहेस ९०.

**सर्ग ९१**—जगत् ब्रह्मदृष्ट्या उत्पन्न न झालेलें, आत्मदृष्ट्या मिथ्या उत्पन्न झालेलें व आत्मज्ञानानें अमूर्त कसें, त्याचें वर्णन.

**श्रीराम**—मुनिवर्य, आकाशापासून उत्पन्न होणाऱ्या वृक्षाप्रमाणें पर-ब्रह्मापासून कांहीं कारण नसतानाच व्यर्थ केवल-जाग्रत् कशी उद्भवली ?

**श्रीवसिष्ठ**—हे महामतिमन्,-कोणतेंही कार्य कारणावाचून होत नाहीं, असा नियम आहे. त्यामुळें या जगात केवल—जाग्रत्-नें युक्त असलेल्या जीवाचा संभव नाहीं. त्यांचा असंभव असल्यामुळें कोणतेच जीवभेद संभवत नाहींत. कारण, कारणाचा अभाव या एका निमित्तानें त्याचें निरसन केलें आहे. या सृष्टींत कांहीं उत्पन्न होत नाहीं व कांहीं नष्ट होत नाहीं. तर उत्पत्ति, प्रलय, इत्यादि हा सर्व शब्दार्थप्रपंच उपदेशास पात्र असलेल्या शिष्याच्या उपदेशाकरितां कल्पिलेला आहे.

**श्रीराम**—भगवन्, असें जरी आहे, तरी देहादिकाचा निर्माता अवश्य कोणी तरी असला पाहिजे. तो कोण ? त्याचप्रमाणें मन, बुद्धि, स्नेह, राग इत्यादि चेतनधर्मांनीं जीवाला मोहित कोण करतो ?

श्रीवासिष्ठ—शरीरें कोणी कधीं करीत नाहीं. व कोणी केव्हांही ूताना मोहित करीत नाहीं. स्वरूपांत स्थित असलेला आद्यन्तरहित ोधात्माच जलतरंगन्यायानें नाना पदार्थाकार होतो. खरोखर पाहतां ाह्य कांहीं नाहीं. बोध बाह्यपदार्थासारखा स्फुरण पावतो. बीजांतून ासा वृक्ष तसा बोधाशयांतून पदार्थभास निघतो. हे रघूद्वहा, बोधाच्या ात हें विश्व स्थित आहे. चित् वस्तुतः आतर् व बाह्य नाहीं, तर अनंत ाहे. पुष्पातील सुवासाप्रमाणें तिच्या आत हें सर्व विश्व स्थित आहे. सर्व जगत्कल्पना जर आत्म्यामध्येंच आहे, तर ब्रह्मलोकादि परलोक ्र कसा आहे?' म्हणून विचारशील तर त्याचेंही कारण सांगतों.— ाशाप्रकारच्या अनादिवासनाप्रवाहामुळेंच देवयानमार्गगमनानें प्राप्त ाणाऱ्या दूरदूरच्या लोकाची भावना होते. पण वासनाक्षय झाला ासता सर्व लोक आत्ममात्र होत असल्याकारणानें ते अत्यंत समीपच ाहेत, असा निश्चय होतो. देश काल, क्रिया, लोक इत्यादि सर्व प्रत्य- ात्माच आहे. यास्तव देशकालादिकांचा जरी बाध झाला, तरी शून्य अव- ाेष्ट रहात नाहीं. तर आत्मा अवशिष्ट राहतो. तथापि त्या पदास जाणणा- ाचीच त्याच्या ठिकाणीं गति होते. ज्याची दृश्य दृष्टि शांत झालेली असते, ांनाच आत्मबोध होतो. दुसऱ्या कोणाला नाहीं. जे तरल व गंभीर अहं- ागर्तेचा आश्रय करून रहातात, ते त्या प्रकाशास कधींही पहात नाहींत. ावदा भुवनात सूक्ष्म कीटाप्रमाणें घुमघुमत राहणाऱ्या चराचर प्राण्यास ज्ञानी ापल्या शरीरावयवाप्रमाणें समजतो. कारणाचा अभाव असल्यामुळें सृष्टि ात्पन्न झालेली नाहीं व ती शांतही होणार नाहीं. कारण जसें असतें तसें ार्य होतें. पण कारणांतच जर कार्य स्थित असलें, तर त्याची कारणता ासली? जेव्हां कार्याचाच प्रत्यय येतो, तेव्हां कारणाकडे दृष्टि जात ाहीं. व कारणाचा प्रत्यय आल्यास कार्याला सत्यत्व रहात नाहीं. उदाह- णार्थ आपण सोन्याचें कुंडल घेऊं या. तें सोन्यामध्येच सदा राहतें, हणून सोनें हें त्याचें उपादानकारण आहे. पण आपण तें कुंडल ाहे, अशा कार्यदृष्ट्या पाहिल्यास आपल्याला त्यावेळीं सोन्याचें विस्मरण ाोतें. व हे सोनें आहे, अशा कारणदृष्ट्या पाहिल्यास केवल आकाररूप कुंडल असत् ठरतें. कारण आकारभेद नुस्ता शाब्दिक असतो. कारण

व कार्य हीं दोन्ही जर सत् असतीं, तर एकाच वेळीं दोन्हींचा अनुभव आला असतां. पण तसें होत नाहीं; कारणाचाच त्रिकालीं प्रत्यय येतो. आकाररूप कार्याकडेच मनोवृत्ति लागून कारणाचें जेव्हां विस्मरण होतें, तेव्हांही कारणाचें भान अगदीं नाहींसें होत नाहीं. आकाराची स्थिति तशी नसते. उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतर तो प्रतीत होत नाहीं. यास्तव कांहीं काल भासणारा आकार (कार्य) असत् आहे. याच न्यायानें त्रिकालाबाधित ब्रह्म सत्य असून जगदादि सर्व मिथ्या आहे. स्वप्नकालीं स्वप्नच भासतें, जाग्रत् नाहीं. तसेंच जाग्रत्समयीं जाग्रत्चें मात्र भान होतें, स्वप्नाचें नाहीं. पण त्या दोन्ही अवस्थांचा साक्षी एकच आहे. तो सुषुप्तीचाही अनुभव घेतो. यास्तव त्रिकालीं असणारा तो सत्य असून त्या त्या कालीं भासणारे अवस्थाभेद मिथ्या आहेत. अवस्था चित्तमात्र आहेत. या असत्या तत्त्वज्ञानानें भूतें देहतेसह स्वका-रणाचा त्याग करितात. सत्य ज्ञानानें अहंकारासह जगत् शांत होतें. बोधानें दृश्यता गळून जाते. दीप्त अग्नींत टाकलेल्या–सुवर्ण, घृत, इंधन–इत्यादिकाप्रमाणें भुवन–चित्त–दृक् विज्ञानामध्यें एकतेस प्राप्त होते. बोधाच्या बलानें त्रिभुवनातील मूर्त आकार कृश होतो. अनंतरूप आत्मस्वरू-पात आत्माच जगत्, चित्त इत्यादि आकारानीं भासतो. बोधाचें अज्ञानच सृष्टिरूपानें स्थित आहे. पण बोधाचें भान होताच तें नाहींसें होतें. अर्थात् स्वप्नकालीं जाग्रत्च स्थूलता सोडून सूक्ष्म प्रपंचरूप होते व स्वप्न-भ्रांतिच दीर्घाभ्यासामुळें घनरूपानें जाग्रत् होते. विवेकी पुरुष त्या दोन्ही अवस्थांना मिथ्या जाणून त्याचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं. अहो, आत्मविश्रांति कोठें व हा तुच्छ विषयानुभव कोठें? पण अज्ञाना जर त्याचा कंटाळा आला तर जाग्रत् व गाढ निद्रा अथवा भ्रांत व अभ्रांत पुरुष यांचेंही ऐक्य होऊं लागेल! जगत् चित्तमात्र, भ्रांतिमात्र, व स्वप्नमात्र रूप आहे, असें कळलें असता पदार्थां-विषयींची सत्यबुद्धि निवृत्त होते. कारण हे महामते, असत्य वस्तु कोणाला आवडणार? सर्व दृश्य स्वप्नतुल्य आहे, असें कळलें असता ज्ञानी नीरस, शांत, मननशून्य, अहंकाररहित, वीतराग व आयासरहित होऊन रहातो. विषयरस निवृत्त झाला असता वासना क्षीण होते. ज्ञानाचा प्रकाश आकाश-

भर पसरला असतां पूर्वी भ्रांतिरूपानें भासणारें जगत् प्रकाशमय होतें. सौम्यस्वभाव ज्ञानी एक समाधानवान् होतो. तो आसंगशून्य असतो. तो असत् असल्याप्रमाणेंच होऊन राहतो. मनाचा अस्त झाल्यामुळें तो मौनी व निरोधपदवीस प्राप्त होत्साता संसारसागरांतून पार जातो. त्याच्या कर्मांचा अंत होतो. सर्व भुवनाचें कारण असें हें अज्ञान गळलें असता विद्यमान असलेलेंही हें सर्व गळल्यासारखें होतें. ज्याचें अंतःकरण शांत झालें आहे, ज्याचा विकल्प गळला आहे, जो स्वरूपसारमय आहे, व जो परम शमामृतानें तृप्त आहे, तो विद्वान् अज्ञानावरणरहित होऊन राहतो ५१.

**सर्ग ५२**—कूटस्थाचा अनिर्वाच्य जगद्भाव.

**श्रीराम**—मुने, बोध ज्या क्रमानें जगाप्रमाणें भासतो, तो क्रम मला पुनरपि भेदनिवृत्तीकरिता सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, मूळ, खोड, शाखा, पानें, पल्लव इत्यादि नानाकारांनीं युक्त असलेल्या वृक्षाप्रमाणें अज्ञात आत्म्याचें जें नानाकार जगद्रूप तें दृष्टि असली तरच असतें. तस्मात् जगाची सत्ता चित्-दृष्टीच्या अनुरोधानेंच व्यवस्थित आहे. शुभ पुरुष पूर्वापरयुक्त शास्त्रार्थच मात्र पहातो. नेत्रापुढें असलेलाही निषिद्ध पदार्थ भोग्यरूपानें पहात नाहीं. तो जें पाहतो तें करतो. यास्तव तूं चित्तशुद्धीस अनुकूल असलेल्या कर्मांचें अनुष्ठान करीत केवळ शास्त्रार्थैकाचित्त हो. मुनि हो. आणि हा ऐकण्यास अगदीं योग्य असलेला उपदेश ऐक. दृश्य खरोखर अविद्या आहे. तें वस्तुतः नाहीं. पण शिष्याला उपदेश करितां यावा म्हणून एक क्षणभर तें सत्य आहे, असें समजून मी काय सांगतों ते ऐक. म्हणजे ही सृष्टि कोणापासून कशी झाली? इत्यादि विकल्प न करिता तूं स्वतःच ती वास्तविक नाहीं, हें जाणशील. हें जेवढें म्हणून स्थावर-जंगमात्मक जगत् दिसत आहे, तें सर्व कल्पांतीं नष्ट होईल. कारण विचार करूं लागलें म्हणजे भरलेल्या घागरींतील एक एक थेंब पाणी निराळें करूं लागलें असतां शेवटीं एकदा तें जसें क्षीण होतें, त्याप्रमाणें भू, भुवर् इत्यादि विभागांनीं युक्त असलेल्या या जगाचा अवयवविश्लेषद्वारा नाश होणें अगदीं सयुक्तिक आहे. याप्रमाणें जगाचा नाश झाला असतां शाखादि अवयवांचा नाश होताच वृक्षाच्या नाशा-

प्रमाणें ब्रह्माचाही नाश होण्याचा प्रसंग येतो; आणि त्यामुळें त्याचें श्रुतिप्रोक्त अनंतत्त्व सिद्ध होत नाहीं. त्याचप्रमाणें अवयवशः पृथक् केलेल्या अवयवीविषयीं विचार केला असता त्याचें असत्त्व सिद्ध होतें पण चिदेकरस व निरवयव ब्रह्म मूर्त—अमूर्त जगदवयववान् कसें असूं शकेल?

श्रीराम—प्रभो, जड जगत् हेच चिदात्म्याचे अवयव आहेत, असे जरी सिद्ध न झालें तरी चार्वाकाच्या मताप्रमाणें—मदिरेच्या अवयवांत असलेली मदशक्ति जशी मद्यात व्यक्त होते, त्याप्रमाणें-चैतन्यही शरीराकार परिणाम पावलेल्या जड भूम्यादि भूताचीच शक्ति आहे. मदशक्ति हा जसा मदिरेचा धर्म, त्याप्रमाणें चैतन्य हा शरीराकार भूताचा धर्म आहे, असें म्हणण्यास काय हरकत आहे?'

श्रीवसिष्ठ—मदशक्तीप्रमाण ज्ञान ही जडभूताची शक्ति आहे, हा चार्वाकाचा सिद्धान्त आम्हा आस्तिकाना मान्य होण्यासारखा नाहीं. कारण आम्हा वेदप्रमाणवाद्याना देहाची सिद्धि विज्ञानाच्या अधीन असल्याचा प्रत्यक्ष अनुभव येत असल्यामुळें स्वप्नांतील देहाप्रमाणें जाग्रत्-देहही तात्त्विक नव्हे, असें निःसंशय वाटतें. देहसत्ता सिद्ध करणारें विज्ञानावाचून दुसरें काहींही नाहीं. देहाचीच जर सिद्धि झालेली नाहीं, तर मदशक्तीप्रमाणें त्यात चैतन्य कसें उत्पन्न होणार? शिवाय जग ब्रह्माहून भिन्न नाहीं, असें म्हटल्यास दृश्यनाशानें ब्रह्माचाही नाश होईल, अशी शंका येणें साहजिक आहे. पण जगद्ब्रह्माचा अभेदही त्याच्या भेदाप्रमाणेंच व भेदामुळेंच आध्यासिक आहे. (आध्यासिक ह्मणजे आरोपित.) त्यामुळें जगाचा जरी नाश झाला तरी त्याचा ब्रह्माशीं काहींच संबंध नसल्यामुळें ब्रह्माचा नाश होत नाहीं. व शास्त्रही सफल होतें. कारण बंध जर सत्य मानला, तर शास्त्रादि कोणताही उपाय त्याला बाधित करण्यास समर्थ होणार नाहीं व मोक्षाचा असंभव होईल. पण सृष्टि सत्य आहे, असें कोणालाही सिद्ध करता येत नाहीं. तिच्या स्वरूपांत प्रतिक्षणीं बदल होतो. ती कशी होते, आह्मांला तिचा अनुभव कसा येतो, आमचें अनुसंधान सुटतांच ती नाहींशी कशी होते व त्या नष्टावस्थेंत आमचा व तिचा कोणता संबंध असतो, हें सृष्टि सत्य

आहे, असें ह्मणणारांस सांगता येत नाहीं, ह्मणूनच आह्मी तिला अनिर्वाच्य ह्मणतों. एकदा जी नष्ट झाली तीच पुनः उत्पन्न होते, असें ह्मणणें अगदीं अनुचित आहे. कारण आह्मीं वेदवेत्ते अनुभवाप्रमाणें मानणारे आहों. अनुभवाविरुद्ध कोणी बोलूं लागल्यास तें आह्मांला मुळींच सहन होत नाहीं. आता ती मूर्तताच प्रलयसमयीं अमूर्तभावानें होती, असें ह्मणावें तर तेंही युक्तिसिद्ध नाहीं. कारण मूर्तताच अमूर्तता कशी होते? बरें, तीं जरी अमूर्त झाली तरी पूर्वरूपच असते तिच्यामध्यें काहीं फरक पडत नाहीं, ह्मणून ह्मणावें तर प्रलयवादाचा भंग होणार! कारण प्रलयामध्यें तिचा नाश होत नाहीं व नाशावाचून प्रलयाची सिद्धि कशी होणार? अर्थात् कार्य व कारण याचीं जेव्हा एकरूपता आहे, तेव्हा कार्यकारणभावाचें ऐक्यच ठरत असून तोच आमचा सिद्धान्त आहे. जी वस्तु ज्ञानाचा विषय होऊन शून्य होते ती नष्टच होय. कारण ती ज्ञानसमयीं जरी भासली तरी असत् असते असा आमचा सिद्धान्त आहे. असत्त्वास प्राप्त होणें, हाच नाश आहे. पण ज्याना हा अशा प्रकारचा नाश इष्ट नसेल त्यानीं तो कशाप्रकारचा असतो, तें तरी आम्हाला सागावें. एकादी वस्तु काहीं काल उपलब्ध होते, एवढ्याच कारणावरून नष्ट होत नाहीं, असे म्हणता येणें शक्य नाहीं. कारण तसे म्हटल्यास मेलेल्या आईबापाचेंही स्वप्नात कधीं कधीं दर्शन होत असल्यामुळें तीं नष्टच झालीं नाहींत, असें म्हणावें लागणार. बरें—जें एकदा नष्ट झालेकें असतें, तेच पुनः उत्पन्न होतें. यास्तव मध्यें काहीं काळ नष्ट झालेल्याही वस्तूंचें अस्तित्व आम्ही कल्पितों—असें कोणी म्हणेल तर तेंही बरोबर नाहीं. कारण तेंच हें असें ओळखणार कोण? पुनः उत्पात्ति भिन्न वस्तूचीच होत नाहीं म्हणून कशावरून? तस्मात् हें दिसणारें सर्व अवश्य नष्ट होतें, व पुनः दुसरेंच प्रवृत्त होतें.

श्रीराम—प्रभो, ज्याप्रमाणें मूळापासून शेंड्यापर्यंत वृक्षाचा एकच आकार असून शाखा, ढोली, पानें, इत्यादि त्याच्या अवयवामध्यें कितीही जरी विचित्रता असली, तरी वृक्षाची एकता बाधित होत नाहीं; त्याप्रमाणें उत्पत्त्यादि विकारभेदांचा पुनःपुनः उद्भव व प्रलय होत असला तरीं भुवनादिकाची एकता असण्यास काय हरकत आहे?

**श्रीवसिष्ठ**—रामा, उंची, शाखा, पानें, फुलें, फळें इत्यादि वृक्षाच्य अवयवांमध्यें सर्वत्र व्यापून राहणारी एकच बीजसत्ता असून ती अखंड आहे, असें पाहिलें म्हणजे शाखादिकांची पृथक् सत्ता सिद्ध होत नाहीं. त्यामुळें बीज कारण व शाखादिमान् वृक्ष कार्य, हा भेद रहात नाहीं. त्याच न्यायानें प्रळय, सृष्टि, देश, काळ, क्रिया, इत्यादिरूप एक सन्मात्रच बीज आहे, असें समजल्यास पुरुष कांहीं करणार नाहीं. कारण पटाचें कार्य करण्यास असमर्थ असलेला घट पटकार्य करीत नाहीं, असें आपण पाहतों. शिवाय एकच वस्तु नाना विचित्र स्वभावाची असणें युक्त नव्हे. एकच परमार्थ वस्तु आहे, अशा सर्व एकदर्शन—सिद्धान्तांत कार्यभेद नाहीं. परमार्थमय वस्तुस्वभावामध्येंही नानात्व असणें शक्य नाहीं. यास्तव विचारपूर्वक सर्व दर्शनसिद्धान्त ठरविणाऱ्या वैदिकाच्या विरुद्ध बोलणाराशीं व्यर्थ विवाद करून तरी काय करावयाचें आहे? कारण आमचें हें सर्व दर्शन शांत, अनादिसिद्ध आकाशस्वरूप, चिन्मात्र व अनुभवसंज्ञक एकाच प्रमाणानें सिद्ध होणारें आहे. याचा अनुभव कसा येत नाहींसा होतो, पुनः त्याचा अनुभव कसा येतो, व सिद्धि कशी मिळते, तें मी तुला सांगतों ऐक:—

राघवा, महाकल्पान्ताचे वेळीं सर्व दृश्य-मण्डल नष्ट झालें असतां, महादेवापर्यंत मन, बुद्धि, कर्म, इत्यादि सर्व शांत झालें असता, आकाश, काळ, वायु, तेज, इत्यादि सर्वांचा क्षय झाला असता, सर्व शब्द व त्याचा अर्थ लुप्त झाला असता, एक शांत अनुभवात्मा राहतो. तो त्रिकालसत्य आहे. तो आदि—अंतरहित, सौम्य, अमळ, अव्यय, अवाच्य, अव्यक्त, अतींद्रिय, अनामक, सर्व भूतात्मक, व परपदरूप आहे. आकाश, वायु, इत्यादि भूतें हा तो आत्मा नव्हे. त्याचा अनुभव केवळ आत्मज्ञाला येतो. जगांतील काळादि एकही भाव तो महादेव नव्हे. संसार व संसारानुभव याच्या पार गेलेल्या कांहीं विद्वानास मात्र त्याचा अनुभव येतो. सर्व भाव त्याच्यामध्यें स्थित आहेत. पण त्या महा-आत्म्याच्या स्वरूपाकडे लक्ष दिल्यास ते त्याच्यामध्यें नाहींत, असेंही म्हणावें लागतें. कारण तें पद सर्व, सर्वात्मक व सर्वार्थरहितही आहे. हे महाबुद्धे, तुला अद्यापि अशा प्रकारचें उपशमात्मक यथार्थ ज्ञान झालेलें नाहीं. कारण तुला अद्यापि संशय येत आहे. पण जो

ज्ञानी आभासशून्य, व स्वच्छान्तःकरण असतो, तोच त्या पदास पाहतो. सोन्याच्या मोहरेमध्यें जसा पंधरा रुपयाचा कल्पित समूह असतो, त्याप्रमाणें त्या सत्–आत्म्यामध्यें मी, तूं, तो, इत्यादि प्रकारचा हा त्रिजगद्भ्रम राहतो. पण सोन्याच्या गोळ्याहून तांब्याचीं अनेक भांडीं जशीं पृथक् दिसतात, त्याप्रमाणें त्या परमार्थघनाहून जगत् पृथक् दिसत नाहीं. यास्तव दिसणारें हें सर्व त्याच्या ठिकाणीं मिथ्या आरोपदृष्टीनें असतें व सत्य अपवाद दृष्टीनें नसतें. स्थिर जलामध्यें जशा लाटा, मातीच्या गोळ्यांत जशी मातीचीं भांडीं, त्याप्रमाणें हें ब्रह्मामध्यें स्थित आहे. ह्मणून त्याला भिन्न-अभिन्न व भिन्नाभिन्न ह्मणवत नाहीं. त्या शांत तत्त्वामध्यें हें शांत जग तन्मय होऊन राहतें. सृष्टि ह्या त्या अक्षोभ्य सागरांतील लाटा, अथवा चिद्घनापासून निघालेल्या अमृतवृष्टि आहेत. या महातत्त्वाच्या प्रत्येक सूक्ष्म काल्पित अंशामध्यें संसारमंडळ भासतें. सारांश हे महापुरुषा, आकाश, काळ, वायु, इत्यादि सर्व पदार्थ त्या अंगरहित आत्म्याचीं अंगें असल्यामुळें वस्तुतः अंगरहित आहेत. त्याला आत्मवेत्ते सर्वात्मक व सर्वभावविकारशून्य ह्मणतात ५२.

सर्ग ५३—अध्यारोपित चेत्याचा भाव ब्रह्मच आहे.

**श्रीराम**—ज्याप्रमाणें चेत्यामध्यें चेतनता, कालामध्यें कालता, व आकाशामध्यें व्योमता, त्याप्रमाणें अजडामध्यें जडता राहते. जसें वायूमध्यें वायुत्व, भूतांमध्यें भूतत्व. मूर्तांमध्यें मूर्तत्व, अनंतामध्यें अनंतता, दृश्यामध्यें दृश्यत्व, व सर्गामध्यें सर्गत्व, तसें मला हें या सर्व वस्तूंचें असाधारण तत्त्व क्रमानें सांगा. कारण सुज्ञ अल्पज्ञाना पहिल्यापासून प्रतिपादन करून बोध करीत असतात.

**श्रीवसिष्ठ**—तें अनंत महाकाश महाचिद्घन या नावानें प्रसिद्ध आहे. तें अवेद्यचिद्रूपमय, शांत, एक व समस्थिति आहे. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर इत्यादिकांचा अंत होऊन महाप्रलय नावाचा शद्बार्थ रूढ झाला असता जें शुद्ध तत्त्व अवशिष्ट राहतें, तोच सर्व पदार्थांचा भाव आहे. आतां तोही आपल्या कारणांत लीन होत असेल, असें कोणाला वाटेल, पण तें बरोबर नाहीं. कारण त्या सत्–आत्म्याच्या जन्माचें कांहींच कारण उपपन्न होत नाहीं. कारण माया, मोह, भ्रम इत्यादि सर्वांची सिद्धि त्याच्याच योगानें

होत असते. तें केवळ, शांत, अतिस्वच्छ व आद्यन्तरहित आहे. त्याच्या अपेक्षेनें आकाशही स्थूल आहे. तें चिद्रूप असल्यामुळें ' नाहीं ' असें ह्मणता येण्यासारखें नाहीं. व अत्यंत शांत असल्याकारणानें ' आहे ' असेंही ह्मणता येण्यासारखें नाहीं. आत्म्याची ज्ञानशक्ति एका निमिषांत शेकडों योजनें निघून गेली असता मध्यें तिचें जें स्वरूप असतें, तें परमात्म्याचें स्वरूप होय. वासना-विषयभ्रम सबाह्याभ्यन्तर शांत झाला असता अर्धरात्रीं निद्राकालुष्य घालवून उठलेल्या व सर्व चिंता सोडून समाधीचा अभ्यास करीत बसणाऱ्या योगी पुरुषाचें जें सुख-दुःखरहित शांत स्वरूप तेंच त्याचें परम पद होय. मनाचें जें स्पंदरहित रूप तेंच त्या पदाचें रूप आहे. तृण, गुल्म, तरु, कांड, अंकुर, इत्यादिकांचा उद्भव झाला असता उद्भवणारें, ( त्याच्या संबंधानें व्यक्त होणारें ) जें विस्तृत सत्तासामान्य तेंच त्या परम पदाचें रूप आहे. त्या पदामध्यें हें जें सकारण, आकारानें धिप्पाड, व भेदयुक्त दृश्य जगद्रूप दिसत आहे, तें सर्व कारणाचा अभाव असल्यामुळें उत्पन्नच झालेलें नाहीं, व वस्तुतः नाहींच. जगत् आकारयुक्त नाहीं व द्वैतैक्ययुक्तही नाहीं. कारणरहित वस्तूची सत्ता या जगांत उपपन्न नाहीं. स्वयं नित्य अनुभवास येणाऱ्या वस्तूचा अपह्नव करण्यास कोण समर्थ आहे? अमूर्त, आदि अंतरहित व आकाशरूप ब्रह्म-साकार, सादि व दृश्य जगाचें कारण होऊं शकत नाहीं. यास्तव अशा ब्रह्माच्या ठिकाणीं जें जगद्रूप भासलेलें आहे तें ब्रह्मच तसें भासलें आहे, असें समजावें. अर्थात् ब्रह्मच सर्व वस्तूंचा भाव आहे.

राघवा, येणेंप्रमाणें जगाला चिद्ब्रह्मभाव आहे. यास्तव विचार करीपर्यंतच प्रतीत होणारा घट–पटादि आकार भ्रामक आहे, असें सिद्ध झालें असता सर्वत्र सर्व एकरूप होतें. ' नंतर पूर्णमिदम्०–हें पूर्ण आहे ' इत्यादि श्रुतीनें वर्णन केल्याप्रमाणें पूर्ण ब्रह्माचा साक्षात् अनुभव येतो. व तेंच एक, शांत, सम, उदयास्तरहित, आकारशून्य, अज, आकाशरूप, स्वच्छ व उत्तम बोधस्वरूप आहे ५३.

**सर्ग ५४**—सर्व स्वभावांत स्थित आहे क्रिया व भेद स्वाभाविक आहे. त्यामुळें अविकार अद्वैत सन्मात्र आहे.

श्रीवसिष्ठ—-सर्व जग एका शांत तत्त्वांत स्थित आहे. त्याचें बाह्य-

विक स्वरूप काय आहे हें ठरवितां येत नाहीं. एवढ्यासाठींच त्याचें कारण काय आहे, तें पुष्कळ विचार करूनही कळत नाहीं. जें योग्य कारणावाचून भासणारें तें भ्रमात्मकच असणार, हें उघड आहे. असत्य भ्रमाला सत्यता कोठची? कारणावांचून विद्यमान कार्य कसें होणार? अपुत्राच्या पुत्राचें दर्शन हा शुद्ध भ्रमच असणार, हें उघड आहे. जो कारणावांचून भासणारा तोच स्वभाव असून तो सर्वरूपानें संकल्प गंधर्वनगराप्रमाणें भासतो. बोधच पदार्थरूपानें भासतो. तो आकाशाहून अणु आहे. याला योग्य दृष्टान्त आतल्या आत अनुभविलेल्या स्वप्नांतील पर्वताचा आहे.

**श्रीराम**—भगवन्, वटबीजात जसा सूक्ष्म वृक्ष, त्याप्रमाणें बोधांत जडात्मक प्रपंच, असें का म्हणूं नये?

**श्रीवसिष्ठ**—तसें म्हटल्यास कोणता दोष येतो तें सांगतों. जेथें बीज असतें तेथेंच विस्तृत शाखा होते. ती सहकारी कारणामुळें होते. पण सर्व भूतांचा प्रलय झाल्यावर ज्याच्यापासून जग हा अंकुर उद्भवणार तें बीज कोणत्या आकारानें राहणार व त्याचें सहकारी कोण होणार? भ्रामक जगाचा नाश झाल्यावर शांत परब्रह्म राहतें. पण त्याच्या ठिकाणीं आकारादिकाची कल्पना करतां येत नाहीं. अहो, ज्याच्याशीं परमाणुत्वाचाही संबंध होत नाहीं, त्याच्यामध्यें बीजता कोठची? म्हणूनच जगाच्या कारणाचा असंभव आहे, असें आम्हीं पूर्वीं म्हटलें आहे. तेव्हां कारणावांचून जगत्सत्ता कोठें कशी होणार? जग अत्यंत सूक्ष्म परमाणूमध्यें असतें हें म्हणणेंही उचित नव्हे. कारण मोहरीच्या कणामध्यें मेरु राहतो, या म्हणण्याप्रमाणेंच ती मूर्ख कल्पना आहे. बीज असलें तर कार्यकारणदृष्टि प्रवृत्त होतात. जग निराकार आहे, असें म्हणावें तर त्याच्या बीजादिकांचा अगदींच असंभव होऊन शेवटीं ब्रह्मताच अवशिष्ट राहते. तस्मात् परब्रह्मच जग आहे. त्यातील एकही वस्तु उत्पन्न होत नाहीं व नष्ट होत नाहीं. सर्व आत्माच आहे. जग हा त्यात भासणारा भ्रम आहे. भ्रान्त पदार्थांचे उत्पत्ति—विनाशभाव सत्य नसतात. जगाचें अधिष्ठान ब्रह्म असून तें अबाधित व विकारशून्य आहे. सारांश याप्रमाणें सर्व जग चित्स्वभावमात्र आहे ५४.

सर्ग ५५—चित् आपल्यालाच अन्य भावनेनें अन्यरूप जग पाहते. व आत्म-भावनेनें अनन्य होते.

**श्रीवसिष्ठ**—जग व ब्रह्म याचा याप्रमाणें अत्यंत अभेद असल्यामुळें, जगाची अनुत्पत्तिच सिद्ध होते. त्याची उत्पत्ति होते असें म्हटल्यास बीज कोणतें तें अवश्य सांगितलें पाहिजे. पण तें कसें सांगतां येत नाहीं, तें आम्ही वारंवार दाखविलेंच आहे. एवढ्यासाठींच तत्त्ववेत्ता सर्व जग चित्स्वभावच आहे, अशी भावना करीत त्या भावानेंच राहतो. कारण आकाशात्मा चिद्धातु मनात ज्या भावाचा आस्वाद घेतो तोच बाहेर पाहतो. अज्ञ पुरुष आपल्या भावनेनेंच या अनंत अपार संसारसागरास प्राप्त होत असतो. यास्तव रामा, तूंही कांहीं एक उत्पन्न झालेलें नसून सर्व सम, शांत, ब्रह्म आहे, असें जाण. प्रथम सृष्टींतील हिरण्यगर्भसंज्ञक समष्टि-चित्चें जें स्वप्न तीच ही जाग्रत्-अवस्था आहे व प्रत्येक व्यष्टीच्या अंतःकरणांत निद्रासमयीं भासणारें जें स्वप्न ती स्वप्नावस्था होय; ज्याप्रमाणें पूर्वी प्रवृत्त झालेली नद्यांची तरंगपंक्ति दृष्टींना प्रत्यक्ष भासते, त्याप्रमाणें आदिसृष्टीच्या वेळीं केलेला संकल्पच महाप्रलयापर्यंत सर्व पदार्थांच्या स्वभावांची व्यवस्था करणारी नियति आहे. तिच्या अनुरोधानेंच आजवर सर्व पदार्थरचना जशीच्या तशीच रूढ झाली आहे. पण तरंगांची सत्ता जलाच्या सत्तेहून जशी पृथक् नाहीं, त्याप्रमाणें जगाचीही सत्ता चित्सत्तेहून पृथक् नाहीं. एवढ्यासाठींच ब्रह्माला जगाचें उपादान कारण म्हणतात. याप्रमाणें जगाची पृथक् सत्ता नाहींशी झाली म्हणजे मग जन्म व मरण यांना भिण्याचें कारण काय राहिलें ? उलट जन्म व मरण या दोन्ही प्रसंगीं सुखच होण्याचा फार संभव आहे. आतां कुकर्मामुळें भीति वाटेल म्हणून म्हणावें, तर ती जिवंत असतांना किंवा मेल्यावरही सारखीच आहे. कारण जसें सुख तसेंच ऐहिक किंवा पारलौकिक दुःखही ब्रह्मसुखसत्तारूप असतें. अशा उत्तम विचारानें मरण व जीवित याविषयीं ज्यांची वासना समान झालेली असते; दोन्ही ब्रह्म सुखरूप आहेत, असें ज्याला निश्चयानें वाटतें; आणि त्या कारणानें ज्याचें चित्त विश्रांति पावतें तो अंतःशीतळ होय. सर्व विषयज्ञानाचा निरास झाला असतां जशा प्रकारची संवित् उदय पावते, तन्मय तो होऊन राहतो. त्यामुळें तो मुक्त होय. याप्रमाणें दृश्याचा अत्यंत अभाव होऊन चित्त परसत्तामय झाल्यावर सृष्टि असली किंवा

नसली तरी सर्व ज्ञान निर्विषय होतें. चित्-चा विषय नसल्यामुळेंच त्याच्या अपेक्षेनें होणारी चित्क्रियाही होत नाहीं. सर्व सद्रूप होतें. त्यात देश, काल, क्रिया, द्रव्य, आकाश इत्यादि कांहीं पृथक् नसतें. हें सर्व साकारही अनाकार व असत् असूनही व्यर्थ भासतें. तें वस्तुतः अतिशुद्ध व एक चिन्मात्र आहे ५९.

**सर्ग ५६—सर्वत्र सर्व चित्-च आहे, हा निश्चय दृढ होण्याकरितां पाषाणाख्यायिका.**

**श्रीवसिष्ठ**—सर्वत्र चित् आहे. त्यामुळें सर्व पदार्थ चिन्मय आहेत. अ-चित् कोठेंही व काहींही नाहीं. स्वप्नांतील पर्वत, नगर इत्यादि पदार्थ जसे केवल चिन्मय, त्याप्रमाणें जाग्रतींतील सर्व पदार्थ चिन्मय आहेत. रामा, याविषयीं मींच पूर्वी पाहिलेलें हें विचित्र पाषाणाख्यान ऐक. मला सर्व ज्ञेय ज्ञात झालेलें असल्यामुळें माझे मानस तृप्त होतें. तथापि एकदा या भ्रामक लोकव्यवहारास सोडण्याच्या इच्छेनें मी ध्यानात मग्न झालों. कारण लोकव्यवहाराचा त्याग केल्यावाचून दीर्घ व दृढ विश्रांति मिळणें शक्य नव्हतें. मला त्यावेळीं एकान्तस्थानाची फार आवश्यकता भासली, आणि त्यामुळें हळू हळू शान्त होण्याकरिता देवालयात बसून मीं असें चिंतन केलें.—

हर हर ! या जगाच्या विविध गति पाहून मी अगदीं कंटाळलों आहें. ही लोकस्थिति सकृद्दर्शनीं जरी सुंदर दिसली, तरी खरोखर ती विरस आहे. ती केव्हाही, कोठेंही व कोणत्याही उपायानें मला सुखद वाटत नाहीं. कारण इष्ट व अनिष्ट फल देणाऱ्या या दृश्य-दृष्टिद्रष्ट्याच्या चित्तात उद्वेग उत्पन्न करितात. पण हें सर्व दिसणारें काय आहे ? प्राणी हें काय पहात असतो? अथवा मी कोण आहें? सर्व शांत अज आकाश आहे. तें चिन्मात्र आत्म्यामध्यें विवर्त पावलें आहे. यास्तव मी समस्त सिद्धेंद्र, देव, दैत्य इत्यादिकांस दुर्गम असलेल्या एका चांगल्या प्रदेशीं जाऊन अंतर्धानादि उपायांनीं स्वदेहाचें संरक्षण न करितां सर्व भूतांस अदृश्य होऊन निर्विकल्पसमाधीमध्यें स्थित होतों. बाह्य विषयाचें संवेदन न होईल अशा रीतीनें मी सम, शांत व स्वच्छ पदीं राहतो. पण अत्यंत शांत व निर्जन प्रदेश कोणता बरें आहे? जेथें या पांच बाह्य विषयांचें

ज्ञानच होणार नाहीं, असा तो प्रदेश असला पाहिजे. पर्वतशिखरें, गुहा, नदीतीर इत्यादि समाधियोग्य अनेक स्थानें सांगितलेलीं आहेत. पण पर्वत तर मला शत्रूसारखे प्रतिकूल भासतात. कारण ते चित्ताच्या विक्षेपास कारण होणाऱ्या शब्दप्रचुर अरण्यांनीं, जल, मेघ, सिंह-व्याघ्रादि हिंस्र प्राणी इत्यादिकांनीं स्वयंक्षुब्ध असतात व इतरांनाही क्षुब्ध करितात. पर्वताच्या खोऱ्यांत जाऊन रहावें, तर तेथें निर्दय किरात फार असतात. व बाकीचे सर्व प्रदेश विषयरूपी सर्पांच्या विषानें दूषित झालेले असतात. जलांनीं भरलल सागर, अनेक व्यापारांनीं क्षुब्ध झालेल्या नागरिकांनीं जशीं नगरें त्याप्रमाणें, अनेक जलचरांनीं व्याप्त झालेले असतात. नद्यांचें तीर, लोकपालाचीं नगरें व पाताल प्रदेश विविध भूतांनीं आकुल असतात. पर्वताच्या गुहादिकामध्यें सर्प, सिंह, इत्यादिकाचें साम्राज्य असतें. सरोवरांच्या काठावर जाऊन समाधीचा अभ्यास करीत बसेन म्हणून म्हटलें तर त्यांत, दर्प व भय यानीं व्याकुळ झालेले मासे आणि स्नानशील मुनि यांच्या क्रीडा, व स्नानप्रसंगीं होणारे आघात याच्या योगानें कमलें चंचल होतात व जलाचा खळखळ ध्वनि ऐकूं येतो; त्यामुळें चित्त स्थिर रहात नाहीं. यास्तव मला पंपा सरोवरासारखीं प्रख्यात सरोवरेंही विरस वाटतात. लहानशा झऱ्याच्या काठीं बसावें तर तेथेंही वाऱ्यानें उडणारी धूळ व पानें मला विक्षिप्त करितात. तस्मात् सर्व प्रकारच्या विक्षेपानीं शून्य असलेल्या आकाशाचाच मला आश्रय केला पाहिजे. मी आतां दूरच्या एकाद्या कोपऱ्यांत जाऊन व प्रशस्त योगयुक्तीचा आश्रय करून तेथें राहतों. त्यात एक वज्रासारखी दृढ कल्पित कुटी करून मी वासनारहित होऊन राहतों.

असें चिंतन करून मी तरवारीच्या पात्याप्रमाणें निर्मल असलेल्या आकाशांत गेलों. पण तेथेंही तें ( आकाश ) सहस्रावधि विक्षेपकारणांनीं भरलेलें आहे, असा मला अनुभव आला. कारण त्यांत कोठें सिद्धगण भ्रमण करीत होते. कोठें मेघ मोठी गर्जना करीत होते. कोठें विद्याधरांचा मोठा संघ जमला होता. कोठें यक्ष आपसांत युद्ध करीत होते. कोठें अप्सरा विलास करीत होत्या. कोठें मेघ वृष्टि करीत होते. कोठें उन्मत्त योगिनी आपल्या शीलाला साजेलसें कर्म-

करीत होत्या. कोठें दैत्यांचीं पुरें व गंधर्वांचीं नगरें उडत होतीं, कोठें नक्षत्रांनीं व्याप्त असलेलें तें आकाश ग्रहगतीनें मंडित झालें होतें. भूमीच्या जवळील अंतरीक्षांत उतरून तेथें पहावें, तों तें पक्ष्यांच्या नादांनीं नादित झालेलें असून भूलोकांतील वाद्यादिकांच्या नादांनींही गजबजलेलें आहे, असें वाटे. कोठें मोठा वारा त्याला व्याकुल करीत होता. सारांश अशा असंख्य विक्षेपहेतूंनीं तें भरलेलें होतें. पण मी सर्व भूतसंघांस सोडून अतिशय दूर गेलों. तेव्हां तेथें मला एक एकान्त शून्य प्रदेश आढळला. तो फारच विस्तृत असून तेथें वाराही मंद वहात होता. तेथें कोणताही प्राणी स्वप्नांतही दिसण्याचा संभव नव्हता. तें स्थान शुभ व अशुभ अशा दोन्ही प्रकारच्या चिह्नांनीं रहित होतें. खरोखर राघवा, तें संसाराला अगम्य होतें, असेंच तूं समज. मी तेथें आपल्या सत्यसंकल्पानें एक सुंदर कुटी बनविली. ती पूर्ण चंद्रासारखी आह्लाद जनक व अनेक दिव्य पुष्पवृक्षाच्या शोभेनें युक्त होती. तेथें आपल्या चित्तानेंच कोणत्याही भूतास येता येऊं नये, असा संकल्प करून मी आपल्य कुटींत निर्विकल्पसमाधीमध्यें स्थित झालों. त्यावेळीं मीं पद्मासन घातलें. मन शांत केलें. अत्यंत मौन धारण केलें, व आतां शंभर वर्षें संपल्या-वांचून येथून उठावयाचें नाहीं, असा निश्चय करून मीं निद्रामुद्रा धारण केली. थोड्याच वेळात माझें मन सौम्य, स्वस्थ व आकाशातून खोदून काढल्याप्रमाणें स्थिर झालें. रामा, चित्तानें दीर्घकाल ज्याचा संकल्प केलेला असतो तें त्याला तत्काल दिसतें, असा नियम आहे. त्याप्रमाणें शंभर वर्षें होतांच माझ्या हृदयक्षेत्रांत व्युत्थाननिमित्त कर्म उद्भवलें. त्यामुळें माझा जीव जागा झाला. त्याला मी व इतर यांची कल्पना झाली. चैत्रांत पाणी शिंपडून थंड केलेल्या वृक्षाप्रमाणें माझा देह सतेज झाला. माझीं तीं शंभर वर्षें एका निमेषाप्रमाणें गेलीं. कारण ज्याचें चित्त एकाग्र झालेलें असतें, त्याला पुष्कळ कालही अगदीं थोड्या कालासारखा भासतो. वृक्षातील रस जसा पुष्परूपानें विकास पावतो, त्याप्रमाणें माझा ज्ञानेंद्रिय-समूह बाहेर विकास पावला. नंतर देह प्राण व इंद्रियें यांनीं भरल्यामुळें,

पाहून इच्छासंज्ञक पिशाचीनें ज्याला कवटाळलें आहे, असा अहंकार-पिशाच अकस्मात् कोठूनसा आला ५६.

**सर्ग ५७**—ज्ञानी व अज्ञ यांच्या अहंकारांतील फरक कळण्याकरितां ज्ञानानें बाधित झालेलें दृश्य चिन्मात्र असतें, असें समर्थन करितात.

**श्रीराम**—भगवन्, ज्यांना ज्ञान झालें आहे अशा तुमच्या सारख्यांनाही अहंकार-पिशाच पीडा देतें, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. व त्यावरून ज्ञानाचें फल अनित्य आहे, असें ठरवावयाचें कीं काय? असा संशय येतो. यास्तव त्याची शांति करण्याकरिता मला तत्त्वार्थ सांगा.

**श्रीवासिष्ठ**—रामा, कोणी ज्ञानी होवो कीं अज्ञ असो, त्याची देहस्थिति अहंभावावाचून होणें शक्य नाहीं. कारण आधेय वस्तूचें अस्तित्व आधारावाचून कसें होणार? पण ज्याचें चित्त विश्रान्त झालें आहे, त्याच्या व अज्ञाच्या अहंभावात थोडासा फरक आहे. तोच मी आता सागतों ऐक. त्याच्या श्रवणानें तुझा अहंभाव-पिशाच शांत होवो. या अज्ञान बालकानें वस्तुतः नसलेल्याच अहंभाव-पिशाचाचा संकल्प केला, व त्यामुळें तो स्थित आहे. पण त्या पिशाचाचें कल्पक अज्ञानही वस्तुतः नाहीं. कारण विचारपूर्वक पाहू लागलें असता दिवा घेऊन शोधूं लागलेल्या अंधकाराप्रमाणें तें नाहींसें होतें. ज्ञानानें अज्ञानाचा नाश झाला कीं अज्ञानजन्य अहंभावही बाधित होतो. विद्वानाचा अनुभव जसा जसा वाढत जातो, तसा तसा अज्ञानाचा क्षय दृढ होतो. रात्रीं बुद्धीला मोह पाडणाऱ्या निराकार यक्षीप्रमाणें अविद्या असली तरच कार्यअविद्या उदय पावते. त्याचप्रमाणें कारण-अविद्याही कार्यअविद्येच्या अधीन आहे. कारण तिचा व्यवहार सर्गरूपी कार्य-अविद्येचा जेव्हा उदय होतो तेव्हांच होतो व अविद्योपाधिक जीव-चैतन्याचा ती विषय होते. अर्थात् तिची (कारणाविद्येची) सिद्धि जीवाच्या अनुभवाधीन आहे. कारण दुसरा शशी (चंद्र) जेव्हा भासतो, तेव्हांच दुसरा ससाही दिसत असतो. त्यावाचून नाहीं. पण हा सर्ग कधींच उत्पन्न न झालेला आहे. कारण त्याच्या उत्पत्तीचें योग्य निमित्त दिसत नाहीं. या परम आकाशकोशातील निरामय आदि सृष्टींत पृथिवी इत्यादि पदार्थांच्या अनुभवाचें कारण काय असणार? मन व पांच ज्ञानेंद्रियें यांचा विषय न होणारें व निराकार तत्त्व मन व पांच

ज्ञानेंद्रियरूप व साकार सर्गाचें कारण कसें होणार? बीज नांवाच्या कारणापासून अंकुर नांवाचें कार्य होतें; पण जेथें बीजच नाहीं, तेथें अंकुर कोठून होणार? कारणावांचून कार्य कधींच संभवत नाहीं. आकाशांत खरा वृक्ष कधीं कोणीं पहिला आहे का? तस्मात् दिसणारा हा सर्ग ( प्रपंच ) आकाशांतील संकल्पवृक्षाप्रमाणें कल्पित आहे. त्यांत सत्यार्थता कांहीं नाहीं, सृष्टीच्या आदिकालीं तो चिदाकाशात निष्प्रतिबंध दिसत असतो. प्रपंचाकार वैषम्यानें रहित असलेला ईश्वरच प्रपंचाकारानें प्रकट होतो. विकाररहित आत्मा जगद्विकाराकार कसा भासतो, म्हणून शका वाटत असली तर प्रत्यहीं अनुभवास येणाऱ्या स्वप्ना-वरून तिचें निरसन करून घ्यावें. चित्स्वभाव आत्म्यामध्यें स्वाप्न पदार्थ जसे स्फुरतात, त्याप्रमाणेंच सर्गरहित ब्रह्मामध्यें सर्ग असतो, असें समज. शुद्ध अव्यय आत्माच सर्ग होऊन राहिला आहे. पण वस्तुतः हा प्रपंच नाहीं व पृथिव्यादि संघही नाहीं. तर सर्व शांत ब्रह्मच ब्रह्मामध्यें स्थित आहे. सृष्टीच्या आदि कालीं शुद्ध चिन्मात्राचाच मायिक विकास होतो. अर्थात् सर्ग हा त्याचा स्वभावच आहे. सर्व त्रिपुटीचाही आधार स्वरूपात स्थित असलेलें स्वच्छ चिदाकाशच आहे.

रामा, वस्तुस्थिति जर अशी आहे, तर सर्ग कोठचा, अविद्या कोठची व अज्ञता कोठून आली? सर्व शांत व एकरस ब्रह्म आहे. अहंकारादिक कोठचे? ही मी तुला अहंभावाची शांति सांगितली आहे. अहंभावाला बरोबर ओळखलें असता तो पिशाचाप्रमाणें शात होतो. मी अशाच रीतीनें सर्व अहंभावाला जेव्हा जाणलें, तेव्हा तो मजमध्यें असूनही शरदतूंतील अभ्राप्रमाणें निष्फल झाला. ही चित्रातील अग्नीची ज्वाला आहे, असें कळल्यावर जशी ती दहनक्रियेच्या निरुपयोगी ठरते, त्याचप्रमाणें अहंभाव, सर्ग, अज्ञान इत्यादिकांस जाणलें असतां तीं सर्व आपापल्या कार्यास असमर्थ होतात. अहंभावाविषयींचा राग व त्याचा त्याग, यांना सम लेखल्यावर माझी स्थितिही सम झाली. रामा तूंही अहंभावाचा मी कोणी नव्हे व माझा तो कोणी नव्हे, तर हें सर्व चिदाकाशच आहे, असें जाण. कारण मजप्रमाणेंच दुसऱ्याही बोधवानांना हा अहंभावादि बोध-भ्रम होत नाहीं. तूंही मजप्रमाणें मनांत सर्वांचा बाध करून अद्वि-

तीय हो. दिसणारें हें कांहीं नाहीं, असें जाणून प्राप्त होईल तेवढाच व्यवहार करणारा व शिलामौनमय हो. आकाशाच्या उदराप्रमाणें स्वच्छ, शिलेप्रमाणें निरवकाश, व सर्वभावशून्य होऊन रहा. सृष्टिसमयीं व सृष्टीच्या पूर्वीही सर्व चिन्मयच आहे; दृश्य नाहीं. हें सर्व शिवच होय ५७.

**सर्ग ५८**—भिन्न भिन्न दृष्टीनें सर्गश्री सदा सर्वत्र आहे व नाहींही.

**श्रीराम**—भगवन्, आपण मला ही फार उत्तम बुद्धि सांगितलीत. सर्व, सर्वदा, सर्वथा व सर्वत्र सत्‌च आहे, असें आपण म्हणतां; पण अनुभवाच्या दृष्टीनें पाहिल्यास तें अविषम (सम) ब्रह्मच आहे, असें ठरतें. कारण सर्व धर्म व धर्मी यांचा देशतः, कालतः व वस्तुतः सर्व भाव आहे, असा निश्चय झाल्यावर व्यावृत्ति–व्यावर्तकतादिकांची सिद्धि होत नाहीं. यास्तव आपण पूर्वी पाषाणाख्यायिकेचा जो निर्देश केला आहे, तो याच्याशीं कोणत्या अशानें जुळतो? तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—सर्व सर्वत्र सर्वदा असतें, असें प्रतिपादन करितांना मीं पाषाणाख्यानाचा दृष्टान्त दिला होता, त्याचेंच आतां वर्णन करतों. रंध्ररहित एका घनाकार पाषाणाच्या कोटरामध्येंही (उदरांत) सहस्रशः प्रपंच असतात, असें या कथेच्या योगानें सांगावयाचें आहे. अथवा पदार्थांच्या आंतील चैतन्याचे ठायीं जसा, तसाच शून्यरूप आकाशात्मक अभावाच्या अधिष्ठान चितीमध्येंही असंकीर्णपणें सर्व जगाचा आरोप संभवतो, असें या आख्यायिकेच्या योगानें मी दाखवितों. म्हणजे हाच न्याय सर्वत्र योजतां येईल.

**श्रीराम**—भिंत, खांब इत्यादि सर्व भाव व अभाव यांनीं अवच्छिन्न झालेल्या चितीमध्यें सर्व जगाचा अध्यास, हाच जर या आख्यायिकेचा अभिप्राय असेल तर शुद्ध चिदाकाशांत सर्व जगाचा अध्यास होतो, हाच पक्ष कां मान्य करूं नये? कारण त्याचा अंगीकार केल्यास अध्यस्त जगाचा बाध केला असतां शुद्ध तत्त्वच अवशिष्ट राहतें, ही दुसरी अनुकूल गोष्ट घडून येईल.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तुझें म्हणणें अगदीं खरें आहे. व मलाही तोच पक्ष मुख्यत्वानें सांगावयाचा आहे. पण शुद्ध चिदाकाशाचा परिचय एकाएकीं होत नाहीं. यास्तव त्याच्याच उपाय, म्हणून या प्रत्येक उपाधियुक्त

चैतन्यामध्येंही प्रथम सर्व जगाचा अध्यास दाखविला आहे. या उपायानें सर्व दृश्य ब्रह्ममात्र झालें असतां कशाचीही उत्पत्ति होत नाहीं, हाच फलितार्थ सिद्ध होतो. आरोप दृष्टीनें प्रत्येक भूताच्या परमाणूमध्यें सर्व आरोप्य दिसणें शक्य आहे. पण अपवाद दृष्टीनें तें तसें दिसणें शक्य नाहीं. आरोपदृष्ट्या भूमि, तेज, वायु, आकाश, महाभूतता, पर्वत, हिरण्यगर्भ, ब्रह्मा इत्यादिकांतील एक अणुही सर्गरहित नाहीं; पण सर्व ब्रह्म आहे, या अपवाददृष्ट्या ब्रह्म व सर्ग यांचा शब्दमात्र भेद ठरतो. त्यांत सत्यत्व कांहीं नसतें. कारण सर्गच ब्रह्म व ब्रह्मच सर्ग ( सृष्टि, प्रपंच ) आहे. अग्नि व सूर्य यांच्या उष्णतेप्रमाणें त्यांच्यामध्यें वस्तुतः थोडेंसेंही अंतर नसतें. द्वैत, ऐक्य इत्यादिकांनीं युक्त असलेल्या व्यवहारातही सर्ग, ब्रह्म इत्यादि शब्दांचे अर्थ थोडेसे सुद्धां भासत नाहींत. म्हणूनच तत्त्ववेत्याला व्यवहारसमयींही शांत, शिव, एक, आदि अंतरहित, स्वच्छ, अनामय व शिलाघन मौन भासतें. यास्तव बा राघवा, तूंही तत्त्वज्ञ हो व जगाला इतर तत्त्वज्ञाप्रमाणें पहा. प्राणी जागा झाल्यावर स्वप्नात पाहिलेलें जगत् जरी स्मरत असलें तरी तें जसें आत्ममात्र पाहतो, त्याप्रमाणें तूं सर्व द्वैत आत्ममात्र आहे, असें जाण ९८.

**सर्ग ५९**—समाधि सपतांच सूक्ष्म ध्वनि ऐकूं आला व त्याचें मूळ शोधण्यासाठीं केलेल्या ध्यानांत अनंतकोटी जगांचा प्रतिभास झाला.

**श्रीराम**—मुनिवर्य, शंभर वर्षांनंतर आपण देहभानावर आल्यावर त्या कल्पित कुटींत काय झालें ?

**श्रीवसिष्ठ**—त्यानंतर ध्यान सोडून उठलेल्या मला तेथें एक ध्वनि ऐकू आला. पण तो स्पष्ट अक्षरांनीं युक्त व अर्थ प्रतिपादन करण्यास समर्थ नव्हता. तथापि एकाद्या स्त्रीच्या कोमल कंठांतून निघाल्याप्रमाणें तो मृदु, मधुर, नादशील, व अगदीं हळूसा मला भासला. त्याचप्रमाणें तो स्वर रडण्याचा किंवा पठनाचाही नव्हे, असें मला निश्चयानें वाटलें. तो शब्द कानीं पडतांच, त्याचा कर्ता कोण आहे, हें पाहण्यासाठीं मीं दशदिशांकडे दृष्टि फेंकली. कारण तो सिद्धादिकांनाही गम्य नसलेला आकाशाचा फारच दूरचा प्रदेश होता. त्यामुळें तेथें असला ध्वनि होणें, अगदींच अशक्य होतें. पण मी मोठ्या विस्मयानें पहात

असतांनाही मला तेथें शब्दकर्ता कोणीच दिसला नाहीं. माझ्या पुढें अनंत, शून्य व निर्मल आकाश मात्र उभें होतें. मोठ्या प्रयत्नानें पाहूनही जेव्हां मला तेथें कोणी प्राणी आढळला नाहीं, तेव्हां मीं मनांत म्हटलें, मी प्रथम उपाधीचा त्याग करून व चिदाकाशच होऊन त्याच्या ठिकाणीं आरोपित केलेल्या अव्याकृताकाशाशीं ऐक्य पावलों आहें. आता त्यात असलेलें आकाशकार्य भूत शब्दगुण व त्याचे अर्थ याचा मी अनुभव घेतों. ध्यान-बलानें जसें आहे तसेंच हें देहाकाश येथें स्थापून मी चिदाकाश शरीरानें अव्याकृत आकाशाशीं, जलात टाकलेल्या जलाप्रमाणें, एकरूप होऊन जातों.

राघवा, असा विचार करून देहाचा त्याग करण्यासाठीं मी पद्मासनावर स्थित झालों व समाधि लावण्यासाठीं पुनः नेत्र अर्धनिमीलित केले. इंद्रियसंबंधी बाह्य व आंतर् विषयस्पर्शाचा त्याग करून मी संवित्स्पंद-मयात्मक चित्ताकाश झालों. पण पुढें त्याचाही त्याग करून बुद्धितत्त्व-पदास प्राप्त झालों. नंतर त्यालाही सोडून व वास्तवरूप चिदाकाशांत स्थित होऊन मी आपल्या ठिकाणीं आरोपित केलेल्या जगज्जाल प्रतिबिंबांचा एक आरसा झालों. त्यानंतर त्याच स्वभावानें मी भूताका-शाशीं ऐक्य पावलों. त्यामुळें ( सर्वांचा आधार होण्याची योग्यता ज्याच्या-मध्यें आहे, अशा भूताकाशाशीं ऐक्य पावल्यामुळें ) मी असंग, अद्वय, अनाकार, व अनाधार असूनही सर्व पदार्थांचा आधार झालों. त्या अव-स्थेस प्राप्त झालेल्या चिदाकाशात मी त्रैलोक्यांचे समुदाय, शतशः संसार व अगणित ब्रह्मांडें पाहिलीं. तीं एकमेकाच्या दृष्टीनें अव्याकृत आकाश-मात्र रूप होतीं. म्हणून एकाच वेळीं निजलेल्या लोकाच्या स्वप्नाप्रमाणें तीं एकमेकाच्या दृष्टीस पडत नव्हतीं. त्यामुळें एकेकाच्या दृष्टीनें त्यांतील प्रत्येक महाकर्मांनीं आकुल पण इतराच्या दृष्टीनें शांत होतें. एवढ्या-साठींच तीं शून्य व अशून्यही होतीं. विविध जनांनीं आपल्या मनानेंच तीं उग्र मनोराज्यें निर्माण केलीं होतीं. त्यांच्या स्वरूपाचा कांहीं नियम नव्हता. तो सर्व अत्यंत विचित्र व अचिंत्य बाजार भरला होता. त्याचें वर्णन करीत बसणें, हें सुद्धा फार श्रमदायक आहे. एकाच्या मनोराज्य-रूप ब्रह्मांडाची उपमा दुसऱ्याला नाहीं, दुसऱ्याची तिसऱ्याला नाहीं,

असा सर्वत्र अनंत अद्भुत प्रपंच पसरला होता. सारांश रामा, या परमार्थसंज्ञक ( ब्रह्माख्य ) महा अरण्यात मायोपहित चिद्गवर्गानें केलेलीं व सूर्यसंज्ञक दीपांनीं दीप्त झालेलीं अशीं अनेक गृहें आहेत. तीं या अनंत आकाशांत कांहीं निमित्तावाचूनच उत्पन्न होतात व नाश पावतात. रामा, मीं त्या समाधीमध्यें असल्या भ्रामक अनंत जगाना पाहिलें ५९.

**सर्ग ६०**—त्या समाधींत शब्द करणाऱ्या स्त्रीचें दर्शन. पण तिचा अनादर करून पुनः विचित्र जग पाहणें.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, वर सांगितल्याप्रमाणे शब्द करणाऱ्या प्राण्याचा शोध करीत मी पुष्कळ वेळ हिंडलों व शेवटीं अपरिच्छिन्न चिदाकाशतेस प्राप्त झालों. तों वीणेच्या शब्दाची ज्याला उपमा आहे, असा तो पूर्वीचाच शब्द, मागून ज्यातील पदें स्पष्ट आहेत, अशा आर्यावृत्तत्वास प्राप्त झाला. तेव्हा तो ( शब्द ) जेथून आला होता तिकडे माझी दृष्टि वळताच एक स्त्री दिसली. तिच्या दोन्ही बाजूचें आकाश सोन्यासारख्या निश्चल प्रभेनें प्रकाशित झाले होतें. तिच्या कंठातील माळा व अंगावरील वस्त्रें चंचल होतीं. केशानीं नेत्र आकुल झाले होते. वेणी पाठीवर लोंबत होती. जणुं काय साक्षात् आलेल्या लक्ष्मीप्रमाणेंच, तिचें अंग तापविलेल्या सोन्याप्रमाणें गौरवर्ण होतें. तिचे नूतन यौवन जणुं काय नुकतेंच मार्ग चालूं लागलें होतें. ती रमणी वनदेवीप्रमाणें सुवासिक सर्वावयवानीं सुंदर दिसत होती. तिचें मुख पूर्ण चंद्रासारखें आल्हादजनक व हास्य पुष्पाच्या थराप्रमाणें मनोरम होतें. ती रामा माझ्या जवळ येऊन मंजुल व मधुर स्वरानें हंसत अशी आर्या म्हणाली—

असदुचितरिक्तचेतनसस्रृतिसरिति प्रमुह्यमानानाम् ।
अवलम्बनतटविटपिनमभिनौमि भवन्तमेव मुने ॥ १ ॥

**अर्थ**—हे मुने, तुमचें चित्त खलाना उचित असलेल्या राग, द्वेष, काम, लोभ, मोह इत्यादि दोषानीं रहित आहे. त्याचप्रमाणें तुम्ही संसारलक्षण नदींत मोहित होणाऱ्या जीवास आधारभूत तटवृक्ष आहा. यास्तव मी तुमचीच सर्वथा प्रशंसा करतें. दुसऱ्या कोणाचीही नाहीं.

रामा, अशा अर्थाची ही आर्या ऐकून व त्या सुंदर ध्वनीनें युक्त असलेल्या रमणीस पाहून 'ही ललना आहे, मला हिच्याशीं काय

करावयाचें आहे,' असें म्हणून व तिचा अनादर करून मी पुढें गेलों. (म्हणजे जगद्वृंदमयी माया पाहून विस्मित झालेल्या मीं त्या स्त्रीचा अनादर करून आकाशात विहार करण्यास उद्युक्त झालों.) त्यानंतर तिच्याविषयींचा विचार सर्वथा सोडून चिदाकाशरूप झालेलों मी शून्यस्वभावांत स्थित असलेल्या जगन्मायेस पाहण्यास प्रवृत्त झालों. कारण तीं सर्व उग्र जगें स्वप्न, संकल्प व मनोराज्य याप्रमाणें शून्यरूप होतीं; त्यामुळेंच वस्तुतः तीं कांहीं केव्हाही पहात किंवा ऐकत नाहींत. तीं कल्प, महाकल्प, महासर्ग इत्यादि प्रसंगीं एकरूप असतात. तीं परस्पराच्या उत्पत्ति समारंभाप्रमाणें प्रलय-समारंभासही पहात नाहींत. साराश याप्रमाणें जगाची परस्पर शून्यरूपता आहे. रामा, पण मीं त्या अनंत जगात सहस्रावधि रुद्र, ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र इत्यादि पाहिले. त्यातील कांहीं जगाचा अस्त व उदय तर मला केवल अनुमानानेंच जाणावा लागला. कारण त्यात सूर्य, चंद्र, अहोरात्र इत्यादि कालगणनेचें एकही साधन मला आढळलें नाहीं. राघवा, तेथें मी पूर्वोक्त पाषाणाख्यायिकेचें हृदय (रहस्य) (अर्थात् चित्-मध्यें सर्व आहे. चित्–पासून सर्व झालें आहे, सर्व चित् आहे, सर्वत्र चित् आहे, चित्‌च सत् व सर्वात्मिका आहे, इत्यादि) सर्व साक्षात् पाहिलें. हे रामा, तूं घट, पट, भिंत इत्यादि ज्या कशाच्या आकाराची कल्पना करून नावानें त्याचा उच्चार करतोस, तें तें सर्व चैतन्यच असून त्याचा नामरूपतः उच्चार हाच उदय होय. आणि सर्व शून्य आकाशमय आहे, अशी कल्पना करणे, हा अस्त आहे. जगत् अशा नावानें व या प्रत्यक्ष स्वरूपानें तें शून्य आकाशच भासतें. कारण त्याचाच जगत् हा वायु, तेज इत्यादि क्रमानें होणारा परिणाम आहे, असें श्रुतीनें सांगितलें आहे. तें आकाश शब्दतन्मात्ररूप असल्यामुळें सर्व वस्तूंच्या नावामध्यें साम्यताही आहे. त्याच कारणानें 'तें तूं आहेस, मी ब्रह्म आहें.' इत्यादि शब्दरूपानें परिणाम पावलेल्या आकाशाच्या द्वारा सर्व जगत् परम चिदाकाशच होतें, हाच जगाचा आत्यंतिक (सकारण) क्षय होय.

रामा, मीं बराच वेळ असा विचार केला असतां—ही दृश्यदृष्टि भ्रांति आहे, आकाशवृक्षाची मंजरी आहे, तिला पृथक् जाणल्यावर अवशिष्ट राहणारें जें चिदाकाश तें निरतिशयानंद एकरस ब्रह्मच आहे—असा मला अनुभव आला.

चरम ( अंत्य ) साक्षात्काररूप आकाशांत आविर्भाव झाल्यामुळें त्रिविध परिच्छेदरहित झालेल्या मीं त्या समाधींत या निःसंकल्प पदार्थांचा अनुभव घेतला. ब्रह्मांडांचे समूह, त्यातील दशदिशा, त्यांतील कला, काल, देश इत्यादि सर्व ब्रह्माकाशच होऊन राहिलें आहे, असें मीं पाहिलें. त्यांत मी पुढें सांगणार आहें, त्याप्रमाणें अनेक भेदयुक्त शेकडों संसार भासले असतां त्यांत माझ्यासारखेच मुनीश्वर मला दिसले. तुजसारख्याच राघवानीं युक्त असलेलीं बहात्तर त्रेतायुगें माझ्या दृष्टीस पडलीं. पण हें सर्व भेदवासना जागृत केल्यासच दिसत असून तिच्या अभावीं तत्त्वदृष्ट्या हें सर्व ब्रह्माकाशच दिसत होतें. अर्थात् ब्रह्माची सप्रपचता किंवा निष्प्रपंचता दृष्टिभेदानेंच आहे. अज व अनाद्यन्त तत्पदात्मक ब्रह्म सर्व नामरूपरहित आहे. ज्योतिरूप आहे. तेंच जगाच्या आकारानें नटतें, असें सांगितलेलें आहे. विषयरहित अशी ही चित्सत्ता विषयरूप जगदाकारानें भासते. ब्रह्म प्रत्यगात्म्याहून प्रथक् नाहीं. कारण सर्व प्रकाशमात्ररूप आहे. तें प्रकाशाप्रमाणें सर्व व्यक्त करतें व करीतही नाहीं. त्या लक्षावधि जगात सूर्यानें उष्णच असावें, चंद्रानें शीतच असावें, इत्यादि नियतिही रहात नाहीं. तर निरनिराळ्या ब्रह्मांडात भिन्न भिन्न वस्तुस्वभावही आढळतो. कोठें चंद्र उष्ण असतात, सूर्य शीतल दिसतात, दिवांधाप्रमाणें आचरण करणारे लोक अंधकारात पाहूं शकतात. उजेडात अंध होतात. एके ठिकाणीं शुभ आचरणानें प्राण्याचा नाश होतो व दुसरीकडे पापाच्या योगानें पुरुष स्वर्गास जातात. एके ठिकाणीं विष-भक्षणानें जीव जगतात व दुसऱ्या जागीं अमृत-भक्षण करिताच मरतात. अर्थात् मनःकल्पना निष्प्रतिबंधपणानें चालत असल्यामुळें कल्पनेप्रमाणें हा सर्व प्रकार घडतो. वस्तुतः नव्हे. कारण वस्तुतः जर असें झालें असतें, तर वेद व शास्त्रें अप्रमाण ठरलीं असतीं. शिवाय कोणतीही वासना दीर्घ अभ्यासानें दृढ झाली असतां तिच्या अनुरोधानेंच वस्तूचा अनुभव येतो व तदनुरूपच भोग घडतो. मग ती कल्पित वस्तु सत् असो कीं असत् असो. कारण तें ब्रह्मच जीवांच्या—वासना व कर्म यांच्या-अनुरोधानें विवर्त पावतें. त्यामुळें आमच्या दृष्टीनें जें असंभवनीयसें भासतें तें वस्तुतः तसें असतेंच असा कांहीं नियम नाहीं. येथील वृक्षाच्या स्वरूपा-

हून भिन्न स्वरूपाचे वृक्ष अन्यत्र असणें शक्य आहे. येथें वाळूंतून तेल निघणें जरी अशक्य असलें तरी तें इतरत्रही तसेंच असेल, असा कांहीं नियम नाहीं. कदाचित् शिलांतून कमलांचा उद्भव होत नसेल म्हणून कशावरून? लाकुड, पाषाण, भिंती यांवरून खोदलेल्या व काढलेल्या जड पुतळ्याही देवांगनांशीं संभाषणादि करीत असतील. वरिष्ठ प्राणी श्रेष्ठ वस्त्राप्रमाणें मेघांचें परिधान करितात. वृक्षांवर प्रतिवर्षी निरनिराळ्या जातीचीं फळें येतात. प्राण्यांचे आकारही एक प्रकारचे नसतात. कोणाला दोन पाय असतात. कोणाला चार, सहा, आठ, दहा, शंभर इत्यादि अनेक असतात. कोणाला पुच्छ असतें कोणाला नसतें. कोणाला हात असतात, कोणाला नसतात. कोणी डोकें वर करून चालतात व कोणी पुढें करून जातात. कोणाचें डोकें खालींच असतें. कांहीं प्राणी शास्त्रवेदहीन असतात. कित्येक जीव धर्मरहित असतात. कांहीं यत्किंचित् व्यवसाय करितात. कित्येक भूम्यादि अधोलोकीं तिर्यक् जीव होतात. कित्येक कामसंवेदनशून्य व त्यामुळेंच स्त्रीजातिरहित असतात. अर्थात कांहीं ब्रह्मांडें ज्याचीं हृदयें अतिशय शुष्क आहेत, अशा पाषाणमय भूतांनीं व्याप्त आहेत. साराश राघवा, मीं पाहिलेल्या त्या असंख्य ब्रह्मांडांत कोणत्याही एका प्रकारचा कांहीं नियम नव्हता. उलट सर्वत्र विचित्रता दिसत होती. कोठें जळ, कोठें अग्नि, कोठें सुंदर वाणी, कोठें मूकभाव, कोठें स्थूल आकार, कोठें नुसती संवित् दृष्टि, असे अनेक चमत्कार मीं एका चित्सागरांत असंख्य बुडबुड्याप्रमाणें पाहिले ६०.

**सर्ग ६१**—ज्याला ब्रह्मज्ञान झालेलें नाहीं, त्याच्या दृष्टीनें जगाचा नाश झाला तरी तें अनश्वर आहे; पण ब्रह्मज्ञान झाल्यावर तें त्रिकालीं नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—अनादि अज्ञात ब्रह्मच आपला निर्विकार पूर्णानंद चित्स्वभाव विसरल्यामुळें चलन, मर्यादा इत्यादि भिन्न स्वभावाची कल्पना करून मन, प्राण इत्यादि क्रमानें भोक्ता जीव व भोग्य जग होऊन सर्वत्र सर्वदा सर्व रूपानें संसार करतें. यास्तव अविद्या असेपर्यंत त्याचा संसार शाश्वत आहे. पण तेंच ब्रह्म शास्त्र व आचार्यांचा उपदेश याच्या योगानें ज्ञात झालें असता सर्वतः सर्वदा सर्वरूपानें पूर्णानंद चिदेकरसमात्र भासतें. मग त्यामध्यें संसारलेशाचीही कल्पना करतां येत नाहीं. त्यामुळें तें नित्य मुक्तस्वभावच आहे.

**श्रीराम**—पण प्रभो, वासनायुक्त चित्तच सर्व जगें होतें असें जरी मानलें, तरी महाकल्पाचा क्षय होऊन सर्व भूत गणांचा मोक्ष झाला असतां पुनः कोणाला कसें सर्गज्ञान होतें ? हा संसार पुनरपि जीव-जगत्-परंपरेनें बीजावांचूनच कसा उत्पन्न होतो ?

**श्रीवसिष्ठ**—भूमीपासून आकाशापर्यंत सर्व विशेषाचा विनाश झाला असतां व ब्रह्मादि स्थावरान्त जीव व जगत् मुक्तीमध्यें परिणत झालें असतां अनिर्वाच्य ब्रह्म-चिन्मात्रच अवशिष्ट राहतें; असे जरी सांगितलेलें असलें, तरी त्या अवशिष्ट ब्रह्म-चिन्मात्राचें हृदय, असें हें जगत् त्या ब्रह्माहून भिन्न नाहीं. ( याचा तात्पर्यार्थ असा—यद्यपि मुक्ताच्या दृष्टीनें सर्व जीवन्मुक्तिच आहे, कोणाचेंही कांहीं अवशिष्ट रहात नाहीं, तथापि इतर अ-तत्त्वज्ञांच्या दृष्टीनें अविद्येचा नाश झालेला नसल्यामुळें बंध आहेच. म्हणजे चंद्रलोकीं असणाऱ्या व हल्लीं चंद्रलोकीं जाणाऱ्या जीवाच्या दृष्ट्या चंद्र टीचभर नसून जरी फार विस्तृत असला, तरी भूमीवर राहणाऱ्यांच्या दृष्टीनें तो जसा टीचभरच आहे. त्याप्रमाणें हा सर्व बद्धमुक्त—व्यवहार जाणावा. ) तोच देव तें आपलें हृदय आहे, असें जाणतो. आम्ही ( जीवन्मुक्त ) त्या जगाला विनोदानें जळलेल्या वस्त्राप्रमाणें पहातों. अर्थात् मुक्तांच्या दृष्टीनें सर्व मुक्त, बद्धाच्या दृष्टीनें सर्व बद्ध व जीवन्मुक्ताच्या दृष्टीनें बाधितानुवृत्तिरूप, असें तीन प्रकारचें जग जरी भासलें तरी तें ब्रह्माहून पृथक् नसल्याकारणानें नाश कसें पावणार व उत्पन्न तरी कसें होणार ? सर्व अविनाशी एक ब्रह्मच जर आहे, तर महाकल्प, अवांतरकल्प इत्यादि कसे होतात म्हणून विचारशील तर सांगतो. शाश्वत अशा त्याचे एक देश ( अवयव ) अशाश्वत आहेत, असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें एकदां नष्ट झालेले कल्पभेद पुनः पुनः येण्यास समर्थ नसतात. यास्तव वस्तुतः विद्यमान असलेल्याच कल्प व सर्गभेदाची जपाच्या माळेंतील मण्यांप्रमाणें कालचक्ररूपानें पुनःपुनः आवृत्ति होते. अतीत, अनागत इत्यादि भेदप्रत्यय केवळ अज्ञानजन्य आहे. त्यामुळेंच विचारपूर्वक पाहूं लागलें असतां त्यांतील कांहीं उपलब्ध होत नाहीं. तस्मात् कधीं कांहीं नष्ट होत नाहीं व कांहीं उत्पन्न होत नाहीं. तर शांत दृश्य अज स्थित आहे. अतिमहत् आकाश, अतिसूक्ष्म परमाणु व

सहस्रावधि परमाणूंचा समूह असें जग यामध्यें एक ब्रह्मचित्सत्ताच आहे, असा जर सिद्धान्त आहे तर विनाश होणार कसा? जगत् हें त्या महा-चितीचें शरीर आहे. तेव्हां तिचा नाश झाल्यावांचून हिचा नाश कसा होणार? चित् नित्य असल्यामुळें ती कधींच नाश पावत नाहीं. अर्थात् सृष्टि ब्रह्मरूपानें नित्य आहे. स्वप्नांत संवित्चें हृदयच जसें जगद्रू-पानें भासतें, त्याप्रमाणें आकाशात्माच आदि सर्गापासून जगाच्या आका-रानें भासतो. हा सर्ग चिदाकाशाचा अवयव आहे. यास्तव त्याची उत्पत्ति व नाश अविर्भाव व तिरोभावरूप आहेत व त्याचें वास्तविक रूप आकाश आहे. तेव्हा नाश पावणारें अथवा अविनाशी काय असणार? आता या परमार्थभूत संवित्-चाच नाश होतो, म्हणून ह्मणावें तर ती अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य, अशोष्य, व अतत्त्वज्ञास न दिसणारी आहे. त्यामुळें तिच्या विनाशाचें कांहीं निमित्तच नाहीं. ज्याप्रमाणें ही संवित् नाश पावत नाहीं त्याप्रमाणेंच तिच्या आत असलेल्या तिच्या हृदयभूत जगाचा व त्याला कारण होणाऱ्या अज्ञानाचा अनुभवही उत्पन्न होत नाहीं व नाश पावत नाहीं, असें जर आहे तर सुख-दुःखादिकाचा केव्हां केव्हाच जो अनुभव येतो तो का? ह्मणून विचारशील तर सागतों केवल स्वाभाविक स्मरण व विस्मरण याच्या योगानेंच सुख-दुःखादिकाचा अनुभव व अननुभव याची कल्पना होते. जें तत्त्व ज्या रूपानें असतें, तें त्याच्या विनाशावाचून विनाश पावत नाहीं, असा नियम आहे. यास्तव ब्रह्मात्मक दृश्य ब्रह्माप्रमाणें अक्षय आहे, असें समज. महाप्रलयादिक हे त्याचे अवयव आहेत. पण चिदेकरस ब्रह्म अचेतन, सृष्टि, प्रलय इत्यादि अनत–विरुद्ध–अवयवघटित कसें? म्हणून म्हणशील तर सागतों–पर्वत, वृक्ष नगर इत्यादि अनेक प्रतिबिंबघटित स्फटिकशिलेच्या स्वच्छशीलैकरसत्वाप्रमाणें कल्पित अवयवघटित ब्रह्महीं त्याचवेळीं चिदेकरस असूं शकतें. असे विचित्र प्रतिबिंबभेद स्फटिकरूपानें स्थित असतात. त्याप्रमाणें महाकल्पादि विचित्र भाव संविदेकरस ब्रह्मामध्यें स्थित आहेत. ज्याप्रमाणें मनःसंकल्पजन्य यक्ष-नगर–सेनाप्रभृति वस्तूंना मनोमात्रत्व असतें, त्याप्रमाणें चित्संकल्पजन्य जगाला चिन्मात्रत्व आहे. जसे अवयवी वृक्षाचे शाखा, पल्लव, पुष्प,

फल, इत्यादि अवयव, त्याप्रमाणें परमार्थघन व आकाशाहूनही स्वच्छ अशा ब्रह्माचे प्रलय, महाप्रलय, नाश, उत्पत्ति, भाव, अभाव, सुख, दुःख, जनन, मरण, साकार, निराकार इत्यादि अवयव आहेत. जसा हा अवयवी अविनाश व अनिर्वाच्य, तसेच तेही अविनाश व अनिर्वाच्य होत. कारण अवयव व अवयवी एकरूप असल्यामुळें ते दृश्य असले तरी अदृश्यावस्थेंत सदा अभिन्नच आहेत. जेव्हां वस्तु स्थूल असते, तेव्हा दिसते व ती जेव्हा सूक्ष्म होते, तेव्हां दिसेनाशी होते. अर्थात् दृश्यत्व व अदृश्यत्व याचें कारण क्रमानें स्थूलत्व व सूक्ष्मत्व हें आहे; त्यांचा वास्तविक भेद असणें हें नव्हे. ज्याप्रमाणें वृक्षाच्या अस्तित्वाचें मूल त्याची संवित्च आहे, त्याप्रमाणें परमार्थघन जगाच्याही सद्भावाचें संवित् हेंच मूळ आहे. अर्थात् वृक्ष व जग याचें मूलतः साम्य आहे. याप्रमाणें संवित्-मलत्व असल्याकारणानेच वृक्षाप्रमाणेंच, जगात ही विचित्रता आढळते. यात कोठें कांहीं, कोठें सर्गसंज्ञक मध्यकाष्ठ, कोठे त्याला लागलेल्या लोकांतररूप खांद्या, त्याच्या पुढें जंबूद्वीपादि व्यवस्थारूप शाखा, त्यांस पर्वत, नदी, देश, इत्यादि पल्लव, त्यात चंद्र, सूर्य इत्यादि प्रकाश हें पुष्प, अंधकाररूप हिरवीं पानें, प्रलयलक्षण गाठी, हरिहरादि उत्तम देवरूप गुच्छ, जलयुक्तमेघजाड्य-रूप त्वचा (साल), इत्यादि प्रकारें, आकाररहित आकाशच आकारभेदानें ज्ञानरूप ब्रह्ममध्यें ब्रह्मतुल्य स्वच्छत्वामुळेंच अभिन्न राहिलें आहे. कारण सर्व पदार्थांची सिद्धि अनुभवाच्या अधीन असल्यामुळें सर्व पदार्थ अनुभवरूपच आहेत. अनुभवच आत्मा असन तें एक अचल ब्रह्मच अशा विचित्र कल्पनेनें स्थित आहे. पण ह्या सर्व उत्पत्ति–प्रलयादि कल्पना ब्रह्ममध्यें सत्य नाहींत, तर मिथ्या आहेत. कारण अति निर्मल परम आकाशामध्यें भावाभावकल्पना कशा असणार ? आदि, मध्य व अंत या रंजना कोठें राहणार ? व लोकान्तरभ्रम कसे होणार ? केवल एक अपरिज्ञानच ( अज्ञानच ) दूषित जगाच्या आकारानें उदय पावलें आहे. तें केवल बाह्यदृष्टि सोडून बुद्धीला प्रत्यगात्म्याकडे वळविल्यानेंच शांत होतें. अज्ञानसाधक व चरम साक्षात्काररूप वृत्तीनें दीप्त झालेल्या बोधानेंच तें नाश पावतें. अज्ञानाचें ज्ञान झालें असतां तें कधीं नव्हतेंच असें कळतें. नंतर सर्व बंध-मोक्षरहित ब्रह्मच आहे, असें समजतें. रामा, याप्रमाणें मी

हे बोधादि तुला मोक्षोपाय म्हणून सांगितले आहेत. यांचा जो निरतर विचार करतो तोच मोक्षास प्राप्त होतो, यात कांहीं संशय नाहीं. हें जग-ज्जाळ अनादि व अजातच आहे, तें अज्ञात ब्रह्मच आहे, असें जाणणारा अधिकारी जीव विवेकदृष्ट्या, अणिमादि अष्टगुणसंपन्न ईश्वरत्वही मायामात्र असल्यामुळें असार आहे, असें जाणतो. पर वैराग्याच्या उत्कर्षामुळें सर्वाला तृणतुल्य समजून व मी परमानद ब्रह्मच आहें, असा निश्चय करून स्वात्म्यामध्येंच पूर्णकाम होऊन राहतो ६१.

**सर्ग ६२**—आकाशरूप मुनीनें देहाप्रमाणें जगाचें दर्शन घेतलें व आकाशरूप स्त्रीशीं संभाषण केलें.

**श्रीराम**—भगवन्, आपण चिदाकाशस्वरूपानें हें जें पाहिलेंत तें आकाशात एके जागीं स्थित होऊन पाहिलेंत कीं, सर्वतः भ्रमण करीत पाहिलेंत ?

**श्रीवसिष्ठ**—त्यावेळीं मी व्यापी अनंतात्मा झालों होतों. तेव्हा त्या अवस्थेंत माझें गमन व आगमन कसें होणार ? अर्थात् मी एका स्थानीं स्थित नव्हतों व कोठें जात-येतही नव्हतों. त्यामुळें मीं हें सर्व या आपल्या आत्म्यामध्येंच पाहिलें. म्हणजे देहच मी आहें, असें जाणले असता देहाच्या एकेका अवयवाची स्थिति देहभर फिरल्यावांचूनच व नेत्रगोलकाची अपेक्षा न धरिता चित्–नेत्रानेंच जशी दिसते ( अनुभवास येते ) त्या-प्रमाणें मला तें सर्व कोठेंही न जाता व कोणत्याही बाह्य साधनावाचून दिसलें. पण ' असंग, उदासीन, व निरवयव ब्रह्मभूत झालेल्या तुम्हाला त्यावेळीं जगदवयवता कशी होती (म्हणजे जग हें तुमचे अवयव कसें झालें ? ) ' म्हणून विचारशील तर सागतो. त्या समाधि-अवस्थेंत आकाररहित व निर्मल चिदाकाशरूप अशा माझीं तीं जगें अशीं अंगें झालीं कीं, त्यामुळें त्याची वस्तुता गेली नाहीं व त्यांस अवस्तुताही आली नाहीं. तीं माझ्या सत्तेनेंच सत्तावान् झालेलीं असल्यामुळें त्यांची वस्तुता गेली नाहीं व तीं माझे अवयवही झालीं. त्यांना स्वतः सत्ता नसल्यामुळें ती खरी वस्तुता नव्हती व त्या कारणानेंच ते माझे खरे अवयवही नव्हेत. याविषयीं स्वप्नात पाहिलेला भुवनभ्रम हाच योग्य दृष्टान्त अथवा प्रमाण आहे. कारण स्वप्नामध्यें दृश्य दिसतें, पण तें कांहीं एक नसून केवळ आकाश आहे.

ज्याप्रमाणें वृक्षरूपी देहांत राहणारा जीव आपल्या पत्र-पुष्प-फलादिकास आपल्या संवेदन नेत्रानें पाहतो, त्याप्रमाणें मी त्या सविकल्प समाधींत तें सर्व पाहिलें. अथवा ज्याप्रमाणे समुद्ररूपी शरीरावर 'हा मी' असा अभिमान धरणारा ( सामुद्र ) जीव अनतात्मा असून सर्व जलचर, तरंग, आवर्त, फेन इत्यादिकांस जाणतो, त्याप्रमाणें मीं त्या सर्वांना जाणलें. किंबहुना कोणताही प्राणी आपल्या अवयवाना आपल्या अंतर्दृष्टीनें जसा पाहतो, त्याप्रमाणें मीं अनन्यरूप अशा सर्गास जाणलें. असो, राघवा, मीं त्यावेळीं तेवढेंच स्वात्म्यामध्यें तें जगत् पाहिलें असें समजूं नको, तर तें पाहिजे तेव्हा, पाहिजे तेथें केवळ अंतर्मुख दृष्टि करितांच मला दिसणें शक्य आहे. बोधैकरूप झालेल्या मला हें सर्व विश्व जगत्समूहानीं भरलेलें दिसतें. ज्याप्रमाणें जल, हिम व वायु याच्या देवता क्रमानें रसता, शैत्य व स्पंद जाणतात, त्याप्रमाणें शुद्धबुद्धि पुरुष तें जाणू शकतो. जो जो विवेकी शुद्धबोधरूप झालेला असतो तो तो मद्रूप होतो. मी तर आपल्या आत्म्याला त्याचा आत्माच समजत असतों. वास्तव जे माझे प्रत्यय तेच सर्व विद्वानांचे प्रत्यय होत. अर्थात माझ्याप्रमाणें इतरानाही अनुभव येतो. ही सर्वात्म दृष्टि परिपक्व झाली असतां त्यांची त्रिपुटी आत्म्याहून पृथक् रहात नाहीं. कारण त्याची विज्ञान-एकरूपता उदय पावलेली असते. एका ज्ञानानें दूर-दूरच्या व आड असलेल्या सर्व वस्तूंचें दर्शन कसें होतें म्हणून म्हणशील तर त्याचाही संभव कसा आहे, तें सांगतों.—पर्वतावर चढलेल्या पुरुषाची दिव्य दृष्टि तिमिरादि रोगानें प्रतिबद्ध झालेली नसल्यामुळें, औषधादि-कांनीं निर्मल केलेली असल्यामुळें, किंवा जन्मतःच ती सिद्ध झाल्यामुळें अथवा योगाभ्यासानें संपादन केल्यामुळें जशी फार दूरच्याही बाह्य ( आधिभौतिक ) व आतर ( आध्यात्मिक ) पदार्थांस पाहते, त्याप्रमाणें मीं सर्व स्थूल सूक्ष्म पदार्थ पाहिले. रामा, ज्याप्रमाणें भूमंडलाचा अभि-मानी जीव आपल्या अंगांतील सर्व निधि, रस, धातु इत्यादि जाणतो त्याप्रमाणें मी आपल्या स्वरूपाहून अभिन्न असलेल्या दृश्यास पाहिले.

**श्रीराम**—हे भगवन्, आपण अशा रीतीनें अनुभव घेत असताना तिकडे त्या आर्या म्हणणाऱ्या स्त्रीनें काय केलें ?

**श्रीवसिष्ठ**—ती, तीच आर्या म्हणत तशीच मला प्रसन्न करण्याच्या उद्देशानें माझ्या समोर आकाशरूपानें उभी राहिली. मीं तिला समाधि लावण्याच्या पूर्वीच पाहिलें असतें, पण ती मजप्रमाणेंच आकाशरूपिणी असल्यामुळें मला दिसली नाहीं. पण समाधिसमयीं ती, मी व सर्व जगत् आकाशमात्र होतें.

**श्रीराम**—भगवन्, ती जर आकाशरूप होती, तर जिह्वा, तालु, ओष्ठ, प्राणवायु, इत्यादि नसल्यामुळें तिनें आर्या कशी म्हटली ? त्याचप्रमाणें आकाशरूप असलेल्या तुम्हालाही तिचें रूप कसें दिसलें ? व आर्या ऐकू कशी आली ? तें मला खरें सांगा.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, स्वप्नाप्रमाणे नुसत्या कल्पनेनेंच तें सर्व होऊ शकलें. शिवाय त्यावेळचेंच तेवढें दृश्य आकाशरूप होतें व आताचें नाहीं, असे थोडेंच आहे ? कारण आम्हाला स्वरूपावांचून दुसरें जेवढें म्हणून दृश्य ज्ञान होतें तें सर्व सदा आकाशरूपच आहे. फार काय पण तूं, मी इत्यादि आह्मी सर्व द्रष्टेही आकाशरूप आहों. परमार्थ महाधातु निर्विषय चैतन्यरूप असून तोच स्वतः दृश्य–दर्शन–द्रष्टृ–रूपानें भासतो, हें श्रुति व विद्वानाचा अनुभव यावरून सिद्ध आहे. हा सर्व जगद्वासनोपहित चित्स्वभावाचाच निश्चय आहे. रामा, शरीर, स्थान, साधन इत्यादिकाच्या सत्तेविषयींही तुला प्रमाणभूत ज्ञान काय आहे ? कारण त्यांची सत्ताबुद्धि श्रुतीनें बाधित होत असते. स्वप्नात ज्याप्रमाणें असत् असलेलेही भाव अनुभवास येतात त्याप्रमाणें हे संसारसमूह अनुभवास येतात. स्वप्नातील वैचित्र्याचें योग्य कारण कोणालाही कधींही सांगता येत नाहीं. तसेंच या दृश्याचें वैचित्र्यही काकतालीय न्यायानें भासतें. रामा, या दृश्याला मी स्वप्नाचा जो दृष्टान्त देत आहें, अथवा त्याला स्वप्न म्हणत आहें, तें सर्व तुझ्या बोधाकरितांच होय. कारण वस्तुतः तें सत् नव्हे असत् नव्हे, व स्वप्नही नव्हे. तर केवळ ब्रह्म आहे.

असो; रामा, नंतर मीं कांताच्या ठिकाणीं अनुराग करणाऱ्या तिला तन्मय संवित् करून असें विचारलें.–स्वप्नांत स्वप्नांतील लोकांसह जसा व्यवहार होतो, त्याप्रमाणें माझा तिच्याशीं वाग्व्यवहार झाला. फार काय पण आतां माझा तुझ्याशीं जो व्यवहार होत आहे, तोही आकाशरूप

आहे, असेंच समज. कारण हा जगद्वेष आत्म्याचें स्वप्न आहे, अथवा कांहीं नाहीं. तर तो निर्मल ज्ञप्तितामात्र आहे. या लौकिकस्वप्नाचा द्रष्टा जसा तूं, मी, इत्यादि त्याप्रमाणें सर्गस्वप्नाचा द्रष्टा चिदाकाश. जसा द्रष्टा निर्मल आकाश त्याप्रमाणें दृश्य व दर्शनही आकाश होय. सारांश रामा, हा सर्व जगत्–मंडप उपादानादि सामग्रीवांचूनच झालेला असून त्यांत कर्तृता, भोक्तृता, जगत् इत्यादि कांहीं नाहीं. यास्तव तूं पाषाणः मौनाचा आश्रय करून व ज्ञानी होऊन प्राप्त शुभकर्म कर. मग तुझें शरीर राहो कीं जावो ६२.

**सर्ग ६३**—अज्ञदृष्टया आंत आंत अनंत सर्गसपत्ति, व ब्रह्म-वित्-दृष्टया चिदेकघन.

**श्रीराम**—हे मुने, आपला त्या पूर्वोक्त स्त्रीसह मुखादि अवयवावाचून केवळ वासनामात्र देहानें व्यवहार कसा झाला ? त्याचप्रमाणें त्या दर्शेत तुह्मी क, च, ट, त, इत्यादि वर्ण कसे उच्चारिलेत ?

**श्रीवसिष्ठ**— रामा, वर्णोच्चारादि व्यवहाराचें शरीर हें कारण नव्हे. कारण तेंच जर त्याचें निमित्त असतें, तर शवशरीरही बोललें असतें व स्वप्नात शरीरावाचूनच संभाषणादि व्यवहार संभवला नसता. शिवाय व्यवहार जर सकारण असता तर तो सत्यही झाला असता. पण तसें दिसत नाहीं. यास्तव व्यवहार कल्पनामात्र आहे. त्यामुळें तो योग्य सामग्रीवांचूनही होऊं शकतो. अर्थात् तत्त्ववेत्यांच्या मते क, च, ट, त इत्यादि वर्ण कल्पनामात्र असल्यामुळें कधींही उदय पावत नाहींत. ज्याचें शरीर आकाशतुल्य आहे अशा पुरुषाच्या स्वप्नांतील वर्णोच्चार जर सत्य असता, तर तो जवळच्या मनुष्यानें ऐकला असता; पण तसें होत नाहीं. तस्मात् तो काल्पित आहे. या तर्कावरून शब्दव्यवहार मिथ्या ठरतो. अर्थात् स्वप्नामध्यें सत्य कांहीं नाहीं, ती भ्रांति आहे. निद्रास्वभावबलानें कल्पिलेलें तें सर्व स्वाप्न पदार्थजात चिन्मात्र आकाशाचें विकसित स्वरूप आहे, व जसें स्वाप्न तसेंच हें माझें समाधींत पाहिलेलें जाग्रत्–पदार्थ-जात वस्तुतः आकाश असूनही आकाश नसल्यासारखें होऊन राहिलें आहे. तात्पर्य हा सर्व चेतनाचाच विकास आहे; यांत अणुमात्रही अचेतनाचा भाग नाहीं.

**श्रीराम**—पण प्रभो, योग्य प्रत्यक्ष प्रमाणानें ज्ञात होणाऱ्या या जाग्रत्–प्रपंचाचें योग्य प्रमाणांचा विषय न होणाऱ्या स्वप्नाशीं साम्य

आहे, असें म्हणणें युक्त नव्हे. शिवाय तें जर खरोखरच असत् आहे, तर नेत्रादि इंद्रियांचा विषय कसें होतें ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, चांगला विचार करीपर्यंत चक्षुःप्रभृति इंद्रियांना जगत् जरी दिसत असलें तरी तत्त्वतः विचार करूं लागतांच तो त्याला सहन होत नाहीं. त्यामुळें ते अस्थिरच आहे, व म्हणूनच स्वप्नतुल्य होय. जाग्रतींतील पदार्थ स्वप्नाप्रमाणेंच आत्म्याहून पृथक् नाहींत. आत्म्याप्रमाणें ते त्रिकालीं रहाणारे व सत्यही नाहींत; तर ते अनिर्वचनीय आहेत. आत्मसत्तेनेंच ते सत्तायुक्त होतात. तस्मात् ते स्वतः स्वतंत्र सत्तावान् नाहींत. शिवाय जाग्रत्-जगें स्वप्नाप्रमाणें कशीं तें ऐक. त्याना परस्पर बीजभाव आहे. परस्पर विरुद्ध भेद-अभेद, समरूपत्व, असमरूपत्व, इत्यादि आहे; केळीच्या सोपटाप्रमाणें तीं आंत आंत अवस्थित आहेत; परस्पर अदृष्ट आहेत. तीं एकमेकास दिसत नाहींत. तीं फोलपटातील निर्जीव बीजाप्रमाणें आतल्या आत गळतात. पण तीं गळलीं तरी चेतनरूप असल्यामुळें तापलेल्या खापरावर टाकलेल्या जलबिंदूप्रमाणें आकाशरूप होऊन जात नाहींत, व तीं गळलेलीं जगें आमच्या प्रमाणे परस्परास पहातही नाहींत. तर त्याचे चेतन अज्ञानाने आवृत झालेलें असल्यामुळे निरंतर जणुं काय तीं निजल्यासारखीं असतात. वास्तव तीं स्वप्नाचाच अनुभव घेतात. त्यात निजलेले जीव स्वप्नजगज्जालास प्राप्त होऊन तेथेंच कल्पिलेल्या दिवसात सर्व व्यवहार करणारे होतात. देवानीं संग्रामांत ज्याना मारलें आहे, असे असुर, अज्ञानामुळें मुक्त झालेले नाहींत, स्वतः अजड असल्यामुळे जडही झाले नाहींत व देहवान्ही नाहींत, तेव्हा अशा अवस्थेंत स्वप्नजगत्स्थितीवाचून ते दुसऱ्या कोठें राहणार ? याच न्यायानें सर्व मारलेले अथवा मेलेले जीव स्वप्नजगातच गुरफटून राहणार ! त्यावांचून त्याना दुसरा मार्गच काय आहे ? पण तें स्वप्नच दीर्घ अनुभवामुळें जाग्रत् होतें. आता आम्हीं ज्याप्रमाणें हें जग सत्य आहे, असें अभिमानपूर्वक समजतों, त्याचप्रमाणें तेही आपल्या स्वाप्नजगालाच सत्य समजतात. म्हणजे याचा भावार्थ असा कीं आम्ही ज्याचा अनुभव घेत आहों तें जगत् व त्यांतील हे आम्ही जर त्याच्या दृष्टीं पडलों तर आमची जाग्रत् हेंच त्याचें स्वप्न व आम्हीच त्यांचे

स्वप्नपुरुष होऊं. पण याप्रमाणें तेही अनुभवरूप असल्याकारणानें सत्य आहेत. अधिष्ठानचिदात्मा सर्वग आहे. त्यामुळें ते कोणत्याही अवस्थेंत असले तरी तद्रूप व म्हणूनच नित्य आहेत. सारांश हा सर्व चिच्चमत्कार आहे. सर्वत्र पसरलेल्या त्या महात्म्याचा कांहीं अंत लागत नाहीं. जगाच्या या अनादि परंपरेंत आजवर जितके जीव मरून मोक्षावांचून राहिले आहेत, तितके त्याचे भिन्न भिन्न अक्षय संसार आहेत. त्यांत त्यांचे कल्पित जन आहेत, प्रत्येक जनाला निरनिराळें मन आहे. प्रत्येक मनानें कल्पिलेलें पृथक् जग आहे, व त्यांत पुनः लोक आहेत. याप्रमाणें हा आद्यन्तरहित दृश्यमय भ्रम आहे. पण ब्रह्मवेत्त्याच्या पक्षीं तो ब्रह्मच असून त्याला कोणत्याही प्रकारची मर्यादा नाहीं. हे रामा, भिंत, आकाश, पाषाण, जल, स्थल, इत्यादिकामध्यें चिन्मात्र आहे. यास्तव सर्व विश्व तेंच आहे. जगत् म्हणून दुसरें कांहीं नाहीं. आणि चित् सर्वगत असल्यामुळें जेथें तेथें जगत् आहेच. तेव्हां त्याची संख्या कोठून होणार? तें विश्व तत्त्वज्ञाचे ठिकाणीं निर्विशेष निरतिशयानंदैकरस ब्रह्मच आहे. पण अज्ञाच्या मनांत तेंच दृश्य प्रपंचरूपच व अनर्थरूपच आहे ६३.

**सर्ग ६४**—वसिष्ठानीं विचारल्यामुळें विद्याधरीनें आपला सर्व वृत्तांत सांगितला

**श्रीवसिष्ठ**—राघवा, त्यानंतर त्या सुंदरीला मीं म्हटलें, "हे भामिनि, तूं कोण? मजपाशीं का आलीस? तूं कोणाची आहेस? तुझी काय इच्छा आहे? कोठें जातेस व तुझें आस्पद (आधार) काय आहे?" तेव्हा ती उलट बोलली, "मुने, मी आपला सर्व सत्य वृत्तान्त तुला सांगतें. मजविषयीं तुला जें विचारावयाचें असेल तें तूं मला परस्त्री, एकान्त, इत्यादि कशाचीही शंका न बाळगता विचार. कारण मी कोणातरी कारुणिकापासून दुःखशांतीचा उपाय जाणण्याची इच्छा करीत आहें. या परम आकाशाच्या एका कोणामध्यें हें तुमचें जगद्गृह आहे. यांत पाताल, भू व स्वर्ग अशा तीन खोल्या आहेत. त्यांत धातृत्व नांवाच्या मायेनें सर्गवैचित्र्यकल्पना या नावाची एकच कुमारी क्रीडेकरितां गृहस्वामिनी केली. त्यातील भूतल जगल्लक्ष्मीच्या कंकणयुक्त मनगटाप्रमाणें समुद्र व द्वीपें यांच्या योगानें वेष्टित होतें. द्वीपें, समुद्र यांच्या तीरापासून पुढें चारी दिशांमध्यें विस्तृत पृथ्वी पसरलेली आहे. ती स्वतःच रात्री सुद्धां प्रकाशित होते. सर्व इष्ट-

फल देते. ती आकाशाप्रमाणें निर्मल आहे. ती चिंतामणिमय, निर्मळ, आपल्या कांतीनें स्वर्गादि लोकांस जिंकणारी, अप्सरा, देव सिद्ध इत्यादिकाच्या लीला–विहाराची भूमि, केवल संकल्पानेंच सर्व संभोग देणारी आहे. तिच्या शेवटीं प्रसिद्ध लोकालोक पर्वत आहे. तो कोठें मूढ बुद्धीच्या हृदयाप्रमाणें नित्य तमानें व्याप्त, कोठें सत्त्ववानांच्या मनाप्रमाणें नित्य प्रकाशरूप, कोठें साधूंच्या संगमाप्रमाणें आह्लादजनक, कोठें मूर्खसमागमाप्रमाणें उद्वेग उत्पन्न करणारा, कोठें मतिमानांच्या मतीप्रमाणें सर्व अर्थ प्रकट करणारा, कोठें मूर्ख व श्रोत्रिय याच्या चित्ताप्रमाणें अत्यंत गहन, कोठें ज्याला चंद्रकिरणांचा व सूर्यकिरणांचा स्पर्शही होत नाहीं असा, कोठें जनप्रचुर, कोठें देव व दैत्य याच्या नगरांनीं व्याप्त, कोठें पातालानें गहन, कोठें शून्य महारण्यानीं भयंकर, कोठें पुष्पोद्यानानें सुशोभित, कोठें ज्यावर विद्याधरी गायन करीत आहेत असा, कोठें मुनींच्या आश्रमानीं मनोरम, कोठें मेघाच्छादित, कोठें मेघरहित, अशा अनेक विचित्र वस्तूंनीं व प्राण्यानीं मंडित झालेल्या त्या पर्वताच्या उत्तर शिखरावर एक मोठी शिला आहे, तिच्या उदरात मी राहतें. विधीनें मला त्या वज्रासारख्या दृढ पाषाणयंत्रात बांधून ठेवलें आहे. तेथें राहूं लागल्यापासून मला वाटतें कीं आजवर अनेक युगगण गेले. प्रभो, मी एकटीच तेथें बद्ध होऊन पडलें आहें, असें नव्हे; तर सायंकाळीं कमलकोशात अडकून पडलेल्या भ्रमराप्रमाणें माझा भर्ताही तेथें बद्ध होऊन राहिला आहे. तेथें भर्त्यासह राहून मीं अनेक वर्षसमूह गेलेले पाहिले. केवल आपल्याच दोषानें आम्ही अद्यापि तेथून सुटत नाहीं. काम हा आमच्यांतील मोठा दोष आम्हाला मुक्त होऊं देत नाहीं. एकमेकांवर ममता ठेवून आम्ही तसेंच तेथें फार दिवसापासून राहिलों आहों. भगवन्, त्या पाषाणाच्या संकुचित अवकाशात आमच्या पुत्रपौत्रादि सर्व परिवारालाही आमच्याबरोबर बद्ध होऊन रहावें लागलें आहे. माझा पुराण पुरुष द्विज पति शेकडों युगें जिवंत आहे, तथापि तो त्या एका स्थानांतून हालत नाहीं. तो बालपणापासून ब्रह्मचारी, वेदपाठक व शास्त्राध्यायी असून एकान्तात एकटाच राहतो. तो आळशी, कुटिल व चपलही नाहीं. हे वेदवेत्त्या, मी त्याची व्यसनी भार्या आहें. मी त्याच्या वाचून एक क्षणभरही देह धारण करण्यास समर्थ नाहीं. हे ब्राह्मणा, त्यानें

मला आपली भार्या कशी केली, व आमचा इतका अकृत्रिम स्नेह कसा वाढला, तें सांगतें ऐक:—

पूर्वी तो उत्पन्न होऊन, एकटाच आपल्या निर्मल गृहांत किंचिज्ज्ञ होऊन, राहत असता 'माझ्या वेदाध्ययनशीलास शोभेल अशी मला जन्मशालिनी भार्या कशी बरें प्राप्त होईल' असा मनांत पुष्कळ विचार करून व शेवटीं निर्णय करून चंद्राच्या चादण्याप्रमाणें त्यानें आपण होऊनच मनानें मला निर्मिलें. तेव्हा त्याची मी मानसी भार्या वसंत ऋतूंतील मंजिरीप्रमाणें उत्तरोत्तर वृद्धि पावत चाललें. मी सहज (जन्मत:च उत्पन्न झालेल्या) वस्त्रानें आच्छादित झालेली, प्राण्याचें चित्त हरण करणारी, पूर्णचंद्रमुखी, निर्मल तारकायुक्त आकाशाप्रमाणें शुद्ध, समग्र रसशालिनी, लीलाविलासरत, हरिणनेत्रा, गायनवादनप्रिया, अतृप्ता, अनुरागिणी, सौभाग्यभोग—परायणा, लक्ष्मी व अलक्ष्मी या दोघींचीही प्रियसखी, मोहजालरूप, पण संपत्ति व आपत्ति यांविषयीं अखिन्न होतें. मी आपल्या भर्त्याच्या मनोमय असल्यामुळेंच त्यानें कल्पिलेल्या त्रैलोक्याचें धारणही माझ्या अधीनच होतें. यास्तव मी त्या ब्राह्मणाचें केवळ गृहच नव्हे, तर त्रैलोक्यही धारण करीत होतें. मी पुत्र—पौत्रादि परंपरेस उत्पन्न करण्यास व तिचे पोषण करण्यास योग्य अशी त्याची भार्या होतें. त्रैलोक्य-गृहांतील सर्व संभार धारण करणें, हाच एक भार मीं आपल्या माथीं घेतला होता. असो; त्यानंतर मी तरुण झालें. माझ्या ठिकाणीं तारुण्याचीं चिन्हें स्पष्ट उमटलीं. पण अशा अनेक गुणांनीं युक्त असलेल्याही माझें, माझा पति स्वभावत:च दीर्घसूत्री, श्रोत्रिय व तपोनिष्ठ असल्यामुळें, काहीं गूढ आशेनें, अद्यापि पाणिग्रहण करीत नाहीं. त्यामुळें मला फार दु:ख होत आहे. शीतल वायूनें चंचल होणाऱ्या नलिनीवनांतील आल्हादकारक स्थानींही माझ्या अंगाचा दाह होतो. पुष्पवृष्टीनें परिपूर्ण असलेल्या उद्यानभूमीही मला तप्त वाळवटाप्रमाणें भासतात. साराश मला या जगातील सर्व विलासजनक सरस वस्तु नीरस वाटतात, रम्य पदार्थ अरम्य भासतात, व अल्हादकारक आकार खेदजनक दिसतात. जें जें सुंदर, उचित, मधुर, विचित्र व चित्तहारक आहे, तें तें पाहून माझ्या नेत्रांत अश्रू येतात. कमलें व उत्पले यांनीं भरलेल्या स्थानीं जातांच व्यसनाग्नीनें संतप्त झालेल्या

माझ्या नेत्रांतून बाष्पबिंदु टप टप गळूं लागतात. लीलेनें हालणाऱ्या कदली, इत्यादिकांच्या रम्य वनांत जातांच मी आपलें तोंड झांकून घेऊन रडूं लागतें. तुषारांनीं भरलेल्या कदलीदलांकडे पाहून मी दीर्घ उष्ण श्वास सोडतें. नलिनीचा हालणारा देंठ, ह्याच झोंपाळयावर बसून झोंके घेणाऱ्या सारससहित सारसीला पाहून मी दीनमुख होतें. व मनातल्या मनांत आपल्या तारुण्याची निंदा करतें. भगवन्, मी रम्य वस्तूकडे पाहून रडतें, मध्यस्थ पदार्थांकडे पाहून सौम्यता धारण करतें, व अशोभनपदार्थांस पाहून मला बरें वाटतें. पण माझी अशी दशा कशानें झाली तें मला कळत नाहीं. तात्पर्य माझे तारुण्याचे दिवस असे व्यर्थ चालले आहेत ६४.

**सर्ग ६५—**दीर्घ कालानें विद्याधरीचा तो आत्मानुराग वैराग्यरूप झाला व धारणाऽभ्यासानें प्राणजय झाला.

**विद्याधरी—**भगवन्, पुढें कांहीं कालानें तो माझा पतीविषयींचा अनुराग अशा विचारानें विरागतेस प्राप्त झाला. माझा हा पति वृद्ध, एकांतप्रिय, नीरस, स्नेहशून्य, सरलचित्त, व मौनी आहे. तेव्हां माझ्या या जिविताचे काय फळ आहे? खरोखर बालपणापासून वैधव्य प्राप्त झालेलें पतकरेल, मरण, व्याधि, आपत्ति इत्यादिक पतकरतील, पण अहृद्यप्रकृति पति कोणालाही पतकरणार नाहीं. कारण पति तरुण, रसिक व अनुकूल आचरण करणारा असणें हेंच स्त्रीचें अखंडित सौभाग्य व जन्मसाफल्य आहे. जिचा नाथ नीरस आहे ती स्त्री, जिला शास्त्रसंस्कार झालेला नाहीं ती बुद्धि, दुर्जनानीं भोगलेली श्री व वेश्यांनीं हरण केलेली लज्जा मृतच आहेत. भर्ता जिचें अनुकरण करतो तीच स्त्री, संत जन जिचा उपयोग करितात तीच श्री, जी मधुर व उदार असते तीच बुद्धि व समदृष्टिता हीच साधुता होय. परस्परावर अनुरक्त असलेल्या दंपतींच्या मनांस आधि, व्याधि, आपत्ति व दैवी कोपही बाधा करूं शकत नाहींत. ज्याचा नाथ मेला आहे अथवा ज्यांचा स्वामी वाईट आहे, त्या स्त्रियाना फुललेल्या पुष्पस्थली व नंदनोद्यानभूमि मरुभूमीसारख्या संतापदायिनी होतात. खरोखर स्त्रियांना एका पतीवाचून जगांतील गृह-क्षेत्रादि दुसरे सर्व भाव अल्पगुणामुळें अथवा अनवधानामुळें त्याज्य होतात. (पण पति कधीं त्याज्य होत नाहीं.) सारांश हे मुनिनायका, जिचें तारुण्य स्थिर आहे अशा मी अनेक वर्षें अशीं असंख्य दुःखें भोगलीं. माझ्या दुर्भाग्याचा

प्रभाव कसा आहे तो पहा ! ! अथवा माझा हा भाग्योदयच आहे, असें मी समजतें. कारण अशा प्रतिकूल स्थितीमुळें माझा तो अनुरागच विराग झाला. आतां सर्व वस्तूंविषयींची माझी आस्था कमी झाली आहे. आपल्या उपदेशानें मी आतां एका आत्मनिर्वाणाची इच्छा करीत आहें. कारण ज्यांना इष्ट वस्तु प्राप्त झालेल्या नसतात, ज्यांची बुद्धि पर तत्त्वामध्य विश्रांत झालेली नसते व ज्याचा जीवितकाळ मरणतुल्य दुःखांनीं जात असतो, त्यांच्या जगण्यापेक्षां मरण बरें. राजा राजाच्या साह्यानेंच इतर राजाला जिंकण्याची जशी इच्छा करतो त्याप्रमाणें तो माझा भर्ताही मनाच्या योगानेंच मनाला जिंकण्यास्तव सतत जागरूक राहतो. यास्तव हे ब्रह्मन्, त्या माझ्या भर्त्याचें व माझें अज्ञान नष्ट व्हावें, म्हणून तूं न्याययुक्त वाणीनें आम्हाला आत्म्याचें स्मरण करीव. जेव्हां माझी अपेक्षा न करताच तो माझा भर्ता आत्म्यामध्यें स्थित आहे असें मला कळलें, तेव्हांच मी माझ्या विरागानें जगत्स्थितीस विरस केलें. आतां मी वासनावेशरहित झालें आहें. मी आपल्याला इष्ट असलेली आकाशसंचार–धारणा धरून स्थिरचित्त झालें आहे. यास्तव मी उपदेशास पात्र आहें. मला चित्तैकाग्र्यरूप परम तपामुळें आकाशगति फार दिवसापासून प्राप्त झाली आहे. पण मी पुनः सिद्धाचा समागम हें फळ देणारी धारणा धरली. तिच्या दीर्घ अभ्यासानेंच दुसऱ्या कोणास अगम्य असलेल्या या एकांतस्थानीं येऊन तुझ्याशीं संभाषण करण्यास समर्थ झालें आहें. सिद्धसमागम नावाची दुसरी सिद्धि प्राप्त झाली असतां मी आपल्या निवासस्थानभूत ब्रह्मांडाच्या आकाराचें शास्त्रदृष्ट्या व योगदृष्ट्या दर्शन करण्याच्या इच्छेनें भावना धरून बसलें. योग्य वेळीं क्रमानें ती धारणाही सिद्ध झाली. तेव्हां मी आपल्या त्या जगांतील सर्व वस्तु पाहून त्याच्या बाहेर निघालें. तों लोकालोकपर्वतावरील तो शिलासमूह माझ्या दृष्टीस पडला. मुने, त्यापूर्वीं मला किंवा माझ्या पतीला तें ब्रह्मांड पाहण्याची कधीं इच्छाच झालेली नसल्यामुळें आम्ही तें पाहिलें नव्हतें. माझा भर्ता शुद्ध वेदार्थां ( धर्म व परमात्मा यां ) चेंच चिंतन करीत असल्यामुळें भूत, वर्तमान व भविष्यत्काल, त्यांतील पदार्थ व ब्रह्म यांस जाणत नाहीं. त्यामुळें तो माझा पति विद्वान् असूनही परम पदास प्राप्त झाला नाहीं

पण आतां आम्ही दोघेंही तुझ्या उपदेशाच्या श्रवण–मननादि प्रयत्नान परम पद जाणण्याची इच्छा करीत आहों. यास्तव हे ब्रह्मन् , आमची एवढी प्रार्थना सफल करणें आपणास उचित आहे. तुझ्यासारख्या महात्म्यापाशीं आलेले याचक इच्छाभंग पावून कधींही परत जात नाहींत हे मानदा, मी आकाशांतून भ्रमण करून सिद्धांच्या समूहांतील पुष्कळ महात्म्यांना पाहिलें, पण त्यात तुजवांचून घन अज्ञानास जाळणारा मला दुसरा कोणी आढळला नाहीं. भगवन्, ज्या अर्थी संत काहीं कारणावांचूनच याचकांचें वांछित पूर्ण करीत असतात, त्याअर्थी आपण मज शरणागतेचा तिरस्कार करणार नाहीं. अर्थिजनाची उपेक्षा करणें हाच तिरस्कार आहे. ६५.

**सर्ग ६६**—आकाशरहितस्थानीं तुमची स्थिति अथवा शिलेच्या उदरांत तुमें घर कसें झालें ? असें वसिष्ठांनीं विचारलें असतां विद्याधरी जगाच्या विस्ताराचें वर्णन करते.

**श्रीवसिष्ठ**—रामा, पूर्वी वर्णिलेल्या ब्रह्मांडावरील आकाशात असलेल्या व तेथेंही संकल्पित आसनावर बसलेल्या मीं त्याच आकाशांत कल्पित आसनावर बसलेल्या तिचा हा वृत्तान्त ऐकून तिला पुनः विचारलें.–बाले, शिलेच्या अवकाशरहित उदरात तुझ्यासारख्याची स्थिति कशी होते ? तुम्हीं तेथें चलन-वलनादि व्यापार कसे करितां व तेथील तें तुमें गृह काय कामाचें ? कारण ज्यांत प्रवेशही संभवत नाहीं, तेथें हें सर्व अत्यंत असंभावित आहे.

**विद्याधरी**—मुनिवर्य, तुमचें हें विस्तृत जग जसें शोभत आहे, त्याप्रमाणेंच आमचें तें शिलेच्या उदरातीलही जग सर्व संसारांनीं युक्त आहे. त्याच्या पाताळात नाग स्फुरतात, भूमीवर पर्वत उभे असतात, पाणी झुळझुळ वाहतें, आकाशांत वायु वाहतात, समुद्र पाण्यानें भरलेले दिसतात, सर्व प्राणी त्यात गमन-आगमनादि क्रिया करितात, जीव सतत जन्म घेतात व मरतात. सारांश देव, गंधर्व, मानव इत्यादि सर्वांच्या सर्व व्यवहारपरंपरा त्यात कल्पपर्यंत अखंडित चालतात. त्यांचें विस्तृत वर्णन करीत बसण्यापेक्षा दुसऱ्या कोणत्याही जगांत जें जें काहीं दिसतें तें तें सर्व त्या आमच्या जगात आहे. तेथेंही पातालांत राहण्यास योग्य असलेले जीव पातालांत शिरतात; आकाश–कुहरांत वास करणारे आकाशांत

जातात. इतर मध्यभागीं भ्रमण करितात. वायु सदा भ्रमण करतो; चंद्र-सूर्य आपापलें नित्य कर्म करून जगाचा व्यवहार करवितात व अशा प्रकारचा हा सर्व संसार तेथेंही चालतो ६९.

सर्ग ८७—कौतुकानें त्या शिलेपाशीं जाऊनही वसिष्ठाला विद्याधरीचें जग दिसलें नाहीं म्हणून विद्याधरीनें अभ्यासाचें माहात्म्य वर्णन केलें.

**विद्याधरी**—मुने, मजवर प्रसाद करून त्या आमच्या सर्गास चल. म्हणजे मी सागत असलेलें हें सर्व सत्य आहे, अशी तुम्ही साक्षात् अनुभवानें खात्री होईल,

**श्रीवसिष्ठ**—राघवा, त्या सुंदरीनें असें म्हटलें असतां मी 'बरें आहे,' असें म्हणून तिच्या सहवर्तमान वायूच्या झुळकीबरोबर जसा सुगंध जातो, त्याप्रमाणे आकाशातून जाऊं लागलों. शून्य प्रदेशातून जाणाऱ्या तिच्या-प्रमाणेंच मीही शून्यरूप होतो, आकाशाच्या शून्य मार्गाचें उल्लंघन करून तिच्यासह मी आकाशस्थ देवादि प्राणिसमूहापर्यंत जाऊन पोंचलों. पण पुढें त्या प्रदेशाचेंही उल्लंघन करून आम्हाला जावें लागलें. पुष्कळ वेळानें आम्ही लोकालोक पर्वताच्या शिखरावरील मेघानीं शुभ्र झालेल्या आकाशांत आलों. तेव्हा उत्तर दिशेच्या पूर्वभागीं असलेल्या चंद्रासारख्या शुभ्र पीठाच्या खालीं जाऊन त्या विद्याधरीनें मला त्या शिलेपाशीं आणलें. ती शिला फार उंच व तापवून लाल केलेल्या सोन्यासारखी होती. मीं तिला सभोंवार हिंडून पाहिलें. पण विद्याधरीनें सांगितलेलें जग तेथें मला दिसलें नाहीं. तेव्हां मी तिला म्हटलें, " तुझें तें जगत् आहे कोठें ? रुद्र, सूर्य, नक्षत्रादि, सात लोकान्तर, समुद्र, दिशा, प्राण्याचे जन्मनाश, महामेघाचा संभार, पर्वताचीं शिखरें, द्वीपाची पंक्ति, कालाचे अवयव, प्राण्यांनीं भरलेले लोक, विद्याधर, गंधर्व, किन्नर, नर, अमर, दानव, ऋषि, राजे, मुनि, इत्यादि सर्व आहेत कोठें ? "

राघवा, मी असें विचारूं लागलों असतां, ती, मी शिलेला पाहून विस्मित झालों आहें, असें समजून मला म्हणाली,—'भगवन्, मी सुद्धां पूर्वीप्रमाणें हें आपलें जगत् या शिलेंत आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें असलेलें पाहत आहें. मला तें येथें दिसत आहे, याचें कारण माझा नित्य अनुभवच आहे. पण तुला तसा अभ्यास नसल्यामुळें तें दिसत नाहीं. शिवाय

सर्व सूक्ष्मार्थ पाहण्यास समर्थ असलेल्या अति शुद्ध मनोमात्र देहतेच्या विस्मरणामुळेंही तुला त्याचें दर्शन होत नाहीं, व मला त्याचें अस्पष्ट दर्शन होत आहे. मलाही दीर्घ अभ्यासामुळें हें जग नष्टप्राय दिसत आहे. पूर्वी माझें जें जग अगदीं स्पष्ट होतें तेंच मी हें आतां आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें अस्पष्ट पहात आहें. हे नाथ, फार दिवसापासून व्यर्थ उत्पन्न झालेल्या या परस्परसंभाषणव्यथेमुळें मी हें आत्मसंबंधी शुद्ध स्वास्थ्य विसरलें. दीर्घ अभ्यासामुळें जो संस्कार मनांत दृढ झालेला असतो, तन्मय सर्व दिसूं लागतें. एवढ्यासाठींच अभ्यासहीन पुरुषाचें श्रवण व मनन व्यर्थ आहे. तसेंच अभ्यासाला असाध्य असेंही कांहीं नाहीं. मुने, हा तुझा संवादभ्रम आपल्या जगाच्या सतत अभ्यासाच्या बलानें पूर्वजग-क्रमानें युक्त असलेल्या मला आपल्या वश करून घेता झाला. अर्थात् त्यामुळें तो संस्कार गुप्त झाला. कारण मागच्या भ्रमापेक्षा आतांचा भ्रम अधिक बलाढ्य असतो. एवढ्यासाठींच लौकिक शिल्प अथवा वैदिक विद्या इत्यादि फलाची इच्छा करणाऱ्या विद्यार्थ्यांस त्या त्या विद्यांच्या गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें पुनः पुनः त्याचा अभ्यास करणें, हेंच श्रेयस्कर आहे. असो; बा मुने, याप्रमाणें हा येथें अहंरूप अज्ञानभ्रम प्रौढ झाला आहे. तो ज्ञानचर्चेनें शांत होतो. तेव्हा अभ्यासाचें सामर्थ्य केवढें आहे, तें तूं पहा. या गोष्टीला आम्हा दोघांचेंच उदाहरण चांगलें आहे. मी तुझी शिष्या, अबला व बाला आहें. तथापि अभ्यासबलानें मी शिलासर्ग पहातें व तूं सर्वज्ञ गुरु असूनही पहात नाहींस. अज्ञ असतो तो अभ्यासबलानें हळू हळू तज्ज्ञ होतो. जड बाणही धनुर्धराच्या अभ्यासामुळें सूक्ष्म लक्ष्याचा वेध करून जातो. अशाच रीतीनें ही अतिशय प्रौढ झालेली मिथ्या अज्ञानविषूचिका विचाराभ्यासानें शांत होते. बा मुने, अभ्यासानें कटुद्रव्यही गोड लागूं लागतें. कडुलिंबाला अमृत समजणारे लोक या जगांत आहेत. मधालाही पुष्कळ रोगी विष मानतात. सहवासाभ्यासानें जो आप्त नसतो तोही आप्त होतो व बाल-पणापासून दूर राहिलेली माताही पुत्राला परकी स्त्री भासते. केवळ शुद्ध चिद्रूप असलेला हा सूक्ष्म देहच भावनाभ्यासानें आधिभौतिक स्थूल देह होतो. त्याच प्रमाणें तो धारणाभ्यासवशात् पक्ष्याप्रमाणें आकाशांतून

जातो. आपल्या तोंडानें दुसऱ्यास 'मीं अमुक पुण्य केलें,' असें सांगणें, या एवढ्याशा अपराधामुळें महा पुण्यें व्यर्थ होतात; मोठमोठीं ऐश्वर्यें निष्फळ होतात; पण अभ्यास कधींही विफल होत नाहीं. सतत अभ्यासानें दुःसाध्य असलेले पदार्थ साध्य होतात; शत्रु मित्र होतात; व विषें अमृत होतात. जो इष्ट वस्तूचा अभ्यास सोडतो तो अधम होय. त्याला ती इष्ट वस्तु कधीं मिळणार नाहीं. स्त्री, पुत्र, गृह, क्षेत्र इत्यादि वस्तूही इष्ट असतात. शास्त्रानेंही त्यांचा कोठें निषेध केलेला नाहीं. व मोठ्या कष्टानेंच त्या सर्वांना संपादन केलेलें असतें. यास्तव त्याचाही सहसा त्याग करणें उचित नव्हे. पण वैराग्याचा चांगला अभ्यास करून त्याच्या निर्वाहादिकाची व्यवस्था लावल्यावर युक्तिपूर्वकच त्याग करावा. म्हणजे मरणापर्यंत अत्यंत इष्ट असलेल्या जीविताचाही योगी लोक युक्तीनेच जसा त्याग करितात त्याप्रमाणेंच परिग्रहत्याग करणें उचित होय. पण तत्त्वज्ञानाचा अभ्यास तर सर्वथा अत्याज्य आहे. कारण त्याचा त्याग केल्यास देहाहंभावादिकाचा अभ्यास अवश्य होणार. त्याचें निवारण करता येणेंही शक्य नाहीं, व त्यामुळें मोक्षाची आशाही करावयास नको, असें होईल. ज्याच्या योगानें संसार असार वाटेल असा विचार करणारे पुरुष आत्मविचाराख्य अभ्यास सोडीत नाहींत व त्यामुळें तेच विस्तृत मायानदीचें उल्लंघन करूं शकतात. ज्याप्रमाणें घटाची इच्छा करणारास दिव्याची प्रभा घट दाखविते व निर्विघ्नपणें त्याच्यापाशीं नेऊन पोंचविते त्याप्रमाणें आत्मवस्तूची इच्छा करणाऱ्या पुरुषास अभ्यासलक्षण प्रकाश अभिमत आत्मवस्तु दाखवितात व निर्विघ्नपणें तिच्यापाशीं नेऊन पोंचवितात. त्यातल्या त्यात श्रवण व मनन यांचे अभ्यास असंभावनारूप अज्ञानावरण नाहींसें करून आत्मवस्तूला प्रकट करितात व निदिध्यासनाभ्यास विपरीतभावनारूप तिमिर घालवून आत्म्याच्या स्वरूपांत नेऊन पोंचवितात. जशा कल्पवृक्षाच्या लता, उत्तम चिंतामणि व शरदृतु त्याप्रमाणेंच या अभ्यासभूमि सदा फल देतात. या देहलक्षण पृथ्वींतील इष्ट वस्तु परम प्रेमास्पद आत्माच आहे. त्याचा विचार, हाच सूर्य असा प्रकाश पाडतो कीं, त्याच्या योगानें अधिकारी जन

रूपी निद्रा देणारी–रात्र पाहात नाहींत. सर्व प्राण्यांना सर्व वस्तु भासविणारा एक अभ्याससूर्यच सर्वोत्कृष्ट आहे. या चवदा लोकांनीं युक्त असलेल्या ब्रह्मांडांतील एकाही जीवाला अकृत्रिम अभ्यासावाचून इष्ट वस्तु साध्य होत नाहीं. पुनः पुनः तेंच तें करणें हा अभ्यास होय. पुरुषार्थही त्यालाच म्हणतात. यास्तव त्याच्या वाचून प्राण्याला दुसरी गति नाहीं. दृढाभ्यास नांवाच्या आत्मविवेकानेंच सिद्धि मिळते. त्यावाचून नाहीं. इंद्रियादिकांस जिंकणाऱ्या शूर पुरुषाचा अभ्याससूर्य प्रकाशमान होत असताना भूमि, जल, वन, अंतरिक्ष इत्यादिकांतील कोणतीही वस्तु सिद्ध होत नाहीं, असें नाहीं. पर्वतगुहादिकामध्यें असणारे व्याघ्र–सर्पादि भयंकर प्राणीही निर्भय होतात ६७.

**सर्ग** ६८—आधिभौतिक भ्रांति नाहींशी करून आतिवाहिक भावाची स्थिति सत्य आहे, असें समर्थन.

**विद्याधरी**—मुने, ज्या अर्थी दृढाभ्यास नामक समाधीवाचून देहादिकांच्या ठिकाणची आधिभौतिकता–भ्रांति निवृत्त होत नाहीं व आतिवाहिक भाव व्यक्त होत नाहीं आणि त्यावाचून तर दुसऱ्या सर्गाची स्थिति साक्षिप्रत्यक्षप्रमाणानें पाहता येणे अशक्य आहे, त्या अर्थी आपण आतां परमात्म्याच्या ठिकाणी सर्वबोधानुकूल समाधिरूप धारणेनें प्राचीन आतिवाहिक भावाचा अभ्यास करूं या म्हणजे त्या उपायानें आम्हाला पाषाणातील मी सांगितलेलें तें जग दिसेल.

**श्रीवसिष्ठ**—रामा, त्या विद्याधरीनें असें युक्तियुक्त भाषण केलें असतां मी त्या पर्वताच्या शिखरावर पद्मासन घालून समाधि लावीत बसलों. त्या समाधींत सर्व बाह्यार्थविचार सोडला असता चिन्मात्र–एकान्त भावना उदय पावली. त्याबरोबर मी आधिभौतिक देहादि-भावनासंस्काररूपी मळही सोडला. शरत्समय आला असता आकाश जसें निर्मल होतें त्याप्रमाणें मी चिदाकाशतेस प्राप्त होताच परा दृष्टीनें युक्त झालों. त्यानंतर सत्य वस्तूच्या अवधानाचा दृढ अभ्यास केल्यानें माझी देहाच्या ठिकाणची आधिभौतिक भ्रांति खचित अस्त पावली. आणि उदयास्तशून्य नित्य अनावृत स्वप्रकाश, महाचिदाकाशता प्रकट झाली. त्यानंतर मी जों आपल्याच अमल तेजानें पहात आहें तों मला वस्तुतः आकाशही

नाहीं व पाषाणही नाहीं तर परम तत्त्वच आहे, असें भासलें. तें परमार्थघन स्वच्छ तत्त्वच माझा आत्मा असून तोच पाषाणाच्या भावनेनें पाषाण पाहता झाला. ज्याप्रमाणें स्वप्नांत फार मोठी गृहगत शिला दिसली तरी ती केवल आकाशरूपच असते त्याप्रमाणें ती शिलाही अति शुद्ध चिदाकाश होती. आता हा सर्व व्यवहार जर स्वप्नच आहे तर आपल्या व दुसऱ्यांच्या जागृतीचा प्रतिभास कसा होतो? म्हणून म्हणशील तर सांगतों—स्वप्नात अज्ञानानेंच मी जागा आहें, असें जाणणाऱ्या दुसऱ्याच्या स्वप्नांत दिसणारा स्वप्नयुक्त पुरुष स्वरूपतः जसा मी जागा आहें, असें समजतो त्याप्रमाणेंच स्वप्नतुल्य व्यवहारांतही आपली व दुसऱ्याची जाग्रदवस्था अनुभवास येते. एवढ्यासाठींच सुषुप्तींत मारलेल्या पुरुषांच्या देहाचा अभाव झाल्यामुळें जागरणाचा उपायच नाहींसा होतो. त्यामुळें त्याची जागरता स्वप्नातच अवशिष्ट राहते, असें मी वर म्हटलें आहे. तस्मात् मूल अज्ञानाख्य निद्रेचा उच्छेद होऊन त्याच्या योगानें स्वरूपाचा साक्षात्कार होणें हीच मुख्य जागृति आहे. ती महा मोहवानासही योग्य कालीं होते. कारण एका ब्रह्मतत्त्वावाचून दुसरें काहींही अक्षय नाहीं. मी त्यावेळीं स्वरूपतः जागरणावस्थेस प्राप्त झालेलों असल्यामुळें पूर्वी पाहिलेली शिळेची आकृति स्वच्छ चिद्घन पाहिली. पृथिव्यादिरूप पाहिली नाहीं. महाप्रलयाच्या वेळीं सर्व भूतांचें जें शुद्ध पारमार्थिक शरीर असतें तेंच या तत्त्ववेत्त्यास चित्तैकाग्र्यानें प्राप्त होण्यासारखें आहे. मूर्ख ब्रह्माचें रूपच जगदाकार पाहतात. मायाशबल ब्रह्माला सत् म्हणतात. त्यातील चित्‌चा जगत्संस्कारयुक्त अंश हीच सत्ता. ती सत्ताच आतिवाहिक देह आहे. तो परमार्थतः तें पर ब्रह्मच होय आणि नित्य अपरोक्ष शुद्ध चिदंश हेंच स्वरूपकथन होय. असें जर आहे तर 'तुम्ही मन जीवाचा आतिवाहिक आहे, असें पूर्वी कसें सांगितलेंत?' म्हणून विचारशील तर त्याचेंही कारण सांगतों. तेंच सत्तारूप सर्गाच्या उदयानें जणुंकाय त्याच्या आकाराचें होतें; सर्गविषयक प्रत्यक्ष चिदाभासरूप जीवाचें पहिलें हिरण्यगर्भाख्य समष्टिरूप आतिवाहिक शरीर होतें. नंतर दुर्बुद्धीमुळें समष्टित्वही विसरून व्यष्टितेस प्राप्त झालेलें तेंच सर्वजनप्रत्यक्ष मन होतें, असें पूर्वी मी सांगितलें आहे. त्याचप्रमाणें स्वतःच चित्‌चें रूप समष्टिरूपानें योगिप्रत्यक्ष

व सर्वजनसाधारणतेनें मनःप्रत्यक्ष असेंही म्हटलें आहे. त्यांतील हें आजचें मनःप्रत्यक्ष आधिभौतिक देहादि कल्पनेनें अत्यंत असत्-रूपानेंच उद्भवलें आहे. यास्तव तें असत्प्रत्यक्षच आहे असें समज आणि तें योगिप्रत्यक्षच मुख्य प्रत्यक्ष आहे. कारण त्याच्या योगानें सत्चें यथार्थ स्वरूप स्फुरत असतें असें जर आहे तर सर्व लोकांना त्या प्रत्यक्षामध्यें परोक्षतेचा व अप्रत्यक्षामध्यें अपरोक्षतेचा अनुभव कसा येतो, म्हणून विचारशील तर बाबारे, हीच तर विचित्र माया आहे. ती असले अनेक चमत्कार करते. यास्तव रामा, तूं प्रथम उत्पन्न झालेलें आतिवाहिक देहत्व प्रत्यक्ष, सत्य, व सर्वगत आहे. व आधिभौतिक माया आहे, असें समज. सोन्याचा कडेंपणा जरी अनुभवास आला तरी तो जसा खरा नव्हे त्याप्रमाणें आतिवाहिकाचें आधिभौतिकत्व खरें नाहीं. जीव विचारावांचून भ्रमास सत्य व सत्यास असत्य जाणतो, अहाहा ! ही मूढता किती दृढ आहे ! ! स्थूल सूक्ष्माहून पृथक् किंवा अपृथक् आहे, असें जाणल्यास त्याचें स्वरूप कशा प्रकारचें भासतें, अशा पूर्वोक्त विचारानें पाहूं लागलें असता हा आधिभौतिक देह सापडत नाहीं. आतिवाहिक देह मात्र दोन्ही लोकीं अक्षय आहे. कारण मोक्ष होई तों तो या लोकीं व परलोकीं सर्व व्यवहाराचा निर्वाह करतो. मृगजळातील जलबुद्धीप्रमाणें आतिवा-हिक देहामध्यें आधिभौतिक देहसंवित् मिथ्याच उत्पन्न झाली आहे. व ती खांबाच्या ठिकाणीं जशी पुरुषबुद्धि त्याप्रमाणें देहदृष्टिवशात् प्रौढ झाली आहे. ज्याप्रमाणें शिंपीच्या ठिकाणीं रजतता, सूर्यकिरणांच्या ठिकाणीं जलता व एक चंद्राच्या ठायीं द्वित्व, त्याप्रमाणें आतिवाहिक देहाच्या ठायीं ही आधिभौतिकता मायेमुळेच उद्भवली आहे. अहाहा ! जीवाच्या ठिकाणच्या या अविचारजन्य मोहाचें माहात्म्य किती विलक्षण आहे हें ? त्यानें असत्याला सत्य व सत्याला असत्य केलें आहे. स्फूर्ति व स्पंदन असें दोनच प्रकारचें व्यवहाराचें सर्वस्व आहे. व तें दोन्ही लोकांस साधारण असल्यामुळें आतिवाहिक देहाचेंच आहे, असें विचारानंतर ठरतें. यास्तव दुसरें सर्व सोडून केवळ सर्वसाधारण प्रत्यक्षामध्येंच योगाच्या योगानें स्थिरता करावी. केवळ पामर जनांत प्रख्यात असलेल्या ऐहिकमात्र स्थूलादि प्रत्यक्षामध्यें स्थिर होऊं नये. त्याचप्रमाणें विद्वान् अनुभवी क्षणात

नाश पावणाऱ्या विषयसुखाला दुःख व केवळ योग्याच्याच अनुभवानें सिद्ध होणाऱ्या अकृत्रिम अनाद्यंत सुखालाच सुख म्हणतात. योगिप्रत्यक्षच साक्षात् आहे. यास्तव त्याचाच विचार करावा. त्रिभुवनाचा अनुभव देणाऱ्या त्याचा त्याग करून मायामय ऐहिक प्रत्यक्षाचें जो ग्रहण करतो त्याच्या सारखा अत्यंत मूढ दुसरा कोणी नाहीं. तस्मात् या सर्व भूताचें आतिवाहिक शरीरच सत्य असून त्यातील आधिभौतिक व्याप्ति असत्य पिशाचिका आहे. अहो मिथ्या संकल्पमय प्रत्यक्षाचा जन्मच जर असंभाव्य आहे तर त्याची सत्ता संभवनीय कशी असणार! आणि स्वभावतःच जें असत्य तें अर्थक्रियासमर्थ (सफल क्रिया करण्यास समर्थ) कसें असणार! राघवा, साक्षात् विषयसाधक नेत्रादिकांची जर ही अशी दशा आहे तर प्रत्यक्षमूलक अनुमानादिकां विषयीं काय बोलावें! स्वयं असिद्ध असणाऱ्या प्रमाणानें सिद्ध होणारें प्रमेय सत्य कसें असणार! अहो हत्तीसारखे मोठ मोठे जीवही ज्या प्रवाहातून तृणाप्रमाणें वाहत जातात तेथें क्षुद्र बकऱ्याची काय कथा!

तस्मात् प्रमाणसिद्ध दृश्य कोठेंही नाहीं. तर तें तें सर्व घन, ब्रह्मघन आहे. स्वप्नात पर्वत पाहणाऱ्या पुरुषाचा तो विषयरूप पर्वत जसा त्यावेळींही शून्य, कारण, त्याचवेळीं जागत असलेल्या अथवा निजलेल्या इतर पुरुषाच्या दृष्टीनें तो नसतो? त्याप्रमाणें शिळेच्या भावनेनें युक्त असलेल्या आम्हा दोघांना दृश्य असलेली ही ती शिला चित्च. आकाश-आत्माच स्वतः आपल्या स्वरूपांत वस्तुतः हा पर्वत, हें आकाश, हें जगत्, हा मी इत्यादि प्रकारें भासतो. पण ज्याप्रमाणें भारतादि कथाचें ज्ञान तें ऐकणाराला अथवा वाचणारालाच होतें व न ऐकणाराला होत नाहीं त्याप्रमाणें चित्च या सर्व पदार्थरूपानें विकास पावते. हें तत्त्व तत्त्वज्ञालाच कळतें, अतत्वज्ञ प्राकृताला कळत नाहीं. उन्मत्त पुरुषांच्या दृष्टीनें वृक्ष व पर्वत जसे खरेच नाचत असतात, त्याप्रमाणें ही अज्ञांची भ्रांतिच सत्य होऊन बसली आहे. राघवा, जे योगिप्रत्यक्ष व पूर्णानंदैकरस स्वरूप जाणूनही, त्याच्या योगानें बाधित होणारें दुसरें चक्षुरादि तुच्छ प्रमाण, प्रमाण म्हणून समजतात त्या तृणतुल्य आत्मवंचक शठाना अगदीं दूर करावें. त्याच्याशीं आपलें काहीं प्रयोजन ठेवूं नये. कारण स्वानुभवावरही

विश्वास न ठेवणारे ते दुसऱ्याच्या वाक्यावर विश्वास कसा ठेवणार! यास्तव ते उपदेशास पात्र नाहींत ६८.

**सर्ग ६९**—शिलासर्गांत प्रवेश; तेथील स्रष्ट्याचें दर्शन; चांगल्या प्रकारें आसनावर बसलेल्या मुनीचें त्याच्याशीं संभाषण.

**श्रीवसिष्ठ**—रामचंद्रा, जग हींच ज्याचीं अंगें आहेत, जें सूर्यादि ज्योतींचा अविषय आहे, जें चक्षुरादि इंद्रियाचाही विषय होत नाहीं, व जें निरामय आहे तें ब्रह्मच दृश्यासारखें भासतें; पण हें तत्त्व परा दृष्टीनें कळतें. त्या सत्ता व स्फूर्ति देणाऱ्या अधिष्ठान ब्रह्मामध्यें पर्वत, नद्या, झरे आणि इह व परलोकाचे भ्रम भ्रांतीनें आरशातील प्रतिबिंबाप्रमाणें भासतात. असो; रामा, नंतर ती अकुंठगति विद्याधरी त्या शिळेंतील सर्गांत शिरली. संकल्प हेंच ज्याचें रूप आहे, असा मीही तिच्याबरोबर त्या शिळेच्या उदरात गेलों. ती मोठी उद्यमी स्त्री त्यातील ब्रह्म लोकास जाऊन विरिंचीच्या पुढें बसली. आणि म्हणाली " हे मुनिश्रेष्ठा, हा माझा पति. तो या मला पाळीत असतो. पूर्वी यानें मनानें मला विवाहाकरितां निर्माण केलें. पण तो पुराण पुरुष मी वृद्धही झालें, तरी अद्यापि मजशीं विवाह करीत नाहीं. त्यामुळें मला वैराग्य आलें. मजप्रमाणेंच यालाही वैराग्य आलें आहे. तो आता जेथ द्रष्टृता, दृश्यता व शून्यताही नाहीं त्या परम पदास जाण्याची इच्छा करीत आहे. आता या जगाचा महाप्रलय समीप आला आहे. पण हा शैलमौनापासून न ढळणाऱ्या पर्वताप्रमाणें ध्यानापासून चंचल होत नाहीं. यास्तव हे मुनीश्वरा, मला व यालाही बोध करून महाकल्पापर्यंत (वैज्ञानिक प्रळयापर्यंत) जे जे सर्ग प्रसिद्ध आहेत त्याच्या मूलभूत ब्रह्मसंज्ञक मार्गांत नियुक्त कर.

रामभद्रा, ती विद्याधरी मला असें बोलून ब्रह्मदेवाला बोधयुक्त (जागें) करण्याकरितां म्हणाली,–' हे नाथ, हा मुनिनायक आज आमच्या या घरास आला आहे. हा दुसऱ्या एका जगद्रूपी गृहांतील ब्रह्मदेवाचा पुत्र आहे. आपल्या येथें आलेल्या, याची तूं गृहस्थांच्या गृहांत उचित असलेल्या पूजनानें पूजा कर. हा मुनिश्रेष्ठ, पूज्य आहे, असें तूं जाण व अर्घ्यपाद्यादि सामग्रीनें याचा सत्कार कर. कारण हे महात्मन्, तुझ्यासारख्या

महात्म्यांस मोठ्या पूजेनें प्राप्त होणारें मोठें फळच रुचतें. क्षुद्र फळ रुचत नाहीं.'

ती साध्वी असें बोलतांच समुद्रांत जसा तरंग त्याप्रमाणें आत्मचैतन्य-रसरूप असलेला तो बुद्धिमान् ब्रह्मा समाधि सोडून जागा झाला. त्यानें हळू हळू आपले नेत्र उघडले, वसंतसमयीं पालवी नव्या रसाला जशी प्रकट करते, त्याप्रमाणें त्याच्या तनूनें (अंगानीं) त्याच्या संवित्‌ला प्रकट केलें. प्रातःकाळीं ज्यांतील कमळें फुललीं आहेत अशा सरोवराकडे जशा हंसांच्या पंक्ति येतात. त्याप्रमाणें ब्रह्मा देहभानावर येताच देव, सिद्ध, अप्सरांचा संघ इत्यादि सर्व त्याच्यापाशीं आले. डोळे उघडतांच तेथें प्राप्त झालेल्या मला व त्या विलासिनीला त्यानें पाहिलें व नंतर तो वेधा प्रणव-पूर्वक स्वरांनीं सुंदररीतीनें असें बोलला—

**अन्यजगद्ब्रह्मा**—हे ज्ञानामृतरूपी जलाने भरलेल्या महा मेघा, व हे असार संसारातील सार करामलकवत् पाहणाऱ्या मुने, तुझें स्वागत असो; तूं या फार दूर प्रदेशास प्राप्त झाला आहेस. फार दूरचा मार्ग चालून आल्या कारणानें तूं अतिशय श्रान्त झाला असशील. यास्तव या आसनावर बैस.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, त्यानें मला असें सांगितलें असता मी 'भगवन्, आपल्याला अभिवादन करितों.' असें म्हणून त्यानें नेत्रसंकेतानें दाख-विलेल्या रत्नमय आसनावर बसलों. त्याबरोबर देव, ऋषि, गंधर्व, मुनि, विद्याधर, इत्यादिकांनीं स्तुति, पूजा, युक्तव्यवहारनियति इत्यादि आरंभिल्या. त्यानंतर दोन घटिकांनीं तो सर्व संवेग शांत झाला असतां मी ब्रह्मदेवाला म्हटलें, 'भगवन्, हें काय? ही स्त्री मजपाशीं येऊन आम्हांला ज्ञानवाणीनें बोध कर' असें कां म्हणत आहे? आपण भूतेश्वर देव ज्ञानपारग असतांना ही कामामुळें मूर्ख झालेली अबला मला असें काय म्हणत आहे तें सांगा. त्याचप्रमाणें हे देव, आपली भार्या होण्यासाठीं निर्माण केलेल्या हिच्याशीं आपण विवाह कसा केला नाहीं. तिला विरस कसें केलें?

**अन्यजगद्ब्रह्मा**—मुने, हें सर्व कसं झालें, तें मी सांगतों, ऐक. कारण संतांना यथार्थवृत्तच सांगणें उचित असतें. अज, शांत, अजर,

च सत्‌च असें कांहीं आहे. त्या प्रकाश-एकरूप तत्त्वापासून मी प्रकट झालों आहें. मी आकाशरूपच आहें. सर्वदा आत्म्यामध्यें स्थित आहें. व्यवहार करणाऱ्या प्रजेच्या सर्गाची उत्पत्ति होऊन तो स्थित झाला असतां त्यातील लोकाच्या दृष्टीनें माझें व्यावहारिक स्वयंभू असें नाव होईल. पण वस्तुतः मी उत्पन्न झालों नाहीं व कांहीं पहात नाहीं. मी चिदाकाश अनाच्छादित होऊन चिदाकाशांत राहतों. ज्याप्रमाणें एकच अखंड समुद्र तरंगाच्या भेदानीं एकमेकांवर आघात करून विचित्र ध्वनि करतो त्याप्रमाणें त्या एकरस आत्म्यामध्यें हा, तूं, माझा, अहं, तुझा, इत्यादि परस्पर नामभेदानीं व्यवहार होतो. सारांश, समुद्रतरंगाप्रमाणें किंचित्कल्पित स्वपरदृष्टीनें ज्ञेयभेदरूप, कालवशात् किंचित् स्वरूपविस्मरणामुळें अस्पष्ट आकार व त्यामुळेंच किंचित् आभासमात्र अशा माझ्या स्वरूपात मी व माझें अशी जी वासना उदय पावली तीच कुमारीहून भिन्न असलेल्या तुला कुमारीरूपानें पृथक् दिसत आहे. पण माझ्या दृष्टीनें ती मला मजहून पृथक् भासतच नाहीं. मुने, विनाश न पावणाऱ्या सत्तेपासून उदयच न पावलेला मी आत्मस्वरूपात स्थित आहें. मी स्वतःच्या भावापासून च्युत झालेलों नाहीं. मी स्वात्म्यामध्ये रममाण होणारा व स्वयंप्रभु आहें. वसिष्ठा, पूर्व पूर्व अहंकारसंस्कारापासून उत्पन्न झाल्यामुळें स्मृतिसदृश असलेल्या त्या अहंअशा भ्रांतीची व जगत्स्थितीच्या वासनेची जी अधिष्ठात्री देवता तीच ही माझ्या संकल्पामुळें देहाकार होऊन राहिली आहे. ती माझी गृहिणी नव्हे व मी तिला भार्या करण्याकरिता निर्माणही केलेलें नाहीं. तर ही अंतःस्थजगद्वासना आपणच आपल्या भावनेमुळें मी ब्रह्मदेवाची भार्या आहें, असें जाणून व्यर्थ अतिशय दुःख भोगीत आहे ६९.

**सर्ग ७०**—वासनादेवीच्या वैराग्याचें कारण, जगाचा प्रलय व मिथ्या भ्रममात्रता.

**अन्यजगद्ब्रह्मा**—आतां माझें स्वसंकल्पानें कल्पिलेलें दोन परार्ध आयुःप्रमाण संपलेलें असल्यामुळें चिद्विवर्तरूप मी चिदाकाश निरतिशयानंदरूप दुसऱ्या आकाशमयी ( ब्रह्माकाशमयी ) कैवल्य स्थितीस जाण्याची इच्छा करीत आहें. त्यामुळें या जगाचा नित्य–नैमित्तिक, दैनंदिन, व आत्यंतिक असा पुराणात सांगितलेला चारी प्रकारचा क्षय समीप आला

आहे. यास्तव हे मुनींद्रा, मी आता या महाप्रलयसमयीं तिचा त्याग करण्यास आरंभ केला आहे. त्यामुळें ही क्षयोन्मुख झाली आहे. मी जेव्हां चित्ताकाशता सोडून आद्य ब्रह्माकाश होईन तेव्हा महाप्रलय व वासनेचा क्षय होईल. वस्तुस्थिति अशी असल्यामुळें ही विरस होऊन माझ्या मागोमाग धांवत आहे. कोणता मतिमान् प्राणी आपल्या निर्मात्याचें अनुकरण करीत नाहीं ? शेवटचा कल्प, शेवटचें मन्वन्तर व शेवटचें कलियुग याचा हा परिसमाप्तिकाल आला आहे. त्यामुळें आता प्रजा, मनु, इंद्र व देव याचा प्रलय होईल. आजच कल्पान्त महाकल्पान्त, माझ्या वासनाचा अन्त ( आत्यंतिक वैज्ञानिक प्रलय ) व देहव्योमान्त ( प्राकृत प्रलय ) असा चारी प्रकारचा प्रलय एकाच वेळी उपस्थित झाला आहे. हे ब्राह्मणा, आत्मदर्शनाची इच्छा इत्यादि कारणामुळें ही वासना क्षय पावण्यास उद्युक्त झाली आहे, कारण कमलाचा ताटवा सुकून गेल्यावर त्याच्या सुगंधाचा लेश कसा राहणार ! पण हिला आपल्याच विनाशास कारण होणारी आत्मदर्शनाची इच्छा कशी होते म्हणून म्हणशील तर त्याचें कारण सांगतों—ज्याप्रमाणें जड सागरापासून तरंग आपोआप उत्पन्न होतो त्याप्रमाणे या वासनेपासून विशेष कारणावाचूनच इच्छा व्यर्थ उद्भवते. अभिमान हाच जिचा देह आहे, अशा वासनेची आत्मदर्शनेच्छा स्वाभाविकपणेंच होते. आत्मज्ञानाकरिता करीत असलेल्या धारणाभ्यासाचें दुसऱ्या ब्रह्माडादिकांत जाणें इत्यादि सिद्धि हें आनुषंगिक फल आहे. यास्तव त्या प्राप्त सिद्धींची प्रतीति पहावी, असें वाटल्यामुळें ही तुमच्या सृष्टींत आली व त्यातील धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांकरिता आपापल्या अधिकाराप्रमाणें प्रयत्न करणाऱ्या लोकांस हिनें पाहिले. ( पूर्वी सांगितलेल्या ) शिलेचें दर्शनही हिला आकाशसंचारसिद्धीमुळें झालें. तिला आकाशरूप असलेलीही ही शिला आपल्या जगाचा आधार आहे, असें भासलें. आमच्या जगत् या वस्तूमध्यें दुसरींही जगें आहेत. पण भेददृष्टीमध्यें ( व्युत्थानदशेंत ) स्थित असलेल्या आम्हांला तीं दिसत नाहींत. तथापि समाधीच्या योगानें बोधैकरूपतेस प्राप्त झालेल्या आम्हांला योगदृष्ट्या तीं दिसतात. आम-

च्या या शिलेमध्यें ज्याप्रमाणें जग आहे त्याप्रमाणेंच घट, वस्त्र, वड, भिंत, आकाश, अग्नि, जल, तेज, इत्यादि सर्वांमध्यें जगें आहेत. कारण, जग म्हणजे स्वप्नभ्रमतुल्य व्यर्थ भ्रांति आहे. ती कोठें बरें असणें शक्य आहे ! कारण ती जर आहे असें म्हटलें तर अधिष्ठानचिद्रूपच आहे. जशी प्रतित होते तशी जडरूप नाहीं. हिचें यथार्थ ज्ञान झालें असतां ही चिदाकाशाशीं एकरूप होऊन जाते. त्यामुळें ज्ञानी शिष्ट मोहित होत नाहींत. ते भ्रमाचें भाजन होत नाहींत. असो; बा मुने, वर सांगितल्याप्रमाणें हिला वैराग्य प्राप्त झालें असतां आपल्याला इष्ट असलेलें आत्मज्ञान व त्याचें साधनभूत श्रवणादिक यास तुझ्या उपदेशानें साधणाऱ्या हिनें अन्य ( दुसरें जग पाहणें, आकाशगमन, इत्यादि ) सिद्धींस कारण होणाऱ्या धारणाचा अभ्यास केला. त्यामुळें प्राप्त झालेल्या सिद्धींच्या बलानें तुझ्या सकल्पित समाधिस्थानास जाणून ही तुजपाशीं गेली व गुप्त असलेल्याही तुला पाहती झाली. तात्पर्य, याप्रमाणे जीव-चित्‌ची शक्ति अविद्या गारुड्याच्या मायेप्रमाणें विकास पावते. ब्रह्माची मायाशक्तिही अशीच विकास पावते. पण ती आद्यन्तरहित व विद्येच्या योगानें तिच्या आवरण शक्तीचें निरसन झालेलें असल्यामुळें अनामय आहे. ( अर्थात्‌ जीवाच्या अविद्येहून ईश्वराच्या मायेमध्यें हा विशेष आहे. ) वस्तुतः या जगातील कोणतेंही कार्य उत्पन्न किंवा नष्ट होत नाहीं. तर केवल चितिच द्रव्यासारखी कालासारखी व क्रियेसारखी प्रकाशित होते. मुने, देश, काल, क्रिया, द्रव्य, मन, बुद्धि इत्यादि हे सर्व जणुं काय चित्‌-शिलेची प्रतिकृतिच आहे. यास्तव तें उदयास्तशून्य आहे. ही चित्‌च शिलाकार होऊन राहिली आहे. वायूच्या स्पंदाप्रमाणें जगज्जाल हें हिचेंच अंग आहे. ती भ्रांत स्वभावामुळें आपल्या विज्ञानघन स्वरूपासच जग पाहते. ती आदि-अंतरहित असूनही देश, काल व वस्तुकृत परिच्छेदयुक्त होते. ही आदि-अंतरहित चिच्छिला आदि-अंतयुक्त आहे, असें जाणल्यानें वस्तुतः निराकार असतानाही साकार होऊन जिच्या अंगात अनेक जगें आहेत, अशी होते. ज्याप्रमाणें स्वप्नात चिदाकाशच आपल्या रूपास नगर जाणतें त्याप्रमाणें जागरांतही चिदाकाशच जगत्‌-अंगयुक्त पर्वतावरील पाषाणास

पाहतें. पण जागें होतांच स्वप्न जसें बाधित होतें ( मिथ्या ठरतें ) त्याप्रमाणें याचाही ज्ञानानें जागें होतांच बाध होतो. कारण सर्व चिन्मय आहे, समुद्रांतील तरंगांप्रमाणें जलरूप आहे असें साक्षात् समजलें म्हणजे या लोकीं नद्या, पर्वत, वृक्ष विषय इत्यादि कांहींएक पृथक् भासत नाहीं. या संविदाकाशांत महाकल्प-कल्पान्त इत्यादि संवित् पृथक् संभवतच नाहींत. बा वसिष्ठा, असा खरा प्रकार असल्यामुळें अध्यारोपदृष्टीनें पाहिल्यास अनंत जगें सदा सर्वत्र चित्सत्तेनें असलेलीं दिसतात. त्यावेळीं कशाचाही यत्किंचित् सुद्धां अपलाप करितां येत नाहीं. पण तेंच अपवाददृष्टीनें पाहूं लागल्यास काहींही चित्स्वरूपाहून भिन्न आहे, असें समर्थन करितां येत नाहीं. यास्तव मुने, तूं आता आपल्या जगास जा व त्यातील आपल्या पूर्वींच्या कल्पित आसनावर बसून समाधीच्या योगानें शांतिसुखाचा अनुभव घे. मी कल्पिलेलीं हीं बुद्ध्यादि जगद्रूपें प्रलयद्वारा आपल्या अव्यक्तसंज्ञक कारणात लीन होवोत. आणि आम्ही हिरण्यगर्भाच्या उपाधिसहित मूल अज्ञानाचा बाध झाल्याकारणानें कैवल्यनामक परम पदास जातों ७०.

**सर्ग ७१**—विधात्याच्या संकल्पाचा उपशम ज्या क्रमानें होत गेला त्याच क्रमानें त्यानें कल्पिलेल्या भूतांचा प्रलय झाला.

**श्रीवसिष्ठ**—रामा, भगवान् ब्रह्मा मला असें सांगून त्या लोकांतील जनासह पद्मासन घालून पुनर्व्युत्थानरहित समाधीमध्यें तत्पर झाला. ओंकाराच्या अर्धमात्रेंतील नाद, बिंदु, शक्ति, व शांतसंज्ञक भागामध्यें क्रमानें चित्तलय करून तो सर्ववासनाशून्य झाला. चित्रांत काढलेल्या आकाराप्रमाणें तो निश्चेष्ट व सर्वबाह्यज्ञानरहित झाला. त्याची ती वासनाही त्याचेच अनुकरण करून तशीच ध्यानामध्यें स्थित झाली. त्या कारणानें तिचे स्मृतीस कारण होणारे बीजभूत अंश ( संस्कार ) शांत झाले. त्यामुळें ती स्वतः आकाशरूपिणी झाली. पण हें त्यांच्या मनातील रहस्य तुम्हांला कसें कळलें म्हणून विचारशील तर सांगतों—तो संकल्परहित परमात्मा वासनाक्षयामुळें उत्तरोत्तर सूक्ष्मभावास प्राप्त होऊं लागला असतां मीही समाधीच्या योगानें अनंत चिदाकाशरूप होऊन तें सर्व पाहिलें. त्या विधीचें संक-

त्पन त्या क्षणापासून जसें जसें विरस होत चाललें तशी तशी पर्वत द्वीप, सागर इत्यादिकांसह पृथ्वीची तृण–गुल्मादिकास उत्पन्न करण्याची शक्ति व तशीच जलादिकांची शक्तिही अस्त पावूं लागली. मरावयास टेंकलेल्या विद्वानाचें सर्व देहव्यापी संवेदन शांत झालें असतां त्याचीं अगें जशीं निःसंज्ञ व विरस होतात त्याप्रमाणें विधीचें संवेदन क्षीण झालें असतां त्याच्या अवयवरूप पृथ्वीप्रभृति भूतांमध्यें वैरस्य आलें. पृथ्वी मृतपुरुषाप्रमाणें विचेतन व जर्जर झाली. तिच्यामध्यें एकाचवेळीं अनेक महा उत्पात झाले. दुष्कर्मरूपी अग्नीनें जळलेले मानव नरकोन्मुख झाले. पृथ्वी दुर्भिक्ष, राजाची लूट, चोर इत्यादि उपद्रवानीं दरिद्रा झाली. दुःखशील व सर्व स्त्रियाशीं व्यभिचार करणाऱ्या पुरुषांनीं भरून गेली. धुळीप्रमाणें धुक्यानें सूर्य आच्छादित व त्यामुळेंच धूसर झाला. ठिकठिकाणीं आगी लागल्या; अतिवृष्टि झाल्या; भूकंपांनीं नगरें नाहींशीं केलीं. नद्या आटल्या; रोग उत्पन्न झाले; व त्यामुळें सर्वत्र हाहाकार पसरला. वर्णसंकर झाला; अधर्मानें आपलें साम्राज्य स्थापिलें, सर्व दुर्व्यसनें लोकामध्यें शिरलीं. मंदिरें, धर्मशाळा, पाठशाला, अन्नसत्रें, तीर्थें, क्षेत्रें याचा उच्छेद झाला. साराश, याप्रमाणें ब्रह्मा संवेदनरहित झाला असता पृथ्वी ( प्रलय समीप आल्यामुळें ) आपला स्थूलभाव सोडून सूक्ष्म झाली. त्याचप्रमाणें विधि जलभागातूनही आपल्या चैतन्याचा उपसंहार करूं लागला असता सातही सागर क्षुब्ध झाले. त्यानीं आपली श्रेष्ठ मर्यादा सोडली. त्याचा आश्रय करून राहणारे जलचर प्राणी अतिशय दुःखी झाले. जलाच्या असह्य वेगानें पर्वत फुटले. जलचर व स्थलचर प्राण्याचीं युद्धें सुरू झालीं. भूलोकाप्रमाणें त्या ब्रह्माडातील इतर लोकाचाही प्रलय सुरू झाला. त्यामुळें ब्रह्मलोकापर्यंत सर्व प्राण्यांचा मोठा आक्रोश ऐकूं येऊं लागला, व शेवटीं अन्य लोक, पर्वत, नगरें, समुद्र, अरण्यें इत्यादिकासह सर्व जग नाश पावलें ७१.

**सर्ग ७२**—धात्याच्या प्राणनिरोधानें वातस्कंधस्थितीचा क्षय. पुनः प्रश्न केल्यामुळें, पुढील विराट्स्थितीचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—नंतर विराडात्म्या स्वयंभूनें आपल्या प्राणास आपल्या हृदयप्रदेशीं उपसंहृत करण्यास आरंभ केला असता वातस्कंधांत स्थित

असलेला वायु ग्रह—नक्षत्रविमानादिकास धारण करण्याची मर्यादा सोडता झाला. ब्रह्मदेवाच्या प्राणवायूचा म्हणजेच त्या वातस्कंधाचा उपसंहार झाला असता पूर्वोक्त मर्यादा सोडून साम्यावस्थेस प्राप्त होण्याकरिता ते क्षुब्ध झाले. त्याबरोबर वातयुक्त जळणाऱ्या अग्नीपासून जशीं किटाळें उडतात किंवा वाऱ्यानें झाडावरील फुलें भूमीवर पडतात त्याप्रमाणें ग्रह, नक्षत्रें, तारा इत्यादि ऊर्ध्व जगातील पदार्थही प्रळयाग्नीत जळून जाण्याकरिता कोसळू लागले. जगात संपादन केलेल्या पुण्याच्या फळ-भोगभूमिच, अशा विमानपंक्ति काल-परिणामामुळें व भोगमूलक कर्म संपल्याकारणानें खालीं पडल्या. ब्रह्मदेवाचा संकल्प क्षीण होताच सिद्धाच्या गति कुंठित झाल्या. किंबहुना आकाशगमनादि सिद्धि क्षयिष्णु व तुच्छ असल्यामुळेंच आकाशात कल्पवायु वेगानें भ्रमण करूं लागले असता सिद्धाच्या परपरा तोंडातून शब्द काढण्यासही असमर्थ होत्सात्या भराभर खालीं पडल्या. इंद्रादिकाच्या नगरानीं युक्त असलेलीं मेरूचीं शिखरें कोसळलीं.

श्रीराम—भगवन्, चतुर्मुख ब्रह्मा चितिसंकल्पमात्र मनोरूप आहे व ब्रह्मांड हें त्याचें शरीर आहे, असें जगात शास्त्रज्ञाना माहीत आहे. तेव्हा त्या संकल्पमात्ररूप ब्रह्मदेवाचे भूर्लोकादि लोक अवयव कसे? कारण अमूर्त मनाचीं मूर्त अगें संभवत नाहींत. बरें तीं संभवतात, असें जरी म्हटलें तरी भूर्लोक हें त्याचें कोणतें अंग? त्याचप्रमाणें स्वर्ग, रसातळ इत्यादि हीं त्याचीं कोणतीं अगें? अथवा चतुर्मुखाचा देहही मूर्त आहे, असेंच आपण समजूं या. तरी अल्प परिमाणानें युक्त असलेल्या त्याचींही फार मोठ्या प्रमाणानीं युक्त असलेलीं भूः, भुवर् इत्यादि भूतें अंगें कशीं होऊन राहिलीं? बरें तो ब्रह्माही विस्तृत आहे, अशा कल्पनेनें तो ब्रह्मांडात्मक आहे, असें जरी म्हटलें तरी तो आपल्याच शरीराच्या म्हणजे या ब्रह्मांडाच्या आंत सत्यलोकांत कसा राहतो? शिवाय ब्रह्मा संकल्प-मात्ररूप, निराकार, व अमूर्तच आहे आणि हे जग साकार होऊन राहिलें आहे, असा माझा निश्चय झाला आहे. पण यापेक्षां जर कांहीं निराळा प्रकार असला तर तोही मला सांगा.

श्रीवसिष्ठ—रामा, अगोदर तर तूं असें समज कीं, हें सत् किंवा

असत् नाहीं, तर सर्व एक, निरामय, चिन्मात्र, आणि सर्व अभिलाष व दिशा यांचें पूरक परमाकाश आहे. तेंच हें परमाकाश आपलें स्वरूप न सोडता (म्हणजे कोणत्याही विकारास प्राप्त न होता ) आपल्याच आकाशतेची कल्पना करीत आपल्याहून भिन्न वस्तूस जाणतें. त्यांतूनही बोध्य–बोध–बोद्धृ-भावरूप त्रिपुटीच्या मननानें घनीभाव प्राप्त झाल्यामुळें मनोवेषानें स्थित होणारें चेतन जीव आहे, असें तूं जाण; पण तेथवर म्हणजे त्रिपुटीजीवभावापर्यंत जें स्थितिजाल अध्यासानें उद्भवलें आहे त्यांत वस्तुतः काहींही साकार नाहीं. तर सर्व शुद्ध आकाशच आहे. भासणारें हें सर्व त्या शिव–चिदाकाशाहून निराळें नाहीं. त्याचप्रमाणें अभिमानाकाराची भावना केल्यामुळे ते चिदाकाशच तदाकार भासूं लागतें. या अहंकाराच्या कल्पनेनंतर त्याची स्थूलदेहकल्पनाही असत्यच होय. तो शून्य असूनही स्वप्नातील नगराप्रमाणें भासतो. प्रलय, मोक्ष इत्यादि दुसऱ्या सर्व कल्पनाही अशाच मिथ्या आहेत. संवित् निर्मल असल्यामुळें जीव तिच्या बळानेंच सर्व विषयांचा अनुभव घेऊन पुनः तिच्यामध्यें शात होतो. आमचें अतत्त्वज्ञान जेव्हा विस्तार पावलेलें असतें तेंव्हां हें शून्य संसरणही सत्यसें होऊन बसते; पण यथार्थ ज्ञान झालें असतां मिथ्यावासना याच जन्मात शात होते, व त्यामुळें अद्वैत निरहकार बनल्यामुळें त्यानंतर मोक्ष अवशिष्ट राहतो.

रामभद्रा, वस्तुस्थिति अशी असल्यामुळें हा जो ब्रह्मा तेंच हे जग स्थित आहे. बा दशरथपुत्रा, विराट् ब्रह्मदेवाचा जो देह तेंच हे जग होय सकल्पाकाशरूप अशा त्याची जी उद्भवलेली भ्राति तेंच हें जग दिसत आहे, त्यालाच ब्रह्माड असें म्हणतात. ( अर्थात् ब्रह्माडालाही स्थूलदेहत्व भ्रातीनेंच भासतें. विचारदृष्टया पाहिल्यास त्याला ब्रह्मदेवाचें मनोमात्रत्व आहे. त्यामुळें त्याच्या अंगाच्या उपसंहारानें त्या त्या स्थूलाचाही उपसंहार सिद्ध होतो. ) अथवा स्वप्न पाहणारा पुरुष जागा होऊं लागला असता स्वप्नातील देहाच्या अंगाचा उपसंहार होऊं लागतो. व त्याबरोबर स्वाप्न भूरादि लोकाचाही उपसंहार होतो. त्याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या अंगोपसंहाराबरोबर त्यानें, स्वाप्न-सृष्टीप्रमाणेंच, केवळ संकल्पानें बनविलेल्या भूमि, अप् इत्यादि अंगांचा उपसंहार होऊं शकतो. ( कारण संकल्पाकाशरूपत्व दोन्ही सृष्टींत सारखेंच असतें. )

तस्मात् जगत् , त्वपणा अहंपणा इत्यादि खरें नाहीं. कारण त्याच्या खरेपणाची कारणादि सामग्री आढळत नाहीं. म्हणून हे राघवा, मी शांत व सर्व विशेषशून्य होऊन राहिलों आहें, तूंही मजप्रमाणेंच वासनाशून्य, शांतचित्त, मौनी व चापल्यशून्य, होऊन जें जें प्राप्त होईल तें तें कर अथवा नको करूं. मी करीनच अथवा कांहीं झालें तरी करणार नाहींच, असा एकाचविषयीं आग्रह कशाला धरतोस? सारांश सर्व दृश्य ब्रह्मच आहे. भ्रांत्याकार परिणाम पावलेलीं त्याचीं अज्ञानेंच दृश्याचे अनुभव आहेत ७२.

**सर्ग ७३**—पुन. बोध दृढ होण्यासाठीं आरोपाचा क्रम वर्णितात व याचीं अर्गें कशीं इत्यादि प्रश्नांचें उत्तर देतात.

**श्रीराम**—भगवन् , बंध, मोक्ष, जगत् , इत्यादि बुद्धि शून्यही नव्हे व सत्‌ही नव्हे. कारण तिचा विषय बंधादि जरी असत् आहे तरी सर्वसाक्षित्वामुळें ती स्वतः अस्त किंवा उदय पावत नाहीं. यास्तव ती सर्वसाक्षिणी बुद्धिच विषयाचा निरास केला असता, वाङ्मनसागम्य, आद्य ब्रह्म आहे, असें जें आपण मला तात्पर्यतः सांगितलेंत तें मी जाणलें. पण अद्यापि माझी तृप्ति झाली नाहीं. यास्तव असलेंच उपदेशामृत मला आपण पुनः पाजा. सर्गादि भ्रमदृष्टि, शून्यतादि दृष्टि, इत्यादि कोणत्याही दृष्टि सत्यही नाहींत व असत्यही नाहींत. अशी स्थिति असल्यामुळें जें सत्य आहे ते सर्व मी जाणलें आहे. तथापि तोच मोठा बोध दृढ होण्यासाठीं पुनः सृष्टीचा अनुभव सांग.

**श्रीवसिष्ठ**—रामा, हें जें सर्व प्रकारांनीं संपन्न व देशकालक्रियात्मक स्थावरजंगमात्मक जग दिसत आहे ते नाश पावून महा प्रलयनामक प्राकृत प्रलय झाला असता ( म्हणजे सर्व स्थूल भूतभौतिकाचा सूक्ष्मभूतांत नाश होऊन त्याचा अव्याकृतात लय झाला असतां ) व त्यामुळें ब्रह्मा, उपेंद्र, इंद्र, मरुत, रुद्र, महेंद्र, इत्यादिकांचा परिणाम (अभाव) झाला असतां काहींएक अनिर्वचनीय शांत अतिस्वच्छ अज अनादि सत् राहिलेलें अनुभवास येतें. त्याचें वाणीनें वर्णन करवत नाहीं म्हणून तें अनिर्वचनीय होय. आकाश इतर पदार्थांच्या अपेक्षेनें शून्य व अति सूक्ष्म जरी असलें तरी त्याच्या अपेक्षेनें फार स्थूल आहे. त्याचप्रमाणें इतर पदार्थांच्या अपेक्षेनें अतिशय मोठें असलेलेंही

हें ब्रह्मांड त्याच्या अपेक्षेनें अतिशय सूक्ष्म आहे. कालप्रमाणाच्या सूर्यादि उपाधि शांत झाल्या असतां प्रलयास आरंभ होतो. त्यांत सृष्टि-समयाप्रमाणें कालप्रमाण कांहीं नसतें. तथापि सृष्टिइतकाच, म्हणजे ब्रह्मदेवाच्या द्विपरार्ध आयुःप्रमाणाइतका, काळ लोटला असतां त्या शांत व अनुभवात्मक परमाकाशांत असंकल्प व महाशांत ( मायावरणांत सुप्त-प्राय ) चिदाकाश स्वप्नोन्मुख झाल्याप्रमाणें आपल्यामध्यें लीन झालेल्या जगत्संस्काररूप परिणामतेस जाणतो. त्या असत्य परिणामाचीच आतल्या आंत भावना करीत तो स्वतः स्वप्नासारखा होतो. त्या भावनेनेंच किंचित् स्थूल भाव प्राप्त होत असल्यामुळें तेंच चिदाकाश ब्रह्म या नावास पात्र होतें. पण त्याचेंही कारण चित्स्वभावच आहे. त्यामुळेंच द्रष्टृताभाव प्राप्त होतो. 'एका चिदाकाशालाच द्रष्टृ-दृश्य-भाव कसा येतो; कारण द्रष्टा व दृश्य म्हणजेच विषयी व विषय याच्यामध्यें प्रकाश व अंधकार याच्या इतकाच दृढ विरोध आहे. तेव्हां एकालाच असा विरोधीभाव प्राप्त होणें युक्त नव्हे' असें म्हणशील तर त्याचेंही उत्तर देतो. बाबारे, स्वप्ना-प्रमाणेंच विरोधाचें पर्यालोचन न केल्यामुळें विरोधी द्रष्टृ-दृश्य भावही उत्पन्न होऊं शकतो. पण तो भाव मिथ्या असल्यामुळें चिदाकाशाच्या वास्तविक एकतेची कांहीं हानि होत नाहीं. असो; नंतर तो द्रष्टाच माया-बलानें आपण प्रकाशस्वभाव पण अणु ( परिच्छिन्न ) आहों, असें समजून आपल्या वृद्धीची कल्पना करतो. त्याचवेळीं देश, काल, क्रिया, द्रव्य, द्रष्टा, दर्शन, इत्यादि कल्पनाही अवश्य होतातच. पण त्या वाणीचा विषय होत नसल्यामुळें अनुदित या नावानें प्रसिद्ध असतात. त्याच्या विभागाची कल्पना कशी होते, तेंही सांगतो. जेथें तो चिदणु भासला तो देश, जेव्हां भासला तो काल, जें त्याचें भान तीच क्रिया व जें उपलब्ध झालें तेंच द्रव्य होय. अर्थात् त्या दृश्याबरोबरच साक्षी व त्याच्या आलोकनाचें साधन याचीही कल्पना होते. अशाच रीतीनें कर्ता, कार्य, करण; भोक्ता, भोग्य, भोग, इत्यादि त्रिपुटींची, त्याच्या साक्षीची व त्यांच्या निमित्ताची सर्वत्र कल्पना करावी. त्रिपुटीची कल्पना झाली म्हणजे मग चक्षुःप्रभृति इंद्रियांची कल्पना, तीं त्याहून पृथक् राहत नसल्यामुळेंच निराळी करावी लागत नाहीं. तर पूर्वोक्त जीवसंज्ञक चिदणु

रूपादि विषयांस ज्या छिद्राच्या व त्यांतील ज्या सूक्ष्म करणांच्या योगानें पहातो तीं इंद्रियें होत. त्यांच्या शब्दादि विषयाचें जें प्राक्तन (पूर्वीचें) नामरहित स्वरूप त्यालाच तन्मात्र असें म्हणतात. कारण तें अतिशय सूक्ष्म असतें. असो; रामा, अशा क्रमानें चिदणूचें प्रातिभारूप आकाशच घनस्थिति होऊन स्थूल देह बनतें. व त्यातच रूपादि-अनुसंधानवशात् इंद्रियपञ्चक उत्पन्न होतें.

आतां अंतःकरणचतुष्टयाची कल्पना कशी होते तें सांगतों-चिदणूचें अनुसंधान असेंच, शब्दादि विषयाचा पुनः पुनः अनुभव आल्याकारणानें, पुष्ट होतें. त्यालाच इंद्रियगृहीत विषयाच्या स्मृतिदशेंत ज्ञान, चित्त असें, निश्चय अवस्थेंत बुद्धि असें, संकल्पविकल्पदशेंत मन असें व अभिमानानें (अहमम-भावानें) अभिनिविष्ट झाले असतां अहंकार असें म्हणतात. आता आत्म्याने देश-कालपरिच्छेद कसा अंगीकृत केला तें सांगतों-ज्या चिदणूला शब्दादि विषयाचें पहिलें संवेदन ज्या देशरूप अथवा कालरूप आधारामध्यें होते तो चिदणु त्या देशाची अथवा कालाची पूर्व अशी संज्ञा करतो. कारण त्या देशाला व कालाला उत्तर काल हटवीत असतो. त्यामुळें प्रत्येक जीव व प्रत्येक वस्तु याचा देश व काल नियत नाहीं. याप्रमाणें देश-काल वस्तुभेद व त्यांचीं नावें याची कल्पना करून ज्यांनीं शब्दाचे अर्थ-विषयक संकेत ग्रहण केले आहेत. त्याच्या शब्द ऐकताक्षणींच होणाऱ्या अर्थज्ञानरूपानेंही तेंच चिदाकाश विकार पावतें. साराश याप्रमाणें आत्मा स्वतःच प्रथम सूक्ष्म देह, त्यानंतर देश-काल-क्रिया-वस्तुविभाग, त्यानंतर त्याच्या त्याच्या नावाचा विभाग, इत्यादि क्रमानें नामान्त सर्व जगच्छरीर संपादन करतो. अर्थात् सर्व जगत् मनःकल्पनामात्र असलें तरी चिरकाल भावनेनें आधिभौतिकतेचा दृढ निश्चय करतो. तो आपल्या मस्तकादि अवयवाची भावना करून तदाकार होतो. तो संकल्पशक्तीनें अश्व, गाय, घट, वस्त्र, इत्यादि बाह्य वस्तुही निर्माण करतो. सर्व संकल्पाच्या अधीन आहे. ब्रह्मा, हरि, शिव, व एकादा क्षुद्र कृमिही असाच संभवतो. रामा, ईश्वराच्याही देहादिकाची कल्पना जर संकल्पामुळें होते तर इतरांची काय गोष्ट सांगावी. पण ही सर्व सृष्टि खरी नव्हे. कारण ती संकल्पमयी आहे. या व्यष्टींप्रमाणें समष्ट्यात्मा विराट्पुरुषही कल्पनेनेंच

उद्भवलेला आहे. त्यामुळे आत्माच सर्वांचे बीज आहे. तोच त्रैलोक्याचा आधार आहे. मुक्तीच्या द्वारामध्यें प्रतिबंध करणाराही तोच. त्याचा देह आकाशादि भूतमय नाहीं. त्याच्या शरीरात हाडें वगैरे नाहींत. त्यामुळें त्याला हातात धरतां येत नाहीं. स्वप्नात समुद्र, मेघ, सिंह अथवा संग्राम याच्याप्रमाणें मोठ्या गर्जना करणाराही पुरुष निजलेल्या स्थानीं जसा मौन धरूनच पडलेला असतो त्याप्रमाणे तो अनेक चेष्टा करणाराही विराडात्मा निष्प्रपंच स्वरूपात स्थित असतो. पुरुषाला स्वप्नात पाहिलेल्या योद्ध्याच्या कोलाहलाचे स्मरण जाग्रतीत येत असतें. त्यामुळें त्याचें ज्ञान अत्यंत असत् ( मिथ्या ) आहे असें म्हणवत नाहीं व स्वप्नानंतर त्याचा विषय प्रतीत होत नसल्यामुळें तें सत् आहे, असेंही म्हणवत नाहीं. तसाच हा प्रपंच अनिर्वचनीय आहे. तो मायामात्र असल्यामुळें हजारों असंभावित गोष्टीही त्यात संभवतात. पण तो अज आत्मा अशा असंख्य जगदाकारानीं व्याप्त असला तरी अणु-रेणु-एवढाही त्यामुळें दूषित होत नाहीं. स्वयंभू , विराट् , ब्रह्मांडात्मा, या नावानीं प्रसिद्ध असलेला हा वस्तुतः आकाशरूप आहे. त्यालाच सनातन, रुद्र, इंद्र, उपेंद्र, इत्यादि म्हणतात. अति सूक्ष्म चित्च प्रथम चेतित झाल्यामुळें चित्तशरीर झाले. नंतर तोच चित्तात्मा वर वर्णिलेल्या क्रमानें विस्तृत ज्ञानवान् होऊन मी महा ब्रह्मांडात्माच आहें, असें म्हणून स्थित होतो. म्हणूनच वातस्कंध हे त्याचे प्राण आहेत. एवढ्यासाठींच ब्रह्मदेवानें प्राणाचा उपसंहार केला असता वातस्कंधाचा भंग झाला, असें मी वर सांगितलें आहे. त्याचा प्राणस्पंद हाच या ब्रह्मांडाकाशातील वातस्कंध होय. बालकानें कल्पिलेल्या पिशाचांप्रमाणें त्या ईश्वरानें चित्तापासून ज्या तेजःकणाची कल्पना केली तेच हे सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें इत्यादिकांच्या स्थानतेस प्राप्त झाले आहेत. सारांश हे राजपुत्रा, हें जगत् विराडात्म्याचें शरीर आहे, असें समज. तें बाह्य योग्य साधनानीं घडविलेलें नसून केवल कल्पनामात्र आहे. वास्तव आकाश, पर्वत इत्यादि सर्व अति शांत चिदाकाशच आहे ७३.

**सर्ग ७४**—या ब्रह्मदेवाचीं अंगें, अवयव इत्यादिकांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, भूर्लोक हें त्याचें कोणतें अंग आहे? इत्यादि तूं जे प्रश्न विचारले होतेस त्यांचें आतां मी उत्तर देतों. त्या शिलेच्या उद्-

रात पाहिलेल्या ब्रह्म-कल्पात्मक विराजाच्या संकल्पांत जें ब्रह्मांडात्मक शरीर स्थित होतें त्याची ही पुढील जन्म-कर्म-अवयवादि विभागव्यवस्था ऐक. त्यांत याचें ब्रह्म ( परम-चिदाकाश ) हेंच मूळ अकल्पित स्वरूप आहे. पण दुसरें विराट्-शरीर काल्पनिक आहे, व त्याच्या दृष्टीनें अतिशय लहान आहे. कारण तो ब्रह्मा स्वतः आपल्याच संकल्पानें झालेल्या या ब्रह्मांडाच्या बाहेर ( संकल्प-रहित ) निःसंकल्प साक्षि-चिदाकाशमात्र असतानाच संकल्पनामक स्वतःचें अंडें पहातो. पण तें परमार्थदृष्ट्या आकाशच आहे. पुढें पुष्ट झालेला तो पुष्ट झालेल्या त्या आपल्या तेजोमय अंड्याला स्वसंकल्पानेंच पक्ष्याप्रमाणे फोडून त्याचे दोन भाग करतो. त्याचा एक भाग वर फार दूर गेला आहे, व दुसरा खालीं स्थित आहे. पण ते दोन्ही भाग आपल्याहून अभिन्न आहेत, असें तो कल्पितो. त्यातील मध्य अवकाशास अंतरिक्ष म्हणतात. त्यातील ऊर्ध्व ब्रह्मांडभाग हें विराटाचें शिर आहे. अधोभाग पाय आहेत व मधील आकाश हाच त्याचा नितंबप्रदेश आहे. लोकाना त्या दोन्ही कपालाच्या मधला भाग शून्य व श्यामवर्ण दिसतो. द्युलोक ( स्वर्ग ) हीच त्याची तालु आहे. व तारा हे रक्ताचे बिंदु आहेत. त्याच्या देहात बुद्धि व प्राण याच्या वृत्ति हे देव, असुर व नरादिक आहेत. भूत, प्रेत, पिशाचें हे त्याच्या अंगातील कृमि होत. इतर लोक हींच त्याच्या शरीरातील छिद्रें आहेत. ब्रह्मांडाचें खालचें शकल हेच त्याचे विस्तृत तळपाय होत. जानुरध्रें याच पाताळापर्यंत पोंचणाऱ्या गुहा आहेत. त्याच्या शरीररध्रांतून जल वाहत असते. समुद्र व द्वीपें यानीं वेष्टित असलेली भूमि हीच त्याची वस्ती आहे. नद्याचे प्रवाह हेंच नाड्यातून गुडगुडणारें जल आहे. जंबूद्वीप हें त्याचें हृदय आहे. मेरु ही त्या हृदयकमलाची कर्णिका आहे. शून्य दिशा ह्याच त्याच्या कुशी असून पर्वत हेंच यकृत्, प्लीहा इत्यादि आहे. चंद्र व सूर्य हे त्याचे नेत्र आहेत. सोम हें त्याचें तेज आहे. हिमालय हा श्लेष्मा ( खाकरा ) आहे. अग्निलोक व वाडवाग्नि हेंच दुःसह पित्त आहे. वातस्कंधातील महावात हेच विराटाच्या हृदयातील प्राण-अपान इत्यादि आहेत. कल्पवृक्षाचीं वने, इतर वनें, उपवनें व पाताळादि काहीं प्रदेशीं राहणारे सर्प हेच त्याच्या अंगावरील लोम आहेत.

ब्रह्मांडाच्या वर जी ज्योति आहे तीच याची शिखा आहे. विराडात्मा ब्रह्मा स्वतःच मनोमय असल्यामुळें त्याला दुसऱ्या मनाची गरज नाही. आत्माच आपल्या भोगाकरिता या सर्व भोग्याची कल्पना करतो, असें जर तूं समजत असशील तर तें बरोबर नाहीं. कारण तो स्वतः कूटस्थ व अद्वय आहे. त्याचप्रमाणें त्याला इंद्रियादिकांची आवश्यकता नाहीं. कारण त्याने आमच्या ठिकाणीं त्याची कल्पना केली आहे. व इंद्रियसमूह केवल कल्पनामात्र आहे. अवयव व अवयवी याच्याप्रमाणेंच इंद्रिये व चित्त याच्यामध्यें थोडासाही भेद नाहीं. कारण ज्याचें शरीर ( आकार ) एकच असतें त्या अवयवाचें तत्त्वतः ऐक्य असणें युक्तच आहे. शिवाय इंद्रियांची प्रवृत्ति सर्वस्वी मनःप्रवृत्तीवर अवलंबून असते. स्वप्नात केवल मनानेच सर्व इंद्रियाचीं कार्यें होतात, या अनुभवावरूनही इंद्रियाची पृथक् स्थिति नाहीं, असेंच ठरतें. एवढ्यासाठींच सर्व जगाची चेष्टा ही त्या मनाचीच क्रिया आहे. कारण त्याचा संकल्पच व्यष्टिपुरुषवेषानें व्यवहार करीत असतो. रामा, वस्तुस्थिति अशी असल्यामुळें समष्टि जगाची उत्पत्ति व नाश हीच त्याची उत्पत्ति व नाश आहे. कारण हें सर्व तोच आहे. यास्तव त्याच्या सत्तेनेंच जगाची सत्ता होते व त्याच्या मरणानें जगत मरतें. स्पंद व वायु याच्याप्रमाणें जगत् व विराट् यांचे ऐक्य आहे. जगत् विराट् , ब्रह्मा, हे पर्याय शब्द आहेत. हे सर्व वस्तुतः शुद्ध चिदाकाशरूप व संकल्पमात्र आहेत.

**श्रीराम—** चिदाकाशच संकल्पानें विराट् झाला, असें जरी मानलें तरी तो संकल्पात्मा पितामह आपल्याच शरीरात कसा राहिला, याप्रश्नाचें उत्तर मिळत नाही.

**श्रीवसिष्ठ—** रामा, ध्यानानें तूं जसा आपल्या शरीरात यथास्थितपण राहतोस तसाच तो परमेष्ठी आपल्या देहात राहिला. ( मानसपूजेमध्यें हृदयांत कल्पिलेल्या रत्नमंडपात आपल्या उपास्य देवाला बसवून त्याच्या-जवळ तूं छत्र, चामर, व्यजन, दर्पण, तांबूल इत्यादिकांच्या योगानें परि-चर्या करीत उभा आहेस, असें ज्याप्रमाणें अनुभवितोस त्याप्रमाणें ब्रह्म संकल्पानें स्वदेहांत राहतो; असा याचा भावार्थ. ) शिवाय स्थूलदेहात्मक अशा या स्वतःच्या आत हृदयकमलांत लिंगदेहात्मक अशा आपलें अव-

स्थान ( राहणें ) होतें, हें सर्व विवेकी जनाच्याही अनुभवानेंच सिद्ध आहे. तेव्हां त्या धात्याविषयीं काय सांगावें ? आम्ही जीवही जर अशा अशक्य वाटणाऱ्या गोष्टी करूं शकतों तर तो संकल्पात्मा विभु ब्रह्मा काय न करील ? अहो ! वृक्षादि स्थावर पदार्थांमध्येंही जर आपल्या बीजरूपी देहांत राहण्याचें सामर्थ्य आहे तर ज्याच्यामध्यें सर्वशक्ति प्रकट झाल्या आहेत अशा चित्कल्पनात्मक चतुर्मुख मूर्तीमध्यें तें कसे नसेल ? तस्मात् ब्रह्मा ब्रह्मांडाकारानें साकार होऊन चिदाकाशरूप असो कीं मनःसमष्टिरूपानें निराकार आकाश असो, पण तो या दोन्ही पक्षीं बाहेर व आंतही असतो. पण बाह्य व आंतर या कल्पनाच स्वरूपास सोडून आहेत. कारण तो स्वतः बाहेरून विराट् ब्रह्मांडात्मा, आंत अहं, त्वं इत्यादि व्यष्टि-समष्टि भूत भौतिकमय व आत्मस्वरूपांत आत्माराम होऊन काष्ठमौनी व स्वरूपतः अजड असूनही पाषाणासारखा जड झाला आहे. रामा, केवळ विराडात्म्याचीच ही स्थिति आहे असें तू समजूं नकोस, तर तत्ववेत्ते पुरुषही याच अवस्थेंत असतात. कारण ज्याप्रमाणें वेली, गवत, काष्ठाचा पुरुष इत्यादिकांना दोरीनें बांधलें व मागून सोडलें तरी राग येत नाहीं व तीं सर्व मुकाट्यानें राहतात. अथवा जलप्रवाह कोणी कितीही प्रतिबंध केला तरी व त्याच्या अंगाचे शतशः तुकडे झाले तरी जसा आपली स्थिति सोडीत नाहीं त्याप्रमाणें तत्वज्ञ नानाप्रकारच्या कार्यजालांत विहार करीत असला तरी शिलेच्या उदराप्रमाणें शांतचित्त असतो. आपल्या स्वाभाविक शांतीमध्यें राहतो. क्रोध, हर्ष, विषाद इत्यादिकांच्या योगानें विकार पावत नाहीं ७४.

**सर्ग ७५**—विधाता ध्यानपरायण झाला असतां बारा सूर्य उगवले व सर्व जगाला आग लागून प्रलयाग्नि पसरला.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तुझ्या प्रसंगप्राप्त प्रश्नाचें उत्तर मी यथामति दिलें आहे. आतां त्या जगत्प्रलयाचा पुढील क्रम ऐक. ब्रह्मा ध्यानामध्यें मग्न होतांच मी त्या ब्रह्मांडाच्या बाहेर आलों व इंद्रादि नगरें, मेरुशिखर इत्यादि पाहिल्यावर आपली दृष्टि सहज फिरविली, तों मला तेथें दुसरा सूर्य दिसला. एक सूर्य दिशांच्या मध्यभागीं अगोदरच तळपत होता, तों हा दुसरा भास्कर पश्चिम दिशेंत मला दिसला. त्याच्या मागून क्रमानें नैर्ऋत्य,

दक्षिण, आग्नेयी, इत्यादि इतर दिशांमध्येंही एकेक अतिशय दीप्त सूर्य मला दिसला. त्या अनेक सूर्यांतील एकेक रवि अग्निलोकच्या अग्नीप्रमाणें अथवा सागरातील वडवाग्नीप्रमाणें मला भासला. तो चमत्कार पाहून दैवाच्या प्रातिकूल्याविषयीं मी जो विचार करीत आहें तों भूतलातून आणखी एक सूर्य वर आला. दहा दिशातील दहा व मध्यभागचा एक असे अकरा सूर्य तेथें पूर्वींच होते. त्यातील अकराव्या मध्यगत सूर्याचें जणुं काय प्रतिबिंबच असा हा बारावा सूर्य होता. तो रुद्राच्या घोर नेत्राप्रमाणें मला भासला. अग्नि शुष्क वनाला जसा जाळतो त्याप्रमाणें त्यानें त्या जगाला चोंहोंकडून जाळण्यास आरंभ केला. ब्रह्मांडातील सर्व वस्तूस आग लागली. भयंकर ज्वाला 'चट्‌चट्' असा शब्द करीत सभोंवार पसरल्या. हिमालयासारखे, मेरूसारखे महा पर्वतही जळूं लागले. पण त्या दशेंतही मलय पर्वताचें मला मोठे कौतुक वाटलें. कारण तो महा साधु आपल्याला जाळून टाकणाऱ्या अग्नीलाही चंदनाचा सुगंध देत होता. खरोखर नाश पावत असतानाही दुसऱ्यास आह्लाद देणें, खेद न देणें, हें महा व्रत महात्मेच करूं जाणत. चंदनाला जरी कोणी जाळूं लागलें तरी तें जाळणाऱ्यास आनंदच देतें. यावरून उत्तम वस्तु केव्हांही अवस्तु होत नाहीं, हें ठरतें. असो; प्रलयाग्नीनें जाळून टाकलेलेंही सोनें नष्ट झालें नाहीं. त्यावेळी सोनें व आकाश या दोनच वस्तु राहिल्या. त्यामुळें सर्व नाश झाल्यावरही राहणाऱ्या त्यांचेंच शरीर श्लाघ्य होय. आकाश विभु असल्यामुळें नाश पावलें नाहीं व सोनें अग्नींतून शोधून ( सर्व-दोष-रहित होऊन ) निघाल्यामुळें अक्षय झालें. म्हणूनच रज व तम या दोन गुणांपासून शोधनप्रयोगानें पृथक् केलेलें सत्त्वच सुखसार आहे. कारण तें ब्रह्म-सुखास व्यक्त करीत असतें, असें मी समजतों. असो; प्रलयाग्नि याप्रमाणें भूलोकास निःशेष जाळून अंतरिक्षातील मेघांनां जाळूं लागला. पण राघवा, ज्ञानी पुरुषातील दोषांप्रमाणें प्रलयाग्नीनें जाळलेल्या मेघांचें भस्मही कोठें दिसलें नाहीं.

असो; तो प्रलयाग्नि याप्रमाणें अंतरिक्षातील सर्व वस्तूंस जाळीत कैलासाचें उल्लंघन करून जों जात आहे तों कल्पसमयीं क्रुद्ध झालेल्या रुद्राच्या नेत्राग्नीनें त्याला जाळून सोडलें. त्या दोन अग्नींचा भयंकर संघर्ष जेव्हां सुरू

झाला तेव्हा मला काहीं विलक्षण शोभा दिसली. ती जणुं काय प्रळयाग्नीच्या दाहानें पोळणाऱ्या मूर्ख जीवांस जगाची असारता प्रत्यक्ष दाखविण्यासाठींच प्रकट झाली होती. असो; त्यानंतर अग्नीच्या मागून प्रळयवायू वेगानें वाहूं लागले. त्यानीं आपल्या भयंकर संहारशक्तीनें अवशिष्ट प्राण्यास मारलें ७९.

सर्ग ७६—पश्चिम दिशेच्या ऊर्ध्वभागीं पुष्करावर्तमेघाचा उदय व आग्नेय कोणांत अग्नीचा उपसंहार.

**श्रीवसिष्ठ**—कल्पात वायू वाहूं लागले असता समुद्र अमुद्र ( चिह्न-रहित ) झाले; मेघांनीं आपली मर्यादा सोडली, धनी जसे निर्धन व्हावे त्याप्रमाणें ते ( मेघ ) जलदारिद्र्याचा अनुभव घेऊं लागले. अग्नीनें ज्याला भाजलें आहे, असें भूतल भूतलेशरहित झालें. पातालही काहीं विलक्षण नाशास प्राप्त झालें. द्युलोकातील सूर्याचा प्रकाश नष्ट झाला व दिशांचा संघ शोकात निमग्न झाला. त्यानंतर एकाद्या आकाशकोणातून मत्त दैत्य जसे निघावे त्याप्रमाणें पुष्करावर्तक नांवाचे मेघ कोठूनसे अकस्मात् येऊन गुळ गुळ शब्द करूं लागले. त्यांच्या त्या भयंकर ध्वनीनें ब्रह्मांड-कटाह फुटला. त्याचा उद्भट सचार आकाशभर होऊं लागला. ते एक-मेकावर हापटून मोठा ध्वनि उठला. विजा कोसळल्या. अशनि गळूं लागल्या. पण या प्रलयाग्नीपुढें मेघाची स्थिति कशी होत आहे, असें म्हणून मी मोठ्या आश्चर्यानें इतर नऊं दिशाकडे जों पहात आहें तों मला मेघ कोठेंच दिसले नाहींत. तर नभोंगणात केवल उल्कापात होत आहे, असें मात्र आढळलें. त्यांच्या योगानें फार दूर-दूरचे पदार्थही भस्म होत होते. काहीं वेळानें मला फार दूर प्रदेशीं वर शीतल वारा वहात आहे व खालीं तोच अग्नीसारखा उष्ण आहे, असा अनुभव आला. त्यानतर त्या तितक्या दूर प्रदेशीं पुष्करावर्तादि मेघ आहेत, असेंही माझ्या ध्यानांत आलें. तेथवर हा अग्नि जाऊं शकला नाहीं. इतक्यात पश्चिमे-कडून कल्पवायु आला. त्याच्याबरोबर विंध्य, हिमालय इत्यादिकांसारखे पर्वत तृणाप्रमाणें उडून जात होते. त्या वायूच्या वेगाबरोबर प्रलयाग्नीच्या ज्वालारूपी पर्वतांना जावें लागलें. महावातानें अग्नीला आग्नेय दिशेंत नेऊन सोडलें. अंतरिक्षांतून उडवीत नेले जाणारे ते प्रळयाग्नी संध्याका-

ळच्या अभ्रांप्रमाणें अंतरिक्षांत तरंगत असलेले मला दिसले. त्याच्या योगानें जगांतील सर्व वस्तूंचा नाश पूर्वींच झालेला होता. सर्व सागर-पर्वतासारखे मोठमोठे पदार्थही सूक्ष्मभाव धरून आकाशाच्या एका कोपऱ्यांत जाऊन राहिले. पुष्करावर्तादि प्रलयमेघ जलाचा वर्षाव करूं लागले. साती समुद्र एकमेकास येऊन भेटले. व त्या सर्वांचा मिळून एकच महासागर झाला. राघवा, त्यावेळचा तो अग्नि व मेघ यांचा समागम एकाद्या अतिघोर संग्रामाप्रमाणें भयानक होता ७६.

सर्ग ७७—पुष्करावर्तादि मेघ व सात समुद्र यांच्या वृष्टीनें व क्षोभानें पुनः नाश पावणाऱ्या जगाचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—भूमि, जल, तेज, व वायु या चारी महा भूताचा अशा रीतीनें मोठा क्षोभ झाला असता त्रिभुवनाची काय दशा झाली तें मी वर सांगितलेंच आहे. तथापि पुनः थोडक्यांत सांगतों. त्या स्थितीचें यथावत् वर्णन करणें अशक्य आहे. पण तसला प्रलय पाहणेंही चांगले नव्हे. वर सांगितलेला पश्चिमेंतील मेघ थोड्याच वेळात अतिशय वाढला. त्यानें सर्व अंतरिक्ष व्यापून सोडले, व हत्तीच्या सोंडेएवढाल्या धारानीं त्या ब्रह्मांडांतील भूमीवर वृष्टि करण्यास आरंभ केला. त्या मेघामुळें अंतरिक्षांत अंधकार पसरला. मेघगर्जना, विजा, उल्कापात, गाराची वृष्टि इत्यादिकाची तेथें एकच गर्दी झाली. वायुही क्षुब्ध होऊन मेघाना साह्य करीत होता. अतिवृष्टीमुळें भूलोकीं चतुर्विध प्राण्याची त्रेधा उडाली. महा पूर आले. घरें पडलीं, झाडें उपटून पडलीं, सर्वत्र हाहाकार झाला. सर्व जीवानीं आपपल्या जीविताची आशा सोडली. अग्नीनें पूर्वींच अनेक जीवाना व पर्वतासारख्या कठिण पदार्थांना जाळून सोडलें होते. त्यातूनही राहिलेल्या प्राण्याचा नाश या अतिवृष्टीने केला. समुद्रांनीं आपापली मर्यादा सोडल्यामुळे भूलोक जलमय झाल्याचें वर्तमान वर सांगितलेंच आहे. पण चोहोंकडून जळाचे महा पूर जेव्हा त्यांना येऊन मिळूं लागले तेव्हां त्याच्या क्षोभाबरोबर जलचर प्राणीही व्याकुल झाले. भूमीवरील सर्व पदार्थांना आपल्या पोटात साठवीत जळाचा महा प्रवाह वेगानें वाढू लागला. त्यावेळीं त्या त्रिभुवनात एका दुःखावांचून मला दुसरें कांहं

ासलें नाहीं. जिकडे पाहावें तिकडे जल व वायूचा महावेग आणि ामुळें सर्वत्र जीवांचा संहार ७७.

**सर्ग ७८**—वाढलेल्या एका समुद्राचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, अतिवृष्टीमुळें जलाचा वेग अतिशय वाढला. ात हिमालय मेरु इत्यादि पर्वत कोठें गडप होऊन गेले ते कळेना. समुद्राचें ल देव व लोकपाल यांच्या स्थानास जलप्राय करून सूर्यमार्गापर्यंत ढलें. त्यात प्रमाणातीत लाटा, भोंवरे, फेंस व महा गर्जना याची द्धि झाली. जलचर पाण्यानाही त्या अतिवृद्धीमुळें सुख झालें नाही. द्रजलचराना तर महा मत्त जलचरानीं पूर्वीच खाऊन टाकले होतें. ग कालानें त्या दुसऱ्याच्या शरीरानीं आपल्या शरीरास पुष्ट करणारा- ही जणुं जगाचें दुःखरूपत्व भासविण्यासाठींच सागराच्या भयंकर ाभानेंच मारण्यास आरंभ केला. भूमीवरून वेगानें निघालेला एक ागर अंतरिक्षातील पुष्करावर्तादि मेघास मोठ्या प्रेमाने येऊन भेटला. भुवनाला खाल्ल्यामुळे तृप्त झालेला तो घर्घर् ध्वनीने गात लाटाच्या गानें नाचू लागला; राघवा, याप्रमाणें तें महा जल त्रैलोक्यरूपी ष्टीच्या एका तुकड्याचा असा संहार करूं लागलें असता, अरेरे, त्याचें ण करणारा कोणी नव्हता. त्या समुद्राच्या लाटाच्या वश न झालेला साही कोणी नव्हता, कारण कालानें ज्याला ग्रासलें आहे, अशा दार्थाचें रक्षण करण्यास कोण समर्थ आहे ? त्यावेळीं तेथें आकाश व्हतें, दिशा नव्हत्या, अधःप्रदेश व उर्ध्वप्रदेश नव्हता. कोणी प्राणी व्हता, व सृष्टीही नव्हती तर केवल जल होतें ७८.

**सर्ग ७९**—ऋषि, देवगण व धाता याचें निर्वाण.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, याप्रमाणें एकार्णवाच्या जलानें तपोलोकापर्यंत र्व प्रदेश बुडवून सोडले असता सत्य लोकाजवळच्या आकाशात स्थित ऊन मी प्रभातसमयीं जशी सूर्यप्रभा त्याप्रमाणें, आपली दृष्टि ब्रह्मलोकात कली. तों मला मुख्य परिवारासह ( म्हणजे प्राणादि उपासना करून सालो- ादि मुक्तीस प्राप्त झालेले व ब्रह्मदेवाबरोबर विदेह कवल्यात प्रवेश करण्याची छा करणारे जे जीवन्मुक्त त्यांसह ) समाधि लावून बसलेला परमेष्ठी दिसला. ाचप्रमाणें त्या ब्रह्मांडाचे इंद्रादि अधिकारी देव व शुक्रादि अधिकारी

मुनि, यांच्या समूहांसही मी तेथें पाहिलें; पण ते सर्व पद्मासन घालून ध्यानपरायण झालेले असल्यामुळें चित्राप्रमाणें अथवा निर्जीव असल्यासारखे मला भासले. इतक्यात भुवनाचा दाह करणारे बारा अदित्यही तेथें आले व इतराप्रमाणेंच पद्मासन घालून बसले. त्यानंतर थोडक्याच अवकाशानें (ब्रह्माचें आयुः–प्रमाण पूर्ण झालें असता ) ब्रह्मदेवाच्या अंत्य साक्षात्काररूप बोधानें दीप्त झालेल्या ब्रह्मचैतन्यानें त्याच्या अविद्याकल्पित देहासह सर्व प्रपंचास बाधित केलें. तेव्हा जागें होताच, स्वप्नात पाहिलेले सर्व पदार्थ जसे बाधित होतात, त्याप्रमाणें आत्मबोधानें सर्व प्रपंचाचा बाध होऊन आत्मा मात्र अवशिष्ट राहिला आहे, असें मी पाहिलें तेंच याचें विदेहकैवल्य होय. तत्त्वज्ञाच्या ज्ञानानें बाधित झालेल्या पूर्ववासनेप्रमाणे त्याच्या परिवारातील लोकही त्याच्या बरोबरच कैवल्यास पोंचले. जागा झालेला पुरुष स्वप्नातील पुढें दिसणारेंही नगर जसें पहात नाहीं त्याप्रमाणें मी त्याना पुनः पाहिलें नाहीं. रामा, ब्रह्मदेवाला जेव्हां तो चरम [ अन्त्य ] साक्षात्कार झाला तेव्हा तें ब्रह्मनगर [ ब्रह्मांड ] अरण्याप्रमाणें शून्य [ गृहजनादिरहित ] झालें. पृथ्वीवरील आकस्मिक उत्पातानें जसें एकादें नगर नाहींसें व्हावें, त्याचा विध्वंस व्हावा, त्याप्रमाणें ब्रह्मनगराचा विध्वंस झाला. त्यातील मुनि, देव इत्यादि सर्व शून्य झाले. कारण ते कोठें गेले आहेत असें मला आढळलें नाहीं. तेव्हा आकाशात स्थित असलेल्या मी अंतर्दृष्टीनें [ आत्मानुभवानें ] ते नाम व रूप यांच्या योगानें जरी शून्य झालेले असले तरी स्वरूपानें निर्वाणआत्मा होऊन राहिले आहेत, असें जाणलें. निद्रा सोडून उठलेल्या पुरुषाची स्वप्नवासना लीन झाली असता त्याचे स्वप्नांतील पदार्थ जसे शून्य होऊन स्वरूपास येऊन मिळतात त्याप्रमाणेंच देव, मुनि, ऋषि, वेद, विद्याधर इत्यादि सर्व नामरूपतः शून्य होऊन स्वरूपास जाऊन मिळाले. कारण हा देह शून्यरूप असून केवल वासनेनें आकारवान् झालेला असतो व वासना क्षीण होतांच त्याचें अभान होतें. स्वप्नात आपण आपला देह अंतरिक्षांत गेला आहे, असें पाहतों. पण जागें झाल्यावर वासना शांत झाल्यामुळें तो स्वस्थानींच आढळतो, हें प्रसिद्ध आहे. रामा, जाग्रतींतही आत्मबोध होऊन वासनेचा क्षय झाला असतां

ूक्ष्म व स्थूल देहही दिसत नाहीं, व असा प्रमाणजन्य तत्त्वबोध जाग्रतींतच ेणें शक्य आहे. स्वप्नाचा बाध कसा होतो, हें आबालवृद्धांना ठाऊक ाहे. व त्या सार्वजनीन अनुभवाचाच अनुवाद श्रुति व स्मृति यांनीं केला ाहे. पण याप्रमाणें आपल्या व दुसऱ्याच्याही अनुभवानें सिद्ध होणाऱ्याही ग्नबाधाचा जो निषेध करतो, म्हणजे स्वप्नादि सर्व द्वैत खरें आहे, असें ो म्हणतो त्याला बोध करूं नये. कारण तो मिथ्याग्रहरूपी निद्रेनें ोहित असतो. तेव्हां झोंपेचें सोंग घेणाराला कोण उठविणार ?

**श्रीराम**—भगवन्, आपण म्हणता तें जरी खरें आहे तरी स्वप्नाचा ष्टान्त बरोबर नाहीं. कारण हा देह पित्याच्या देहापासून झालेला आहे. तो असेपर्यंत स्वप्न पडतें. त्याच्या अभावीं स्वप्न पडत नाहीं. पण स्प्न-देह तसा नाहीं. तो निष्कारण होतो. पितृ-मातृ-प्रभृति योग्य साम- विाचून तो होतो. यास्तव तो अत्यंत असत् आहे. तेव्हां त्याचें व याचें ाम्य कसें असेल ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, तूं जर असें म्हणूं लागलास तर यज्ञादिकाच्या ोगानें होणाऱ्या स्वर्गी पुरुषाचा देहही, कारण-सामग्रीनें रहित असल्या- ळें, स्वप्न-देहाप्रमाणेंच असत् होईल व त्यामुळें तुझ्या पदरीं नास्तिकता ईल. शिवाय देह ज्याचें कारण नाहीं असा प्रत्येक देह ( देहापासून झालेला देह ) अत्यंत असत् आहे, असेंच म्हटल्यास सूक्ष्मदेहसमू- ह्रूप हिरण्यगर्भाचाही अत्यंत अभाव होण्याचा प्रसग येईल आणि तसें ालें म्हणजे सृष्टि इत्यादि अर्थ-क्रियाही मिथ्या ठरेल. कारण पूर्व र्गाचा प्रलय झाल्यावर सर्व शरीराचा अभाव झाल्याकारणानें । सर्गाच्या उत्पत्तीच्या वेळीं एकाद्या शरीराचाही संभव नसल्यामुळें ही ष्टिही होणें दुर्घट होईल. पण ती तर आपणाला आज प्रत्यक्ष दिसत ाहे, व तशीच ती प्रत्येक सृष्टीच्या वेळीं दिसणें शक्य आहे.

**श्रीराम**—( जैमिनीच्या मतानें शंका— ) भगवन्, असें जर आहे [ प्रलय होतो, असेंच समजण्यांत काय अर्थ आहे ? जो कधीं उत्पन्नच ेला नाहीं, अशा या अनादि संसारांत सर्व देह देहापासूनच झाले ाहेत, असें समजावें. म्हणजे सर्व देह अर्थक्रिया ( कोणतीही सफल ृत्ति ) करण्यास समर्थ होतील. किंवा हिरण्यगर्भाच्या देहाची उत्पत्ति

पूर्व पूर्व नारायणाच्या देहापासून झाली आहे, असें समजावें. म्हणजे हें जग मिथ्या आहे, तें आज जसें दिसतें तसें नेहमींच दिसत नाहीं असें म्हणण्याचें कारणच उरणार नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, जैमिनींच्या मताप्रमाणें ही तुझी शंका बरोबर आहे. पण तिचें समाधान थोडक्यांत करितां येतें. कसें तें पहा—पृथ्वी, अप्, इत्यादि द्रव्यें सावयव आहेत कीं नाहींत? तीं सावयव आहेत हें जर तुलाही मान्य आहे तर अवयवाच्या संयोगानेंच झालेल्या त्यांचा अवयवविभाग होताच नाश होणें अवश्य आहे. तेव्हां जग नेहमीं आजच्या सारखेंच होतें ह्या म्हणण्यात कांहीं सार नाहीं. अवयवांचा विभाग होऊन भूमिप्रभृति भूताचा नाश झाला असता चतुर्विध भूत-संघाच्या शरीरीचा, आधारच नाहींसा झाल्याकारणानें त्याचें अस्तित्व अशक्य आहे. नारायणाचा देह झाला तरी तो सावयवच असणार हें उघड आहे. तेव्हा त्याच्या विनाशित्वाचें निवारण कोणालाही करतां येणार नाहीं, बरें तो प्रलयानंतर जलात शयन करतो, अशी पौराणिकी प्रसिद्धि असल्यामुळे त्याला जन्म व नाश नाहींत, असें म्हटल्यास त्याचा देह देहरूपी कारणावाचून झालेला आहे, व म्हणूनच तो असत् आहे, असें म्हणावें लागणार!

**श्रीराम**—( प्रसंगोपात्त चार्वाकाची शंका )–चार प्रकारच्या देहाच्या आकारानें व घट–पटादिकाच्या आकारानें एकत्र होणारीं पृथ्वीप्रभृति चार भूतें हेच जगत् होय. त्याचा पृथिवीप्रभृति भूताच्या रूपानें नाश कधींही होत नाहीं. भूताचें मिश्रण होऊन उद्भूतज्ञान इच्छा इत्यादि गुण, हस्त, पाद इत्यादि अवयवाची रचना, तिच्यावरून व्यक्त होणारी जाति इत्यादि त्या भूताचा धर्मसंघात हाच देह आहे. त्यांतील ज्ञप्ति ( चैतन्य ) पृथ्वी, जल, इत्यादि भूतांमध्यें जरी कोठेंच दिसत नसले तरी मद्यास उत्पन्न करणारीं पीठ, पाणी, क्षार किण्व इत्यादि द्रव्यें मिळालीं असतां कालपरिपाकादिकामुळें त्यांत जशी प्रति-द्रव्यात नसलेली मदशक्ति उत्पन्न झालेली दिसते त्याचप्रमाणें देहाकार परिणाम पावलेल्या चार भूतामध्यें ज्ञप्ति हा गुण उत्पन्न होतो. यास्तव ज्ञप्तिगुणयुक्त देहच आत्मा आहे.

श्रीवसिष्ठ—राघवा, चार्वाकाच्या मताप्रमाणें अशी शंका येते हें खरें; पण तिचेंही उत्तर आमच्यापाशीं तयार आहे. बाबारे, जग नित्य आहे, असें जर म्हटलें तर सर्वभूताचा नाश आणि नित्य, नैमित्तिक, प्राकृत व वैज्ञानिक असा चार प्रकारचा प्रलय त्याचे प्रतिपादन करणारीं अठरा पुराणें, भारतादि इतिहास, पारलौकिक आत्महित व अहित करणारा, धर्म व अधर्म याचा बोध करणाऱ्या मनुप्रभृति स्मृति व सदाचार हीं सर्व व्यर्थ व अप्रमाण होतील! याचा काहीं विचार केला पाहिजे. 'अहो, चार्वाकाना वेदादिकांचें अप्रामाण्य इष्टच आहे,' म्हणून म्हणशील, तर बाबारे, द्वेष, लोभ, शाठ्य, असत्य इत्यादि दोषरहित असलेल्या या वेदादि-काचे प्रलय, धर्म, अधर्म, आत्मतत्त्व इत्यादि प्रतिपाद्य विषय जर अप्रमाण झाले तर भोगलापट्य, लोभ, द्वेष, इत्यादि सहस्रावधि दोषानीं दूषित असलेल्या चार्वाकादिकाच्या 'ह्या वंध्येला शभर पुत्र झाले,' या वाक्या-सारख्या वाक्यावर तरी विश्वास कसा बसणार! त्याच्या तसल्या वाक्याना कोणी विचारी प्रमाण मानील अशी आशा करणें व्यर्थ आहे. कोणीही विचारी वैदिक वेदादिकाना अप्रमाण समजत नाहीं. कारण त्याना अप्र-माण मानल्यावर कृतहान व अकृतअभ्यागम इत्यादि दोष व निर्बीज आणि निष्फल सर्गादिकाचा असंभव यांच्या योगानें जगाचा उच्छेद होण्याचा प्रसंग येणार. बरें वेदादिकाना सोडून नुसत्या युक्तीनेंच जरी चार्वाकादिकाच्या मताचें परीक्षण चालविलें तरी त्याचें मत फार वेळ टिकत नाहीं. कसें तें पहा—देहच आत्मा आहे, हा वाद परी-क्षणार्थ घेतल्यास सकृद्दर्शनीं आम्ही असें विचारणार कीं देहाचे सर्व अवयव आत्मे कीं नुस्ता एक अवयवी देह आत्मा? सर्व अव-यव आत्मे, असें म्हणशील तर एका देहात अनेक चेतन झाले. त्याचें सदा एकमतच असणें शक्य नाहीं. अर्थात् विमत झाल्यास देहाचा नाश होणें अगदीं साहजिक आहे. बरें अवयवी आत्मा, असें म्हटलेंस तर हस्त, पाय इत्यादि अवयवातील एकादा अवयव मोडला कीं, अवयवी-च्या स्वरूपात वैगुण्य येत असल्यामुळें आत्म्याचाही क्षय होणार! अर्थात् हात मोडल्यावर जीवनाची आशा करावयास नको. अशींच आणखीं दुसरींही हजारों दूषणें या नास्तिक मतावर देता येण्यासारखीं आहेत.

रामा, या उत्तरांतच–किण्व, पिष्ट व जल यांच्या संघातांत उद्भवणाऱ्या मदिरेंतील मदशक्तीप्रमाणें देहाकार परिणाम पावलेल्या भूतांच्या संघातांत ज्ञप्तिगुण उत्पन्न होतो–या चार्वाकाच्या म्हणण्याचें उत्तर अंतर्भूत आहे. पण आतां मी त्याच्या मतावर आणखीं एक दूषण देत आहें, तें ऐक.

ज्ञान हा गुण मदशक्तीप्रमाणें संघातापासून उत्पन्न होणारा आहे, असें मानल्यास त्या गुणाचा आधार असा जो गुणी देह त्याचा नाश झाल्यावर गुणभूत ज्ञानाचाही नाश होणें अगदीं युक्त व साहजिक आहे, पण त्याचाही नाश होतो, असें म्हटल्यावर–दूर परदेशांत मेलेल्या जीवाच्या देहाचा उच्छेद झाल्यानंतर त्याच्या पिशाचादिकांचा–दुसऱ्या देहानें स्वदेशात परत येणें, दुसऱ्याच्या शरीरात प्रवेश करून पूर्वीच्या आपल्या आप्तांना ओळखणें, त्याच्याशीं संभाषण करणें, इत्यादि–सत्य व्यवहार लोकात जो दिसतो त्याची वाट काय ?

**श्रीराम**—ती पिशाचादि कल्पना व्यर्थ भ्रांति आहे, कारण पिशाचादि प्रत्यक्ष दिसत नाहींत व चार्वाकाच्या मतीं प्रत्यक्षावाचून दुसरें प्रमाण नाही. तें का म्हणून म्हणाल तर सांगतों—प्रत्यक्षाहून इतर प्रमाण संभवत नाहीं. कारण अनुमानाला प्रमाण म्हणावें तर व्याप्ति-ज्ञानावांचून अनुमान होत नाहीं. व्याप्ति म्हणजे साहचर्यनियम, दोन वस्तूंनीं सदा सह राहणें; एकीनें दुसरीला सोडून नसणें. पण पार्थिवत्व (पृथिवीचा विकार) व लोखंडानें त्याच्यावर रेघा काढणें, याचें साहचर्य शतशः जरी आढळलें तरी तें वज्ररत्नाच्या ठिकाणीं व्यभिचार पावतें. म्हणजे वज्रमणीवर लोखंडाच्या तीक्ष्ण शस्त्रानेंही रेघ काढतां येत नाहीं. तसेंच गायीला गोजातीचेंच वासरूं होतें असें सहस्रशः जरी दिसलें तरी उत्पातादि प्रसंगीं गायीला गाढवाचें पोर झाल्याचेंही दिसत असल्यामुळें–जेथें जेथें गायीचा प्रसव तेथें तेथें गोजातीचें वासरूं–ही व्याप्ति व्यभिचार पावल्यावाचून रहात नाहीं. देवताच्या प्रतिमादिकापासून अग्नीवाचूनही धूमाचा उद्भव झाल्याचें दिसत असल्यामुळें सर्व लिंगाविषयीं देशान्तरीं व कालान्तरीं व्यभिचारशंकेचें निवारण करता येणें शक्य नाहीं. तेव्हां अनुमान प्रमाण आहे, असें कसें म्हणतां येईल ?

उपमान प्रमाण आहे, म्हणून म्हणावें तर उपमानाला अत्यंत

अवश्य असलेल्या सादृश्याविषयीं विचार करूं लागल्यास त्याचा समाधानकारक निर्णय होत नाहीं. कसा म्हणून म्हणाल तर सांगतों—'गाईसारखा गवय (गवा) आहे' हें उपमानप्रमाणाचें उदाहरण आहे. यांत सादृश्य-ज्ञान म्हणजे सारखेपणाचें ज्ञान हेंच उपमान आहे. पण तो गव्याच्या ठिकाणचा गायीचा सारखेपणा त्याच्या सर्व शरीरांत आहे कीं, काहीं भागांत आहे, असें उपमान-प्रमाणवाद्यास विचारलें असता त्याला समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं. कारण तें सादृश्य गव्याच्या सर्व शरीरभर राहतें, असें म्हटल्यास तो गवा नसून गायच आहे, असें म्हणणें भाग पडेल. व काहीं भागांत राहतें, असें म्हटल्यास तें गव्याचें नुसतें लक्षण होईल. स्वतंत्र प्रमाण होणार नाहीं.

आतां शब्द प्रमाणाविषयीं विचार करूं या. यथार्थ भाषण करणाऱ्या आप्ताचें वचन प्रमाण आहे, असें शब्द-प्रमाण-वादी त्याचें लक्षण करीत असतात. पण शब्दाचें यथार्थत्व दुसऱ्या म्हणजे प्रत्यक्षादि प्रमाणावर अवलंबून असल्यामुळें त्याची अर्थसिद्धि नियमपूर्वक दिसत नाहीं. म्हणजे अमुक शब्दाचा अमुक अर्थ आहे, हें ठरविण्यास दुसऱ्या प्रमाणाची गरज असते. पण कोशादि दुसऱ्या प्रमाणावरून शब्दाच्या अर्थाचें ज्ञान जरी झालें तरी लोक-व्यवहारांत नियमानें तोच अर्थ सिद्ध होतो, असेंही आढळत नाहीं. शिवाय दुसऱ्याचे शब्द नेहमीं अनुवादी असतात. यास्तव शब्दाला प्रमाण मानतां येत नाहीं.

अर्थापत्ति व अनुपलब्धि हीं प्रमाणें व्यतिरेकव्याप्तीवर निर्वाह करणारीं आहेत, यास्तव त्यांचा योगक्षेम अनुमानासारखाच असणार, हें उघड आहे. संभव व ऐतीह्य हीं प्रमाणें केवळ संभावनेचा आश्रय करणारीं आहेत. अनुमानादिकांच्या ठिकाणच्या संभावनांनाच, अनुमानादिकांस प्रमाण म्हणणारे लोक, प्रमाण समजत असतात. व त्या प्रामाण्याभिमानामुळेंच त्यांची प्रवृत्ति होते. कारण जे फलाविषयीं आतुर झालेले असतात ते ज्याचें फल संदिग्ध आहे, अशा कार्यादिकांतही नियमानें प्रवृत्त होत असल्याचें दिसतें. तेव्हां फलाविषयींचा निश्चय हेंच प्रवृत्तीचें अंग आहे, असाही निर्धार करवत नाहीं. तस्मात् केवल प्रत्यक्षप्रमाणानेंच सर्व व्यवहाराची व्यवस्था चांगल्या रीतीनें लागते. आतां पिशाचप्रस्ताविषयीं

म्हणाल तर तेंही सांगतों—पिशाचानें ज्याला ग्रासलें आहे त्याचा शब्दादि व्यवहारही देह असेपर्यंतच दिसतो. मेल्यावर दिसत नाहीं. यास्तव संनिपातजन्य भ्रांतीसारखी, मी पिशाचग्रस्त आहें, ही त्या देहाचीच व्यर्थ भ्रांति आहे.

श्रीवसिष्ठ—राघवा, चार्वाक आपलें म्हणणें तूं म्हणतोस तसें व्यवस्थित रीतीनें मांडतात व तें सामान्य जनांना खरेंही भासतें, यात काहीं संशय नाहीं. पण त्यावर आमचें असें म्हणणें आहे—बा चार्वाका, तुझें हें सर्व म्हणणें व्यर्थ आहे. कारण तें तुझ्याच शब्दांनीं व्याहत होत आहे. कसें म्हणून विचारशील तर सांगतों—प्रत्यक्षातिरिक्त प्रमाण नाहीं, असें म्हटल्यावर तुम्हा चार्वाकाचें वचन तरी प्रमाण कसें होणार? कारण तुमच्या मतीं प्रत्यक्षावाचून दुसरें सर्व अप्रमाण व तुमचें वचन प्रत्यक्षाहून अन्य आहे. तेव्हां तेंही अप्रमाण ठरलें. शिवाय अनुमानादिक जर प्रमाणें नव्हेत तर तूं आपलें म्हणणें युक्तींनीं सिद्ध करण्याची खटपट व्यर्थ का करतोस! कारण युक्ति हेंच अनुमान आहे व तें तर तुला अप्रमाण ठरवावयाचें आहे. त्याचप्रमाणें तुला आपल्या म्हणण्याचें समर्थन करण्याकरितां दृष्टान्त देता येणार नाहीं. कारण सादृश्य हेंच उपमान आहे व तें तर तुझ्या मतीं प्रमाण नव्हे. त्याचप्रमाणें स्वपक्षीं अनुकूल व परपक्षास प्रतिकूल, असा तर्कही तुला उठविता येणार नाहीं. कारण तर्क अन्वय—व्यतिरेकव्याप्तिघटित असल्यामुळें, व्याप्तीचाच अपलाप करणाऱ्या तुला तर्काची ओळख असणेंही शक्य नाहीं. एकाद्या प्रसंगाची आपत्ति व व्यतिरेक ( अभाव ) हे दोन्ही अनुपपत्ति व अनुपलब्धि यांच्या अधीन असल्यामुळें त्याचा स्वीकार केल्यास तीं दोन प्रमाणेंच मानल्यासारखें होणार! अर्थात् प्रत्यक्षावाचून दुसरें प्रमाणच नाहीं, असें नुस्तें तोंडानें कितीही जरी तुम्ही म्हटलेंत तरी कृतीनें त्याचा अंगीकार केल्यासारखेंच होतें, आणि अशारीतीनें शब्दादिकाचें प्रामाण्य सिद्ध झालें म्हणजे निर्दोष शब्दरूप श्रुतीला अवश्य प्रामाण्य येतें. मग त्या श्रुतीपासून उत्पन्न होणारीं—परलोक व स्वर्ग-नरकादिक—हीं सत् ( विद्यमान ) आहेत ही बुद्धि प्रमाण कां असणार नाहीं? कारण ज्ञानांना स्वतःप्रामाण्य आहे. तें कारणदोष व बाधकज्ञान यांच्या योगानें क्वचित् अप्रमाण होतें. पण वेदाविषयीं त्यातील एकही संभवत नाहीं.

कारण वेद अपौरुषेय असल्यामुळें त्याच्यामध्यें कारणदोष संभवत नाहीं. व स्वर्ग, नरक इत्यादि नाहींत, असें बाधकप्रमाणजन्य ज्ञानही त्याविषयीं नाहीं.

आतां, 'मी पिशाचग्रस्त आहें, ही व्यर्थ भ्रांति आहे, म्हणून जें तूं म्हणतोस त्याचें उत्तर सांगतों—पिशाचग्रस्ताची पिशाचाविषयींची प्रमा (यथार्थ ज्ञान), पर देहामध्यें स्थित असलेल्या पिशाचाची त्याच्या अनुभवानें सिद्ध होणारी दर्शन, श्रवण इत्यादि प्रमा व आमच्यासारख्या पिशाचग्रस्तास पाहणाऱ्याची दुसऱ्याच्या देहानेंही होत असलेल्या पिशाचव्यवहाराची प्रमा अशा या तिन्ही प्रमा लौकिकदृष्ट्या सत्य आहेत, कारण ज्ञान स्वतःप्रमाण आहे. पण तीही (प्रमाही) सत्य नाहीं, असें म्हटल्यास, मद्य पिऊन मत्त झालेल्या पुरुषास झालेली मदिरादि मदशक्तिमान् द्रव्याची मदशक्तिप्रतिभाही सत्य नव्हे, असें होईल. कारण अमत्त (मत्त नसलेल्या) लोकाच्या अनुभवानें सिद्ध असलेल्या वस्तूचा अपलाप करणाऱ्या तुला अतिमत्ताच्या अनुभवानें सिद्ध असलेल्या मदशक्तीचाही अपलाप करणें भाग आहे. त्यामुळें तुझा दृष्टान्त सिद्ध होत नाहीं. दृष्टान्ताच्या अभावीं ज्ञान भौतिक देहाचा गुण आहे, हें म्हणणें अयोग्य ठरतें. तेव्हा परलोकरूप स्वर्गनरकादि स्थितीचें निरसन करण्याचा तरी तुला काय अधिकार आहे ?

राघवा, याप्रमाणें ज्ञानाच्या सर्वलोकप्रसिद्ध स्वतःप्रामाण्यानें पिशाच आहे, ही संवित् अनुभवबलान जर सत्य आहे तर मेलेल्या मनुष्याला परलोक आहे या श्रुतिजन्य प्रतीतीमध्येंही अनुभवबलानेंच सत्यता का नसावी ? शिवाय पिशाचग्रस्ताचें पिशाचासंबधीं ज्ञान श्रुतीसारख्या दृढतर प्रमाणानीं उत्पन्न झालेलें नसतें; तर तें काकतालीय न्यायानें आकस्मिक असतें. पण ती तसलीही प्रतीति, स्वानुभवाचा अपलाप करतां येणें अशक्य असल्यामुळें, जर यथार्थ आहे, तर सकारण परलोकसंवित् यथार्थ कशी नव्हे ?

**श्रीराम**—भगवन्, नुसत्या अनुभवाच्या बलानेंच कोणत्याही अर्थाची सिद्धि होणें शक्य नाहीं. कारण शिंपीच्या ठायीं भासणाऱ्या रुप्याचा अनुभव जरी येत असला तरी त्याच्या विषयाचें म्हणजे रुप्याचें अस्तित्व दिसत नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—जी संवित् भांत विषयाचे सत्त्व ( अस्तित्व ) जसें जाणते ती तसेंच त्याचें सत्त्व अनुभवते, असा नियम आहे. त्याप्रमाणें शुक्ति-रजतसंवित् आपल्या प्रतिभाससमयीं रुप्याचें सत्त्वच जाणते, त्याचप्रमाणें हें रुपें नव्हे, तर ही शिंप आहे, अशी उत्तरकालीं होणारी बाधसंवित् तिन्ही कालीं रुप्याचें असत्त्व जाणते. यास्तव या दोन संवित्–पैकीं पहिल्या संवित्च्या बलानें रुप्याचें प्रातिभासिक सत्त्व असू दे किंवा दुसऱ्या संवित्च्या बलानें असत्त्व असूं दे. पण अनुभवानें सिद्ध असलेल्या विषयाच्या रूपाचा अनुभवावाचून अपलाप करतां येणें शक्य नाहीं. तेव्हां जिवंत पुरुषाचा देह असतांना श्रुत्यादि प्रमाणाच्या बलानें किंवा मेलेल्या पुरुषाच्या देहाचा अभाव असतां स्वप्नासारख्या प्रतिभामात्र बलानें परलोक आहे, अशी जर अनुभवरूप संवित् अवश्य होणारच तर तू त्या मरणानें अपलाप कशाचा करणार ? जिवत पुरुषाच्या अनुभवानें सिद्ध झालेल्या सत्चा कीं मृत पुरुषाच्या अनुभवसिद्ध असत्–चा ? कीं याच्या उलटरीतीनें ? पण अनुभवसिद्ध वस्तूचा अलाप कसाच करता येणें शक्य नाहीं. अर्थात् श्रुत्यादिकाचें प्रामाण्य सिद्ध झालें.

**श्रीराम**—भगवान् , पण त्यावर नास्तिक चार्वाक असें म्हणेल कीं, शरीराकार परिणाम पावलेल्या भूतांपासून संवित् उत्पन्न होते. यास्तव मेलेल्या पुरुषाला शरीरनाश झाल्यावर परलोकासंबंधीं संवित् होणेंच शक्य नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—त्यानें जर असें म्हटलें तर त्याला असें उत्तर द्यावें. बाबारे चार्वाका, संवित् नित्य आहे. त्यामुळें ती स्वतःसिद्ध आहे. याविषयीं अनुभवासारखें उत्कृष्ट प्रमाण असून त्याची सिद्धि आम्हीं अनेकदा केली आहे. शिवाय तिच्या सिद्धिबलानेंच वासनामय आतिवाहिक देह, त्यानें कल्पिलेला स्थूल देह, व बाह्य प्रपंच याची मागून सिद्धि होत असते. तिच्या वाचून दृश्याच्या सिद्धीचें दुसरें काहीएक कारण प्रसिद्ध नाहीं. तस्मात् ज्ञानाचा जन्म देहाच्या अधीन नाहीं. असो; रामा, याप्रमाणें नास्तिकाचें खंडन करावें. साराश अशारीतीनें वेदादिकाचें प्रामाण्य व ज्ञानाचें स्वतःप्रामाण्य सिद्ध झालें असता ज्ञानस्वभाव परमात्मा स्वप्रकाश असल्यामुळें सर्व व्यवहाराच्या पूर्वीं स्वरूपभूत व

नित्यसिद्ध संवित्‌ला स्वतःच जाणतो व अग्नि आपल्या उष्णतेची व प्रकाशकरूपतेची दुसऱ्यापासून जशी अपेक्षा करीत नाहीं त्याप्रमाणें तो ज्ञानफल दुसऱ्यापासून मिळविण्याची इच्छा करीत नाहीं. वासनांच्य उत्पत्तीचें उपादान कारण असा जो सर्व जगद्वासनामय आतिवाहिक देह त्याला तर तो मागून (सृष्टि व जाग्रत् यांच्या आरंभाचे वेळीं) स्वरूपचित्स्व भावबलानेंच जाणून नंतर देहादि भ्रम पाहतो. तस्मात् सर्वांच्या पूर्व सिद्ध होणाऱ्या ज्ञानाची सिद्धि देहाच्या अधीन नाहीं. तर तें स्वतःसिद्ध आहे. एवढ्यासाठींच वासनाक्षयानें आतिवाहिक देहाचा क्षय झाला कं त्याच्या द्वारा सर्व अनर्थांचा क्षय सिद्ध होतो. दृष्टृ, दृश्य, दर्शन इत्यादि दृष्टि हेच महा अनर्थ आहेत. सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मापासून अगोद वासनान्तर्गत प्रपंचपर्यालोचनरूप उपलंभ उत्पन्न होतो. नंतर प्राक्तन जगद्वासनाचा जगद्रूपानें उद्भव होतो. पण वासना शांत झाली म्हणजे बीजाच्या अभावामुळेंच जगाचा पुनरुद्भव होत नाहीं. त्यामुळें अर्थातच निर्वाण सिद्ध होतें. ती वासना प्रलयात किंवा पूर्वसृष्टींत उत्पन्नच झालेलं नाहीं. कारण असंग व अद्वय ब्रह्माच्या ठिकाणीं तिचा जन्म संभवत नाहीं. पण वस्तुस्थिति अशी असली तरी ब्रह्माच्या साक्षात्काराचा उपाय म्हणून शास्त्रानें कल्पिलेल्या सर्गादि समयाच्या पूर्वी वासनाही कांहीं निमि त्तानें उत्पन्न झाली आहे, असें ब्रह्मज्ञान होई तों, समजावें. कारण कांह तरी बीज कल्पिल्यावाचून जगाच्या उत्पत्तीचें समर्थन करिता येणें शक्य नाहीं व ब्रह्माचा बोध झाला म्हणजे सर्व जग ब्रह्मच होत असल्यामुळे वासनाही पर ब्रह्मच होते. रामा, ज्ञान हें निर्वाणच आहे, असें ज्ञानी जाणतात व तसें न जाणणें हाच बंध आहे. यास्तव ब्रह्म असंग व अद्वय आहे इत्यादि ज्ञानानंतर संशयादिकांना जागाच रहात नाहीं. आत युक्तिदृष्ट्या बोलावयाचें असेल तर अज्ञात ब्रह्मच जगत्, वासना व अज्ञा आहे. त्यांची निवृत्ति हेंच ज्ञान व निर्वाण हें त्याचें फल आहे. अर्थात तें विज्ञानघनच तत्त्व श्रुत्यादि प्रमाणाचा लाभ होण्यापूर्वी साक्षात् स्फुरत नाहीं. मी स्वभावतः बुद्ध आहें, असें आपल्याविषयीं समजणारी संवित स्वतःच आपला बंध आहे व मी नित्यमुक्त आहें, अशा रीतीनें प्रमाणत आपल्याला जाणणारी ती स्वतःच मोक्ष आहे, असा निष्कर्ष कळला असत

मोक्ष-साधनांत मुळींच क्लेश नाहींत. आम्ही सांगत असलेल्या या सत्य गोष्टी
अनुभव जर कोणाला घ्यावयाचा असला तर त्या परीक्षकांनीं व्युत्थान
समाधि यांच्या योगानें अथवा व्युत्थान व सुषुप्ति याच्या योगानें तो स्प
घेतां येण्यासारखा आहे. कारण संवित्‌ला बहिर्मुख करणें हाच बंध
अंतर्मुख करणें हाच मोक्ष आहे. बहिर्मुख संवित्-मध्येंच असत् जग स
भासतें. वेदनानें निजणें हाच मोक्ष व त्यानें जागें होणें हाच बंध आं
यास्तव तुला आतां यातील हवें असेल तें घे. याप्रमाणें बंध व मो
आपल्या इच्छेच्या अधीन आहेत, असें ठरलें असता मोक्षस्वभावा
अंगीकार करणेंच युक्त आहे. कारण तोच विक्षेप-रहित परमानन्दरू
आहे. यास्तव रामा, तूं स्वच्छ बोध-स्वरूप ब्रह्मच होऊन बंधशून्य रहा ७९

**सर्ग ८०**—तत्त्वदृष्ट्या वैज्ञानिक प्रलयाचें वर्णन करून आता दुसऱ्या योगिग
प्राकृत प्रलयाचें वर्णन करितात

**श्रीवसिष्ठ**—ज्यातील वात संपली आहे, अशा दिव्याप्रमाणें ते स
ब्रह्म-लोकनिवासी देव व मुनि अदृश्यतेस प्राप्त झाले. ( धात्याच्या वा
नेने कल्पिलेल्या आब्रह्म-स्तंबपर्यन्त सर्व प्रपंचाचा, त्याच्या प्रारब्धाचा क्ष
होताच त्याचक्षणीं उत्पन्न झालेल्या साक्षात्कारानें झालेला जो स्वप्न-सद
बाध, तल्लक्षण वैज्ञानिक प्रलय तात्त्विक-दृष्ट्या युक्ति-पूर्वक वर सांगितल
आता बद्ध दृष्ट्या धात्याचा देह, त्याच्या आरंभक उपाधि, व त्याचीं इं
यादिक याचा आपापल्या कारणांत लय होऊन त्याच्या द्वारा मायाशब
ब्रह्मामध्यें लय होणें, या प्राकृत प्रलयाचें वर्णन करण्यास आरंभ क
तात. ) ते बारा आदित्य विधात्याच्या देहामध्यें लीन होऊन मायाशब
ब्रह्मतेस प्राप्त झाले असता पृथ्वीप्रमाणें त्या ब्रह्मलोकालाही त्यानीं आपल
दीप्त ज्योतींनीं जाळलें. विरिंचीचें नगर जाळल्यावर विरिंचीप्रमाणें
ध्यान करून ते आदित्यही निर्वाण पावले. तों एक सागराचा वाढणा
पूर ब्रह्म-पुरात शिरला. रात्रीं भूमीला अंधकार जसा व्यापून सोड
त्याप्रमाणें त्यानें ब्रह्मनगरास व्यापलें. त्यामुळें ब्रह्मलोकापर्यंत स
जग जलानें भरून गेलें. कल्पान्त मेघही विच्छिन्न होऊन पर्वतादिक
प्रमाणें त्या एक—सागरांत बुडून गेले. इतक्यांत मी त्याच आकाशांत
उठलेल्या एका भयंकर रूपास पाहिलें. हा रुद्र आहे, असें समजे

मीही त्याला पाहून अतिशय घाबरलों. तें उठलेलें रूप कल्पान्त जल-दाकार होतें. त्याला पाहून सृष्टिकालचें सर्व तम (अंधकार) एकत्र होऊनच असें साकार झालें कीं काय, असा मला भास झाला. देहाकार झालेल्या याचें मुख लक्षावधि सूर्यासारख्या भास्वर तीन नेत्रांनीं शोभत होतें. यांतून ज्वालांचा प्रवाह निघत होता. त्या भयंकर शरीराला पाच मुखें होतीं. दहा हात होते. हातात शूल होते. अनन्त आकाशातही संचार करणारें तें महद्भूत काळ्या कुट्ट शरीरानें युक्त होऊन पुढें आलें. तें एकार्णवानें व्यापलेल्या ब्रह्मांडाच्या बाहेरील आकाशात उभें राहिलें. तें शून्यरूप असूनही हस्तपादादि रचनेनें युक्त असल्यासारखें दिसलें. आपल्या भुजानीं क्षीरसागरास क्षुब्ध करणाऱ्या गोविंदाप्रमाणें त्यानें आपल्या नासिकावायूच्या भ्रमणानें त्या एक-सागरास हालविण्यास आरंभ केला. त्याच्याकडे पाहून, कल्पसागराचा पूरच पुरुषाकार घेऊन उठला आहे कीं काय व सर्व अहंकाराचा समूहच देहवान् होऊन आला आहे कीं काय? असें मला वाटलें. तें रूप सर्वांचें कारण असल्यामुळें स्वतः कारणरहित होतें.

राघवा, पण तीन नेत्र, त्रिशूल इत्यादि चिह्नांवरून हा जगदीश्वर रुद्र आहे, असें दुरूनच जाणून मी त्यास नमस्कार केला. आता- अमूर्त मायाशबल ब्रह्मच महेश्वर आहे, असें श्रुतिप्रसिद्ध आहे. तेव्हां तो कशाकरिता व कोणत्या उपाधींनीं पंचमुखत्वादि-विशिष्ट मूर्ति धारण करतो; तसेंच त्या सर्वात्म्याला मर्यादित—भाव कसा प्राप्त होतो? म्हणून विचारशील तर सांगतों—काकुत्स्था, तो परमेश्वर सृष्टि-स्थिति—संहारादिविषयक, संकल्प—निश्चय इत्यादिबीजभूत, व सर्वाभिमानात्मक मायावृत्तिरूप अहंकारत्वानें सर्व जगाच्या अध्यासाचें मूळ आहे. तो सर्व प्राण्यास संहारसमयीं रडवीत असल्यामुळें व सर्व शरणागतांची पीडा घालवीत असल्यामुळें रुद्र या नावानें प्रख्यात आहे. त्यांतील रोदनसमयीं तो विषमाभिमानवान् व पीडा दूर करण्याचे वेळीं एकाभिमानवान् होतो. मी पाहिलेली त्याची मूर्ति निर्मळ आकाश होतें. (आता तो पंचमुख कसा झाला तें सांगतों.) त्या अहंकाराचीं प्रत्येक शरीराशीं संबद्ध असलेलीं जीं पाच ज्ञानेंद्रियें तींच रुद्राचीं पाच मुखें

होत, असें तत्त्ववेत्ते जाणतात. म्हणून तीं सर्वतः प्रकाशरूप असतात. ( त्यांतून संविदग्नीच्या ज्वाला एकसारख्या बाहेर पडतात. ) आता तो दशबाहु कसा तें ऐक. वाक्, पाणि, पाद, वायु व उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें हे त्याचे उजवे हात व त्यांचें वचन, आदान ( घेणें ), विहरण ( चालणें ), उत्सर्ग ( मलविसर्जन ) व आनंद हे पाच विषय हे डावे हात होत.

'असें जर आहे तर तो पूर्वीच तशा आकारानें कां दिसला नाहीं ?' म्हणून म्हणशील तर त्याचेंही कारण सागतों. चराचर-नामरूपकार्याकार अध्यारोपानें ज्याची दृष्टि अतिशय मोहित झाली आहे. त्याना अध्यारोपाच्या आतील कारणांचा स्वभाव दुर्ग्राह्य असतो. चार प्रकारचीं शरीरें व त्यांतील जीव यासह प्रलयद्वारा मायाशबल ब्रह्मास प्राप्त झालेल्या चतुर्मुखानें जेव्हा त्याला ( अध्यारोपाला ) सोडलें तेव्हा तो आपल्या पूर्वोक्त आकाशमात्र परिशेष मूर्तीस प्राप्त झाला. पटानें ( वस्त्रानें ) ज्याना सोडले आहे, असे तन्तु जसे व्यक्त होतात त्याप्रमाणें चतुर्मुखसंज्ञक आत्माध्यारोपित कार्यानें सोडतांच रुद्र कारणरूपानें स्पष्ट झाला.

पण तो जर आकाशमात्ररूपच होता तर अमूर्त असलेल्या त्याची वर सागितल्याप्रमाणें देहाकृति कशी दिसली ? म्हणून विचारशील तर त्याचें उत्तर असें-सर्व कार्यविलय झाल्यावर राहणारा जो केवल कारणांश तदेकरूप तो होता. यास्तव त्याची मी वर्णिल्याप्रमाणें देहाकृति वस्तुतः नाहीं. पण तशा आकाराची कल्पना करून उपासना करणाऱ्या उपासकांना तो तसा दिसतो. आता तो राहतो कोठें, तें सागतों. तो ईश्वर चिदाकाशगत विस्तीर्ण भूताकाशात, सर्वभूताच्या शरीरांतील वायूप्रमाणें राहतो. असो; सर्व भूतानीं ( आकाशादि कार्यांनीं ) ज्याला सोडलें आहे, असा तो त्यावेळीं आकाशाकार होऊन जळाला क्षुब्ध करीत स्वतः क्षीण होतो व परम शांतीस पोंचतो. आता त्याच्या मित्रत्वाचें कारण सागतों.-तीन गुण, तीन काल, चित्त-अहंकार व बुद्धि, हें अंतःकरण-त्रिक, प्रणवाचे तीन वर्ण, तसेच तीन वेद, त्या रुद्राच्या पूर्वोक्त पाच मुखावर क्रमानें तीन नेत्र होऊन राहिलेले होते. त्यानें आपल्या मुठींत त्रैलोक्यरूपी त्रिशूल धारण केला होता. ज्या अर्थी सर्व भूतसमूहामध्येंही त्याच्या-

वांचून दुसरें कांहीं नसतें त्या अर्थी तो रुद्रच सर्व भूतांचा देहात्मा होऊन राहिला आहे.

या रुद्राचें प्रयोजन काय तेंही सांगतों. आपण उत्पन्न केलेल्या सर्व प्राण्यांना होणारा स्वस्वकर्मानुरूप विषयभोगानुभव व क्रमानें ज्ञानसाधनांची प्राप्ति झाली असता शेवटीं होणारा स्वात्मतत्त्वोपलंभ, एतद्रूप शास्त्रीय विहित–निषिद्धकर्म–ज्ञानफलदानस्वभाव हेंच याचें प्रयोजन आहे. कारण तो स्वभावच त्याला सृष्टि, स्थिति व संहार यांमध्यें नियुक्त करीत असतो. आता कोणाकडून प्रेरणा केला गेलेला हा, हें सर्व करतो, तें सागतों. वाणी व मन याचा विषय न होणाऱ्या निरतिशय भूमा (बहुल) नामक आनंदात्मक परम कल्याण स्वरूप परमात्म्यानें ‘बहु होण्याच्या’ संकल्पात्मक मायावृत्तीनें सर्गादिकास उत्पन्न करण्यास उद्युक्त केलें असतां, हा सृष्टि निर्माण करतो. नंतर सृष्टिकाल संपून त्यानें याला प्रळयाची प्रेरणा केली असता हा अहंकारात्मक रुद्र ( प्रथम पृथ्वी, नंतर जल, नतर तेज इत्यादि ) सृष्टीच्या उलट क्रमानें सर्व जगाला गिळून आकाशभावानें स्थित होतो. नंतर त्यालाही त्या शिवस्वरूप स्वात्म्यानें गिळलें असता तो आकाशभावही सोडून भूमानन्दस्वरूपप्रतिष्ठालक्षण शातीस प्राप्त होतो. राघवा, याप्रमाणें हा निर्मल आकाशरूप आहे. तो सर्व जगाचा कल्पान्त करून व तें पुढचें एकार्णव जळ पिऊन पुनरपि परत न येण्यासाठीं परम शातीस प्राप्त होतो.

रामा, आता त्या रुद्रानें शेवटीं काय केलें, तें सागतों. मी त्याला मोठ्या यत्नानें जों पहात आहें, तों तो आपल्या श्वासवायूच्या वेगानें त्या महासमुद्राचें पाणी पिऊं लागला. त्याचें मुख घोर व ज्वाळासमूहांनीं युक्त होतें. त्यामुळें त्याच्या प्राणानें ज्याला ओढलें आहे, असा तो महासागर वडवाग्नीप्रमाणें त्याच्या मुखस्थतेजात शिरला. सृष्टिकालींही जळाचा शोष झाला असतां, तें तेजांतच शिरतें. अंधकाराला सूर्य अथवा सर्व दुर्गुणाना सज्जनसंपर्क जसा नाहींसा करतो, त्याप्रमाणें रुद्रानें तें जल क्षणात शोषून घेतलें. त्यामुळें ब्रह्मलोकापासून पातालापर्यंत सर्व शात व शून्य झालें. धूळ, धूर, वायु, सागर, इत्यादि भूतांनीं रहित, असें सम आकाश झालें, राघवा, त्यानंतर केवळ हे चार आकाशासारखे निर्मळ

पदार्थ तेथें दिसत होते. एक तर—मध्यभागीं असलेला हा कृष्णाकाशाकार रुद्र. तो निश्चल सुवासाप्रमाणें आकाशांत निराधार स्थित होता. दुसरा—फार दूर सातो पाताळाच्या खालीं पृथ्व्याकाशतलासारखा ब्रह्मांडगृहाचा भाग होता. तिन्ही लोकांचें व यांतील सर्व पदार्थांचें भस्म होऊन व तें पुनः जलानें भिजून त्याचा चिखल झाला होता. त्यानें व्यापलेला तो भूतलभाग वरच्या आकाशभागापेक्षा किंचित् स्थूल होता. तिसरा पदार्थ—वरील ब्रह्मांडभागभूमि हा होता, तो फार दूर असून तेथपर्यंत दृष्टि पोंचत नसल्यामुळें तो गगनासारखा नीलवर्ण भासत होता. या एकमेकापासून फारच दूर असलेल्या दोन ब्रह्मांडखंडांच्यामध्यें जें अंतराळाकाश होतें, तेंच निर्मळ ब्रह्म होय. तें अनादि व अनंत, निर्मळ व विस्तृत होतें. हाच चवथा पदार्थ मी तेथें पाहिला. या चार वस्तूंवांचून तेथें मला आणखी कांहींएक दिसलें नाहीं.

**श्रीराम**—अहो गुरुवर्य, ब्रह्मगृहरूप कटाहाच्या बाहेर काय होतें ! ( म्हणजे आपण वर जीं दोन अवरणें—भूतळ व ऊर्ध्व आकाश—सांगितलीं त्याच्या पलीकडे काय होतें ? त्यांना आवरण करणारें काय होतें ? व त्यांची किती संख्या होती व तीं आवरणें निराधार राहिलीं कशीं?

**श्रीवसिष्ठ**—त्या दोन ब्रह्मांडखंडाच्या पलीकडे दशगुण जळ होतें. त्याच्या पलीकडे तसेंच ज्वालारूप तेज होतें. तेजाच्या पलीकडे तसाच निर्मळ वायु होता. त्याच्या पलीकडे दसपट निर्मळ आकाश होतें. त्याच्या पलीकडे अतिस्वच्छ व अनंत परब्रह्माकाश होतें. ( हें शबलब्रह्म होय) याच्या पूर्वी, आकाशाच्या पुढें अहंकार, महत्तत्त्व, प्रकृति इत्यादि निरनिराळीं तत्त्वें निरनिराळ्या वाद्यांनीं मानलेलीं आहेत. व त्यांचा पुराणादिकांतूनही निर्देश केला आहे. पण तीं श्रुतिप्रोक्त नसल्यामुळें आम्हीं त्यांचा येथें उल्लेख केला नाहीं.

**श्रीराम**—पण भगवन् , ब्रह्मांडखंडाच्या वर व खालीं असलेल्या महाजलाला धारण कोण करतें ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, बालक जसें आपल्या आईकडे धांवत जातें त्याप्रमाणें तें जळ पृथ्वीच्या ब्रह्मांडखर्परभागाचाच आश्रय करितें. ताहानेनें व्याकुळ झालेले लोक जसे पाण्याकडे वेगानें धावतात, त्याप्रमाणें सर्व

पदार्थ जवळ असलेल्या ब्रह्मांडशरीराकडे जातात. अवयव जसे अवयवीला सोडीत नाहींत त्याप्रमाणें त्या पार्थिव भागाचाच आश्रय धरून राहिलेले तैजसादिक पदार्थ आपली स्थिति सोडीत नाहींत. ' पण जळादि इतर आवरणास आधारभूत होणारीं हीं दोन ब्रह्मांडखर्परें ( ब्रह्मांडाचीं खापरें, कवच्या ) फार जड ( भारी ) असल्यामुळें पडत कशीं नाहींत. त्यांना कोण धारण करतें ? म्हणून म्हणशील तर सांगतों—रामा, हें जगही वस्तुतः कोणी धरलेलें नाहीं, तें पडत नाहीं व त्याला कांहीं आकारही नाहीं. पण तें कोणी धरलें आहे, पडत आहे व साकार आहे, असें स्वप्ननगराप्रमाणे भासतें. अर्थात् जग सत्य आहे, अशी दृष्टि ठेवल्यास आधारादिकांविषयींची चिंता उद्भवते; पण तें मिथ्या आहे, असें ठरल्यावर ती उद्भवण्याचा मुळीं संभवच नाहीं. कारण पर्वतादिकासारखे मोठमोठे गुरु ( भारी ) पदार्थही स्वप्नादि भ्रमांत आधारावांचून राहू शकतात. जगत् हा चित्-मधील केवळ आभास आहे. सर्व पदार्थांचा स्वभाव संवेदनाप्रमाणेंच नियत अथवा अनियत असतो, त्यामुळें त्यांना संवेदनानेंच धरलें होतें. सारांश, शरत्समयीं अंतरिक्षांत पाहिलें असतां ज्याप्रमाणें बोराएवढालीं मोठीं मोत्यें खालीं गळावयासच झालीं आहेत, असे दिसतें त्याप्रमाणें चिदाकाशांत भ्रांतीनें स्फुरणाऱ्या या जगाची संख्या, आधार इत्यादि तत्त्वाची गणना करण्यास कोण समर्थ आहे ? ८०.

**सर्ग ८१—भैरव रुद्र व त्याची छाया कालरात्री यांचें नृत्य**

**श्रीवसिष्ठ**—राघवा, त्यानंतर तो उद्धत आकाराचा रुद्र त्या महा अंबरांत नाचावयास लागला आहे, असें मला दिसलें. आकाशाच्या आकारास प्राप्त झालेल्या त्यानें आपली व्यापिता तर सोडली नाहींच; पण त्या महा आकारानेंच तो थै थै करूं लागला. तो मेघाप्रमाणें काळा होता. त्यानें दाही दिशा भरून सोडल्या होत्या. सूर्य, चंद्र व अग्नि हेच त्याचे तीन नेत्र होते. त्याच्या भुजा व पाय त्यावेळीं हालत होते. त्याच्या शरीराच्या मागें जों मी पहात आहें, तों मला रुद्राच्या नर्तनाचें अनुकरण करणारी छाया उत्पन्न झाली आहे, असें आढळलें. पण सूर्यादिकांचा अभाव झालेला असल्यामुळें सर्वतः अंधकार पसरलेला असतांना ही याची छाया कशी पडली आहे, असा जों मी मनांत विचार

करीत आहे तों ती त्रिनयना व विपुल शरीराची छाया त्याच्यापुढें येऊन उभी राहिली. ती काळी, कृश व जिच्या अंगावर मोठाल्या शिरा स्पष्ट दिसत आहेत अशी होती. तिच्या विखुरलेल्या केसातून पुष्पें होतीं. तिचें शरीर शिथिल झालें होतें. खललेल्या काजळाप्रमाणें काळ्या वर्णाच्या तिला पाहून ही अंधारी रात्रीच शरीर धारण करून आली आहे, कीं ही तमःश्री देहयुक्त झाली आहे, कीं ही आकाशाची नीलिमा साकार झाली आहे, असें माझ्या मनात आलें. अनेक उपवास केलेल्या एकाद्या दरिद्राप्रमाणें ती कृश होती. तिच्या अंगावरील शिराच्या जाळ्याकडे पाहिलें असता, ब्रह्मदेवानें ही कृश असल्यामुळें स्वतः उभी राहण्यास समर्थ नाहीं, असे पाहूनच जणुं काय तिला शिरांनीं वेष्टित केलें आहे, असा तर्क होत असे. शिवाय ती इतकी उंच होती कीं, तिच्या मस्तकाचें अग्र मी फार वेळ खालीं व वर हिंडून मोठ्या प्रयत्नानें पाहिलें. तिच्या आकाराचा निश्चय करवत नसे. ती क्षणात एकभुजाकार दिसे. व लागलीच अनेक भुजांनीं युक्त होई. एकदा तिला एकच तोंड आहे, असें वाटे, पण लागलेंच पहावें तों ती अनेक मुखाकार होई. तिला अनेक उग्र मुखें आहेत, असा भास होत असे. केव्हा ती पादरहित भासे. काहीं वेळानें शंभर पायानीं भूषित आहे, असें दिसे व केव्हां तर तिला एकच पाय आहे, असा अनुभव येई.

अशा त्या घोर छायेला पाहून व ती त्या भगवान् रुद्राबरोबर अगदीं त्याच्या सारखेच तांडव करीत आहे, असें समजून मी ही कालरात्रि आहे, असें अनुमान केलें. तिच्या मुख-प्रभृति पादपर्यंत शरीरांत सर्व जगातील पदार्थ राहिले होते. तिच्याबरोबर ते सर्व पदार्थही नाचत आहेत, असें भासलें. पूर्वी गिळलेलें जग आपल्या अंगांत व्यक्त करून ती तृप्त झाली होती. आरशातील प्रतिबिंबाप्रमाणें सर्व जगत् तिच्या विस्तीर्ण देहांत भासत होतें. वस्तुतः ती नाचत नसून, हें सर्व पर्वत-सागरादियुक्त जगच नाचत आहे, असें मला त्यावेळीं भासलें. मेलेलें तें पुनः परलोकीं सुखानें नांदत आहे, असाच मला भास झाला. त्या नृत्यात मी अनेक चमत्कार पाहिले. सर्व पर्वत, सागर, इत्यादि पदार्थ नाचत होते, हें तर झालेंच; पण माशांनीं खडखडीत जमिनीवरून

भराभर संचार करणें, पक्ष्यांनीं आकाशाप्रमाणें पाण्यांतून उडत जाणें, पाण्यानें अतराळीं स्थिर राहणें इत्यादि दुसरेही अनेक जादूचे खेळ मीं अवलोकन केले. त्या काळरात्रीच्या शरीरांत एका क्षणात किती कल्प, सर्ग, ब्रह्मादि देव, आकाशादि भूतें व वृक्षादि पदार्थ होऊन जात असलेले मी पाहिले, तें काहीं मला सागवत नाहीं. सर्व वस्तू आपापला लौकिक स्वभाव सोडून व्यवहार करीत होत्या. त्या देवीच्या शरीरात क्रिया—शक्ति भरून राहिली होती. जगद्रूपी मुगाचे कण एकत्र होऊन तिच्या शरीरात नाश पावत होते. ती क्षणात कांहीशी आहे, असा भास होत असे, व क्षणात नाहीं असे वाटे. क्षणात आगठ्या एवढी होई व क्षणात सर्व आकाशास व्यापून सोडीत असे. ती देवी परिणामिस्वभाव जड जगन्मयी असल्यामुळेंच अशी प्रतिक्षणीं निरनिराळ्या रूपानें भासत होती. ती देवी ( काळत्रयवर्ती त्रिभुवनाच्या आंतील चित् ) चित्रकाराच्या अंतःकरणात असलेल्या चित्राच्या आकाराप्रमाणें प्रत्येक अंतःकरणातील काम कर्म-वासनापरिपाकानुसार व्यक्त होते. ती देवी अविद्यावृत-एकचिदात्मक असल्यामुळें, सर्व संसारात्मक-एकाकार होऊन राहते. पण विद्येच्या योगानें अविद्येचा नाश झाला म्हणजे ती अतिशात चिदाकाशमात्र व निष्प्रपंच होते. साराश ती बद्धदृष्ट्या व मुक्तदृष्ट्या जाणलें जाणारें अनाद्यनन्त रूप धारण करते. परमार्थतः तें चिदेकरूप आहे. जीवन्मुक्तांना तें विवर्तदृष्ट्या व युक्तिवाद्याना परिणामदृष्ट्या भासतें. असो; ती मोठी भैरवी देवी त्या कल्पान्तरुद्राच्या पुढें नाचूं लागली असता तिच्या आकारानें त्रिभुवनास व्यापून सोडलें. त्यामुळें ती कल्पान्तवायूनें हालविलेल्या वनपंक्तीप्रमाणें दिसली, कुदळ, उखळ, आसन फळाचे हार, उदकुंभ, करंड्या, मुसळें इत्यादिकाची माळ तिनें आपल्या गळ्यात घातली होती. तिच्याकडून वंदन केला जाणारा तो आकाशभैरवही तिच्या बरोबर तसाच नाचत होता. असो; याप्रमाणें उद्धत ताडवनृत्य करणारा तो काळभैरव तुम्हां सर्वांचें पालन करो. ८१.

**सर्ग ८२—चिद्रूप शिवाचें तत्त्व.**

**श्रीराम**—भगवन्, सर्वनाश झाला असतां ती देवी कोणत्या अंगानें नाचते. उखळ मुसळ इत्यादि पदार्थांची माळ तिनें घातली होती, हें

आम्ही खरें कशावरून समजावें? कारण युक्तिदृष्ट्या तें असंभव वाटतें. नष्ट झालेलें जग पुनः कसें दिसलें. त्या काळीची देहस्थिति कशी झाली?

**श्रीवसिष्ठ**—रामा, तो पुरुष, ती स्त्री, त्यांचें नृत्य, त्यांच्या त्या आकृति इत्यादि कांहीं खरें नाहीं. तें सर्व अनादि चिन्मात्र आकाश आहे. तें अनंत, शांत, आभासमात्र, व अव्ययच पसरलें आहे. तें साक्षात् शिवस्वरूप असतांनाही भैरवाकृति दिसत होतें. सोनें जसें निराकार राहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें तें चेतन असल्यामुळेच तशा प्रकारच्या स्वभाववैभवावांचून राहत नाहीं मिरची तिखटपणाला सोडून राहील कां? नाहीं. मग चिन्मात्र तरी चेतनावाचून कसें राहील? स्वभावाला सोडून पदार्थांची स्थिति कशी होणार? माधुर्यस्वभावाला सोडून शर्करा एकक्षणभरही राहत नाहीं, हें सर्वांना ठाऊक आहे. शिवाय नष्ट झालेल्या वस्तूंचेंही स्मृतिसमयीं भान होत असल्यामुळें चित्-दृष्ट्या कशाचाही निरन्वय नाश अप्रसिद्धच आहे. ब्रह्माहून पृथक् नसलेल्या जगाला केवल ब्रह्मसत्तेहून निराळी सत्ता नसल्यामुळें कोणत्याही पदार्थाचा अत्यंत नाश अशक्यच आहे. शबलब्रह्मच स्वसंकल्पानें जगद्रूप झालेलें असल्यामुळें, श्रुति–स्मृति–पुराणोक्त सर्व मूर्त व अमूर्त वस्तु तद्रूपच आहेत. ब्रह्मसत्ता हेंच जगाचे रूप आहे. ती तत्त्वबोधक प्रमाणावांचून म्हणजे नुसत्या लौकिकदृष्ट्याच उत्पत्ति, प्रलय इत्यादि आकारानें रज्जुसर्पन्यायानें भासते. पण तत्त्वबोधक प्रमाणानें तिचा यथार्थ रूपानें साक्षात्कार होतो. प्रपंच, त्याच्या सर्व अवस्था, सर्व विकार, बंध, मोक्ष, विद्या, अविद्या, शुभ, अशुभ इत्यादि सर्व शुद्ध, निरामय, चिदाकाश आहे.

राघवा, हा जो मी चिन्मय परमाकाशात्मा सांगितला तोच सनातन शिव आहे. तोच हरि होतो. पितामह, चंद्र, सूर्य, इंद्र, वरुण, यम, कुबेर, अग्नि, इत्यादि सर्व चिन्मयाकाशाचे कोश आहेत. अन्यथा ग्रहण करविणाऱ्या अविद्येमुळें हे सर्व आहेत असें वाटतें. पण ते सर्व परमार्थस्वभावमात्र आहेत, असें जाणल्यानें चिन्मात्र होतात. अर्थात् ब्रह्मच कांहीं काळ अज्ञदृष्टीनें जीव व जगत् वेषानें स्थित होतें. पण पुढें विद्वदृष्टि प्राप्त होऊन बोध झाला असता तें स्वरूपांत स्थित होतें. म्हणजे जीव आपल्या परब्रह्मात्मक स्वस्वभावास जोंपर्यंत जाणत नाहीं तोंपर्यंतच अज्ञात स्वात्मस्वरूपांतील

संसारमहासागरात जन्म–मरण–भ्रमणादि नाना तरंग करतो. पण जेव्हां जाणतो तेव्हा तन्मयतेस प्राप्त होतो व तत्काल निरामय होतो. राघवा, ज्ञान झालें असता ( आत्म्याचा साक्षात्कार झाला असता ), हें सर्व इतकें शांत होतें कीं, मग तो सागर नाहीं, तरंग नाहीं व क्षोभही नाहीं. तर सर्व अनंत पर तत्त्वच आहे ८२.

**सर्ग ८३**—नृत्य करणारा रुद्र व कालीही चिन्मात्ररूप होय.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, वस्तुस्थिति अशी असल्यामुळेंच अविद्याभ्रांतीचा निरास करून तात्त्विक शिवस्वभावदृष्टीचें उद्घाटन करण्यासाठीं, मी स्वतः अनुभविलेल्या या जगत्प्रलय, नृत्य इत्यादिकांचें वर्णन केलें. पण तें सर्व खरें आहे, असें भ्रमानें समजूं नये. तत्त्वदृष्ट्या मी त्याची आकृति चिदाकाशमात्र पाहिली. मजवाचून दुसऱ्या कोणाही तत्त्वदृष्टिहीन पुरुषाला ती त्याची आकृति दिसणें शक्य नाहीं. मी तत्त्वदृष्टीनेंच कल्पान्तादि सर्व मायामात्र आहे, असें जाणलें. रामा, दीर्घ परिचयामुळें तुझी आधिभौतिक दृष्टि रूढ झाली आहे, त्यामुळें तुझ्या वाणीमध्ये जें जें आरूढ होतें तें तें सर्व तत्क्षणीं सत्यताभ्रांतीचा विषय होतें. परमार्थतः तो भैरव नाहीं, ती भैरवी नाहीं व तो जगाचा क्षयही नाहीं, तर तें सर्व भ्रांतिमात्र आहे.

**श्रीराम**—भगवन्, प्रामाणिकाच्या दृष्टीनें तें सर्व नाहीं, हें खरें; पण अप्रामाणिकाच्या दृष्टीनें जें कांहीं असल्यासारखें वाटतें, तें तरी कल्पांतीं नाश पावतें कीं नाहीं? मग असें जर आहे, तर चित्-चें चेत्यरहित ( निर्विषय ) चित् हें नाव कसें रूढ झालें? त्याप्रमाणें आश्रयाचा अभाव असताना चिद्घन चेतित करणारा कसा होतो? अर्थात् त्रिपुटीची उपपत्ति लागत नाहीं. ' त्यावेळीं अविद्या असत् असलेलेंही दृश्य दाखविते, व त्यावरूनच त्रिपुटीची सिद्धि होते, ' असें म्हणाल, तर सर्ग व प्रलय याच्या विषयींही तसेंच म्हणतां येईल. तसेंच रुद्र व देवी याचें सर्व जगद्घटित शरीर चेतित झाल्यावांचून त्यांचें नृत्य संभवत नाहीं. एकाच वेळीं द्वैत व अद्वैत यांचीही भावना करता येणें शक्य नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—बाबारे, तूं जरी अशी शंका घेऊं लागलास तरीही तुझा द्वैतैक्यसंदेहसागर शांत होण्यासाठीं मी तिचें समाधान सांगतों तें ऐक.

सर्व वस्तूंचा प्रलय होऊन, अवशिष्ट राहिलेल्या चिन्मात्राचें जर कांहींच चेत्य (विषय) राहिलें नाहीं, तर दुसरी वस्तूच नसल्यामुळें कोठेंही व केव्हाही कोणतीही वस्तु कोणालाही कळणार नाहीं. कारण सर्व एक आत्माच झाल्यावर कोणकोणत्या साधनानें कशाला पाहणार? असें श्रुतीनें सांगितलें आहे. अर्थात् प्रामाणिकांच्या दृष्टीनें सिद्ध होणारा नित्य मुक्त आत्मस्वभावच तूं येथें सांगितलेला प्रलय झाला. त्यामुळें अप्रामाणिकाच्या दृष्टीनें प्रश्न करणें उचित नव्हे. बरें तूं पहिल्या दृष्टीहून दुसरी दृष्टि अगदीं विलक्षण आहे, असें दाखविण्यासाठीं प्रलयामध्येंही अविद्यादि कांहीं चेत्याचा अंगीकार करीत असलास तर त्या कारणानेंच त्रिपुटी, जगद्घटित रुद्र व देवी यांचीं शरीरें, त्यांचें नृत्य, इत्यादि सर्व सिद्ध होईल. म्हणजे मी सांगितलेल्या पैकीं कांहीं असंभवनीय नाहीं. पण तेवढ्यावरून वास्तविक कूटस्थ चित्स्वभावाची हानि होत नाही. कारण भ्रांतीनें अन्यथा प्रतिभास जरी झाला तरी वास्तव स्वभावापासून वस्तु च्युत होत नाहीं. याविषयीं स्वप्ननगरादिकाचे दृष्टान्त पूर्वी पुष्कळ दिले आहेत. तस्मात् सर्व ज्ञेयाला जाणूनही चित् स्वरूपानें सदा विषयशून्यच असते. यास्तव हे रामा, तूंही त्या ईश्वराप्रमाणें लोक दृष्ट्या आपलें प्रकृत परंपराप्राप्त राज्य-पालनादि आचरण कर. पण तें करीत असतानाही आत्म-दृष्ट्या परमार्थ मौन धारण करून, मान, मोह, मद इत्यादि दोषाचा त्याग कर. जीवभावालाही अहंकारत्याग-पूर्वक विसर, व विक्षेप-रहित होऊन रहा ८३.

**सर्ग ८४**—शिव व शक्ति यांचे निजरूप व उखळादिकांच्या मालेचें स्वरूप.

**श्रीराम**—भगवन्, आपण वर सांगितलेली काली नाचताना कोणत्या रूपाची असते व तिची माळा कोणत्या आकाराची होती?

**श्रीवसिष्ठ**—तो भैरव चिदाकाश शिव असून त्याची ती मनोमय स्पंदशक्ति त्याच्याहून भिन्न नव्हती, असें जाण. वायु व त्याची स्पंदशक्ति, अग्नि व औष्ण्य यांची जशी एकता तशी चिन्मात्र व त्याची ती स्पंदशक्ति ह्यांची सर्वदा एकरूपता आहे. स्पंदावरून वायूचा बोध होतो; औष्ण्यावरून अग्नीचें अनुमान होतें; त्याचप्रमाणें त्या अमळ, शांत, चिन्मात्र शिवाचें त्याच्या स्पंदमायाशक्तीवरून ज्ञान होतें. तिच्यावांचून नाहीं. शिव

हेंच अवाच्य व शांत ब्रह्म आहे, असें तत्त्वज्ञ जाणतात, त्याची स्पंदशक्ति हीच त्याची 'मी बहु व्हावें' ही इच्छा आहे. सत्यकाम ईश्वराची ती इच्छाच मनोराज्याप्रमाणें जगत् पसरते. तीच आपल्यांतील चिदाभासाने प्रदीप्त झाल्यामुळें चितिशक्ति ( जीवचैतन्य ) होय. जगदाकारानें परिणाम पावल्यामुळें तीच सृष्टीची प्रकृति, झाली. दृश्य पदार्थरूप आभासांमध्यें अनुगत असलेल्या उत्पत्ति, आप्ति, विकृति, व संस्कार या चार फलांना निर्माण केल्यामुळें ती क्रिया होते. पुराणांमध्यें ती शुष्क आहे, असें सांगितलें आहे. त्याचें कारण—समुद्रादि जलानें ओलें झालेलें ब्रह्मांड हाच तिचा देह असून तो वडवाग्निशिखाकार आदित्यादि ज्योतींकडून सुकविला जातो, म्हणून तिला शुष्क असें म्हणतात. त्याचप्रमाणें तिच्या चंडादि ( प्रखरत्वादि ) गुणामुळें ती चंडिका, जया, विजया, सिद्धा, अपराजिता, वीर्या, दुर्गा, उमा, गायत्री, सावित्री, सरस्वती, गौरी इत्यादि नावानीं प्रख्यात झाली आहे. शिव व शिवा अशीं तीं दोघेंही आकाश-रूप असल्यामुळें त्याचें शरीर काळें दिसतें. चिद्रूप असाही त्या दोघानीं मांसमय स्वशरीराप्रमाणें आपलें काळें शरीर संकल्पदृष्टीने पाहिलें. आकाशाप्रमाणेंच त्यांची निराधार स्थिति होती. अमूर्तत्व व स्वच्छत्व हे दोन धर्मही त्याच्या ठायीं आकाशाप्रमाणेंच राहत होते.

राघवा, आता त्याच्या हस्तादि अवयवाचें बहुत्व व उखळ, मुसळ इत्यादि-कांची माळा याविषयीं सांगतों तें ऐक. ज्याअर्थी ती भगवती अनाद्यन्ता चितिशक्ति ही स्वेच्छेनें सर्व वैदिकक्रियारूप होऊन द्यावें, स्नान करावें, हवन करावें इत्यादि वेदविहित दान-स्नान—यागादि श्रेष्ठ शरीरिणी होते, त्याअर्थी त्या देवीचे नानाप्रकारचे अभिनययुक्त नाच ह्याच ब्रह्माच्या कर्म-फलरूप सर्व प्राणि-सर्ग, स्थिति, जरा, मरण इत्यादि रीति आहेत, असें जाणावें. ही देवी क्रीयारूप असल्यामुळें व निरवयव क्रियेची प्रसिद्धि होणें अशक्य असल्यामुळें तिच्या स्वरूपसिद्धीकरितांच हस्त—पादादिकांची कल्पना केली आहे. ती कल्पित अवयवात्मिका देवीच ग्राम, द्वीप, नगर इत्यादिकाची शरीरावर माळ धारण करते ( म्हणजे त्यांच्या योगानें स्पंद करून आपली क्रियारूपता प्रकट करते. काली इत्यादि नावेंही तिला क्रिया-स्वभावता, सर्व भूलोकादिकांस धारण करणें, इत्यादि निमित्तानींच प्राप्त

झालेलीं आहेत. ) पण ती देवी याप्रमाण जगद्रूपी अंग धारण करीत असली तरी तिचा स्वभाव असंग, उदासीन चिद्रूप असल्यामुळें ती वस्तुतः निरवयवच आहे. ती शिवाहून भिन्न नसल्याकारणानें तिला शिवत्वही आहे, असें जाणावें. तिच्याठायीं वस्तुतः क्रियारूपत्वही नाहीं. तें अबोध दृष्टीतच मात्र अनुभवास येत असतें. पण शिवस्वरूप बोध-दृश्य आहे. म्हणून तेंच खरें होय. बोधामुळें ती क्रियास्वरूपा-पासून व्यावृत्त होऊन जेव्हां आपल्या वास्तवस्वभावानें राहते तेव्हाच तिला शिव असें म्हणतात. कूटस्थाच्या चितिशक्तिरूप देवीचें अविद्या-वशात् प्रतिकूल स्पंद व जडभाव याच्या योगानें स्थित होणें, हीच क्रिया आहे. असो; याप्रमाणें कल्पित जगद्देह धारण करणाऱ्या देवीनें कल्पित शूर्प—मुसळादिकांची माळा धारण करणेंच उचित आहे. कारण चवदा लोक व त्यातील सर्व पदार्थ हे तिच्या शरीरातील कल्पित भागच होते.

रामा, सर्व पदार्थ आत्म्यामध्यें स्थित असल्यामुळें आत्मरूप आहेत. दृढ ध्यानानें वासना क्षीण झाली असता त्याची प्रतीति येत नाहीं. म्हणून केवल अवस्थेंत ते आत्मरूप होतात. अर्थात् आरशातील प्रति-बिंबाप्रमाणें किंवा स्वप्नाप्रमाणें अज्ञदृष्ट्या ते जरी सत्य वाटले तरी तसे नाहींत. तथापि त्याच्या योगानें अर्थक्रिया होऊ शकते. आरशातील घटादिकाच्या योगानें बाहेरील जल आणणें इत्यादि क्रिया करिता येत नाहींत, म्हणून म्हणशील तर सांगतों— बाबारे, आरशातले किंवा स्वप्नातले पदार्थ बाहेरील किंवा जागरावस्थेंतील व्यवहाराच्या उपयोगीं कसे पडणार ? दुसऱ्या जागीं असलेली वस्तु दुसऱ्या जागच्या अर्थक्रियेच्या उपयोगीं असणें शक्य नाहीं. गावात असलेले सहस्रावधि घट तुझ्या घरचें पाणी आणण्याच्या उपयोगीं आहेत का ? नाहींत. पण तेवढ्यावरून ते असत्य आहेत, असें म्हणणें युक्त नव्हे. प्रतिबिंबातील पदार्थ त्यांतील अर्थ—क्रियेस; स्वप्नांतील पदार्थ स्वाप्न क्रियेस व जागरांतील वस्तु जागरातील अर्थ—क्रियेस समर्थ आहेतच. अर्थात् वस्तूची सत्यता द्रष्ट्याच्या दृष्टीवर अवलंबून आहे. त्यानें सत्य दृष्टीनें पाहिल्यास ती सत्य होते व असत्य दृष्टीनें पाहिल्यास असत्य होते. पण दुसऱ्यालाही ती तशीच भासेल, असा कांहीं नियम नाहीं. तथापि

सर्व सत्य व असत्य वस्तु ज्याच्यामध्यें व ज्याच्या बलानें भासतात तो आत्मा नित्य सत्य आहे. कारण तो द्रष्टयानें कल्पिलेल्या सत्या-सत्यांचा आधार आहे. त्याच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे असत्य कांहींच नाहीं. कारण आत्मा जर सर्व भाव व अभाव पदार्थ आहे, तर ते आत्म्याच्या स्वभावाविरुद्ध असत्य कसे होणार? असो; रामा, ती काळी असें उद्धत नृत्य करीत होती तरी तिच्या अंगावरील त्रिभुवन हाललें किंवा घसरलें नाहीं. कारण झोंपीं गेलेला पुरुष आंत स्वप्न नगर पाहत असतो व त्याचवेळीं त्याचा देह एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळतो; पण त्यामुळें त्याच्या मनातील काल्पित नगर कधीं ढासळत नाहीं. किंवा आरसा कितीही जोरानें जरी हालविला तरी त्यातील प्रतिबिंब हालत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. रामा, हा त्रैलोक्यरूपी महा आरंभ स्वप्नांतील नगरादिकाप्रमाणें द्रष्टयाच्या दृष्टीनें सत्य असला तरी भ्रांतिमात्र आहे. तेव्हा काळीच्या नाचानें तो ढासळणार कसा? स्वप्नग्राम सत्य केव्हा असतो, तो मिथ्या केव्हा होतो, तो तुटतो केव्हा व असतो केव्हा? केव्हांही नाहीं. त्याचप्रमाणें ही सर्व पुढें दिसणारी दृश्यश्री भ्रांतिमात्र आहे. स्वप्नगत नगरादिकांच्या अनुभवाप्रमाणेंच त्रैलोक्यानुभवही संकल्प-मात्र आहे. साराश बा रामा, चित्–मध्यें 'अहं' अशी व 'जगत्' अशी भावना वस्तुतः नाहीं. ती आकाशाच्या काळ्या रंगासारखी मिथ्या आहे. स्वरूपाच्या अज्ञानामुळें ती भ्रांति झाली आहे. म्हणून स्वरू-पाला साक्षात् जाणलें असता ती शांत होते ८४.

सर्ग ८५—तसा नाच करणाऱ्या त्या देवीनें शिवाला पाहिलें त्याला स्पर्श केला. प्रेमानें त्याच्या अंगांत ती विलीन झाली व याप्रमाणें त्या दोघांचा एकभाव झाला.

श्रीवसिष्ठ—रामभद्रा, याप्रमाणें ती काळी आपल्या परिस्पंदात्मक दीर्घ भुजलतांनीं आकाशास दाट अरण्य करीत नाचूं लागली. जिला स्वतंत्र कळलेलें नाहीं अशी ही चितिशक्तिच ती क्रिया होय. सूप, कुदळ, बाण, शक्ति, उखळ, मुसळ, इत्यादि सर्व भाव व अभावरूप पदार्थ, कला, काल इत्यादि सर्व तिचें भूषणच होय. फिरवीत असलेलें कोलीत जसें चक्रादिकांच्या आकाराचे होतें त्याप्रमाणें चित्स्पंदच जगाचा आकार धारण करतो. कल्पना हृदयामध्यें नगराला जशी धारण करते त्याप्रमाणें चित्स्पंद

जगाला धरतो अथवा कल्पनाच जसे नगर तसें कल्पनाच जगत् होय. ती शिवाची इच्छा शिवाहून भिन्न नाहीं. कारण वायूंतील स्पंदाप्रमाणें ती त्याच्याहून पृथक् नाहीं. स्पंदरहित वायु जसा शांत शांत तसा इच्छारहित शिव शांत शांत असतो. अमूर्त वायु आकाशात जसें मूर्त शब्दाडंबर करतो त्याप्रमाणें अमूर्त शिवेच्छा मूर्त जगत् करते. असो; ती त्याप्रमाणें नृत्य करीत असताना त्या परम–आकाशात तिला अकस्मात् शिव दिसला. त्याबरोबर तिच्या मनात प्रेमाचा महापूर आला व त्याच्या भरांतच तिने त्याला स्पर्श केला. पण त्या परम कारणरूप शिवास स्पर्श करतांच स्वप्रकृतीस जावयास प्रवृत्त झालेली ती इतकी कृश झाली कीं, आपला तो अनंताकार सोडून एकाद्या पर्वता-एवढी बनली. पण काहीं वेळानें ती एकाद्या नगरासारखी झाली. पुढें अशीच कृश होतां होतां ती आकाशाकार होऊन शिवासारखी बनली. एकादी वेगवती नदी जशी महासागरात शिरते त्याप्रमाणें ती शंकराच्या शरीरात शिरली, तेव्हा शिवेनें रहित झालेला एकटा शिवच राहिला.

**श्रीराम**—भगवन्, शिवाचा स्पर्श होताच ती शिवा परमेश्वरी शांत कां झाली? तें मला तत्त्वतः सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, ती शिवाची ( परमेश्वराची ) इच्छा, त्याची प्रकृति आहे. ती स्वाभाविक स्पंदशक्ति जगन्माया या नावाने प्रख्यात आहे. पवनाकार पुरुष तिच्याहून अगदी विलक्षण श्रेष्ठ, शिवस्वरूप व शांत आहे. या संसारात त्याची प्रकृतिच भ्रमण करीत असते. नित्यतृप्त शिवाला ती जोंवर पहात नाहीं तोंवर तिचे नृत्य थांबत नाहीं. कारण कोण-त्याही इच्छेचा स्पंद इष्ट वस्तूची प्राप्ति होई तोंच होणें उचित आहे. पण इष्टप्राप्तीनंतर संविदेकरूप असलेली ती अकस्मात् शिवाला स्पर्श करून अगदीं तन्मय होऊन जाते. प्रकृति पुरुषाला स्पर्श करताच आपला कार्याकार परिणाम सोडते व नदी जलरूप असल्यामुळें, जलरूप साग-रात मिळून जशी तदाकार होते त्याप्रमाणें ती ( प्रकृति, शिवा ) शिवा-कार बनते. शिवेच्छा चिति आहे. ती देवाला येऊन पोंचताच शांत होते. वृक्षादिकाच्या सावलींत गेलेल्या पुरुषाची सावली जशी त्याच्या शरीरांत प्रवेश करते तशी प्रकृति सत्वर पुरुषामध्यें प्रवेश करते. चित्

आपल्या पुरुषाख्य सनातनभावास जाणल्यावर पुनः या संसारात भ्रमण करीत नाहीं. ती तद्रूप होते. साधु पुरुष चोरांना ओळखीपर्यंत त्यांच्या संघांत राहतो. पण हे चोर आहेत, असें कळतांच तो त्यांच्या संसर्गाचा तिरस्कार करतो. त्याप्रमाणें चिति जोंवर परम-तत्त्वास पहात नाहीं तोंवरच द्वैत सत् आहे, असें जाणून त्यांत रमते. पण त्याला पहातांच ती तन्मय होते. कारण बा रामा, रसायनाच्या माधुर्याचा स्वाद घेतल्यावर जसा कोणी त्याचा अव्हेर करीत नाहीं त्याप्रमाणें आत्मतत्त्व एकदा हातीं लागल्यावर मग त्याला सोडणार कोण? कारण त्याची प्राप्ति होतांच जन्म-मरण-मोहमय सर्व निरंतर दुःखें शांत होतात ८५.

**सर्ग ८६**—ब्रह्मांडाच्या कवच्याचाही ग्रास करणारा रुद्र कृश होत होत शिलेतील चिदाकाशात गुप्त झाला.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, आता महाकाशामध्यें तसा स्थित असलेला तो रुद्र देह-भ्रांति सोडून शांत कसा होतो, तें ऐक. तो रुद्र व ब्रह्मांडाचीं तीं दोन्ही (एक खालचें व दुसरें वरचें) शकलें असे तिन्ही पदार्थ चित्रात काढल्याप्रमाणें त्या आकाशात निश्चलच होते. कांहीं वेळानें रुद्रानें त्या शकलांस पाहिलें, आणि लागलीच श्वासवायूने त्याना जवळ ओढून घेऊन तोंडात टाकलें. त्यामुळे आकाशात जसें एकटें शून्यच असते त्याप्रमाणे तो तेथें एकटाच राहिला. काहीं वेळानें ब्रह्मांडास निःशेष खाऊन सोडणारा तो उग्र रुद्र अभ्राप्रमाणें लहान झाला. पुढें तो क्षीण होत होत एकाद्या काठीएवढा, टीचभर, बोटभर, रेतीच्या कणाएवढा, व शेवटीं परमाणूसारखा झाला. मी त्या सूक्ष्म देवाला दिव्य दृष्टीनें अवलोकन केलें. परमाणुरूप झाल्यावर थोड्याच अवकाशांत तो गुप्त झाला. त्यानंतर तो मला दिव्यदृष्टीनेंही दिसला नाहीं. शरत्कालच्या मेघाच्या तुकड्याप्रमाणें तो अशा रीतीनें शांत झाला. एकादें माकड जशीं दोन कोवळीं पानें तोंडात टाकतें. त्याप्रमाणें माझ्या समक्ष ब्रह्मांडकपाटांस खाणाऱ्या त्यानें आपला तो सर्व महारंभ सोडून शांत ब्रह्मभाव स्वीकारला. राघवा, याप्रमाणें मी त्या शिलेच्या उदरांतील ब्रह्मांडाची ब्रह्मपर्यन्त परिसमाप्ति साक्षात् पाहिली. आरशातील प्रतिबिंबासारख्या त्या शिलेंतील ब्रह्मांडभ्रमास अवलोकन

करून व त्या विद्याधरीला आठवून मी राजद्वारांत गेलेल्या एकाद्या गांवढळाप्रमाणें विस्मित झालों. मला तेथें दिसलेल्या शिलेसारख्या शिळा अन्यत्रही जेथें तेथें दिसूं लागल्या. कालीच्या अंगावरील सर्गाप्रमाणें इतरत्रही अनेक सर्ग आहेत. पण ते बुद्धिनेत्रानेंच दिसतात. मांसदृष्टीनें दिसत नाहींत. मांसदृष्टीनें पाहिल्यास ते शिळाकार भासतात.

राघवा, हा चमत्कार पाहून तर माझ्या आश्चर्याला सीमा नाहींशी झाली. दुरून मांसदृष्टीनें पाहिल्यास जी निश्छिद्र शिला भासते, तिच्याकडेच विवेकदृष्टीनें पाहिल्यास वर वर्णन केल्याप्रमाणें तिच्या उदरांत सर्व त्रिभुवन दिसतें. हें कळताच मी सर्व पर्वतभर फिरून त्याच्यावरील सर्व शिळा पाहिल्या. तों प्रत्येकीचें बाह्य स्वरूप निराळें आहे व आंतर स्वरूप निराळें आहे, असें मला कळलें. प्रत्येक शिळेंत एकेक भिन्न भिन्न व निरनिराळ्या अवस्थेंत असलेलें ब्रह्मांड मला आढळलें. कोठें त्रिभुवनाचा नुक्ता आरंभ होत होता. कोठें तें वृद्धि पावून त्यात चतुर्विध प्राणी उत्पन्न होत होते. कोठें चार सागर व भूमि यांची मर्यादा मात्र व्यक्त झाली असून त्याची स्थिति पुढें होणार होती. कोठें देवाचाही उद्भव झाला नव्हता. कोठें त्रिभुवनाची ऐन मध्यावस्था असून त्यात देव–दानव इत्यादिकांचें घोर युद्ध चाललें होतें. कोठें शुक्राचार्यांच्या विद्याबळानें असुर देवांचीं स्थानें बळकावीत होते. कोठें इंद्र राक्षसींचे गर्भ कापीत होता. कोठें सर्व प्रजा धर्मशील असल्यामुळें सर्व जीव सुख भोगीत होते. कोठें वेद-शास्त्राध्ययन चालू होतें. कोठें दैत्य देवांचीं नगरें लुटीत होते. कोठें गंधर्व व किन्नर सुरेनें मत्त होऊन गायन करीत होते. कोठें प्रळय होत होता. कोठें यातना शरीरें तयार होत होतीं. कोठें सर्व भूतें शांत होतीं. कोठें देव, असुर व मानुष क्षुब्ध झाले होते. कोठें सूर्याचा उद्भवच न झाल्यामुळें सर्वत्र दाट अंधकार पसरला होता. कोठें इंद्र पर्वतांचे पंख तोडीत होता. कोठें कल्पान्त रात्र सुरू झाली होती. कोठें राम व रावण यांचा संग्राम चालला होता. कोठें राम त्याला मारीत होता व कोठें रावण रामाला मारीत होता. कोठें भारतयुद्धानें वीरांच्या अक्षौहिणी क्षीण होत होत्या.

**श्रीराम**—भगवन्, तर मग काय मी पूर्वी होतों ! पण मी कोणत्या आकारानें त्यावेळीं होतों? याच कीं दुसऱ्या एकाद्या ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, सर्व भाव पुनः पुनः विवर्त पावत असतात. मापात घालून क्रमानें मापले जाणारे उडीद जसे तेच ते वारंवार त्याच त्या अथवा निराळ्या आकारानें दिसतात त्याप्रमाणें सर्व क्रम प्रायः एकसारखेच असून क्वचित् भिन्न आकाराचेही असतात. याला समुद्रावरील तरंगाचें योग्य निदर्शन आहे. रामा, तूं पुनः होतोस, मी पुनः होतों व हे सर्व जन पुनः पुनः होतात. तत्त्वदृष्ट्या पाहिल्यास परम तत्त्वात कांहीं संभवत नाहीं. पण माया-दृष्ट्या पाहिल्यास सर्व संभवतें. तथापि सागरातील तरंगाप्रमाणें उत्पन्न होणारे हे भाव तेच ते आहेत कीं निराळे आहेत, तें समजत नाहीं. संसारभ्रमानें अनत भूतें येतात व जातात. भूताच्या उत्पत्तीचा निर्णय करितां येत नाहीं, हेंच सृष्टि मायिक आहे, असें म्हणण्याचें कारण आहे. भूतें हे जगत्सागराचे शितोडे आहेत. जीव एकच असला तरी शरीरें एकाच प्रकारचीं असतात असा कांहीं नियम नाहीं. त्याचप्रमाणें जीव प्रतिशरीरीं भिन्न भिन्न आहे, या मतींही शरीरें अगदीं निरनिराळ्या प्रकारचींच असतात, असा कांहीं नियम नाहीं. कांहीं प्राणी कांहीं धर्मानीं सम असतात कांहींनीं असम असतात. ज्याअर्थी ते जीव राग, द्वेष, भोगलंपटता, इत्यादि दोषानीं आकुल झालेल्या विचित्रधर्माधर्मचेष्टेनें कालवशात् विचित्र नाना देह धारण केल्यामुळें अन्य-अन्यसे होऊन अधोलोकामध्यें व ऊर्ध्व स्वर्गादि लोकामध्यें पुनः पुनः जातात त्याअर्थी या चंचल संसारमय सागरांत वाहणारीं तरंगप्राय भूतें तींच आहेत, अथवा अन्य आहेत, असा निर्धार करण्यास कोण समर्थ आहे ? ८६.

**सर्ग ८७**—वसिष्ठांच्या देहांतच विश्वकल्पना, स्वत चेंच स्वयंभूत्व व शरीर, इंद्रियें इत्यादिकांचा उद्भव.

**श्रीवसिष्ठ**—रामा, मी त्या पर्वतावरील सर्व शिलांमध्यें एक एक विचित्र त्रिभुवन पाहिल्यावर आश्चर्यानें तेथील वृक्ष, तृण, लता, गुल्म इत्यादिकांमध्येंही तें दिसतें कीं काय म्हणून सूक्ष्मदृष्टीनें पाहूं लागलों. तों त्या सर्वांत चतुर्दश लोक मला दिसले तेव्हां विस्मयानें मी आपल्या

शरीरात पाहिलें. तों तेथेंही तें तसेंच दिसलें. एकाद्या सूक्ष्म धान्याचा जसा भूमींतून कोमल अंकुर वर यावा त्याप्रमाणें तें मला दिसलें. त्यामुळें मूर्त, अमूर्त, चेतन, अचेतन, इत्यादि सर्व वस्तूंमध्यें, जलसेकानंतर भूमींतून उद्भवणाऱ्या तृणांकुराप्रमाणें, जगदंकुर आढळतो, असा मी निर्णय केला. निद्रेंतून स्वप्नामध्यें येणाऱ्या चिन्मात्र पुरुषाच्या स्वचेतनापासून दृश्यश्री जशी उद्भवते किंवा स्वप्न संपून जाग्या होणाऱ्या पुरुषापासून जाग्रत्प्रपंच उत्पन्न होतो त्याप्रमाणेंच सृष्टीच्या आरंभीं अनुभूतस्वरूप आत्म्यामध्यें सर्गोदय होतो. पण तो आकाशस्वरूपाहून अन्यरूपाचा नसतो.

श्रीराम—अहो परमाकाशस्वरूप गुरुवर्य, चिदाकाशरूप अशा तुमच्या ठायीं सर्ग कसा प्रवृत्त होतो तें मला बोधवृद्ध्यर्थ सांगा.

श्रीवसिष्ठ—रामा, मी पूर्वी असत् असलेलें ही स्वयंभूत्व सत् असल्यासारखें कसें पाहिलें तें ऐक—पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें सुवर्णशिलादिकामध्यें महाकल्पाचा आरंभ पाहून चिदाकाशरूपी म्यां शरीराच्या अन्य भागीं स्थित असलेली संवित् कौतुकानें सर्गदर्शन संकल्पानें अंकुरित केली. ज्यावेळीं मी तिला किंचित् विकासित केलें त्यावेळीं लागलीच आकाशता मला दिसली. पण ही आकाशता म्हणजे चिद्घन ब्रह्माच्या स्वरूपांत शून्यभावप्राप्तिरूप अधिक सूक्ष्मता नव्हे, तर ती स्थूलताच होय. म्हणजे ज्याप्रमाणें तूं जाग्रत् किंवा स्वप्नलोकांत प्रवेश करीत असताना स्वात्माच त्या दोन्ही अवस्थांचा आधार आहे व त्या अवस्था हीच त्याची उत्तरोत्तर घनता आहे, असे जाणतोस त्याप्रमाणेंच हें समज. आपल्या चलनाच्या अनुकूलतेनें आपल्यामध्येंच पर्यालोचन करणें, या क्रियेमुळें तें आकाशच प्रथम चित्त झालें. नंतर आकाशच 'मी' या भावनेनें अहंकार बनलें. तें घन आकाशच आहे, असा निश्चय केल्यानें व पूर्वभाव विसरल्यामुळें त्यालाच बुद्धि म्हणतात. तीच संकल्प, विकल्प, कामना, संशय इत्यादि कल्पनांनीं घन झाली असतां मन होते. अशाच क्रमानें उत्तरोत्तर स्थूल होत होत तें आकाशच विषय व त्यांना ग्रहण करणारीं इंद्रियें कल्पितें. त्यामुळेंच पूर्वी दुःखरहित असलेल्या आत्म्याला स्वप्नाप्रमाणें व्यवहारदुःखाची प्राप्ति होते. 'पण स्वप्नांतील सर्ग आकाशादिक्रमानें होत नाहीं; तर तो एकाच क्षणांत सहसा उत्पन्न झालेला

दिसतो,' म्हणून म्हणशील तर सांगतों—रामा, या अनंत आत्म्यामध्यें हें सर्व दृश्यजाल एकाच वेळीं भासतें. म्हणूनच कांहीं वेदमंत्र त्याच्या उत्पत्तीचा क्रम सागतात; व कांहीं सांगत नाहींत. एका क्षणांत दीर्घकालाचा जसा अनुभव यावा त्याप्रमाणें परमाणूच्या उदरांतही दीर्घ देशाच्या कल्पनेनें मीच तेथें ब्रह्मांडात्मक चेतन आत्म्यास पाहिलें. कारण वायूच्या चळनाप्रमाणें शरीरादिकांची कल्पना करणें हा मनाचा स्वभाव आहे. त्या प्राथमिक मनःकल्पनाशक्तीनें जें रूप कल्पिलेलें असतें त्याच्यामध्यें विपरीत भाव आणण्यास ही दुसरी शक्तिही स्वतः समर्थ नसते. यास्तव पुढच्या सर्व कल्पनामध्यें हीच स्थिर नियति होय. म्हणूनच मी अपरिच्छिन्न असूनही कल्पनाकृत परिच्छेदामुळें अणुरूप झालों. त्यानंतर मी चित्प्रतिबिंबव्याप्तीमुळें तेजःकणाकार भासणारें सूक्ष्मशरीर पाहिलें. पुढें त्याचीच भावना करीत मी स्थूल देहाकारतेस प्राप्त झालों. त्यात चक्षुःप्रभृति द्वारांची कल्पना करून मला रूपादिद्रष्टृता आली. ज्या रंध्रानें मीं पाहण्यास प्रवृत्त झालों त्याला चक्षु हें नाव आहे. जें पाहतो तें दृश्य व दर्शन हें त्याचें फल आहे. जेव्हा मी पाहूं लागलों तेव्हा तोच काल झाला. माझ्या पाहण्याचा प्रकार हाच क्रम बनला व जेथें मीं पाहिलें तें आकाश झालें. आणि आता तोच माझा जगद्बोध दृढ झाल्यामुळें तें सर्व खरें होऊन बसलें आहे. पण त्या वेळच्या दृष्टीनें सर्व चिद्विकासच असल्यामुळें मी चिन्मात्रकारण आहें. असो, पाहण्याच्या इच्छेनें मी बाहेर पाहिलें. तों मला रूपाचा अनुभव आला. ज्या छिद्रांच्या द्वारा मी तें पाहिलें तेच हे नेत्र होत. त्यानंतर मला ऐकावें अशी इच्छा झाली. त्याबरोबर दुसरीं दोन रंध्रें उत्पन्न होऊन आकाशांतील स्वाभाविक शब्द मला ऐकूं आला. शंखाच्या आवाजासारखा तो झंकार होता. ज्यांच्या द्वारा मी त्यास ऐकलें त्यास श्रवण असें म्हणतात. पुढें आणखी अशाच, क्रमानें त्वगादि इंद्रियें कल्पनेनें निर्माण करून मी स्पर्शादि विषयांचा अनुभव घेतला. पण ही सर्व देहेंद्रियसंपत्ति कल्पनामात्र असल्यामुळें मिथ्या आहे. तथापि कल्पनामात्र अशा तिच्या योगानेंही माझ्या इच्छेवांचून सुद्धा पाच विषयांचा भोग घडूं लागला. अशा प्रकारच्या या जाळ्याची भावना करीत जो मी तेव्हां स्थित होतों

तोच मी आतां हा वसिष्ठ झालों आहें. म्हणजे लोक त्यावेळीं त्या अभिमान धरणाऱ्यालाच आतां वसिष्ठ म्हणूं लागले. दृढ निश्चयानें घन झालेल्या अहंकारालाच बुद्धि व पुनः पुनः विषयस्मरण करणाऱ्या चित्ताला मन असें म्हणतात, याप्रमाणें मी येथें अंतःकरणरूप होऊन राहिलों आहे, मी आतिवाहिक देहरूप व चिन्मय देहवान् आहें. मी शून्याकार असल्यामुळेंच सर्व कल्पना केलेल्या भावाचा निरास करीत नाहीं. रामा, त्या पूर्वकल्पित देहामध्यें जेव्हां मी चिरकाल राहिलों तेव्हां आंत स्वतः चतुर्मुख देहवान् झालों. तसल्या देह-प्रत्ययानें, स्वप्नात उडणारा मनुष्य आकाशातून संचार करतांना जसा शब्द करतो त्याप्रमाणें मी शब्द करण्यास प्रवृत्त झालों. मी प्रथम ॐ हा सामान्य शब्द उच्चारला. त्यामुळेंच तो ओंकार या प्रसिद्धीस प्राप्त झाला. त्यानंतर स्वप्नपुरुषाप्रमाणें मी कांहींसें ( व्याहृति, गायत्री, वेद इत्यादि पूर्वी ज्याचा अभ्यास केला होता तें ) म्हटलें. तिला मागून वाणी असें म्हणूं लागले. तोच मी सृष्टीचा कर्ता व जगद्गुरु चतुर्मुख झालो. त्यानंतर मीं मनोमय चतुर्मुख देहानेंच सर्व सृष्टींची कल्पना केली. याप्रमाणें मी उत्पन्न झालों; पण वस्तुतः कल्पनामात्र आहें. मी आपल्या स्थूल देह-भूत सावरण ब्रह्मांडास पाहिलें. त्याच्या बाहेर मला कांहीं दिसलें नाहीं.

राघवा, याप्रमाणें माझ्या मनोमय असें हें जग संपन्न झालें. पण खरोखर त्यांत कांहीं नव्हतें. तें केवल शून्य आकाशच होतें. कारण हें सर्व शून्य व संवेदनमात्र आहे. वस्तुतः पृथ्वी-प्रभृति भाव यत्किंचित्-ही नाहींत. चित्-मध्यें या सर्व चित्-अवस्था हेंच जगत्-मृगजल आहे. ब्रह्माकाशच तसें ( म्हणजे जगन्मय ) होऊन राहिलें आहे. माळभूमीवर जल नसतानाही संवित् तेथें जल पाहते. तेव्हा त्या वेळचा जलानुभव केवल संविदाकार आहे, हें उघड होय. हाच न्याय सर्व वस्तूंचे ठिकाणीं योजावा. संवित् आंतल्याआंत विनाकारण क्षुब्ध होत असते. ब्रह्मामध्यें जगत् नाहींच. ज्ञान तें तेथें पाहतें. अविद्यावृत संवित्स्वभावामुळेंच अशी भ्रांति होते. संकल्प-प्रयुक्त मनोराज्याप्रमाणें अथवा स्वप्ननगराप्रमाणें हें असतच भासतें. सर्व जग हृदयामध्येंच पसरलें आहे. आपल्या बाजूस निजलेल्या पुरुषाचें स्वप्न त्याच्या चित्तांत प्रवेश केल्यावांचून जसें दिसणें

शक्य नाहीं, पण योगी लोक चित्तात प्रवेश करूनच तें पाहतात. त्याप्रमाणें शिलेंतील जग शिलेंत प्रवेश केल्यावांचून दिसणें अशक्य आहे. तें पाहावयाचे झाल्यास त्याच्या कल्पनेच्या अधिष्ठान-भूत चिच्छिलेंत प्रवेश करूनच तें पहावें लागतें. तें आरशातील प्रतिबिंबाप्रमाणें तेथें दिसतें. तथापि तें मिथ्या आहे. पण तें आधिभौतिक शरीरातील मास-मय देहानें पाहूं लागल्यास दिसत नाहीं. केवळ पर्वत दिसतो. बोध-दृष्टीनें पाहिल्यास तें अमल परमात्माच आहे, असें आढळतें. तत्त्वदृष्ट्या सर्वत्र सृष्टीचे निर्वाण दिसतें. खरोखर तत्त्वदृष्टीनें व योगिदृष्टीनें ( म्हण-जेच युक्तियुक्त विचारशालिनी शुद्ध बुद्धीनें ) जें दिसतें तें शंकराच्या तीन नेत्रास व इंद्राच्या सहस्रनेत्रासही गोचर होत नाहीं.

रामभद्रा, जसें आकाश तशीच भूमिही असंख्य सर्गांनीं व्याप्त आहे, असें जेव्हा मला कळलें तेव्हा मी पृथ्वीची धारणा धरून ध्यान करूं लागलों. ज्याप्रमाणें एकादा चक्रवर्ती राजा स्वदेहच मी आहें, हा अहंभाव न सोडताच समस्त भूमंडलात ममताभाव धारण करतो त्याप्रमाणें मीही चिदाकाशरूपी ब्रह्म—अहंभाव न सोडता ' पृथ्वी मी आहें ' या भावनेनें पृथ्वीरूपधर झालों. त्या धारणेनें पृथ्वीच्या अभिमानी जीवाच्या उदरांत शिरून ( म्हणजे त्याच्या बुद्धीशीं तादात्म्य पावून ) द्वीपें, वृक्ष, पर्वत, तृण, इत्यादि देहवान आहें, असा अनुभव घेतला. याप्रमाणें मी पृथ्वीपीठ झालों. नानावनें हेच त्या माझ्या अंगावरील केंस होते. नानारत्नांनीं व्यापलेलीं नाना नगरें हींच माझीं भूषणें होतीं. सारांश रामा, मी याप्रमाणें भूपीठावरील सर्व वस्तूंस आपल्या अंगावरील विविध अवयव व पदार्थ मानूं लागलों ८७.

**सर्ग ८८**—स्वदेहभूत भूपीठांत जागजागीं असलेल्या विशेषाचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—हे मनुवंशजा, वर वर्णिल्याप्रमाणें भूपीठरूप झालेल्या मी स्वेच्छावशात् त्यातील प्रत्येक पदार्थाचा तत्तदाकार होऊन कसा अनुभव घेतला, तें ऐक. मला कोठें पति, पुत्र, भ्राता इत्यादिकाच्या मरणानें आक्रंदन करणाऱ्या स्त्रियांच्या करुणवेदनांचा अनुभव आला. मीं कोठें जोरानें तांडव करीत असलेल्या स्त्रीसमूहांच्या महो-त्सवाचें महासुख घेतलें. कोठें दुर्वार दुर्भिक्षामुळें हाय हाय

चालली होती. कोठें चांगलें धान्य निपजल्यामुळें लोकांमध्यें आनंद पसरला होता. कोठें मोठी आग लागलेली असून त्यात अनेक वस्तू जळत आहेत व प्राण्यांचे देहही अर्धवट भाजले आहेत, असें दिसलें. कोठें अधिक वृष्टीमुळें नद्याना मोठा पूर येऊन त्याच्या वेगानें नगरांचे कांहीं भाग व गावच्या गांव वाहून गेले होते. कोठें एक चपल सामंत राजा दुसऱ्या सामंत राजाच्या प्रदेशात शिरून लूट करीत होता. कोठें उद्दाम व दुरात्म्या राक्षस–पिशाचांचा मोठा अनर्थ चालला होता. सारांश माझ्या अंगावरील अनेक प्राणी अनेक क्रिया करण्यात निमग्न होते. याज्ञिकाचे यज्ञ, अध्यापकाचें अध्यापन, उपासकाच्या उपासना, योग्याचा अभ्यास, ध्यानस्थाचें ध्यान, क्षत्रियाचा कलह, राजाचीं युद्धें, वैश्याचा उद्यम, शूद्राची सेवा, दुर्बल पशु–पक्ष्याना सबलानीं मारून खाणें, राक्षसप्राय मानवानीं त्याची हिंसा करून आपलें दुरोदर भरणें, इत्यादि विविधचेष्टा चालल्या होत्या. कोठें बीजें जलादिकाचें साह्य मिळताच अंकुर धरीत होतीं. कोठें वृक्ष आपल्या कठिण अंगांतून कोवळीं पानें बाहेर काढीत होते. फुलें फळाना प्रसवत होतीं व कांहीं पुनः आपल्या पूर्वभावास प्राप्त होत होतीं. रामा, माझ्या अंगावर सरोवरानीं मंद वायूनें किंचित् हालणाऱ्या कोमल नलिनीदलाना हांतरून जणुं काय निरतिशयानंदरूप क्रीडाच केली ८८.

सर्ग ८९—धारणेमुळें पाहिलेलें हें भूमंडल व सर्व जग चिदाकाशांत मनोमात्र होतें.

**श्रीराम**—गुरुवर्य, कौतुकानें आपल्यामध्यें सर्व पृथ्वी पाहण्यासाठीं आपण धारणा धरून, आम्हास दिसणाऱ्या या मृत्पाषाणमय भूगोलरूप झाल कीं मनोमात्रमय स्वप्नसदृश भूलोक झाला ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, तूं जर हें कल्पनादृष्टीनें विचारीत असलास तर तुला मृत्पाषाणमय म्हणून जें ठाऊक आहे तेंच, केवल मनाचा विकार असल्यामुळें मानसही झालें, असें समज. पण तूं जर तत्त्वदृष्ट्या विचारीत असलास तर दोन्ही नाहीं. कारण मन असलें तरच त्यात ‘ आहे, नाहीं ’ इत्यादि विकल्प संभवत असल्यामुळें त्याच्या अभावीं हें महीपीठ संभवतच नाहीं. ज्याला तूं असत् किंवा सत् म्हणून समजत आहेस तें

सर्व मनोमात्र आहे. कारण मी शुद्ध चिदाकाश आहें. तत्पदरूप अशा माझें जें चिन्मात्रविकसन तोच संकल्प होय. तेंच मन, तेंच भूपृष्ठ, तेंच जगत्, व तोच पितामह होय. तस्मात् धारणाभ्यासानें पुष्ट झालेलें माझें मनच हें भूमंडल होय. अथवा अज्ञांना ठाऊक असलेल्या या मृत्पाषाण-मय जगाचा श्रुतीनें निषेध केलेला असल्याकारणानें तत्त्वज्ञाच्या धारणेंत दिसणारें हे मृत्पाषाणमय नव्हे. तर चिदाकाशविकासरूप आहे. पण अमूर्त आकाशमात्र मूर्तरूप व ' हें ' अशा स्वभिन्न प्रत्ययाचा विषय कसें होतें, म्हणून म्हणशील तर सांगतों.—तें आकाशमात्र असूनही चिरकाल तशारूपानें स्थित झाल्यामुळें ' हें ' या प्रत्ययाचा विषय होतें, व त्यामुळेंच मनोमात्रत्वाचा त्याग करतें; पण दहीं आपल्या मूळच्या दुधाच्या स्वभा-वास जसे सोडतें तसें हें जग चिदाकाशास सोडीत नाहीं; तर स्वप्नादिकां-मध्यें केवळ मनोमय असलेल्या पृथ्वीप्रभृति पदार्थांना जाग्रत्–काळीं ज्याप्रमाणें हें असें म्हणून बाह्यत्व येतें त्याप्रमाणें त्याला बाह्यभाव येतो. चिदाकाश व जग यांचा सबंध दूध व दहीं याच्यासारखा नाहीं, तर जल-तरग सुवर्ण–कडें, अथवा कापूस व वस्त्र यांच्या संबंधाप्रमाणें आहे. आकाशात नीलत्वादिकाची बुद्धि जशी होते त्याप्रमाणें दीर्घ संवेदनामुळें हें भूमंडल स्थिर, अतिशय कठिण, व विस्तीर्ण आहे, असें भासतें. पण विकार शब्दमात्र आहे, या न्यायानें पाहिल्यास हेंच अज्ञांना ठाऊक अस-लेलें पृथ्वीपीठ, विद्यमान नाहीं, तर मनोरूप प्रथम सर्गाचें जें आद्य सूक्ष्मरूप तेंच हें जग होऊन राहिलें आहे. हें भूतलादि सर्व दृश्य चिद्रूप ( चतुर्मुख ) बालाचें मनोराज्य आहे. त्यामुळें वस्तुतः तें सत्य, साकार गोलरूप, किंवा फार मोठें नाहीं. अज्ञात चिन्मात्र हेंच जग आहे. रामा, त्रिकाळीं भासणाऱ्या असंख्य भूमंडलांना एकच सत्ता आहे. ती सर्व मीच आहें. एका ब्रह्मावांचून दुसरें कांहीं नाहीं. ८९.

**सर्ग ९०**—पृथिवीच्या हृदयांत अनंत जगाची दृष्टि व जलधारणेनें सर्व जलक्रीला.

**श्रीराम**—हे भगवन्, नंतर आपण त्या भूमंडलाच्या हृदयांत निर-निराळ्या प्रदेशीं जगें पाहिलीं कीं नाहीं ?

**श्रीवसिष्ठ**—पृथ्वीच्या धारणेनें मी परमात्म्याख्या जाग्रत्पृथ्वीमंडलरूपानें व स्वप्नपृथ्वीमंडलरूपानें, पृथ्वीच्या त्या त्या निरनिराळ्या प्रदेशांत ईश्वरसाक्षि-

दृष्टीनें सर्व साक्षात् पाहिलें व मनानें त्याचा अनुभव घेतला. रामा, मी पूर्वोक्त शिळेमध्यें जसें सर्व पाहिलें होतें तसेंच तेथेंही प्रत्येक प्रदेशांत पाहिलें. सर्व शांत अद्वैत व द्वैतमय जगही मला दिसलें. कारण रामा, सर्वत्र जगें आहेत; व सर्वत्र ब्रह्म संस्थित आहे. सर्व परम शांत शून्य आहे व सर्व आरंभव्यग्र आहे. सर्वत्र पृथिवीप्रभृति स्थूल आहे व तेंच स्वप्ननगराप्रमाणें चिदाकाश आहे. वस्तुतः येथें नाना अथवा अनाना कांहीं नाहीं. नास्तित्व किंवा अस्तित्वही नाहीं. कारण हें सर्व पाहणारा कोणी असला तर सिद्ध होणार. पण तो अहंकारच नाहीं. त्याचा सर्वांना अनुभव जरी येत असला तरी तो नाहींच. त्यांतूनही तो आहे, असेंच जर म्हणावयाचें असेल तर तें अज व अनामय ब्रह्मच आहे कारण सृष्टीच्या पूर्वी चित्-च होतें. त्यामुळें त्यानंतर चिदाकाशातच दिसलेलें हें सर्व दृश्य जगही स्वप्ननगरासारखेंच आहे. येणेंप्रमाणें अस्तितेची अव्यवस्था झाली असता तिचा अभाव म्हणजे नास्तिताही अव्यवस्थितच आहे, असें जाणावें. राघवा, ज्याप्रमाणें मी पृथ्वीरूपधर होऊन तीं जगें पाहिलीं त्याचप्रमाणें जलरूप होऊन त्यांतही तसेंच सर्व अवलोकन केलें. मी अजड असतानाही जलाच्या धारणेनें जड जलरूप होऊन समुद्रमंदिरांत दीर्घकाल गुलगुल ध्वनि केला. तुझ्या अंगावर जशी ऊ चढते, त्याप्रमाणें मी तृण, वृक्ष, लता, गुल्म, वेली इत्यादिकांच्या काष्ठांतून नाड्यांच्या द्वारा कोणाला न दिसता वर चढलों. तृणादिकांच्या सूक्ष्म व अति गूढ स्थानींही मी गुप्त रीतीनें संचार केला. तमाल, ताल, इत्यादि वृक्षांत शिरून त्यांच्या पल्लवांत व फलांत विश्रांति घेतली व कालवशात् पुष्ट आकृतीनें त्यांत रेखाची रचना केली. त्याचप्रमाणें प्राण्यांच्या देहामध्यें जलपानाच्या वेळीं मुखाच्या द्वारा हृदयांत प्रवेश करून वसंतादि ऋतुप्रयुक्त वैषम्य धारण करणाऱ्या मी कोठें वात-पित्त-कफ-संज्ञक धातु धारण केले, केव्हां केव्हां त्याचा क्षय केला, क्वचित् त्याचा भोग घेतला, कित्येक धातूंस जठराग्नीच्या साह्यानें परिपक्व केलें, व कित्येकांस खंडित केलें. मी एकाच वेळीं दशदिशांतील वृक्षपल्लवरूपी शय्येवर दंवाच्या थेंबांच्या आकारानें स्वस्थ निजलों. अनेक डोहरूपी नद्यांच्या हितकर निवासस्थानीं वास केला. मी प्रवाहरूपानें सतत मार्ग-

क्रमण करीत राहिलों. कोठें कोठें सेतु( धरण )संज्ञक निरपेक्ष मित्राच्या अनुग्रहाने मी थोडीशी विश्रांति घेत होतों. चैतन्याने जडाशाचें विषयाकारानें अनुसंधान केल्यामुळें व त्यात केवल विषयांशच असल्यामुळें चित्स्वभावाचा आश्रय न करिता जलरूप झालेल्या मीं जडाशयसदृश पदार्थांमध्ये सहस्रावधि भ्रातींनीं भोवऱ्याप्रमाणें फिरत राहिलों. एकादा पापी प्रायश्चित्तार्थ भृगुपात करावयास जसा प्रवृत्त होतो त्याप्रमाणे मी पर्वताच्या उंच उंच शिलावरून चंचल निर्झरांच्या रूपाने खालीं पडून आपल्या शरीराचे शतधा विभाग करून घेतले. काष्ठातून धुराच्या रूपानें निघून व गगनसागरांत जाऊन त्यातील नीलवर्ण नक्षत्रमण्यात रत्नकण होऊन राहिलो. मेघपीठामध्यें विद्युत्–वनितेसह विश्राति घेतली. रामा, फार काय सागूं ? मी ब्रह्माप्रमाणेंच परमाणूसारख्या अति सूक्ष्माकार शरीरात व त्यातील अति अति सूक्ष्म नाड्यात गुप्तपणें राहिलों. मधुरादि रसरूप अशा मी त्या प्राण्याच्या जिह्वालक्षण अणूंशीं संग पावून त्याचा रसास्वादलक्षण उत्तम अनुभव केला. पण तो अनुभव देहाचा नव्हे, तर तें केवल ज्ञानस्वरूप आत्म्याचेंच विषयानंदाकारानें व्यक्त झालेले स्वरूप आहे, असें मी समजत होतों. सामान्य प्राकृत जन स्वाद घेतला जाणारा विषयच आनदरूप आहे, असे समजतात. पण सुज्ञानें तसें समजूं नये. कारण विषयजन्य सुख हे असत् म्हणूनच दुःखरूप व त्यामुळेंच स्वाद न घेण्यासारखें आहे, असें जाणावें. कारण ज्या विषय-रूपाचा मीं ( अधिष्ठान चैतन्यानें ), स्वाद घेणाऱ्या पुरुषाच्या देहानें, अथवा दुसऱ्या कोणी, त्यांत सुखलेशाचाही संभव नसल्यामुळे, स्वाद घेतलेला नाहीं, ते तशा प्रकारचें विषयरूप चैतन्यानें जीवाना मोह पाडण्याकरिताच आत प्रकाशित केलें आहे कारण तें असत् आहे.

बरें, तें स्वाद घेण्यास योग्य आहे, असें जरी म्हटलें तरी विषयाधिष्ठान चैतन्यानें ज्याचा पूर्वीच स्वाद घेतला आहे, अशा उष्टया विषयांचाच इतर जीव अनुभव घेतात, असेंच समजणें उचित आहे. कारण चवदा लोकांतील भूताच्या अंगसंधींमध्यें चेतनच स्वभावतः अजड असूनही जडासारखें वास करते. असो; तुषार-समूहाच्या रूपानें मी वायु-

रूपी रथावर सुवासाप्रमाणें आरूढ होऊन क्रीडा केली व लोकांना आल्हाद दिला. त्या जलांतही परमाणूपर्यंत सर्व वस्तूंमध्यें मी सर्ग पाहिले. रामा, जल-धारणेनें मी अजड असतांनाही जडासारखा होऊन सर्व पदार्थांच्या आंत ज्ञात व अज्ञात रूपानें राहिलों. त्यात मी लक्षावधि जगें व त्यांचे नाश व उद्भव अनुभविले. याप्रमाणें हें सर्व साकार किंवा निराकार जग किंवा अजग चिन्मात्र आकाश आहे. त्यामुळें तें सर्व आकाशाहून अधिक निर्मळ आहे. तस्मात् रामा, तूं कांहीं नाहींस. ( म्हणजे या वाक्यानें तीन अवस्थासह देह व इंद्रियें यांचा निषेध केला. ) व त्याचप्रमाणें हें आकाशादि बाह्यही कांहीं नाहीं. त्याचप्रमाणें शोधित तत्-त्वंपदाचा बोध दृश्य-स्वभाव किंवा अदृश्यस्वभाव नाहीं, तर तो अखंड चिदाकाशरूप आत्माच तूं आहेस. यास्तव तूं सर्व द्वैत-संकोच सोडून रहा ९०.

**सर्ग ९१**—वसिष्ठांनीं तेजोधारणेनें तेजोभावास प्राप्त होऊन पाहिलेले सूर्य-चंद्र-अग्निरूप रत्नाचे चमत्कार.

**श्रीवसिष्ठ**—रामा, त्यानंतर मी दीप्त तेजोधारणेनें तेज झालों. चंद्र, सूर्य, नक्षत्रें इत्यादि हे सर्व माझे अवयव झाले. मी त्यावेळीं नित्य सत्त्व-प्रधान झाल्यामुळें सर्व जगत् प्रकाशाकार झालें. ज्याप्रमाणें राजा नानावेषानीं विहार करणाऱ्या आपल्या स्नेहपूर्ण चाराच्या द्वारा आपल्या राष्ट्रांतील प्रत्येक घरांतील सर्व वृत्त प्रत्यक्ष पाहतो त्याप्रमाणें मी वात व तेल यांच्या योगानें समर्थ झालेल्या हजारों दीपाच्या द्वारा सर्व गृहगत पदार्थ प्रत्यक्ष पाहिले. दुसऱ्यास प्रकाशित करणें, याच एका उत्तम कर्मात रत झालेल्या व म्हणूनच लोक व भुवनें यांस पाहताच अति संतुष्ट व पुलकित झालेल्या चंद्रसूर्यादिकांच्या किरण-रूपी माझ्या रोमानीं आकाशांतील सर्वांस आच्छादित करणाऱ्या तमो-वस्त्रास जणुं काय दूर सारलें. ( अर्थात् त्यामुळें सर्वांस आवृत करणारा अंधकार नाहींसा झाला. ) कारण सर्व विद्यमान जगत् रूपादि सर्व गुणास झाकून सोडणाऱ्या अंधकारलक्षण दैन्याचाच विषय आहे व सर्व गुण-शाली ( पर दैन्यनिवर्तनसमर्थ ) प्रकाशाचा दैन्यरहित उत्तम दृश्यच विषय आहे. यास्तव त्यानें तमोवस्त्राला दूर सारलें. तें तेज तमोरूप

तमाल वृक्षांस तोडणारा जणुं काय परशुच ( तीक्ष्ण कुऱ्हाडच ) आहे. तें उत्कृष्ट शुद्धि करणारें स्थान आहे. तेंच सुवर्णादिरूपानें जनांच्या उपजीविकांचें साधन आहे. प्रकाशामध्यें असणाऱ्या शुभ्र, काळ्या, लाल इत्यादि वर्णरूपी सर्व पुत्रांचा तो देहद पिताच आहे. त्याचा पृथ्वीशीं मोठा स्नेहभाव आहे. त्यामुळेंच सर्व दाहक तेजही मृत्तिकेला जाळीत नाहीं. तसाच पृथ्वीचाही त्याच्यावर गाढ अनुराग आहे. कारण ती भिंती, कोन्हाडे, इत्यादिकांच्या रूपानें, त्याच्या पासून झालेल्या दीपरूपी पुत्रास वायूपासून जिवंत राखते. वायूचा सर्व वेग स्वतः सहन करून त्याचें रक्षण करते. तें तेज तम, रज व सत्त्व ज्यात पुष्कळ आहे अशा पाताळादि लोकामध्यें न्यूनाधिक प्रकट होतें. तो दिग्वधूंचा प्रकाशक आरसा आहे. रात्रीच्या दैवाला हटविणारा आहे. चंद्र, सूर्य व अग्नि यांचें जीवितसर्वस्व आहे. अंतरिक्षाचें कुंकू आहे. दिवसरूपी सस्याचें क्षेत्र आहे. सर्व रूपाचा अनुग्रह आहे. तें तेज आकाशरूपी मोठ्या पात्रास धुवावयाचें जळ आहे. तें सर्वपदार्थांस सत्ता व प्रकाश देणारें असल्यामुळें चिन्मात्र प्रकाशाचा सहोदर अनुज आहे. ( कारण त्यात जडता हा धर्म असून तो त्याला चिन्मात्राहून न्यून करणारा आहे ). तें क्रियारूपी कमलिनीचा सूर्य आहे, भूतलावर राहणाऱ्या जीवांचें जीवित आहे. चैतन्याप्रमाणें नेत्राच्या द्वारा विषयास आवृत्त करणाऱ्या तमाला निवृत्त करणें, हा चमत्कार तें करतें. तें सुवर्णादिकामध्यें सुवर्णत्व, नरामध्यें पराक्रम, रत्नादिकांमध्यें चकचकीतपणा, वर्षादिकातील विद्युत्प्रकाश, दानवातील देवशत्रुत्व, देवांतील सुरत्व इत्यादि प्रकारें सर्वांत व्यापून असून मी तद्रूप होऊन त्याचा अनुभव घेतला. मी कोणाला न दिसता सर्व तेजोमय वस्तूंत शंभर युगें राहिलों.

**श्रीराम**—भगवन्, त्या दशेंत आपण सुख भोगलेंत कीं, दुःख ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, ज्याप्रमाणें चेतन असलेलाही नर निजला असता जडतेस प्राप्त होतो त्याप्रमाणें चिदाकाश दृश्य होत असतें. वास्तव ब्रह्म आपल्याला पृथिव्यादिरूप जेव्हां पाहतें तेव्हा ते आतल्या आंत निजल्यासारखें असतें. पण त्याचें वास्तव सच्चिदानंदरूप अन्यथा होत

नाहीं. ( बदलत नाहीं. ) त्यामुळें चिदानंद एकरसपूर्ण व ब्रह्मभूत अशाही मला, कौतुकानें मी आपल्या ठिकाणीं जगद्भावाचा आरोप केला असतां थोड्याशा दुःखाचा अनुभव आला; पण वस्तुतः सुखच झालें. कारण चैतन्य पृथ्व्यादि विकारकालींही अविकृतरूपानें स्थित असतें. अज्ञानानें दुःखाची प्रसक्ति होते. पण हें सत्यज्ञान ज्याला अखंडित होतें, त्याला पाच भूतें व दृश्य—द्रष्टृभ्रम होत नाहीं. त्यावेळीं ब्रह्मरूप अशा मीच हें सर्व केलें. कारण ब्रह्मरूपावांचून हें करता येणे शक्य नाहीं. नंतर हें सर्व दृश्य जेव्हा निरामय ब्रह्म झालें तेव्हा ब्रह्मपदामध्यें स्थित असलेल्या मी आत्माच अज्ञा-रूपानें पाहिला आणि जेव्हा पंचभूताची भावना केली तेव्हा मी जड-साच झालों. अशा वेळीं मला काय कळणार? कारण त्यावेळीं, मी निजलों आहें, असा स्वतः चेतन असूनही माझा दृढ भाव झाला. निद्रेच्या योगानें प्राप्त झालेलें अज्ञानच 'मला काहीं कळलें नाहीं' अशा प्रतीतीचा विषय होतें. पण त्या प्रतीतीवरून त्यावेळीं असणाऱ्या स्वप्रकाश वस्तूची सिद्धि होते. कारण ती जर नसती तर सुषुप्तिकालच्या अज्ञानाचें स्मरण कसें झालें असतें? असो; राघवा, ज्ञानाचा उदय होऊन स्थूल व्यष्टि—समष्टि देहाचा आधिभौतिकभाव गेला असता विमल बोधरूप आतिवाहिकभाव उदय पावतो. त्यामुळेंही त्यावेळीं जाड्य व दुःख याची प्रसक्ति होत नाहीं. ज्ञानानंतर जीवन्मुक्त इच्छेस येईल, त्याप्रमाणे त्या बोधात्मक आतिवाहिक अणुरूप देहानें अथवा व्यापी देहानें राहतो. तो त्या बोध-देहानें अतिकठिण शिळाच्या हृदयातही प्रवेश करून पुनः त्यातून सत्वर बाहेर पडतो. पाताळात व आकाशातही शिरतो. तस्मात् रामा, मी पूर्वी अनत बोधदेहानें तो सर्व व्यवहार केला. त्यामुळें मला दुःख झालें नाहीं. चिन्मात्ररूप अशा मला वज्र, पाषाण, पाताळ, आकाश इत्यादि प्रदेशातून जात—येत असताना काहीं विघ्न झालें नाही. कारण आत्मा बोधमात्र शरीरानें जडवस्तूच्या ठायीं जोवर असतो तोवर तो तेथें तद्रूप होऊन राहतो. बरें तो स्वेच्छेनेंच दुसऱ्या ठिकाणीं गेल्यासही तेथें दुःखावांचूनच स्थित होतो, (म्हणजे जसें पुनरागमन तशीच तेथें स्थितिही इष्टच आहे. ) आतिवाहिक अव्यय देह बोधमात्र आहे, असें सर्व ज्ञानी जाणतात. तूंही ज्ञानी झाला आहेस. यास्तव तूंही इच्छा असल्यास

आता येथें त्याचाच अनुभव घेशील. निरनिराळ्या धारणांमुळे जगद्भावाचें कौतुक पाहणे झाल्यास, तें अगदीं सुलभ आहे. यास्तव तुला पाहिजे असल्यास धारणाभ्यासानें माझ्या म्हणण्याची प्रतीति पहा. तत्त्वज्ञास आपल्या इच्छेनेंच सूर्यादि सर्व जगाचा अस्त करून त्याला आत्मरूप करून ठेवतां येतें; पण आमच्या दृष्टीनें विद्यमान असलेल्या जगाला आत्मधारणेनें अविद्यमान कसें करितां येईल? म्हणून म्हणशील तर सागतों—जाग्रत्पुरुषाच्या दृष्टीनें विद्यमान असलेलेंही जग सुप्त पुरुषाच्या दृष्टीनें जसें असत् असल्यासारखें होऊन राहतें, त्याप्रमाणेंच तें समजावें. शिवाय ज्याप्रमाणें एकादा पुरुष मनोराज्यकल्पित निखाऱ्याच्या नदीच्या लाटा अंगास लागत असल्या तरी त्यामुळे दुःखित होत नाहीं, त्याप्रमाणें मीही आपल्याच किंचित् इच्छेनें पाषाण-रत्नादि भावानें उत्पन्न झालों होतों. त्यामुळे मला दुःख झालें नाहीं असो; रामा, तेजोरूप झालेल्या मी, किंशुक, अशोक इत्यादि वनास जणुं काय त्याच्या त्याच्या पुष्पानींच व्यापल्याप्रमाणें, आपल्या दीप्त ज्वालांनीं व्यापलें. पण हे रघुवंशजा, खलाच्या दीप्त लक्ष्मीप्रमाणें मीही चंचल ज्वालेनें झटकन उत्कर्ष पावून एकाएकीं क्षीण झालों. असो; तेजोभाव धरून मी याप्रमाणें परमाणुकणाच्या उदरांतही जगत्-श्री पाहिली. पण ती परम चिदाकाशाहून भिन्न नव्हती. याविषयीं स्वप्नातील नगरादिकाचा उत्तम दृष्टान्त आहे. ९१.

**सर्ग ९२**—वायुधारणेनें वायुभाव प्राप्त झाला असतां त्याच्या कर्माचा विस्तार व त्यानंतर आकाशासह सर्वात्मस्थिति.

**श्रीवसिष्ठ**—दाशरथे, त्यानंतर जगद्दर्शनलालसेनें वातमयी धारणा करून मी वायुरूप झालों. मी उपवनांतील लतारूपी वनितांना नाचवूं लागलों. पुष्पाच्या सुवासास आपल्या अधीन करून घेऊन त्याचा पालक झालों. निर्झरांच्या सूक्ष्म बिंदूंना उडवूं लागलों. सुरतश्रांत स्त्रीपुरुषाच्या शरीरास आह्लादित करण्याची इच्छा धरली. मंगलसमयीं भावि कल्याण सुचविण्याकरितां मृदु, शैत्य, माद्य, सुगंध इत्यादि गुणानीं युक्त झालों. पण उत्पातसमयीं भयंकर, तीक्ष्ण, उष्ण, तीव्र व दुर्गंधवान्ही झालों. प्रलय-समयीं तर मी पर्वतांनाही सुकलेल्या पानांप्रमाणें उडवीत असें. नंदनवनांत

मी कुंद, मंदार, इत्यादिकांच्या मकरंदरेणूंनीं भूषित होत असें. नरकात दुःखाग्नींच्या ज्वाला माझ्या आकारास सुशोभित करीत. सागरातील माझा संचार तरंगावरून ध्यानात येत असे. अंतरिक्षांत मेघाचें आच्छादन पसरून सूर्य व चंद्र याना मी झाकून सोडीं व आपल्या वेगानें त्यांचा पडदा दूर करून त्या तेजोगोलाना व्यक्तही करीं. नक्षत्ररूपीं क्षत्रियसैन्याचा मी वेगवान् व फार मोठा रथच झालों. मीच सिद्ध व देव याच्या विमानास त्रैलोक्यसंचार करावयास लावीत असें. माझ्या आनुकूल्यामुळेंच तीं इष्ट-स्थानीं जात येत होतीं. मी त्वरित गतीमुळें जणुं काय या मनाचा सख्खा भाऊच असून अनंग ( अंग—शरीर-रहित ) असतानाही समस्त अंगवान् व स्पंदाच्या योगानें चंदनाप्रमाणें प्राण्यास आनंद देणारा झालों. मी तुषार-रूप शुभ्र रोमानीं जर्जर व म्हणूनच वृद्धासारखा, पुष्पादिकाच्या सुवा-सानीं तारुण्याच्या उन्मादानें युक्त असल्यासारखा, आणि मौन ( शब्द-राहित्य ) व मृदुत्व याच्या योगानें बालकासारखा झालों, इंद्राच्या उद्या-नात उदार व मधुर, कुबेरोद्यानापासून पसरलेला, गंगेच्या तरंगात लोळून दुसऱ्यांचे श्रम घालवीत असल्यामुळें आपल्या सदागमनप्रयुक्त श्रमांस न जुमानणारा, वसंताच्या वनितेच्या अंगास गुजगुल्या करून हालवि-णारा, दावानलादि अग्नींना साह्य करणारा, प्राण, अपान इत्यादिकाच्या योगाने प्राण्याचें यंत्र वाहणारा, मनोराज्यांतील नगराप्रमाणें समोर असूनही कोणाला दिसणारा, धूर, धूळ, मेघ व जल याचे भयंकर आवर्त ( भोंवरे ) निर्माण करणारा, आकाशरूपी अरण्यातील महागज, तेजाच्या भात्याप्रमाणें सर्व रसाचें आकर्षण करण्यात सदा व्यग्र असणारा, घेणे, देणे, चालणें, बोलणें, इत्यादि क्रियांना अनुकूल असलेली अंगचेष्टा करवि-णारा शरीररूपी नगरांत नाडीमार्गांनीं निष्प्रतिबंध गमन करणारा, अन्नरसमय शरीरपात्रात प्राण—अपानादि भावानें संचार करून आयु-रूपी रत्नाचें रक्षण व खर्च करण्यात व्यग्र असणारा, शरीररूपी नग-राना पाडण्यात व पुनः निर्माण करण्यात तल्लीन झालेला आणि अन्न-रसाचा, मलाचा व अति सूक्ष्मसार भागाचा ( म्हणजे त्वक्, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र या सहा अथवा कफ, वात, पित्त या तीन धातूंचा ) विभाग करण्यांत कुशल असलेला असा मी झालों.

रामभद्रा, त्या वायुभावामध्येंही मी परमाणूपर्यंत प्रत्येक द्रव्यांत पूर्वोक्त शिलेप्रमाणेंच त्रिभुवन पाहिलें. त्या जगातही मीच पृथिव्यादि जगद्रूपवान् झालों होतों. पण परमार्थतः तर त्यांतील कांहींच नव्हतें. कारण सर्व शून्याकार होतें. आरोपदृष्टया मात्र चंद्र, सूर्य, अग्नि, वायु, इंद्र, कुबेर, ईश्वर, ब्रह्मा, हरि, गंधर्व, विद्याधर, महासर्प इत्यादि सर्व भाव प्रत्येक परमाणूंत एकाचवेळीं धारण केले जातात. असो; रामा, याप्रमाणें यावेळीं भूतपंचकरूप अशा मीं त्रैलोक्यांत ठिकठिकाणीं विहार केला. भूमि, जल, तेज व वायु यांच्या समवायरूप वृक्षादि शरीरांत राहून मीं मुळांच्या द्वारा भूमींचा रस प्याला. ज्याचीं अंगें अमृतानें भरलीं आहेत व जीं चंदनद्रवाप्रमाणें शैत्य, शुक्ल व इत्यादि गुणांनीं युक्त आहेत अशा चंद्रबिंबामध्यें लोळलों. सर्व दिशांतील सर्व ऋतूंत उत्पन्न होणाऱ्या विविध पुष्पांचा आमोद भोगला. जिच्यामध्यें लोणी पसरलें आहे, अशा भूमी-प्रमाणें मृदु असलेल्या आकाश-अंगणांतील मेघ-शय्येवर शयन केलें. तात्पर्य, राघवा, मी सर्व वस्तूंमध्यें यथेच्छ संचार केला. सर्वांमध्यें वास केला. सर्व अवस्थांचा अनुभव घेतला. आरसा जशीं प्रतिबिंबें वाहतो त्याप्रमाणें मी आपल्या अंगावर गुप्त व प्रकट जगें वाहिलीं. राघवा, वर वर्णन केल्याप्रमाणें आकाशधारणेनें आकाशरूप होऊन प्रत्येक परमाणूंत अवाढव्य त्रिभुवनाचा अनुभव घेतला. स्वप्नांत प्रसिद्ध चित् जसें संसार-मंडल निर्माण करते त्याप्रमाणें मी तें प्रपंच-जाल प्रकट केलें होतें. स्वतः मीच तें सर्व झालों. सर्व द्वैत-संहार करणाऱ्या बोध-कालास प्राप्त होणाऱ्या माझ्यामध्यें लक्षावधि जगें एका दृष्टीनें राहतात व दुसऱ्या दृष्टीनें रहातही नाहींत. तीं चिच्चमत्कार-मात्र रूपानें राहतात व अन्य रूपानें राहत नाहींत. ( म्हणजे चित् मध्यें स्वसत्ता-स्फूर्तिलक्षण चमत्कार करणें, अर्थात् सत्ता व स्फूर्ति यांचा आरोप जगाचे ठिकाणीं करून दाख-विणें या रूपानें असतात. पण तोच चिच्चमत्कार बंद केला कीं, एका परमार्थावांचून काहीं नाहीं. ) एवढ्यासाठींच अध्यारोपानें प्रत्येक वस्तूंमध्यें स्वसत्तेचें अर्पण केल्यामुळें निरामय भूमा विश्वरूपात्मा व सर्वकर्ता होतो आणि अपवादानें प्रबुद्ध झालेला तोच शुद्ध बोधात्मा होतो. कारण सर्व ब्रह्मात्मक आहे. याप्रमाणें एकेका वस्तूंतील ब्रह्मामध्यें सर्व जगाचा अध्यास

होत असल्यामुळें ज्ञानी पुरुषाला जगांत सर्वत्र तोच सर्वात्मा दिसतो. अज्ञान्यांना दिसणारें जगद्रूप ज्ञान्यास दिसणें शक्य नाहीं. त्यामुळें विद्वान् पुरुषांनीं अद्वय चिदात्म्याच्या ठिकाणीं सर्वत्र सर्वात्मतेची कल्पना करणें हा सुद्धां शुद्ध विकल्प आहे. कारण चित्-हून निराळी वस्तूच नाहीं ९२.

**सर्ग ९३**—वसिष्ठाच्या कुटींत ध्यानस्थ सिद्धाचें दर्शन. पण कुटीचा उपसंहार केल्यामुळें त्याचा पात व स्ववृत्तान्त.

**श्रीवसिष्ठ**—रामा, याप्रमाणें धारणासिद्ध जगद्देहाच्या दर्शनानंतर मी पूर्वोक्त कौतुकदर्शन–संवेदनापासून निवृत्त होऊन आपल्या त्या पूर्वींच्या समाधिस्थानास परत आलों. पण तेथें सर्वत्र शोध करूनही मला माझा देह कोठेंच दिसला नाहीं. केवल मला तेथें माझ्या पुढें बसलेला दुसराच एक सिद्ध मात्र दिसला. इष्ट पदास जाऊन पोंचलेला तो समाधाननिष्ठ होऊन राहिला होता. चित्ताच्या पूर्ण समाधानामुळें त्याच्यामध्यें चाचल्य मुळींच दिसत नव्हतें. काय, शिर, व ग्रीवा याना सम धारण करणाऱ्या त्यानें पद्मासन घातलें होतें. त्याची दृष्टि नासाग्रालाच जणुं काय लक्ष्य करीत होती. सर्व इंद्रिय–व्यापार क्षीण झाले होते. अतःकरणकोटर अक्षुब्ध व शात होतें. आपला देह दिसत नसून पुढें तो मुनि दिसत आहे, असें पाहून मी आपल्या सुंदर चित्तानें असा विचार केला—हा कोणी महासिद्ध या दिशेंत आला आहे. मजप्रमाणेंच एकान्तात विश्राति घेण्याची इच्छा करणारा हा हें आकाशमंडल समाधियोग्य आहे, असें जाणूनच येथें आला असावा. येथें आल्यावर या सत्यसंकल्पशाली महापुरुषानें ही माझी कुटी पाहिली असावी. नंतर यानें मी दीर्घकाळ उपेक्षा केल्यामुळें कुटींत शवरूप होऊन पडलेल्या माझ्या देहास पाहून व येथें मी पुनः परत येणार नाहीं, असें समजून त्याला फेंकून दिल्यावर यात वास केला असावा. तस्मात् माझें तें शरीर नष्ट झालें आहे, यात कांहीं संशय नाहीं. यास्तव मी आता या आतिवाहिक देहानेंच आपल्या सप्तर्षिलोकास जातों.

राघवा, असा विचार करून मी जों जावयास प्रवृत्त होत आहें, तों मी येथें असेपर्यंत ही कुटी असो, अशा प्रकारचा माझा कुटीविषयींचा सत्य-संकल्प क्षीण झाला. कारण तेथून जाण्याचा माझा संकल्प त्या पूर्वोक्त

संकल्पाच्या विरुद्ध होता. असो, माझा संकल्प क्षीण होताच ती माझी कुटि निवृत्त झाली. तेथें केवळ आकाश झालें. त्याबरोबर तो समाधिमान् सिद्धही आधाररहित झाल्यामुळें खालीं पडला. स्वप्नसंकल्प शांत होताच स्वप्नसंकल्पनगर जसें नष्ट होतें त्याप्रमाणें माझा संकल्प शांत होताच ती माझी सांकल्पिक कुटीही नष्ट झाली. आणि मेघांतून पाण्याचा झोत जसा खालीं पडतो त्याप्रमाणें ध्यानी सिद्धही घसरला. रामा, प्रळयसमयीं चंद्रबिंब, पुण्य क्षीण झालें असतां वैमानिक किंवा मुळापासून तोडलेला वृक्ष जसा खालीं पडतो त्याप्रमाणें तो सिद्ध भूतलावर पडला असतां मीही कौतुकानें आतिवाहिक शरीरानेंच त्याच्या मागोमाग खालीं गेलों. प्राण व अपान यांना वर आकर्षण करून ऊर्ध्वगामी केल्यामुळें विहिरींत सोडीत असलेल्या कुंभाप्रमाणेंच तो मुनि, माझ्या कुटींत जसा बसला होता तसाच ( म्हणजे मस्तक खालीं न होतां ) पडला व पद्मासनानेंच भूमीवर येऊन स्थिर झाला. पण रामा, तो महात्मा इतक्या उंचावरून व एवढ्या मोठ्या वेगानें खालीं पडला तरी देहभानावर आला नाहीं. कारण योगबलानें त्याचा देह पाषाणासारखा दृढ किंवा कापसाच्या गोळ्यासारखा लघु झाला होता. तेव्हां त्याला समाधीपासून व्युत्थित करण्याकरितां प्रयत्न करणाऱ्या मीं आकाशांत मेघाकार होऊन महावृष्टि व महा गर्जना केली. गारा, अशनि इत्यादिकांचा वर्षाव झाला असतां तो महात्मा जागा झाला. त्याची अंगकांति तुकतुकीत झाली व त्यानें नेत्र उघडले. तेव्हां तो जागा होऊन स्वस्थचित्तही आहे, असें पाहून परमार्थसिद्धीस कारण होणाऱ्या समाधीपासून निवृत्त झालेल्या त्याला मीं स्वच्छ चित्तवृत्तीनें म्हटलें, " हे मुनिश्रेष्ठा, तूं कोठें स्थित आहेस, हें काय करीत आहेस, तूं कोण आहेस, एवढ्या दूरावरून पडलास तरी तुला त्याचें भान कां झालें नाहीं. "

मी असें विचारलें असतां त्यानें मजकडे पाहिलें व पूर्वींच्या गतीचें स्मरण बरोबर न झाल्यामुळें मला म्हटलें, " श्रेष्ठा, जरा थांब; मला माझा सर्व पूर्व वृत्तान्त आठवूं दे. " असें म्हणून तो कांहीं वेळ स्वस्थ बसला व सर्व प्राक्तन वर्तमान आठवलें असतां पुनः मला म्हणाला " भगवन्, मी आतां तुला ओळखिलें. मी अभिवादन करतों. मी

केलेल्या या अतिक्रमाविषयीं मला क्षमा कर. कारण क्षमा हा संताचा स्वभावच आहे. हे मुने, भ्रमर जसा पद्मिनीमध्यें त्याप्रमाणें मी भोग व सुगंध यांनीं मोह पाडणाऱ्या देवाच्या उपवनभूमींतून दीर्घकाल विहार केला. पण शेवटीं चित्तजलकल्लोलक्रीडेनें या दृश्य नदींतून चक्राकार भ्रमण करता करता खिन्न होऊन मी मनात असें म्हटलें—या संसारसागरातील दृश्यकल्लोलानीं मी आकुल झालों आहें. वृष्टीच्या अभावीं जसा चातक त्याप्रमाणें दीर्घकाल लोटला तरी यात स्थिर असें कांहींच न लाधल्यामुळें मी उद्विग्न झालों आहें. केवल संवित् हेंच ज्यातील सार आहे, अशा भोगात एका संवित्—वाचून दुसरें काय रम्य आहे? यास्तव मला आता केवल संविदाकाशातच राहिले पाहिजे. विषयामध्यें शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांवाचून आणखीं काहीं नाहीं. तेव्हा मी तेवढ्यातच का रममाण व्हावें? हें सर्व चिन्मात्र आकाशच जर आहे, तर मी त्याला विसरून खुळ्यासारखा या असदाकारात का रममाण होऊं? विषय विषासारखे भयंकर आहेत. स्त्रिया कामविमोह देणाऱ्या आहेत. अतिस्नेह सरस पुरुषालाही विरस करणारे आहेत. तेव्हा त्यात लोळणारा कोण मारला जात नाहीं? त्याचप्रमाणें शरीराचे ठायीं आसक्ति ठेवणेंही उचित नव्हे. कारण जरा त्याला ग्रासावयास टपून बसलेली असते. सागरातील बुडबुड्याप्रमाणें त्याचा नाश प्रतिक्षणीं संभवनीय असतो. त्याचप्रमाणें जीविताची आशा धरणेंही युक्त नव्हे. कारण तें एकाद्या नदीसारखेंच आहे, अशी कल्पना केल्यास तिचे सर्व धर्म त्याच्या ठायीं आढळतात. मरण व जन्म हेच तिचे मोठे तट आहेत. सुख व दुःख हे तरंग आहेत. यौवन ( तारुण्य ) ह्याच चिखलानें ती जीवितनदी मलिन झाली आहे. जरा हाच तिच्यावरील फेंस आहे. केव्हां केव्हा प्राप्त होणारें विषयसुख हेच तिच्यावर केव्हां केव्हा येणारे बुडबुडे आहेत. ही नदी व्यवहारलक्षण महाप्रवाहपंक्तीनें व मूर्खप्रलापरूपी जलरवानें युक्त आहे. ती राग-द्वेषरूपी मेघाच्या योगानें वाढते. लोभ, मोह, काम हे तिच्यातील मोठाले भोंवरे आहेत. उत्कर्ष व अपकर्ष याच्या योगानें तिचा प्रवाह चालू असतो. हर हर, अशा प्रकारची ही जीवितनदी नित्य तापानें तप्त झालेली असते. इष्ट पुत्र मित्रादिकाचे समागम व धनादिकाची प्राप्ति

हेंच या संसारजलाशयांतील जल आहे. त्याचें येणें व जाणें सतत चालतें. जे भाव विद्यमान असून निवृत्त होतात त्यांची मला गरज नाहीं व जे मजपाशीं नसून अकस्मात् प्राप्त होतात त्याच्या ठिकाणीं मी आस्था ठेवीत नाहीं. कारण मजपाशीं असलेले पदार्थही जर गेले तर आतां हे नवीन आलेले जाणार नाहींत म्हणून कशावरून ? इतर सर्व नद्यांचें पाणी जरी क्षणोक्षणीं वाहून जात असलें तरी तें पुनः पर्वत, मेघ इत्यादिकांपासून येत असतें. म्हणून नदीचा वेग बंद पडत नाहीं. पण या देहनदींतील आयुष्यरूपी जल एकसारखें जात मात्र असतें. पण त्यात दुसरीकडून भर पडत नाहीं म्हणून तें कांहीं वेळ वाहून शेवटीं संपतें. कुंभाराच्या चक्रावर घातलेल्या घटादि पदार्थांप्रमाणें हे सर्व भोग्यभाव प्रतिशरीरीं व प्रतिक्षणीं फिरतात. चतुर चोर किंवा भयंकर शत्रु असे हे विषय माझ्या विवेकरूपी सर्वस्वास लुटून नेत असतात. यास्तव मला अज्ञाननिद्रेंत न निजता सदा जागें राहिलें पाहिजे. हर हर, काळ प्राण्याच्या आयुष्याचे तुकडे तुकडे करून टाकीत असतो. पण प्रत्येक दिवशीं अशा प्रकारें क्षय पावणारें आयुष्य संपत आहे, हें कोणाच्या ध्यानात येत नाहीं. आज मला हें मिळालें आहे, आज माझें हें इष्ट झालें आहे, उद्या हें होईल, काल हें झालें इत्यादि गणना करण्यांत व्यग्र झालेले जन गेलेल्या आयुष्यास व जवळ आलेल्या मृत्यूस जाणत नाहींत. अनन्त वनभूमींत भोजन केलें, पान केलें, विहार केले, व सुखें आणि दुःखें पाहिलीं. आतां आणखीं मला या संसारात काय मिळवावयाचें राहिलें आहे ? आम्ही सुख-दुःखाचा अनुभव घेतला. सर्व पदार्थ वारंवार परिवर्तन पावत असतात. त्यांना स्थिर स्थिति अथवा नित्यता नाहीं, हें मी जाणलें व आता कौतुकशून्य होऊन राहिलों आहों. भोगांचे अनुभव घेतले व सर्वत्र अनित्यता आहे, हें जाणलें. पण त्यातील कशातही मला विश्रान्ति आढळली नाहीं. मला लोकपालादिकांच्या उच्च नगरातही कांहीं अकृत्रिम आढळलें नाहीं. जेथें जावें तेथें काष्ठमय वृक्ष, मांसमय प्राणि-शरीरें, मृन्मय भूमि, दुःखें व अनित्यता हींच कायतीं आढळलीं. तेव्हां त्यांतील कशावर विश्वास ठेवावा सांग.

बा मुने, काळानें ज्याला ग्रासलें आहे, त्याचें रक्षण करण्यास धन, मित्र, सुख, व बांधव समर्थ नाहींत. धुळीच्या लहानशा पुंजक्याप्रमाणें अस्थिर व अदृढ असलेला जन पर्वतावर पडलेल्या मेघ-जळाप्रमाणें विषयामध्यें आसक्त होऊन क्षणोक्षणीं हीन होत पुरुषार्थावांचूनच मरण पावतो. मला कामविषय मनोरम वाटत नाहींत व ऐश्वर्य रम्य भासत नाहीं. हें जीवित अतिशय चंचल आहे. तेव्हा बा मुनिवर्या, कोणा सुज्ञाचा कशावर विश्वास बसणार? आज नाहीं उद्यां, मृत्यु मस्तकावर पाय ठेवणारच! शरीर पानाप्रमाणें गळून पडणारें आहे. भगवन्, मी आपलें आयुष्य नुसत्या नीरस मनोरथांनीं घालविलें. मला आता कोणतेंही धन चमत्कार करणारें वाटत नाहीं. आता माझा मोह मंद झाला आहे. देह काहीं उपयोगाचा नाहीं. विषयांविषयीं अनास्था हीच उत्तम स्थिति व जीवनाची आस्था हीच अधम-स्थिति होय. संपत्ति प्राप्त झाली असता ही मोठी आपत्तिच आली आहे, असें समजावें. तिच्यामध्यें आसक्त होऊ नये. विवेक्यास विधि-निषेधयुक्त शास्त्रेंही व्यामोह पाडणारीं आहेत, असें भासतें. कारण कर्मठाचे ऐहिक व पारलौकिक विषय हृदयपुष्पांतील विवेकरूपी सुवासास नाहींसे करून प्राण्याला अनर्थांत पडतात; पण विषयाचें रूप वस्तुतः असत् असतानाही सत्‌बुद्धीने पाहिल्यामुळें सत् होतें. ज्याप्रमाणें सत् ब्रह्मरूप आवरणानें असत् झालें आहे, तसें असत्‌ही विक्षेपामुळें सत् झालें आहे. कारण माया-शक्ति अघटित घटना करण्यात मोठी पटाईत आहे. ज्याची दृष्टि अंतर्मुख नसून बहिर्मुख असते त्याची प्रवृत्ति विषयाकडे होणें साहजिक आहे. चित्तरूपी बाण विषयाकडे जात असतात. कृतघ्न सौहृदास जसे स्पर्श करीत नाहींत त्याप्रमाणें ते (चित्तबाण) विवेक-वैराग्यादि गुणांस स्पर्श करीत नाहींत. पण विवेक्याला आयुष्य हा उत्पातवायु, मित्र (स्नेहानें आसक्त करणारे) हेच शत्रु, बंधू हेच बंध, धन हेंच मरण, सुखें हींच अति दुःखें, संपत्ति ह्याच मोठ्या आपत्ति, व भोग हे संसारमहारोग आहेत, असें वाटतें. राघवा, मायेचा विलास किती आश्चर्यकारक आहे, हें तूं पहा तर खरें. ती आपत्तींना संपत्ति करून दाखविते. केवल दुःखाकरितांच सुख देते व मारण्याकरिता जीवित देते.

रामा, हा जन अनेक इष्ट व अनिष्ट कालपरिवर्त, अनेक प्रियजन-वियोग व थोडेसें केव्हा केव्हा मिळणारें सुख याचा अनुभव घेत जर्जर होतो. त्याचें आयुष्य निरायास पदप्राप्तीवाचून जातें. कष्टकर चेष्टा करण्यात सर्व शक्ति क्षीण होते. विषय व विभूति रम्य व मनोहर आहेत, हें खरें; पण जीवित मत्त स्त्रियाच्या कटाक्षा इतकेंच चंचल आहे, त्याला काय करणार? ज्याचा शेवट अत्यत विरस आहे, अशा आपात रमणीय विषयामध्यें जे रममाण होतात ते शेवटीं नरकात पडतात. सुखदुःखादि द्वंद्वदोषानीं उपरुद्ध दुःसाध्य व अस्थिर धनें अभाग्यवान् जनानाच सेव्य आहेत. तीं माझ्या सतोषाला कधींही कारण होत नाहींत. आरंभीं मधुर वाटलीं तरी शेवटीं दुःखपर्यवसायिनी लक्ष्मी लोकाना मोहच पाडीत असते. धनादिकाचे समागम खळाच्या समागमाप्रमाणें दुःख देणारे असतात. तारुण्य शरत्कालच्या अभ्रासारखें अस्थिर आहे. मोठमोठ्याच्या जीवितालाही ग्रासण्यासाठीं अंतक त्याच्या सभोंवार घिरट्या घालीत असतो. प्राण्याची आयुष्यें शाखाग्रावर लोंबणाऱ्या जलबिंदुइतकींच स्थिर आहेत. वृद्ध झालेल्या जीवाचे केंस पिकतात, दात पडतात, अग शिथिल होतें, पण एक तृष्णा मात्र तरुण होते. बाल्य, तारुण्य, इत्यादि दशा न कळता, केव्हाच निघून जातात. जीवित ओंजळींतील पाण्याप्रमाणे क्षणोक्षणीं गळत असतें. नदीच्या प्रवाहाप्रमाणें गेलेलें आयुष्य परत येत नाहीं. अकस्मात् कोठूनसा आलेला देह अकस्मात्, तरंग, मेघ किंवा दीपाप्रमाणेंच कोठेंसा जातो. व्यावहारिक रम्य वस्तूंमध्यें अरम्यता, स्थिर वस्तूंमध्यें अस्थिरता, व सत्यवस्तूंमध्यें असत्यता मीं पाहिली व त्यामुळें अतिशय विरस झालों. मन सत्त्वरूपतेस ( निर्वासनतेस ) प्राप्त झाल्यावर आत्मविश्रांतीमध्यें जें सुख आहे तें पाताल, भूतल व स्वर्ग यातील विषयात नाहीं. मुनिवर्य, आता माझें वैराग्य दृढ झाल्यामुळें संपूर्ण विषयासह असलेल्याही सर्व इंद्रियवृत्ति मला जिंकण्यास समर्थ नाहींत. फार दिवसानीं आज निरहकार झालेल्या मला हें स्वर्ग–मोक्ष–वैतृष्ण्य स्वबुद्धीनेंच प्राप्त झालें आहे. म्हणून मी चिरकाल एकान्त विश्रांति घेण्यासाठीं तुज प्रमाणेंच या आकाशात आलों. तों मला येथें ती कुटी दिसली. ती तुझी होती, हें मला आता कळलें. तूं पुनः येणार आहेस, याचा मी पूर्वी विचा-

रही केला नाहीं. त्यावेळीं मला एवढेंच वाटलें कीं कोणी सिद्ध येथें आपला देह सोडून निर्वाण पावला आहे. असो; भगवन्, हा माझा वृत्तान्त आहे. व हा मी आहें. आतां माझ्या या अपराधाविषयीं तुला जें काहीं करावेसें वाटेल तें कर. मी दंड्य आहें, असें वाटल्यास दंड कर, अनुग्राह्य आहें, असें वाटल्यास अनुग्रह कर. कारण हे मुनिराज, तुमच्यासारखे सिद्धही जोंवर अवधानपरायण होऊन व आत संपूर्ण वस्तूचा उत्तम बुद्धीनें विचार करून निर्णय करीत नाहींत तोंवर त्याना त्रिकाल ज्ञान होत नाहीं. ब्रह्मदेवादिकाच्या मनाचाही हा असाच स्वभाव आहे. मग माझ्या सारख्याची काय गोष्ट सागावी ? यास्तव वृत्तान्त न जाणणें, तुझा समाधिस्थ देह फेंकून देणें, इत्यादि अपराधाची मला क्षमा कर ९१.

सर्ग ९४—त्या दोघाचे सिद्धलोकीं गमन, तेथें देवता व पिशाचें यांची मनोमात्र स्थिति

**श्रीवसिष्ठ**—राघवा, नंतर आकाशासारख्या विस्तीर्ण महाभूमींत असलेल्या त्या सिद्धाला मीं सुहृद्भावामुळें असें म्हटलें, “श्रेष्ठा, हा तुझा एकट्याचाच अपराध नव्हे. तो माझाही आहे. कारण मी सुद्धा तुझें आगमन होईल, याचा काहींच विचार केला नाहीं. तूं म्हणतोस तें खरें आहे. योगी देहवानानाही चित्तैकाग्र्यानेंच सर्व विषयाचें ज्ञान होतें. त्यावाचून भूत व भविष्यत्कालचें ज्ञान होत नाहीं. तें जर झालें असतें तर तूं पडूं नयेस म्हणून मी ती आपली संकल्पकुटी स्थिर केली असती. अर्थात् यामध्यें दोघाचाही अपराव आहे. यास्तव परस्परांनीं परस्परास क्षमा केली पाहिजे. बरें, आता ऊठ. आपण होतों तसेच सिद्ध लोकीं जाऊन राहू या. मी सप्तर्षि लोकात राहतों व तूं आपल्या नंदनवनात रहा. आपल्या आस्पदात ( स्थानीं ) वास करणें, हेंच निर्विक्षेपस्थितीचें उत्तम साधन आहे.”

रामा, असा संकेत करून आम्ही दोघेही एकदम गोफणींतून फेकलेल्या दोन दगडाप्रमाणें वर गेलों. नंतर स्वर्गापर्यंत बरोबर गेल्यावर प्रणामपूर्वक एकमेकाचें विसर्जन करून आम्ही दोघेही आपापल्या इष्टस्थानीं पोंचलों. राघवा, हा सर्व वृत्तान्त मी तुला सांगिला आहे. या संसाराची आश्चर्यमयी विचित्रता कशी आहे, ती पहा.

**श्रीराम**—भगवन्, कुटींतील आपला देह त्या सिद्धानें फेकून दिल्यावर या पृथ्वीमध्यें तो अणुरूप होऊन लीन झाला असावा, यांत कांहीं संदेह नाहीं. त्यामुळें आपण मनोमात्र देहानेंच सिद्ध लोकांत गेलां असाल. पण त्यानंतर आपला तेथील सिद्धांशीं व्यवहार कसा झाला? कारण मनोमात्र पुरुष दुसऱ्याशीं व्यवहार करूं शकत नाहीं व दुसरेही त्याच्याशीं व्यवहार करण्यास समर्थ नसतात.

**श्रीवसिष्ठ**—हो, रामा, बरी आठवण झाली. त्यानंतर सिद्धसेना व लोकपाल-पुरें यातून संचार करणाऱ्या माझा हा वृत्तान्त ऐक.—मी इंद्रपुरांत आलों. पण आतिवाहिक देहरूप असलेल्या मला तेथें कोणी पाहिलें नाहीं. त्यावेळीं मी आकाशाप्रमाणें अस्थूल, व चिदाकाशप्रचुर मनोमात्ररूप होतों. त्याकारणानें तुझ्यासारख्या त्या स्थूलार्थज्ञांना माझा साक्षात्कार झाला नाहीं. पण सूक्ष्मार्थदर्शी योग्यांना मी दिसत होतों. मी केव्हांही देशकालादिकाचें परिवर्तन करण्यासही समर्थ झालों नाहीं. कारण मी मननमात्र देह असून पृथिवीप्रभृति भूतांनीं विरहित होतों. संकल्पपुरुषाकार असल्यामुळें मी खांब, भिंत इत्यादिकांनीं रुद्ध होत नसें. स्वप्न व मनोराज्य याच्या प्रमाणें स्वमनोमय भूताच्या योगानें व्यवहार करीत असें. रामा, स्वप्नांतील अनुभव अशाप्रकारच्या अर्थांच्या संभावनेविषयीं पूर्ण दृष्टान्त आहेत. पण जो नैयायिक, देह कोणत्याही ज्ञानाचें अवच्छेदकतासंबंधानें कारण होतो, त्वचा व मन याचा योगही प्रत्येक ज्ञानाचें कारण आहे, कारण त्यामुळेंच सुषुप्तींत त्याचा वियोग झाला असतां ज्ञानाचा अभाव होतो, इत्यादि व्यर्थ प्रलाप करतो त्याच्याशीं संभाषणही करूं नये. रामा, स्वप्नामध्यें संचार करणारा पुरुष आपल्या भ्रामकदृष्टीनें जरी संचारचसा करीत असला, तरी त्याच्या घरांतील इतर माणसांना जसा तो निजलेलाच दिसतो, व्यवहार करीत असलेला दिसत नाहीं त्याप्रमाणें आकाशगत देवादिकांनीं पुढें असलेल्याही मला पाहिलें नाहीं. मी मात्र त्या सर्वांना पहात होतों.

**श्रीराम**-भगवन्, असें जर होतें तर त्या सिद्धानें आपल्याला कसें पाहिलें?

**श्रीवसिष्ठ**—रामा, आमच्यासारखे योगसिद्धजन सत्यकाम असतात. त्यामुळें ते आपल्या संकल्पाप्रमाणें कल्पित पदार्थांस प्राप्त होतात. असं-

कल्पितांस प्राप्त होत नाहींत. ज्ञानसिद्ध जनांना सदा आतिवाहिकताच असते, हें खरें; पण लौकिकव्यवहारांत मग्न झालेल्या शुद्धचित्त पुरुषालाही आपल्या आतिवाहिकतेचें विस्मरण होतें. त्यावेळीं हा सिद्ध मला पाहो, असा संकल्प मी केला व त्यामुळें त्यानें मला पाहिलें. शिवाय तोही मजप्रमाणेंच सत्यसंकल्प होता. सामान्य पामरजन आपला भेदभाव द्वैतवासनेनें दृढ करून घेतात. मीच सच्चिदानंदघन ब्रह्म आहें, हा भाव त्यांच्या मनाला स्पर्शही करीत नाहीं. त्यामुळें ते संकल्पार्थास पात्र होत नाहींत. पण ज्ञानी पुरुषाचा भेदभाव व त्याविषयींची वासना हीं दोन्ही निवृत्त झालेलीं असल्यामुळें तो संकल्पार्थाचें भाजन होतो.

**श्रीराम**—गुरुवर्य, समजा कीं दोघे सिद्ध आहेत. त्यांतील एकानें मी याला पाहावें, असा व दुसऱ्यानें यानें मला पाहूं नये, असा संकल्प केला. तर अशा प्रसंगीं कोणाच्या सत्य संकल्पाप्रमाणें कार्य घडतें?

**श्रीवसिष्ठ**—ज्याच्या आत्मज्ञानाची विशदता ( निर्मलता ) अधिक त्याचा संकल्प प्रबल होय. म्हणजे ज्याप्रमाणें एका राज्याच्या सिद्धीकरितां प्रयत्न करणाऱ्या दोघा राजांतील जो अधिक बलाढ्य असतो त्याला तें मिळतें त्याप्रमाणें हाही प्रकार जाणावा. पण दोघांचें बल एकसारखेंच असल्यास दोघांच्याही इच्छेप्रमाणें होतें. याविषयीं आम्ही पुढें सांगणार आहों. असो; पण जेव्हां मी त्या महा आकाशांत दुसऱ्याशीं व्यवहार करण्यास प्रवृत्त झालों तेव्हां मला देवादिकांतील कोणी पहात नाहीं, असें कळलें. मी मोठ्यानें बोलत असूनही माझा शब्द कोणाला ऐकूं जात नाहीं, असें माझ्या निदर्शनास आलें. कोणी पडत असतांना किंवा वर येत असतांना त्याला आधार देण्यासाठीं मी आपला हात पुढें केला तरी तो कोणी धरीत नाहीं, असें माझ्या प्रत्यक्ष अनुभवास आलें. रामा, याप्रमाणें आकाशांत गेलेला व मनोमननरूप असलेला मी व्योमपिशाच झालों. मी त्यावेळीं देवाच्या घरांतील पिशाचतेचा अनुभव घेतला.

**श्रीराम**—भगवन्, या लोकीं पिशाच कोणत्या आकाराचे असतात. त्यांचें स्थान कोठें असतें. त्यांची जाति व आचार कोणत्या प्रकारचा असतो व त्यांचा आशय कसा असतो?

श्रीवसिष्ठ—राघवा, या लोकीं पिशाच कोणत्या प्रकारचे व कसे असतात तें सांगतों, ऐक. कारण प्रसंगप्राप्त वचन जो बोलत नाहीं तो सभ्यच नव्हे. रामा, काहीं पिशाच आकाशसदृश व सूक्ष्मदेहवान् असतात, आणि काहीं तुझ्या सारखेच, स्वप्नतुल्य, मनःकल्पित हस्तपादादि युक्त असतात. पण ते असे जरी मनोमय देहवान् असले तरी दुसऱ्या मनुष्यामध्यें त्याच्या चित्तभ्रमरूपानें नानाभय देणाऱ्या आपल्या प्रतिबिंबाच्या द्वारा प्रवेश करून त्याच्या चित्तात जणुं काय तादात्म्यसें पावून त्या मानवाचा आशय ( दुःखभोगप्रद कर्म—काम—वासनादिक ) नाना—भ्रांतिचेष्टानुरूप करितात. ज्याला ते धरतात त्याचा आशय मरणानुकूल असल्यास त्याला मारतात, किंवा ऋणानुबंधाप्रमाणें त्याच्या देहातील धातूस खातात, रक्त पितात, व चित्ताचें आक्रमण करून त्याचे बल व सत्त्व याना नाहींसें करून सोडतात. रामा, ह्या त्याच्या आचाराप्रमाणेंच आता आकार व जाति याविषयींही सांगतो, ऐक. विचित्र कर्मानुसार त्याना विचित्र आकार प्राप्त होतात. कोणी आकाश-सदृश असतात. कोणी नीहार—तुल्य असतात व कोणी स्वप्न-नराकार असतात. त्याचप्रमाणें त्याच्या अंतर्धानादि शक्तींतही विचित्रता असते. सारांश ते सर्व ज्याचें आक्रमण करावयाचें असेल त्या पुरुषाच्या भ्रांतीप्रमाणें देह धारण करितात, पण त्याचें कोणाला ग्रहण करता येत नाहीं, व त्यास धरण्यास कोणी समर्थही नसतें. तथापि ते स्वतः अनुभव घेतात. अथवा परस्पर पाहतात. त्याना शीत, उष्ण इत्यादिकामुळें होणारें सुख व दुःख कळते. ते पिशाच जलादि पिण्यास, अन्नादि खाण्यास व यथेच्छ घेव-देव इत्यादि व्यवहार करण्यास समर्थ नसतात. पण ते इच्छा, द्वेष, भय, क्रोध, लोभ व मोह यानीं युक्त असतात. मंत्र, औषध, तप, दान, धैर्य व धर्म याच्या योगानें मात्र ते मनुष्याच्या अधीन होऊं शकतात. पिशाचांना एका प्रकारच्या सत्त्वावष्टंभ नावाच्या योग-धारणेनें यंत्राच्या योगानें अथवा आराधनेनें साधलेल्या मंत्रानें स्ववश करून घेऊन काहीं थोड्याशा लोकाकडूनच सेवादिकामध्यें नियुक्त केलें जातें. पण असले लोकही सर्वत्र आढळत नाहींत. पिशाच ही एक अधम देवयोनि आहे. यास्तव त्यांतील भूताची त्याच्या कर्मानुसार न्यूनाधिक शक्ति असते.

ते देवादिकांपासून अगदीं हीन जीवापर्यंत पाहिजे त्याचा आकार धारण करूं शकतात. आतां त्यांचा जन्म कसा होतो, तें सांगतों ऐक.

माया-शबल ब्रह्माला जीवादि भावांची प्राप्ति व मनःप्रभृति उपाधींची उत्पत्ति कशी होते, तें पूर्वी सांगितलेंच आहे. तुझें मन जसें कल्पित आकाशनगर पाहते त्याप्रमाणें जीव–समष्टिमनोरूप ब्रह्मा आपल्याच मध्यें कल्पित जग पाहतो. तो जी जी कल्पना करतो तें तें पुढें पाहतो व त्याचा अनुभव घेतो. कारण सर्व जीव चिद्रूप सत्च आहेत. तेव्हां ज्ञान-शक्ति–युक्त असा तो आपल्या विषयाला का पाहणार नाहीं? तो निराकार ब्रह्मा चिदाकाशात शून्यरूप ब्रह्माडाकारास पाहतो. तेंच हें जगत् होय. त्याचा हा तसला प्रति-भासच दीर्घकाल भावनेनें घन, पुष्ट व दीर्घ स्वप्नाप्रमाणें सुंदर होऊन राहिला आहे. त्यामुळेंच हा सर्व सर्ग सदा स्वप्नतुल्य आहे. जगाचें जाल हें मनोराज्य आहे. त्या कारणानेंच आत्मा आकाश–चिदाकाशरूप आहे, असें दृढ अनुसंधान केल्यावर कोणाचाही सर्ग, स्थिति व लय रहात नाहीं. तेव्हा राग, द्वेष, भय इत्यादि भाव कसे उत्पन्न झाले? तें सांग पाहूं? परमार्थदृष्ट्या सर्गाचा आरंभ नाहीं, व असर्गही नाहीं तर हें सर्व नित्य प्रकाशरूप आकाश आहे. तथापि तसल्याच क्षेत्रात अज्ञानकल्पनापंकापासून विविध भूत-सृष्टि झाली. देवादिक हे तिचेच भाग आहेत. प्रत्येक व्यक्ति ही एक एक शिला असून समान गुण–धर्म–युक्त अनेक व्यक्ति हीच ती ती जाति होय. तिच्या शुभ भागास देवसृष्टि, बुद्धिमान् भागास ऋषिसृष्टि, अर्ध-पक्क भागास मानवसृष्टि व मूढ भागास तिर्यक् व नारक सृष्टि म्हणतात. त्यातील जी शिला–जाति भारभूत, कांति–प्रकाशादि फलरहित, व अशरीराकार असते तीच पिशाचजाति होय. पिशाचशिला प्रसंगोपात्त विचित्र शरीरें धारण करितात. त्याच्या पूर्व वासनाच त्याच्या पिशाच-भावास कारण होतात. त्यामुळें हिरण्यगर्भानें सर्व शिलारत्नें देवादिकासारखींच का निर्मिलीं नाहींत? पिशाचादिकासारख्या दुष्ट शिलाचा संकल्प का केला? ही शंका रहात नाहीं. शिवाय संकल्पाच्या इच्छेविषयीं प्रश्नच करिता येत नाहीं. कारण तो स्वतंत्र असतो. सर्वभूतांच्या (प्राण्यांच्या) जाति चिदाकाशरूप असतात. त्याचे देह सूक्ष्म असतात. पण चिर–

अभ्यासवशात् त्यांना आधिभौतिक भाव प्राप्त होतो. पिशाचादिकांनाही याच नियमाप्रमाणें कदाचित् कल्पित देहभाव प्राप्त होतो. रामा, पिशाचांसारख्या दुसऱ्याही अनेक दुष्टजाति या जगांत आहेत व त्या प्रत्येकाच्या कर्मानुसारच, ईश्वराच्या नियतीप्रमाणें, दुःख देतात. जेथें जेथें पिशाचादिक असतात तेथें तेथें त्याची छाया पडते. भर दोनप्रहरीं उघड्या जागेंत जरी एकादें भूत उभें असले तरी त्याचें आंध्य त्याच्यापाशीं येऊन उभें राहतें. सूर्य त्याचा घात करीत नाहीं व दुसरा कोणी त्याला पहात नाहीं. पण ज्याच्याशीं त्याचा संबध असतो तो मानव त्याला अगदीं स्पष्टपणें पाहूं शकतो. तेव्हा मायेचा विलास कसा आहे, तो पहा. अग्नि, सूर्य व चंद्र, याच्या तैजस मंडलासारखेंच पिशाचादिकाचें तामस मंडल असतें. घुबडादिकाप्रमाणें तेजामध्यें तीं निर्बल होतात व अंधकारात सबळ होतात. हें त्याच्या स्वभावानुरूप आश्चर्य आहे. असो, रामा, याप्रमाणें मी देवलोकपालाच्या नगरात पिशाचासारखा वावरूं लागलों ९४.

**सर्ग ९५**—सत्यसंकल्पतास्मरणानें लोकाशीं पुन. व्यवहार व स्वत ला प्राप्त झालेलीं आकाशवासिष्ठादि नावें

**श्रीवसिष्ठ**—राघवा, वर वर्णन केल्याप्रमाणें चिदाकाशशरीर व भूतपंचकरहित असा मी आकाशात पिशाचासारखा विहार करीत राहिलों. मला चंद्र, सूर्य, इद्र, हरि, हर इत्यादिकातील कोणी पहात नव्हते. देव, सिद्ध, गधर्व, किनर, व अप्सरागणही मला पाहूं शकले नाहींत. मी त्याच्या अगावर पाय ठेवीत होतों, आरोहण करीत होतों व त्याच्यावर बसत होतों, पण ते मला उलट काहीं करीत नव्हते. एकाद्या विकत घेतलेल्या सज्जनाप्रमाणें पूर्वापर कर्तव्याचें अनुसंधान न राहिल्यामुळें, मी त्यावेळीं मोहितसा झालों. इतक्यात मला माझ्या सत्यकामत्वाचें स्मरण झालें व त्याबरोबर ‘ मला या देवगणानीं पहावें, ’ असा मी संकल्प केला. राघवा, त्या भावनेचा केवढा प्रभाव सागावा ! माझ्या अशा संकल्पानंतर लागलेच सर्व आकाशचर मला पाहूं लागले. त्यामुळें मी देवांच्या घरांत संभाषणादि स्पष्ट व्यवहार करूं लागलों. ज्यानीं मला अंगण्यात पाहिलें त्याना मी त्याचवेळीं आविर्भूत झालों आहें, असें वाटलें व माझा पूर्व-

वृत्तान्त ठाऊक नसल्यामुळें मी पृथ्वीपासूनच उत्पन्न झालों आहें असें ते समजले. त्यांनीं मला पार्थिववसिष्ठ असें नांव दिलें. ज्या आकाशांतील सिद्धांनीं मला सूर्यकिरणांत पाहिलें ते मला तैजसवसिष्ठ म्हणूं लागले. याप्रमाणेंच त्या त्या स्थानोपाधींमुळें मी वातवसिष्ठ, वारि( जल )वसिष्ठ, इत्यादि नांवानीं प्रख्यात झालों. कांहीं कालानें मला त्याच आतिवाहिक देहाचे ठिकाणीं आधिभौतिकता प्राप्त झाली, पण हे दोन्ही देह आकाशरूप आहेत, असें मला तत्त्वतः ज्ञात असल्यामुळें एका चित्-चेंच भान होत होतें. अर्थात् मी अज्ञा-प्रमाणें देहात्मरूप झालों. नाहीं. याप्रमाणें मी सदा आत्मचिदेकस्वभाव आहें. भूताकाशादिस्वभाव नाहीं. ' तर मग तुम्ही आम्हांला साकार कसे दिसता ? म्हणून विचारशील तर सांगतों—बाबारे, सदेह मुक्त व विदेह मुक्त यांचें वस्तुतः ऐक्यरूप असल्यामुळें मी तुम्हाला उपदेश करण्याकरिता जीवन्मुक्त अवस्थेनें व्यवहार करीत असलों तरी आपल्या दृष्टीनें आत्मा-काशरूप आहें. हा शास्त्रीय व्यवहार करीत असतानाही माझी ब्रह्मता माझ्या अस्मरणामुळें लुप्त होत नाहीं. अर्थात् स्वप्न पाहणाऱ्या नराची जन्म व आकार यावाचूनच स्वतःविषयीं आधिभौतिकता बुद्धि जशी होते त्याप्रमाणेंच माझी व इतराचीही ती झाली व नेहमीं होते. ब्रह्मादिकांचीं शरीरें व त्यांनीं केलेले सर्ग हीं सर्व याप्रमाणें परब्रह्मच आहेत मी आकाशरूप असूनच असा पुष्ट झालों आहें. मजप्रमाणें हिरण्यगर्भाच्याही आत्मदृष्ट्या जगत् ब्रह्माकाशरूप आहे. परीक्षकाच्या दृष्टीनें जसें हें सर्व मनोमात्र तसे हे सर्व सर्गही मनोमात्र आहेत. अज्ञानदोषामुळें मी व हे सर्व जग, बालाच्या कल्पित भूताप्रमाणें, वज्रासारखें दृढ झालें आहे. बंधु दूर गेला असता त्याच्याविषयींचा स्नेह जसा हळू हळू क्षीण होतो त्याप्रमाणें वासना जशा जशा क्षीण होत जातात तसा तसा संसार ज्ञानानें क्षीण होतो. हें स्वप्न आहे, असें कळताच त्यांत पाहिलेल्या निधीविषयींची ग्रहणबुद्धि जशी क्षीण होते त्याप्रमाणें हें सर्व आत्ममात्र आहे, असें कळताच अहंकाररूप स्थूलता शांत होते. सर्व दृश्यदृष्टि उपशम पावतात. या महारामायणासारख्या उत्तम शास्त्राचें केवळ अवलोकन केल्यानेंही जीवन्मुक्तत्व नियमानें प्राप्त होतें. रामा, या एवढ्याशा साधनां-

मध्यें दुष्कर तें काय आहे ? संसारांत आसक्त होऊन जो मंदमति पुरुष मोक्षाविषयीं उदासीन राहतो त्याचें नांवही आम्ही घेणार नाहीं. कारण तो मनुष्याकाराचा खरा अधिकारी नव्हे. तो देह त्याला मुळींच योग्य नाहीं. ज्याप्रमाणें एकच अन्न पवित्र हविः-पुरोडाशादि रूपानें देवादि भक्षण करितात व तेंच अपवित्र विष्ठा, रक्त, मूत्र इत्यादिरूपानें कुत्रे, कोल्हे इत्यादि खातात, त्याप्रमाणें जीवन्मुक्त शब्दादि भोग शुद्ध चिन्मात्र आनंदरूपानें भोगतात व मूढ अत्यंत अपवित्र विषयरूपानें भोगतात. शिवाय अज्ञाना भोग्याविषयींची तृष्णा, क्रोध, लोभ इत्यादिलक्षण अग्नीपासून संताप होतो; पण या महारामायणासारख्या ग्रंथाचे परिशीलन करणाऱ्या सुज्ञाच्या मनांत सर्व विषयांविषयीं अत्यंत शीतलता उदय पावते. शीतल चित्तत्व हाच मोक्ष व संतप्तचित्तता हाच बध होय. पण अशा मोक्षाविषयींही कोणी इच्छा धरीत नाहींत. याहून आणखीं त्यांची अधिक मूढता ती कोणती ? राघवा, हा जन स्वभावतःच विषयांकडून वश केला गेलेला आहे. त्यामुळेंच तो परस्त्री व धन यामध्यें लोलुप झालेला असतो. तो युद्ध, चौर्य व लूट याच्या योगानेंही त्याना संपादन करतो, व व्यर्थ संतप्त होत असतो. त्याच्या त्या नित्य संतापाचें शमन असल्या शास्त्रांचें श्रवण, अर्थविचार, निदिध्यासन इत्यादि उपायावाचून होणें शक्य नाहीं. जीव यथार्थ वस्तूच्या साक्षात्कारानेंच सुखी, व पूर्णानंद होणें शक्य आहे.

श्रीवाल्मीकि—मुनि इतकें बोलत आहे तों सूर्यास्तसमय झाला. त्यामुळें सर्व सभासद नमस्कार करून सायंतन विधींचें अनुष्ठान करावयास गेले, व नेहमींप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सभेंत परत आले ९९. दिवस सतरावा. पाषाणोपाख्यान समाप्त.

**सर्ग ९६**—वरील आख्यानाचें तात्पर्य. जगद्भ्रम चिद्विवर्त आहे. चित्‌च आत्मा आहे. ब्रह्मानंद अजर व अमर आहे.

श्रीवसिष्ठ—हे कार्यज्ञा रामा, हें पाषाणाख्यान मी तुला सांगितलें. या आख्यानाच्या योगानें स्फुरण पावणाऱ्या चिन्मात्र पूर्ण दृष्टीनें सर्व सृष्टि चिदाकाशांत स्थित आहेत, असा तूं निश्चय कर. कांहीं, केव्हांही, कोठेंही स्थित नाहीं तर जें आहे तें जसेंच्या तसेंच अखंडित ब्रह्मघन

आहे. सर्व जग चिन्मात्राच्या विवर्तरूप आहे, हें स्वप्नांत सर्वांच्या अनुभवानेंच सिद्ध आहे. कारण स्वप्ननगर आत्मरूपाहून कधींही भिन्न नसतें. स्वयंभू–( समष्टि-जीव )–त्व प्राप्त झालें असता व त्या सूक्ष्मावरोबरच दृश्यस्थूलता आली असतांही अज ब्रह्म स्वरूप न सोडताच जसेंच्या तसें असतें. परमार्थतः एक ब्रह्मच आहे. तें सृष्टीच्या आरंभापासून अंतापर्यंत अखंडच राहतें. सर्व अनुभव चिदनुविद्धच असतात. तिला सोडून कोणताही अनुभव नाहीं. यास्तव तीच विषयरूप होऊन राहते, असें जाणावें. स्वप्नात दिसलेल्या पर्वताला ज्याप्रमाणे केवळ चिद्रूपता असते याप्रमाणें जाग्रतींत अनुभविलेल्या वस्तूनांही चिन्मात्रत्व आहे. हें अनंत, अज व अव्यय चिदाकाश सहस्रावधि महाकल्प झाले व गेले तरी स्वतः उदय किंवा अस्त पावत नाहीं. चिदाकाशच पुरुष आहे. हा तूं चिदाकाशच आहेस. मीही अजर अमर चिदाकाशच आहें व सर्व त्रिभुवन चिदाकाशच आहे. चिदाकाशाला सोडल्यावर राहणारें शरीर शवच होय. चिदाकाश अच्छेद्य, अदाह्य व अशोष्य आहे. तें कधीं शांत होत नाहीं. यास्तव कांहीं मरत नाहीं व कांहीं उत्पन्न होत नाहीं. ब्रह्म चिद्रूप असल्यामुळेंच सर्व चिन्मात्र आहे. त्याचा विकास हेंच जग होय. कोणताही जीव चिन्मात्रपुरुष आहे. यास्तव तो ( एकही जीव ) मेल्यास चैतन्य एकच असल्यामुळें सर्व अंधकार होईल. पण रामा, आजवर लोटलेल्या अनंत कालात अजून एकही जीव मेला नाहीं, हें मी तुला प्रतिज्ञेनें सांगतों.

एक चिन्मात्रच मी आहें. शरीरादि मी नव्हे, अथवा तीं माझीं नव्हेत, असें अनुसंधान केल्यावर जन्ममरणादिक कोठून होणार ? आत्मघातकी मूढ मी अमळ चिन्मात्र आहें, हा आत्मानुभव स्वतःच नाहींसा करितात व आपत्तीच्या सागरांत पडतात. मी अनंत व निरामय चित् आहें. तेव्हां माझें जीवित काय, मरण काय ? व सुखदुःख काय ? मी आकाशरूप चेतन आहें. शरीरादिक माझे कोण ? अशा, विद्वानांनीं आंतल्या आंत अनुभाविलेल्या या तत्त्वाचा जे आत्मघाती मूढ कुतर्कांनीं अपह्नव ( निषेध ) करितात त्यांना धिक्कार असो. मी स्वच्छ चिदाकाश आहें, हा स्पष्ट अनुभवही ज्याच्या ठिकाणीं अस्त पावलेला असतो त्या

मूढ जीवाला आत्मज्ञ शव समजतात. देहेंद्रियातीत आत्म्याला जाणणाऱ्या व शुद्ध चिन्मात्राचा आश्रय धरून राहणाऱ्या विद्वानाला आधि व व्याधि पिडा देत नाहींत. चित्स्वभावाला विसरून ज्यांनीं शरीरावर आस्था ठेवली आहे त्यांनीं वस्तुतः सोनें टाकून राखच हातात घेतली आहे. मी देह आहें, अशी भावना करताच प्राण्याचें स्वाभाविक बल, बुद्धि व तेज नष्ट होतें. पण मी चित् आहें, अशी भावना करतांच तें सर्व अधिक वाढतें. आत्मज्ञानानें मरण-जन्माचा बाध झाला असतां लोभ, मोह, मद इत्यादि कशाच्या आधारानें राहणार? मी देह नव्हे, असा ज्याचा निश्चय झालेला असतो त्याला मृत्यु कस्पटासारखा वाटतो. मी चिदाकाशच आहें, हा भाव अत्यंत स्थिर झाला असता वज्रपात, युगाताग्नि इत्यादि सर्व पुष्पवृष्टीसारखे होतात. अहो जनांनो, तुम्ही चेतनावाचून जर आणखीं कांहीं असाल तर मला सागा. उगीच आत्मापहार का करतां? या जगात प्रतिक्षणीं अनेक प्राणी मरतात. पण त्याच्या बरोबर चेतनही मरतें म्हणून जर म्हटलें तर अहो लोकानो, तुम्ही अजून जिवंत कसे आहां! अर्थात् मी मरतों, इत्यादि सर्व अनुभव व आक्रोश चित्-मुळेंच होतात. हें सर्व आबाल गोपालास माहीत आहे. यास्तव सर्वत्र एक असलेल्या चित्चा नाश होत नाहीं. ती संसार पाहते. मुक्ततेचा अनुभव घेते. सुख-दुःखास जाणते. पण इतकें सर्व करीत असतांनाही स्वरूपापासून च्युत होत नाहीं. या जगात कशाचाही अस्त व उदय होत नाहीं. कारण सर्व चिदाकाश आहे. त्यांत स्वकल्पनेप्रमाणें सत्य नाहीं, असें कांहीं नाहीं व मिथ्या नाहीं, असेंही कांहीं नाहीं. तर प्रत्येकाच्या निर्णयाप्रमाणें सर्व कांहीं आहे. साराश सर्व संविदनुसारी आहे. तिला सोडून कांहीं नाहीं; हा आमचा महासिद्धान्त आहे ९६.

**सर्ग ९७—आत्मतत्त्व सर्वशक्तिसंपन्न असल्यामुळें सर्व वाद्यांची उक्ति सत्य आहे. सर्व जीव भोगासक्त असून तत्त्वज्ञ विरल आढळतात**

**श्रीराम—**प्रभो, वर म्हटल्याप्रमाणें ब्रह्मरूपानें सर्व सत्य असलें तरी प्रतीत होणाऱ्या जगाच्या रूपानें तें सत्य कसें? रज्जूचें रूप सत्य असलें तरी तिच्यावर आरोपिलेला सर्प कधींही सत्य होत नाहीं!

श्रीवसिष्ठ—रामा, तूं दिलेल्या दृष्टान्तांतील अधिष्ठान रज्जु व आरोपित सर्प हीं दोन्हीं दृश्य आहेत. त्यामुळें रज्जूचें दर्शन होतांच सर्पाचा बाध होतो व त्या कारणानें सर्प असत्य (मिथ्या) ठरतो. पण दार्ष्टान्तिकांत जगद्भ्रांति दृश्य आहे व त्याची अधिष्ठानभूत महाचिति अदृश्य आहे. अर्थात् दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांच्यामध्यें विषमता आहे. त्यामुळें चिदात्मा मदशक्तीप्रमाणें स्वतः अदृश्य राहूनच दृश्यभ्रमाचा हेतु होतो. तो कार्यरूपानेंच आपली सत्ता प्रकट करतो. त्याकारणानें या जगाच्या तात्त्विक रूपाला सत्यता असणे अयुक्त नाहीं. कारण तत्त्वज्ञानानें आकाराचा जरी बाध झाला तरी त्याच्या सत्त्वाचा बाध होत नाहीं. असें जर आहे तर आपण वर 'या जगात मिथ्या नाहीं, असें कांहीं नाहीं,' असें कसे सांगितलेंत? म्हणून म्हणशील तर सागतों. बंधसमयीं सर्व दृश्योपरमरूप मोक्षाचें असत्त्व असल्यामुळें (त्याचें संपादन झालेलें नसल्यामुळें) व त्यावांचून अद्वितीय चिदात्म्याची प्राप्ति होत नसल्यामुळें आणि मोक्षसमयीं प्रमाता, प्रमाण इत्यादिकाचा बाध होत असल्यामुळें परमार्थ वस्तु असतांनाही इतर अपरमार्थ वस्तूंचा अत्यंत अभाव होणें योग्यच आहे. म्हणून एका चिदात्म्याहून दुसरें काहींही सत् नाहीं, असें म्हणण्यास काहीं प्रत्यवाय नाहीं. जगांतील वस्तूंना जर सत्यत्व असलेंच तर तें अनुभवरूप आत्म्यामुळेंच असणें शक्य आहे. ज्याला जसा अनुभव येतो तो तसा बोलतो. परमार्थाविषयीं विचार करणाऱ्या अनेकांचा अनेक प्रकारचा अनुभव हींच शास्त्रें असल्यामुळें सर्व वादाचें वाक्य त्यांच्या त्याच्या अनुभवाचेंच प्रतिपादन करणारें असतें. म्हणून तें सत्यच आहे. सांख्याचें गुणसाम्यावस्थारूप प्रकृतीपासून महत्तत्त्व, अहंकार, तन्मात्रें इत्यादि क्रमानें जग हा गुणविकारमय सर्व आविर्भाव झाला. पुरुष केवल चिन्मात्र व अकर्ता आहे. त्याच्या भोगाकरितां व मोक्षाकरिता सर्ग प्रवृत्त होतो.— इत्यादि मत त्याच्या अनुभवाप्रमाणें सत्यच आहे. तसेंच वेदान्ती—जग हा ब्रह्माचा विवर्त आहे, असें युक्तिपूर्वक निश्चित करून—जगाला त्याच दृष्टीनें पाहूं लागला असतां तसाच अनुभव घेतो. म्हणून त्याचेंही मत सत्यच आहे. तशीच—कणाद, गोतम, सौत्रान्तिक बौद्ध, आर्हत जैन, वैभाषिक बौद्ध इत्यादिकांची—जग परमाणूंच्या समूहरूप आहे, ही कल्पनाही

त्यांच्या त्यांच्या अनुभवानुसार असल्यामुळें सत्यच आहे. त्याचप्रमाणें दृष्टिसृष्टि-मतीं ऐहिक व पारलौकिक जग अनिर्वचनीय आहे, त्याला सत् किंवा असत् यातील कोणत्याही कोटींत घालतां येत नाहीं. यास्तव जगाची गति मनःकल्पनामात्ररूप आहे. त्यांचें हें म्हणणेंही, त्यांच्या अनुभवा-प्रमाणें, खरेंच आहे. तसेच जे दुसरे चार्वाक नावाचे नास्तिक वादी आहेत ते पृथिवी, अप्, इत्यादि चार भूतेंच कायतीं आहेत. त्यांच्या आंत असणारें दुसरें आत्मरूप नाहीं, असें म्हणतात. कारण ते आपल्या देहात जेव्हा विचारपूर्वक पाहूं लागतात तेव्हा त्यांस इंद्रियाच्या पलीकडे कांहीं आढळत नाहीं. यास्तव त्यांचा सिद्धान्त त्यांच्या अनुभवानुसारच असल्यामुळें सत्य आहे. त्याचप्रमाणें क्षण-भंग वाद्याची क्षणभंगुरबुद्धिही युक्तच आहे, कारण प्रतिक्षणीं बदल-णाऱ्या पदार्थांची विपरीतता एकसारखी अनुभवास येत असते. ज्याप्रमाणें मडक्यात किंवा पिंजऱ्यांत अडकवून ठेवलेला चिमणा किंवा पोपट मडक्यांवरील झाकण काढलें किंवा पिंजऱ्यांचें दार उघडें ठेवलें असतां उडून जातो त्याप्रमाणें देहात परिच्छिन्न होऊन राहिलेला धर्म (जीव) कर्मक्षय होतांच परलोकास उडून जातो; ही जैनांची कल्पनाही सत्य आहे. त्याचप्रमाणें म्लेच्छ यवनादिकांची ‘ ईश्वरानें उत्पन्न केलेला देहाकारच जीव, देह जेथें पुरला असेल तेथेंच राहतो. नंतर उत्तर-कालीं ईश्वरानें त्याचा परामर्ष घेतला असतां त्याच्या इच्छेनें मुक्त ( उच्छिन्न ) केला जातो. शाश्वत स्वर्गात किंवा शाश्वत नरकात पाडला जातो. ’ इत्यादि कल्पनाही त्यांच्या अनुभवानुसार असल्यामुळें खरीच आहे. त्याचप्रमाणें सर्वत्र समबुद्धि व ज्यांनीं सन्मात्रवस्तूमध्यें दृष्टि ठेवली आहे, अशा पुरुषांना जगांतील विष, अमृत, जन्म, मरण इत्यादि पदार्थांचें समरूपानें व सद्रूपानें भान होणेंही उचितच आहे. ज्या अर्थीं हें ब्रह्मच सर्व व सर्वात्मक आहे त्याअर्थीं येथें कांहीं एक दुर्लभ नाहीं. या दृष्टीनें विचार केल्यास सर्व वाद्यांचेंही अभीष्ट सिद्ध होतें. हें सर्व जग स्वभावतःच ( म्हणजे आपोआप कांहीं विशेष कारणावांचून ) उत्पन्न होतें व तें स्वभावतःच नाश पावतें. जगाचा कोणी कर्ता नाहीं, असें कांहीं स्वभाव-

वादी चार्वाकांचें मत आहे व तहा योग्यच आहे. कारण घट, वस्त्र, इत्यादिकांचे जसे कुंभार, कोष्टी इत्यादि चतुर कर्ते दिसतात त्याप्रमाणें वृष्टि, वारा, तृणांकुर इत्यादिकांचा कर्ता पुष्कळ शोध केल्यावरही कोठेंच दिसत नाहीं. धान्याच्या इच्छेनें शेतें करणाऱ्या पुरुषांना, अकालीं महावृष्टि होणें, चांगल्या शेतांतही गवत उगवणें इत्यादि अनिष्ट असलेल्या गोष्टीही कर्त्यावांचून स्वभावतःच होत असल्यामुळें कर्त्याची कल्पना सहन होत नाहीं. पृथ्वी, अंकुर इत्यादि सर्व कार्यांचा एकच कर्ता आहे, अशी कित्येकांची कल्पना आहे, तीही सत्यच होय. कारण तसा निश्चय धरून ईश्वराची उपासना करणाऱ्यांना त्याची प्राप्ति होते, त्याच्यावर त्याचा अनुग्रह होतो; तो त्यांना वरदान देतो; इत्यादि प्रकार घडतात. यास्तव उपासक शेतकऱ्याप्रमाणें ' तो नाहीं, ' असें म्हणत नाहीं. तर अकालवृष्टि, सुक्षेत्रांत गवत उगवणें इत्यादिकही शेतकऱ्यांस जरी अनिष्ट असलें तरी दुसऱ्या सर्व जीवानांही तें अनिष्ट असतेंच, असें कांहीं नाहीं. उलट गवत पुष्कळ झाल्यास गुरांचें त्यांत हितच असतें. तस्मात् सर्व प्राण्यांना सर्व कर्मांचें फल देणाऱ्या ईश्वराच्या पदरीं अनिष्ट-कर्तृत्वादि दोष येत नाहीं, असे मानून ते आपली श्रद्धा दृढ ठेवतात. आस्तिकाच्या मतीं या लोकाप्रमाणें परलोकही आहे. यास्तव परलोकाची इच्छा करणाऱ्या त्यांची, त्याच्या उद्देशानें केलेलीं तीर्थस्नान, अग्निहोत्र, इत्यादि कर्में निष्फल नाहींत. कारण त्यांची भावना तीं सफल आहेत, अशीच असते, व म्हणून तीं सफल होतात. बौद्ध सर्व शून्यच आहे, असें म्हणतात. त्यांच्या समजुतीप्रमाणें तें सत्यच आहे. कारण त्यांच्या परिभाषेप्रमाणें प्रमाणच शून्य झाल्यावर प्रमेय ( प्रमाणाचा विषय ) शून्य आहे, अशी कल्पना होणें साहजिकच आहे. सारांश, राघवा, चिति चिंतामणीप्रमाणें अथवा कल्पवृक्षाप्रमाणें प्रत्येकाचा दृढ अभिलाष सत्वर पूर्ण करते. त्यामुळें शून्यही नव्हे व अशून्यही नव्हे, असा तिसराच कांहीं अनिर्वचनीय प्रकार आहे, असें म्हणणाऱ्या कांहीं वाद्यांचें मतही असत्य नव्हे. कारण सर्वशक्ति ब्रह्माची ती अनिर्वचनीय माया-शक्तिच आहे. तात्पर्य जो ज्या आपल्या निश्चयामध्यें दृढ असतो त्याला ता आत्म्याच्या अज्ञानापासून निवृत्त न झाल्यास तसेंच फल अवश्य मिळतें, अर्थात् जोंपर्यंत

आत्मसाक्षात्कार झाला नाहीं तोंवर सर्व सिद्धान्त सत्य आहेत. पण तो झाला कीं आत्माच एक सत्य असून बाकी सर्व भाव असत्य आहेत, असा निश्चय होतो. एवढ्यासाठींच उगीच विचार केल्यावांचून जो भेटेल त्याचा सिद्धान्त मान्य करूं नये. तर बुद्धिमानानें सर्वश्रेष्ठ वस्तूंविषयीं पंडिताशीं बसून विचार करावा व जो निश्चय रूढ होईल त्याचेंच ग्रहण करावें. अध्ययन व शुभ आचार याच्या योगानें भूषित झालेल उत्तम प्रज्ञावान् पंडित यद्यपि दुर्लभ असले तरी त्याचा अत्यंत अभाव आहे, असें मात्र समजूं नये. सच्छास्त्राचा व्यवहार करून तत्त्वज्ञानार्थ संवाद करणाऱ्या सज्जनाचें समाधान करणारा व निंद्य निषिद्ध आचरणानें रहित असा जो सत्पुरुष विरळा आढळेल त्याचाच आश्रय करावा. बाकीच्या लोकाचे निश्चय अगदींच व्यर्थ आहेत, असें आमचें म्हणणें नाहीं. उलट सर्व प्राणी आपापल्या निश्चयानुरूप फलास प्राप्त होत असतात, असाच आमचा सिद्धान्त आहे पण हितबुद्धीनें आमचें सर्वांना इतकेंच सांगण आहे की, बाबानो, शहाणे लोक नदींत उतरावयाचे असता जसे अगोदर एकच पाय बुडवून पाणी किती आहे तें पाहतात व थोडें किंवा पर्याप्त (बेताचें) आहे, असा निश्चय झाल्यावर दुसरा पाय बुडवितात त्याप्रमाणें वर सांगितलेल्या अनेक मतातील परम पुरुषार्थाचें साधन काय आहे, याचा अगोदर चांगला निश्चय करून नंतर सद्गुरु व सच्छास्त्र यांचा आश्रय करावा. अहो मुमुक्षु जनानो, सद्गुरु व सच्छास्त्र यांचा आश्रय करण्यास विलंब लावूं नका. कारण आयुष्याचा कांहीं विश्वास नाहीं. तुमचे दिवस पानावर पडणाऱ्या पावसाच्या थेंबाप्रमाणें तुम्हांला न कळतां कसे जात आहेत, तें पहा. विचार करा.

**श्रीराम**—भगवन्, भोगतृष्णा, अतिशय प्रबल आहे. त्यामुळें विरक्त मुमुक्षुच दुर्लभ असतात, आणि त्यांतल्या त्यांत आपण सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेले परमात्मतत्त्वसाक्षात्कारवान् तर अति दुर्लभच होत, असें मला वाटतें.

**श्रीवासिष्ठ**—रामा, खरें आहे. असले पुरुषोत्तम अति दुर्लभ आहेत. पण देव, असुर, मनुष्य, गंधर्व इत्यादि निरनिराळ्या जातींमध्यें ते असतातच. यास्तव त्याना शोधावें. बाबारे, बहुतेक सर्व मूढ मोहमहासागरां-

तील भोगतृष्णा कल्लोळाबरोबर तृणासारखे जरी वहात जात असले तरी त्यांतही कोठें कोठें सद्ब्राह्मण आढळतात. स्वर्गात देव आत्मस्थितीपासून च्युत होऊन भोगाग्नींत जळत असतात. मदोन्मत्त दानव भोगरूपी महा चक्रानें पराभूत होऊन घोर नारायणरूप महा गर्तेमध्यें पडले आहेत. गंधर्व आपल्या ठिकाणीं विवेकाचा लेशही आहेसा दाखवीत नाहींत. ज्याच्या मागें व्याध लागला आहे, अशा हरणाप्रमाणें ते गानलक्षण मदिरेच्या योगानें काम—लोभादि षड्रिपूंच्या तावडींत सापडून मृत्यूपुढून पळून जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. विद्याधर विद्यांच्या आधारानें मोहित होऊन ब्रह्मविद्यावान् उत्कट विवेक्यांचाही अनादर करितात. भय, ज्वर, उन्माद, इत्यादि दोष उत्पन्न करून ज्यानीं सर्व भूतलवासी जनाना क्षुब्ध करून सोडलें आहे असे यक्ष जणुं काय आपल्या देहाला स्थिर मानून मणि—मंत्रादि साहाय्यशून्य बाल, वृद्ध व आतुर यांच्या ठिकाणीं आपली दक्षता व्यक्त करितात. कामबल, शौर्य इत्यादिकामुळे हत्तीप्रमाणें मदोन्मत्त झालेल्या राक्षसाच्या शत्रुभूत हरीनें त्यांचा पूर्वी पुष्कळ क्षय केला आहे व पुढेंही करील. अर्थात् त्यांना त्याच्या प्रमादाचें फल प्रत्यक्षच मिळत आहे. पिशाच तर सदा क्षुधातुर असल्यामुळें सदा प्राण्यांना मारून खाण्याच्या चिंतेंतच असतात. त्याकारणानें त्याना विवेक करण्यास मुळीं अवकाशच मिळत नाहीं. नागाच्या जाती तर वृक्षांच्या मुळांप्रमाणें जड होऊन पाताळात शिरतात. कीटांप्रमाणें असुर बालकांना भूच्छिद्रच शरण आहे. त्याना विवेक कोठून स्फुरणार? रामा, याप्रमाणें बल, वीर्य, प्रभाव इत्यादिकाच्या योगानें सुसंपन्न झालेल्या देवादिकांमध्येही जर विवेक आढळत नाहीं तर मनुष्यादि इतर जीवामध्यें तो कोठून आढळणार? कारण दीन मानव तर मुंग्यासारखे क्षुद्र कणाकरितांही दिवसभर भटकत असतात. इष्ट वस्तूंच्या चिंतनामध्यें व्यग्र असलेल्या सर्व जीवांचा काळ व्यर्थ व दीर्घ दुरिच्छेनें जात असतो. जलांत पडून बुडणाऱ्या धुळीच्या कणाला जसा शुष्क कण मिळत नाहीं त्याप्रमाणें असल्या तृष्णामग्न जनाला विवेकाचा स्पर्शही होत नाहीं. सर्व जीव अभिमान, क्रोध, इत्यादिकांच्या योगानें विविध चेष्टा करीत असतात. राघवा, देवादिकांतील आत्मज्ञ काहीं थोडेसेच आहेत.

म्हणून त्यांचा येथें नामनिर्देश करितों. केवळ-यम, चंद्र, इंद्र, रुद्र, सूर्य, वरुण, वायु, हरि, ब्रह्मा, गुरु, शुक्र, व अग्नि-प्रभृति दुसरेही कांहीं, देव; दक्षादिक, कश्यपादिक, नारदादिक, कुमारस्वामी इत्यादि व सनकादिक हे देवपुत्र; हिरण्याक्ष, बलि, प्रह्लाद, शंबर, मय, वृत्र, अंध, नमुचि, इत्यादि दानव; बिभीषणादिक राक्षस, शेष, तक्षक इत्यादि नाग, हे आत्मज्ञ आहेत. कांहीं तुषित व साध्यही जीवन्मुक्त आहेत. बा रघुवीरा, मानवांमध्यें काहीं राजे व ब्राह्मणोत्तम मुनि जीवन्मुक्त संभवतात. पण ते सर्व विरल होत. कारण शाखा, पानें, इत्यादिकानीं भारभूत झालेले वृक्ष जसे पुष्कळ आढळतात, पण कल्पद्रुम फारसे व जेथें तेथे दिसत नाहींत, त्याप्रमाणे मोहयुक्त जीव दश दिशामध्ये भरले आहेत. पण त्यांत आत्मबोधवान् क्वचित्च भेटतात ९७.

**सर्ग ९८**—तत्त्ववेत्त्या महात्म्याचीं लक्षणें.

**श्रीवासिष्ठ**—जे विरक्त विवेकी परमपदीं विश्रांति पावतात त्याचे लोभ-मोहादि शत्रु उत्तरोत्तर क्षीण होत जातात. ते त्दृष्ट होत नाहींत; क्रोध करीत नाहींत; एकाद्या गोष्टीचा आग्रह धरीत नाहींत व भोग्यविषयांचा संग्रह करीत नाहींत. ते लोकांना उद्विग्न करीत नाहींत, स्वतः कोणाकडून उद्विग्न केले जात नाहींत, शरीराला अत्यत क्लेश देणाऱ्या पारलौकिक कर्मामध्येंही शुष्कवैदिकाप्रमाणें आग्रहानें प्रवृत्त होत नाहींत. परलोक आहे, असें जो म्हणतो तो आस्तिक व तो नाहीं असें जो म्हणतो तो नास्तिक होय. पण तत्त्वज्ञ, सामान्य वैदिकाप्रमाणें, यातील एकाही मताचा अधिक अभिमान धरीत नाहीं. तत्त्वज्ञानी महात्मे सुंदर व मधुर आचारण करितात. प्रिय व नम्र भाषण करितात. ते चद्रकिरणांप्रमाणें आपल्या संगानें इतरांस आह्लाद देतात. करण्यास योग्य असलेल्या लौकिक व वैदिक कर्माविषयीं संशय आला असतां ते तत्काल विवेचन करून संशयनिवृत्ति करितात. त्यांचें आचरण कोणालाही उद्वेग न होईल, अशा प्रकारचें असतें. ते सर्वांचे चतुर बांधवच होत. बाहेरून ते सर्वांसारखाच आचार करितात पण आंत अत्यंत शीतल असतात. ते शास्त्रार्थाचे मोठे रसिक, तज्ज्ञ, लोकांतील उच्चनीच भाव जाणणारे, त्याज्य व ग्राह्य यांस ओळखणारे, प्राप्त होईल तसें आचरण करणारे, विरुद्ध कार्यांपासून निवृत्त झालेले,

सज्जनांच्या मर्यादेंत स्थित असणारे, उपदेशानें अज्ञांच्या हृदयकोशांचें उद्धाटन करणारे, उत्तम आश्रयदान, सुखकर अन्नदान इत्यादिकांच्या योगानें प्राप्त झालेल्या याचकांची पूजा करणारे असतात. महात्मे लोक जनसमूहाचें चित्त आपल्या गुणानीं स्ववश करून घेतात. ते सर्वांचे पाप शांत करतात. शीतळ उद्यानादिकाप्रमाणें ते इतराना शीतल भासतात. वर्षाकालच्या मेघांप्रमाणें ते स्निग्ध असतात. ते राजांच्या राष्ट्रास उध्वस्त करणाऱ्या–दुर्भिक्ष,महामारी,परचक्र इत्यादि–क्षोभामुळें दुःखी झालेल्या जीवांच्या दुःखाचें-तपः प्रभाव, सत्कर्मानुष्ठान करविणें–इत्यादिकाच्या योगानें निवारण करितात. विपत्तीच्या वेळीं ते लोकाना उत्साह देतात व संपत्तीच्या वेळीं आनद देतात. त्यांचें भाषण वसत ऋतूंतील कोकिलाच्या आलापासारखें मनोहर असतें. समुद्राच्या तीरावरील पर्वतांप्रमाणें चित्तमहासागराचा सर्व क्षोभ सहन करण्यास साधूच समर्थ आहेत. आपत्ति, बुद्धिनाश, क्षुधा-तहान, शोक-मोह, जरा-मरण या सहा उर्मी, भूकंप, भयंकर संकटें, इत्यादि प्रसंगीं संतांची गति संतच होऊं शकतात. असो; रामा, या व अशाच दुसऱ्याही चिह्नावरून संतास ओळखून संसारमार्गानें जाता जातां थकलेल्या पुरुषानें अद्वय ब्रह्मामध्यें विश्रांति घेण्यासाठीं त्यातील एकाद्या उचित पुरुषाचा आश्रय करावा. कारण हा संसार-सागर अत्यंत कठीण आहे. या सत्संगरूपी नौकेवाचून त्याचें उल्लंघन करितां येत नाहीं. एकाद्या चिखलात रुतलेल्या किड्याप्रमाणें, जाऊं दे; मला विचार करून काय करावयाचें आहे ? माझें जें व्हावयाचें असेल तें होवो; असें म्हणून स्वस्थ बसूं नये. प्रयत्न करावा. रामा, वर सांगितलेल्या गुणातील एकही गुण ज्याच्यामध्यें असेल त्याचाही तेवढया गुणास उद्देशून व त्याच्या इतर दोषांकडे दुर्लक्ष्य करून, आश्रय करावा. बालपणापासूनच गुण व दोष यांचें विवेचन करावयास शिकावें. शक्य असेल तितकाच सत्संग व सच्छास्त्र यांच्याशीं परिचय करून अगोदर आपली बुद्धि वाढवावी. लोकांतील दोषांची उपेक्षा करून गुण घ्यावे. संतांची सेवा करावी. ज्याच्यामध्यें स्थूल दोष आहेत, अशा पूर्व परिजनांचा हळू हळू त्याग करावा. कारण त्यांच्या सहवासानें शुद्ध केलेलें चित्तही रागादिकांनीं कलुषित होतें. स्थिर विश्रांतिसुखही अस्थिर होतें. एकाद्या साधूनें दुष्ट होणें, हा महा उत्पात

आहे. पाप्यांशीं समागम केल्यास देश–कालवशात् महा अनर्थ भोगावा लागतो. यास्तव रामभद्रा, इतर सर्व कर्मे ( उपाय ) सोडून सज्जन–संगम करावा. हें एकच कर्म दोन्ही लोकांचें साधन आहे. सज्जनापासून दूर होऊं नये. विनय-संपन्न मनानें त्यांचें सेवन करावें. कारण त्यांच्या समीप राहणारास त्याच्यांतील गुण-पुष्पांचे रेणु स्पर्श करीत असतात ९८.

**सर्ग ९९**—कृमि, कीट, पतंग, तिर्यक् व स्थावर या योनींत उत्पन्न झालेल्या जीवाच्या संसार-भोगांचें वर्णन.

**श्रीराम**—भगवन्, आमच्या दुःखांचा क्षय करावयास शास्त्र, सत्संग, मंत्र, औषधि, तप, दान, तीर्थ, पुण्याश्रमवास, इत्यादि उपाय आहेत. पण कृमि-कीटादिकाची दशा काय होणार? त्यांच्या दुःखाचा क्षय कसा होईल?

**श्रीवसिष्ठ**—रामा, सर्व स्थावर व चर भूतें आपापल्या योग्य भोगोचित सुखसत्तेमध्यें विश्रांति घेत राहिलीं आहेत. म्हणजे त्या त्या योनींस भोग्य असलेल्या विषयापासून होणाऱ्या सुखलेशालाच महापुरुषार्थ समजून तेवढ्यानेंच ते कृतार्थ होतात. रामा, मी तुला फार काय सागूं पण प्रायः सर्व जीव त्या क्षुद्र सुखाच्या आशेनेंच पुष्कळ दुःखेंही सहन करून जिवंत राहतात. अरे बा सज्जना, अगदीं अणुमात्र शरीरानें युक्त असलेल्या क्षुद्र जीवानाही आमच्या प्रमाणेंच त्याच्या त्यांच्या योनीस उचित अशा सुखभोगाची इच्छा असते. आम्ही त्या भोगाविषयीं अल्प आस्था ठेवतों व आम्हाला विघ्नेंही थोडींच येतात. पण त्यांच्यामध्यें मोह-काम इत्यादिकांचें प्राबल्य असल्यामुळें व विवेकाचा अभाव असल्यामुळें त्याची विषयास्था अतिशय दृढ असते व त्याना विघ्नेंही फार येतात. त्यांची भोगास्था आमच्याहून अधिक असतेच म्हणून कशावरून, असें विचारशील तर सागतों—ते भोगाकरिता आम्हाहून अधिक प्रयत्न करीत असतात, असें आढळतें. त्यावरून त्यांच्या अधिक आस्थेचें अनुमान होतें. सर्व ब्रह्मांड हें ज्याचें शरीर आहे, असा हिरण्यगर्भ जीव आपला अधिकार चालविण्यासाठीं नानाप्रकारच्या चेष्टा करून आपल्या भोगांकरितां जसा प्रयत्न करीत असतो त्याप्रमाणें केसाच्या अग्राएवढा ज्याचा देह आहे, असा–ऊ, ढेंकूण, कृमि इत्यादि जीवही स्वसुखार्थ यत्न करतो. तेव्हां अहंकाराचा खेळ कसा आहे, तो पहा. पक्षी निराधार आकाशांत

उत्पन्न होतात व मरतात. त्यांचा विषय वस्तुतः जरी शून्य असला तरी त्यांना प्रयत्नराहित्यरूप स्थैर्य एक क्षणभरही मिळत नाहीं. मुंग्यांसारखे जीव अल्पशा ग्रासाकरितांही कसे प्रयत्न करीत असतात, तें पहा. म्हणजे त्यांची भोगास्था अधिक आहे कीं नाहीं तें तुला कळेल. आमचा एवढा मोठा दिवसही त्याना एकाद्या क्षणाप्रमाणें अपुरा वाटतो. तिमि या नांवाचा एक अतिशय सूक्ष्म कृमि आहे. पण त्याची गमनाविषयींची व्यग्रता गरुडासारखी दिसते. मनुष्य व कृमि यांचे देह व भोग्य पदार्थ यांच्या ठिकाणचे अहं व मम हे अध्यास समान असतात. विषयास्थेनें सर्व आयुष्याचा क्षय करणें, हा सुद्धां सर्व जीवांचा समान धर्म आहे. वृक्ष अर्धे जागे असतात. पाषाणादि घन निद्रेंत असतात. व कृमि–कीटादि बाकीचे सर्व जीव स्वप्न व जागर याचा अनुभव घेतात. शरीर असेपर्यंत आपल्याला महा सुखी समजणारे कृमि-कीट-स्थावरादि प्राणी आमच्याप्रमाणेंच मरण हेंच महा दुःख समजतात. शरीरात प्राण असणें हेंच त्यांचें जीवन होय. आम्हास भोग्य असलेल्या व त्यास भोग्य नसलेल्या गृह-रत्नादि वस्तूंस ते उदासीन दृष्टीनें पाहतात. आमच्या प्रमाणेंच त्यानाही संसार सुखदुःखद वाटतो. पदार्थांचा उत्कर्ष व अपकर्ष यांचें भान नसल्यामुळें त्याना आम्हाप्रमाणें वस्तूचे गुण, क्रिया व उपयोग मात्र कळत नाहींत. विकलेले मानव व पशु याच्यामध्यें पारतंत्र्य, स्वदुःख मुकाट्यानें सोसणें, सुखाची फारशी आशा न करणें इत्यादि गोष्टींत साम्य आहे. निजत असलेल्या आम्हाला ढेंकूण, मच्छर, इत्यादि चावूं लागले असता जसा त्रास होतो तसाच त्रास कोवळ्या वृक्षादिकांना कीटादिकांच्या दंशानें होत असतो. पण तेवढा तो काल सोडून बाकीच्या वेळीं वृक्ष घन निद्रेंत असतात. दरवडा, आग, पूर, इत्यादि उत्पातांच्या वेळीं जीव घेऊन पळणाऱ्या आम्हाला जशी सर्वतः शंका व भय वाटत असतें त्याप्रमाणें पक्ष्यादिकांचें आयुष्य नेहमीं भयभीत दशेंत जातें. पण तोच चित्तविक्षेप सोडला कीं इंद्र व कीट याचें सुख एकसारखेंच होतें; तथापि संकल्पामुळें प्राप्त होणारा चित्तविक्षेप दुर्लंघ्य आहे. त्यामुळेंच हें सर्व दुःख! इंद्रादि-कृमीपर्यंत जीवाचें या संकल्पशून्य सुखाप्रमाणें राग द्वेष-भय-आहार-मैथुन

इत्यादिकांपासून होणारें सुख व दुःखही समान आहे. जन्म, मरण इत्यादि प्रसंगीं होणारा खेद सर्वांचा सारखाच. मनुष्यादि उच्च जीवाना जसें पदार्थांचें भूत, वर्तमान व भविष्यत्-कालसंबंधी ज्ञान असतें तसें तें मनुष्यांच्या खालच्या जीवांस नसतें, एवढेंच काय तें त्यात अंतर आहे. सामान्य पाषाणरूप जीव सुषुप्तिस्थ वृक्षांची गाढ-मूढ स्वसत्ता अनुभवितात व हिमालय, मेरु इत्यादि जे तत्त्वज्ञ पर्वत आहेत ते अखंडित चिदाकाशाचा अनुभव घेत सदा समाधींत स्थित असतात.

राघवा, यावरून असें ठरतें—वृक्षादि गाढ निद्रेंत असल्यामुळे त्याच्या दृष्टीनें जगाची कल्पना नाहीं. पर्वतादि जीव स्वसत्तेंत स्थित असल्यामुळें त्याच्या दृष्टीनेंही ती नाहीं. जंगमजातींतील तत्त्वज्ञ चिदाकाशमात्र होऊन रहात असल्यामुळें त्याच्या दृष्टीनेंही जग नाहीं. बाकी राहिलेल्या काहीं थोड्याशा अज्ञ जंगमजातीच्या जीवाच्या दृष्टीनेंच तें आहे. पण अज्ञाची दृष्टि पुष्कळांच्या अनुभवाविरुद्ध असलेल्या जगाची सत्ता सिद्ध करण्यास ती समर्थ नसते. अज्ञ जंगम जीवानांही सुषुप्ति, मूर्च्छा, समाधि इत्यादि अवस्थेंत जग भासत नाहीं. तेव्हा स्वप्न व जागर या दोनच दशेंत व काहीं अज्ञांना मात्र भासणारें जग सत्य कसें असणार व तें सर्वांच्या दृष्टीनें सदा सिद्ध असलेल्या चिदाकाशरूपच कसें नव्हे ? अज्ञाच्या दृष्टीनेंही स्वतत्त्वाचें ज्ञान होई तोंच जग असतें. तत्त्वज्ञानानंतर अहं, त्वं ( मी, तूं ) इत्यादि कांहीं नाहीं. अर्थात् अशा प्रकारे जगाची असत्ताच ठरत असल्यामुळें त्याचा निरास केल्यावर ब्रह्म अवशिष्ट राहतें. तें ब्रह्म जगाच्या उत्पत्तीपूर्वी जसें होतें तसेंच आता आहे व जगाचा बाध किंवा कल्पान्तानें नाश झाल्यावरही तसेंच राहील. त्यामुळें त्या महाभूतामध्यें आत्मता, परता, जगत्ता, शून्यता, मौनता, इत्यादि काहीं नसतें. यास्तव तूं जसा आहेस तसाच रहा. मीही जशाच्या तसाच राहिलों आहें. या शांत पर आकाशांत सुख व असुख नाहीं. परमाकाशतेला सोडून या स्वप्ननगरात काय आहे, सांग. सदा स्थित असणाऱ्या परम आकाशतेला न जाणणें हाच महा अपराध असून, तें अज्ञानच जगद्भ्रम पाडणारें आहे. जगत्स्वप्नाला ओळखलें म्हणजे सत्य कांहीं रहात नाहीं. विज्ञानदृष्ट्या सर्वांचा बाध झाला म्हणजे उदार बुद्धिमानाला थोडेसेंही दुःख नसतें. तर मग अज्ञाला

मरणादि दुःख कसें होतें, म्हणून विचारशील तर तें आम्हांला माहीत नाहीं. मृगजलांत संचार कसा करावयाचा, हें जसें त्या जळांतील माशालाच ठाऊक तसें मरणादि दुःख कसें असतें तें त्या अज्ञालाच ठाऊक. सारांश, अहं, त्वं इत्यादि रूपानें आंत व बाहेर तें एक चिदाकाशच विलसत असतें ९९.

**सर्ग १००**—देहात्मवाद्यादिकांच्या मतामध्यें ज्याची मति निमग्न झाली आहे, त्याला तत्त्वामध्यें आणण्याची युक्ति.

**श्रीराम**—भगवन् , 'देहच आत्मा आहे, यास्तव जोंवर जिवांत जीव आहे तोंवर सुखानें रहावें. कारण मृत्यूच्या तावडांतून सुटेल, असा कोणी नाहीं, व एकादा भस्म झालेल्या देहाचें पुनरागमन कोठून होणार?' असें ज्याचें मत आहे, त्या देहात्मवाद्याच्या सांसारिक दुःखाची शांति कोणत्या युक्तीनें होणार ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, प्राण्याची संवित् आपल्यामध्यें जो जो अखंडित निश्चय धारण करते त्याचा त्याचाच सर्वत्र अनुभव घेते. जसें हें आकाश सर्वगत व शांत आहे, तसेंच चिदाकाश सर्वगत व शांत आहे. तेंच ऐक्य व द्वैत आहे. कारण त्यावांचून दुसरें कांहींच संभवत नाहीं. ते कसें म्हणून विचारशील तर थोडक्यांत सांगतों. महाप्रलयरूप सर्गाच्या पूर्वकाळीं त्याच्यावांचून दुसरा कांहीं पदार्थ नव्हता. त्या ( ब्रह्म ) चें कारण कांहीं असेल म्हणून म्हणावें तर तें अकरण आहे. यास्तव प्रलयसमयीं सर्वत्र ब्रह्मच पसरलेलें असतें.

**श्रीराम**—पण भगवन् , मीमांसक मुळीं ब्रह्मरूप महाप्रलयच मानीत नाहींत. तर बीज-अंकुर इत्यादिकांची परंपराच अनादि असल्यामुळें पृथिवीप्रभृति पदार्थांनाही अनादित्व आहे. म्हणून हें जग अनीदृश ( असें नाहीं असें कधींही ) नाहीं. तर तें सदा असेंच असतें, असें ते कर्मजड मानतात !

**श्रीवसिष्ठ**—होय; तें खरें. पण सर्व वेदवाक्यें व शास्त्रें यावरून सिद्ध होणारा प्रलय, जीवांचा ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष, त्यांचीं साधनें इत्यादि जे मानीत नाहींत ते शास्त्रशून्य होत व त्यामुळेंच आमच्या दृष्टीनें ते मृततुल्य आहेत. शास्त्रशून्य कसे म्हणून विचारशील तर सांगतों-त्यांनीं प्रलय, मोक्ष

व मोक्ष-साधनें यांना न मानून ज्ञानशास्त्राला अप्रमाण ठरविलें, म्हणजे त्याचें कर्म-शास्त्रही अर्थात्च अप्रमाण ठरतें, व त्यामुळें ते शास्त्र–शून्य होतात. यास्तव ते तत्त्वोपदेश व तत्त्ववार्ता यांस योग्य नसतात. ज्यांचे देहेंद्रियांस सर्व व्यवहारात नियुक्त करणारें प्रत्यगात्म-चैतन्य ( किंवा मन ) सर्व शास्त्रांशीं अविरुद्ध असलेलें हें सर्व ब्रह्मच आहे, अशा दर्शनानें पूर्णकाम होऊन राहतें त्यानाही तत्त्वोपदेशाचा कांहीं उपयोग नाहीं. कारण ते कृतकृत्य झालेले असतात. यास्तव जिज्ञासूंकरितांच उपदेश-कथेचा आरंभ केलेला असतो. असो;

तात्पर्य, रामा, ज्याच्या अंतःकरणांत जशाप्रकारची संवित् सतत उद्भवते तन्मय पुरुष होतो. मग देह असो कीं नसो. अर्थात् चार्वाकाच्या देहात्म-वादालाही आमची संवित्च कारण आहे. जड देह नव्हे. म्हणूनच आनंद-एकरस आत्म्यालाही विरुद्ध दुःखित्व भावनेनें दुःखमयता प्राप्त होते, आणि दुःखमय जगत्ही आनंद-आत्ममय आहे, असें दृढ भावनेनें जाणल्यास तें आनंदरूप होतें. ज्याना एक आत्म्याचा निश्चय झाला आहे, त्याना सुखें व दुःखें लिप्त करीत नाहींत. आपापल्या दृढ निश्चयाप्रमाणें वस्तूचा अनुभव येतो; हें जरी खरें असलें तरी एवढयावरून चित्तवृत्तीचें सत्यत्व अथवा असत्यत्व ठरत नाहीं. कारण देहच आत्मा आहे, असें जोंवर वाटत असतें तोंवर ती सत्य नसते व ब्रह्मसाक्षात्कार अवस्थेंत ती असत्य नसते, तेव्हा अशा या अज्ञ व ज्ञानी यांच्या अनुभवावरून सिद्ध होणाऱ्या गोष्टींचा अपह्नव कसा कोण करणार? म्हणूनच सर्व वाद्याच्या त्या त्या इष्ट मताप्रमाणें वेष धारण करण्यास समर्थ असलेली संवित्च आत्मा आहे. असा सर्वां ( वाद्या ) स बोध करून कृतार्थ करिता येणें शक्य आहे. कारण चार्वाकांना मान्य असलेला देह साख्याना अभिमत असलेला पुरुष व मीमासकास इष्ट असलेला भोक्ता जीव संवित्हून पृथक् केल्यावर उपलब्ध होत नाहीं. यास्तव वाद्यांच्या या असल्या कल्पनांस कारण होणारी संवित्च सर्व कांहीं आहे. ती सत्य किंवा असत्य कशीही जरी असली तरी तिच्यामुळेंच देहाचा अनुभव स्वतंत्रपणें ( नुस्त्या आपल्या कल्पनेनें, पृथ्वीप्रभृति कारणांच्या अपेक्षेनें नव्हे, ) येतो. यास्तव पुरुष ( आत्मा )

संवित्-मय आहे, असें आमचें म्हणणें आहे व सर्वमतें त्याच्या आधारानेंच रूढ होत असल्यामुळें त्याच्याप्रमाणेंच तींही सत्य आहेत. आत्म्याच्या आधारावर कल्पिलेल्या त्याना आत्म्याच्या प्रभावानेंच भावनेप्रमाणें फल, हें अर्थक्रियाकारित्व आहे. साराश कोणताही वादी अथवा कोणतेंही मत आमच्या एकरूप संवित्-ला सोडून स्वतः राहूं शकत नसल्यामुळें अद्वैतच सत्य आहे. आत्मवादच सर्व वादाचा मुकुटमणि आहे. कोणी कांहीं जरी म्हटलें तरी त्याचें प्रत्येक म्हणणें या आमच्या आत्मवादावरच उपजीविका करणार, हें तूं निश्चयानें जाण. एक व नित्य पुरुषार्थ या वादाचा आश्रय केल्यानेंच मिळतो.

**श्रीराम**—भगवन्, तर मग काय संवित्-च निरनिराळ्या वाद्यांना अभिमत असलेल्या देहादिकाच्या आकारानें त्याच्या निश्चयानुसार परिणाम पावते ?

**श्रीवसिष्ठ**—नाहीं. असें होणें शक्य नाहीं. कारण आत्मरूप संवित् निर्विकार आहे. यास्तव तिच्यामध्यें असलेली जी स्वाभाविक अविद्या तीच त्या त्या वाद्याच्या कल्पनेप्रमाणें परिणाम पावत असते. पण तीच तत्त्वबोधरूपानें परिणाम पावली असतां निर्मल शुद्ध चिदाकार होते व त्यामुळेंच ती मोक्षफलास पात्रही होते. राघवा, असा प्रकार असल्यामुळें पुण्य देश, काल, इत्यादिकामध्यें स्नान, दान, क्रिया; रसायन, मंत्र, औषध, इत्यादि द्रव्यें; कर्मशास्त्रबोधित स्वर्ग, पशु, पुत्रादि एषणाश्रम; याच्या योगानें ती अबोधिता ( अविद्या ) व तिच्यामुळें उत्पन्न झालेला विक्षेप कधींही शांत होत नाहीं. आता तूं कदाचित् म्हणशील, कीं, ज्ञानानें जरी तिचा नाश होत असला तरी स्वभावरूप बीजभाव असल्यामुळें तिचा पुनः आविर्भाव होईल. पण तें बरोबर नाहीं. कारण बोधसूर्यानें जिचा अत्यंत बाध केला आहे तिचाच पुनः आविर्भाव होतो, असें म्हटल्यास जीवाचें दुःख कसें शांत होणार ? कारण संवित्च जीवाचा जीव आहे. तो आपल्या दृढ भावनेप्रमाणें सुखी अथवा दुःखी होत असतो, हा निश्चय आहे. यास्तव प्रत्यगात्मरूप संवित्च तत्त्वतः ज्ञात झाली असता आपल्या बंधसंज्ञक कार्याचें निवारण करते. यास्तव तीच सर्व मुमुक्षूना आश्रय करण्यास योग्य आहे. कारण तिचा

अभाव होतो, असें म्हटल्यास सर्व जगांत अंधकार पसरण्याचा प्रसंग येईल, मग मोक्षाची आशा करावयास नको.

**श्रीराम**—गुरुराज, मीमांसकांच्या मताप्रमाणें हें जग नित्य आहे, असें निश्चयानें जाणणाऱ्या लोकांना तत्त्वज्ञानाचा उपदेश करिता येईल, अशी कांहीं युक्ति आहे कीं नाहीं ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, अशा निःशास्त्र पुरुषाशीं भाषणही करूं नये, हें मी वर सांगितलें आहे. तोच त्यांना ज्ञानमार्गामध्यें उतरविण्याचा उपाय आहे. कारण नुस्त्या उपदेशानें ते कांहीं ऐकणार नाहींत. तर त्यांच्याशीं भाषण करावयाचें सोडलें म्हणजे कदाचित् ते तत्त्वाचा विचार तरी करूं लागतील व कालांतरीं तरी त्यांना सद्बुद्धि होईल. अथवा त्याचा त्याचा निश्चयही संवितला सोडून नाहीं, अशी त्याची समजूत घालून त्याला ज्ञानमार्गामध्यें आणावें, अथवा हे रामा, तो पुरुष देहातिरिक्त चेतनात्मवादी आहे, कीं नित्य आतिवाहिक देहालाच आत्मा समजणारा आहे, कीं स्थूल देहालाच आत्मा समजणारा आहे, कीं शुद्ध संवित्‌ला आत्मा म्हणणारा आहे, कीं अज्ञानावृत संवित्‌ला आत्मा म्हणून स्वस्थ राहणारा आहे, कीं संवित्‌चा अपलाप ( म्हणजे ती नाहींच ) असें सांगणारा आहे ? तो जर चिदाभासरूप आहे, असें मानणारा असेल तर त्याला क्रमानें आत्मतत्त्वाचा अनुभव होईल. कारण तो चिदात्मवादी देहादि आकाराचा नाश झाल्यावर अद्वैत जरी तोंडानें मानीत नसला तरी परमात्म्याला जाऊन मिळेल, यांत संशय नाहीं. अन्नमय देहाला आत्मा म्हटल्यास सर्वतः विनाशाची शंका येऊन दुःख होईल. पण आत्मा अविनाशी आहे, असें जाणल्यावर नुस्ता तो देहाकार परिणाम पावला आहे, असें म्हणणें, या एवढ्याच अपराधानें त्याला कांहीं दुःखी होण्याचा प्रसंग येणार नाहीं, व त्याला बोध केल्यास तोही लवकरच उमजेल. देहालाच आत्मा समजाणारा प्रायः स्थूलबुद्धि असतो. त्याला नाश पावणारे इतर पदार्थ दाखवून, जें सावयव असतें तें अवश्य विनाशी असतें, असें समजवावें. म्हणजे कांहीं कालानें तोही देहातिरिक्त आत्म्याचा निश्चय करूं शकेल. शुद्ध संवित्–लाच आत्मा समजणारा जीवन्मुक्त सर्वदा सर्वत्र लीलेनें जगत् पाहतो, व मरणानंतर कैवल्यास प्राप्त होऊन

पुनः संसारास पाहत नाहीं. जी संवित् तत्त्वज्ञानानें शुद्ध झालेली नसते, ती बीजभावाचा नाश न झाल्यामुळें अवश्य संसार करते. पण तो करतां करतां शेवटीं एकाद्या जन्मात तरी ज्ञानोदय होऊन अज्ञानाचा निस्तार होणें शक्य आहे. पण संवित् नाहींच, असें म्हणून तिचा जो अपलाप करीत असेल तो मात्र दीर्घकाल पाषाणासारखा जड होऊन राहील. मरणपर्यन्त दृढ केलेल्या स्वसंकल्पाप्रमाणें देहपातानंतर त्याचें चित्त नष्ट होऊन त्याला गाढसुषुप्तीसारखी दशा प्राप्त होते. नैयायिकांनीं मानलेल्या मोक्षासारखी ती दशाच त्याना परम कल्याणकर आहे. कारण तिच्यामध्यें दुःखानुभव नसतो.

राघवा, शून्यवादी बौद्ध आत्माच नाहीं, असें म्हणणारे असतात. ते मेल्यावर शरीररहित व जड होऊन भयंकर आध्यभावाचा अनुभव घेतात. विज्ञानवादी बौद्ध जग क्षणिक विज्ञानमय व म्हणूनच स्वप्नतुल्य आहे, असा निश्चय करितात व त्याप्रमाणें मरणोत्तर क्षणिक व विकारी चिदात्मभूत होतात. जगाला स्थिर म्हणणारे व अस्थिर (क्षणिक) समजणारे असे दोन्ही प्रकारचे लोक जर सुखदुःखादि भोगरूप व्यवहार सारखाच करितात तर मग त्याला नित्य किंवा अनित्य म्हणण्याचा उपयोग काय? आतां तत्त्ववेत्त्या-विषयीं विचारशील तर तो पृथ्वीप्रभृति भूतें स्थिरच आहेत किंवा क्षणिक आहेत, असा आग्रह धरीत नाहीं. कारण अध्यस्त जग अधिष्ठान सत्ता-मात्र असल्यामुळें, भ्रमानें भासलेल्या रुप्याच्या किंमतीची चर्चा करण्याप्रमाणें भूतादिकांच्या स्थिरत्वादिकांविषयींची चर्चा करणें व्यर्थ आहे, असें तो सम-जतो. सारांश रामा, हीं भूतें व शरीरें कूटस्थ चैतन्यापासून विवर्त-रूपानें झालेलीं आहेत, असें जाणणारेच पुरुष वंद्य आहेत. कारण चित्-वाचून या सृष्टींत दुसरें कांहीं सार नाहीं. पण हें अति गूढ तत्त्व मान-मोहादि दोषांनीं रहित असलेल्या सत्पुरुषांनाच मात्र कळतें १००.

**सर्ग १०१**—ज्ञान्याची अभयस्थिति.

**श्रीवसिष्ठ**—रामा, येणेंप्रमाणें सर्व चिन्मात्र आहे. ज्या नास्तिकांना आत्मा मान्य नसतो त्यांनाही राग-द्वेष-सुखादि अनुभव असतोच! तेव्हां आत्मा या नांवानें जरी अनुभवाला त्यांनीं ओळखलें नाहीं तरी संवित्-चा अपलाप त्यांना करतां येत नाहीं. संवित्च आमचा आत्मा आहे, व तो

नित्यही आहे. कारण त्या ज्ञानाचाही अभाव होतो असें जरी म्हटलें तरी त्याला जाणणार कोण? असो; त्याच्याविषयीं अनेकांनीं अनेक कल्पना आपापल्या बुद्धीप्रमाणें केल्या आहेत. पण त्यामुळें आमच्या चिदात्म्याची कांहीं हानि नाहीं. देहाच्या वृद्धि-क्षयादिकांनीं त्याची वृद्धि किंवा क्षय होत नाहीं. वस्तुतः जीर्ण देह सोडून नवा देह घेणें हेंच मरण आहे. पण तसल्या आनंदाच्या प्रसंगींही आत्म्याची नित्यता न जाणणारे मूर्ख रडतात; तेव्हा त्याना आता काय सांगावें? ज्याच्या मतीं पुनर्जन्मच नाहीं त्याना तर शोक मुळींच करावयास नको. कारण त्याच्या सर्व अनर्थांचा क्षय त्याच्या मरणानेंच होत असतो, आणि जन्म-मरण-भाव सत्य आहेत, असें मानून सुद्धां जर याप्रमाणें दुःख करणें अयोग्य आहे, तर त्याना अत्यंत असत् ( मिथ्या ) मानणाऱ्या आम्हांला तें योग्य कसें होईल? मरणानंतर दुसरा देह अवश्य प्राप्त होतो व त्याकरिता मरणाची भीति वाटते, म्हणून कोणी म्हणेल तर तें युक्त नव्हे. कारण मरण म्हणजे देहनाश, तो होताच त्यातील रोगादिकाचा नाश होऊन दुसरा नवा, नीरोगी देह प्राप्त होतो, हें जर निश्चित आहे, तर मरण हा महोत्सवच आहे, असें समजलें पाहिजे. कारण जुन्या वस्तूबद्दल नवी वस्तु मिळाल्यास त्यात दुःख करण्याचें कांहींच कारण नाहीं. कुकर्माची भीति वाटते म्हणून म्हणाल तर तीं करूंच नयेत, म्हणजे झालें. अरे बा जना, तूं नेहमीं मी मरेन, मरेन, मरेन म्हणून जप करीत असतोस. पण त्याच बरोबर होईन, होईन, पुनः होईन, असा जप का करीत नाहींस? हे सर्व सज्जनांनो, जन्म, मरण, संसारभूमि इत्यादि आहेत कोठें? हें सर्व चिदाकाश आहे. यास्तव तुम्ही उगीच कल्पना करूं नका. केवळ ममता सोडून खानपानादि अवश्य व अनिषिद्ध व्यवहार करा. तत्त्वज्ञ आकाशाच्या उदराप्रमाणें स्वच्छ असतो. तेव्हा त्याच्या ठिकाणीं इच्छादिक कोठून संभवणार? त्याला मरणामुळें दुःख होत नाहीं व जीवितापासून सुख होत नाहीं. तो सर्व सांसारिक भावना तृणाप्रमाणें तुच्छ समजतो आणि निर्भय व वासनाशून्य होऊन राहतो १०१.

**सर्ग १०२—तत्त्वज्ञांचीं लक्षणें.**

**श्रीवसिष्ठ—**रामा, ज्याला ज्ञेय कळलेलें असतें तो पुरुषोत्तम याव-

जीव कसें आचरण करतो तें मी आता सांगतों ऐक. पाषाणही त्याचे मित्र होतात. वनातील वृक्षही बाधवांप्रमाणें भासतात. वनांत राहणाऱ्याही त्याचे हरिणांची पोरें, हे स्वजन बनतात. जेथें अनेक लोकांचा संघ जमलेला असतो ते स्थान त्याला शून्य भासतें. त्या आत्मनिष्ठाला संपत्ति विपत्तींसारख्या वाटतात. महाराज्यावर स्थित असलेल्याही त्याला संकटें हेच मोठे उत्सव आहेत, असें भासते. तो समाधि लावून बसलेला नसला तरी समाधानवान् असतो. दुःखालाच मोठें सुख म्हणतो. वाणीनें शब्द-व्यवहार करीत असतानाही मौनापासून ढळत नाहीं. शरीरानें प्राप्त कर्में करणें हीच त्याची अकर्मता आहे. तो जागत असला तरी निजलेलाच असतो. जीवंत असतानाही मृतोपम असतो, सर्व आचार करीत असूनही तो बुद्धिपुरःसर काहीं करीत नाहीं. तो आत्मानंदाविषयीं रसिक असूनही विषयसुखाविषयीं अत्यंत विरस, ममतारहित असल्यामुळें निर्दय असूनही आत्मदृष्ट्या सर्वांवर स्नेह करणारा, द्वैताला न पाहिल्यामुळें निर्दय असूनही, आपल्या देहाच्या उपमेनें दुसऱ्याच्या देहादिकांतही सुख–दुःख पहात असल्यामुळें, अत्यंत दयाळु, स्वतः पूर्ण असल्यामुळें निस्तृष्ण, व अज्ञजनांचा उद्धार करण्याचा त्याचा स्वभाव असल्यामुळें त्याच्या हितेच्छेनें युक्त, लोकसंग्रहार्थ आचार करीत असूनही स्वतः सर्व आचार-रहित, स्वतः शोक–भय–आयासरहित असूनही अज्ञजनांचें दुःख पाहून सशोकसा होणारा, असा असतो. त्याच्यापासून लोकांना उद्वेग होत नाहीं व त्याला कोणाचा उद्वेग वाटत नाहीं. स्वतः आत्मरसाविषयीं अतिशय रसिक असूनही ससारास भिणारा तो प्राप्त झालेल्या इष्ट वस्तूचें अभिनंदन करीत नाहीं व अप्राप्त वस्तूची इच्छा करीत नाहीं. विषयानुभव घेत असतांनाही तो हर्ष व विषाद करीत नाहीं, तो दुःखितामध्यें दुःखितासारखा बोलतो; सुखितांमध्यें सुखितासारखा भाषण करतो व सर्व अवस्थामध्यें सहिष्णु होऊन राहतो. सुकृत कर्मावाचून त्याला दुसरें काहीं आवडत नाहीं. अशास्त्रीय आचरण सोडणें हा महात्म्याचा स्वभावच आहे. ज्ञानी पुरुष फारसा कशाचा रसिक होत नाहीं व अरसिकही होत नाहीं. विषयामध्यें विषयेच्छेनें संचार करीत नाहीं. यथाशास्त्र व्यवहार करीत असल्यामुळें प्रसंगोपात्त सुख–दुःखाना तो जुमानीत नाहीं. स्वकीय धनादि व

पुत्रादि विषयांवर पाण्यावरील बुडबुड्यांप्रमाणेंच तत्त्वज्ञांची आस्था नसते. तो आतून निःस्नेह असूनही बाहेरून स्नेहवान् असल्यासारखा भासतो. कारण त्याचा स्वभावच वत्सल बनतो. अज्ञ जन कामादिकानीं देह संतप्त झाला आहे, असें पाहून विषयामध्यें अतिशय आसक्ति ठेवून राहतात. असें केल्यानें आमचा संताप शांत होईल, अशी त्यांना मोठी आशा असते, पण अनासक्तीनें विषय भोगणें, ही युक्ति त्यांना अवगत नसल्यामुळें ते शांतीच्या ऐवजीं दुःखच भोगतात. असो, रामा, तत्वज्ञ महात्मे बाह्यतः सर्व करीत असले तरी आंतून कांहीं करीत नाहींत.

**श्रीराम**—पण अहो मुनिवर्य, या लक्षणानीं युक्त असलेल्या तत्त्वज्ञाचा परिचय होणें, फार दुर्घट आहे. कारण मूर्ख, दांभिक व वंचक तापसांमध्येंही हठानें संपादन केलेलीं हीं चिन्हें आढळतात. कुटिलबुद्धि पुरुष मान, द्रव्य, कीर्ति इत्यादिकांच्या लोभानें विद्वान् तत्त्वज्ञाच्या या सर्व लक्षणांचें अनुकरण करितात. तेव्हां खऱ्या तत्त्वज्ञाचें स्वरूप कसें कळेल, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, दंभानेंच का होईना, पण या लक्षणानीं जो भूषित झालेला असेल त्याला पूज्यच समजावें. कारण हीं महालक्षणें कोणी कुटिल बुद्धीनें जरी आपणामध्यें आणलीं तरी त्यांचा परिणाम नेहमींच शुभावह होत असल्याकारणानें त्यांना अवश्य मान द्यावा. शिवाय अशा ढोंग्याचें अनुकरण करतां करतां एकादे वेळीं एकाद्या स्वभावसिद्ध लक्षणसंपन्न पुरुषाचीही दैववशात् गांठ पडण्याचा संभव असतो. शिवाय दांभिक व तत्त्ववेत्ता यातील भेद स्थूलदृष्टि पुरुषाला जरी न कळला तरी विचारवानास सहज कळण्यासारखा असतो. सर्पाचा मार्ग जसा सर्पानाच दिसतो त्याप्रमाणें तत्त्वज्ञ दुसऱ्या उदार व पवित्र तत्त्वज्ञास तत्काल ओळखतात. तत्त्वज्ञ व दांभिक यास ओळखण्याची युक्ति ठाऊक असली म्हणजे त्याचें ज्ञान होणें फारसें कठिण नसतें. दांभिक आपल्यांतील महालक्षणें प्रकट करण्याची इच्छा धरितात व तत्त्वज्ञ तीं गुप्त ठेवण्याची खटपट करितात. कारण भाजीच्या दुकानांत चिंतामणि विकावयास कोण ठेवील! व जर कोणी एखाद्या मूर्खानें तो ठेविला तर ग्राहक हा खरा चिंतामणि नव्हे, तर त्याच्यासारखा दिसणारा दगड आहे, असें निःसंशय

समजतील कीं नाहीं! त्याचप्रमाणें आपले गुण प्रगट करणें, या चिह्नावरूनच दांभिकास व खऱ्या रत्नाप्रमाणें त्यास लपवून ठेवणें, या लक्षणांवरूनच तत्त्वज्ञास ओळखावें. रामा, तत्त्वज्ञ वासनाशून्य, द्वैतरहित व मानरहित असतात. त्याना आपल्या ख्यातीची मुळींच इच्छा नसते. कारण ख्याति, मान, धन, इत्यादिकाची समृद्धि झाल्यास जनसमाज, अभिमान इत्यादि अनेक अनर्थांच्या योगानें विक्षेप होऊन आत्मसुखानुभवात विघ्न येतें व तें तर त्याना अगदीं अनिष्ट असतें. यास्तव रामा, खऱ्या तत्त्वज्ञाला एकात, अमान, दुर्गति, जनाची अवज्ञा इत्यादि जसें सुख देतात त्याप्रमाणें महा ऋद्धि सुख देत नाहींत. शिवाय तत्त्वसाक्षात्कार इतर सर्व साक्षात्काराप्रमाणेंच स्वसवेद्य असतो यास्तव त्याचा नुस्ता अनुभव घेणेच योग्य आहे. तो दुसऱ्याला दाखविता येण्यासारखा नाहीं. यास्तव माझा हा गुण लोकाना कळावा व त्यानीं माझी पूजा करावी, ही इच्छा अहंकारवानालाच होणें शक्य आहे. मुक्तचित्त पुरुषाला नाहीं. राघवा, मंत्र, मणि, ओषधि इत्यादिकाच्या योगानें आकाशगमनादि सिद्धि अज्ञानाही प्राप्त होतात. कारण ज्ञानी अथवा अज्ञानी, जो जसा प्रयत्न करितो तसें त्याला फल मिळतें, असा नियम आहे. त्यास अनुसरून अज्ञ आपल्या अहंकारादिकास अनुरूप अशा विषयाचें संपादन करितात व ज्ञानी वासनारहित होऊन सर्व प्रपंचगत वस्तूविषयीं उदासीन राहतात. त्याच्या लोभाचा विषय होईल, असा पदार्थ त्रिभुवनात नसतो. कारण तत्त्वज्ञ इंद्रपदालाही तृण समजतो. त्यानें सर्व जगद्यात्रा संपविलेली असते. त्याचें चित्त नित्य तृप्त असतें. तो आत अतिशय शीतल असतो. मौनवान्, सत्त्ववान्, पूर्ण सागराप्रमाणें गंभीर व पूर्ण चंद्राप्रमाणें आह्लादक असतो. पंडिताच्या बुद्धि उपदेशाच्या योगानें जनाला जसा आनंद देतात तसा आनन्द दुसरें कोणी देऊं शकत नाहीं. ज्ञानी आपल्या देहातील शीतोष्णजन्य सुखदुःखेंही दुसऱ्याच्या देहात असल्याप्रमाणें उदासीनतेनें पाहतो. त्याला आपल्याच मागच्या अज्ञचरित्राचें स्मरण झाल्यास हंसूं येते. तो संसारदृष्टींना तुच्छ समजतो. मला हें आठ प्रकारचें ऐश्वर्य तृणासारखें वाटतें, हें माझें मोठेंच भाग्य आहे, असें मी समजतों, असें तो वारंवार आप-

रामा, सर्व ज्ञानी एकाच नियत स्थितींत नसतात. कोणी पर्वताच्या गुहेत घर करून राहतात, कोणी पुण्य आश्रमाचा आश्रय करितात, कोणी गृहस्थाश्रमांत असतात, कोणी ब्रह्मचर्याश्रमांत अध्ययन करीत राहतात, कोणी भिक्षाचर, कोणी एकान्त तापसी, कोणी मौनव्रतधर, कोणी ध्यानपरायण, कोणी अध्यापक, कोणी श्रुति-स्मृतींचें श्रवण करणारे, कोणी राजे, कोणी वेड्यासारखे, कोणी आकाश-गमनादि सिद्धींनीं संपन्न, कोणी गायनादि शिल्पावर आजीविका करणारे, कोणी पामरासारखे, कोणी आचारशून्य, कोणी महा कर्मठ, व कोणी संन्यासाश्रमवान् होऊन राहतात. शरीरादि किंवा चित्तादि हा पुरुष नव्हे. चेतन हाच पुरुष होय व तो नष्ट होत नाहीं. तो अच्छेद्य, अदाह्य इत्यादि आहे. त्याला यथावत् जाणणारा कोठेंही असला तरी कांहीं हरकत नाहीं. तो पाताळांत शिरो, आकाशाचें उल्लंघन व दिङ्मंडलाचें अतिक्रमण करून जावो, कीं वाऱ्याबरोबर इतस्ततः भटकत राहो; त्याचें चिन्मात्र-स्वरूप कधींही नाश पावत नाहीं. कारण तें आकाशाप्रमाणें निराकार अज, शांत व शिव आहे १०२.

सर्ग १०३—चित्चें नित्यत्व, एकत्व व स्वातंत्र्यही सिद्ध करून या सच्छास्त्राचें माहात्म्य व हितोपदेश.

श्रीवसिष्ठ—रामा, भानमात्र चित्चा नाश का व कसा होईल? तें चिन्मात्र जसें आदि-अंतशून्य तसाच पुरुषही जन्मनाशरहित आहे. शिवाय चिन्मात्र जर नष्ट झालें तर तें पुनः उदय कसें पावणार? प्रत्येक शरीरांतील अथवा प्रत्येक प्रदेशांतील चैतन्य निरनिराळें आहे व म्हणून शरीराबरोबर तें मरतें व शरीराबरोबरच उत्पन्न होतें, म्हणून म्हणावें तर तेंही प्रमाणतः खरें ठरत नाहीं. कारण अनुभव हें त्याचें स्वरूप जर सर्वत्र एकसारखेंच आहे तर त्याला भिन्न म्हणणें युक्त कसें होईल? सर्वांचा अनुभवही एकसारखाच असतो. बर्फ सर्वांना शीत लागतें, अग्नि, उष्ण लागतो. दूध सर्वांना मधुर लागतें. मग अशा सर्वत्र एकसाखाच अनुभव देणाऱ्या अति शुद्ध चिन्मात्राला अन्यत्व कोठचें? बरें चैतन्य शरीराबरोबर उत्पन्न होऊन शरीराबरोबरच नाश पावतें, असें जरी म्हटलें तरी संसाराला व जन्म-मरणाला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण मेल्यावर सर्व संसार आपोआपच आटपणार, हें ठरलेलेंच आहे. शिवाय

येथें असह्य दुःख भोगीत राहण्यापेक्षां दुःखी जनांनीं भराभर आत्मघात करून घेणेंच अधिक श्रेयस्कर होय. पण वस्तुतः शरीराबरोबर चिदाकाश नाश पावतच नाहीं. जर पावलें असतें तर पुनर्जन्म न मानणाऱ्या म्लेच्छादिकांना पिशाचाची पीडा झाली नसती. शिवाय शरीरनाशाबरोबरच चिदाकाश नाश पावतें हें म्हणणें असंगतही आहे. कारण हें जर सत्य आहे तर शरीर शव का होतें ? तें जळेपर्यंत त्यात चेतन का दिसत नाहीं. सारांश, रामा, नास्तिकाच्या या सर्व कल्पना व्यर्थ आहेत. एक सन्मात्र चित्‌च सत्य असून तिचाच हा सर्व विकास आहे. वासनेप्रमाणें अनुभव. स्वभावच या सर्वांचें कारण आहे. ज्याच्या आरंभालाच कांहीं कारण नाहीं. तें स्थितिकाळीं तरी कसें असणार ! अर्थात् दृश्य हा आभास आहे. फार काय पण बोध व अबोध हीं दोन्ही चिदाकाशमयच आहेत. अविचारणा हीच दृश्यता आहे. यास्तव विचारानें अविचार नष्ट झाल्यावर जग कसें दिसणार ?

यास्तव बा रामा, आत्मज्ञानविचाराचा अभ्यास करावा. तो दोन्ही लोकीं सिद्धि देणारा आहे. अविद्येचा क्षणिक नाश कांहीं कामाचा नाहीं. तिचा आत्यंतिक नाशच झाला पाहिजे. तत्त्वसिद्धि होण्यास अभ्यासच केला पाहिजे. यास्तव रामा, शमादि साधनसंपन्न पुरुषानें आलस्य, चित्ताचें अरंजन इत्यादि उद्वेग सोडून व त्या उद्वेगाला कारण होणाऱ्या यथेष्ट खानपान, दुःसंग, इत्यादिकाचाही त्याग करून, गुरुशुश्रषा, इत्यादि नियम धरून उभयलोकीं हितकर व पथ्य अशा या महारामायणसंज्ञक शास्त्राचा प्रत्यहीं विचार करावा. गुरूपासून श्रवण केलेल्या या शास्त्राचा ( भागाचा ) अनेक सहाध्यायाबरोबर बसून विचार करावा. म्हणजे परस्पराच्या धारणादिकाचा परस्परास लाभ होऊन तत्त्वज्ञान प्रतिष्ठित होतें. ज्ञान दुर्लभ आहे, असें समजून श्रवणाचा त्याग करूं नये. कारण जो ज्याची इच्छा करतो व त्याकरितां मध्येंच श्रांत न होता शेवटपर्यंत यत्न करतो त्याला इष्ट फळ अवश्य प्राप्त होतेंच. यास्तव, अहो जनहो, या असत् अनात्म-शास्त्रापासून निवृत्त व्हा. त्याचा विचार करूं नका. एकादा शूर भयंकर संग्राम करून जयलक्ष्मी जशी संपादन करतो त्याप्रमाणें तुम्हीही सच्छास्त्राच्या श्रवण-

मननानें शाश्वत शांति मिळवा. ही मनोनदी विवेक व अविवेक यांच्या-कडे वहात असते. पण त्यांतील ज्याकडे मोठ्या यत्नानें तिला वाहूं द्यावें. तेथेंच तिची स्थिति होते. यास्तव ती विवेकाकडेच वाहील, असा प्रत्ये-कानें प्रयत्न करावा. या शास्त्रावाचून आजवर कोणाचें कल्याण झालें नाहीं व पुढेंही होणार नाहीं. यास्तव परम बोधाकरितां याचाच विचार करा. विचार करीत असलेल्या पुरुषाला तत्काल आत्मतत्त्वसाक्षात्कार होतो. शापाप्रमाणें किंवा वराप्रमाणें त्याचें फळ मिळण्यास विलंब लागत नाहीं. पिता, माता व पुण्य यांनींही न केलेलें तुमचें श्रेय ( कल्याण ) हें शास्त्र तत्काल करील.

बा साधो, रामा, ही भवबंधमयी महामारी अतिशय कठिण आहे. अतिशय दीर्घ असलेली ती आत्मज्ञानावाचून कधींही शांत होत नाहीं. अहं ही मिथ्या भावना व तिच्यामुळें होणारी ही शोच्यता सोडावी. मृत्यु केव्हा येईल, याचा कांहीं विश्वास नाहीं. यास्तव सत्वर शास्त्रचिंतन करावें. अहो हे मूढ लोक, प्राण-मूल्य देऊनही धन-मान इत्यादि श्रम जोडतात पण शास्त्रविचारानें अजर व अमर पद जोडीत नाहींत. जे साधु मोठ्या यत्नानें चिदाकाशात आपलें स्थान करितात त्याच्या मस्तकावर अज्ञानशत्रु पाय कसा ठेवणार? व तो त्यांना सहन तरी कसा होणार? अहो जनांनो, तुम्ही ज्याच्या योगानें निर्मान व निर्मोह होता येतें अशा विवेकास प्राप्त होऊन व तत्त्वाला जाणून मोक्षगतीस जा. अधम संसार-गतीस प्राप्त होऊं नका. अहो सज्जनांनो, हा मी तुम्हाला बोध व्हावा म्हणून अहोरात्र, कंठशोष झालातरी, उपदेश करीत आहें. यास्तव हा ब्राह्मण आता या श्रमातून मुक्त होवो, अशा भावनेनें तरी ( म्हणजे मजवर दया करून तरी ) माझें म्हणणें ऐका. त्याप्रमाणें निश्चय करा व देहादि—आत्म भाव सोडून ब्रह्मात्मतेस प्राप्त व्हा. जो मानव आज स्वस्थावस्थेंतच मर-णापत्तीची चिकित्सा करीत नाहीं तो मूढ मृत्यु आल्यावर त्या आतुर दशेंत काय करणार? स्वात्मज्ञान करून घावयास या ग्रंथासारखा दुसरा उत्तम ग्रंथ नाहीं. हा निश्चयानें अभिलषित अर्थ देणारा आहे. हें शास्त्र आत्मज्ञानाला दीपाप्रमाणें प्रकाशित करतें. हें पित्याप्रमाणें बोध करतें व कांतेप्रमाणें रमवितें. कारण ब्रह्मसूत्रें, भाष्य, उपनिषदें, श्रीगीता इत्यादि

दुसरेही आत्मज्ञान करून देणारे ग्रंथ आहेत. पण मायेचा प्रभावच काहीं विलक्षण असल्यामुळें नित्य विद्यमान आत्मज्ञानही दुर्बोध होऊन बसलें आहे. यास्तव वरील केवळ मीमांसामय अथवा उपदेशमय शास्त्राच्या योगानें स्पष्ट बोध होत नाहीं. पण तेंच आत्मस्वरूप यांत मधुर शब्दांनीं व मधून मधून आख्यायिकाची योजना करून वर्णिलेलें असल्यामुळ सुबोध झालें आहे. यास्तव याचें परिशीलन केल्यास आत्मबोध निःसंशय होईल, शास्त्रदृष्टया जेवढीं आख्याने लिहिलीं आहेत त्यात हें उत्तम आहे. यात अनादि तत्त्वास जाणणाऱ्या महात्म्याच्या संप्रदायास सोडून आपल्याच मनचें काहीं सांगितलेलें नाहीं. नुस्त्या आख्यान श्रवणानें चित्तविनोद होतो. म्हणून त्याकरिताही त्याचे परिशीलन करणारास आत्मबोध अनायासान होतो. सर्व शास्त्रज्ञानाही जो बाध झालेला नसतो तो या शास्त्रानें होतो.

**श्रीराम**—पण भगवन्, हें शास्त्र ज्यानें केलें त्याला तरी अगोदर हें ज्ञान कसें झालें? त्यानें ज्याच्या वरून तें संपादन केलें त्याच्याच वरून आम्ही तें का संपादन करूं नये?

**श्रीवसिष्ठ**—रामा, या शास्त्राच्या कर्त्याविषयीं विचार करण्याचें कांहीं कारणच नाहीं, कारण कर्ता कोणीही जरी असला तरी तो आज आपणाला प्रत्यक्ष दिसणार नाहीं, हें उघड आहे, व त्याला प्रत्यक्ष पाहून अथवा तो अमुक आहे, असें जाणून तरी काय लाभ होणार! त्यापेक्षा पुढें असलेला हा ग्रंथच प्रत्यक्ष पहा व त्याचा विचार करा. जर त्याच्यापासून युक्तियुक्त व अनुभवपर्यंत ज्ञान झालें तर तें ग्राह्य आहे, असें समजा. नाहींतर त्याचा त्याग करा. कर्ता अमुक आहे, व त्यानें अमक्या शास्त्रावरून हें ज्ञान संपादन केलें आहे, हें समजूनही जर एकाद्या शास्त्रात युक्त प्रतिपादन केलेलें नसलें तर त्याचा काय उपयोग? रामा, हे शास्त्र स्वतः सहस्रावधि युक्तींनीं भरलेलें आहे, व प्रतिपाद्य वस्तूचा साक्षात् अनुभव देणारें आहे. तेव्हां याच्या अध्ययनानंतर स्वानुभवानेंच सर्व शंकाची निवृत्ति होण्यासारखी असल्यामुळें अगोदरच ग्रंथकारादिकांविषयीं साशंक होऊं नये. पण असें असतांनाही अज्ञान, मत्सर अथवा मोह यातील एकाद्या कारणानें जे अध्यात्म—शास्त्राची अवहेलना करीत असतील त्यांच्याशीं मैत्री

करूं नये. कारण ते आत्मज्ञानापासून पराङ्मुख होऊन आत्मघात करणारे व म्हणूनच महा पातकी असतात. तर मग तुम्ही आम्हाशीं मैत्री कशी केली ? व या सभेतील सर्व लोकास उपदेश करण्यास कसे प्रवृत्त झाला ? म्हणून विचारशील तर सांगतों—रामा, हे श्रोते व तूं याचा अधिकार किती आहे, तें मी जाणतों. तुमच्या बुद्धि श्रवण-धारण-कुशल आहेत, हें मला माहीत आहे. पित्यानेंही मला अशीच आज्ञा केली आहे. सारांश, तुम्हा सर्वांचा भाग्योदय झाल्याकारणानेंच मी करुणेनें उपदेश करावयास प्रवृत्त झालों आहें. यास्तव तुमच्या हिताची इच्छा करणाऱ्या मज दयाळु ब्राह्मणाच्या सांगण्याचा आदर करा. अथवा मी तुमचा शुद्ध आत्माच असून तुमच्या पुण्यप्रभावामुळेंच तुम्हाला आत्मतत्त्वाचा उपदेश करावयास आलों आहें. तुम्हीही माझा परम प्रेमास्पद आत्माच आहा. त्यामुळें मी तुमच्याशीं मैत्री केली. सारांश हा मी निरुपाधिक आत्मा आहें. नर, अमर, गंधर्व किंवा राक्षस नव्हे. तुम्ही जसे संविद्रूप तसाच मीही संवित-मय आहें. त्यामुळें आम्हामध्यें भेदच नाहीं. मी तुमचा महा आप्त आहें. यास्तव जोंवर ते काळे कुट्ट मरणाचे दिवस उगवले नाहींत तोंवर सर्व वस्तूंविषयीं विरक्त व्हा. जो मूढ येथें असतानाच पुढच्या नरकव्याधीची चिकित्सा करीत नाहीं तो जेथें औषधाचा लेशही मिळणें शक्य नाहीं, अशा रोगमय स्थानीं रोगग्रस्त होऊन गेल्यावर काय करणार ? विरक्तीवाचून पदार्थांविषयींची भावना शांत होणार नाहीं व आत्म्याला ब्रह्ममय करावयाचें असल्यास वासनाक्षयावाचून दुसरा उपाय नाहीं. ज्याच्याविषयीं वासना धरावयाची ते पदार्थ सत् नव्हेत. ते विचार करी पर्यंतच सत् भासत असतात. योग्य कारणावाचून विद्यमान असल्याप्रमाणें भासणें हाच त्याच्या मिथ्यात्वाचा मुख्य हेतु आहे. उत्पत्तीच्या पूर्वी भावाचें योग्य कारण कसें नसतें, हें आम्ही अनेकदा सांगितलें आहे. ( सन्मात्र ब्रह्म अतींद्रिय, निराकार, नामरूपशून्य व अकरण, आहे. यास्तव तें इंद्रियगोचर, साकार, नामरूपात्मक, व कार्यकारणमय जगाचें कारण होणें शक्य नाहीं. इत्यादि अनेक युक्ति पूर्वी प्रतिपादिल्या आहेत. ) सहकारी कारणाच्या अभावीं कार्य होत नाहीं, ह्या सिद्धान्ताचा अनुभव पामरानाही

येतो. अहो, हें जग ज्याच्यापासून झालें तें रज प्रत्येक घरांत व प्रत्येक जागीं चालत असतें. पण त्याच्यामध्यें क्षणोक्षणीं होत असलेला हा फरक कशामुळें होतो तें कोणालाही कळत नाहीं. तें रज कोठून येतें, त्याचा संयोग कसा होतो ? व तो कोण करतो; जगाची रचना हें कोणाचें कर्म आहे ? संसारी पुरुषाचें कीं असंसारी ईश्वराचें ? पण संसारी पुरुषाला जगत् रचण्याचें सामर्थ्य कोठून असणार व असंसारी ईश्वर तरी तें कांहीं प्रयोजनावाचून काय म्हणून रचील ? इत्यादि अनेक संशयाच्या परंपरेचें निवारण चिन्मात्रवादावाचून दुसऱ्या कोणालाही करीता येत नाहीं.

तूं कदाचित् म्हणशील कीं, चेतनाला बुद्धिपूर्वक रचना करावयाची इच्छा झाल्यास जशी कार्याच्या प्रयोजनाची अपेक्षा असते तशी ती अबुद्धिपूर्वक रचना करावयाची झाल्यास नसते.पण तें बरोबर नाहीं. कारण बा रामा, मनानेंही ज्याचें चिंतन करवत नाहीं असें हें चतुर्विधभूतोत्पत्तिरूप कर्म अबुद्धिपूर्वक झालें असेल, असें कोणाच्यानेंही म्हणवणार नाहीं, व कोणतेंही बुद्धिपूर्वक कर्म व्यर्थ कोणी करणार नाही, हेंही उघड आहे. अर्थात् वायुच अणूंचा समुदाय करतो, बुद्धिपूर्व व्यापारावाचूनच आपोआप तो होतो, इत्यादि कल्पना करणें व्यर्थ आहे. कारण जड वायु बुद्धिपूर्वक चेष्टा कशी करणार ? व तिच्या वाचून अणूंचा समूह कसा होणार ? जड व सर्वज्ञ याच्या वांचून बाकीचे सर्व जीव प्रलयामध्यें देहादिक नसल्यामुळेंच, कोणतीही क्रिया करण्यास असमर्थच असतात. तस्मात् सृष्टीच्या आरंभीं योग्य व समर्थ जगत्कर्ता नसतो, हा परम सिद्धान्त होय. कर्त्यावाचून झालेलें हें जग वस्तुतः असत्यच आहे. तें उत्पन्नच झालेलें नाहीं. ‘ तर मग आम्ही कोणत्या आकारानें व या जगांत कसे स्थित आहों ? ’ म्हणून म्हणशील तर सांगतों— हे आम्ही आकाशरूप आहों. हे सर्व जनही आकाशरूप आहेत. म्हणजे आम्हाला देहादि मूर्तता नाहीं. तथापि स्वप्नामध्यें स्वप्नमानव जसे असतात तसे आम्ही परस्पराच्या कल्पनेनें आहों. या सिद्धान्ताप्रमाणें विचार केल्यास मात्र सर्व संशयाची निवृत्ति होऊन अद्वैताची सिद्धि होते. वायुप्रभृतींमध्यें स्पंदादिक जसे अभिन्नरूपानें राहतात त्याप्रमाणें चिदाकाशांत विश्वाकाश असतें. जगच्छून्य चिदाकाशाचें रूप कसें असतें तें मागें पुष्कळवेळां सांगितलेंच

आहे. ( चंद्र पाहत असतांना नेत्र व चंद्र यांच्यामध्यें संवित्चें जें रूप असतें तेंच निर्विषय चित्चें स्वरूप होय. ) सर्व पदार्थांचा संविदाकाश हाच खरा स्वभाव आहे. चिदाकाशानें स्वभावापासून च्युत होऊन विवर्त पावणें हेंच जग आहे. यास्तव चित्त व जग याचा भेद नाहीं. विश्व हा चिद्दर्पणातील आभास आहे. त्या मिथ्या आभासात आसक्त झालेलें मन पुरुषाच्या दीर्घ प्रयत्नानेंही त्याच्यापासून परतून झटकन ब्रह्मामध्यें निमग्न होत नाहीं व त्याच्यामुळेंच सर्व अनर्थ उद्भवतात. तस्मात् रामा, तू आपल्या मनाला अधीन ठेव, कल्पना सोड व शात मनानें रहा. १०३.

**सर्ग १०४—आकाशापासून जसे वायुप्रभृति भात्र त्याप्रमाणेंच चित्पदापासून जगद्भाव.**

श्रीवसिष्ठ—रामा, चिन्मात्रच जगाच्या आकारानें स्वप्नाप्रमाणें भासतें, असें जें सांगितलें आहे तेंच अनुभवाचा अवलंब करणारास शेवटीं मानावें लागतें. कारण तत्त्वाची जिज्ञासा करणाऱ्या पुरुषाना आकाशादि सृष्टीची कल्पना करीत फार दूरवर गेल्यावर सुद्धा तसें वाटतेंच. कसें तें पहा— आकाश शब्दतन्मात्र आहे. त्यातील वायु स्पर्शतन्मात्र आहे. आकाश व वायु यांचा संघर्ष झाला असता रूपतन्मात्र तेज होतें. उष्णतेची शाति हेंच जल ( रसतन्मात्र ) आहे. भूमि हा याचा संघ आहे. ती गंध-तन्मात्र आहे. चित्—लाच या स्वप्नसदृश जगाचें भान होण्याचा हा क्रम जगांत रूढ झाला आहे. पण त्याविषयीं आम्ही असें विचारतों, कीं, अमूर्त आकाशापासून पृथिवीपर्यंत मूर्त जग कसें होतें? याचें उत्तर कोणी असें देईल. वायुच प्रथम आकाशापासून क्रिया व स्पर्शप्रधान होऊन उद्भवतो. तो रूप नसल्यामुळें किंचित् आकाशासारखा व स्पर्शक्रियावान् असल्यामुळें किंचित् साकार असतो. त्याच्यापासून रूपतन्मात्रप्रधान मूर्त तेज होतें. पण या उत्तरानें समाधान होत नाहीं. कारण निरवयव आकाशापासून वायूची सिद्धि होणें शक्य नाहीं. व्यापाररहित व निरवयव वस्तु काहीं कार्याचा आरंभ करते, असा अनुभव नाहीं. शिवाय आकाश वायुरूपानें परिणाम पावतें, असें समजल्यास तें सर्वच वायु होतें, कीं अर्धें, ( अथवा कांहीं थोडेसेंच ) ? सर्व होतें म्हणून म्हटलें, तर आकाशाचा अभाव व्हावयास पाहिजे. पण तो झालेला नाहीं.

त्याचा कांहीं भाग वायु होतो, म्हणून म्हटलें तर तें सावयव होतें. बरें आकाश सावयवच का असेना, म्हणून समाधान करावयास जावें तर, मग वायुप्रभृति इतर भूताची गरजच काय आहे ? सक्रिय व सावयव आकाश सर्व जग आपणच करील–असा अक्षेप होतो. शिवाय आकाशही सावयव आहे. असें म्हटल्यावर आज दिसणाऱ्या या अफाट पोकळीची उपपत्ति लावितां येत नाहीं, त्याचप्रमाणें रूपरहित वायूपासून रूपयुक्त तेज कसें होतें ? या प्रश्नाचेंही उत्तर–कारणगुण कार्यांतील गुणाचा आरंभ कारितात. असें म्हणणाऱ्या नैयायिकादि आरंभवाद्यास देतां येत नाहीं. शिवाय कोणताही परिणाम तेजःसंयोगरूप परिपाकावांचून होत नाहीं, असा त्याचाच अभ्युपगम ( सिद्धान्त ) आहे. तेव्हां आकाश व वायु याचा परिपाक तेजाच्या उत्पत्तीपूर्वींच कसा होणार?

यावर कदाचित् कोणी मध्यस्थ म्हणेल कीं, आम्ही अनुभवबलानेंच निर्विकार आकाशापासून चलनात्मक वायु, नीरूप वायुपासून रूपवान् तेज, रसरहित तेजापासून रसयुक्त जल व गंधरहित जलापासून सगंधा पृथ्वी होते, अशी कल्पना करूं, अनुभवरूप भगवती ज्ञप्तिच सर्व विरोध घालवून अनुभवानुसार पदार्थाचें समर्थन करील.

तर त्यावर आमचें एवढेंच म्हणणें आहे कीं इतकें दूर जाऊनही जर तुम्हाला ज्ञप्तीचाच आश्रय करावा लागत आहे, तिच्यावाचून जर तुमचे चालतच नाहीं, तर ती ज्ञप्तिच स्वप्नादि भ्रामक स्थितीप्रमाणें विवर्तरूपानें सर्व जगद्वेष धारण करते, असें आधींच म्हणण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? अर्थात् सर्व अर्थरूप अमल ब्रह्मच सर्वदोषशून्य व परम सिद्धान्त आहे आणि म्हणून तो आमचा सिद्धान्त आम्ही येथें पुनः सांगतों.— अति शुद्ध ज्ञप्तिच स्वरूपात भासते व तें तिचें भासणेंच जग आहे. ती सत्य असल्यामुळें तेंही सत्य आहे. ती भूतें व भौतिक शरीरें यावाचून असूनही भूतभौतिकरूपानें कशी भासते, असा कोणाला संदेह असल्यास त्यानें आपल्या स्वप्नातील सृष्टीवरून त्याचें निरसन करावें. स्वप्नात जशी चित्च स्वाप्न जगन्मय होते त्याप्रमाणेंच जाग्रतींतही आपण चित्स्वभावच पाहतों. वस्तुतः सर्व चिदाकाशच आहे. असो; रामा, या विचारानें अमळ स्वभाव कळला असत जें

अक्षय निरतिशय सुख होतें तोच मोक्ष होय. तो देह असला तरी व नसला तरी एकसारखाच असतो. बा सच्छिष्या, तुलाही तसली पूर्ण विश्रांति प्राप्त होवो १०४.

सर्ग १०५—जाग्रत् व स्वप्न यांचा स्वभावतः अभेद.

**श्रीवसिष्ठ**—रघुवरा, चिद्भाव आपल्या स्वभावभूत जगदाकाराला पहात असतो. स्वप्नाप्रमाणें आपल्या कल्पनामय जगाचाच तो अनुभव घेतो. हें जाग्रज्जगद्रूपानें दिसणारें जग मूलतः अज्ञानच, अधिष्ठानतः शिलेच्या उदराप्रमाणेंच व स्वतः शून्यच आहे. नगरमंडलानें मंडित झालेलें स्वप्न हाच याला उत्तम दृष्टान्त आहे व याविषयीं आम्ही पूर्वी पुष्कळ प्रतिपादन केलें आहे. सारांश कालचा सूर्य व आजचा सूर्य हे जसे एक त्याप्रमाणें जाग्रत्-जग व स्वप्न जग एक होय. स्वप्न जागें होताच बाधित होतें व जाग्रत्-प्रपंच एका जन्मात वारंवार तोच तो दिसतो, हा जरी त्या दोन प्रकारच्या जगात विशेष आहे तरी त्यावरून जाग्रत् सत्य ठरत नाहीं. कारण कोणताही अनुभव व त्याचा विषय, अनुभव घेणारा असेपर्यंत राहतो, असा आमचा सिद्धान्त आहे. जाग्रतींतील देह व त्या देहावर अभिमान ठेवणारा जीव हे दोन्ही असेपर्यंत जाग्रत् विषयाचा म्हणजे जगाचा बाध होणें शक्य नाहीं, पण तो देह पडला कीं, त्यावर अभिमान ठेवणारा जीवही अदृश्य होऊन त्याचें जगही बाधित होतें. स्वप्नातील द्रष्टा प्रत्येक स्वप्नात बदलतो व त्यामुळे त्याचें जगही बाधित होतें व तें प्रत्येक स्वप्नात निरनिराळें असतें. जाग्रत् देहाचा अभिमान सोडून स्वप्नात गेलेला जीवही या जगास विसरताेच. तस्मात् भोक्ता ज्या देहावर अभिमान ठेवतो तो देह असेपर्यंत त्याला विषय होणारे जग राहतें, व त्याच्यावरील अभिमान सुटला कीं, त्याचाही बाध होतो. ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. अर्थात् स्थिरत्व किंवा अस्थि-रत्व विषयावर अवलंबून नसतें; तर तें त्यास पाहणारावर अवलंबून असतें. स्वप्नद्रष्टा अस्थिर असतो. तो जागा होताच त्यानें संकल्पानें रचलेलें शरीर मरतें व त्याबरोबर त्याचा प्रपंचही घडघडतो. जाग्रत्-द्रष्टा तितका अनित्य नसतो, तर तो तें शरीर असेपर्यंत राहतो. त्यामुळ त्याचा विषय स्वप्नाप्रमाणें वरच्यावर बदलत नाहीं. जीवाचा जन्म व मरण सुद्धा त्या त्या देहावर हा मी असा अभिमान धरणें व तो सोडणें

याचाच पर्याय आहे. सारांश जाग्रत् व स्वप्न हे भाव इतिहासमय आहेत, ते यथार्थ नव्हेत. म्हणूनच ते परस्परांच्या उपमेस पात्र होतात. स्वप्नामध्यें दिसणारा प्रपंचही जागरांतील प्रपंचाप्रमाणेंच प्रत्यक्ष असतो, व त्या अवस्थेंत जागरही स्वप्नाप्रमाणें मिथ्या ठरतो. ( म्हणजे जागें होतांच स्वप्न जसें बाधित होतें त्याप्रमाणें जागर सोडून स्वप्नात शिरतांच जाग्रत्प्रपंचही मिथ्या ठरतो. कारण त्या त्या वस्तूचें नित्य भान न होणें, कदाचिद्भान होणें, हेंच मिथ्यात्वाचें स्वरूप आहे. शिवाय प्रत्येक विषयानुभव मनोवृत्तीवर अवलंबून आहे. ती नसली कीं, तोही नसतो. अर्थात् मनोवृत्तीवरच उपजीविका करणारा विषय सत्य कसा ? कोणताही स्थावर अथवा जंगम पदार्थ चित्-वाचून कधींही स्फुरत नाही. कारण मनोवृत्तीला सुद्धा आंतून चित्-चें साह्य जेव्हां मिळतें, तेव्हां ती विषयाकार होते, व चिदाभास पदार्थाला व्यक्त करतो, असा नियम आहे. मृन्मय ( मातीचें ) भाडें जसें मृत्तिकेवांचून कधीं दिसतच नाहीं तसें काष्ठ-पाषाणादि सर्व चिन्मात्रावांचून उपलब्ध होत नाहीं. आम्हांला स्वप्नाप्रमाणेंच हें सर्व जाग्रत्-वस्तुजातही वाटत आहे. स्वप्नांत दिसलेला पाषाण चिच्चमत्कारावांचून आणखीं काय असणार ? त्याचप्रमाणें जागरातील पाषाणही चित्-वांचून नाहा. कारण चिन्मय वस्तु चित्--वाचून राहणें शक्य नाहीं. अग्नि उष्णतेवाचून जसा राहूं शकत नाहीं. त्याप्रमाणें चिन्मय चत्य चित्-वाचून राहाणार नाहीं. कारण जें ज्या रूपाचें असतें त त्या आकारानेंच भासतें. आकाश शून्यावांचून कसें असेल ? पृथ्वी घनाकारास सोडून कशी राहील. सारांश तसेंच हें घट--पटादिक चिदाकाशमयच आहे. रामा, स्वप्नातील नगरादिक जसें चिदाकाशमय त्याप्रमाणेंच जाग्रतींतील नगरादिकही चिन्मय आहे. म्हणूनच स्वप्न व जाग्रत् हे विशेष विचारानें सोडले म्हणजे एक निर्विशेष चिन्मात्रच अवशिष्ट राहतें. पण या इतक्या स्पष्ट तत्त्वाविषयींही वादी व्यर्थ विवाद करीत असतात १०५.

सर्ग १०६--चिदाकाशाचीं लक्षणें व तेंच जग आहे.

श्रीराम--प्रभो आपलें हें भाषण ऐकत असतांना माझ्या मनाची तृप्ति होत नाहीं. यास्तव तें चिदाकाश कशा प्रकारचें आहे तें मला पुनः

सांगा. ( मंदमति अविकाऱ्यांवर अनुग्रह करण्याकरितां रामानें हा प्रश्न केला आहे. )

श्रीवसिष्ठ—एकसारख्या दोघां जुळ्या भावांचीं दोन निरनिराळीं नांवें जशीं व्यवहाराकरितां ठेवितात, त्याप्रमाणें हे जाग्रत्–स्वप्नलक्षण अखंड चित्स्फटिक शिलामय दोन प्रपंच दोन नांवांनीं प्रसिद्ध होतात, चिदाकाशाचें लक्षण मागें सांगितलें आहे, ( इंद्रिय व दूर असलेला विषय यामध्यें असणारें जें निर्विषय संवित्–रूप तेंच चिदाकाश होय, ) मुळांच्या द्वारा भूमींतील रस ( जळ ) आकर्षण करून घेत असतांना वृक्षाचा हर्ष–दैन्यशून्य ( आल्हादक ) भाव जसा असतो तसेंच चिदाकाश असतें. ज्याच्या सर्व इच्छा निवृत्त झाल्या आहेत व त्यामुळें, ज्याचें चित्त शांत आहे अशा पुरुषाचा जसा सदा समभाव असतो तसें चिदाकाश असतें. झोंप लागलेली नसतांना व मन विषयरहित असतांना स्वस्थ पुरुषाचा जो भाव तेंच चिदाकाश होय, पावसाळ्यांत अतिशय तृप्त होणाऱ्या तृण–गुल्म–लतादिकांचा ममताशून्य जो आनंद तेंच चिदाकाश आहे. मनोरथ व कल्पना यांनीं रहित जिवंत पुरुषाचा जो भाव तेंच शुद्ध चिदाकाश होय. ईश्वरानें काष्ठ, पाषाण, पर्वत इत्यादिकांचें जें हें स्थिर अवस्थान स्वभावतःच निर्मिलें आहे तेंच जर जीवांनीं प्रयत्नानें आपणांमध्यें आणलें तर तेंच नित्य आत्मचैतन्य होय. ( पण तें मनोनाशावाचून सिद्ध होत नाहीं. ) रामा, द्रष्टा, दर्शन व दृश्य या त्रिपुटीचा उदय ज्याच्यापासून होतो व अस्तही ज्यांत होतो, तेंच चिदाकाश आहे, असें तूं जाण. ज्याच्यापासून हे सर्व विचित्र पदार्थांचे अनुभव उत्पन्न होऊन ज्याच्यामध्येंच परिणाम पावतात तें चिदाकाश होय. ज्याच्यामध्यें हें सर्व दृश्य राहिलें आहे, ज्याच्यापासून हें सर्व झालें आहे, जें हें सर्व आहे, जें सर्वतः आहे, व जें सर्वमय आहे तें चिदाकाश होय. जो सम या नांवाचा देव स्वर्गांत, भूमीवर, पाताळांत, आंत व बाहेर भासतो तोच तो चिदात्मा आहे. माळेंतील मण्यांप्रमाणें त्यांत हें सर्व स्थूल–सूक्ष्म दृश्य आहे. झोंप संपतांच हें विश्व ज्याच्या योगानें पुनः भासतें, व झोंपेंत हें ज्याच्यामध्यें मिळून जातें तें चिदाकाश आहे. ज्याच्या उन्मेष–निमेषांच्या योगानें जगाची सत्ता व लय होतो, तेंच

स्वानुभवात्मक चिदाकाश प्रत्येकाच्या हृदयमंदिरांत आहे, असें तूं जाण. अनुभवास येणाऱ्या या सर्व स्थूल व सूक्ष्म दृश्याचा बोध केल्यावर जें अनुभवस्वरूप राहते तेंच ब्रह्म होय.

रामा, हें जग तन्मय आहे. किंचित् विकास पावल्यामुळेंच चित अनात्मरूप होते. यास्तव तू इंद्रियाच्या योगानें विषयांस पहात असतांनाही वासनाशून्य होऊन जाग्रत्समयींच निजल्यासारखा निर्विकार व एकरूप रहा. तूं वासनारहित व शांतचित्त होऊन नंतर बोल, जा, खा, पी, घे, दे व बाकीचाही उचित व्यवहार कर. तूं जें पुढें पहात आहेस तें जग संभवत नाहीं. तें मृगजलाप्रमाणें किंवा चद्रगत द्वित्वाप्रमणें खोटेंच उद्भवलें आहे. योग्य कारणाचा अभाव असल्यामुळें हें आरंभीं उत्पन्नच झालेलें नाहीं. कारण कारणावाचून कार्य होणें शक्यच नाहीं. व्यवहारात बीजांकुरादिक जें कारण कार्यमय भासतें तेंही कार्यकारणभावशून्य ब्रह्मापासून होतें. निर्विकार ब्रह्मापासून तें कसें होतें म्हणून म्हणशील तर सांगतों जसें–अद्वय चंद्रबिंबच भ्रमानें सद्वय भासतें त्याप्रमाणें तें अद्वय तत्त्वही भ्रमानें द्वैतमय भासतें. अर्थात् द्वैतसमयींही ब्रह्माच्या अद्वैताची हानि होत नाहीं, कारण बीजांकुरादिक जग हा ब्रह्माचा खरा परिणाम नव्हे. तो स्वप्नस्त्रीप्रमाणें मायामात्र आहे. यास्तव दृश्य उत्पन्न झालें नाहीं; तें वस्तुतः नाहीं; पुढें नसेल; व त्याचा नाशही होणार नाहीं. मूर्ताचें जसें मूर्तत्व त्याप्रमाणें नित्यसिद्ध चिदाकाशाचा जग हा मायिक विकल्पवशात् झालेला धर्म आहे.

श्रीराम—भगवन्, मग हा कार्यकरणादि–भेद सत्य असल्यासारखा कसा भासतो ?

श्रीवसिष्ठ—चिदाकाशाच्या प्रसादानें तो सत्य भासतो. याला स्वप्नभेदाचाच चागला दृष्टान्त आहे. कार्यकारणादि दृष्टि हा अविद्येचा विकास आहे. द्रष्टा, कर्ता, भोक्ता इत्यादि सर्व कल्पना आहेत. स्वयंभूपासून क्षुद्र कीटकापर्यंत ही सृष्टि–भ्रांति रूढ झाली आहे. तिचें तत्त्व समजलें असता ती क्षणांत नष्ट होते. या सृष्टिभ्रांतीचें ज्ञान झालें नाहीं तोंवर तिला शास्त्रांत माया, लोकांत जग, अज्ञजनाकडून अविद्या व दृक्–वस्तूला पृथक् जाणणाऱ्या विवेक्याकडून दृश्य, असें म्हटलें जातें.

चिदाकाश प्रकाश आपल्या चित्तालाच दृश्य पिशाच समजतो. निरवयव जगही स्वप्नाप्रमाणें भ्रमानें सावयव दिसतें. चित् मायाप्रभावानें आपल्या-लाच विसरून आपल्याच ठिकाणीं अहंचा अभ्यास करते व आपल्याहून भिन्न पण आत्मसंबंधी जगाचा अनुभव घेते. आकारवान् कारणावांचून झालेलें हें कार्य खरें असणें शक्य नाहीं. वस्तुतः निरवयव असलेलेंच हें जग कांहीं कारणावांचून चैतन्यात भासतें. आरसे आपल्यामध्यें कारिलेल्या प्रतिबिंबांना जाणण्यास जसे समर्थ नसतात त्याप्रमाणें सर्व जंतु विचाराच्या अभावीं स्वरूप-दर्शनास समर्थ नसतात. त्यामुळेंच जडासारखे होणारे ते व्यर्थ जीर्ण होत असतात. पण परम पुरुषार्थ विचार करणाऱ्या महात्म्या पुरुषाच्या समीपच प्रत्यगात्म-रूपानें राहतो. यास्तव बा शूरा, नाम–रूपस्वरूप सोडून बाकी राहणारें चिन्मात्रच तत्त्व आहे, असें जाणावें व चिद्रूप होऊन अचल रहावें. मायिक देहादिकांच्या ठिकाणची आस्था सोडावी. जसें पाणी आपल्या आकारास हालवून तरंगादि होतें त्याप्रमाणें चित्‌ही किंचित् विकास पावून जग होतें. त्याचा विकास प्रयत्नानें बंद केला कीं, निर्जगत् चिदाकाश अनुभवास येतें. जसा कल्पवृक्ष अथवा चिंतामणि तत्काल वाछित पूर्ण करतो त्याप्रमाणें चित् अंतःकरणांतील अभीष्ट तत्काल पुरविते. साराश राघवा, सहकारि कारणाचा अभाव असल्यामुळें सृष्टीच्या आरंभीं चित्–हून अगदीं विलक्षण असलेल्या ( म्हणजे जड ) कार्याचा उद्भव संभवत नाहीं. यास्तव आद्य चित्‌च हें सर्व दृश्य आहे, ही गोष्ट स्वप्नदृष्टान्तानें सिद्ध झाली १०६.

**सर्ग १०७**—चिद्विषयभूत पृथिवीप्रभृति दृश्याची अवस्तुता.

**श्रीवसिष्ठ**—रामा, ज्या अर्थीं चिदाकाशच सर्वतः भासत आहे, त्या-अर्थीं जग चिन्मात्राच्या अधीन आहे. तें स्वतंत्र नाहीं. त्याचें भान व सत्ता चित्–वर अवलंबून आहे. सर्व त्रिपुटी चिन्मय आहे. त्यामुळें स्थित असलेल्याही जगाच्या जगद्भावाची व जिवंत असलेल्याही आमच्या जीवभावाची निवृत्ति होते. सर्व स्थावर–जंगम पदार्थ निर्विकार भावास प्राप्त झालेले आहेत. आकाशाच्या निळ्यारंगाप्रमाणें दिसणारे ते सर्व भ्रामक आहेत. यास्तव असत् जगामध्यें आस्था ठेवणें योग्य नव्हे. पण

प्रायः सर्व जन त्यावर आस्था ठेवतात; त्याचें कारण त्यांचें अज्ञानच आहे. यास्तव ज्यांच्या चित्तांत भाग्यवशात् विवेक उत्पन्न झाला आहे, त्यांनीं पृथिव्यादि असत् वस्तूंच्या लाभाचा विचार व चिंता सोडून जन्माचें साथक्य करणारा विवेक करावा. वैराग्यादि उत्तम साधनांचा आश्रय करावा. सुवर्ण, रत्नें इत्यादि मिळविण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषाला भूमी-मध्यें मोठमोठ्या खाणी खणावयाचें सोडून आकाशास शोधीत बसल्यानें जसा काहीं लाभ होत नाहीं त्याप्रमाणें पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्यास मांसमीमासेनें कोणताही लाभ होत नाहीं. कारण आरंभींच नसलेलं जग आता तरी कसें असणार? अर्थात् उत्पन्नच न झालेल्या व म्हणूनच मिथ्या आकाशाशीं जे व्यवहार करितात ते मूढ मेलेल्या किंवा न झाले-ल्याच पुत्राचेंही पालन करतील. कारण विचारदृष्टया पाहूं लागल्यास पृथिव्यादिक कोठून झाले, कोणी कसे केले, इत्यादि कळत नाहीं. कार्य–कारण—काल इत्यादि कल्पना करण्यात गढून गेलेल्या मूढाच्या दृष्टीनें जगातील पदार्थ जरी असले तरी ते आमच्या दृष्टीनें प्रमाणभूत नव्हेत. तस्मात् चित्च हें सर्व आहे १०७.

सर्ग १०८—अविद्या नष्ट झाल्यावांचून जगाचा नाश होत नाहीं, हें स्पष्ट कर-ण्याकरितां विचित्र अविद्याख्यान आरंभितात.

श्रीराम—भगवन्, आपण वर वर्णिलेल्या संसृतिरूप अविद्येचा तत्त्वज्ञानानें अत्यंत असत्त्वरूप बाध झाल्यावाचून देशतः व कालतः नाश होणें शक्य आहे कीं नाहीं?

श्रीवसिष्ठ—रामा, ब्रह्माच्या ठिकाणीं देशतः किंवा कालतः परिच्छेद जसा नाहीं, त्याप्रमाणें या अविद्येमध्येंही देशतः व कालतः परिच्छेद नाहीं. याचविषयीं मी आतां एक कथा सांगतों ती ऐक. या महा आका-शाच्या एका कोनांत या आपल्या जगासारखेंच एक दुसरें त्रैलोक्य आहे. तें आमच्या या जगाची जशी व्यवस्था आहे तशाच व्यवस्थेनें म्हणजे चवदा भुवनें, समुद्र, द्वीपें, काल, कालविभाग इत्यादिकांनीं युक्त होऊन राहिलें आहे. त्यांत या आमच्या जंबुद्वीपासारख्या भूस्थितीचा भूषणभूत असा एक भूभाग आहे. त्यांतही पुरीतत् या नांवाची एक नगरी आहे. तिच्या आधारभूत भूप्रदेशांत पर्वतादिक कांहीं नसल्यामुळें तिच्यांतील

भूतळ सपाट होतें. त्यामुळें त्यांतून मनुष्य, गज, घोडे, रथ इत्यादिकांचा संचार अव्याहतपणें चालत होता. त्या नगरींत विपश्चित् या नांवाचा एक प्रख्यात राजा होता. उत्तम सभ्यांनीं भरलेल्या सभेंत, तो सर्व शास्त्रांत निपुण असल्यामुळें, फार शोभत असे. ज्याचें वर्णन करावयास प्रवृत्त झालेल्या कवींचें वचन, सर्वच उत्तम गुण त्याच्यामध्यें असल्यामुळें, कुंठित होत असे. त्याच्या प्रतापानेंच सर्व सृष्टि–शोभा विकास पावत असे. त्याची मति नेहमीं ब्राह्मणाचें हित करण्यात तत्पर असे. तो मोठा मानी होता. अग्नि हा देवातील ब्राह्मण आहे; म्हणून तो ब्राह्मण-प्रिय राजा त्याचीच उपासना करीत असे. तो दुसऱ्या देवास ओळखीतही नसे. त्याच्या अनेक मंत्र्यातील धीर, महा बलाढ्य व निर्भय सैन्यानें युक्त असे चार मुख्य मंत्री चार दिशेंत होते. ते सागराप्रमाणें आपली मर्यादा पालन करण्यास नेहमीं उत्सुक असत. त्या मंत्र्यासह विपश्चित् राजा चारी दिशाचा आधार-भूत होऊन सुदर्शन चक्राप्रमाणें विजयी व अजिंक्य झाला.

राघवा, एकदा त्या राजाकडे एक चतुर चार ( दूत ) पूर्व दिशेंतून आला व म्हणाला, " हे अच्युत राजा, ही पृथ्वी सदा तुझ्या भुजबलावर अवलंबून राहिली आहे. यास्तव आतां मी काय सांततों तें ऐक. पूर्व दिशेंतील मर्यादा राखण्याकरितां तूं ज्या मंत्र्याची योजना केली होतीस तो तुझा सामंत ज्वरानें मरण पावला आहे. मला वाटतें कीं, ज्यानें सर्व शत्रूंस जिंकलें आहे, अशा तुझ्या आज्ञेनें तो दक्षिणादिशेच्या लोकपालास जिंकावयासच गेला आहे. तो मेला आहे, असें जाणून दक्षिणादिशेचा नायक, असा जो तुझा सामंत तो पूर्व व दक्षिण अशा दोन्ही दिशांस समंततः जिंकण्यास प्रवृत्त झाला. पण शत्रूनें पूर्व-अपर-सैन्यांच्या योगानें त्याच्यावर हल्ला करून त्यालाही मारलें. ही वार्ता ऐकतांच पश्चिम दिशेचा तुझा सामंत मोठ्या सैन्यासह शत्रूवर चालून गेला; पण पूर्व देशांतील व दक्षिण देशांतील राजांनीं मिळून ( एकमत होऊन ) त्याला अर्ध्या रस्त्यांतच गांठून मारलें. "

रामा, तो दूत आपल्या राजाला इतकें जों सांगत आहे, तों इतक्यांत आणखीं एक दूत मोठ्या त्वरेनें राजगृहांत आला. आणि आकुल वाणीनें

( धापा टाकीत ) म्हणाला, "प्रभो, उत्तर दिशेंतील सेनापतीवर चाल करून शत्रूंनीं त्याचा पराभव केला आहे व त्याला हटवीत सर्व शत्रूंचें दल धरण फोडलेल्या जलप्रवाहाप्रमाणें वेगानें इकडे येत आहे." त्या दूताच्या तोंडचे हे शब्द कानीं पडतांच आता कालक्षेप करणें चांगलें नाहीं, असें जाणून विपश्चित् राजा आपल्या श्रेष्ठ नगरातून बाहेर निघण्याचा निश्चय करून म्हणाला, "दूतांनो, तुम्ही सत्वर सामंत राजे, मंत्री, इत्यादिकांस युद्धाकरितां सज्ज करून आणा; आयुधशाला उघडा; अहो सैनिकांनो, भयंकर शस्त्रें बाहेर काढा, कवचें अंगांत घाला. पायदळ येऊं दे. सैन्याची गणती करा. सत्वर युद्धाची तयारी करा. सेनाध्यक्ष नेमा."

राजा अशीं आज्ञावचनें बोलत आहे तों प्रतीहार धांवतच राजापाशीं आला व म्हणाला, "हे देव, उत्तर दिशेचा सामंत द्वारावर येऊन उभा आहे व तो कमल जसें सूर्यदर्शनाची इच्छा करतें त्याप्रमाणें स्वामीच्या दर्शनाची इच्छा करीत आहे." द्वारपालाचें हें भाषण ऐकताच, "जा, जा, त्याला सत्वर आत आण. उत्तरेंतील सर्व खरा वृत्तांत त्याच्या तोंडून कळेल." असें राजा बोलला. तेव्हा लागलाच प्रतीहार त्याला घेऊन आला. त्याच्या सर्व अंगभर बाण लागले होते. अंगातून व तोंडातून रक्त गळत होतें. पळत आल्यामुळें त्याला श्वासही लागला होता. पण त्यानें धैर्यानें अंगातील व्यथा सहन करून प्रभूला प्रणाम केला व म्हटलें.—

"स्वामिन्, आपले तिघेही मंत्री मेले. तेव्हा त्यांच्या देशाचें पालन करण्यास असमर्थ झालेल्या मजवर अनेक राजे चाल करून आले. मी स्वामीचा आश्रय घेण्याकरिता इकडे येऊं लागलों. पण तेही सर्व फार मोठ्या सैन्यासह माझ्या मागोमाग या आपल्या राजमंडलापर्यंत येऊन पोंचले आहेत. यास्तव आता आपण त्यांच्या सैन्याची दुर्दशा करून टाका. आपणाला तें कांहीं अशक्य नाहीं."

राघवा, उत्तर दिशेचा नायक मंत्री मोठ्या धैर्यानें इतकें जों सांगत आहे तों आणखीं एक पुरुष येऊन राजाला प्रणामपूर्वक बोलला, "भगवन्, आपल्या या देशाच्या सीमेवर शत्रूंचें भयंकर सैन्य येऊन देशाचा नाश करीत आहे. सीमासामंतही मला आपल्याला हें निवेदन करावयास इकडे पाठवून सैन्यासह त्यांस प्रतिबंध करावयास त्यांच्या

संमुख ससैन्य गेला आहे. मीही त्याला यथाशक्ति साह्य करावयास जातों. आता आपण उचित दिसेल तें करा." इतकें सांगून व प्रणाम करून त्वरेनें निघून गेला. तेव्हां तें राजकुल भयंकर वायु सुटला असतां एकादें महावन जसें अतिशय आकुल होतें त्याप्रमाणें आकुल झालें. मंत्र्यांची गडबड उडाली. राजे, योद्धे, राजाचे सेवक, हत्ती, गज, पायदळ, रथ, घोडे, इत्यादिकाची विलक्षण हाल चाल सुरू झाली. फार काय पण आपल्या राष्ट्रावर हा मोठाच दुर्धर प्रसंग ओढवला आहे, असें समजून नागरिक स्त्री-पुरुषांनीही भयानें शस्त्रें उचललीं १०८.

**सर्ग १०९**—मंत्र्याचें भाषण ऐकून राजानें आपला देह अग्नींत होमिला व त्यातून चार देहांसह तो उठला.

**श्रीवासिष्ठ**—इतक्यात सर्व मंत्री राजापाशीं आले व म्हणाले, "प्रभो, हे शत्रु सामादि तीन उपायांचें उल्लंघन करून गेले आहेत. यास्तव त्याना आता दंड करणेंच योग्य आहे. कारण अशा क्षुद्र व उन्मत्त होऊन सामादिकांचा अव्हेर करून आलेल्या यांना दान-मान इत्यादि स्नेहाच्या योगानें वश करणें अगदीं अनुचित आहे. यास्तव आपल्या सैन्यास या पापी म्लेच्छावर तुटून पडण्याची आज्ञा करा. म्हणजे वीराचे सिंहनाद, धनुष्याचे टणत्कार, इत्यादि एकदम सुरू होतील. शत्रूवर बाणाची वृष्टि करावयास आपले सैनिक वर्षाकाळच्या मेघांप्रमाणें सज्ज आहेत.

मंत्र्यांचें हें भाषण ऐकून राजा म्हणाला, "तुम्ही सर्व जण सैन्याची योग्य रचना करून युद्धास जा. मीही स्नान करून व अग्नीची पूजा करून रणांगणांत येतों." इतकें सांगून मंत्र्यांना पाठविल्यावर दुसरीं अनेक कर्तव्यें सोडून त्यानें प्रथम गंगाजलानें स्नान केलें व अग्निगृहांत प्रवेश करून अग्नीची यथाशास्त्र पूजा केल्यावर आपल्याशींच असा विचार केला. मी आजवर आपलें आयुष्य सुख-विलासवैभवानें घालविलें. समुद्रापर्यंत सर्व प्रजेला अभय दिलें. फलांच्या भारानें लता जशा नम्र होतात त्याप्रमाणें मी सर्व शत्रूंच्या मस्तकावर पाय ठेवून त्यांचीं शिरें नमविलीं. प्रजेच्या चित्तांत आपलें शुभ्र यश स्थिर केलें. त्रिभुवनांत कीर्ति पसरली. सुहृत् मित्र, आर्य व बंधु यांना कोशांप्रमाणें भरलें. समुद्राच्या तीराकर निर्भयपणें

विश्रांति घ्यावयास बसून नारीकेलासव घ्यालें. शत्रूंच्या प्राणांना थर थर कांपविलें. सर्व द्वीपें व कुलपर्वतही माझ्या आज्ञांकित झाले. राक्षसादिकांनांही आपल्या स्वाधीन करून घेतलें. पण शेवटीं आतां मला या जरेनें जीर्ण करावयास आरंभ केला आहे, आणि अशा दशेंत हे भयंकर शत्रू एकमत होऊन मजवर चढाई करून आले आहेत. युद्धांत जय होईलच असा कांहीं विश्वास नाहीं. यास्तव मी आतां येथेंच या जयदायी अग्नीला आपल्या पक्क केशांनीं मंडित झालेल्या मस्तकाची आहुति देतों.

असा निश्चय करून तो वीर राजा अग्नीला उद्देशून म्हणतो—हे देवा, कृशानो, मी आतां हें माझें उत्तमांग तुला पुरोडाशाप्रमाणें अर्पण करतों. हे भगवन्, तूं जर मजवर संतुष्ट झाला असशील तर माझ्या या कृत कर्मानें तुझ्या कुंडातून माझे चार देह उत्पन्न होवोत. ते नारायणाच्या भुजांप्रमाणें अतिशय बलाढ्य व तेजस्वी असोत. म्हणजे त्यांच्या योगानें मी चारी दिशेंतील शत्रूंना निर्विघ्नपणें मारूं शकेन. आणि हे प्रभो, तूं मला दर्शन दे.

रामा, इतकें बोलून त्या राजानं खड्गानें आपलें मस्तक तोडलें व तत्काळ तो वीर त्यासह अग्नींत पडला. त्याबरोबर दीप्त अग्नीनें त्याच्या शरीराचें भस्म केलें व नवे चार देह दिले. कारण महात्म्याच्या उपयोगास आलेली वस्तु तत्काळ वृद्धि पावत असते. याप्रमाणें तो राजा चार शरीरांनीं पुनः अवतीर्ण झाला. त्यांचीं तीं चारी बळकट शरीरें सहज भूषणांनीं अतिशय शोभत होतीं. किरीट, कवच, शिरस्त्राण, बाहुभूषणें, कडीं, हार, कुंडलें इत्यादिकांनीं ते सर्व महाशय झळकत होते. ते चौघेही एकसारख्या आकाराचे, सदृश अवयवांनीं युक्त, व चंचल उच्चैःश्रवासारख्या उत्तम घोड्यावर बसलेले होते. त्यांच्या पाठीवर सोन्याच्या बाणांनीं भरलेले अक्षय भाते, सारख्याच गुणांनीं शोभणारीं धनुष्यें, व इतर दिव्य अस्त्रें होतीं. ते ज्या वाहनांत बसत तीं वाहनें शत्रूंच्या सर्व प्रयत्नांस अगम्य होत असत. असो, सारांश अशा प्रकारचे ते विचित्र पुरुष त्या अग्नींतून निघाले १०९.

**सर्ग ११०—राजधानीपर्यंत येऊन पोंचलेल्या शत्रूंशीं भयंकर युद्ध.**

**श्रीवसिष्ठ**—राघवा, इकडे राजाच्या मंदिरांत हें आश्चर्यकारक वर्तमान जों होत आहे तों तिकडे नगराच्या बाहेरच्या तटापर्यंत शत्रू येऊन पोंचले

व त्यांच्याशीं राजाच्या सैन्याचें तुमुल युद्ध सुरू झालें. त्यामुळें प्रजा व इतर प्राणी यांचे अतिशय हाल होऊं लागले. दोन्ही पक्षातील वीर एकमेकांस मारून मरू लागले. रक्ताचे पाट वाहूं लागले. दुसऱ्या कोणत्याही युद्धाप्रमाणेंच त्यांतही सर्व क्रूर गोष्टी घडल्या. निरनिराळ्या ध्वनींनीं आकाश व भूतल दुमदुमलें. अनक शस्त्राचा उपयोग करीत असलेल्या वीरांनीं आपलें युद्धकौशल व्यक्त केलें. सन्मुख मरणारे भट सूर्यमंडलाचा भेद करून भराभर स्वर्गांत चालले व अशाप्रकारचें तें अंगावर काटा आणणारें युद्ध जणुं काय यमराजाच्या सयमिनी नगरीस भरून सोडण्यासाठींच प्रवृत्त होऊन दीर्घ काल चाललें ११०.

**सर्ग १११**—आपलें सैन्य पराभव पावत आहे, असें पाहून राजा स्वतः संग्रामांत आला व शत्रूस मारूं लागला.

श्रीवसिष्ठ—रामा, याप्रमाणें कल्पांतासारखा तो भयंकर संग्राम सुरू झाला असता, समारांगणांत सेना भराभर मरत असता व वीराचा आक्रोश भीतांना भयभीत करूं लागला असता विपश्चित राजाही आपल्या चार देहांसह रणागणांत आला. तों त्याला आपल्या सैनिकांचा अधिक क्षय झालेला असून शत्रुपक्षाचा उत्तरोत्तर विजय होत आहे, असें दिसलें. त्याबरोबर मी आता या सर्व शत्रूंना यमलोकीं पाठवितों, असा विचार करून त्यानें वायव्यास्त्राचें स्मरण केलें व आपल्या देशाचें व सैन्याचें कल्याण व्हावें, म्हणून अग्नीस प्रमाण करून आणि अस्त्र-मंत्राचा जप करून शत्रूंवर त्याचा चारी दिशेंत प्रयोग केला. त्याचप्रमाणें त्या शूर राजानें आपल्या सहायकांस शत्रूपासून ताप होऊं नये म्हणून पर्जन्यास्त्रही सोडलें. त्या दोन्ही अस्त्रापासून चारी दिशेंत बाणाचे चार प्रवाह निघाले. त्यातून बाणाप्रमाणेंच त्रिशूल, शक्ति, भुशुंड, मुद्गर इत्यादि अनेक शस्त्रें बाहेर पडलीं. भयंकर वायु सुटला. विजा पडल्या, अशनींचा वर्षाव झाला आणि अकस्मात् ओढवलेल्या ऱ्या अनर्थामुळें हाहाकार उडाला. शत्रूंचे सैनिक चोहोंकडे पळूं लागले आणि त्यांतील बरेचसे केवळ भीतीनेंच मेले १११.

**सर्ग ११२**—कोणकोणत्या देशचे लोक कसे कसे नष्ट झाले त्याचें वर्णन.

श्रीवसिष्ठ—रामा, विपश्चित्–राजाच्या त्या भयंकर अस्त्रांपासून निघणाऱ्या परशूंनीं चेदिदेशाच्या योद्धयांचीं शरीरें प्रथम सोलून काढलीं. पारसीयोद्धे वाळलेल्या पानांप्रमाणेंच भराभर उडत कोठल्या कोठें जाऊन पडले. ते वायूच्या महावेगानें उडून जात असतांना एकमेकांसच भ्रमानें मारूं लागले व चेदिभट जसे दक्षिणसमुद्रांत तसे ते वंजुलवनात जाऊन पडले. तसेच दरद योद्धे दर्दुर पर्वतावरील गुहेंत जाऊन लपले. वायव्यास्त्रापासून निघालेला वायूचा वेगतर आयुधांच्या धाराचा वर्षाव करीत मेघाप्रमाणें वेगानें चालला. तेव्हा त्याच्या वेगाबरोबर धुळीप्रमाणें उडत जाणारे हत्ती, घोडे, बैल इत्यादि पशु एकमेकांच्या दात, खुर व शिंगें यांच्या प्रहारानीं जर्जर होऊन मरूं लागले. दरदांतीलच कांहीं वीर रैवतक पर्वताचा आश्रय करून राहिले. पण तेथेंही जीव घेऊन गेलेल्या त्याना आपल्या स्वरूपानें पुरुषास ठकविणाऱ्या पिशाचींनीं वांटून घेऊन खाल्लें. दशार्ण देशचे योद्धे जीर्ण ताडवनात घुसले. पण तेथें सिंहानीं त्यांच्या मानेवर पाय देऊन त्यांस फाडून मारलें. यवन पश्चिम समुद्राच्या काठीं नारळी वनात जाऊन मरून पडले. तों समुद्रांतून वर आलेल्या मकरानीं त्याच्या मांसानें आपली तृप्ति करून घेतली. शकाना बाणाचे वेध सहन झाले नाहींत. रमठांचे प्राण तर ताडवनृत्यच करूं लागले. गांधार वीरांचें रक्षण विद्याधर कुमारींनीं गंधमादन पर्वतावरील पुन्नाग वनांत केलें. हूण, चीन, किरात इत्यादिकांचीं मस्तकें अस्त्रातून निघालेल्या चक्रांनीं फुलाप्रमाणें तोडून टाकलीं. नीलीप्रवीर नळिनीच्या देठावरील स्थिर कंटकांप्रमाणें करंज वनातील प्रत्येक झाडावर लपून राहिले. सारांश याप्रमाणें त्या अस्त्रामुळें चारी दिशेंत क्षोभ झाला. जिकडे पाहावें तिकडे जीव घेऊन सशस्त्र पळणारे योद्धे व व्याकुळ झालेल्या क्षत्रियाचे हाहाकार दिसत व ऐकूं येत होते. आपल्या जन्मभूमीकडे जाणारे अनेक हूण उत्तर सागराच्या वाळवंटांत गळ्यापर्यंत पुरले गेले, कित्येकास दयाळु मुनींनीं आपल्या आश्रमांत आश्रय देऊन वाचविलें. तात्पर्य रघुवीरा, ज्याच्यावर अग्नीचा महा अनुग्रह आहे अशा त्या राजाच्या त्या महास्त्राच्या प्रभावानें सर्व देशचे वीर वर वर्णिल्याप्रमाणें केवळ सागरांतच नव्हे तर क्षेत्रें, अरण्यें, नगरें, जलाशय स्थलें, पर्वत तीर, जलाशय, पाण्याचे

पाट, लहान गांव, त्यांतील घरें, झोंपड्या इत्यादि निरनिराळ्या स्थानीं जाऊन व जीवित, यश, धर्म, ऐश्वर्य व विजय या सर्वांपासून भ्रष्ट होऊन पडलेल्या त्या लोकांची गणना करण्यास कोण समर्थ होणार? ११२.

सर्ग ११३—शत्रूंच्या नाशानंतर अस्त्रांची व साधनांची शांति, समुद्राचें वैभव.

श्रीवसिष्ठ—रामा, याप्रमाणें शत्रूंचे वीर अस्ताव्यस्त व क्लेश भोगीत पळूं लागले असता विपश्चित् राजाचे चारी देहही त्याच्या मागून धावत फार दूरवर गेले. त्या चारी देहाचा अभिप्राय एकच असल्यामुळें सर्व शक्तिमय, सर्व शक्तिसंपन्न, व सर्व देशात एकच अशा चेतन ईश्वरानें ज्यास प्रेरणा केली आहे असे ते दिग्विजय करण्यास प्रवृत्त झाले. नद्याच्या प्रवाहाप्रमाणें ते शत्रुसैन्याच्या मागून समुद्रापर्यंत गेले. पण अशा रीतीनें फार दूरवर शत्रूंचा पाठलाग करीत गेल्याकारणानें त्याच्या सैन्यांतील लोकाजवळ जीवन व युद्ध याचें धन व शस्त्रें इत्यादि साधन संपलें व त्या कारणानें मुमुक्षूंच्या पुण्यपापाप्रमाणें, त्याचें स्वसैन्यही क्षय पावलें. त्याबरोबर वायव्यास्त्रासह पर्जन्यास्त्र निरंधन अग्नीप्रमाणें शांत झालें. विपश्चित् राजाचे सर्व अनुचर वीर आपापल्या जागींच निजल्याप्रमाणें निश्चेष्ट होऊन पडले. रात्रीं घरट्यात लीन होऊन राहणाऱ्या पक्ष्याप्रमाणें व वायु शात झाला असतां जळात लीन होणाऱ्या तरंगाप्रमाणें, ते रथादि स्व-स्व-स्थानीं लीन झाले. त्यामुळें शून्य आकाश शात सागराप्रमाणें क्षोभ-रहित व साधूच्या चित्ताप्रमाणें गंभीर भासलें.

असो; रामा, याप्रमाणें सर्व जीव व अस्त्रें शांत होऊन ते चारी विपश्चित्-देह चारी समुद्राच्या तीरापर्यंत जाऊन पोंचले असतां त्याना आकाशाच्या सदृश धाकट्या भावाप्रमाणें ते चारी समुद्र दिसले. ते फार विस्तीर्ण, निर्मलाकार, सर्व दिशास भरून सोडणारे व तरंगांच्या योगानें किंचित् चलन करणारे सागर जणुं काय व्याधीनें आकुल होऊन भूमीवर पसरलेल्या जीवाप्रमाणेंच, त्यांस भासले. वायूनें आर्त केलेले त्याचे देह जणु काय चंचल होऊन धडपड करीत होते. ते वस्तुतः जड असूनही स्पंद करीत आहेत, असें वाटलें. लाटा, भोंवरे इत्यादि विविध दशांनीं आकुळ झालेले ते जणुं काय विस्तीर्ण संसारच होते. अनेक लहान मोठे जीव व अनेक प्रकारचीं खरीं खोटीं मोत्यें वगैरे रत्नें, यांच्या योगानें

ते अनेक ( चतुर्विध ) प्रकारचे प्राणी व अनेक प्रकारचे शुभाशुभ पदार्थ व गुण यांनीं युक्त असलेल्या भूलोकासारखे होते. क्षितिजा-पर्यंत पसरलेले ते सागर आपलें नीलवर्ण जळ आकाशासच नेऊन भिडवीत आहेत, असें वाटलें. असो, थकलेल्या अवशिष्ट सैन्यासह त्या चारी दिशातील चारी तटावर आलेल्या त्या चारी विपश्चित्–राजदेहांनीं तेथें क्षणभर विश्रांति घेतली ११३.

**सर्ग ११४**—विपश्चित् राजाचे अनुचर त्यास वनवृक्ष, सागर, पर्वत, मेघ व वनेचर दाखवितात.

**श्रीवसिष्ठ**—नंतर त्या राजांचे अनुचर त्यांस तेथील निरनिराळे पदार्थ दाखवूं लागले. ते म्हणाले,–'देव, या पर्वताची आकाशास जाऊन लागणारी ही अग्रभूमी पहा. ह्या इकडे बकुल, पुंनाग, नारीकेल इत्यादि अरण्यांच्या पंक्ति लागल्या आहेत तिकडे दृष्टि लावा. त्यावरून वाऱ्याबरोबर नानाप्रकारचे सुवास येत आहेत, त्यांचा अनुभव घ्या. तीरावरील भूमीला हा समुद्र आपल्या कुदळींसारख्या लहरींनीं कसा खणीत आहे, तें अवलोकन करा. या पर्वताच्या शिखरांवर पाण्यानें भरलेले व त्यामुळेंच एकाद्या स्थूल पुरुषाप्रमाणें मंद झालेले मेघ स्वस्थपणें विश्रांति घेत आहेत. ब्रह्म जसें जगाना त्याप्रमाणें हा समुद्र अनेक तरंगांना आपल्या पाठीवर वहात आहे. यात जगातील इतर प्राण्याप्रमाणेंच शरीरपोषणार्थ व इष्ट संपादनार्थ जलचर लहान–थोर जीवाचा कलह सतत चालला आहे. याच्या तीरावरील वृक्ष पापीजनांप्रमाणें आपल्या अधःपाताची क्षणोक्षणीं आकांक्षा करीत राहिले आहेत. भाग्यवानांला प्रतिक्षणीं चोहों-कडून येऊन मिळणाऱ्या भाग्यसंपत्तीप्रमाणें नद्या या सागराला प्रतिक्षणीं विपुल जलासह येऊन मिळत आहेत. भगवन्, या महापर्वतांवर जसे अनेक वृक्ष, अनेक वेली, अनेक नद्या, व अनेक पाषाण आहेत, तसेच अनेक जीवही याचा आश्रय करून राहिलेले आहेत. काक, गृध्र, भास, चाष, राघु, मैना इत्यादि विविध पक्षी, सिंह, व्याघ्र, गज, हरिण, इत्यादि नानाप्रकारचे हिंस्र व अहिंस्र पशु, शबर, मातंग, व्याध, मुनि, संन्यासी इत्यादि विविध असाधु व साधु पुरुषही त्यांवर आहेत. साराश हे राजन्, तुमच्या राष्ट्रांप्रमाणें या महाशैलावरही विलक्षण वैचित्र्य आढळतें. अथवा

वैचित्र्य हेंच या जगाचें स्वाभाविक स्वरूप आहे, व त्याचा प्रत्यय सृष्टींतील कोणताही पदार्थ घेऊन त्याचें सूक्ष्म निरीक्षण करूं लागलें असतां येतो ११४.

**सर्ग ११५**—चारी दिशेंतील वनें, पर्वत, वृक्ष, नद्या, समुद्र, पक्षि, इत्यादिकांचें वर्णन.

**अनुचर म्हणतात**—हे उत्तमाशय राजा, या पर्वताच्या पाठीवरील लतावलयांकित प्रदेशात बसून हे किन्नरगण मधुर गायन करीत आहेत, तें ऐका. महाराज, हे हिमालय, विंध्य, सह्य, क्रौंच, इत्यादि महा पर्वत वस्तुतः अतिशय उच्च असूनही येथून फार दूर असल्यामुळें किती लहान दिसत आहेत, तें पहा. त्यांच्या शिखरावरील शुभ्र मेघपटल शुभ्र वस्त्राप्रमाणें भासतें. वस्तुतः त्यांच्या अंगावर सर्वत्र विषमता असूनही आम्ही प्रेक्षक दूरस्थित असल्यामुळें, ते आम्हाला अगदीं सुसम आहेत, असा भास होतो. ते अतिशय विस्तृत असले तरी मधील अंतर फार मोठें असल्यामुळें आमच्या दृष्टीला एकाद्या मोठ्या प्रासादाप्रमाणें रमणीय दिसतात. आम्हाला येथून एकमेकास लागून उभे असल्याप्रमाणेंच दिसणारे ते एकाद्या महादुर्गाच्या कोटाप्रमाणें भासतात. राजन्, पर्वतावरून वेगानें खालीं उतरून समुद्रास जाऊन मिळणाऱ्या या नद्या सूक्ष्म व शुभ्र वस्त्राच्या आंचळ्यांप्रमाणे दिसत आहेत. पृथ्वीपते, ज्यानीं पर्वतांच्या मस्तकावरून मेघाचें पांघरूण घेतलें आहे, ज्याचा आकार मेघासारखाच काळा आहे, पक्ष्याचा किलकिलाट हाच ज्याचा सुंदर ध्वनि आहे, वेलींनीं सोडलेल्या पुष्पवृष्टींनीं ज्यांचीं शरीरें भूषित झालीं आहेत व शोभणाऱ्या वनपंक्ति याच ज्याच्या भुजलता आहेत अशा या दहा दिशा जणुं काय तुझ्या राण्यांना हंसतच तुजपुढें उभ्या आहेत. ताल, तमाल, बकुल इत्यादि वृक्षांनीं ज्याचीं शिखरें व्यापलीं आहेत. अशा दुरून एकाद्या ढिगाप्रमाणेंच दिसणाऱ्या पर्वतावर एकाकार झालेलें व वाऱ्यानें हलणारें वन, सागराचे तरंग जोरानें ज्यावर आदळत आहेत, अशा शेवाळाच्या ढिगाप्रमाणेंच दिसत आहे. अहाहा स्वामिन्, या सागराचें शरीर किती विस्तृत, ऊर्जित व भार सहन करणारें आहे, तें पहा. कारण याच्या एका भागांत केशव शयन करीत आहे व दुसरीकडे त्याच्याच शत्रूंचें

कुळ आहे; एकीकडे पर्वतरूपी पक्षी याचे आश्रयास येऊन राहिले आहेत. दुसरीकडे त्यानें आपल्या भक्षक शत्रूलाही संवर्तकादि सर्व प्रलयकारक मेघांसह आधार दिला आहे. (उत्तर दिशेतील विपश्चित् राजास त्याचा कोणी अनुचर म्हणतो–) महाराज, जेथील सर्व ग्रामादिक सोन्याचे आहेत, असे हे सूर्यकिरणांनीं व्याप्त झालेले जंबुनदीचे तट कसे चमकत आहेत, ते पहा. ते जणुं काय सभोंवार प्रकाशाचे प्रवाहच सोडीत आहेत. खरोखर ही अशा प्रकारची भूमि देवानाच सुसेव्य आहे, ती मानुषांच्या उपयोगाची नाहीं. हे पहा, या पर्वताचे ऊर्ध्वभूमिभाग मेघासारखें काळें कदंबवन, हेंच कांबळें पांघरून सूर्याच्या मार्गांत उभे राहिले आहेत. पण तुझ्या पृथ्वीसारखेच तेही तट आहेत, असें तूं जाण. ते सूर्याला रोध करणारे आकाशस्थ मेघ आहेत, असें समजूं नको. (दक्षिण दिशेकडे शत्रूचा पाठलाग करीत गेलेल्या विपश्चित्–राजाचा एक अनुचर म्हणतो––) राजन्, हा पुढें दिसणारा मलयाद्रि मोठा प्रभावशाली आहे. कारण त्याच्यावरील श्रेष्ठ लवली वेलींनीं वेष्टित झालेल्या चंदनाच्या विस्तृत सुगंधाने अन्य वृक्षही चंदनासारखेच सुवासिक होतात व त्याचा कल्क (गंध) देव, मनुष्य व असुर आपल्या कपाळावर मंगलचिह्न म्हणून धारण करितात. फार काय पण हा (पर्वत) तांडवनृत्य करून श्रांत झालेल्या शंकराच्या गालावरील शीतलचंदनलेपानें त्यालाही आनंद देण्यास कारण होतो. समुद्राच्या लाटांनीं ज्याच्या पायांना (प्रत्यंत पर्वताना) धुवून स्वच्छ केलें आहे अशा या मलयावर चढून मोठमोठे नाग आपल्या शरीरानीं चदनास वेढून बसतात. विद्याधरी ह्यावरील मोठमोठ्या शिलावर येऊन आरूढ झालेल्या असतात. भगवन्, हा क्रौंच पर्वत पहा. यावरील वेळूंचें वन वेळूच्या छिद्रांत शिरणाऱ्या व त्यामुळेंच सुंदर ध्वनि करणाऱ्या वाऱ्याच्या द्वारा जणुं काय मंजुळ गायन करूं लागलें आहे व त्यामुळें या पर्वतावरील पुष्पांच्या कळ्यावर बसलेले भ्रमर मूकभाव धारण करून तें ऐकतच आहेत. या उंच पर्वताच्या उंच शिखरावरून संचार करणाऱ्या बलाकाप्रिय मेघाना पाहून मयूर आनंदानें टाहो फोडूं लागतात व तो ऐकून भयभीत झालेले सर्प जीर्णवृक्षांच्या ढोलींत शिरून व आपल्या विस्तृत शरीराचा संकोच करून नुसतें मस्तक मात्र वर काढून पहात

राहतात. हे राजन्, या पर्वतावरील लतामंडपांत आपापल्या प्रियांसह बसलेल्या व विलास करणाऱ्या ललनांच्या कंकणांचा रात्री लोकांच्या कानांस तृप्त करणारा ध्वनि ऐक. हे महाराज, अमृतमंथनप्रसंगीं क्षीरसागरांतून निघालेल्या नवनीताप्रमाणेंच ज्याचें शरीर आहे, असा हा चंद्रमा तसल्याच शरीरांच्या आपल्या तारका–प्रियांसह क्षीरसागरात प्रतिबिंबित होऊन जणुं काय आपल्या पित्याच्या मांडीवर जलक्रीडाच करीत आहे, पहा. महाराज, ज्यांच्या चंचल व लाल पल्लवरूपी हातांत पुष्पांचे गुच्छ आहेत अशा या मलयावरील लतास्त्रिया पुष्पपरागांचाच तिलक लावून कशा नाचत आहेत, तें पहा. हे राजा, पर्वतावरील एकाप्रकारच्या वेळूमध्यें शिरलेले जलबिंदु मोतीं होतात. तसेंच समुद्रात जलाची इच्छा करून ज्यानीं आपलें तोंड उघडलें आहे अशा शिंपांतून शिरलेले स्वातीनक्षत्रातील मेघजलबिंदु मोतीं बनतात किंवा गंधहस्तीच्या कुंभात तीं (मोत्यें) उद्भवतात. मोत्यांच्या अशा या तीन जाति आहेत. पण त्यातूनही जेथें जेथें त्याना उत्तम व शुद्ध स्थान मिळतें तेथें तेथें तीं (मोत्यें) आकारानें अधिकाधिक स्थूल होतात. त्याचप्रमाणें व्यवहारातही उत्तम गुणांपासूनच उत्तम गुणांचा उद्भव होतो. निरनिराळीं रत्नेंही पर्वत, सागर, पुरुष, पृथ्वी, मेघ, बेडुक, शिला, गज, इत्यादि निरनिराळ्या खाणींतून (स्थानांतून) उत्पन्न होतात व त्यांच्या क्रिया व गुणही विचित्र असतात. भगवन्, चंद्रोदय होतांच नगरातील वातायनादिकांतून लोक हे कसे हर्षयुक्त घोष करीत आहेत ते पहा. ते जणु काय चंद्राचा स्तुतिपाठच करीत आहेतसें वाटतें. अहो राजाधिराज, गंगातरंगांनीं शीतळ झालेल्या व ज्याच्या शिलांवरून विद्याधराचीं जोडपीं बसलीं आहेत अशा या महेंद्रपर्वताच्या तटप्रदेशांत पहा. कारण अतिशय पुण्यकारक देश-वनें-तीर्थें इत्यादिकांस पाहिल्यानें दुर्भाग्याची निवृत्ति हें महाफल मिळत असतें. प्रभो, श्रीशैलादि शृंगें, साधु-जनांनीं भरलेलीं दिगन्तरें, पवित्र कूप-वापीप्रभृति श्वभ्रें, हिमवानादिकाचीं अभ्रयुक्त शिखरें, व गुहा, चंपकारण्यें, पवित्र व नानाप्रकारच्या सुंदर वृक्षांनीं मंडित झालेलीं जलकुंडें, व सेतुबंधादि तीर्थें अवलोकन केल्यानें मानवांचीं ब्रह्महत्येसारखीं महा पातकेंही नाश पावतात. वास्तव अनेक उत्तम वस्तूंनीं शोभणाऱ्या कुलपर्वतांचें दर्शन प्रत्ये-

कानें अवश्य ध्यावें. कारण त्यावांचून नेत्रांचें सार्थक्य होत नाहीं. ( या सर्गांत अशाच प्रकारचें आणखी विचित्र वर्णन विस्तार-पूर्वक केलेलें आहे. पण संस्कृतमध्यें वाचकांना तें जरी फारसें कंटाळवाणें न वाटलें तरी केवळ मराठी वाचकास तें तसें वाटण्याचा बराच संभव आहे. शिवाय ग्रंथाचा विस्तारही होत आहे. यास्तव या व असल्याच पुढच्याही दुसऱ्या सर्गांचा सारांश मात्र देण्याचा विचार केला आहे. ) तात्पर्य, हे विजयी राजा, तूं आपल्या विजयानें पुनः संपादन केलेलें हें भूमंडळ अशा अनेक चमत्कारानीं, व वृक्ष, पक्षी, मृग, मानव, इत्यादि पदार्थांनीं भरलेलें आहे. विशेषतः या सर्व पर्वतांकडे पाहिलें म्हणजे विधात्यानें आपल्या विश्रांती-करिता ते रम्य अमृतपूर्ण मंडपच रचले आहेत, असा भास होतो ११५.

**सर्ग ११६**—पुनरपि संग्रामादिकाचें वर्णन.

अनुचर—राजन्, या तुझ्या शत्रूच्या सैन्याची कशी त्रेधा उडाली आहे, ती पहा. त्यातील लोक आपापलीं शस्त्रें खालीं ठेवून जीव घेऊन पळत आहेत. त्यातील लढताना सन्मुख मेलेल्या वीराना देवांगना विमानात बसवून नेत आहेत. खरोखर, तारुण्यात जसें विलासशील शोभतें त्याप्रमाणें असलें धर्म्य युद्ध प्राण-संकट-समयीं विजयी वीराला फार शोभतें. कारण लोकानीं न निंदिलेली लक्ष्मी, ऐश्वर्ययुक्त आरोग्य, व धर्म्य युद्ध हींच जीवनाचीं उत्तम फळें होत. धर्मतः युद्धात प्राण देणारा स्वर्ग-सुखास पात्र होतो. असो; महाराज, हातात विविध शस्त्रें घेऊन सन्मुख मरून पडलेल्या या आपल्या शत्रु-वीराचेंही तूं अभिनंदन कर. कारण आता ते तुझ्या करुणेस पात्र झाले आहेत. असो; हे अधिराज, मेघसागरानीं भरलेल्या या आकाशास पहा. तरल तारकाचा हा मोठा हारच त्याच्या गळ्यात आहे. तें कसें नीलवर्ण आहे, पहा. चंद्राचे किरण जणुं काय त्याचा दिवसकृत संतापच शमवीत आहेत. त्यातील देवादिकाच्या विमानानाच तारा हें नाव प्राप्त झालें आहे. आकाश अश्विनीप्रभृति अनेक नक्षत्रें व चंद्र—सूर्यादिकाचीं मंडळें यानीं सर्वतः व्यापून राहिलेलें असतांना अज्ञ त्याला शून्य म्हणण्याचें अजून सोडीत नाहींत. साराश आकाशासारखा अति मोठा पदार्थही जर आपल्यावर अज्ञ लोकांनीं आरोपिलेला दोष घालवू शकत नाहीं तर दुसरा क्षुद्र जीव तो कसा घालविणार ? राजन्, मेघांचीं अनेक अव-

डंबरें, प्रलयाग्नि, पर्वतांच्या पंखांचा छेद, तारांचा पूर, देवासुरांचे अनेक क्षुब्ध संग्राम इत्यादि अनेक विचित्र प्रकार घडले तरी बिचारें आकाश अद्यापि आपली प्रकृति ( स्वभाव ) सोडीत नाहीं. यावरून—महा गुणशाली महात्मे आपल्या महिम्याचा अंत लागूं देत नाहींत.—असेंच ठरलें कीं नाहीं. !! अरे बा महासाधो, आकाशा, तूं एकसारखें सूर्य, चंद्र, नारायण, इतर सर्व देव व ग्रह इत्यादिक तेजास व विद्युत्प्रभृति भासुर दीप्तींसही आपल्या मांडीवर बसवून लहान मुलांप्रमाणें डोलविलेंस; पण आपलें आध्य ( जडत्व, श्यामत्व ) अजून सोडीत नाहींस; हें आश्चर्य आहे. बा गगना, तू स्वतः मलिन आहेस; पण तुझ्याच आधारानें असलेल्या चंद्राला तूं मलिन कसें करीत नाहींस, हें मोठें आश्चर्यच होय. अथवा त्यात आश्चर्य तरी कसलें ? मलिनाच्या संगानें आतून स्वभावतः मलिन असलेला पुरुषच बाहेरूनही मलिन होतो. कारण आतून निर्मळ असलेल्या जनाला मलिन करण्यास कोण समर्थ आहे ! ( तुझ्या आधारानें राहणाराही चंद्र मलिन झाला नाहीं, हें सर्व त्याच्याच निर्मलतेचें फळ व लक्षण आहे. ) अथवा एकाद्या तत्त्ववेत्याप्रमाणें सर्व जगद्दोषानीं भरलेल्या, पण तरीही, आपली निर्विकार स्थिति न सोडणाऱ्या या आकाशाला सर्व अनर्थ—शून्य सुख सुलभ आहे. हे उदारबुद्धे आकाशा, तूं कल्पातींचे मेघ, वृक्ष, वेली, लता इत्यादि उन्नतीची इच्छा करणाऱ्या सर्व वस्तूंस अवकाश देऊन त्याची उन्नति करतेंस. त्याचप्रमाणें चंद्र, मेघ, सूर्य, किन्नर, वायुस्कंध, देव इत्यादिकांस धारण करतेंस. यास्तव सम व स्वच्छस्वभावाच्या तुझें हें कृत्य रम्यच होय. पण अग्नि, सूर्य, इत्यादिकांनाही अवकाश देऊन आमच्या संतापाचें निमित्त होतेंस, हें मात्र चांगलें नव्हे. तूं शून्य असूनही मेघांदिकांस धारण करतेंस, हें मोठेंच आश्चर्य आहे. तूं दिवस संपला असता अग्नीसारखें लाल भडक होतेंस, रात्रीं काळें कुट्ट दिसतेंस; व सदा सर्ववस्तुशून्य असल्यामुळें रिकामें असतेंस ही तुझी विचित्र लीला मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांनाही कळत नाहीं. अति विशालबुद्धि तत्त्ववेत्ता दरिद्र असला तरी जशीं आपलीं इष्ट कार्यें साधितो तसें शून्य आकाशही सर्वांची उन्नति करतें.

राजन्, सात्त्विक पुरुष एकदा आरंभलेलें कठिम कार्यही कधीं सोडित नाहींत. याचें उदाहरण पाहावयाचें असल्यास या भगवान् सूर्याकडे पहा. हा नारायण गगनमार्गामध्यें तृण, जल, वृक्ष, ग्राम, नगर इत्यादिकांतील एकादेंही विश्रातीचें साधन नसलें तरी प्रत्यहीं त्यांतून संचार करतो. दिवस सूर्यप्रकाशरूपी नव्या वस्त्रानें आपणास भूषित करतो. द्युलोक रात्रीं नक्षत्ररूपी पुष्पांच्या संभारानें आपणांस अलंकृत करतो, वसंतादिक सर्व ऋतु मेघतुषारादि जलपुष्पानीं आपणांस सुशोभित करितात, रात्र अंधकाररूपी वस्त्राचा बुरखा घेऊन आपणास सजविते. शीतल चंद्र कापुरासारख्या शुभ्र किरणानीं स्वतः नटतो आणि हे सर्व मिळून कालकलारूप त्रिभुवननाथ चंद्र—सूर्यांच्या क्रीडास्थानरूप आकाशांगणास भूषित करितात. महाशयांची स्थिति विचित्र (आश्चर्यरूप) व उन्नत दिसते. कारण धूर, ढग, धूळ, अंधकार, सूर्य, रात्र, चंद्र, संध्यासमय, नक्षत्रें, विमानें इत्यादिकाच्या क्षोभानेंही क्षुब्ध होऊन हें अंतरिक्ष आपली स्थिति सोडीत नाहीं.

अहाहा? राजाधिराज, हें त्रिभुवन तर मला एका जीर्ण गृहासारखें दिसत आहे. कारण दिशा ह्याच त्याच्या भिंति आहेत. अंतरिक्ष हीच वरील माडी आहे. भूमि हाच तळमजला आहे. नगरें व पर्वत हींच घरातील अनेक भाडीं आहेत. विद्याधरादिक हेच त्यातील जाळीं बाधणारे कोळी आहेत व जरायुजादिक चार प्रकारचे प्राणी ह्याच त्यात सतत संचार करणाऱ्या मुग्या आहेत. एकाद्या उपवनांत राहून त्याचें रक्षण करणाऱ्या माळयाच्या जोडप्याप्रमाणें असल्या या जीर्ण गृहात काल व क्रिया याचें जोडपें दीर्घ काल राहत असून तेंच त्याचें पालन करीत आहे. पण तें जोडपें विवेक्यावाचून दुसऱ्या कोणाला दिसत नाहीं व प्रतिदिवशीं त्याचा नाश होतो, अशी जरी शंका आली तरी तें अद्यापि जसेंच्या तसेंच आहे. म्हणजे क्षणोक्षणीं बदलत असलें तरी प्रवाहरूपानें नित्य आहे. खरोखर हें केवढें मोठें आश्चर्य आहे बरें, मला वाटतें कीं, हें आकाश वृक्षादिकांच्या उन्नतीस व वृद्धीस जणुं काय प्रतिबंधच करीत आहे. पण निरोधव्यापारशून्य असलेल्या त्याला निरोध कसा करितां येईल, अशी शंका कोणी घेईल; परंतु महात्म्याच्या माहा-

त्यानेंच त्यांना कर्तृता येत असते. याला पर्वताचें चांगलें उदाहरण आहे. वस्तुतः ते कोणाला प्रतिबंध करीत नसतांना 'पर्वत मार्गाला प्रतिबंध करितात' असा शब्दव्यवहार होतो. जेथें लक्षावधि जगें लीन होतात व ज्यांतून तीं उद्भवतात त्या आकाशाला शून्य म्हणणाऱ्या पंडिताच्या पाडित्याला धिक्कार असो. आकाश ईश्वराहून अन्य आहे, असा भेद उन्मत्ततेस प्राप्त होणाऱ्याच वाचार्ने केला आहे. ( शुद्धीवर असलेला दुसरा कोणीही तो करणार नाहीं ). कारण सर्व जगें आकाशातून उत्पन्न होतात, त्यातच रहातात व त्यांतच लीन होतात. यास्तव सर्व शास्त्रसिद्ध ईश्वरलक्षण आकाशात आहे. म्हणून तेंच ईश्वर होय. ( कोणी तत्त्वज्ञ अनुचर राजाला म्हणतो— ) राजन्, तूं आकाशापासून अग्निविस्फुलिंगन्यायानें जगाचा जन्म झाला आहे, असें जर समजत असलास तर तुला तें ( आकाश ) जड आहे, असें म्हणतां येणार नाहीं. तें मद्रूप आहे, असेंच मानावें लागेल. कारण चेतनामध्यें भेद आहे, असें समजण्यास काहीं विशेष प्रमाण नाहीं. अर्थात् सर्व शरीरात राहणारा हा मीच ईश्वर आहें. कित्येकांच्या समजुतीप्रमाणें तो तटस्थ ( राजाप्रमाणें एके ठिकाणीं मर्यादित होऊन राहणारा ) नाहीं. जें या सर्व अनंत वस्तूंना आपल्या अंगावर धारण करतें, तें त्रिजगद्रत्नाचें आधारभूत आकाशच चिद्रूप परब्रह्म आहे, असें मी समजतों. ( आणखी एक सहचर पर्वतावरील कौतुक दाखवून म्हणतो—) महाराज, हा पहा, एक कामी वनचर पुरुष पर्वतशिखरावरील वनभूमींत बसून सुंदर गायन करीत आहे व तो पहा, दुसरा एक तसलाच विषयी व प्रियेपासून दूर झालेला पुरुष पर्वताच्या खालून जात असताना तें गायन कानीं पडल्यामुळें सोत्सुख होऊन वर त्याच्याकडे मोठ्या प्रेमानें पहात आहे. ( दुसरा एक तसलेंच कौतुक दाखवून म्हणतो—) हे नाथ, या पर्वतशिरस्थ वनांतील त्या उच्च वृक्षावर पल्लवमंडपात बसलेली एक विद्याधरी वियोगामुळें उत्कंठित होऊन सद्गदित कंठानें कांहीं गात आहे व खालून जाणारा हा कोणी पथिक तें ऐकून मनांत क्षुब्ध होत आहे. त्याचें पाऊल पुढें पडेनासें झालें आहे. त्याच्या बरोबरचे लोक त्याला 'चल' असें म्हणत असूनही तो जाग्यावरून हालत नाहीं. ती विद्याधरी बाष्पाकुल होऊन कपाळावरील तिलक पुसला

गेला असतांनाही 'हे नाथ, तुझ्या स्मरणानेंच ज्याला आग लागत आहे, अशा या संतप्त व व्याकुल चित्तानें मी हे संवत्सर मोठ्या कष्टानें येथेंच बसून घालवीत आहें' असें म्हणून गात आहे. हिच्या तरुण विद्याधर पतीला कोणी मुनीनें शाप देऊन बारा वर्षे वृक्ष केलेलें असल्या-मुळें ही त्याच वृक्षावर बसून एकेक दिवस मोजीत आहे. हे प्रभो, हा इतिहास मी याच मार्गातील एका पुरुषाच्या तोंडून ऐकला. मुनीनें 'तो शाप आपले ( विपश्चिद्राजाचें ) दर्शन होतांच निवृत्त होईल, असें त्यास सांगून ठेवलें होतें. त्याप्रमाणें आता तुमचें त्याला दर्शन झालें आहे, पहा, पहा; तो वृक्ष आपलें वृक्षत्व सोडून विद्याधरत्वास पुनः प्राप्त होत आहे. अहाहा! स्वामिन्, आपला प्रियकर आज फार दिवसांनीं सशरीर झाला आहे असें पाहताच एका क्षणापूर्वी जी अबला अश्रूंचा वर्षाव करीत होती तीच आता हास्यामृताचा स्राव करूं लागली आहे; व तोही पुण्यवान् शापक्षय होतांच हर्षाश्रू आणून प्रियकांतेची संभावना करीत आहे. प्रेमरूपी रज्जूनें बांधिलेलीं हीं भूतें परस्पर कशीं अत्यासक्त होतात आणि त्यामुळेंच क्षणांत सुख व क्षणांत दुःख कशीं भोगतात, याचें हें साक्षात् उदाहरण आहे, असो; हे राजाधिराज, मलय पर्वत व कावेरी नदी हीं दोन या दक्षिण दिशेचीं स्वाभाविक भूषणें आहेत. या सृष्टींत सर्वत्र कामदेव क्रीडा करीत आहे, असें जीवांच्या प्रत्येक चेष्टेकडे पाहून वाटतें. ( आता येथून पुढें अनेक अन्योक्ति आहेत. त्यांतील कांहीं चांगल्याचें सार मी येथें देतों. ) बा मेघा, तूं श्रीमंताप्रमाणें महा उदार आहेस. तुला जगत्पालनाची इच्छा आहे. तूं महाशय आहेस. तुझी आकृति आतपाचें ( उन्हाचें ) हरण करणारी व अतिशय उंच आहे. बा मेघा, तूं पर्वतांच्या मस्तकाचें भूषण होऊन रहात असतोस; शेत, बाग, इत्यादि भूमीच्या रसांचें स्थान आहेस; पण तुजमध्यें असे सहस्रा-वधि गुण असले तरी तूं पात्रापात्राचा कांहीं विचार न करितां माळ जमीन, पाण्यानीं भरलेलीं डबकीं, समुद्र, कांटेरी झाडांचीं अरण्यें इत्यादि-कामध्येंही चांगल्या क्षेत्राप्रमाणेंच वृष्टि करीत असतोस, हें पाहून मात्र सज्जनांच्या मनाला अतिशय खेद होतो. कारण तुझ्यासारख्या महात्म्यानींही जर सुपात्र व गुणांचा उत्कर्ष यांस मान न दिला तर आणखी कोण

देणार ! अरे बा मेघा, तूं समुद्र, गंगा इत्यादिकांच्या पवित्र जलानें नित्य स्नान करतोस, त्याचप्रमाणें उंचावर उभा राहून सर्व प्राण्यांना जल देतोस, नतर अतिशय शुद्ध होऊन तपोवनांतील मुनींप्रमाणें मौन धारण करतोस, व शरत्कालीं आपल्या जवळचें सर्वस्व देऊन टाकल्यामुळें अगदीं अकिंचन झालेलाही तूं आपल्या शुभ्र अंगकांतीनें अतिशय शोभतोस; पण इतके सगळे गुण तुझ्यामध्यें असूनही तूं जेव्हां दान द्यावयास प्रवृत्त होतोस तेव्हां अशनि, विद्युदग्नि, कटुशब्द, इत्यादिकांच्या योगानें जीवांना भयभीत करतोस, हें मात्र तुला शोभत नाहीं. कारण तें क्षुद्रांच्या शीलालाच शोभत असतें. (मेघालाच पाहून आणखी एक राजानुचर म्हणतो–) अस्थानीं गेलेली सर्व शुभ वस्तुही अशुभ होते. कारण हें शुभ जल मेघासारख्या दुष्टस्थानीं जाताच कसें काळें दिसत आहे तें पहा. अहो, काय चमत्कार सांगावा ! मेघानें जल सोडलें, त्या जलानें भूमीला भरून सोडलें; व धनाढ्य पुरुष जसे दरिद्र सुहृदास पोसतात त्याप्रमाणें त्या जलपूर्ण भूभागांनीं सुकलेल्या शेतांतील सस्यांस पुष्ट केलें. निर्दयत्व, अस्थिरत्व, अपवित्रत्व, मोठ्या मार्गांतून संचार करणें व निंदितत्व हे धर्म मूर्खांनीं कुत्र्यापासून घेतले, कीं कुत्र्यानीं मूर्खांपासून घेतले याचा निर्णय करवत नाहीं. असले मूर्ख जरी सर्वदा निंद्य असले तरी राजासारख्या स्वार्थपरायण लोकांना ते शौर्यादि कांहीं थोड्याशा गुणानींही मान्य होतात, व ते त्यांचा आदरानें संग्रह करितात. मेघगर्जनाप्रभृति कोलाहल सिंह अक्षुब्ध मनानें व निरादरानें डोळे मिटून सहन करितात व कुत्रे भयभीत होऊन व भयानेंच डोळे झांकून घेऊन मोठ्या कष्टानें ऐकतात. अरे बा कुत्र्या, तुझ्यामध्यें आपल्यासारखेच गुण आहेत, असें पाहून कोणीं मूर्खानें तुला नित्य अपवित्रता, अप्रिय जनावर भों भों करणें, रस्त्यांतून फिरत व्यर्थ काळ घालविणें, इत्यादि गुण शिकविले आहेत, असें मला वाटतें. व त्यामुळेंच तुझ्यापेक्षां तुझ्या गुरूमध्यें असल्या गुणांची अधिक समृद्धि असावी असें अनुमान होतें. विचित्र जग निर्माण करणाऱ्या विधात्यानें आपल्या वैचित्र्यास विसरूनच जणुं काय सर्व मूर्खांमध्यें प्रायः समान धर्म निर्मिलेले आढळतात. अरे बा कावळ्या,

झांकून टाकतोस. त्यामुळें तुला पाहतांच माझ्या मस्तकांत शूळ उठतो. राजन्, कावळा कमळनाळाला सोडून अमंगळ पदार्थ उचलतो, हें पाहून तूं विस्मित होऊं नकोस. कारण अभ्यासानें निंद्य खाद्यही स्वादिष्ट वाटूं लागतें. नेहमीं कांदे किंवा लसूण खाणारांना त्यांचा कसा स्वाद येतो तें पहा. अनेक उद्यानांतून संचार केल्यामुळें नानाप्रकारच्या पुष्पाच्या परागांनीं शुभ्र झालेला कावळा हंसासारखा जरी वाटला तरी कृमींनीं भरलेलें व सडलेलें मांस वगैरे तो उचलित आहे, असें पाहतांच त्याच्याविषयींची मिथ्या कल्पना निवृत्त होते. पंख, काळा रंग इत्यादिकामुळें कोकिलाच्या बरोबर असलेला कावळा जरी सकृत्-दर्शनीं ओळखिता न आला तरी त्यानें तोंडांतून शब्द काढ-ताच त्याचें स्वरूप व्यक्त होतें. ( अर्थात् कोकिलांच्या संघांत असलेल्या कावळ्यानें शब्दोच्चार न केल्यास तो कावळा आहे असें कोणालाही वाट-णार नाहीं. ) राजन्, हा पहा या महा अरण्यातील जीर्ण भित्तिस्तंभावर बसलेला कावळा रात्रीं सर्व लोक निजल्यावर चोर जसा उंच वृक्षावर चढून चोहोंकडे टेहेळणी करतो त्याप्रमाणें सभोंवार वांकड्या माना करून पहात आहे. या सारसमय सरोवरात हा कावळा कोठून आला ? अरेरे, हा पहा, कावळा या हंसाच्या वसति-स्थानीं येऊन त्याच्या बरोबर आपणही त्याच्यासारखीच जलक्रीडा करीत आहे. पण हंस व काक यातील अंतर जाणणारे सुज्ञ त्याला हंस म्हणत नाहींत. अरे कर्कश रवानें श्रोत्यांचे कान फाडणाऱ्या कावळ्या, तूं जेव्हा आपलें इष्ट खाद्य पाहतोस तेव्हा का-का-का असा मोठा शब्द करून आपला भाग दुसऱ्या कोणीं घेऊं नये म्हणून आपल्या सजातीयांना बोलावितोस. पण तोच तुझा अभि-मान कोकिलाच्या पोरांना पाळतांना कोठें जातो ? स्वभावतःच अतिशय कटु भाषण करणाऱ्या तुला सुस्वर कोकिलांवर उपकार करणें शोभत नाहीं. अरे बा कोकिला, तूं आता काहींएक न बोलतां एकाद्या जीर्ण वृक्षाच्या ढोलींत मुकाट्यानें बैस. कारण यावेळीं शिशिर आहे. यास्तव तुझें हितावह भाषणही कोणी ऐकणार नाहीं. पण हा काल जाऊन लव-करच वसंत आला म्हणजे मग तूं आपली बोलण्याची हौस पूर्ण करून घे. कारण त्यावेळीं तुला श्रोते पाहिजे तितके मिळतील. हा कोकिल

आपल्या कावळी मातेला सोडून गेला व तीही त्याला चोंच व पायांचीं नखें यांनीं पीडा देऊं लागली. हें पाहून मी जों थोडासा आश्चर्यचकित होत आहें तों तो कोकिल बालकही आपल्या आईसारखाच मोठा होण्यास उद्युक्त झाला. सारांश स्वभावतःच भाग्यवान् असलेला जन ज्या दिशेस जातो ती दिशा त्याचें माहात्म्य वाढविते ११६.

**सर्ग ११७—सरोवर व त्यांतील कमलें, भ्रमर इत्यादिकाचें वर्णन.**

**सहचर**—राजन्, हें समोर दिसणारें सरोवर पहा. तें पर्वत-शिखरावर प्रतिबिंबित झालेल्या पक्षियुक्त आकाशाप्रमाणें दिसत असून कामोद्दीपक असल्यामुळें मदनाचा हा पुरःसर भृत्यच आहे कीं काय, असा भास होतो. वाहनभूत हंस, ब्राह्मण इत्यादिकानीं व्यापलेल्या ब्रह्म-लोकाप्रमाणें हें भूमिस्थ सरोवरही हंस, भ्रमर, सारसादि द्विज यानीं युक्त आहे. यातील नानारंगी कमलें फुललेलीं असून त्यांच्या उन्मत्त करणाऱ्या सुगंधानें मत्त झालेले भ्रमर मधुर गुंजारव करीत आहेत. यांत कोठें विक्षिप्त चित्ताप्रमाणें चंचल तरंग आहेत, कोठें भ्रमर भाडत आहेत, कोठें निश्चल व स्वच्छ जलाच्या योगानें तें सुंदर दिसत आहे. आणि कोठें तर फुललेल्या दाट कमलाच्या योगानें तें सुकूनच गेलें आहे, असा भास होत आहे. महाराज, तो पहा, महा सिंह पाणी पिण्याकरिता मोठ्या उत्सुकतेनें याच्या कांठीं आला. पण त्यांत आपलेंच प्रतिबिंब पाहून दुसऱ्या सिंहाच्या शंकेनें पाणी न पितांच तो निराश होऊन परत जात आहे; आशेनें जवळ आलेल्या प्राण्याना निराश करणाऱ्या या सरोवराचा जसा तिटकारा वाटतो त्याचप्रमाणें या मानी सिंहाच्या स्वाभिमानाचेंही मोठें कौतुक वाटतें. यात एकीकडे वायूनें हालविल्यामुळें कमलांचें कपिश रज उडत आहे, व दुसरीकडे तें आपल्या स्वच्छ जलानें काळें भोर भासत आहे. त्यामुळें तें संध्याकाळच्या आकाशाचेंच अनुकरण करीत आहेसें दिसतें. अनेक उत्तमोत्तम वस्तूंनीं सुशोभित झालेलें हें सरोवर सत्संगाप्रमाणें रसयुक्त व आल्हाद देणारें आहे. शास्त्रार्थाचा परिणाम झाल्यामुळें महात्म्याचें मन जसें अतिशय सौम्य व स्वच्छ होतें त्याप्रमाणें शरत्काळच्या आकाशाचें प्रतिबिंब पडल्यामुळें हें महासरोवर दिसत आहे. राजन्, ब्रह्माहून पृथक् नसलेलें जग जसें ब्रह्माच्याच आधारानें

पृथक् सत्तायुक्त असल्यासारखें भासतें त्याप्रमाणें हें सरोवर जलाहून पृथक् नसलेल्या तरंगादिकांच्या योगानें पृथक्सें भासतें; पण हे जलविकार ब्रह्मविवर्तभूत जगाप्रमाणेंच सत्य नव्हेत; असत्य आहेत. विकार आहेत. तथापि काय चमत्कार आहे, असले हे असत् भावही त्याला क्षुब्ध करून सोडीत आहेत. कूप, वापी, तडाग इत्यादि उपाधींमुळें जलांत जसा न्यूनाधिकभाव येतो त्याप्रमाणें स्त्री-पुरुष-इत्यादि शरीरांच्या उत्कर्षाप्रमाणें आत्म्यामध्येंही तारतम्य भासतें; असो.

चचल मनातील असंख्य वृत्तींप्रमाणें यांतील असंख्य कमलांची गणना करण्यास कोण समर्थ आहे ? मूर्खसमागमाप्रमाणें या जल ( जड ) समागमाचाही परिणाम काहीं विचित्रच आहे. कारण सद्गुणाचा जणुं काय निधिच असें हें पद्मकमल आपल्या सौंदर्य, सौगंध्य, मकरंद इत्यादि गुणांस, स्वतः कंठाशीं दोषाप्रमाणें झाकून ठेवतें व काट्यासारख्या वाईट वस्तूंस प्रकट करतें; पण पद्माच्या प्रख्यात गुणांचें वर्णन करण्यास शेषही समर्थ नाहीं. कारण लक्ष्मीलाही शोभा देणाऱ्या त्याचें अधिक गुणवर्णन कोण करणार? शिवाय हरीच्या वक्षःस्थळीं बसणारी लक्ष्मीही ज्याला मोठ्या आदरानें आपल्या हातांत वागविते तें ( पद्म ) दुसऱ्या कोणाच्या अधिक स्तुतीची आकांक्षा करणार? कमलाचा ताटवा व उत्पलांचा ताटवा यांचा क्रमानें चद्र व सूर्य याच्याशीं द्वेष जरी एकसारखाच असला तरी त्यातील एक शुभ्र व दुसरें कृष्णवर्ण असतें. प्रफुल्लित कमलयुक्त सरोवराची शोभा फुललेल्या मंदारवृक्षाच्या अरण्याची बरोबरी करूं शकत नाहीं; तारकायुक्त आकाशाशीं साम्य करूं शकत नाहीं; एकत्र जमलेल्या चंद्रबिंबाचीही तुलना करूं शकत नाहीं, पण नृत्य करणाऱ्या वधूंच्या सस्मित मुखांची मात्र बरोबरी करू शकतें.

राजन्, ज्या भ्रमराचें दीर्घ आयुष्य पुष्पलताच्या रसाचा स्वाद घेण्यांत जातें तेच भाग्यवान् होत. जे भ्रमर व कोकिळ क्रमानें आम्रमंजरींचा मकरंद व अंकुर यांचा स्वाद घेतात तेच धन्य असून बाकीचे जीव आपल्या जातीची नुस्ती संख्या वाढवीत असतात. या कमलसरोवरांतील कमलांचा रस चाखणारे हे मत्त भ्रमर दुसऱ्या वनादि—स्थानांतील भ्रमरांस जणु काय हंसतच असतील. ज्यानें चंद्रासारख्या कोमल पद्मामध्यें विहार,

शयन, भोजन इत्यादि दीर्घ काल केलें आहे तोच भ्रमर शिशिर ऋतूंत कमलिनीचा ध्वंस झाल्यावर नीरस पुष्पवृक्षावर बसून मोठ्या दुःखानेंच आपले कष्टकर दिवस घालवील ! हा मल्लिकेच्या कळीवर, मोठ्या आशेनें बसलेला भुगा शंकरानें त्रिशूलावर टोचून ठेवलेल्या अंधकासुराप्रमाणें भासत आहे. अरे भ्रमरा, तूं नानाप्रकारच्या पुष्पाच्या रसाचा स्वाद घेत अनेक पर्वतावरील लतागृहातून नित्य भ्रमण करीत आहेस. पण अद्यापि तुझें समाधान होत नाहीं याचें कारण काय? मधुलंपट असल्यामुळें तुझी तृष्णा अतिशय वाढली आहे म्हणून, कीं तुला कोठेंही काहींच सार मिळालें नाहीं म्हणून ? मला वाटतें कीं सारलाभ न झाल्यामुळेंच तूं असा दुःखी होत आहेस. कारण त्यावाचून असा असंतोष अथवा हें भ्रमण संभवत नाहीं. कमलवनांतील मकरंदाचा स्वाद घेण्यात निपुण असलेल्या हे पंडिता, तू पद्मसरोवरांत जा. मकरंदानें पुष्ट झालेल्या आपल्या शरीराला या बोरींच्या वनात फाडून घेऊं नकोस. अरे बा रसिका, पंडित स्वसदृश समाज जरी न मिळाला तरी विसदृश सजातीय प्रभूच्या आश्रयानेच स्व-सदृशांची कधीं तरी गाठ पडेल या आशेनें तो राहतो. किरातादि अति हीन पुरुषाचा कधींही आश्रय करीत नाहीं, त्याप्रमाणें तूंही यावेळीं कमलें जरी फुललेलीं नसलीं तरी तुझ्यासारख्याच काळ्या रंगानें शोभणाऱ्या कुवलयकमळाच्या ताटव्यात जाऊन रहा व तेथें जो काहीं थोडासा रस मिळेल त्यावर आपला निर्वाह कर. कारण कोणताही काळ स्थिर नसतो. तर तो सतत फिरत असतो.

प्रभो, या भव्य सरोवरांतील कमलांवर बसलेली ही हंसांची पंक्ति पहा. ती अतिशय शुभ्र असून सामगायकाप्रमाणें मधुर शब्द करीत आहे. आकाशांत हंसीच्या मागोमाग जाणारा हा हंस खालीं या सरोवरांतील कमलनीडांत प्रतिबिंबित झालेल्या आपल्या प्रियेला पाहून व ती पडून बुडत आहे, असें समजून व्यर्थ कसा मूर्च्छित होत आहे, पहा. महाराज, इतकें स्त्रीव्यसन कोणालाही जडूं नये !! राजहंसानें सहज केलेलें कूजित बकाला शंभर वर्षे प्रयास करूनही साध्य होणें शक्य नाहीं. हंस व राजहंस यांचें जन्मस्थान व निवासस्थान जरी समान असलें तरी त्यांच्या गुणांत व आहारादिकांत फार अंतर आहे. चंद्र व हंस यांचें बहुतेक साम्य दिसतें.

चन्द्र शुक्लपक्षांत आकाशांत विकास पावतो व सरोवरांतील चंद्रविकासी कमलांस प्रफुल्लित करतो. हंसही आपल्या दोन शुक्ल पक्षां ( पंखां ) नीं आकाशातून उडताना फार शोभतो व सरोवरांत कमलांपाशीं बसून त्याना सुशोभित करतो. कदलीवनांत विहार करणाऱ्या हंसाची शोभा दुसऱ्या कोणत्या पक्ष्याला प्राप्त होणार आहे ? राजाधिराज, ही सरसी एकाद्या सरस नारीप्रमाणें पुरुषाचें चित्त कसें आकर्षण करीत आहे, तें पहा. अरे हंसा, तूं जलकाक, बक, काक इत्यादिकांनीं भरलेल्या दुसऱ्या एकाद्या सरोवरांत जाऊन एकटाच राहूं नकोस. कारण या भव्य सरोवरांत राहून तुला आपत्ति जरी भोगावी लागली तरी समानशील, वय व भाषण यांनीं युक्त असलेल्या सजातीयाची संगतीच तुला परिणामीं हितावह होईल. अहो, मोठमोठ्या हत्तींचीं गंडस्थलें आपल्या सहाही पायानीं तुडवून त्याचा मदरस पिणारा व कमलवनांतच सदा वास करणारा हा भ्रमर दैववशात् शिशिर ऋतूसारखा विपरीत काल आला असतां मातीचें ढेकूळ व गवत याचा स्वाद घेत बकाप्रमाणें आचरण करीत आहे. हरहर ! विपत्तिसमयीं मोठ्याचें मनही दैन्यात पडतें ११७.

**सर्ग ११८—**बक, मद्गु, मयूर, पांथ, वियोगीजन, मत्स्य व चातक याचें चरित्र.

**सहचरांच्या सहचरी** क्रमानें म्हणतात—निर्गुण अशाही या बकामध्यें एक मोठा गुण आहे. तो नेहमीं प्रावृट् प्रावृट् असें ओरडून वर्षासमयाचें स्मरण करवीत असतो. अरेबा बका, तूं सरोवरात बसलेला असलास म्हणजे रंगानें हंसासारखा शोभतोस. यास्तव मद्गूंची संगत, दुष्टपणा व वाणी यास सोडून स्पष्ट हंस हो. लोकांची हिंसा करून स्वार्थ कसा संपादन करावा, हें शिक्षण दुर्जनांनीं मद्गूपासून घेतलें असावें, असें वाटतें. उंच उचललेली मान व पसरलेले शुभ्र पख यांच्या योगानें पूर्वीं आपल्याला जो हा हंसच म्हणून वाटला होता तो आता पुढें आलेल्या माशाला पटकन चोंचींत धरून गिळून टाकीत आहे, असें पाहिल्यावर बक आहे, असें कळलें. अर्थात् बाह्य आकारावरून जरी एकाद्याची बरोबर ओळख न पटली तरी त्याचें आचरण पाहिल्यावर ती सहज पटते. जगांत तापसाचें ढोंग करून माशांना गट्ट करणाऱ्या तीरावरील बगळ्यांना पाहून कोणी सरोवराच्या काठीं आलेली वनिता—धूर्तही असेच

साधूंचा वेष घेऊन जवळ आलेल्या शरणार्थींनी अबलांना फसवितात— असें उमजली. राजन्, ही इकडे मौज पहा—हा कोणी वाटसरू या सरोवरांत उतरून कमलें काढीत असलेल्या गांवठी स्त्रियांच्या सहनशीलतेचें कौतुक पहात आहे. पण तेवढयावरूनच रागावून त्याची स्त्री त्याला म्हणाली, 'अरे प्रियकरा, थंडीला न जुमानितां पाण्यांत उभ्या राहून कमलें काढित असलेल्या याच्याकडे जर तुझें चित्त इतकें आसक्त होत असेल तर मी आपली जातें.' पण इतकें बोलून निघून जात असलेल्या प्रियेचें समाधान करण्याकरिता हा मूढ पांथ परोपरीनें प्रार्थना करीत आहे. खरोखर या जगांत विषयलंपटासारखे दीन दुसरे कोणी नसतील!!

मूर्ख व पंडित याच्या बुद्धीचा संकर जसा कधीं होत नाहीं त्याप्रमाणें एकत्र असलेल्याही या बक, मद्गु इत्यादि पक्ष्याच्या गुणाचा संकर होत नाहीं. असो; हे महाराज, आतां आपण या महा अरण्यातील या उदार मयूराकडे पहा. त्या सुंदर पक्ष्याचें चित्त अतिशय उदार आहे. तो सर्वां-करिता इंद्रापाशीं जलाची याचना करतो. त्याच्या त्या उदारतेमुळें प्रसन्न झालेला इंद्रही सर्व पृथ्वी जलानें भरून सोडतो. मेघ व मोर याच्या वर्णाचें साम्य असल्यामुळें, मयूर हे वत्स मेघ या पित्याचें अनुसरणच करीत आहेत, असा भास होतो. हे वाटसरू, मार्गांत भेटलेल्या हरिणाच्या नेत्रांकडे पाहून प्रियाचें स्मरण झाल्यामुळें चित्राप्रमाणें मार्गांतच उभे रहात आहेत. मोर भूमीवरील जलही पीत नाहीं, पण सर्पाला पाहतांच तत्काल बलात्कारानें उचलून घेतो. तेव्हा यांत दुरात्मता कोणाची स-र्पाची कीं मोराची? हें काहीं कळत नाहीं. सज्जनाच्या चित्ता-प्रमाणें स्वच्छ असलेल्या मोठ्या सरोवरालाही सोडून मोर अभ्रातून गळलेलें पाणी पितो. याचें कारण त्या सरोवरापुढें आपलें उच्च मस्तक लववावें लागेल, हेंच असावें. कारण मानी पुरुषांना दुसऱ्यापुढें नम्र होण्यासारखें आणखी कांहीं दुःखकर वाटत नाहीं. राजा, हे मोर आपले पिसारे पसरून कसे नाचत आहेत, ते पहा. मला वाटतें मेघापेक्षां मोत्यें देणारा हा सागरच त्यांना अधिक नाचवीत असतो.

अरे चकित चातका, दावाग्नीच्या भयानें तूं शुष्क तरूच्या कोटरांत वसण्याचा हा आपला आग्रह व अतिमान सोड. कदलीवनाजवळचें

हिरवें गवत खा; पाटांतून झुळ झुळ वाहणारें जल पी; व कदलीवनात सुखानें रहा. बा मयूरा, समोर दिसणारा हा समुद्राचें पाणी पिऊन वर जाणारा मेघ आहे, अशी भ्रांति तुला न होवो. कारण तो दावाग्नीच्या धुराचा लोट आहे. यास्तव व्यर्थ नाचण्याचे श्रम करूं नकोस. ज्या मेघानें शरत्समयींही मोराला तृप्त केलें त्यानें वर्षासमयींही सरोवरास न भरून सोडणें हें अनुचित होय. कारण औदार्याच्या वेळींही मेघानें दाखविलेलें हें अनौदार्य पाहून पामर जन हंसूं लागतात व सज्जन दुःखित होतात; असा विचार मनात आणून मेघाविषयीं अभिमान बाळगणारा मोर तृषेनेंच आपला काल घालविण्यास उद्युक्त होतो. तो पूर्वी स्वच्छ मेघोदक पिऊन फिरून भूमीवरील गढूळ पाणी प्यावयास प्रवृत्त होत नाहीं; आपल्यावर उपकार करणाऱ्या मेघाचें वारंवार स्मरण करीत आशेनें राहतो. ती आशाच त्याचे प्राण वाचविते. कारण गुणवानाची आशा धरली असतां ती सुखावह होते. आत्मज्ञानशून्य मूर्खाचे जन्मच्या जन्म जसे फुकट जातात त्याप्रमाणें आपापल्या कांतेपासून दूर राहिलेले पांथ वर्षाकाल आला असता कोठें तरी बसून गोष्टी बोलत मोठ्या कष्टानें काळ व्यर्थ घालवितात. हे नाथ, या बालिका या सरोवरांतील कमलें, बिसें, पुष्पें, पानें, पाणी इत्यादिक घेऊन आपापल्या घराकडे जात आहेत, त्या पहा. हें सर्व तुम्ही कोणाकरितां नेत आहा, असें त्याना कोणी विचारल्यास " अरे पथिका, आम्ही व्यसन-ज्वरानें तप्त झालेल्या एका वियोगिनीच्या बालमैत्रीणी आहों, " असें उत्तर देतात. तें ऐकून विचारणाऱ्या पथिकास आपल्या प्रियेचें स्मरण होतें. कारण समान वस्तु पाहून किंवा तिचें वर्णन ऐकून आपल्या प्रिय वस्तूविषयींचे संस्कार उद्‌बुद्ध ( जाग्रत ) होतात. आणि अशा पथिकातील कोणीं फारच अधीर असलेला एकादा आपल्याशींच " खरोखर ती माझी कांताही आकाश काळ्या मेघांनीं आच्छादित झालेलें व गृह प्रिय-रहित पाहून अशीच व्याकुल होऊन भूमीवर तळमळत पडली असेल " असें म्हणतो. महाराज, इतर स्वस्थ जनांना सुखावह वाटणारा शीत, मंद व सुगंधयुक्त वायुही कामी जनांना दुःसह होतो. तेव्हां आनुकूल्य

व प्रातिकूल्य हे पदार्थांचे धर्म नसून ते ज्याच्या त्याच्या कल्पनेवर अवलंबून आहेत, असेंच नाहींका ठरत ११८.

**सर्ग ११९**—एक पथिक आपल्या प्रियेला आपली वियोगजन्य दशा सांगतो.

**सहचर**—हे राजन्, या मंदर पर्वताच्या कुंजांमध्यें हा पथिक फार दिवसांनीं भेटलेल्या प्रियेपुढें पूर्वी भोगलेल्या आपल्या वियोगदशेचें वर्णन करीत आहे, पहा. तो म्हणतो—हे प्रिये, तुझ्या वियोग-दशेंत असतांना एके दिवशीं काय आश्चर्य घडलें तें ऐक.—तुझ्याकडे स्ववृत्तान्त निवेदन करण्याकरितां कोणा दूताला पाठवावें ? म्हणून मीं विचार करीत असतांना आपल्याशींच म्हटलें, " या प्रलयकालासारख्या वियोग-दशारूपी महा आपत्तींत असलेल्या माझा वृत्तान्त माझ्या प्रियेस कळवून तिला संतोष देण्याकरितां माझ्या घरीं जाईल असा दयाळु दूत कोण आहे ? परदुःख शांत करण्यास्तव प्रेमानें निरंतर प्रयत्न करणारा महात्मा या जगांत विरळा निपजतो. " प्रिये, मी इतकें जों बोलत आहें तों समोरच्या गिरिशिखरावर विश्रांति घ्यावयास येऊन बसलेल्या मेघाकडे माझी दृष्टि गेली. त्याला पाहतांच मी आनंदानें म्हटलें, " वाहवा, हा मात्र माझा निरोप माझ्या प्रियेला कळवील. कारण हा नेहमीं प्रेमानें दुसऱ्याचें दुःख शमविण्याचा यत्न करीत असतो. तो स्मरदेवाचा जणुं काय अश्व आहे. त्यामुळें तो माझ्या घरीं सत्वर जाऊं शकेल. हा परोपकाररसिक साधु आपल्या विद्युल्लता विलासिनीनें युक्त आहे. यास्तव मी आतां याचीच प्रार्थना करीन. " इतका विचार करून मी त्यास म्हटलें, " अरे बा मेघा, हे बन्धो, तूं मोठा गुणवान् आहेस, यास्तव आपलें उचित इंद्रधनुष्य घेऊन तूं माझ्या घरीं जा. तेथें माझी अबला कांता विरहदुःखानें व्याकुळ होऊन पडलेली तुला दिसेल. तिला तूं आपल्या थंडगार स्वल्प जलबिंदूंनीं व सुखावह वायूच्या योगानें सावध कर. त्यानंतर माझा संदेश ( निरोप ) तिला सांगण्यासाठीं तूं हळूच गर्जना कर. बाबारे, माझ्यावर तूं एवढी दया कर, कारण तुझें भयंकर गडगडणें तिला यावेळीं सहन होणार नाहीं. बा अभ्रा, मी आपल्या हृत्पटलावर चित्ततूलिकेनें तिला काढून आलिंगन देणार होतों; पण इतक्यांत ती प्रिया कोठें नाहींशी झाली, कांहीं कळत नाहीं, त्यामुळें मी फार व्याकुळ आहें, हें तिला तूं कळीव."

प्रिये, असें सांगून मी मेघाला तुजकडे पाठविलें व त्यानंतर ही माझी मति तुझ्या चिंतेनें व्यग्र झाली; स्मृति पार कोठें नाहींशी झाली. स्मृति-लोपामुळें माझें शरीर परवश झालें. व माझे अवयव काष्ठासारखे अथवा भिंतीसारखे जड झाले. खरोखर विरहजन्य दुःख सहन करण्यास कोण समर्थ आहे बरें ! माझी तशी अवस्था पाहून इतर अनेक पाथ माझ्या सभोंवार गोळा झाले. त्यांनीं 'पथिक मेला' असा मोठा हाहाकार केला. स्त्रियाही उर बडवून रडत आहेत, असें मी आतल्या आत ऐकलें. सर्व स्त्रीपुरुष मेघाची निंदा करूं लागले. त्यानंतर इतर पांथांनीं भी मेलोंच आहें, असा निश्चय करून व नेत्रांतून अश्रु ढाळून माझी गंध-पुष्पादिकांनीं शवसंबंधी पूजा केली. मला श्मशानात नेलें, चिता रचली, व मोठ्या थाटानें मला तिच्यामध्यें ठेवून जाळावयासाठीं अग्नि दिला. माझी चिता जेथें रचली होती तेथेंच तिच्या आसपास दुसरीं आणखीं अनेक मढीं जळत होतीं. चिताग्नि आपल्या भयंकर ज्वालांनीं व फट् फट् अशा ध्वनींनीं स्वभावतःच भयकर असलेल्या त्या पितृवनाला अधिक रौद्र करीत होता. असो; सुंदरि, माझ्यासाठीं रचलेल्या त्या अंत्य-शय्येवर माझ्या सहचर पथिकांनीं अश्रूंनीं आपले गाल भिजवीत मला ठेवून तिला पेटाविलें असता प्रथम तिच्यातून काळ्या नागिणीसारखी धूम-लेखा निघून ती माझ्या भूच्छिद्रासारख्या नासारंध्रात शिरली. पण हृदयात स्थिर झालेल्या तुजमध्यें माझें मन गढून गेल्यामुळें मला तिच्यापासून काहीं पीडा झाली नाहीं. काहीं वेळानें अग्नि थोडासा पेटला. पण तुझ्या संकल्परूपी कवचानें आच्छादित झालेल्या माझ्या अंगास तो भाजूं शकला नाहीं. हृदयस्थ मदनसरितेसारख्या तुजमध्यें बुडून गेलेल्या मला त्यानें स्पर्शही केला नाहीं. तुला स्पर्श करून आनंदानें हृदयमंदिरात बसलेल्या मला त्यावेळीं त्रिभुवनाचें राज्यसुख तुच्छ वाटलें. तुझ्या त्या लीला, ते हावभाव, तें भाषण, ते स्मितयुक्त कटाक्ष, इत्यादि सर्वांचा साक्षात् अनु-भव घेणाऱ्या मला त्यावेळीं मी कोठें आहें व काय होत आहे, याचें भानही झालें नाहीं. तो इकडे माझ्या चितेचा अग्नि उंच ज्वालांच्या योगानें अधिकाधिक वाढूं लागला.

सहचर—राजन्, आपल्या कांताचें हें भाषण ऐकून त्याची दयिता भयभीत होऊन 'हाय हाय माझा घात झाला,' असें म्हणून मूर्च्छित झाली. पण कामी पुरुषानें तिला वारा वगैरे घालून थोड्याच वेळांत शुद्धीवर आणलें. तेव्हां ती त्याची प्रिया आपल्या दयिताला घट्ट आलिंगन देऊन बसली व कांहीं वेळानें जरा स्वस्थचित्त होऊन म्हणाली—"प्रिया, त्यानंतर काय झालें?" तें ऐकून महाराज, तो पथिक तिची हनुवटी धरून तिला आपला पुढील वृत्तान्त सांगूं लागला.—प्रिये, तों इतक्यात मी देहभानावर आलों व अरे अरे अग्नि असें मोठ्यानें ओरडलों. तें ऐकून मी जिवंत आहें, असें माझे सोबती समजले व तत्काल चिता कोसळून मला बाहेर ओढून काढते झाले. मी खरोखरच सजीव झालों आहें, असें जाणून त्यानीं मोठा उत्सव केला. मंगलकृत्यें आरंभिलीं. वाद्यें वाजविलीं व माझ्याशीं नानाप्रकारचीं संभाषणें केलीं. चितेंतून बाहेर येऊन देह-व्यथा किंचित् शांत झाल्यावर मी सभोंवतालच्या प्रदेशाकडे पाहिलें तों मला त्या श्मशानाचें संहारकालच्या रुद्रासारखें उग्र स्वरूप दिसलें. त्यांतून भयावह वारे सोसाट्यानें वाहत होते. प्रत्येक चितेंतील अग्नि जणुं काय त्याचें विपुल साहाय्य मिळाल्यामुळेंच मोठमोठ्या ज्वालाजिह्वानीं आकाशास चाटण्यासाठीं उद्यत झाला होता. त्यांत जळत असलेल्या शवांच्या शरीराचा दुर्गंध पसरला होता. जाळावयास आणलेल्या प्रेताच्या आप्तवर्गाचा हाहाकार जळत्या चितेंतील अर्धदग्ध शवानाही ओढून काढून खावयास सवकलेल्या जंबूकादिकांना भयभीत करीत होता. गृध्रादि पक्षी रात्रींही अग्नीच्या प्रकाशांत दिवसाप्रमाणेंच वावरत असलेले दिसत होते. पण चोंहोंकडून अंधकारानें व्यापलेलें तें श्मशान मध्येंच जळत असलेल्या अग्नीच्या प्रकाशानें परत येत असतांना मला दुरून विद्युद्युक्त मेघाप्रमाणें भासलें ११९.

**सर्ग १२०**—वायु, वृक्ष, भ्रमर, वनपंक्ति, देवस्त्रिया, सागराच्या लाटा व हेमचूडादिक पक्षी यांचें वर्णन

सहचर—राजन्, अशा प्रकारच्या गोष्टी सांगत व मद्यपान करीत बसलेल्या या जोडप्याकडे पहा. या पर्वतशिखरावर अनेक प्रकारच्या पुष्परजांनीं मंडित झालेले वायु वहात आहेत. वनांतील अनेक वासांना

दूरदूरच्या विलासी जनांपर्यंत नेऊन पोंचवावयाचें शुभ कार्यच हा महात्मा साधु ( वायु ) करीत आहे. श्रांत जनांच्या मुखादिकांवरील घर्मकणांना शोषून घेण्यांत हा फार पटाईत दिसतो. सरोवरांतील जळ, उद्यानांतील बाललता, वृक्षाचे कोमळ पल्लव, इत्यादिकांना हा उद्धट वायु हाळवून व क्षुब्ध करून जर्जर करतो. कीचकवनात विश्रांति घेणारा हा, हस्तिनापुरांतील नारींनीं गायनविद्येचें शिक्षण दिल्याप्रमाणेंच येथें गायन करण्यास प्रवृत्त झाला आहे. कर्णिकार पुष्पानीं आपला गंध व पराग न देतां वायूला तिरस्कार पूर्वक परत पाठविलें आहे, असें पाहून भ्रमरही त्यांचा दुरूनच परित्याग करीत आहेत. हा ताल वृक्ष खांबासारखा सरळ उभा असल्यामुळें त्याच्यावर चढणें फार कठीण झालें आहे. त्या कारणानें तो कोणाला फळ किंवा पान देत नाहीं. पण त्यामुळें त्याची ही असली भव्य आकृति ही व्यर्थ झाली आहे. याचकाचे मनोरथ पूर्ण करण्याचें त्याचें शील नसल्यामुळें ती शोभत नाहीं. राजन्, औदार्यादि गुणशून्य मूर्खांना वस्त्रालंकारादिकांनींच शरीराला भूषित करावें लागतें. कारण या गंधरहित पलाशाकडे पहा. त्याच्यामध्यें मालतीसारखा सुगंध नसल्यामुळें तो आपल्याला पुष्पांच्या लालरंगानेंच भूषित करून घेत आहे. प्रभो, आपण पुढें चला. या कार्णिकारापाशीं उभे राहूं नका. कारण तो आपल्या चित्तांत विषाद उत्पन्न करील. निर्गुण पुरुषासारख्या या गंधरहिताला घेऊन काय करावयाचें आहे ? हा काळा तमाल वृक्ष चातकाला व्यर्थ मेघभ्रांति करवीत आहे. या कीचका ( वेळू ) च्या बेटापासून, आपल्या सजातीयाशीं कसें मिळून राहिलें पाहिजे, हें आपणाला अवश्य शिकण्यासारखें आहे. पर्वताच्या शिखरांवर विश्रांति घेत असलेल्या मेघाना महावात रोगांप्रमाणें पीडा देत असतो, ज्याच्यावर अनेक पक्षी हेच बाण वरच्यावर येऊन बसत आहेत असा हा फुललेला पळाश वृक्ष रणात शत्रूंशीं झगडत असलेल्या व अंगातून रक्तस्राव होत असलेल्या योद्धयाप्रमाणें दिसत आहे, भगवन् , हे पहा मत्त व कामी गंधर्व या महेंद्र पर्वतावर मंदार पुष्पांच्या परागांनीं शुभ्र होऊन निजले आहेत. हे राजन् , कल्पवृक्षाच्या छायेत बसून मार्गस्थ सिद्ध व विद्याधर गात आहेत, त्यांकडे पहा. महाराज, या समोरच्या कल्पवृक्षावरील प्रत्येक पल्लवावर एकेक अप्सरा

बसून आनंदानें गात व हंसत आहेत, पहा. हें मंदपाल मुनीचें मंदिर आहे. त्या उदार मुनीची जारिता नांवाची गृध्री भार्या आहे. ( हिची कथा महाभारतांत आहे.) पशु, पक्षी व इतर प्राणी आपापलें जातिवैर विसरून या सर्व मुनि—आश्रमांतून कसे गुण्यागोविंदानें रहात आहेत, ते पहा. समुद्राच्या तीरावरील वेलींच्या पानावर पडलेले हे जलबिंदु सूर्यप्रकाशानें क्षीरसागरांतून मंथनसमयीं उडालेल्या क्षीरबिंदूप्रमाणें कसे दिसत आहेत, ते पहा. चंद्राच्या ऱ्हासाबरोबर स्वतः ऱ्हास पावणाऱ्या समुद्राच्या पाण्याच्या काळ्या रेघा तीरावर कशा दिसत आहेत, त्या पहा. एकांतांत तरुण स्त्रीपुरुष जसे रममाण होतात तसे ते देवाच्या नंदनवनांतही होत नसतील. एकान्त स्थान विरक्त मुनीप्रमाणेंच विलासी तरुणांनाही अतिशय आवडतें. पुन्नाग वृक्षावर बसलेले हे सोन्यासारखे पिंवळे हेमचूड पक्षी स्वर्गांतील देवाप्रमाणें शोभतात. हा वारा चंपकवनाना कसा हालवीत आहे, तें पहा. कण्हेरीच्या शाखेवर बसून झोंके घेणारी ही कोकिळा आपल्या मधुर आलापानीं प्रियाला कशी बोलावीत आहे, तें पहा. हे राजा, या समुद्राच्या तीरावर असंख्य राजे हातांत उपायनें घेऊन तुझा प्रसाद संपादन करण्याकरितां उभे आहेत. त्यांच्याकडे कृपादृष्टीनें अवलोकन कर. महाराज, तुझ्या अमोघ अस्त्राच्या योगानें मरून राहिलेल्या व शरण आलेल्या याच्या मस्तकावर आपलें शासन स्थापून त्याची आपापल्या दिशेंत योजना कर. सर्व प्रजेला पुनः पूर्वप्रमाणें सुख भोगूं दे. स्वाधीन करून घेतलेल्या यांना अस्त्रें व सैन्य दे, आणि स्वतः आपल्या राजधानींत सुखानें रहा. १०२०.

सर्ग १२१—देशमर्यादा स्थापून विपश्चित् दिशांचा अंत पाहण्याचा प्रयत्न करितात.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, त्यानंतर चारी दिशांतील समुद्राच्या तीरापर्यंत जाऊन पोंचलेले ते चारी विपश्चित् राजे तेथें राहिले. त्यानीं सर्व योग्य राज्यव्यवस्था स्थापिली. इतक्यांत तो दिवस संपून भगवान् सूर्य जणुं काय त्यांच्या उज्ज्वल प्रतापाप्रमाणेंच परलोकास गेला, व रात्र आली. तेव्हां राजांनीं सायंकालचीं संध्यावंदनादि कर्में केलीं व भोजनोत्तर सर्व दिवसव्यापार झाले आहेत, असें पाहून ते

आपापल्या शय्येवर जाऊन बसले; पण त्यांनीं त्या उत्तम शयनीयावर निद्रासुख घेण्यासाठीं शयन करण्यापूर्वी विस्मित चित्तानें असा विचार केला. अहो आम्ही त्या देवाच्या अनुग्रहानें फार दूरवर अनायासानें चालून आलों. दिव्य वाहनाच्या योगानें आम्हाला कोठेंही प्रतिबंध झाला नाहीं. पण हें दृश्य श्री अजून किती विस्तृत असेल बरें? याच्यापुढें हा महासागर आहे. सागराच्या पुढेंही द्वीपें आहेत. द्वीपाच्या पलीकडे पुनः सागर आहे. पण त्याच्यापुढे आणखी काय असेल? ही चैत्यरूप माया अशी कोठवर पसरली आहे? हिचा अंत पाहण्यासाठीं आम्ही आता त्या देवापासूनच वर मागतो, व त्याच्या प्रभावानें या चारी दिशाचा अंत पाहतों.

असा विचार करून आपापल्या स्थानीं असलेल्या त्या चौघानींही एकाच वेळीं भगवान् अग्नीची प्रार्थना केली. त्याबरोबर आकारवान् अग्नि त्याच्या सन्मुख उभा राहिला व " पुत्रानो, तुम्हांला हवा असेल तो वर मागून घ्या. " असे त्यास म्हणाला. तेव्हा विपश्चित् त्यास म्हणाले, " हे सुरेश्वरा, या पंचभूतात्मक दृश्याचा अंत आम्हाला पहावयाचा आहे. यास्तव जोंवर या देहानें आमचें जाणें शक्य असेल तोंवर या देहानें, त्यापुढें मंत्र-देहानें व त्याचीही गति कुंठित झाल्यावर मनानें आम्ही हें सर्व पाहू असें कर. सिद्धाच्या मार्गापर्यंतचा भाग आम्ही या शरीरानें पाहूं शकू. यास्तव तेथें जाईपर्यंत आमच्या या देहास मृत्यु न येवो. "

त्यावर ' तथाऽस्तु ' असे म्हणून अग्नि गुप्त झाला. राघवा, याप्रमाणें अग्नि गेला; रात्र आली. पण तीही कांहीं काल ( चार प्रहर ) राहून गेली. नंतर सूर्य आला व त्याबरोबर त्या राजांना समुद्राचें उल्लंघन करून जाण्याचीही इच्छा झाली १२१.

**सर्ग १२२**—पायानीं समुद्राच्या तरंगावरून जाणाऱ्या राजांनीं आवर्त, मकर इत्यादिकांचें आक्रमण केलें.

**श्रीवसिष्ठ**—त्यानंतर दुसरा दिवस उजाडतांच पृथ्वीच्या संरक्षणाची यथाशास्त्र व्यवस्था लावून दिगन्तदर्शनाविषयींच्या उत्कंठेनें अंगात संचार केल्याप्रमाणें ते पुढें जावयास निघाले. त्याचे मुख्य मंत्री त्यांच्या इच्छेविरुद्ध ' जाऊं नका ' असें म्हणण्यास जरी समर्थ नव्हते तरी त्यानीं मुखादि विकारांनीं आपला गूढ अभिप्राय व्यक्त केला. तथापि त्या निश्चयी राजांनीं त्यांच्या निषेधा-

कडे फारसें ध्यान न देतां आक्रोश करणाऱ्या सर्व परिवाराचें निवारण करून, अभिमान, मात्सर्य, लोभ, दुसऱ्यांचा पराभव करण्याची इच्छा इत्यादिकांचाही त्याग करून ' समुद्राच्या पलीकडचें दिगन्त पाहून आम्हे आतां एका क्षणांत परत येतों; ' असें सांगून परिजनाचें समाधान करित करितांच पुढें प्रयाण केलें. आपल्या मंत्रशक्तीनेंच उत्तमतेस प्राप्त झालेल्य त्यांनीं पायांनींच सागरांत प्रवेश केला. त्यांनीं आपल्या बरोबर अगदीं थोडे थोडे भृत्य घेतले होते. व तेही त्यांच्या प्रभावानें पाण्यावरून चालूं शकले. तीरावर उभे असलेले त्यांचे इतर जन बराच वेळ त्यांस पहात होते. पण पुढें शरत्कालच्या मेघांप्रमाणें ते त्यांच्या दृष्टीच्या आड झाले. त्यांना मकरादि जलचर मध्यें मध्यें प्रतिबंध करीत होते. पण अलौकिक सामर्थ्यानें युक्त असलेल्या त्यांच्या देहास ते अपाय करूं शकले नाहींत. समुद्राच्या प्रत्येक उच्च तरंगावर व त्यांतून संचार करणाऱ्या महा जलचरांवर एकाच वेळीं पाय देऊन ते वेगानें पुढें गेले १२२.

सर्ग १२३—द्वीपें व समुद्र यातून संचार करणाऱ्या त्यांचे क्रमानें वर्णन.

श्रीवसिष्ठ—याप्रमाणें ते विपश्चित् राजे पायांनीं दृश्यरूप अविद्येचा अंत पाहण्यासाठीं ( विचारांत ) प्रवृत्त झाले. ते समुद्रांतून द्वीपांत द्वीपांतून सागरांत, सागरांतून पुनः पर्वतावर अशा रीतीनें त्वरेनें संचार करूं लागले. त्यांना मार्गामध्यें कांहीं पीडा झाली नाहीं. पण पश्चिम दिशेचा अंत पहावयास गेलेल्या विपश्चित् राजाला मी देव आहें, असा अभिमान बाळगणाऱ्या एका माशानें वितस्ता नदींत गिळिलें. पण तो राजा त्याच्या पोटांत जीर्ण होण्यासारखा नव्हता. म्हणून त्या माशानें त्याला क्षार सागरांत गेल्यावर ओकून टाकलें. दक्षिणेकडे गेलेल्या राजाला एका यक्षिणीनें इक्षुरसार्णवांतील यक्षनगरांत विद्याबलानें नेऊन आपला कामुक केलें. पूर्व दिशेचा अंत पहावयास गेलेला राजा गंगेच्या अनेक मुखांतून संचार करीत असतांना एक मकर त्याला गिळण्याची इच्छा करीत होता. पण त्या वीरानें त्या मकराला धरून गंगेच्या प्रवाहांतच त्याचे दोन तुकडे केले. तेव्हां जणुं काय आपलें जल मकराच्या रक्तानें दूषित केल्यामुळें रागावलेल्याच भागीरथानें त्या राजाला आपल्या वेगाबरोबर कान्यकुब्ज देशांत आणून सोडलें. उत्तरकुरु देशांत देवीसह क्रीडा

करणाऱ्या ईश्वराची आराधना करून उत्तरेकडे निघालेल्या विपश्चित्-नें अणिमादि अष्टसिद्धि प्राप्त करून घेतल्या. त्यामुळेंच त्याला मरणादिकांचें भय वाटेनासें झालें. पश्चिम दिशेंतील राजानें कुशद्वीपांत जातांच तेथील गरुडाची उपासना केली व त्यामुळें त्यानें त्या राजाचें आपल्या पाठीवर बसवून संरक्षण केलें. पूर्वेकडील राजा क्रौंच पर्वतावर येताच त्याला एका राक्षसानें खाल्लें पण राजानें त्याचें पोट फाडून आंतडीं बाहेर काढलीं. दक्षिणेकडील राजा शाकद्वीपांत दक्षाच्या शापानें एका क्षणात यक्ष झाला. व शभर वर्षांनीं तो त्यातून मुक्त झाला. उत्तरेकडचा राजा एका सिद्धाच्या शापानें महार्णवसुवर्णभूमींत शिला होऊन पडला. शभर वर्षांनंतर तो अग्नीच्या अनुग्रहानें त्या शापांतून मुक्त झाला. ज्या सिद्धानें त्याला शाप दिला होता त्यानेंच अग्नीच्या प्रेरणेनें त्याला शापमुक्त केलें असतां तो राजा फार संतुष्ट झाला. पूर्वेकडचा राजा पूर्वेकडील नारीकेलप्रधान-प्रदेशांतील लोकाचा राजा झाला. त्यानें आठ वर्षें तेथें राज्य केलें व उत्तम धर्माचरणामुळें त्याला पूर्वींची स्मृति झाली. तो मेरूवरील उत्तर-प्रदेशांतील कल्पवृक्षाच्या वनांत अप्सरेसह दहा वर्षें राहिला. पक्ष्यांस कसें वश करून घ्यावें, हें जाणणारा पश्चिमेकडील विपश्चित् शाल्मली द्वीपातील शाल्मली वृक्षावर पक्षिणीच्या घरट्यांत तिच्यासह क्रीडा करीत कांहीं वर्षें राहिला. त्यानंतर तो मंदर पर्वतावर गेला असतां ज्याच्यावरील लता अतिशय मृदु आहेत अशा मंदार वृक्षाच्या खालीं मंदरी नावाच्या किन्नरीनें त्याची एक दिवस उत्तम सेवा केली. पूर्वेकडील राजा क्षीरोद-सागराच्या तीरावर गेला व तो तेथील कल्पवृक्षांच्या वनपंक्तींत कामाकुल होऊन अप्सरांसह सात वर्षें राहिला १२३.

सर्ग १२४—एकाच विपश्चित राजाच्या चार दिशेंत चार देहांनीं होणाऱ्या व्यवहाराचें समर्थन.

**श्रीराम**—भगवन्, ते चारी राजे एकसंविद्रन व एकशरीरमय असतांना त्याच्या इच्छा परस्पर विलक्षण कशा ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, एकच जीव स्वप्नांत अविद्येमुळें नानादेहादिकांची कल्पना करूं शकतो कीं नाहीं व त्या कल्पित वस्तूमध्येंही शत्रु-मित्र-उदासीन-इत्यादिकांची भावना करून तदनुरूप इच्छा-द्वेषादि होतात

कीं नाहीं ? त्याचप्रमाणें हें जाणावें. संविद्घन आकाश स्वच्छ असल्यामुळें आरशाप्रमाणें त्यांतही नानारूपता प्रतिबिंबित होते. आरशाच्या निर्मळतेप्रमाणेंच त्याची निर्मळता हेंच त्यांत नानाकल्पित भाव येण्याचें कारण आहे.

**श्रीराम**—पण गुरुवर्य, जगही वस्तुतः चित्-च आहे. तेव्हां चित्चेंच चित्-मध्यें प्रतिबिंब कसें पडतें ?

**श्रीवसिष्ठ**—एकाच चांदीच्या अनेक पदार्थांमध्यें जसें परस्परांचें प्रतिबिंब पडतें त्याप्रमाणें परमार्थतः चिद्रूप असलेले पदार्थ चित्-मध्यें आपल्या कल्पित भिन्नत्वामुळें प्रतिबिंबित होतात. कारण माया ही उपाधि अचिंत्य आहे व स्फटिकाच्या भीतीनें परिच्छिन्न झालेल्या आकाशात चंद्र, अभ्रें, नक्षत्रें इत्यादिकांसह महाआकाशाचें प्रतिबिंब दिसतें, असा अनुभवही आहे. यास्तव अध्यस्त भोग्य जगद्रूप–ब्रह्म विषय व इंद्रियें याचा संयोग झाला असतां बुद्धीनें मर्यादित झालेल्या जीवचैतन्यात प्रिय, अप्रिय इत्यादि विषयभोगाकारानें प्रतिबिंबित होतें. ( तें भोग्यवस्तु-रूप ब्रह्म बुद्धीमध्यें जर प्रतिबिंबित झालें नसतें तर भोगच घडला नसता. )

**श्रीराम**—असें जर आहे तर एकाच वस्तूच्या ठिकाणीं नानात्व व अनानात्व कसें येतें ? कारण तें अगदींच विरुद्ध असल्यामुळें मायेनेंही संभवत नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तें खरें आहे. पण नानात्व व अनानात्व हे दोन्ही भाव कल्पित व परस्पर सापेक्ष असल्यामुळें सर्वधर्मशून्य वस्तूंमध्यें ते दोन्ही नाहींत व कल्पनेनेंच मानावयाचे झाल्यास हे दोनचसे काय पण आणखी सहस्रावधिही धर्म खुशाल मानता येतात. साराश वस्तुस्थिति अशी असल्यामुळें विपश्चित् राजाच्या नाना दिशातील भोग्य पदार्थांच्या, भोगदायी कर्मांचा परिपाक एकाच वेळीं झाल्याकारणानें त्याच्या एकाच देहाचे चार भाग झाले, व त्या त्या देशांतील विषयाचें तेथल्या तेथल्या बुद्धींत प्रतिबिंब पडलें. अगस्त्यप्रभृति योगी मलयादि पर्वतावरील आपल्या नियत एकदेशीं राहत असतांनाच नाना देशांतील तिन्ही काळच्या वस्तूंचा अनुभव कसा घेतात, हें तुला माहीतच आहे. कारण योगसामर्थ्य प्राप्त झालें असतां तें सर्व सुलभ होतें. शिवाय नाना देशांत एकाच वेळीं

एकाला भिन्न भिन्न क्रिया करावयाच्या झाल्यास त्या त्या देशांतील व्याप्ती-चीच अपेक्षा असते. जीवभेदाची अपेक्षा नसते. जसें—उष्णानें संतप्त झालेल्या लोकांस आह्लाद देणारा एकच मेघ फार मोठा असल्यामुळें पर्वत नद्या, क्षेत्रें ( शेतें ) इत्यादिकांस एकाच वेळीं व्यापूं शकतो. व त्यामुळें एकाच वेळीं गच्चीला धुवून स्वच्छ करणें, मातीच्या व दगडाच्या ढिगांना अथवा बांधाना पाडणें, नद्यांचें पाणी वाढविणें, शेताचें पोषण करणें इत्यादि भिन्न भिन्न क्रिया आपल्या निरनिराळ्या अंशाने करूं शकतो. व त्याचा अभिमानी जीव मी ह्या क्रिया केल्या, असा अभिमान धरतो. त्याप्रमाणें प्रस्तुत दार्ष्टांतिकातही समजावें. कारण अणिमादि ऐश्वर्यांचा लाभ झाल्याकारणानें योगी लोक ईश्वरासारखे होतात. एकच विष्णु आपल्या चार बाहूंनीं ( म्हणजे चार अंशानीं अथवा शरीरानीं ) कोठें योग-निद्रा, कोठें तप, कोठें इंद्राचा अनुज होऊन त्याचें साहाय्य, कोठें वैकुंठात लक्ष्मीसह विलास करीत जगाचें रक्षण इत्यादि अनेक क्रिया करितो व त्याचा अनुभव घेतो. त्याचप्रमाणें एक-संविद्-मय विपश्चितानीं चारी दिशेंतील व्यवहार केला. सुख—दुःख भोगलें. भूमिशय्येवर शयन केलें. द्वीपांतरीं भोग घेतले. वनांतून विहार केला. मरुभूमींतून संचार केला. पर्वतावर वास केला. सागराच्या तीरावरून भ्रमण केलें. मुनीच्या शापांनीं नाना जातींत निवास केला व अनेक प्रकारच्या विचित्रतेचा अनुभव घेतला १२४.

सर्ग १२५—विपश्चितानीं विपत्तींत परस्परांस केलेलें साह्य व जीवन्मुक्तांच्या विविध अर्थक्रिया.

श्रीवसिष्ठ—रामा, एकदां असें झालें कीं शांतभय नावाच्या एका वर्षांत पूर्वेकडचा विपश्चित् मुनिशापानें वृक्ष झाला व मूळांच्या योगानें भूमींतील रस पीत राहिला. पण ही त्याची विपत्ति जाणून पश्चिमेंतील विपश्चित् तेथें आला व त्यानें त्या मुनीला प्रसन्न करून घेऊन सत्तर वर्षांनीं पूर्वविपश्चिताला वृक्षभावापासून मुक्त केलें. पाश्चात्य राजा शिशिर वर्षांत पाषाण झाला. पण त्याला दक्षिणेकडील राजानें येऊन शापमुक्त केलें. त्याच प्रमाणें क्षेमक वर्षांत यक्ष झालेल्या दक्षिण राजाला पश्चिमराजानें यक्षांस प्रसन्न करून घेऊन, शापमुक्त केलें. पूर्व विपश्चित् केसर

पर्वतावर वानर झाला होता. पण त्यालाही पाश्चात्यानें त्या योनीपासून मुक्त केलें.

**श्रीराम**—भगवन्, एका मर्यादित जागीं असलेले योगी त्रिकालीं विविध कर्मे कशीं करूं शकतात?

**श्रीवसिष्ठ**—रामा, योग्यांच्या दृष्टीनें सर्व प्रपंच मनोमात्र असल्या-कारणानें व मानस क्रियांमध्यें मन सर्वत्र एकाच वेळीं प्रवृत्त होण्यास समर्थ असल्यामुळें त्याच्या हातून सर्व कांहीं होऊं शकतें. त्या तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें चिन्मात्र सत्तासामान्यवांचून पृथक् जगद्रूपच नाहीं. तेव्हां त्यांना कोण कसा प्रतिबंध करणार? ते सर्व कांहीं स्वरूपांत पहातात. सत्ता-सामान्यास सोडून कांहीं रहात नाहीं. म्हणून त्रिभुवन विज्ञानघन आहे. निर्विकार सत्—आत्माच आकाशादि रूपानें स्थित होतो. मायाशबल आत्माच जगत् होतो. तोच दृश्य—द्रष्टृ—रूप जग झाला आहे. तेव्हां साध्यासाध्यरूप शबलब्रह्माला दुःसाध्य काय आहे? कांहीं नाहीं. यास्तव सर्वत्र सदा सर्व क्रिया संभवतात. यास्तव बा रामा, उपाधिभेदामुळेंच विपश्चित्—इत्यादि जीवांचा भेद झालेला असल्यामुळें उपाधींच्या योगानें नानाभावास प्राप्त झालेल्या ईश्वर—चित्—कडून देवतांच्या प्रसादानें सर्व कार्य होऊं शकतें. बोध व अबोध यांनीं युक्त असलेल्या शबल ब्रह्मामध्यें असाध्य असें कांहीं नाहीं. सर्वोत्तम बोधास प्राप्त न झालेल्या जीव चित्ला पदार्थरूपता उचितच आहे. त्याचप्रमाणें किंचित् बोधांत प्रविष्ट झालेल्या तिला सिद्धताही योग्यच आहे. सारांश रामा, असा प्रकार असल्यामुळें निर-निराळ्या दिशेंत असलेले ते विपश्चित् परस्परांस पाहतात; त्यांच्या दशेचा अनुभव घेतात व संकटसमयीं उपाय करितात. स्वरूपापासून किंचित् च्युत होणें हाच मनोभाव आहे, असें मी उत्पत्तिप्रकरणांत अनेकदां सांगितलें आहे. अर्थात् ज्ञान्यांना सर्व मनोमात्र वाटत असल्यामुळें मनो-राज्याप्रमाणें त्यांना सर्वत्र सर्व अर्थक्रिया करितां येतात.

**श्रीवसिष्ठ**—भगवन्, विपश्चित् राजे ज्ञानी होतेना? मग ते निर-निराळ्या प्रदेशीं शापानें निरनिराळ्या दशेस कसे प्राप्त झाले?

**श्रीवसिष्ठ**—रामा, ते योगी व तत्त्वज्ञ नव्हते. मी ज्ञान्यांचें वर जें वर्णन केलें आहे तें—तूं ' योगी एकदेशीं राहून सार्वदेशिक व सार्व-

कायिक कर्मे कशीं करितात?' म्हणून जें विचारलें होतेंस त्याचें समाधान करण्याकरितांच होय. विपश्चित् राजे बोध अबोध यांच्या मध्यमार्गी झोके खात होते. त्यांच्या ठिकाणीं ज्ञान व अज्ञान यांचीं चिन्हें दिसत होतीं. कारण विवेकादिकांप्रमाणें अति स्नेह, लोभ इत्यादिक त्यांच्या ठिकाणीं होते. अर्थात् ते चंचल धारणेनें युक्त होते. पारंगत योगी नव्हते. त्यांनीं हृदयादि प्रदेशांत अग्निरूपी इष्ट देवतेच्या ठायीं चित्ताचा निरोध करून त्याच्या प्रसादानें सिद्धि संपादन केली होती. वास्तव ते धारणायोगी होत, ज्ञानयोगी नव्हेत. कारण ज्ञानयोग्याच्या ठिकाणची अविद्या नष्ट झालेली असते. रामा, तूं म्हणतोस तसे ते जर ज्ञानयोगी असते तर त्यांनीं अविद्यामय संसार पाहण्याची इच्छाच कशाला केली असती? तस्मात् ते चारी राजदेह आत्मविचारशून्य होते. शिवाय राजीवनयना, जीवन्मुक्तां-विषयीं आणखीं एक विशेष गोष्ट मी तुला सांगून ठेवितों ती ऐक. त्यांना व्यवहारसमयींच देहादिकांचें भान होतें. समाधींत त्यांची अवस्था विदेह-कैवल्यासारखीच असते. कारण मोक्ष हा चेतनधर्म असल्यामुळें तो चैतन्यामध्येंच राहणार, देहांत कधींही असणार नाहीं. त्याचप्रमाणें देह असेपर्यंत जीवन्मुक्ताचाही देहधर्मरूप व्यवहार निवृत्त होणार नाहीं. अर्थात् त्यांना व्युत्थानदशेंत बाह्य पदार्थांचें ज्ञान होणें अगदीं अवश्य आहे. पण त्यामुळें त्याचें चित्तही बद्ध होईल, अशी शंका घेऊं नको. कारण एकदां मुक्त झालेलें चित्त पुनः कधींही बद्ध होणार नाहीं. देंठापासून गळलेलें फळ पुनः कोणी तरी देंठाला पूर्वीप्रमाणें चिकटवूं शकेल का? नाहीं. त्याचप्रमाणें संसारधर्मांपासून सुटलेलें चित्त पुनः त्यांनीं युक्त होत नाहीं. अर्थात् मुक्त व अमुक्त यांचे देह-धर्म एकसारखेच अनुवृत्त होतात; पण चित्त-धर्म तसे होत नाहींत. तसेंच हे जीवन्मुक्त आहेत, असें कोणाला सहसा कळत नाहीं. पण धारणायोगी त्यांच्या अभ्यासादि प्रयत्नांवरून दुसऱ्यांना सहज ओळखतां येतात. मद्यादिकांच्या आस्वादापासून होणाऱ्या सुखाप्रमाणें मोक्ष स्वसंवेद्य आहे. त्यामुळें बंधनाप्रमाणें मोक्षही मनामध्येंच जरी असला तरी त्याची साक्षीच्या स्वानुभवानेंच सिद्धि होत असते.

श्रीराम—भगवन्, बंध व मोक्ष हे दोन्ही जर मनाचे धर्म आहेत तर आत्मा बद्ध आहे व तो मुक्त झाला, असें शास्त्रांत कसें म्हटलेलें आढळतें?

**श्रीवसिष्ठ**—स्वानुभूति देणारा हा आत्मा सुख व दुःख या मनोधर्मांनीं युक्त होऊन स्वतः जीव बनतो व बंधाचा अनुभव घेतो. यास्तव विचारानें तो स्वतः मनापासून पृथक् झाला म्हणजेच त्याला शास्त्रांत मुक्त म्हणतात. अर्थात् त्यानें मनाशीं मिळणें, एकरूप होणें, हाच बंध व त्याच्यापासून आपल्याला पृथक् समजणें, हाच मोक्ष होय. ' असें जर आहे तर देहादिकही त्या दोन मनोधर्मांनीं बद्ध व मुक्त आहेत, असें म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे ?' म्हणून म्हणशील पण तें बरोबर नव्हे. कारण आह्लाद व संताप हे आतर आहेत, यास्तव आतर चिदात्म्याचे ठायींच त्याचा आरोप होणें उचित आहे. बाह्य देहादिकाच्या ठायीं तो होणें शक्य नाहीं. शिवाय मी सुखी व दुःखी आहे, असा अध्यास अनुभवसिद्ध आहे. तेव्हा शास्त्रात त्याचा स्वीकार व तसा निर्देश केलेला असल्यास त्यांत कांहीं दोष नाहीं. संततचित्त हाच बंध आहे. अर्थात् तो देहाला असणें मुळींच संभवत नाहीं. एकाग्रचित्तामध्यें शरीराचे धर्म दिसत नाहींत. मन लीन झाल्यावर शरीराचे तुकडे तुकडे केले तरी त्याला समजत नाहीं. त्याप्रमाणें मनाचे धर्मही शरीराचे ठिकाणीं दिसत नाहींत. मन आंत वाऱ्यात ठेवलेल्या दिव्याच्या ज्योतीप्रमाणें फडफडत असलें तरी शरीर बसल्याजागीं स्थिर असतें. तस्मात् रामा, जीवन्मुक्ताचा देह हंसत किंवा रडत असला तरी त्याच्या मतीला आत देहप्रयुक्त सुख दुःखाचा स्पर्श होत नाहीं.

**श्रीराम**—पण प्रभो, माझ्या पायास कांटा लागला असून तो फार पीडा देत आहे. माझ्या हृदयावरील चंदनाच्या उटीमुळें मला फार सुख होत आहे, असें सांगून मानव मनाच्या सुख-दुःखादि धर्मांना देहाच्या ठिकाणींही असल्याप्रमाणें दाखवीत असतो. तेव्हां त्याचा आत्म्याच्याच ठिकाणीं मात्र अध्यास होतो, असें कसें म्हणतां येईल ?

**श्रीवसिष्ठ**—अवच्छेदकतासंबंधानें देहाचे ठायीं सुखदुःखादिकांचा भास जरी झाला तरी मी सुखी, मी दुःखी इत्यादि प्रकारें आत्म्यामध्येंच त्यांच्या अनुभवाचें पर्यवसान होत असतें. यास्तव त्यांची कल्पनाही आत्म्यामध्येंच आहे, बाह्य देहादिकामध्यें नव्हे. म्हणूनच आत्म्याच्या ठिकाणच्या या अध्यासास न मानणारे व देहादिक भिन्न

भिन्न पदार्थच आत्मा आहे असें अभिमानानें म्हणणारे चार्वाक, नैयायिक, सांख्य, बौद्ध, काणाद, इत्यादि पंडित मोक्षाचा उपाय न मिळाल्यामुळें आपोआप पराभूत झाल्यासारखे दिसतात. कारण त्यांनीं आपापल्या शास्त्रांत सांगितलेल्या उपायानीं त्यांचेंच समाधान झालें आहे, असें दिसत नाहीं. शिवाय वेदान्तज्ञ लोकाशीं जल्पकथा करीत असतांनाही ते टिकत नाहींत, असा अनुभव येतो. असो; जीवन्मुक्तांना तर स्वभावतः देहादिक नसतात. यास्तव देहादि मेले तरी जीवन्मुक्त मरत नाहींत, ते रडले तरी ते रडत नाहींत. व देह हंसत असले तरी ते हंसत नाहींत. ते सराग असल्यासारखे भासले तरी विराग असतात. रागिट असल्याचा भास झाला तरी कोपशून्य असतात. ते तत्त्वज्ञ मोहरहित असले तरी लोकदृष्ट्या मोहयुक्त असल्यासारखे वाटतात. हें सुख, हें दुःख इत्यादि कल्पना त्याना सोडून दूर गेलेल्या असतात. तत्त्वज्ञ वासनारहित असतात. हरि, हर, आदित्य, चंद्र, वायु, इंद्र, यम इत्यादि सर्व जीवन्मुक्त आहेत. ते मनातून मुक्त राहून बाहेरून विविध चेष्टा करीत असतात. ते वस्तुतः निःस्पृह असूनही कृपणासारखे भासतात. शुक्र व बृहस्पति जीवन्मुक्त असूनही असुर व सुर यांचें पौरोहित्य करितात. जनक जीवन्मुक्तचित्त असनही राज्य करतो. असे आजवर अनेक जीवन्मुक्त या लोकीं राहून गेले आहेत व पुढेंही येऊन राहतील. हल्लींही पुष्कळ आहेत. व्यवहारात ज्ञानी व अज्ञानी हे दोघेही सारखेच. कारण व्यवहार किंवा अव्यवहार हें बंध किंवा मोक्ष याचें निमित्त नसून वासना व अवासना हेंच त्याचें निमित्त आहे. जीवन्मुक्त आपल्या शुद्ध ज्ञानानें सर्व वस्तूंस आकाशरूप पहात असतात. तेव्हां त्यांच्या ठायीं भेदमति कोठची ? शून्य प्रदेशाही इंद्रधनुष्याकार जसा दिसतो, तसेंच हें जग आहे. यास्तव हे चिदाकाशमय रामा, हें सर्व दृश्य एकाद्या छिद्ररहित पाषाणाप्रमाणेंच पूर्ण ब्रह्ममय आहे. यास्तव तें शांत व मौन होऊन राहिलें आहे. तथापि त्यालाच जगत् असें नांव देऊन हा स्वात्मा मोहितसा होऊन राहिला आहे. अहाहा ! ही त्या ईश्वराची माया अति आश्चर्यकारक आहे १२५.

**सर्ग १२६—मेलेल्या चारी राजांना आंतल्या आंत झालेला संसारभ्रम व उत्तरेकडील विपश्चिताला तम.खातदर्शन.**

श्रीराम—भगवन्, त्यानंतर ते विपश्चित् राजे दिशांच्या अंत-भागीं काय करीत राहिले ?

श्रीवसिष्ठ—रामा, तालि, तमाल इत्यादि वृक्षांच्या पंक्तींतून हिंड-णाऱ्या त्या राजांचें पुढें काय झालें तें ऐक. त्यांतील एकाला म्हणजे पश्चिमेंतील विपश्चिताला कोणी एका हत्तीनें त्याच दिशेंतील एका पर्व-ताच्या कड्यावर कमलाप्रमाणें चुरडून टाकलें. दुसऱ्याला एका राक्षसानें अरण्यावर उचलून नेऊन वाडवाग्नीमध्यें सोडलें. तिसऱ्याला एका विद्याधरानें देवलोकीं नेलें. पण तेथें पोंचल्यावर त्यानें इंद्राला प्रणाम केला नाहीं; म्हणून त्या देवेशानें त्याला शाप देऊन भस्म करून सोडलें. चवथा कुशद्वीप पर्वताच्या तटावरून फिरत असतांना त्याला एका दुर्वार मकरानें फाडून सोडलें. याप्रमाणें ते चौघेही चारी दिशेंत मरण पावले. त्यानंतर आकाशांत आकाशरूपी झालेल्या त्या चौघांच्याही संवितेनें त्यांच्या देहांस पाहिलें. त्यांच्या त्या चारी आतिवाहिक संवित्तीही पुढें पड-लेल्या स्थूल देहांस पाहिल्यावर पूर्वसंस्कारवशात् ही दृश्य पृथिव्यादि-रूप अविद्या कितीशी आहे, तें पाहण्यास प्रवृत्त झाल्या. त्यांतील पश्चिमे-कडील विपश्चिताची संवित् सागराचें उल्लंघन करून भाग्यवशात् स्वर्ण-भूमींत क्रीडा करीत असलेल्या जनार्दनापाशीं येऊन पोंचली. त्यांचें दर्शन झाल्यावर राजाला त्या देवाधिदेवाच्या अनुग्रहानें उत्तम ज्ञान प्राप्त झालें. तेव्हां त्या ब्रह्मविद्येनें संतुष्ट झालेली ती संवित् त्याच दिशेंत समाधि लावून पांच वर्षे राहिली. नंतर देहभावाचा त्याग करून ती चिन्मात्रसत्तेंत लीन झाली. त्यामुळें तो विपश्चित् परम कैवल्यास प्राप्त झाला. त्याचप्रमाणें त्याचा प्राण आकाशभावास व इतर सर्व शक्ति आपापल्या कारणांत लीन झाल्या.

पूर्वेकडील राजा आपलें शरीर पूर्णचंद्रापाशीं आहे, असें चिंतन करीत असल्यामुळें देहरहित होत्साता चंद्रलोकीं राहिला. दक्षिणेकडील विपश्चित् शाल्मलिद्वीपांतील शत्रूंचा उच्छेद करून व दुसऱ्या पूर्वीच्या सर्व निश्चयांस विसरून तेथेंच अद्यापि राज्य करीत राहिला आहे. उत्तरे-कडचा विपश्चित् सहस्रावर्षें एका मकराच्या उदरांत राहिला. तो तेथें मक-राच्या उदरांतील मांस खात असे. पुढें मकर मेल्यावर तो एखादा मक-

राप्रमाणेंच त्याच्या उदरांतून निघाला. त्यानंतर तो आणखी अनेक वर्षे तसाच फिरत राहिला, व शेवटीं देवांच्या संचारास योग्य असलेल्या भूमींत येऊन तेथें मेला. त्यानंतर तो प्रधान देव होऊन लोकालोक पर्वतावर गेला. त्या अतिशय उंच पर्वताच्या शिखरावर उंच स्थानीं चढून बसलेल्या त्याला खालचे लोक नक्षत्राप्रमाणें पहात होते. असो; त्या पर्वताच्या पलीकडे चोहों बाजूंस एक मोठें खात होतें. तें अंधकारानें भरलेलें असून आकाशाप्रमाणें शून्य होतें. त्याचा अंत लागत नव्हता. तेथून पुढें हा लोक नाहीं. लोकालोकपर्वत हा या गोलाकार भूलोकाच्या सीमेवर आहे. त्याच्या सभोंवार अंधकारानें भरलेली एक अपार व अनंत पोकळी मात्र आहे; दुसरें कांहीं नाहीं, असें त्यानें साक्षात् पाहिलें १२६.

**सर्ग १२७—भूमि व नक्षत्रचक्र यांची स्थिति, त्याच्या पलीकडे आकाश; व ब्रह्मांडाच्या दोन खर्परांची स्थिति.**

**श्रीराम**—भगवन्, भूगोल नक्षत्रगण व लोकालोक कसा स्थित आहे, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**—रामा, एखाद्या कल्पक बालकानें संकल्पानें रचलेला चेंडू जसा आकाशांत अंतराळीं राहतो त्याप्रमाणें चिन्मात्रबालकानें कल्पिलेली भूमि आकाशांत असते. ज्याला तिमिररोग झाला आहे त्याला जसे डोळ्यांपुढें केंस व दोन चद्र दिसतात त्याप्रमाणें चिदाकाशाला सृष्टीच्या आरंभीं पृथिव्यादिकांचें दर्शन होतें. संकल्पनगराला कोणी धारण केलें आहे, असें दिसत नाहीं. तथापि धारण केल्याप्रमाणें त्याचा अनुभव येतो. त्याचप्रमाणें चितीला निराधार पृथ्वीचा अनुभव येतो. संकल्पाप्रमाणें वस्तूचा अनुभव घेणें हा तिचा स्वभाव आहे. राघवा, या भूमीच्या स्थितीविषयीं अनेकांच्या अनेक कल्पना आहेत. पण तर्काच्या व अनुभवाच्या कसोटीला उतरेल अशी त्यांतील एकही कल्पना नाहीं. कारण बहुतेक सर्व शास्त्रकार व कल्पक तिला सत्य वस्तु समजून नंतर तिच्या स्थितीची उपपत्ति लावण्याची खटपट करितात व त्यामुळें कालांतरानें आपलें मत खरें नव्हतें, असें त्यांचें त्यांसच आढळून तें पुनः बदलावें लागतें. पण आम्ही हिला व इतर सर्व अनात्म-

पदार्थांना असत् समजत असल्याकारणानें आम्हांला त्याच्या स्थितीची उपपत्ति लावणें फारसें कठिण वाटत नाहीं. असो; येणेंप्रमाणें ही सृष्टि अनवस्थितस्वरूप आहे; तिच्यांत कोठें प्रकाश, कोठें अंधकार, कोठें तेज, कोठें तम, कोठें घनता, कोठें आकाश, कोठें पृथ्वी, कोठें जल, याप्रमाणें सर्व अनियतता आहे. सर्व वस्तूंचें प्रमाणही एकसारखे नाहीं. पृथ्वीच्या पुढें पाणी, या लोकाच्या दुप्पट नक्षत्रमंडल, त्याच्या पलीकडे त्याच्या दुप्पट आकाश, त्यांतही कोठें प्रकाश, कोठें अंधकार असा सर्व विचित्र प्रकार आहे. त्याच्या पलीकडे ब्रह्मांडाचें खर्पर ( शकल, कवची ) आहे. आकाशाच्या दोन्ही बाजूंस दोन खर्परें असून त्यांतील एक अधःखर्पर व दुसरें उर्ध्व खर्पर आहे व त्याच्यामध्यें हें महा आकाश आहे. त्याचें परिमाण करवत नाहीं. महा गोलाकार अशा या आकाशात सूर्य, तारा इत्यादिकांनीं युक्त असलेले हे ज्योतिश्चक्र सर्वतः आहे. तेव्हा यात खालीं, वर, बाजूस इत्यादि कोणाला कसें म्हणणार ? सर्व वस्तु आपापल्या नियतीप्रमाणें खालीं, वर तिरकस इत्यादि भ्रमण करीत असतात. तथापि त्या सर्व एकत्र स्थित आहेत, असें जें वाटत असतें तो केवल प्रत्यगात्म्याचा भास आहे. कारण वस्तुतः पाहिल्यास त्याचें जसें गमनादिक कांहीं नाहीं त्याप्रमाणेंच अवस्थानही नाहीं. तर सर्व एक अद्वय आत्मरूप आहे १२७.

**सर्ग १२८**—विपश्चित् तम.श्वभ्र व ब्रह्मांडावरणें यांचें उल्लंघन करून अनिर्वेत भ्रमण करीत राहिला

**श्रीवसिष्ठ**—रामा, मी सांगितलेला हा सर्व जगाचा अनवस्थित भाव सर्व योग्यांना व सिद्धांना सूक्ष्म देहानें साक्षात् पाहता येण्यासारखा आहे. मी तो साक्षात् पाहिला आहे. पण ही वर वर्णिलेली स्थिति आमच्या या जगत्स्वप्नांत मात्र दिसते. इतर जगत्स्वप्नांतून ती निराळ्या प्रकारचीही असण्याचा संभव आहे. पण तिचें वर्णन करून व्यर्थ काल घालविण्यात काय अर्थ आहे ? बुद्धिमान् लोक निरर्थक गोष्टी बोलत नाहींत. सर्व ब्रह्मांडाच्या उत्तरेस मेरु व दक्षिणेस लोकालोक पर्वत आहे, एवढें सामान्यतः कळलें म्हणजे मग मधल्या विचित्रतेशीं काय करावयाचें आहे. ? कारण प्रत्येक

ब्रह्मांडांतील त्या दोन पर्वताच्या मध्यवर्ती प्रदेशांत जे कांहीं विशेष असतील ते त्या त्या ब्रह्मांडातील जनांनाच प्रत्यक्ष होणें शक्य आहे. येथल्या जनांना ते प्रत्यक्ष दिसण्यासारखे नाहींत.

असो, रामा, वर जीं मी दोन ब्रह्मांडाचीं खर्परें सांगितलीं आहेत, त्याच्या बाहेर दसपट जलावरण आहे. त्यास तीं ब्रह्मांडाचीं आवरणेंच आपल्यातील आकर्षणशक्तीनें धारण करितात. कारण तीं पृथिवीच्या अंशरूप असल्यामुळें त्यांच्यामध्यें आकर्षणशक्ति असते. जलावरणाच्या पलीकडे उत्तरोत्तर दसपट तेज, वायु व आकाश असतें. त्यांच्याही पलीकडे अनंत व शांत ब्रह्माकाश असतें. त्याला प्रकाश अथवा तम ( अंधकार ) ही म्हणतां येत नाहीं. तें आदि-अंत-मध्यशून्य आहे. त्या महाचित् नांवाच्या सर्वात्म्यामध्यें फार दूर दूर अंतरावर पूर्वोक्त ब्रह्मांडासारखीं लक्षावधि ब्रह्मांडें समुद्रातील लाटाप्रमाणें अथवा बुडबुड्याप्रमाणें असतात. पण तीं सर्व ब्रह्मात्ममय आहेत. तीं त्यांतच राहतात, व त्यांच्याच विवर्तरूप आहेत. असो, बा तत्त्वज्ञा, मी हा तुला सर्व दृश्यानुभवक्रम सांगितला आहे. आतां लोकालोक पर्वतावर त्या विपश्चितूचें काय झालें तें सांगतों ऐका.—

दिशांचा अंत पाहण्याविषयींचा ज्याचा निश्चय दृढ झालेला आहे, असा तो त्या उत्तमस्थानींही फार वेळ राहिला नाहीं. लोकालोक पर्वताच्या शिखरावरूनही तो त्या अंधकारमय पोकळींत पडला. पण त्यांत पर्वतशिखरासारख्या मोठाल्या पक्ष्यांनीं त्याला खाऊन टाकलें. तेव्हां तो मनोदेहानेंच दिशांचा अंत पाहण्यास प्रवृत्त झाला, त्याचा स्थूलदेह त्या पुण्यप्रदेशांत पडलेला ( मेलेला ) असल्यामुळें ज्याच्या पुण्यप्रभावानें त्याच्या आतिवाहिक देहानें आधिभौतिक देहाची कल्पना केली नाहीं. त्याला स्थूलभावाचें विस्मरणच झालें. पण मी स्थूलदेहातिरिक्त आहें, एवढ्याच बोधानें युक्त असलेल्या त्याला त्याहून अधिक ( म्हणजे देहत्रयातिरिक्त शुद्ध चिन्मात्ररूपतेचें ) ज्ञान झालें नाहीं. त्यामुळें दिशांचा अंत लावणें, हें आपलें कार्य अजून शेवटास गेलेलें नाहीं, असें पाहून तो त्याच शरीरानें ह्या महा पोकळींत फिरूं लागला.

श्रीराम—मुने, देहावांचून केवळ चित्त कार्यामध्यें कसें प्रवृत्त झालें व आतिवाहिक संवित्तीहून अधिक बोध कोणता ?

श्रीवसिष्ठ—अंतःपुरांत बसलेला पुरुषही जसा संकल्पानें बाहेर प्रवास करूं शकतो त्याप्रमाणें त्याचें मनही शरीरावांचून आपलें कल्पनामय कार्य करूं लागलें. स्वप्न, मनोराज्य इत्यादिकामध्यें स्थूलशरीराची अपेक्षा न करितांच सूक्ष्म आतिवाहिक मन सर्व प्रवृत्ति करूं शकतें. विचारानें आधिभौतिकताभ्रम निवृत्त झाला असतां आतिवाहिक मात्र अवशिष्ट रहातो. नंतर बा रामा, चांगला विचार केला असतां तो राहिलेला आतिवाहिक भावही चिन्मात्ररूप होतो. निर्विषय चिन्मात्रप्रतीति कशी होते तें मी पूर्वी पुष्कळ वेळां सांगितलें आहे. हा सर्वोत्तम भाव सिद्ध झाला म्हणजे द्वैत, राग, द्वेष, इत्यादिकांतील कांहीं रहात नाहीं. तो सर्व शिव अनादि-अनंत बोधच आहे. मनोमननरहित व शांत अवस्थान हाच उत्तम बोध होय. पण आतिवाहिक देहामध्यें स्थित असलेला विपश्चित् राजा त्या बोधास प्राप्त झाला नव्हता. तो आपल्याला केवळ सूक्ष्म देह समजत होता. म्हणून त्याला मी सर्वतः भ्रमण करीत आहें, असें वाटलें. त्यानें त्या महाध्वभ्रांत गर्भवासस्थानाप्रमाणें गाढ तम पाहिलें. त्याच्या एका टोंकास पूर्वोक्त ब्रह्मांडखर्पर होतें. त्याच्यापुढें जल, तेज व वायु यांचीं आवरणें त्याला दिसलीं. त्या सर्वांतून तो अनायासानें तरून गेला. कारण हें सर्व स्वप्नप्राय आहे, असा बोध त्याला होता. वायूच्या आवरणानंतर महा आकाशाचें आवरण लागलें. पण तो महानिश्चयी राजा त्याचेंही उल्लंघन करून शबल ब्रह्माकाशांत जाऊन पोंचला. त्यांतच हें सर्व जग होतें, व तें सर्व त्याच्यापासूनच झालें होतें. तो राजा मनानें भ्रमण करीत तेथून फार दूरवर गेला. तों त्याला दुसरें ब्रह्मांड लागलें. त्यांतूनही तो पार गेला. तों तिसरें ब्रह्मांड दिसलें. त्याच्याही पलीकडे गेलेल्या त्याला चवथें, पांचवें, दहावें, शंभरावें, सहस्रावें, लक्षावें, अशीं असंख्य ब्रह्मांडें दिसलीं. प्रत्येकाची रचना एकसारखीच होती. जागजागीं तशींच भूतें, तशींच आवरणें, तसेच पर्वत, तशाच नद्या, व तसेंच सर्व कांहीं. तात्पर्य राघवा, दिशांच्या अंत जाणण्याच्या यत्नानें दृढ निश्चय केला आहे, असा तो राजा अद्यापि भटकत राहिला आहे. पण त्याला तो

अजून लागत नाहीं. जिकडे जावें तिकडे त्याला पुनः पुनः तेंच तें दिसतें. पण दीर्घ कालापासून दृढ होऊन राहिलेल्या 'जग सत्य आहे,' या निश्चयापासून तो ढळत नाहीं. रामा, या अविद्येचा अंत नाहीं. तिचा सत्य स्वभाव जर पाहिला तर ती साक्षात् ब्रह्मच आहे. कारण निर्विकार ब्रह्मामध्यें वस्तुतः अविद्या नाहीं. तर तो आत्माच हें दृश्य व ही अविद्या यांच्यारूपानें विकास पावला आहे. जें ब्रह्म तूं जाग्रत् व स्वप्न यांत जशा प्रकारच्या वासनेनें पूर्वी पाहिलेंस, आता पहात आहेस व पुढें पाहशील तें ब्रह्म तसेंच होतें, आहे, व असेल. म्हणूनच हें जग सतही नव्हे व असतही नव्हे. तर अनिर्वचनीय आहे. हे रामा, तो विपश्चित् राजा तत्त्वज्ञान झालेलें नसल्यामुळें अद्यापि पुनः पुनः त्याच त्या ब्रह्मांडोदरांत एकसारखा एकाद्या हरणाप्रमाणें भटकत राहिला आहे. १२८.

सर्ग १२९—राहिलेल्या दोघां विपश्चितांचा वृत्तान्त. त्यांतील एकाला मृगत्वाची प्राप्ति व शेवटीं दोघांचा समागम.

श्रीराम—भगवन्, चार विपश्चितांपैकीं एक भगवान् विष्णूच्या प्रसादानें ज्ञानवान् होऊन मुक्त झाला. दुसरा अद्यापि अविद्येमध्ये भ्रमण करीत राहिला आहे. पण बाकी राहिलेल्या दोघांचें पुढें काय झालें, तें सांगा.

श्रीवसिष्ठ—रामा, चंद्रलोक व शाल्मलीद्वीप यांतील भोगांमध्यें आसक्त होऊन राहिलेल्या त्या दोघांतील एकजण ( दक्षिणेकडे जाणारा विपश्चित् राजा ) उत्तर विपश्चित्–राजाच्याच अवस्थेंत जाऊन पडला. म्हणजे त्याच्याप्रमाणेंच ब्रह्मांडावरणाचें उल्लंघन करून शबलब्रह्मांत भ्रमण करूं लागला. तो अद्यापि लक्षावधि ब्रह्मांडें पहात तसाच फिरत आहे. पण पूर्वेकडील राजा चंद्रलोकीं असताना तेथील चंद्रलांछनभूत मृगाशीं अतिशय स्नेह जमल्यामुळें त्याच संस्कारानें आता हरिण होऊन एका पर्वतावर विहार करीत राहिला आहे.

श्रीराम—पण भगवन्, चौघांची एकच वासना असतांना व ती सर्वांची सदा एकसारखीच जागत असतांना हीन व उत्तम फलरूप कशी झाली ?

**श्रीवसिष्ठ**—प्राण्याची चांगल्या प्रकारें अभ्यासलेली ही वासना अ-परिपक्व असल्यास (देश-काल-क्रियावशात्) विपरीत होते व तीच परिपक्व झालेली असल्यास कधींही बदलत नाहीं. विपश्चितांची ती वासना अतिशय परिपक्व झालेली नव्हती. म्हणून त्यांच्या फलामध्यें पुढें बदल झाला. त्यांतील दोघे अविद्येचा अंत लावण्यासाठीं अद्यापि भ्रमण करीत आहेत. एक मुक्त झाला व चवथा हरण होऊन राहिला आहे. पण अविद्येचा अंत लागणें शक्य नाहीं. कारण ती अनंत आहे. पण सूर्योदय होताच अंधकाराची शोभा जशी समूळ नष्ट होते त्याप्रमाणें विज्ञानप्रकाश येतांच ती तत्काल शांत होते. आतां पश्चिम विपश्चित् राजाला मुक्ति कशी मिळाली तें मी सागतों, ऐक. वर सांगितल्याप्रमाणें तो एक-सारखा भटकत असताना ब्रह्ममहाकाशांतील कोणा एका दृश्य मंडलात आला. तेथें त्याला भाग्यवशात् शम, दम, श्रद्धा, तितिक्षा इत्यादि शुभ गुणांनीं युक्त असलेल्या साधकांची संगति लाधली. तिच्या योगानें तो जीवन्मुक्ताच्या समाजात जाऊं लागला व त्याला आत्मज्ञान झालें. तो ब्रह्मरूप बनला. त्याबरोबर त्याची ती अविद्याभ्रांति, तो सूक्ष्म देह व तो पूर्वीचा निश्चय हीं सर्व एकाच वेळीं क्षीण झालीं. असो; राघवा, याप्रमाणें मी तुला हें सर्व विपश्चित्–राजाचें वृत्त व चेष्टित सांगितलें आहे. त्यांना जिचा अंत लावितां आला नाहीं, अशी ही कार्योविद्या सर्व दिशांमध्यें अद्यापि तशीच पसरलेली आहे. कारण तिची कल्पना करणारी अज्ञात चित् अनंत असल्यामुळें लक्षावधि वर्षें लक्षावधि योजनें जरी हिंडत राहिलें तरी ती (अज्ञात चित्) स्वभावतःच कशाना कशाची तरी कल्पना अवश्य करणारच. अज्ञात ब्रह्मालाच अविद्या म्हणतात. पण तेंच ज्ञात झालें असता शांत ब्रह्म होतें. असो; रामा, त्या ब्रह्माला न जाणणाऱ्या उत्तर विपश्चिताला दीर्घ-काल अविद्येमध्यें भ्रमण करूनही तिचा अंत लागला नाहीं.

**श्रीराम**—भगवन्, विपश्चित् राजाला ब्रह्मांडकपाटच सांपडलें नाहीं कीं काय? कारण तो त्याला फोडून त्यांतून बाहेर कसा गेला, तें तुम्ही सांगितलें नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—रामा, ब्रह्मदेवानें पूर्वी उत्पन्न होतांच आपल्या दोन्ही हातांनीं ब्रह्मांडमंडलाचे, एक खालचा व दुसरा वरचा, असे दोन भाग केले. त्यामुळें वरचा भाग फार वर गेला व खालचा अगदीं खालीं गेला आणि त्या दोन्ही कपालाच्या मध्यें विपुल आकाश भरून राहिलें. तेंच हें अपार भूत आपणाला नीलवर्ण दिसतें. तीं दोन कपालेंच ब्रह्मांडाच्या बाहेरील जलादि आवरणास धारण करणारीं आधारस्थानें झालीं. अर्थात् तीं खर्परेंही वस्तुतः कल्पित आहेत. सत्य नव्हेत. जलाच्या आवरणाचा विभाग जेथून होतो तेंच ब्रह्मांडाचें वरचें व खालचें; शकल होय. वस्तुतः तें कांहीं तव्यासारखें किंवा परळासारखें कठिण कवच नव्हे. त्यामुळें विपश्चित् नक्षत्रचक्राप्रमाणेंच त्या मार्गानें पुढें गेला. अविद्येचा अंत लावण्याचा अपक्क निश्चय हाच त्याचा मार्गदर्शक व प्रेरक झाला. असो; रामा, 'मी स्वप्नांत पाहिलेला अमुक एक अपूर्व गांव येथून किती दूर आहे' असें कोणी विचारूं लागल्यास तें जसें सांगतां येणें शक्य नाहीं त्याप्रमाणें भ्रमण करणारे ते दोघे विपश्चित् किती दूर होते किंवा आहेत, हें मला सांगतां येणार नाहीं. पण तिसरा मृग झालेला राजा मात्र या आमच्या ब्रह्मांडांतच नव्हे, तर यावेळीं या आपल्या राजमंदिरांत आहे हें मी जाणतों. तो, आम्ही कधीं पाहिलींही नाहींत, अशा अनेक ब्रह्मांडांतून हिंडून आतां येथें येऊन राहिला आहे. रामा, तुला त्रिगर्त राजानें दिलेला जो क्रीडामृग तुजपाशीं आहे, तोच तो राजा होय.

**श्रीवाल्मीकि**—वसिष्ठाच्या तोंडचें हें आश्चर्यकारक वर्तमान ऐकून रामाला मोठा विस्मय वाटला व त्यानें आपल्या बरोबरच्या इतर बालकास त्या हरणाला सभेंत आणावयास पाठविलें. त्यांनींहीं त्याला मोठ्या त्वरेनें तेथें आणलें. सभेंत येतांच सर्व सभासदांनीं त्या हृष्ट-पुष्टांग हरिणाला पाहिलें. त्याच्या नीलवर्ण अंगावर पांढरे ठिपके होते. ते नक्षत्रयुक्त स्वच्छ आकाशाचें भान करवीत होते. त्याच्या चंचल नेत्रांकडे पाहून सभेंतील तरुणींना हा आपलें अनुकरण करून आपल्याला लाजवीतच आहे, असें वाटलें. तो आपल्या स्वाभावीक आसक्तीमुळें कोमल तृणाच्या आशेनें इकडे तिकडे पळण्याचा प्रयत्न करीत होता. बालकाच्या घोळक्याबरोबर

चालतां चालतां तो मध्येंच एकदम उभा राहून आपल्या भयभीत दृष्टीनें सभ्यांकडे अवलोकन करीत असे. आपल्या मनोरम ग्रीवाभंगानें ( मान मुरडून ) मागें पाहणारा तो सभासदांना आनंद देता झाला. त्याला पाहून राजा, मुनि व मंत्री यांना ' ही काय विचित्र माया आहे, ' असें वाटलें आणि सर्वच सभासद त्याच्याकडे पहात चित्राप्रमाणें स्थिर राहिले १२९.

सर्ग १३०—वसिष्ठांच्या ध्यानजन्य अग्नींत मृगाचा प्रवेश, त्याला विपश्चित् देहाचा लाभ व पूर्वीचें स्मरण.

**श्रीराम**—मुने, या विपश्चित्-राजाच्या दुःखाचा नाश कोणत्या उपायानें होईल ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, ज्या पुरुषाला ज्या देवतेची पुनः पुनः दीर्घकाळ उपासना केल्यानें सिद्धि मिळालेली असते त्याला त्या देवतेवाचून दुसरी गति नसते. अर्थात् पुढच्या सिद्धी करिताही त्याला त्याचीच उपासना करावी लागते. त्यावाचून ती मिळत नाहीं; मिळाली तरी शोभत नाहीं; सुखकर व हितकर होत नाहीं. या विपश्चित् राजाचा आश्रय अग्नि आहे. त्यात प्रवेश केल्यानें हा मृग पुनः पूर्व भावास प्राप्त होईल. मी आतां येथेंच हा सर्व चमत्कार करून दाखवितों पहा.

**श्रीवाल्मीकि**—इतकें बोलून, त्या मुनीनें आपलें चित्त ध्यानासक्त करून योग-सामर्थ्यानें अग्नीला निर्माण केलें. तो इंधन, धूम इत्यादिकांवांचूनच वसिष्ठाच्या पुढें ज्वाला-रूपानें उत्पन्न होऊन सभासदांना दूर सारीत वाढूं लागला. तेव्हा ' भगवन् अग्ने पूर्वी अनेकदा अनुग्रह केलेल्या या विपश्चिताला स्पर्श करून पूर्व देह दे. ' असें अग्नीला विनवून, वसिष्ठमुनि त्या हरणाकडे कृपादृष्टीनें पाहूं लागला. पण पूर्वीच्या गूढ संस्कारामुळें तो पशुरूप राजा अग्नीला पाहतांच प्रथम जरी उल्लसित झाला होता तरी त्याच्या उग्र ज्वाला समीप येताच, सिंहाच्या पुढून जसा, तसाच तो वेगानें मागें पळूं लागला. पण भगवान् वसिष्ठानें आपल्या सामर्थ्यानें त्याला निष्पाप करून अग्नींत प्रविष्ट केलें. तेव्हां तो मृगही आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें अथवा संध्याकाळच्या मेघाप्रमाणें अग्नीच्या ज्वालासमूहांत स्थिर उभा राहिला. त्याचें शरीर सभ्यांना स्पष्ट दिसत होतें. पण ते सर्व त्याच्याकडे टक लावून पाहत असतांनाच तो पशुभाव सोडून मनुष्या-

कार झाला. त्याची कांति अतिशय रमणीय असून सर्व अवयव सुंदर होते. इतक्यांत तो अग्निही आपल्या सर्व ज्वालांचा उपसंहार करून अस्त पावलेल्या सूर्याप्रमाणें कोठें अदृश्य झाला आणि पुरुषाकार, अक्षमालाधर, सुवर्ण यज्ञोपवीती, व शुद्ध वस्त्राच्छादित विपश्चित् नुकत्याच उगवलेल्या चंद्राप्रमाणें तेथें उभा असलेला सर्वांना दिसला. त्याचा वेष पाहून 'अहो विचित्र भास ( कांति ) !' असें सर्व लोक एकाच वेळीं म्हणाले. त्या सर्वांनीं त्याला भास असेंच नाव दिलें. कांहीं वेळानें स्वतः अतिशय विस्मित झालेला तो भास तेथेंच खालीं बसून क्षणभर मनात चिंतन करूं लागला. तेव्हा त्याला आपला सर्व वृत्तान्त आठवला. नंतर सर्व लोक विस्मयानें त्याच्याकडे पहात असताना तो महात्मा पुनः उठला. आपण कोण कोठून, कोठें व कसें आलों, हें पूर्वींच कळलेलें असल्यामुळें त्यानें सहेतुक दृष्टीनें सभेतील सर्व लोकाकडे पाहिलें. तो एकदम वसिष्ठापुढें आला आणि 'भगवन्, ज्ञानसूर्य व प्राण देणाऱ्या मुने, तुला मी शतशः प्रणाम करतों, असें म्हणून त्यानें त्याच्यापुढें लोटांगणें घातलीं. तेव्हा मुनि वसिष्ठानेंही त्याच्या मस्तकास हस्तस्पर्श करून 'राजा, आतां तुझ्या अविद्येचा अत्यंत क्षय होवो' असा आशीर्वाद दिला.

त्यानंतर तो रामाला तुझा जयजयकार असो, असें म्हणत दशरथापाशीं गेला. तेव्हां आपल्या आसनावरून किंचित् उठून दशरथ हंसतचसा त्याला म्हणाला, "राजन्, तुझें स्वागत असो; हें आसन आहे. यावर बैस. अनेक जन्मांतील संसारांत भ्रमण करून तूं फार थकला आहेस. यास्तव जरा विश्रांति घे." दशरथानें असें म्हटलें असता विश्वामित्रादि मुनींना प्रमाण करीत तो आसनावर बसला.

**दशरथ**—अरेरे, या विपश्चित् राजानें अविद्येमुळें दीर्घ काल दुःख भोगलें. खरोखर अज्ञानरूपी दुर्दृष्टीची गति मोठी कठीण आहे ! आकाशांतील विचित्र देखाव्याप्रमाणें ही संसार–भाडंबर दाखवीत असते. या महात्म्यानें किती जगांतून भ्रमण केलें बरें ? शून्यरूप चिदात्म्यामध्येंही असलीं विविध जगें उत्पन्न होऊन भासतात, याला काय म्हणावें ! ! १२०.

**सर्ग १२१**—वटधानाराजपुत्राची कथा सांगून कौशिकानें प्रेरणा केली असतां विपश्चित् आपली भ्रांति विस्तरपूर्वक वर्णितो.

**श्रीदशरथ**—दिगंत पाहणें, या अविद्यारूप दुराग्रहामुळें या विपश्चित्–राजाला व्यर्थ हे सर्व क्लेश झाले, असें मी समजतों. कारण असत्या मिथ्या वस्तूला संपादन करण्याचा हट्ट धरणें, यासारखें मौर्ख्य दुसरें काय असणार? व त्याचा क्लेशकारक परिणाम झाल्यावाचून कसा राहील?

**श्रीवाल्मीकी**—इतक्यात राजाच्या समीप बसलेल्या विश्वामित्राला वटधाना राजपुत्राच्या कथेचें स्मरण झालें, आणि त्यामुळें तो एकाएकीं म्हणाला, " हे राजन्, तूं ठीक बोललास, कारण ज्यांना उत्तम बोध प्राप्त झालेला नसतो त्याना अशा प्रकारच्या अनेक विचित्र भ्रांति होतात. या राजासारखेच वटधानानामकभूमींत वटधानराजपुत्र आज सतरा लक्ष वर्षें एकसारखे भ्रमण करीत राहिले आहेत. पाताळ, भूमि इत्यादि चवदा लोकानीं बनलेला हा महालोक अनेक वर्तुळाकार लोकानीं व्याप्त होत्साता आकाशात स्थित आहे. तो हिरण्यगर्भाचा शुद्ध संकल्पनिश्चयच आहे; दुसरें काहीं नाहीं. त्यात आकाशातील काल्पित वृक्षाप्रमाणें असलेला हा भूलोकही ब्राह्म संकल्पच आहे. पण तो असंख्य जीवांचा आधार आहे. तो स्वतः जरी निराधार असला तरी अंतराळीं धरलेल्या चेंडूवरील मुंग्यांप्रमाणें, त्यावर असंख्य जीव राहून व्यवहार करूं शकतात. त्या गोलाच्या खालच्या, वरच्या व बाजूच्या भागावर राहणारे जीव त्याच्याच धारणाशक्तीनें निर्भयपणें हवे तसे वावरतात. आकाशगंगा व नक्षत्रमंडल यासह अंतरिक्ष त्या भूलोकाच्याच नियमित अंतरावरून एकसारखें फिरतें. स्वतः हा लोकही स्थिर नाहीं. चंद्रादि इतर ज्योति तिला जरी स्पर्श करीत नसल्या तरी तिला सोडून जात नाहींत; तर सदा तिच्या भोवतीं फिरतात. आकाश या गोलाला सर्वतः व्यापून आहे. पण तें त्याच्या आधारानें राहणाऱ्या जीवांना नेहमीं वर दिसतें. त्यामुळें वस्तुतः पृथ्वीचा खालचा भाग कोणता व वरचा कोणता याचा निर्विवाद निर्णय होत नाहीं. पण जीवांनीं पृथ्वीचा तळ हा खालचा भाग व ज्या अवकाशांत पक्षी उडतात व नक्षत्रें दिसतात, तो ऊर्ध्व भाग अशी कल्पना केली आहे. पण वस्तुतः पक्षी उडन खाली जातात कीं वर जातात, याचा

कोणाला कांहींच थांग लागत नाहीं. या एकाच गोष्टीवरून या जगांतील प्रत्येक भाग कसा आश्चर्यमय आहे, तो पहा.

असो, अशा या पृथ्वीगोलांतील एका वटधाना नांवाच्या देशांत त्याच नांवाचे क्षत्रिय होते. राजन्, त्याच्या कुळांत पूर्वी तीन राजपुत्र झाले. तेही तिघे या चौघां विपश्चितांप्रमाणें दृश्य मार्गानें भूम्यादि सर्व जगाचा अंत पहावयास मोठ्या निश्चयानें निघाले. पण पुनः जल, पुनः पृथ्वी, पुनः आकाश, पुनः तोच वायु इत्यादि वारंवार तींच तीं भूतें पहात ते तिघेही चेंडूवरील सूक्ष्म किड्यांप्रमाणें भ्रमण करीत राहिले. त्याना अपूर्व देश, किंवा वस्तु अथवा दुसरें काहीं सांपडलें नाहीं. अंतराळीं टांगलेल्या चेंडूवरील मुंगीप्रमाण ते अद्यापि तसेच फिरत राहिले आहेत. ते या भूगोलावरील ज्या ज्या देशात जातात तेथें तेथें ते येथल्या प्रमाणेंच सर्व पहातात आणि आम्हाला अजून अंत लागला नाहीं, असें म्हणून तो लावण्याच्या दुराशेनें पुनः फिरूं लागतात. सारांश, याप्रमाणें हें दिसणारें काहीं नाहीं; तो सर्व ब्रह्मसंकल्पाचा विकास आहे; पण संकल्पाचें अधिष्ठान चैतन्य असल्यामुळें तेंच तत्त्व आहे. जलावरील आवर्त–तरंग–बुद्बुदांप्रमाणें तें ब्रह्माहून पृथक् नाहीं. जग उत्पत्तीच्या पूर्वी नसतें. यास्तव तें त्यावेळीं शून्यच असतें, हें कोणीही कबूल करील. पण जग जरी शून्य असलें तरी त्याचें अधिष्ठान ब्रह्म त्यावेळीं असतेच, कारण पूर्वी नसणाऱ्या व सृष्टीनंतर होणाऱ्या जगाला आधार हा पाहिजेच. त्याचप्रमाणें तें नाश झाल्यावर ज्याच्यामध्यें राहील, असेंही तत्त्व असलें पाहिजे. अर्थात् स्थितिकाळींही भासणारें हें सर्व साकार जग, तेंच आहे. तें चिद्रूप काम–कर्म–वासनानुसार जशी जशी कल्पना करतें तसें तसेंच आसक्त होतें. चिदणूंच्या उदरात अनेक जगांचे अनुभव आहेत. सारांश राजा दशरथा, जीव शुद्ध चित्–रूप आहे. पण तो आपल्या परम स्थानापासून च्युत न होतांच, मी जीव आहें, असें समजून व व्यर्थ नानात्म-भावना करून दुःख भोगतो, हें मोठें आश्चर्य आहे.

असो, भासा, तूं या आपल्या दीर्घ प्रवासांत काय काय पाहिलेंस, कोठें कोठें गेलास, काय काय केलेंस व त्यांतील कशा-कशाचें तुला स्मरण आहे, तें सांग पाहूं.

भास—भगवन् , मी मुळींच खिन्न न होतां पुष्कळ दृश्य पाहिलें. पुष्कळ मार्ग चाललों व ज्यांची संख्या करवत नाहीं, अशा अनेक वस्तूंचा अनुभव घेतला. मला त्या सर्वांचें स्मरण आहे. राजन् , मी अनंत महा आकाशात जाऊन ज्याचें वर्णन करणेंही अशक्य आहे, अशीं अनंत सुखें व दुःखें भोगलीं. वर व शाप याच्या योगानें अनेक शरीरें घेतलीं. फार दूर दूर गेलों. विचित्र सृष्टीची अद्भुत रचना पाहिली. अनेक जन्म घेतले. पण आपला पृथ्वीचा अंत लावण्याचा निश्चय सोडला नाहीं. एकदां मरताना माझें मन एका कदंबवृक्षामध्यें आसक्त झालें. तेव्हां त्या संस्कारामुळें मी अंग देशांत सहस्र वर्षे वृक्ष होऊन राहिलों; पण मनाच्या बाह्य प्रवृत्तीला कारण होणाऱ्या प्राणचेष्टा त्यामध्यें व्यक्त झालेल्या नसल्यामुळें माझें मन आंतल्या आत राहिलेलें होतें. तथापि त्याच्या अभिमानी जीवरूप अशा मीं पुष्कळ दुःख भोगलें. मी मेरूवर हरण होऊन शेकडों वर्षे गवत खात व क्षणोक्षणीं मृत्यूला भीत राहिलों होतों. मी शरभ झालों; विद्याधर होऊन विद्याधरींच्या समागमात काल घालविला; ब्रह्मदेवाच्या हंसाचा पुत्र झालों व मेरूवरील निर्झरिणींचें सुवर्णकमळाच्या परागांनीं पिवळें झालेलें पाणी प्यालें. कालंजर पर्वतावरील वृक्षाच्या झुडपांत व गुंजावनात जंबूक झालों. तेथें एका गजानें भक्ष्यासाठीं फिरत असलेल्या माझ्या अंगावर पाय देऊन मला चिरडून सोडलें. पण देहाचा मोठा लोभ धरणारे माझे प्राण त्यातून निघेनात. इतक्यात त्याच गजाला एका सिंहाने माझ्या समोर फाडले. त्यानंतर मी सह्य पर्वतावर सिद्धशापानें सुंदर देवस्त्री होऊन कृतयुग अर्धे होई तों राहिलों. पण तेथें असतांना माझें मन करवीर वनातील वाल्मीकपक्ष्यामध्यें अतिशय आसक्त झालें होतें. त्यामुळें पुढें मलाही तीच योनि प्राप्त झाली. मी त्याच करवीरवनात भार्या—पुत्रांसह राहत होतों. पण इतक्यांत काळानें माझ्या सर्व प्रिय परिवारास मारून मला वियोगदुःखाग्नींत ढकललें. याप्रमाणें सिद्धशापानें दोन जन्म दुःख भोगून मी सिद्धांच्याच अनुग्रहानें स्वतः सिद्ध झालों. त्यामुळें मला हवा तेथें संचार कारितां येऊं लागला. त्या सिद्धीच्या बळावर मी अनेक कुकर्मे केलीं. महेंद्रपर्वतावरील चंदनवनांत झोंपाळ्यावर आनंदानें बसलेल्या साध्वींना उचलून नेऊन मीं

त्यांचा बलात्कारानें उपभोग घेतला. कांहीं दिवसांनीं दिशांचा अंत पाहण्याविषयींच्या दुराग्रहानें ज्याला अतिशय व्याकुल केलें आहे, असा मी खिन्न मनानें एका पर्वतावर तापस होऊन राहिलों.

अहो मुनिवर्य, मी आपले मागचे अनेक जन्म आठवीत असतांना मध्येंच मला आठवलेलें हें एक आश्चर्य ऐका. अनंत ब्रह्मांडांनीं भरलेलें एक स्थान होतें. त्यांत सागरांतील जलचरांप्रमाणें सर्व दिशेंत व सर्व स्थानीं असंख्य भूतें होतीं. तेथें तेज, वायु व आकाश यांचें अस्तित्व संशयित होतें व त्यातील भूमि जलांत प्रतिबिंबित झालेल्या पदार्थाप्रमाणें दिसत होती. अर्थात् ज्यातील नाम—रूप किंचित् व्यक्त झालें आहे, असें तें, हें ब्रह्मच होय; हें केवढें आश्चर्य आहे बरें ! असो; त्यांत मी एक स्त्री पाहिली. आरशांत प्रतिबिंबित झालेल्या वस्तूंप्रमाणें तिच्या शरीरांत आकाश—शैल—दिगंतादिकांनीं युक्त असलेलीं अनेक त्रिभुवनें दिसत होतीं. त्या तसल्या आश्चर्यभूत स्त्रीला पाहून मी म्हटलें, “ हे सुंदरी, तूं कोण आहेस ? व तुझें हें शरीर असें काय दिसत आहे ? ” माझा हा प्रश्न ऐकून घेऊन ती म्हणाली, “ बा भल्या पुरुषा, या सर्व वस्तूंमध्यें जी शुद्ध चित् आहे, तीच मी. हीं सर्व महा जगें हेंच माझें अंग ( मूर्तामूर्तात्मक शरीर ) आहे. अरे बाबा, जशी ही मी या आश्चर्यकारक देहानें युक्त आहें, त्याप्रमाणेंच हें सर्व जग आश्चर्यकारक आहे. पण स्थूल भावाविषयींचा अत्याग्रह सुटेपर्यंत प्रत्येक वस्तूंतील हें तत्त्व जीवाना कळत नाहीं. तर ज्याचा स्थूलभाव जाऊन आतिवाहिक भाव उदय पावतो त्यालाच तें दिसतें. प्रत्येक शरीरांत अशा प्रकारचा विचित्र भाव आहे. फार काय पण भिंत, इत्यादि दुसऱ्या सर्व वस्तूंतही तें विचित्र तत्त्व भरून राहिलें आहे; पण त्याला ओळखणारी दिव्य दृष्टि मात्र संपादन केली पाहिजे. मुनिवर्य, हें आश्चर्य पाहून मी पुढें गेलों. कांहीं दिवसांनीं जेथें मुळीं स्त्रियांचें नांवही नाहीं, अशा एका ब्रह्मांडांत मी शिरलों. तेथें भूतापासूनच भूतें होत होतीं, व तीं भूतांतच लीन होत असत. सारांश मी अशींच आणखीं अनेक आश्चर्यें पाहिलीं. त्या सर्वांचें वर्णन कोठवर करूं ? कोठें कांहीं, कोठें कांहीं, मिळून सर्वत्र विचित्रता व क्लेश मी अनुभविले १११.

सर्ग १३२—भास पुनः अनेक जन्म, आश्चर्यें व संसाराचें निःसारत्व वर्णितो.

भास—मी मंदर पर्वतावरील मृदु मंदार-मंदिरांत एकदां एका अप्सरेस आलिंगन देऊन निजलों होतों; तों इतक्यांत एकाएकीं एक मोठा जलप्रवाह येऊन तो आम्हांला तृणाप्रमाणें वाहून नेऊं लागला. त्यामुळें माझी प्रिया व्याकुळ झाली. तेव्हां मी तिला धीर देऊन विचारलें कीं, हें काय आहे ? त्यावर भयानें नेत्र फिरवीत ती म्हणाली, " हे कांत, येथें चंद्रकांत मणी फार आहेत. आपण जेथें बसलों होतो तो सर्व कडा तर चंद्रकांताचाच आहे. यास्तव चंद्रोदय होतांच त्यांतून हा जळप्रवाह निघालेला असून तो आम्हांला वाहून नेत आहे. सुखांमध्यें गुंग झाल्यामुळें मी पूर्वीच हें सांगावयास विसरलें. त्यानंतर एकादी पक्षिणी भूमीवरील किड्याला पटकन् उचलून आकाशांत जशी उडून जाते त्याप्रमाणें ती अप्सरा मला वर उचलून घेऊन गेली. महाराज, मी आणखी असे अनेक चमत्कार व दशा पाहिल्या. जेथें जाऊं नये तेथें गेलों. वेगानें फिरत असताना माझीं वर्षेंच्या वर्षें गेलीं. पण या दृश्यसंज्ञक अविद्येचा अंत लागला नाहीं. दिसणारी प्रत्येक वस्तु सत्य नव्हे, ती स्थिर नाहीं, असें वारंवार वाटत असूनही तिची आशा सोडवत नाहीं, हा केवढा चमत्कार आहे ? जीवाची दशा प्रतिक्षणीं नवी नवी होत असते. सुखें व दुःखें तिला आकुल करीत असतात. खरोखर अशा विचित्र भावामुळें ही अविद्या अतिशय असह्य झाली आहे. मुनिवर्य, मी कोठें कोठें तर जीवरहित जगें पाहिलीं आणि कोठें इंद्राच्या किंवा हिरण्यगर्भाच्या ऐश्वर्यालाही तृणाप्रमाणें तुच्छ वाटविणाऱ्या ऐश्वर्याचा अनुभव घेतला १३२.

सर्ग १३३—आकाशांतून सप्तद्वीपप्रमाण शव पडल्याचें वर्णन.

विपश्चित—हे मुने, एका अपूर्व जगांत मी आणखी एक मोठें आश्चर्य पाहिलें. तें महा पातकांच्या रौरवादि नरकासारख्या भयंकर फळासारखें जरी होतें, तरी अविद्येनें अंध होऊन मी अग्नीच्या वरामुळें तेंही पाहिलें. जेथें या लोकच्या कोणालाही जातां येणें शक्य नाहीं, अशा एका चंद्रसूर्यांच्या दीप्तीनें अतिशय दीप्त झालेल्या आकाशांत भ्रमण करीत असतांना मी सहज खालीं पाहिलें; तों भूलोकावर एक विशाल छाया भ्रमण करीत आहे, असें मला दिसलें. तेव्हां ती कोणाची आहे, हें

पाहण्यासाठीं मी आपले नेत्र वर लाविले. तों एक अनेक पर्वतांसारखी धिप्पाड पुरुषाकृति खालीं गरगर फिरतच पडत आहे व तिनें आपल्या विस्तीर्ण भागानें सूर्यालाही आच्छादित केलें आहे, असें दिसलें; पण 'हा एवढा थोरला पुरुष कोण असावा? हा विराडात्मा ब्रह्मा आहे कीं असाच दुसरा कोणी आहे?' असा जों मी विचार करीत आहें तों अकस्मात् मोठा थोरला आवाज करून सूर्य आकाशांतून खालीं पडला. पण सप्तद्वीपात्मक वसुमतीस आपल्या धिप्पाड देहानें आच्छादित करीत तो भयंकर पुरुष पडत आहे, असें पाहून मला आपल्या जीविताची मोठी चिंता लागली व मी लागलाच माझ्या समीप असलेल्या अग्नीमध्यें शिरलों. तेव्हा शेकडों जन्मामध्यें मी ज्याची आराधना केली आहे, असा तो भगवान् चंद्रासारखा शीतल होऊन 'भिऊं नकोस,' असें मला म्हणाला. तें ऐकून 'हे देवा, तुझा जयजयकार असो. प्रत्येक जन्मीं तूंच आमची परम गति आहेस. आज हा अकालीं कल्पात ओढवला आहे. यास्तव माझें रक्षण कर' अशी मी त्याची प्रार्थना केली. तेव्हां 'तूं कांहीं भिऊं नको. ऊठ, चल, माझ्या लोकीं ये.' असें म्हणून अग्नीनें मला आपल्या वाहनावर बसविलें. (पोपट हें त्याचें वाहन आहे.) आणि त्या वेगानें खालीं पडत असलेल्या पुरुषाच्या शरीरालाच छिद्र करून तो माझ्या सहवर्तमान पार निघून गेला. तेव्हा त्याच्या शरीरांतून पलीकडे गेल्यावर मी त्या भयप्रद आकाराला भूमीवर पडलेलें पाहिलें. त्याच्या आघातानें भूमि चळचळ कांपली. पर्वतांचीं शिखरें व मोठमोठे वृक्ष धडाधड खालीं पडले. समुद्र व इतर जलाशय यांचें जल वर उंच उसळलें. घरें व इतर जड पदार्थ यांचा चूर उडून असंख्य प्राणी मरण पावले, त्याच्या पडण्याचा मोठा ध्वनि झाला व त्याचा आकाशांत दुमदुमलेला प्रतिध्वनिही मी स्वतः ऐकला. वनें व पर्वत यांचा उच्छेद झाला. प्राण्यांचा अकस्मात् नाश झाला. सर्वत्र क्षोभ झाला. हाहाकारालाही त्यावेळीं अवकाश मिळाला नाहीं.

असो; याप्रमाणें सूर्य, पर्वत, वृक्ष इत्यादिकांनाही खालीं पाडणारा तो भयंकर देह केवढासा आहे, म्हणून जों मी पहात आहें तों तो सप्तद्वीप पृथ्वींतही मावत नसून त्याचा कांहीं भाग मात्र तिच्या आधारानें स्थित

आहे, असें मला दिसलें. तेव्हां मी त्या प्रसन्न अग्नीला म्हटलें, ' भगवन्, सूर्यालाही पाडविणारा हा आहे कोण ? हा मांसमय पर्वत या सप्तद्वीपा पृथ्वींतही मावत नाहीं ! ! ' तेव्हां तो माझा पिता मला म्हणाला, " पुत्रा, हा सर्व उत्पात शांत होईतों तूं धीर धर, मग मी तुला सर्व सांगेन. " तो भगवान्, इतकें सांगत आहे तों दिव्य वस्त्रभूषणादिकांनीं भूषित झालेले सिद्ध, साध्य, अप्सरा, दैत्य, गंधर्व, उरग, किन्नर, ऋषि, मुनि, यक्ष, किन्नर, देव इत्यादि सर्व तेथें आले आणि भक्तीनें मस्तकें नम्र करून काळरात्रीची स्तुति करूं लागले. ' संहारसमयीं सर्व जगाचा क्षय करून उद्दंड तांडव करणारी व दैत्याच्या मस्तकांची माळ गळ्यात घालून त्याच्या रक्तानें न्हाणारी चंडी देवी आम्हांवर प्रसन्न होवो. ती सर्वांच कल्याण करो. या उत्पाताचें शमन होवो ' इत्यादि प्रकारें त्यानीं तिची पुष्कळ स्तुति केली १३३.

**सर्ग १३४**—देवीचा आविर्भाव व तिच्या गणांनीं त्या शवाचें केलेले भक्षण.

विपश्चित्—मुने, त्या भूमीवर पडलेल्या शवानें आपल्या उदर भागानेंच सर्व पृथ्वीला आच्छादित केलें आहे, व त्याचे हात-पाय-मस्तक इत्यादि भाग लोकालोक व मेरु यांच्या पलीकडे गेले आहेत, असें मीं पाहिलें, व अग्नीनेंही मला तसेंच दाखविलें. इतक्यांत देवादिकाच्या स्तुतीनें प्रसन्न झालेली देवी प्रकट झाली. तिचें सर्व शरीर अतिशय शुष्क झालेलें होतें. उच हातांवरील व पायांवरील शिरा तर मोजतां येतील इतक्या स्पष्ट दिसत होत्या. तिच्याबरोबर यक्ष, पिशाच, भूत, शाकिनी, डाकिनी, वेताळ इत्यादि सर्व परिवार होता. तिच्या उग्रदृष्टीनें सर्व दिशा प्रकाशित होत होत्या. तिनें आपल्या दीर्घ हातांत सर्व आयुधें घेतलीं होतीं. असो; तिच्यापाशीं जाऊन देवांनीं ' भगवति, हा पुरुष आम्ही तुला अर्पण केला आहे. यास्तव आपल्या सर्व परिवारासह याचा स्वाद घेऊन तूं तृप्त हो, ' अशी प्रार्थना केली. त्यावरोबर ' ठीक आहे ' असें बोलून ती कालिका आपल्या प्राण वायूनें त्या शवाचें रक्त आकर्षण करून घेऊं लागली. तिनें तृप्ति होईतों रक्त पिऊन घेतलें. ती पूर्वी शुष्क असलेली चंडिका आतां चांगली पुष्ट झाली. ती स्वतः वर्षाकाळच्या मेघमालेप्रमाणें काळ व तीची दृष्टि त्याचवेळच्या चंचल विद्यु-

त्–प्रमाणें अस्थिर व उग्र झाली. जिचें उदर फार लांब आहे व जिच्या अंगावर सर्पांचीं भूषणें आहेत अशी ती भगवती रक्तासवाच्या मदानें मत्त झाली. तिनें आपल्या सर्व हातांत आयुधें घेतलीं होतीं. नंतर तिनें आपल्या अर्ध्या शरीरानेंच भरून सोडलेल्या आकाशात नाचण्यास आरंभ केला. देव तिचें नृत्य पाहूं लागले. इतक्यांत तिच्या अनुचरानी ( म्हणजे भूत—प्रेत—पिशाच--वेताळ--यक्ष इत्यादिकानीं ) त्या शवाच्या अवयवास वाटून घेऊन त्यांवर आपापला तप्त जठराग्नि शात करण्यास सुरवात केली. त्यानीं त्या देहाला फाडलें; सोललें; त्यातील हाडाचे तुकडे पाडले. आंतडीं व शिरा याना भूमीपासून सूर्यलोकापर्यंत लांबच लांब पसरलें. रक्ताच्या योगानें पृथ्वी व सर्व जलाशय दूषित झाले. हा सर्व चमत्कार देव लोकालोक पर्वताच्या शिखरावर खिन्न मनानें उभे राहून पहात होते.

**श्रीराम**—( वसिष्ठास म्हणतो–) पण गुरुवर्य, भूलोकाला आपल्या उदरानेंच व्यापणाऱ्या त्याचे इतर अवयव जर भूगोलाच्या बाहेर गेले होते तर देवाना लोकालोक पर्वताच्या शिखरावर जागा कशी मिळाली ?

**श्रीवसिष्ठ**—त्या शवाचे हात व पाय पसरलेले असल्यामुळें त्यांच्या मध्यवर्ती भागांत ते राहूं शकले. असो; रामा, पुढचा वृत्तात मीच तुला थोडक्यांत सांगतों, ऐक. याप्रमाणें तें शव हात-पाय पसरून उपडें पडलें असतां व चंडीचे भूतादि अनुचर गण त्याला खाऊन हर्षानें नाचूं लागले असतां त्या मृत शरीरातून रक्तप्रवाह वाहूं लागला व मेदाचा दुर्गंध सुटला. तेव्हा अतिशय दुःखित झालेले देव असा विचार करूं लागले.—हाय हाय ! मोठी दुःखाची गोष्ट आहे ! ! पृथ्वी कोठें गेली ? जलाशय काय झाले ? लोक व पर्वत याची काय वाट झाली ? चंदन, मंदार, कदंब इत्यादिकांच्या वनानें मंडित झालेला व पुष्पराशींचा जणुं काय मंडपच असा मलय पर्वत कोठें गेला ? रक्तानें उंच शुद्ध व विपुल हिमालयाच्या भूमीही जणुं काय त्यांच्या स्वाभाविक शुभ्रतेच्या मत्सरानेंच लाल करून सोडल्या. क्रौंच द्वीपांतील क्रौंच पर्वतावर जो एक मोठा कल्पवृक्ष असून ज्याच्या शाखा ब्रह्मलोकापर्यंत येऊन पोंचत होत्या त्यांचें चूर्ण झालें. पारिजातक, लक्ष्मी, चंद्र व अमृत यांच्या

उत्पादका क्षीरार्णवा, व इतर सागरांनो, तुमची काय दशा झाली ही? अहो इतर वृक्षांनो, व रम्य पदार्थांनो, तुमच्याकडे आमच्यानें पाहवतही नाहीं. सर्व पुण्यस्थलें भ्रष्ट झालीं. जनांचा विध्वंस झाला. चारी वर्णांचे लोक नाहींसे झाले. आतां या पुढें आम्हांला कशाच्या योगानें समाधान होईल, कांहीं समजत नाहीं. इक्षुरससागराच्या तीरावरील तीं मधुर वनें पुनः आमच्या दृष्टीं पडतील काय? कदंबकल्पवृक्षांच्या छायेंत बसून चंदनानें मंडित झालेल्या सुंदरींचें नृत्य आम्ही कधीं पाहूं काय? जंबूद्वीपांतील जांभळें तर आता आम्हाला विसरलींच पाहिजेत. हर हर!! अनेक रमणीय उपभोग्य साधनांनीं भरलेली पृथ्वी कोठें आहे? आम्ही आतां जिवंत कसें रहावें? १३४.

सर्ग १३५—भूतादिकांनीं मांसादि खाल्यावर भूमीला मेदानें मेदयुक्त व राहिलेल्या रक्तानें मदिरार्णव केलें.

श्रीवसिष्ठ—राघवा, त्या मत्त भूत-संघानें त्या शवाला बहुतेक खाऊन टाकलें असता इंद्रासह देव पुनः असें म्हणाले,—"विद्याधर व देव यांच्या विमानाच्या मार्गांतही देवीच्या गणांनीं हीं आतडीं पसरलीं आहेत. पहा, पहा; त्या भूतांनीं साती द्वीपांत मेदोजल पसरलें, मास खालें, रक्त प्राशन केलें. त्यामुळें आता भूमि कांहींशी दिसूं लागली आहे. सर्व प्राण्याना अतिशय आनंद देणारी ही (भूमि) आता मेदोरूपी वस्त्रानें सर्व बाजूंनीं आच्छादित होऊन राहिली आहे. तिच्यांतील सर्व वनें मेदोमय शारद मेघसमूहाच्या योगानें, धूसुर कंबलांनीं आच्छादित झाल्याप्रमाणें दिसत आहे. पहा पहा! हे त्याच्या हाडाचे पर्वत झाले असून ते हिमालयाच्या शिखरांप्रमाणें दिशांस आच्छादित करून राहिले आहेत."

असो, रामभद्रा, देव याप्रमाणें आपसांत बोलत आहेत तों तो भूतांचा संघ तिकडे सर्व पृथ्वीस मेदानें सारवून, नाचूं लागला. तेव्हा देवांनीं आपल्या सामर्थ्यानें पृथ्वीवर जागजागीं अवशिष्ट राहिलेलें रक्त एकाच मार्गानें नेऊन एका मोठ्या सागरांत सोडलें. त्यामुळें तो सुरार्णव झाला. भूतें आकाशांत नृत्य करून श्रांत झालीं म्हणजे त्यांतील मदिराजल अजून पीत असतात. पृथ्वीवराल मेद सुकून गेला व त्यामुळें तिला

मेदिनी हें नांव प्राप्त झालें. असो; याप्रमाणें त्या शवाची शांति झाली. दिवस व रात्र यांचा क्रम सुरू झाला. प्रजापतीनें तेथें नवी प्रजा निर्माण केली व पुनः तेथें पूर्वीसारखा संसार सुरू झाला १३५.

**सर्ग १३६**—अग्नीनें भासाला शवाचा वृत्तान्त सांगितला.

भास—हे राजा दशरथा, मी शुकाच्या पंखांच्या मूळाशीं बसून भगवान् 'अग्नीला प्रभो, हें काय झालें हें ?' असा प्रश्न केला असतां तो मला म्हणाला—" राजा, काय झालें, तें आतां ऐक. त्या शवाचा सर्व वृत्तान्त मी तुला पहिल्यापासून सांगतों. अनंत व अनाकार असें चिन्मय परमाकाश आहे. त्यात हीं असंख्य जगें हेच अनेक परमाणु भरलेले आहेत. त्यात संवेदनमयी संवित् आपोआप उत्पन्न झाली. तिनें वेदनावशात् तेजःपरमाणुत्व पाहिलें. त्या परमाणूनें, त्याचें चित्—तत्त्व अज्ञानानें आवृत झालेलें असल्यामुळें आपली स्पष्ट भासणारी परमाणुता कल्पिली. ती आपल्या वृद्धीची इच्छा करीत असताना चक्षुःप्रभृति इंद्रियांचा अनुभव घेती झाली. त्यांच्या द्वारा तिला पुढें असलेलें विषयमय जग दिसलें. याप्रमाणें वेदनादि—विषयान्त अध्यारोपरूप कार्य—करण-संघातांत असुर या नावाचा कोणी एक प्राणी होता. तो असुरस्वभावा-मुळेंच अभिमानवान् झाला. त्याचे आई—बाप—पितामह इत्यादि सर्व असत्य प्रतिभासात्मक होते. असुरत्वामुळेंच पाण्यात घातलेल्या चण्याप्रमाणें तो दर्पानें फुगला व त्यानें एका मुनीच्या सुखकर आश्रमस्थानास मोडून सोडलें. तेव्हा क्षुब्ध झालेल्या त्या मुनीनें 'तुला मोठा व बळकट देह मिळाला, म्हणून तूं आम्हाला त्रास देत आहेस; यास्तव आतां अधम मशक हो,' असा त्यास शाप दिला. त्याबरोबर शापाग्नीनें त्याचें भस्म केलें. तेव्हा त्या असुराचें चेतन आकाशाच्या वळयाप्रमाणें निराकार व निराधार आणि चित्त सुषुप्ति अथवा मूर्च्छा याप्रमाणें निर्विषय होऊन राहिलें. तें अव्याकृतरूप चेतन भूताकाशाशीं एकरूप झालें. भूताकाश आपल्यामध्यें राहणाऱ्या वायूशीं एकता पावलें. याप्रमाणें उत्तरोत्तर प्राणिभावास प्राप्त होत तीच आसुर संवित् मशक झाली. त्याचें शरीर श्वासाबरोबर दोन दोन हात उडून जाण्यासारखें हलकें होतें. त्याची आयुर्मर्यादा दोन दिवस होती.

श्रीराम---भगवन्, स्वप्नाप्रमाणें जाग्रत्, असें आपण वारंवार मला सांगितलें आहे, पण स्वप्नदेह योनितः उत्पन्न होत नाहीं. जाग्रत्-देह योनितः होतो. तेव्हां जाग्रत्-देहाप्रमाणेंच सर्वत्र योनितःच तो होतो, कीं दुसऱ्याही प्रकारें होऊं शकतो ?

श्रीवसिष्ठ---ब्रह्मापासून तृणापर्यंत जेवढे म्हणून चराचर प्राण्याचे देह आहेत त्यांचा उद्भव दोन प्रकारानें होतो. एक ब्रह्ममय व दुसरा भ्रांतिजन्य. (विवर्त-उपादानांशांत ब्रह्ममय व परिणामीं उपादानांशांत योनिजन्य उद्भव होतो). पूर्वी रूढ झालेल्या जगद्भ्रांतीच्या अत्यासक्तीमुळें होणारा जो भूताचा संभव तो दृश्याशीं संबंध ठेवणारा असल्यामुळें भ्रांतिजन्य आहे, आणि नित्यमुक्त ब्रह्माला केव्हांही जगद्भ्रांतीचा भास झालेला नसतांनाच आपोआप विवर्तरूपानें सर्गाच्या आरंभीं जीवभावानें प्राप्त होणारा जो भाव तो ब्रह्ममय संभव होय. असो; असा प्रकार असल्यामुळें तो मशक जगद्भ्रांतिवशात् उत्पन्न झालेला होता. ब्राह्मोत्थ नव्हे. कारण ब्राह्मोत्थ जन्म, जन्मतः सिद्ध असलेल्या कपिल-सनकादिकांनाच प्राप्त होत असतो. आतां त्या मशकाचा व्यवहारक्रम मीच सांगतों तो ऐक. त्या मशकानें भूमीवरील ऊंस, तृण, गुल्म इत्यादि स्थानीं गुणगुणत असलेल्या इतर मशकाबरोबर गुणगुणत आपल्या दोन दिवसांच्या आयुर्मर्यादेंतील अर्धें आयुष्य ( म्हणजे एक दिवस ) घालविलें. दुसऱ्या दिवशीं त्यानें एक मशिका भार्या मिळविली, व तिच्याबरोबर तो कोमलतृणाच्या झोंपाळ्यावर बसून झोंके घेऊं लागला. पण शेवटीं झोंके घेऊन थकलेला तो एका गवताच्या झुबक्यांत जों थोडीशी विश्रांति घेण्याकरितां म्हणून बसत आहे तों एका हरिणाच्या पायाखालीं सांपडून चुरून गेला. पण मरतां मरतां हरिणाचा आकार दृष्टीं पडल्यामुळें त्यानें त्याची भावना करीतच प्राण सोडले. त्याकारणानेंच तो पूर्वोक्त क्रमानेंच हरिण झाला. पण वनांतून विहार करणाऱ्या त्याला एका व्याधानें धनुष्यानें मारलें. त्याची दृष्टि व्याधाकडे लागल्यामुळें तो उत्तर जन्मीं व्याधच झाला. तो विहार करितां करितां एका मुनीच्या अरण्यात गेला आणि कांहीं भाग्य उदय पावल्यामुळें त्याला तेथें राहण्याची सद्बुद्धि झाली. मुनीनें करुणेनें त्याला असा बोध केला, अरे बा व्याधा, तूं असा भ्रांत कां होत आहेस ? हरणांना

व्यर्थ कां मारतोस ! अहिंसा, अभयदान इत्यादि शास्त्रमर्यादा कां पाळीत नाहींस ? या भंगुर जगांत असलीं दुष्कर्में करून तुझें हित कसें होईल ? तुला त्यामुळें असह्य दुःख भोगावें लागेल, याचा विचार तूं कसा करीत नाहींस ? हरणांचा जीव घेणें हें जरी तुमचें कुलपरंपराप्राप्त कर्म असलें व त्यावांचून या जगांत जिवंत राहणें जरी शक्य नसलें तरी बाबारे, नुस्तें जिवंत राहणें अथवा भोग भोगणें एवढाच पुरुषार्थ नव्हे. हिंसादि करून जे भोग मिळविलेले असतात ते दीर्घकाल पारलौकिक अनर्थ देतात. आयुष्यही अतिशय चंचल आहे. शरीराला क्षणोक्षणीं अपाय होण्याची भीति असते. यास्तव बा पुत्रा, तूं धर्माचरण कर. हिंसेचा त्याग कर. म्हणजे तुझें कल्याण होईल. तुला अनंत सुख मिळेल. आत्म्याचा विचार कर. गुरूंना शरण जा. म्हणजे ते तुला सन्मार्ग दाखवितील १३६.

सर्ग १३७—मुनि, धारणाभ्यासानें स्वत परशरीरांत प्रवेश करून पाहिलेलें स्वप्न सागूं लागला.

व्याध——मुने, असें जर असेल तर दुःखक्षयाविषयीं चांगला उपाय कोणता तो साग.

मुनि——बा साधो, मुनींचा आचार हाच दुःखक्षयाचा हेतु आहे. यास्तव तूं बाणांसह आताच या धनुष्याचा त्याग करून मुनींना मान्य असलेला यम—नियम—विचारादि आचार कर.

श्रीवसिष्ठ——रामा, मुनीच्या या वचनास मान देऊन तो व्याध सशर धनुष्याचा त्याग करून तेथें राहिला. मुनींप्रमाणें वागू लागला. त्यानें अयाचित वृत्ति धारण केली. त्यामुळें थोड्याच दिवसात त्याच्यामध्यें शास्त्रविवेकिता प्रविष्ट झाली. नंतर एकदा विवेकानें संपन्न झालेला तो व्याध एकान्तांत बसलेल्या मुनीपाशीं जाऊन म्हणाला,—" भगवन्, प्राण्याच्या अंतःकरणांत स्थित असलेलें स्वप्न जाग्रत्—प्रमाणें बाहेर कसें दिसतें ? बाहेर असलेला प्रपंच स्वप्न होऊन आंत कसा दिसतो ? प्राण्यांच्या मनांतील स्वप्न कोणत्या उपायानें दिसतें ? त्याचप्रमाणें आंत व बाहेर स्थित असलेला प्रपंच स्वप्न होऊन कसा दिसतो ? आणि प्रपंच जर स्वप्नच आहे, तर तो आंतर व बाह्य असा दोन प्रकारचा कसा दिसतो ? "

तें ऐकून मुनि म्हणाला,—“ बा साधो, माझा विवेक जेव्हां दृढ झाला नव्हता तेव्हा मलाही असेच अनेक संदेह होते. पण मी त्याकरितां धारणा धरून परकायाप्रवेश केला. त्याच्या शरीरांतील प्राणांशीं आपले नियत करून नेलेले प्राण मिळविले व त्या जंतूच्या अति संकुचित हृदयात जाऊन बसलों. जीव सर्व शरीरात जरी असला तरी विशेषतः तो तेजोधातूमध्यें राहतो. यास्तव त्या जीवाच्या आधारभूत ओजामध्यें मी तद्रूप झालों. त्याच्या ज्योतीस प्राणवायु सभोंवार संचार करून राखीत होते. असो; तेथें गेल्यावर मी थोडीशी विश्रांति घेतली, व स्वप्नाप्रमाणें सर्व विश्व पाहूं लागलों. सूर्य, पर्वत, समुद्र, देव, असुर, मानव, नगरें, वनें इत्यादि सर्व मीं पाहिलें. तें माझें स्वप्नदर्शन अनादि प्रवाहरूपानें स्थिर असलेल्या या प्रख्यात जगासारखेंच स्थित होतें. ‘ मी चागला जागा आहें; कारण मला नीज लागलेली नाहीं. पण असें असतांनाही हें स्वप्न मला कसें दिसतें, ’ असें म्हणून मी विचार करूं लागलों, तों बा व्याधा, मला असें समजलें.–या प्रत्यगात्म्याचें हें ऐश्वर ( ईश्वरसंबंधी ) रूप आहे, हा ईश्वर आकाशरूप अशा आपल्याला घट, पट, जग, जीव इत्यादि ज्या ज्या नामरूपानें कल्पितो त्या त्या नावानें होतो. तो परमात्मा जेथें जेथें असतो तेथें तेथें आपलें स्वरूपच, आपल्या तात्त्विकरूपाला न सोडताच, जगदाकारानें पाहतो. त्यालाच लोक स्वप्न असें म्हणतात, हें आज मला कळलें. तत्त्वतः पाहिल्यास जाग्रत्‌ही हेंच होय. पण जाग्रत्-दृष्ट्या पाहिलें म्हणजे स्वप्न स्वप्न होतें व स्वप्नाच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे जाग्रत् स्वप्न होतें. परंतु तेंच, स्वप्नदृष्ट्या स्वप्न जाग्रत्‌च होय. त्याचप्रमाणें जाग्रत्–दृष्ट्या जाग्रत्‌ही जाग्रत् आहे. अर्थात् मरण म्हणून कांहीं नाहीं. कारण पुरुष चिन्मात्र आहे, तो शेंकडों शरीरें मेलीं तरी स्वतः मरत नाहीं. शरीराच्या त्यागाला मरण म्हटलें आहे. पण वस्तुतः आत्मा शरीराचें ग्रहण अथवा त्याग करीत नाहीं. कारण तो असंगस्वभाव आहे. तसल्या चिदाख्य परमाणूचें सारच भ्रांतीनें देहयुक्त जगत्‌ही होतें. कारण सर्व जगद्भ्रांति-अनुभवरूप अणु त्या चिदाकाशाच्या उदरांत भासत असतात. जाग्रद्भोग देणारें कर्म निवृत्त झालें असतां जीव जागरापासून निवृत्त होतो व आपल्या स्वरूपालाच बाह्य

संस्काराच्या अनुरोधानें, हा बाह्य स्वप्नस्वर्ग आहे, हा सूर्य आहे, हा घट आहे, इत्यादि चिद्विवर्तरूपानें पाहतो. जेव्हां चित्त बाह्य पदार्थोन्मुख होत तेव्हा तें जाग्रत् या नावाचें आपलेंच बाह्य स्वरूप पहातें. व जेव्हां ते आतल्या आंत राहून पदार्थाकार होतें तेव्हां जीव आपल्या रूपाला स्वप्न या नांवानें ओळखतो. एकात्मक जीवच बाहेर व आत स्वर्ग, पृथ्वी इत्यादिरूप पसरला आहे. जसा सूर्य आपल्या बिंबामध्येंच स्थित असताना तेजाच्या योगानें येथेंही आहे त्याप्रमाणें जीव जगद्रूप होऊन बाहेर व आंतही स्थित आहे. साराश सर्वात्मकताच तात्त्विक आहे. यास्तव तिचें ज्ञान झाले असता वासनारहित जीव मुक्त होतो. तो अच्छेद्य व अदाह्य असतांनाही द्वैतसंकल्पामुळें मोहित होतो. आपल्यालाच आत जगद्रूप पहाणारा तो स्वप्न व बहिर्जगद्रूप पहाणारा तोच जाग्रत् होतो. अर्थात् त्याचें अंतर्बाह्यरूप हेंच स्वप्न व जाग्रत् आहे.

व्याधा, याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न याविषयीं चिंतन करणाऱ्या मला सुषुप्त काय आहे ! असें वाटलें, व मी त्याविषयीं विचार करूं लागलों. या दृश्याला पाहून मला काय करावयाचें आहे, मी आतां काहीं वेळ चित्तरहित होऊन राहतों, अशी शमाशमरूप वृत्ति आत जोंवर असते तोंवर सुषुप्ति असते. ही अवस्था पूर्वींच्या दोन सवृत्तिक अवस्थाहून निराळी आहे, त्या अवस्थेंत चित् व्याप्तीचा अभाव असतो. त्यामुळें चित् अभिव्यक्त होत नाहीं. पण तेवढ्यावरून सुषुप्तींत जीव जड असतो असें समजणें उचित नव्हे. कारण तो त्या अवस्थेंत 'अहं' अशा विशेष आकारानें जरी न स्फुरला तरी प्राणादि चेष्टा व शरीराचें जीवन यावरून आणि निजून उठल्यानंतर होणाऱ्या स्मरणावरून त्याचें चेतनत्व सिद्ध होतें. साराश चित्ताचा भ्रांतीमुळें होणारा स्थिर भाव हीच सुषुप्ति होय. पुरुष जागत असतांनाही ही सुषुप्ति चिंतात्याग केल्यानें संभवते. कारण मी काही चिंतन करीत नाहीं, स्वस्थ राहतों, असा निश्चय करून तसेंच शांतचित्त होणें, हीच सुषुप्ति आहे. ही अवस्था जेव्हा अतिशय घन असते तेव्हां तिला निद्रा म्हणतात व ती जेव्हां विरळ होते तेव्हां तीच स्वप्न बनते.

याप्रमाण सुषुप्तीचा निश्चय करून मी तुरीयाचा निश्चय करण्याकरितां पुनः विचार करूं लागलों. पण त्याचें यथार्थरूप मला शुद्ध सम्यक् बोधावांचून निराळें लाधलें नाहीं. यास्तव आत्म्याचा यथार्थ बोध हेंच तुरीय होय. त्यांत विलीन झालेलें जग जसेच्या तसेंच राहतें. यास्तव जागरादि तीन अवस्था या चवर्थीत अंतर्भूत होतात. हें जग योग्य कारणापासून झालेलें नाहीं. तर तें ब्रह्मच, अशा जगद्रूपानें राहिलें आहे, असें जाणणें हीच तुर्यता. सृष्टीच्या कारणाचा असंभव असल्यामुळें ती उत्पन्न होणे शक्य नाहीं. जलानें जशी द्रवता धारण केली आहे तशी चित्-नें सर्ग-संवित् ( सृष्टीची कल्पना ) स्वतः धारण केली आहे" १३७.

**सर्ग १३८**—प्राण्याचा जीव व आपला जीव मिळाला असतां द्विगुण विश्व दिसलें. पण तोच मी त्याच्या पासून पृथक् होताच तें एकच पाहिलें, असें मुनि सांगतो.

**तापस**—व्याधा, असा विचार करून मी त्या प्राण्याच्या संविद्-शीं एकरूप होऊं लागलों. पण मी त्याच्या चिदाभासात प्रवेश करण्यासाठीं त्याच्या पूर्वोक्त तेजोधातूस जों सोडीत आहें तों माझी इंद्रियसंवित् बलात्कारानें बहिर्मुख व्यापार करावयास प्रवृत्त झाली. तथापि मी मोठ्या प्रयत्नानें तिला आत आकर्षण करून घेऊन पाण्यातील जलबिंदूप्रमाणें आतल्या आत पसरविली. याप्रमाणें उपाधिव्याप्तिद्वारा मी जों त्या प्राण्याच्या चिदाभाससंविद्—शीं मिळून जात आहें तों मला सर्व विश्व दुप्पट भासूं लागलें. कारण तें त्याच्या वासनानीं एकप्रकारचें व माझ्या वासनानीं दुसऱ्या प्रकारचें दिसलें. पूर्वादि दोन दोन दिशा, दोन सूर्य, दोन भूमंडलें, दोन स्वर्ग, इत्यादि प्रकारें दोन आरशांत दिसणाऱ्या दोन मुखप्रतिबिंबांप्रमाणें सर्व दुप्पट दिसलें. आम्हां दोघाच्या वासना भिन्न भिन्न प्रकारच्या असल्यामुळें आमच्या जगाचें मिश्रण झालें नाहीं. पण पुढें मी जेव्हां योगबलानें त्याच्या संवित्शीं एकरूप झालों, तेव्हां मला एकच जग दिसलें. त्यानंतर मी आपला पूर्वापर विचार न सोडताच त्या प्राण्याच्या संकल्पानुसारिणी स्थितीस प्राप्त झालों, व तेथें त्याच्या चित्तवृत्तीनेंच त्याचें शब्दादि बाह्य भोग्य विषय मीं पाहिले. त्याच्या चित्ताला एक क्षणभरही न सोडतां मी जाग्रव्द्यवहारलक्षण त्या दिवशींचा आचार स्वतः अनुभविला. त्यानंतर तो

जीव यदृच्छेनेंच निद्रावश झाला. झोंप येऊं लागली असतां त्याच्या प्राणानें, बाहेर दूरवर पसरलेलें चित्त, सायंकाळीं आपल्या कांतीला आकर्षण करून घेणाऱ्यां सूर्याप्रमाणें, आत ओढून घेतलें. तेव्हां कूर्माच्या अगाप्रमाणें चित्ताबरोबर सर्व इंद्रियवृत्तिही हृदयकोशात प्रविष्ट झाल्या. चक्षुरादिक गोलक मुद्रितसे होऊन हृदयाकार बनले. ते चित्राप्रमाणें निश्चेष्ट होऊन राहिले. मीही त्याच्या चित्तानुसार इंद्रियगोलकांस सोडून नाड्यांच्या द्वारा त्याच्या हृदयांत शिरलों व सर्व बाह्य अनुभवाचा त्याग करून आनंदमय कोशात निमग्न झालों. व्याधा, सुषुप्त अवस्थेंत समानवायु सूक्ष्मगतीनें संचार करीत राहतो आणि इंद्रियांसह प्राण संप्रसाद नावाच्या आत्म्याशीं तादात्म्य पावून हृदयस्थ पुरितत्‌मध्यें शिरतो व चित्ताला आपल्या स्वाधीन करून घेतो. त्यामुळें स्वभावतःच एक प्रत्यगात्मा अवशिष्ट राहतो आणि त्याच्या स्वाभाविक सुखविश्रांतीचा अनुभव जीवाला येतो. तो त्या निरतिशयानंदरूप स्वार्थसत्तेंत आपल्या आनंदालाच मात्र पाहतो. विक्षेपदुःखाचा लेशही अनुभवीत नाहीं.

**श्रीराम**—भगवन्, मन आतां सुद्धा प्राणबलानेंच मननादि व्यापार करतें. मग सुषुप्तींत प्राणानें स्ववश केल्यामुळें जर तें मनन करूं शकत नाहीं तर तें आता तरी का मनन करतें. (म्हणजे प्राणाहून पृथक् केलेल्या मनाचें जर स्वरूपच रहात नाहीं तर तें केवल कांहींच नाहीं.)

**श्रीवसिष्ठ**—रामा, हें तूं फारच थोडे बोललास. कारण अधिष्ठानसन्मात्राहून पृथक् केल्यावर देह, प्राण इत्यादि कांहींच जगद्रूप नाहीं. पण त्याला पृथक् करीपर्यंत त्याच्या सत्तेनें सर्व आहे. त्या आरोपित जगाचा क्रम पूर्वी अनेकदां मी सांगितला आहे. सारांश हें सर्व चित्तकल्पनामय आहे. वास्तविक नव्हे १३८.

सर्ग १३९—प्राणाहूनही चित्ताचें प्राधान्य.

**श्रीवसिष्ठ**—चित्तच जगाला करणारें आहे. तें जशी जशी कल्पना करतें तसें तसें तें ( जग ) होतें. त्यानें प्राणाची कल्पना केली. प्राण माझी गति आहे, मी त्याच्यावाचून राहणार नाहीं, असें म्हटलें, त्यामुळें तें तत्परायण झालें. मी आतां कांहीं वेळ त्याच्यावाचूनही राहीन, असा संकल्प केल्यामुळें तें स्वप्न, मनोराज्य इत्यादि देहामध्यें प्राणावांचूनही

मनोव्यापार करतें. तें जेथें जेथें प्राणयुक्त देहाची कल्पना करतें तेथें तेथें तो उदय पावला आहे, असेंच पाहतें. असो; याप्रमाणें प्राण व देह यांची कल्पना केल्यानंतर मी पुनः कधींही प्राण-देह-विरहित होऊं नये, असा दृढ निश्चय करून तेंच जीव होतें. त्यानंतर त्याला आपल्या चिन्मात्र स्वभावाचा निश्चय होत नाहीं. म्हणूनच संसाराचा निरास आत्मज्ञानावाचून होत नाहीं, असें शास्त्रें कंठरवानें सांगतात व अनुभवही तसाच आहे. ज्याला 'हा मी,' असें वाटत असतें त्यालाच जीवत्व व संसारित्व असून तें आत्म्याच्या साक्षात्कारावाचून शांत होणें शक्य नाहीं. मी व हें अशीं दोन प्रकारची अविद्या आहे. ती मोक्षोपायाचें अनुष्ठान केल्यावांचून नष्ट होत नाहीं. यास्तव या शास्त्राच्या साहाय्यानें मोक्षोपायाचा विचार, निश्चय व अनुष्ठान करा. प्राण हेंच माझें जीवित आहे, असा मनानें दृढ अभ्यास केल्यामुळेंच मन प्राणाधीन होऊन राहिलें आहे. देहाच्या क्षोभाबरोबर स्वतः क्षुब्ध होणारें मन देहाच्याही अधीन आहे, असें म्हणावें लागतें. कारण तें आपल्याला तद्रूप पाहूनच त्याच्याबरोबर क्षुब्ध होत असतें. तें देहाद्याकार झाल्यावर आत्मतत्त्व जाणण्यास समर्थ होत नाहीं. म्हणूनच प्राण–निरोधाचा व मनो-निरोधाचा अभ्यास करावा लागतो. प्राण व मन हे परस्पराचे परस्पर रथ व सारथी आहेत. त्यामुळें ते एकमेकाचें अनुकरण करितात.

असो; राघवा, याप्रमाणें परमात्म्यानें आदि-सर्गापासून सुरू केलेली ही नियति प्रलयापर्यंत अशीच चालणार, व ज्ञानरहिताची ती तशी चाललीही आहे. जोंपर्यंत प्राण व मन समरूपानें आपलें कर्म करीत असतात, तोंपर्यंत जाग्रत्–नावाचा सम व्यवहार प्रवृत्त होतो. जेव्हा प्राण इंद्रियांना प्रवृत्त करण्याचें आपलें काम सोडून विषम होतो, तेव्हा स्वप्नसंज्ञक एकच मानस व्यवहार होतो व मनही शांत झालें म्हणजे सुषुप्ति प्रवृत्त होते. अन्नरस, पित्त इत्यादिकांनीं देहातील नाड्याना रोध केला म्हणजे प्राण मंदसंचार करूं लागतो व मन लीन होतें. क्षुधा इत्यादि कारणांनीं श्रम झाले असताही झोंप येते. मर्दनादि उपायांनीं नाड्यांना मृदु केल्यानें अथवा शर–वेधजन्य व्रणादि क्षतांच्या योगानें नाड्या रक्तानें भरल्या अस-

ताही प्राण स्पंदरहित होतो व सुषुप्तता उदय पावते. असो; त्यानंतर तो तापस पुनः त्या व्याधास असा आपला वृत्तान्त सांगूं लागला—

"बा व्याधा, मी ज्या प्राण्याच्या शरीरांत प्रवेश केला होता तो त्या रात्रीं यथेच्छ भोजनादि करून शय्येवर स्वस्थ पडला असतां त्याला गाढ झोंप लागली. मीही त्याच्या बरोबर निद्रा-सुख घेतलें. कांहीं वेळानें त्याच्या उदरातील अन्न जीर्ण झालें असतां स्वाभाविक नाडीमार्गानें प्राण स्पंद करीत असतांनाच त्याची निद्रा किंचित् विरल झाली. त्यानंतर त्याचा स्वप्नप्रपंच मीं पाहिला. या जगासारखेंच मला दुसरें चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्रें, भूमि, वृक्ष, नद्या, वनें, पर्वत, समुद्र, मानवादि प्राणी इत्यादिकांनीं भरलेलें जग दिसलें. त्यात महावृष्टि झाली. सागर वाढला. पर्वतावरून नद्यांचे लोट आले. त्यांनीं नगरें, ग्राम, वनें, इत्यादिकांचा उच्छेद केला. मी त्यावेळीं एका गावात आपल्या सर्व कुटुंबासह होतों. पण अकस्मात् आलेल्या त्या जलप्रवाहानें सर्व स्थावर-जगम वस्तूंसह मला वाहून नेलें. त्या पूराचा ध्वनि फार भयंकर होत होता. आमच्या सर्व गावातील लोकही माझ्यासारखेच घोर आपत्तींत पडले, त्यावेळीं जो तो आपापल्या जीविताकरिता प्रयत्न करूं लागला. प्रत्येक जण हाय हाय करूं लागला. घराच्या भिंती, मंदिरांचे कळस, झाडें भराभर कोसळूं लागलीं. बायका व पोरें आपापल्या स्वामीला हाका मार-मारून व ऊर बडवून रडूं लागलीं. मीही मोठ्यानें आक्रोश करूं लागलों. स्त्री, पुत्र, धन इत्यादि सर्वांची आशा सोडून आपल्याच प्राणांच्या रक्षणाची चिंता करूं लागलों. मला सर्व आप्तापासून दूर करून त्या जलप्रवाहानें अनेक योजनें दूर नेलें. एकदां मी एका लहानशा वृक्षाचा आधार धरून त्याच्यावर बसून राहण्याचा विचार केला. पण जलप्रवाहानें मोठ्या वेगानें येऊन त्या वृक्षासह मलाही आपल्या बरोबर नेलें. मीं त्यावेळीं कितीतरी गटंगळ्या खाल्या. अनेकदा झुडपाशीं अडकलों. त्यांचें काटे माझ्या शरीरात शिरले व अशाप्रकारें मीं असह्य दुःख भोगलें. मी अतिशय व्याकुल झालों. नको हा जन्म; देवा, यापेक्षां हे प्राण जातील तर बरें, असें मला वाटलें. पण बा साधो, इतक्यांत मला आपल्या पूर्वींच्या समाधिनिष्ठ शरीराचें स्मरण झालें. मी स्वप्नचमत्कार कसा उत्पन्न होतो, तें पाहण्यासाठीं या दुसऱ्या प्राण्याच्या

शरीरांत योगबळानें आलों आहें, हें मला आठविलें व त्याबरोबर मला तो महा पूर मोठ्या थोरल्या मृगजलाच्या पुरासारखा मिथ्या भासला. पण त्या विचित्र व अवर्णनीय मायेचा मला मोठा विस्मय वाटला. मी मनांत म्हटलें " अहो, हे आब्रह्मस्तंबपर्यन्त सर्व चराचर जीव या मिथ्या मायेच्या प्रवाहांत कसे कसे दुःख भोगतात, ते पहा. यांत नाश पावणाऱ्या या आबालवृद्ध स्त्री–पुरुषाना यांतून सोडविण्यास कोण समर्थ आहे ? आज हा जगाचा नाश मीं पाहिला. यात त्रिभुवनाचा क्षय झाला आहे. येथें इद्रादि महा पुरुषाचाही जर कोठें थाग लागत नाहीं तर इतराची काय कथा ? " १३९.

सर्ग १४०—प्रलयसागराची निवृत्ति, गावांत जीव होऊन राहणें, मुनीचें त्या प्राण्याच्या शरीरांतून बाहेर पडणें.

व्याध—पण भगवन् , आपल्या सारख्या योगसामर्थ्यानें संपन्न असलेल्याही महात्म्याला असली दुःखकर अवस्था कशी प्राप्त झाली ? त्याचवेळीं ध्यानाचा प्रयोग करून आपण शांत कसे झालां नाहीं ?

मुनि—व्याधा प्रलय, दोन प्रकारें होतो. एक क्रमानें सावकाश व दुसरा अकस्मात्. त्यातील पाहिल्याप्रकारच्या प्रलयांत पूर्वापर विचार करण्यास अवकाश सापडतो. पण दुसऱ्या प्रकारच्या प्रलयात विचाराला अवकाश मिळत नाहीं. मला दिसलेला तो जलाचा महापूर अकस्मात् कसा आला, तें मी तुला सागितलेंच आहे. फार काय पण अकस्मात् ओढवलेलें तें सकट पाहून देव हिरण्यगर्भाला तें निवेदन करावयास जों जाऊं लागत आहेत तोंच त्या पुरानें त्यानाही वाहून नेलें. शिवाय बा आरण्यका, काल सर्वनाशक आहे. त्यामुळें जें जेव्हां व्हावयाचें असतें तेव्हां त्याचा प्रतीकार करवत नाहीं. कालबलामुळेंच मला त्यावेळीं ध्यानधारणा आठवली नाहीं. नाशाचा काल आला म्हणजे मोठमोठ्यांचेंही बुद्धि, बल, तेज–इत्यादि सर्व सर्वदा विपरीत होतें. शिवाय बा हिंसका, मी तुला हें आपलें स्वप्न सागितलें आहे. तेव्हां स्वप्नांत काय संभवत नाहीं ?

व्याध—विभो, हें जर असत्य स्वप्नच आहे तर तें मला कशाला सागितलेंत ? त्यातही आपला कांहीं तरी उद्देश असावा.

मुनि—होय. बा बुद्धिमाना, तुला बोध करण्याच्या हेतूनें मी तें सांगितलें. त्यावरून तूं हें सर्व दृश्य असत्य आहे, असें जाणशील. संसार भ्रमरूप आहे, असें ज्ञान झाल्यावर दृश्याचा निरास होऊन दृक् अवशिष्ट राहते. यास्तव त्या स्वप्नाचा पुढील वृत्तान्तही ऐक—त्यानंतर मी त्या जंतूच्या ओजामध्यें स्थित होऊन जों त्या महापूराकडे पाहात आहें, तों तें सर्व जल कोठेंसें जावयास निघालें आहे, असें दिसलें. मीही त्याच्या-बरोबर जात होतों. तों मला एक तट दिसला व दैवयोगानें मी त्यावर बसलों. तों पाणीही उतरूं लागलें. तेव्हा माझ्याप्रमाणेंच इतर जीवांनाही जरा धीर आला. हळू हळू सर्व आकाश स्वच्छ झालें. नक्षत्रें दिसूं लागलीं. त्या एक—सागराचा तो मोठा थोरला आशय शुष्क झाला. त्यात पर्वत, वृक्ष, लोकपालाचीं मंदिरें, सूर्य—चंद्र इत्यादिकाचीं मंडले जागजागीं चिखलात रुतून बसल्यासारखीं दिसलीं. विष्णूचा गरुड, ब्रह्मदेवाचा हंस, यमाचा रेडा, इंद्राचा ऐरावत इत्यादि सर्व जाग-जागीं मरून पडलेले आढळले. त्यात मेलेल्या इतर क्षुद्र जीवांची तर गणनाच करवत नव्हती. असो; याप्रमाणें तो उत्पात शांत झालेला पाहून मी त्या तटाजवळच्याच पर्वत शिखरावरील कोणा एका मुनीच्या अश्रमात आलों, व श्रांत झाल्यामुळें स्वस्थ निजलों. ती झोंप पुरी झाली असता तसलेंच स्वप्न पुनः पाहिलें. कारण त्याची वासना माझ्या मनात दृढ होऊन राहिली होती. तें दुप्पट दुःख पाहून आकुल झालेला मी फार वेळानें जागा झालों व त्या प्राण्याच्या हृदयामध्यें स्थित असलेल्या त्याच पर्वताशिखरास पुढें पाहिलें, नंतर उजाडताच मला तेथला तो पर्वत, भूमि इत्यादि सर्व दिसलें. तेथली सर्व सृष्टि सूर्योदयानें सुंदर झाली. ज्याप्रमाणें वृक्षाच्या शाखेपासून जशीं पानें त्याप्रमाणें माझ्या चित्तापासून स्वर्ग, पृथ्वी, वायु, पर्वत, नद्या, आकाश, इत्यादि सर्व झालें. तशा प्रकारचें तें भूतळ पाहिल्यावर मी नुकत्याच अनुभवविलेल्या स्वप्नाला थोडासा विसरून त्यांतील त्या पदार्थांनींच व्यवहार करूं लागलों. तेथें मला कांहीं अपूर्वच प्रतिभा झाली. मला जन्मास येऊन आज सोळा वर्षें झालीं आहेत. हा माझा पिता, ही माता, हें माझें घर. इत्यादि प्रतिभा उद्भवली. मी एक ग्राम पाहिला. एक

ब्राह्मणाचा आश्रम पाहिला. त्यांत आपलें घर पाहिलें. तेथें माझा एक
भाऊ होता. नंतर त्या आप्तांसह त्या ग्रामांत राहणाऱ्या व जाग्रदादि
तीन अवस्थांचा अनुभव घेणाऱ्या माझे दिवस भराभर जाऊं लागले.
मला दृढ वासनेमुळें तेंच सत्य भासूं लागलें. पूर्वीच्या सर्व भावन
क्षीण झाल्या.

व्याधा, येणेंप्रमाणें मी एका गावात राहणारा ब्राह्मण झालों. केवल
आपल्या देहावरच आस्था ठेवली. विवेकाला दूर केलें. शरीराला आत्म
समजलों. भार्येचें रंजन हेंच सर्व कर्तव्य आहे, असा निश्चय केला
वासना हाच माझा स्वभाव व देह झाला. केवळ धनपरायण बनलों.
प्रथम मजपाशीं एक म्हातारी गाय, एवढेंच कायतें धन होतें, तथापि
पुढें मी प्रयत्न केला. आपल्या घरापाशीं घेवड्याचे वेल लावले. शेत
गुरें इत्यादि संपादन केलीं. अग्निहोत्र ठेवलें. कमंडलु घेतला. तुळसी
बेल, इत्यादि वृक्षावर फार निष्ठा ठेवली. लोकाचारात निष्णात झालों
परसातील कोवळें गवत उगवलेल्या रम्य जागीं जाऊन बसूं लागलों
भाजीचे व फुलझाडांचे ताटवे लावण्यांत दिवसाचे दिवस घालविले. नद्या
तीर्थें इत्यादिकांत स्नान करण्याची मोठी हौस धरली. शेण, अन्न, जळ
जाळावयाचीं लांकडें, विटा, माती इत्यादिकांचा मोठ्या कष्टानें संचय
केला, आणि हें कार्य व हें अकार्य या पाशानीं मला विवश केलें.

आरण्यका, याप्रमाणें जिवंत राहणाऱ्या माझीं तेथें अनेक वर्षे गेलं
असता एकदा तेथें दुरून एक आत्मज्ञ अतिथि आला. मी त्याचा योग्य
सत्कार केला. त्यानें माझ्या येथें विश्रांति घेतली, स्नानपूर्वक भोजन केलं
व शयनावर बसून रात्रीं तो माझ्याशीं गोष्टी बोलूं लागला. अनेक
ठिकाणच्या अनेक विचित्र वार्ता सागता सागतां त्या महात्म्यानें हें स
चिन्मात्रच आहे. अनंत व अविकारी तत्त्वच या सर्व जगदाकारानें भासत
आहे, इत्यादि मला बोध केला. त्यामुळें माझें चित्त किंचित् शांत
अंतर्मुख झालें. त्याबरोबर मी त्या प्राण्याच्या शरीरात प्रवेश करू
त्याच्या तेजोधातूंत स्थित झालों आहें, असें जाणलें. आपल्या वृत्तांता
स्मरण होतांच मी ज्याच्या उदरांत स्थित होतों त्याला विराड्-रूप समजू
त्यांतून बाहेर पडावयास प्रवृत्त झालें. पण त्यांतून बाहेर पडण्याचें द्वा

मला सापडेना. तेव्हां मी त्याच्या प्राणवायूत शिरून बाहेर यावयास निघालों. त्याच्या नासिकारंध्रांतून बाहेर पडलों व वायुरूपी रथावर बसून जों बाहेर जावयास म्हणून प्रवृत्त होत आहें तों समोरच माझा पद्मासन घालून बसलेला देह मला दिसला. बाहेरील एका मुनीच्या आश्रमात शिष्य त्याचें रक्षण करीत होते. मी समाधि लावून बसल्यापासून माझ्या त्या देहाला ते शिष्य सुमारें दोन घटिकाच कायते संभाळीत बसले होते. ( म्हणजे दोन घटिकाच्या अवकाशांत मी हें सर्व पाहिलें ). मी ज्याच्या हृदयात प्रवेश केला होता तो पुरुषही एका गांवातील उत्सवात प्राप्त झालेल्या मिष्ट अन्नानें तृप्त होऊन उताणा निजला होता.

व्याधा, तें आश्चर्य पाहून मी कोणालाही काहीं बोललों नाहीं. पुनः त्या निजलेल्या पुरुषाच्याच हृदयात प्रवेश केला. त्यातील ओजःप्रदेशीं आलों. तों तेथें युगाचा अंत प्रवृत्त झाला होता. त्या भुवनाचा सर्व-धर्मसंस्थेसह विपर्यास झाला. त्यांत निराळे पर्वत, दुसरीच पृथ्वी, निराळ्याच दिशा, व सर्व काहीं प्रथम पाहिलें होतें त्याच्याहून अगदीं भिन्न मला दिसलें. ते सर्व आप्त, तो गाव, ती भूमि, तो दिक्तट, इत्यादि सर्व वाऱ्यानें उडवून नेलेल्या तृणाप्रमाणें, कोठें गेलें, कोण जाणे. सारांश याप्रमाणें तें सर्व भुवन निराळ्याच प्रकारचें झालें आहे, असें मीं पाहिलें. बारा सूर्य एकदम उदय पावले. दश दिशा जळूं लागल्या. थंडीनें गोठलेल्या जलाप्रमाणें पर्वत विरघळूं लागले. प्रत्येक पर्वतावरील व प्रत्येक दिशेंतील वनें पेटलीं. सर्व रत्नभूमि जळून खाक झाल्या. सर्व सागर शुष्क झाले. महावायु पुढे आले. सर्व भूमंडलात कोळशाचा ढीग झाला. पाताल, भूतळ, दिशा यांतून ज्वाला निघूं लागल्या. साराश सर्व लोक ज्वालामय झाला. मी त्यातूनच वायूबरोबर हिंडत होतों. पण मी आतिवाहिक देहमात्र आहें. असा माझा निश्चय असल्यामुळें मला अग्नी-पासून काहीं पीडा झाली नाहीं १४०.

सर्ग १४१—वायु व मेघ याची वृद्धि.

**मुनि**—व्याधा, हें स्वप्न आहे, असें जाणणारा स्वप्नांत अग्नीमध्यें जरी पडला तरी जसा दुःखभाक् होत नाहीं त्याप्रमाणें मीही त्यावेळीं चांगला सावधान असल्यामुळें दुःखी झालों नाहीं. केवल अलातचक्रा-

प्रमाणें सुंदर फिरत होतों. मला तत्त्वज्ञान झालेलें असल्यामुळें मीं अखिन्न मनानें त्या अग्नीविषयीं जो विचार करीत आहें तो वारा आला. त्याचा भयंकर सीत्कार भीरूंच्या मनाला थरथर कांपवीत होता. त्याच्या बरोबर भस्म झालेले सर्व पदार्थ उडून चालले होते. इतक्यांत प्रलयमेघही अतिवृष्टि करूं लागले. देव, अप्सरा, इत्यादिकांसह सप्त लोक अतिशय दुःखांत पडले, व सर्वत्र संहार झाला १४१.

**सर्ग १४२**—स्वप्नादि जगाचें तत्त्व ब्रह्म आहे व तत्त्वदृष्टया जगद्बीज-कर्मांचा अभाव आहे.

**मुनि**—तथापि तो अतिशय कष्टकर भ्रम पाहून मी फार खिन्न झालों आणि मनात म्हटलें,–" मी विनाकारण दुसऱ्याच्या शरीरात शिरून हा स्वप्नभ्रम कशाला पाहत राहिलों आहें ? "

**व्याध**—पण भगवन्, स्वप्नाचें तत्त्व काय आहे, त्याचा निर्णय करण्यासाठीं आपण दुसऱ्याच्या शरीरात शिरला होता. तेव्हां त्याचा काय निर्णय केलात ? तत्त्वतः स्वप्न हें काय आहे ? दुसऱ्याच्या हृदयात पाहिलेले महार्णवादि, हें काय आहे ? आपल्या हृदयात जग कसें संभवतें, तें मला आपण जसा निश्चय केला असेल, तसें सांगा.

**मुनि**—व्याधा, सर्ग हा शब्द व त्याचा सृष्टि ( सर्व जग ) हा अर्थ हीं दोन्हीं संभवत नाहींत. कारण त्याचें योग्य निमित्त नसतें. परमात्म्यामध्यें हे दोन्ही शब्द अज्ञात आहेत. कारण तें पद अज्ञात-ज्ञानात्मक व अनामय आहे. अज्ञात परमात्मरूपच हें सर्व जग आहे. कारण ज्ञानानें अज्ञान नष्ट झालें म्हणजे हे ( शब्दार्थमय जग ) नसतें. म्हणून जग काय आहे, तें कसें झालें, इत्यादि मला माहीत नाहीं. सर्व आत्म्याच्या चितिशक्तीचे विवर्त आहेत, एवढें मात्र मी निश्चयानें जाणतों. अर्थात् शरीर, हृदय, स्वप्न, जलादिक, जन्म, मरण, इत्यादि कांहीं नाहीं. एक स्वच्छ चिन्मात्रच आहे. त्याच्या अपेक्षेनें हें प्रसिद्ध आकाशही मेरूसारखें स्थूल आहे. ईश्वर व इतर तत्त्ववेत्ते या जगाला चित्–च्या चितेमुळें स्वभावतःच भासणारें समजतात. स्वप्नातील नगराप्रमाणें तें चिन्मात्र आहे. तुझ्यासारख्यांना मात्र तें तिमिररोग्यांना भासणाऱ्या द्विचंद्रयुक्त आकाशाप्रमाणें भासतें. आम्हांला तर एक अनाकार केवळ चिदाकाश

दिसतें. स्वप्नांत सर्व आपापल्या उचित कारणावांचून व्यर्थ भासतें. यास्तव तें सर्व, तो त्रिपुटीरहित शुद्ध द्रष्टाच होय, असा मी निर्णय केला. त्याच न्यायानें व त्याच कारणानें जाग्रतींतही हें सर्व निष्कारण दिसत आहे. तो शुद्ध आत्माच हें सर्व आहे. त्रिपुटी सत्य नव्हे. त्या तत्त्वाचा अनुभव जरी आला तरी त्याचा वाणीनें उच्चार करतां येत नाहीं. एकच काल जसा प्रलय व सृष्टिरूप होतो. अथवा एकच बीज अंकुरापासून पुष्प, फल इत्यादिकांपर्यंत स्वतःच विस्तार पावून राहत तसें एकच ब्रह्म सर्वात्मक होतें. पण वस्तुतः तें द्वैत व ऐक्य यांनीं युक्त नसतें. कारण तें जर खरोखरच तसें असतें तर सर्वांना त्याचा तसाच अनुभव आला असता, पण तसें होत नाहीं. ज्यांना द्वैताचाच अनुभव येतो त्यांनाही तो सदा येत नाहीं. फक्त स्वप्न व जाग्रत् या दोन अवस्थांतच तो येतो. स्वप्न, संकल्प व भ्रम या अवस्थेंत एकाला जी भिंत वाटते तीच दुसऱ्याला शून्यता ( आकाश ) भासते. आत्मा चिन्मात्र आकाशच असताना स्वप्नांत जसा जाग्रत्-प्रमाणें भासतो त्याप्रमाणें जाग्रन्मय स्वप्नांतही भासतो. स्वप्नापेक्षां जाग्रतींत तो थोडासाही विपरीत होत नाहीं. हेंच त्याचें नित्य अद्वयत्व होय. सुषुप्ति, मूर्च्छा, मरण, समाधि इत्यादि दुसऱ्या अवस्थांत जगाचें भान जरी न झालें तरी जेथें जेथें मनाचा विलास असतो तेथें तेथें जगाचें भान होतें. यास्तव त्याचें अस्तित्व मनावर अवलंबून आहे. जग मनाच्या अधीन आहे. मनाचा त्याग केला कीं जगाचा क्षय होऊन स्वाभाविक अद्वयतेचा अनुभव येतो. अर्थात् सद्वयता सनिमित्त व अद्वयता निर्निमित्त आहे.

व्याध—भगवन्, या जगात प्राक्तन कर्म कोणाचें असतें व कोणाचें नसतें ? आणि ज्याचें नसतें त्यांना कर्मावांचून मनन व त्याचा त्याग कसा करतां येतो ?

मुनि—सृष्टीच्या आरंभीं जे ब्रह्मादिक स्वयंभू प्रकट होतात त्यांचे देह विज्ञप्तिमात्र असतात. यास्तव त्यांना जन्म व कर्म नाहीं. त्यांना संसार द्वैत व कल्पना नाहीं. ते विशुद्ध ज्ञानदेहवान् व सदा सर्वात्मरूप होऊन स्थित असतात. त्यांच्या दृष्टीनें सृष्टीच्या आरंभीं कोणाचेंही प्राक्तन कर्म नसतें. तर सर्गाच्या आरंभीं ब्रह्मच सर्गरूपानें असें विकास पावतें.

ज्याप्रमाणें सृष्टीसमयीं ब्रह्मरूपी ब्रह्मादिक भासतात तसेच दुसरेही अनेक जीव उद्भवतात. पण जे अज्ञानानें आवृत झालेले असून स्वतःला ब्रह्म जाणत नाहींत; उलट मी ब्रह्माहून भिन्न आहें असें समजतात. ते कर्मांच्या वासनेनें वासित असतात. त्यांच्या उत्तरजन्मास कर्म कारण होतें. कारण त्यांनीं आपण होऊनच आपल्याला विसरून अचित् देहादिकांना आत्मा मानलें व अवस्तूचा आश्रय केला. जे कधींही आपल्याला ब्रह्माभिन्न समजले नाहींत, ते हे कर्मबंधशून्य ब्रह्म-विष्णु-महेश्वरादिक अधिकारी देव होत. निर्मलत्व हा ब्रह्माचा स्वाभाविक धर्म आहे. ब्रह्म सदा स्वस्वभावातच स्थित असतें. तें क्वचित् मलिन उपाधींत जीवासारखें भान स्वतः पाहतें. जेथें जीवत्व तेथेंच अविद्याही राहते. ती शुद्ध स्वरूपात नसते. अविद्येमुळेंच संसार उद्भवतो. पुढें स्वतः तेंच जीवतत्त्व आपलें स्वरूप पाहून स्वयं ब्रह्म बनतें. अज्ञात ब्रह्माला सर्गाचा भ्रम होणें हा स्वभाव आहे. सर्ग हें ब्रह्माचेंच भान आहे. तें स्वप्न किंवा जागर नव्हे. तेव्हा त्याला खरें सर्गत्व किंवा कर्म कशीं असणार? वस्तुतः कर्म, अविद्या, व सृष्टिकल्पना नाहीं. तर आपल्या संवेदनामुळें हें सर्व प्रसिद्ध होत आहे. अर्थात् कोणत्याही जीवाचें कर्म प्रथम संभवत नाहीं. पण पुढें अविद्येतील स्थितीची कल्पना केल्यावर कर्माची कल्पना होते. पण तें कर्म देहावांचून होत नाहीं. म्हणून देहाची कल्पना करावी लागते. पण शेवटीं या सर्वांच्या आरंभीं काय असतें तें पुनः गुप्त राहतेंच. ( म्हणजे कर्म आधीं, कीं देह आधीं, कीं अविद्या सर्वांच्या पूर्वीं, याचा निर्णय होत नाहीं ) म्हणून काय कीं सर्व घोंटाळा. पण तेंच सर्व ब्रह्म आहे, असें जाणलें कीं जलाच्या बुडबुड्याला जसें जन्म व कर्म नाहीं तसेंच जगाचेंही जन्म व कर्म नाहीं, असा निश्चय होतो. स्वप्नात पाहिलेल्या लोकाचें जसें प्राक्तन कर्म नाहीं, तसेंच आदि सर्गातील चिन्मात्ररूप जीवाचें प्राक्तन कर्म संभवत नाहीं. सर्ग, सर्ग या भावनेनें रूढ झाला म्हणजे मग प्राक्तन कर्माची कल्पना होते व त्यानंतर कर्मपाशानीं परवश झालेले जीव घटीयंत्राप्रमाणें भ्रमण करूं लागतात. येणेंप्रमाणें हा सर्ग वस्तुतः सर्गच नव्हे. हें ब्रह्मच असें स्थित आहे. मग कर्में कोठचीं व कोणाचीं? अर्थात् बंध कर्मप्रयुक्त नव्हे, तर तो अज्ञानप्रयुक्त आहे. यास्तव तेंच कर्माचेंही बीज आहे, दुसरें

कांहीं नाहीं, असें पाहिजे तर खुशाल म्हणा. म्हणूनच अज्ञानाचा नाश होऊन ज्ञान जसें जसें वाढूं लागतें तसें तसें कर्म क्षय पावतें. बंध किंवा कर्म सत्य नसल्यामुळें ज्ञानानें त्यांची शांति होणें अशक्य नाहीं. यास्तव प्रत्येक हितेच्छूनें ज्ञानाकरिताच ( पांडित्याकरिताच, आत्मसाक्षात्काराकरिताच ) सदा यत्न करावा. त्याच्या योगानें सर्व भयाची शांति होणें शक्य आहे. ज्याच्या योगानें संसारचक्रांतून सुटका होते, तेंच ज्ञान आहे. बाकीच्या सर्व उदरभरणाच्या उपयोगीं असलेल्या विद्या होत १४२.

सर्ग १४३—चिन्मात्रदर्शनरूप पांडित्याची प्रशंसा, चित्च जगत आहे.

मुनि—सर्व धर्म, धर्माच्या विरुद्ध नसलेलीं लौकिक कर्में, त्या दोघांचेंही ऐहिक व पारलौकिक फल, इत्यादिकांचा निर्णय करण्यांत व श्रोत्यांचे संदेह घालवून त्यांच्या बुद्धींचा विकास करण्यांत निष्णात असलेला पंडितच सभेचें मंडन आहे. गतिकोविद आत्मज्ञानी ज्या गतीस जातात, तिच्यापुढें इंद्राचें ऐश्वर्यही कुजलेल्या गवताच्या काडीसारखें तुच्छ आहे. आत्मज्ञानरूप पांडित्याच्या फलाहून अधिक सुखावह फल मला त्रिभुवनांत दिसत नाहीं. सच्छास्त्राच्या विचारापासून उत्पन्न झालेल्या ज्ञानवानाची परमार्थवस्तुरूप दृष्टि आत्म्यामध्येंच आल्हाद पावते. त्याचें हें सर्व अविद्यात्मक दृश्य ब्रह्म होतें. ब्रह्मात्मतत्त्वज्ञानानें देह, सर्ग, क्षय इत्यादि सर्व संज्ञा ब्रह्मस्वभावभूत होतात. म्हणून त्या सत्य आहेत. कारण अवशिष्ट राहिलेल्या ब्रह्मामध्यें दृश्य, क्षय इत्यादि धर्म-कर्म यांचा अभाव असतो. पृथिवीप्रभृति दृश्य आहे असा जर संभव असता तर त्याचें कारणही असतें. पण त्याच्या अस्तित्वाचाच जेथें असंभव आहे तेथें त्याचें कारण कोठून असणार. ब्रह्माचा जो प्रतिभास तेंच हें जग होय. प्रातिभासिक घटाला दंड-चक्र-कुंभार इत्यादि कारणसामग्रीची गरज नसते. स्वप्न पाहणाराच्या दृष्टीनें स्वप्नांत पाहिलेल्या पुरुषाचे काल्पनिक आईबाप इत्यादि जसे असतात त्याप्रमाणेंच जाग्रत्-रूप स्वप्नांतही ते असतात. स्वप्नांत दिसणाऱ्या पुरुषादिकांचें जसें प्राक्तन कर्म नाहीं. त्याप्रमाणेंच तें जाग्रत्स्वप्नांतील प्रातिभासिक पुरुषांचेंही नाहीं.जीव सर्व सर्गांमध्यें सर्व स्वप्नार्थांस पाहतो. आपल्या वासनेप्रमाणें प्राक्तनकर्माचें सत्त्वही जाणतो. भूत-भुवनादिकांच्या उत्पत्तीपासून देहसिद्धीपर्यंत जो संसार त्यांत जीवही स्वप्नपदार्थांप्रमाणेंच

आपापल्या संवेदनाप्रमाणें परस्पर भासतात. त्यामुळें स्वप्नार्थप्रमाणेंच ते संवेदनांशीं (ज्ञानांशामध्यें) सत्य (विद्यमान) व इतरांशीं असत् (अविद्यमान) होत. ज्या अर्थी ते भावनेप्रमाणें भासत असतात त्याअर्थीं स्वप्नांतही सत् असतात व जाग्रतीप्रमाणें स्वप्नांतही अर्थक्रिया करण्यास समर्थ असतात. तुझ्या स्वप्नामध्यें वस्तुतः बाह्यार्थ नसताना भोजनादि संकल्पसंवित्च पाकादि संवित्च्या क्रमानें ग्रासादिकांचा स्पष्ट अनुभव घेऊन तृप्त होते. त्यामुळें स्वप्न अस्पष्ट व जाग्रत् स्पष्ट; एवढाच कायतो त्या दोन अवस्थांमध्यें विशेष आहे. बाकी संवित्–प्रमाणें अनुभव येणें, यात काहीं फरक नाहीं. म्हणून त्या दोन्ही अवस्थांतील संवित् एक. येणेंप्रमाणें सर्व सन्मय आहे. सत् ब्रह्मच जगद्रूपानें उत्पन्न होऊन, प्रलयरूपानें मरून, स्थिति–रूपानें दृश्याचा अनुभव घेतें. पण त्या तिन्हीं काळीं स्वरूपापासून च्युत होत नाहीं. पुरुष स्वप्नात मृत्तिका–भिंति, मोठमोठे वाडे इत्यादिकांपासून (नगरापर्यंत) सर्व वस्तूंना जसा निर्माण करतो त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें आकाश, वायु इत्यादि भूतें व भौतिक वस्तु यास कल्पनेनें निर्माण केलें आहे. व त्यानें ज्याची जशी जशी संकल्पना केली तें तसेंच होऊन राहिलें आहे. तीच ईशकृत नियति होय. तिच्या योगानें सर्व व्यवस्था होते. आमचें हें शास्त्र नियतीचा भंग करावयास प्रवृत्त झालेलें नसून कवल तिच्या सत्यतेचा भंग करावयास प्रवृत्त झालें आहे. अर्थात् शास्त्रविचारानें तिच्या सत्यतेचा भंग झाला म्हणजे ती स्वप्नांतील वस्तूंच्या नियतीप्रमाणें चिन्मात्र होते. या चिच्चमत्काररूप सर्गांत प्रथम भावना व नंतर ती ती वस्तु, असा क्रम आहे.

व्याध—भगवन्, मरणानंतर सुख–दुःखभोगाकरितां देह कसा बनतो. त्याचें निमित्त काय ? धर्म व अधर्मच आपल्या भोगदानाकरिता सर्व करितात, असें कोणी म्हणतात; पण त्यांच्या कर्मनिर्मित देहादिकाची निवृत्ति ज्ञानानें होत नाहीं. शिवाय मोक्ष कृतक (कर्मजन्य) आहे, असें म्हटल्यास मोक्षाचा असंभव होतो.

मुनि—बा व्याधा, संस्काररूपानें असलेलें जें विहित व निषिद्ध आचरण तेंच क्रमानें धर्म व अधर्म होय. तशा प्रकारच्या संस्कारांचा पुंज (रास) हेंच मन. तेंच चिदाभासानें व्यापलें असतां जीव होतें. तो

प्राणादि–चेष्टाप्रधान असल्यामुळें कर्मात्मा होय. तोच आपल्या वासनां-प्रमाणें देहादिकांचा संकल्प करून तदाकार होतो. पण हे सर्व चित्-चेच प्रतिभास आहेत. यास्तव त्याची कोणी कितीही जरी कल्पना केली तरी तत्त्वतः त्यांत भेद नाहीं. आता देह कसा होतो, तें सांगतों. संवि-दात्मा स्वतः चिद्रूप असल्यामुळें देहाला जाणतो. तो स्वप्नाप्रमाणेंच मर-णानंतरही देहादिकाची कल्पना करतो. पण त्यात सत्यता नसते. पिता किंवा ईश्वर मेलेल्या अन्य जीवाला निर्माण करतो, असें म्हणावें तर ‘पिताच स्वतः पुत्र होतो’ व ‘ईश्वर जगाला निर्माण करून त्यात शिरला’ इत्यादि श्रुति–वाक्यें असत्य ठरतात. तीं असत्य ठरलीं तर, तें आम्हांला इष्टच आहे, म्हणून कोणी तार्किक म्हणतील, पण तें बरो-बर नाहीं. कारण ईश्वर कोणा नव्याच जीवाला उत्पन्न करतो, असें म्हटल्यास उत्पन्न होताच जीवाची दूध पिण्याकडे होत असलेली साहजिक प्रवृत्ति, कोणी शिकविल्यावाचून, दूध हें आपलें इष्ट आहे, असें माहीत नसतानाच कशी होऊं शकते? भीति, हास्यादि विकार इत्यादि कसे होतात? शिवाय ईश्वराहून जीव भिन्न उद्भवला आहे, असें म्हटल्यास ईशाचें चैतन्य त्याच्या ठिकाणीं कसें दिसतें? अर्थात् मरणोत्तर जीव जन्म घेत नाहीं. तर तो केवळ आपल्या कल्पनेनेंच ‘मी झालों’ असें खोटं समजतो. त्या भासालाच लोकात व वेदातही जन्म हें नाव प्रसिद्ध झालें आहे. तो आकाशात्माच स्वप्नाप्रमाणें आपले मरण, जन्म, जग इत्यादि पुनः पुनः जाणतो. प्रत्येक जीव याप्रमाणे हें खोटेंच जाळें पाहून त्यात खान, पान, इत्यादि व्यवहार करीत राहिला आहे. अशा जगाच्या अनंत कोटी आहेत. पण त्याचें यथार्थ ज्ञान झालें असता त्या सर्व ब्रह्म बनतात. सारांश सर्व संवित्-मात्र आहे; म्हणून द्वित्व व एकता खरी नव्हे ज्या भावनेचा दीर्घ अभ्यास करावा, तसें फळ मिळतें. सर्व खरें आहे, असें म्हटल्यास तें खरें होतें व खोटें आहे, असें म्हटल्यास खोटें ठरतें. यास्तव व्याधा, शरीरें, कर्में, दुःखें, सुखें, इत्यादि सर्व जशीं असतील तशीं असोत. येवोत व जावोत. तूं भ्रम सोडून नित्य आनंद-स्वरूप परमात्मनिष्ठ हो १४३.

(४१) ६३–११६।१२

सर्ग १४४—चित् व जग व जगत् चित्, यांविषयीं कांहीं युक्ति व ब्रह्माचें सर्व शक्तिमत्त्व.

मुनि—अशा स्वप्नतुल्य संकल्परचनेंत बद्ध काय आहे व मुक्त कोण होणार ? आकाशांतील विविध दृष्टि-भासांप्रमाणें हे जग आहे. जशी एकाद्या नगराची रचना दीर्घ कालानंतर अगदीं बदलते त्याप्रमाणें जगाची रचनाही बदलत असते. आतां विद्यमानसा वाटणारा पदार्थ क्षणांत नाहींसा होतो. पण असें पाण्याच्या प्रवाहाप्रमाणें क्षणोक्षणीं बदलणारें जग असत् असूनही सत् असल्यासारखें भासतें. त्याचा अनुभव येता. यास्तव सत्त्व व अनुभव यास कारण होणारें असें कांहीं त्यात आहे व तेंच चिद्रूप ब्रह्म होय. आम्हाला जसें हें जग त्याप्रमाणें आकाशात दुसऱ्या अनेक जीवाचीं असंख्य जगें आहेत. पण तीं परस्परास दिसत नाहींत. अनेक जलाशयात अनेक प्रकारचे जलजंतु असतात. पण त्याना परस्पराचें निवास स्थान जसें दिसत नाहीं, त्याप्रमाणेंच एका जगातील प्राण्याना दुसऱ्या जगाचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं, पण तेवढ्यावरून तीं नाहींतच असें म्हणता येत नाहीं. स्वप्न पाहणारा पुरुष, आपल्या लहानशा घरांतही अनेक नगरें पाहतो. पण तीं जशीं त्याच्या दृष्टीनें आहेत व इतरांच्या दृष्टीनें नाहींत त्याप्रमाणेंच आकाशांतील अनत जगें आहेत व नाहींतही, पण तीं सर्व चिच्चमत्कारमात्र आहेत. नित्यसिद्ध चित्-मुळेंच एकाला जी वस्तु सरूप व सकारण वाटते तींच दुसऱ्याना नीरूप व अकारण भासते. नावांचे जगत्संस्कार नुसत्या देहांत अथवा नुसत्या चित्—मध्यें नाहींत. तर त्या त्या दृश्याकार परिणामास धारण करणाऱ्या चित्स्वभाव बुद्धीचींच तीं संस्कारादि नावें आहेत. ही सर्व प्रतिभाच आहे, ब्रह्म व जगत् आहे. तें अनादि आहे. नवीनच झालेलें नव्हे. परमात्माच कारण व कार्य आहे. कारण तोच जगाच्या पूर्वी असतो व पूर्वी असणारें कारण होय. तोच विशेषाकार कार्य आहे, कारण कार्याचे संस्कार ज्याला असतात तोच बिजाला ( कारणाला ) कार्यरूप देऊं शकतो. म्हणून आत्माच संस्कार आहे. चिदाकाशांत जी स्वप्नकल्पना तेंच जगत् आहे. जगाचें भान चित्मुळें होतें व तें सर्वव्यापी चित्--मध्येंच होतें. यास्तव तें तिच्याहून भिन्न नाहीं, या सृष्टींत असें स्थानच नाहीं कीं

जेथें चित् नाहीं व त्यामुळे कोणताही पदार्थ जेथें ब्रह्म नाहीं तेथें (म्हणजे ब्रह्मबाह्य स्थानीं) राहतो, असें म्हणतांच येत नाहीं, शिवाय हें सर्व अकारण आहे.

व्याध––पण भगवन्, अकारण असलेलें हें दृश्य सिद्ध कसें होतें व तें सकारण असलें तर स्वप्नांत सर्गादिभावना कशी होते?

मुनि––व्याधा, हें अकारण आहे, असेंच आम्ही मानतों, त्यामुळे कारणशून्य स्थूल सर्गाचा संभव नाहीं. वास्तव दृश्य प्रातिभासिक आहे, त्यामुळेंच तें मिथ्या आहे. मिथ्या वस्तूला योग्य कारणाची अपेक्षा नसते. याप्रमाणें कारणरहित सर्ग अत्यंत असंभावित असल्यामुळें ब्रह्मरूपांत (माया-प्रतिबिंब-चैतन्यात) नित्य आत्म्याच्या औपाधिक अवयव-रूपानें, साकारतेनें व सक्रियतेनें जग भासतें. मायाच देव, ऋषि, मुनि इत्यादि सर्व स्थावर-जंगमात्मक जग करते. सर्व नियति व विधि-प्रतिषेधादिक करते; पण त्या मायेलाही आधार ब्रह्माचाच आहे. त्या-मुळें जगाचे तात्त्विक कर्तृत्व मायाशबल ब्रह्माला आहे. एकट्या मायेला नाहीं. सर्व ब्रह्मकर्तृक असल्यामुळेंच भाव-अभावरूप अर्थाचा व्यभिचार झाला तरी त्याच्या नियतीचा व्यभिचार होत नाहीं. नियतीची कल्पना केल्यापासून, त्यानंतर नियति–विशेषरूप कार्यकारणतेवाचून भावाचा संभव होत नाहीं. त्या ब्रह्माची नियति व तिचा कल्पक नायक (भोक्ता जीव) असें हें दोन हातासारखें अंग त्या ब्रह्मापासून आपोआप उद्भवलें आहे. आपण एका हातानें दुसऱ्या हाताचें जसें नियमन करितों तसें ब्रह्म त्यातील एका अंगानें दुसऱ्या अंगाचें नियमन करतें. म्हणून जीवाचा असाच जाग्रत्स्वप्नलक्षण सर्ग अबुद्धिपूर्वक प्रवृत्त होतो; कारणा-मुळें कार्यांत विशेष रचना होणें, हा जो नियम तीच रचनानियति होय. अज्ञात ब्रह्म तिच्यावाचून एक क्षणभरही राहूं शकत नाहीं. मातीचें चूर्ण जसें कांहीं तरी आकारानेंच राहतें त्याप्रमाणें ज्ञ आत्मसाक्षात्कार होईतों नियतीनें युक्त होऊन राहतें. येणेप्रमाणें नियतिकल्पनेपासून पुढें सर्व सकारण आहे. ज्याच्या सर्गांत जेव्हांपासून ज्याकरितां जी नियति प्रवृत्त झालेली असते ती त्याच्याच पुरती असते. ती दुसऱ्या पुरुषाच्या अथवा दुसऱ्या काळातील पुरुषाच्या कामाची नसते. कारणरहित ब्रह्म अज्ञालाच

सर्गरूपानें भासतें. कार्यकारणभ्रमही त्यालाच होतो. पण विवेकी पुरुषाच्या दृष्टीनें सर्व सृष्टि काकतालीय न्यायानें झालेली असल्यामुळें नुस्त्या पूर्व व उत्तरभाव दर्शनानें कल्पिलेल्या कारणकार्यभावास सत्यता राहत नाहीं. कारण माती, दंड, चक्र, कुंभार इत्यादि, घटाच्या पूर्वी अवश्य असल्यामुळें, कारण व घट हें त्याचें कार्य. तंतु, तुरी, वेमा, कोष्टी इत्यादि पटाच्या पूर्वी अवश्य असल्यामुळे कारण व पट कार्य; इत्यादि ही सर्व कल्पना आहे. अर्थात् नित्य सिद्ध वेदांचींच पदें, वाक्ये, व्याकरण इत्यादि जशी नियति तशीच कार्यकारणभाव ही शबल ब्रह्माची नियति आहे. आतां—जन्य भावांना पौर्वापर्य अवश्य असतेंच; यास्तव ते सकारणच असले पाहिजेत-असें ज्यांना वाटतें त्यांच्या जाग्रत् व स्वप्नदृष्टि संभवत नाहींत. कारण त्यांच्या उत्पत्तीचें कांहीं कारणच नसतें. स्वप्न किंवा सुषुप्ति यानंतर जाग्रत् उत्पन्न व्हावयास कांहीं कारण नसतें. त्याचप्रमाणें जाग्रत् अथवा सुषुप्ति यांच्यानंतर स्वप्न येण्यास कांहीं कारण असत नाहीं. व्याधा, मी प्राण्याच्या शरीरांत शिरून जें दुःखावह स्वप्न पाहिलें त्याला तूं कोणतें कारण समजतोस? सारांश ब्रह्म व प्रपंच यांचें ऐक्य प्रतिपादन करणाऱ्या अशा दुसऱ्याही अनेक युक्ति बुद्धिमानाला आपोआप स्फुरतात. यास्तव शास्त्रानुसारी युक्तिभावनानुभवच कोणत्याही प्रकारचा निर्णय करण्यास समर्थ आहे. तोच सर्व प्रमाणाचें जीवित आहे १४४.

**सर्ग १४५**—कफादि दोषांमुळे होणारीं स्वप्नें व इंद्रियांच्या द्वारा बाह्यविभ्रम.

**मुनि**—व्याधा, हा जीव बाह्य इंद्रियांच्या योगानें बाह्य स्वप्नच पाहतो व अंतरिंद्रियांच्या योगानें आंतील स्वप्न पाहतो. बाहेरील व आंतील असा दोन्ही ठिकाणचा व्यापार सिद्ध होण्याकरितां ज्यांच्यामध्यें तीव्रवेग उत्पन्न झाला आहे, अशा द्विविध इंद्रियांनीं तो दोन्ही जाणतो. तो बाह्य इंद्रियांच्या योगानें जेव्हां बाह्य व्यापार करतो तेव्हां आंतर इंद्रियांचा व्यवहार मुळींच नसतो, असें नाहीं, तर मनोराज्यासारखा त्याचा मंद अनुभव येतो. स्वप्नाप्रमाणें स्पष्ट अनुभव येत नाहीं. जेव्हां इंद्रियें अंतर्मुखच असतात तेव्हां जीव आपल्या शरीरांत वासनामात्र असल्यामुळें अति सूक्ष्मही स्वाप्न जग स्थूलाप्रमाणें पाहतो. हाच त्याचा अनुभव होय.

तात्पर्य बाह्य किंवा आंतर जगत् वस्तुतः स्थूल किंवा सूक्ष्म नाहीं. तर जीवाच्या जगद्दर्शनास कारण होणाऱ्या इंद्रियाच्या स्थूलतेची कल्पना करण्यास समर्थ असलेली जी अप्रतिबद्ध दृष्टि तेंच स्थूल जगत् होय. एवढ्यासाठींच बाहेर किंवा आत जेथें इंद्रियाचा प्रसार होतो तेथेंच स्थूलासारखें जग दिसतें. पाच ज्ञानेंद्रियें, पाच कर्मेंद्रियें, पाच प्राण, अंतःकरणचतुष्टय, याचा सघातरूप (समूहरूप) जो आतिवाहिक देह तोच चिदाभासानें व्याप्त झाला असता चिद्रूप जीव होतो. तो आत स्ववासनामय जग पाहतो. 'पण बाहेर वासना नसल्यामुळें तो बाहेर वासनामय जग कसें पाहूं शकतो?' म्हणून विचारशील तर सागतों— कूटस्थ चित्‌च सदा सर्वत्र समष्टि—आकाशमय व सर्वेंद्रियमय होऊनही राहिली आहे. यास्तव त्या सर्व वासनाच्या अधिष्ठानामध्यें बाह्य जगाचा आरोप होऊं शकतो. जीवाला निरनिराळ्या प्रकारचें स्वप्न पडण्याचें कारण त्याच्या शरीरातील कफ—वात—पित्त इत्यादि दोषच आहेत. व्याधा, जेव्हां तुझा अतिसूक्ष्म जीव इंद्रियाचा उपसंहार करून नाड्यातील श्लेष्मारूप अन्नरसानें परिपूर्ण होतो, तेव्हा त्या अतिसूक्ष्म नाड्यात निरनिराळ्या स्थानीं निरनिराळे स्वप्न पाहतो. तो स्वतः क्षीरसागरात उडत असल्यासारखा होऊन आकाश चन्द्रोदययुक्त आहे, सरोवरें विविध कमलानीं भरलेलीं आहेत, इत्यादि पाहतो. वसंत ऋतूंत पुष्पानीं व्यापलेलीं उद्यानें अवलोकन करतो. उत्सव, मगलें व लीला यात निमग्न झालेल्या स्त्रिया त्याला दिसतात. गृहागणें भक्ष्य भोज्य अन्न पान इत्यादिकानी व्यापलेली दिसतात. नद्या वेगानें सागरास मिळावयास जात असलेल्या दृष्टीं पडतात. हिमालयाच्या शुभ्र शिखरासारख्या गच्च्यानीं युक्त असलेले व चन्द्रकिरणानीं व्यापलेले मोठमोठे प्रासाद दिसतात. साराश कफाधिक्य असता असले शुभ्र व आनंददायी पदार्थ आढळतात.

पण जीव जेव्हां पित्तात्मक अन्नरसानें व्याप्त होतो तेव्हां तो लाल ज्वालाची पक्ति पाहतो. त्याला वणवे लागलेले, आगी लागलेल्या दिसतात. कडक ऊन पडलें आहे, असें वाटतें. संताप होतो. क्रोधाचीं कार्यें होतात. साराश पित्ताधिक्य झालें असता उष्णाचा अनुभव येतो. जीव जेव्हां वातरसानें व्याप्त होतो तेव्हा अपूर्व पृथ्वी, अपूर्व नगर, ग्राम, पर्वत इत्यादि

पाहतो. मी उडत आहें, असें तो जाणतो. पाषाण, पर्वत, स्थळें, मेघ-गर्जना, जेथें कोलाहल होत आहेत असे प्रदेश, कुलालचक्रावांचूनच घटाचें भ्रमण, घोडा, उंट, गरुड, मेघ, हंस इत्यादिकावर मी बसून जात आहें, असें वाटणें, फार दूर दूर गमन करून परत स्वस्थानीं येणें, भय, कंप, अंध-कूपात अथवा अतिशय संकटांत पडलों आहें, असें पाहणें, मोठ्या वृक्षावर अथवा उंच टेकडीवर चढलों आहें, इत्यादि समजणें, अशा प्रकारचीं स्वप्नें वाताधिक्याचे वेळीं पडतात. कफ, वात, पित्त या तिन्ही दोषांनीं जेव्हां जीव व्याप्त होतो तेव्हां तो आपल्याला आर्त झालेलें पाहतो. पर्वत-वृष्टि होत आहे, शिळांचा वर्षाव होत आहे, इत्यादि अनेक प्रकार पाहतो. सारांश आतल्या आत निद्रेमुळें लीन झालेल्या इंद्रियवृत्ति वातुवैषम्यामुळें अशा अनेक भ्रांति पाहतात व जाग्रत्-समयीं बाहेर विकास पावणाऱ्या त्या बाहेरील भ्रांति पाहतात. ज्या पुरुषाचे वातादि धातु असम झालेले असतात ते स्वप्नात बाहेर असल्याप्रमाणेंच असल्या अनेक वस्तूंचा अनुभव घेतात. धातुवैषम्यामुळें बाहेरही अशींच विचित्र कार्यें घडतात. व्याधा, हें जग असेंच असत् उत्पन्न झालें आहे. पण तें दृढ वासनेमुळें सत् भासतें. स्वप्नादि भ्रमाप्रमाणेंच त्याचा अनुभवही चित्-तत्त्वांतच येतो. पण येणें-प्रमाणें तें अभिन्न असतानाही भिन्न असल्यासारखें होऊन राहिलें आहे. बाबारे, शांत व निष्प्रपंच ब्रह्मापासून सर्व जग उदय पावतें. पण शांत ब्रह्म अन्यथा कधीं होत नाहीं. कारण आहे आहे, असें दिसणारें हें सर्व उत्पन्न होत नाहीं. वास्तव आकाशतुल्य अनंत चितीच्या शरीरांत जग प्रतिभासमात्र आहे. अर्थात् दिसणारें हें सर्व अनंताकार आहे. दुसरें कांहीं नाहीं १४५.

**सर्ग १४६**—स्वप्नानंतर आपली सुषुप्ति व पुनः स्वप्नप्रसंगानें अद्वैत ब्रह्मवर्णन.

व्याध—त्या प्राण्याच्या हृद्गत ओजामध्यें स्थित असलेल्या आपलें पुढें काय झालें ?

मुनि—पुढें काय झालें, तें ऐक. व्याधा, माझा लिंगदेह त्या प्राण्याशीं मिश्रित होतांच तेथें तो तसाच घोर कल्पान्त भ्रम चालला असून त्यांतच अकस्मात् वृष्टि सुरू झाली आहे, असें मीं पाहिलें. त्या वृष्टीबरोबर मोठा पूर आला. तो वनें, ग्राम, शिखरें, नगरें, यांचा विध्वंस करूं लागला.

त्यामुळें मला फार दु:ख झालें व मी निश्चेष्ट बनलों. त्यामुळें कांहीं वेळ गाढ सुषुप्तीचा अनुभव घेऊन मी हळू हळू जागा होऊं लागलों; पण तत्काल मला पुनः स्वप्न दिसलें. मी चांगला जागा न झाल्यामुळें तेथें सहस्रावधि विक्षेप पाहिले. आईच्या उदरांतून जसा पुत्र जन्मास येतो त्याप्रमाणें सौषुप्त दृश्यापासून तो स्वाप्नप्रपंच उद्भवला. सुषुप्तींत दृश्यच नसतें, तेव्हां त्याच्यापासून स्वाप्न जग कसें होतें म्हणून विचारशील तर सांगतों--हे पदार्थ व जगही उत्पन्न होतें, भासतें, इत्यादि हें सर्व द्वैतानें उपतप्त झालेल्या जीवांचे प्रलाप आहेत; पण ते खरे नव्हेत. कल्पनात्मक आहेत. जात म्हणजे उत्पन्न झालेला हा शब्द सन्मात्राचाच पर्याय आहे. कारण जन् या धातूचा अर्थ प्रादुर्भाव असा आहे. पण प्रादुर्भाव या शब्दांत 'प्रादुस्' हें अव्यय प्रकट या अर्थी असून 'भाव' हाच मुख्य शब्द आहे. भाव हा भूधातूपासून झाला आहे, भू या धातूचा अर्थ पाणिनीनें 'सत्तायाम्' (सत्ता) असा दिला आहे. यास्तव जात म्हणजे प्रकट असलेला; अर्थात् जग झालें, असें म्हटल्यानेंही त्याचें गूढ सत्त्व प्रकट झालें, असें म्हटल्यासारखेंच होतें. आम्हीं जें गूढ असतें तें प्रकट होणें, याला अपूर्व जन्म अथवा प्रकट असलेलें गुप्त होतें, त्याला नाश म्हणत नाहीं. गूढ व प्रकट या वस्तूच्या दोन भिन्न अवस्था आहेत इतकेंच कायतें. तस्मात् सत् नित्यसिद्ध व शांत आहे. ब्रह्म सर्वसत्तात्मक आहे. जगही तसेंच सर्वसत्तात्मक आहे. तेव्हा अमुक एक वस्तु आहे व अमुक नाहीं, असे विधि व निषेध व्हावयास अवकाशच कोठें आहे ? तर मग अमुक एक आहे व अमुक नाहीं, हे लोकव्यवहार कसे होतात; म्हणून विचारशील तर सांगतों---माया या नांवाची जी एक अनिर्वचनीय शक्ति आहे तीच तो व्यवहार करविते. कारण अज्ञांचें स्वरूप मायाशबल असतें. यास्तव ती जशी जशी विकास पावते तसा तसा शब्दव्यवहार व त्याच्या अर्थाचा अनुभव येतो. तत्त्ववेत्ते सदा तुरीय पदामध्यें स्थित असतात. यास्तव त्याना जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या अवस्थाच भासत नाहींत. तस्मात् द्रष्टा, भोक्ता इत्यादि कांहीं नाहीं. हें सर्व आदि-अंतरहित ब्रह्म आहे १४६.

सर्ग १४७---स्वप्नाचा क्रम, पूर्व कुटुंबादिकाचें दर्शन व तत्त्व.

मुनि—त्यानंतर हे शूरा, सुषुप्तांतून निघालेल्या मला स्वाप्न जगत् दिसलें. तें सागरांतून निघाल्याप्रमाणें, आकाशांतून खोदून काढल्याप्रमाणें, पृथ्वीपासून कोरून काढल्याप्रमाणें, अथवा चित्तांतून व दृष्टींतून निघाल्याप्रमाणें मला दिसलें. तो सर्ग मला त्यावेळीं पूर्वीचाचसा वाटला. तो कोठूनसा उडूनच माझ्या पुढें येऊन राहिला आहे, असें भासलें. तें ब्रह्मवृक्षाचें जणुंकाय फूलच, निराधार चित्रच, अथवा गंधर्व नगरच होतें. त्यांत घरें, माणसें, वृक्ष, पशु, पक्षी इत्यादि सर्व होतें. मी जों पहात आहें तों मला तो पूर्वीचाच गाव दिसला. मला सर्व बंधु, व येथील इतर सर्व पदार्थही दिसले. तेंच घर, त्याच स्त्रिया, त्याच तेच व्यवहार व तेंच भाषण मीं ऐकलें. माझी भार्याही मला दिसली. मी तिला आलिंगन देऊन तसाच सुखी झालों. पुनः त्याच वासनेनें माझें आक्रमण केल्यामुळें मला आपल्या रूपाचें विस्मरण पडलें. कारण आरसा पुढें जें जें येईल त्याचें त्याचें जसे स्वभावतःच प्रतिबिंब घेतो त्याप्रमाणें चित्—आदर्शही जें जें पुढें भासतें त्याचें प्रतिबिंब घेतो. व्याधा, पण ज्याला सर्व चिन्मात्र आकाश आहे, असें ज्ञान होतें त्याला द्वैत भासत नाहीं व तोच केवल-रूप असतो. ज्याची शुद्ध बोधशालिनी स्मृति नष्ट होत नाहीं त्याला हें द्वैतपिशाच थोडासाही बाध करीत नाहीं. अभ्यासयोग, साधु व सच्छास्त्र याचा समागम याच्यायोगानें बोधबुद्धि उदय पावते. ती सदा ब्रह्मानुसंधान करीत असते. मी तत्त्वज्ञ होतों तरी त्यावेळीं माझी बुद्धि इतकी प्रौढ झाली नव्हती. म्हणून मला तसा मोह पडला. पण आता कोणताही दुर्वासनासमूह माझ्या बुद्धीस तसा व्याकुल करूं शकणार नाहीं. बा व्याधा, तुझी बुद्धि सुद्धां आजवर सत्संगरहित होती. म्हणून ती आताच शांतीस प्राप्त होत नाहीं. पण तप, शरीरवृद्धि, मरण, पुनर्जन्म, राज्य इत्यादि द्वैतबोधमय कष्टानें व साधनाभ्यासानें ज्ञान संपा-दन करून नंतर ती शांत होईल.

व्याध—महाराज, खरें आहे. कारण तुमच्या या असल्या परम-पावन बोधानेंही माझी बुद्धि निर्मल होऊन सत्पदीं विश्रांति पावत नाहीं. असेंच असेल का? कीं नसेल? हें संदेहजाल अजून शांत होत नाहीं. स्वानुभवानें सिद्ध होणाऱ्या गोष्टीविषयींही विश्वास वाटत नाहीं. खरोखर

दीर्घ अभ्यासानें दृढ झालेली ही अविद्या अति दुरंत आहे. ती सदा असत्यासारखी वाटते. अशात असते. कांहीं केल्या शांत होत नाहीं. भगवन्, माझा आतां असा निश्चय झाला आहे कीं, ही भ्रांति सत्संग, पदपदार्थविचार, व सच्छास्त्र याच्या पुष्कळ अभ्यासानेंच शांत होईल. दुसऱ्या कोणत्याही उपायानें शांत होणार नाहीं १४७.

**सर्ग १४८**—स्वप्नाच्या सत्यत्वासत्यत्वाचा हेतु तिन्ही अवस्थांचे ऐक्य. चित्—सार्वात्म्य, ऐक्य व शुद्धि—यांनीं युक्त आहे.

व्याध—पण भगवन्, आपल्या या सांगण्याप्रमाणें वासनानुसारी चिद्वेदनच जर स्वप्न व जागर आहे तर कांहीं स्वप्नांचें फल साक्षात् मिळतें व कांहींचें मिळत नाहीं, तें कां? तसेंच जाग्रतींतही हिरण्यगर्भाचा संकल्पमात्र सत्य असतो व आमचा नसतो त्याचें कारण काय?

मुनि—व्याधा, जी स्वप्न—संवित् ईश्वरसांनिध्यादि देश, पहाटेचा काल, तपो-व्रतादि क्रिया इत्यादि निमित्तवशात् उदय पावलेली असते तिचें फल उत्तरकालीं तसेंच येतें. म्हणून तिला सत्य म्हणतात. मणि-मंत्र औषध इत्यादि उपायांनीं उत्पन्न होणारी संवित् अयोग्य पुरुषाचे ठिकाणीं असत्य ठरत असली तरी योग्य पुरुषाचे ठिकाणीं सत्य ठरते. यास्तव तिलाही सत्य हें नाव प्राप्त होतें. परंतु या दोन्ही ठिकाणीं काकतालीय न्यायाचाच आश्रय करणें उचित होय. कारण त्या स्वप्न—संवित्-च्या सत्यत्वाचें दुसरें कांहीं दृष्ट निमित्त दिसत नाहीं. हिरण्यगर्भादिकाची संवित् प्राक्तन उपासनापरिपाकामुळें सत्यसंकल्परूप झालेली असते. यास्तव ती जो जो संकल्प करते त्या त्याप्रमाणें होतें. शिवाय त्याचा तो संकल्प पूर्व उपासनाबलानें अतिशय सामर्थ्यवान् झालेला असल्यामुळें त्याच्या विरुद्ध संकल्प करण्यास दुसरा कोणी सिद्ध समर्थ होत नाहीं. तस्मात् संवित्चें स्वातंत्र्य अप्रतिहत आहे. त्याला कोणी प्रतिबंध करूं शकत नाहीं. अर्थात् कोणताही पदार्थ केव्हांही आंत किंवा बाहेर नसतो. तर एक संवित्च जगद्रूपानें स्थित होते. शास्त्रादि प्रमाणावरून होणाऱ्या निश्चयानें स्वप्न जसें खरें होतें त्याप्रमाणेंच जग खरें होतें; पण शास्त्रादि प्रमाणाविषयीं संशय असल्यास त्याविषयींही संशय येतो. त्याचप्रमाणें जाग्रतींतील विषयांची संविद-ही आकस्मिकच

होते. कारण त्याही ( विषयसंविद्ही ) भिन्न देश व काल यामध्यें विपरीत होत असल्याचा अनुभव येतो. पण चित् आपला स्वभाव कधींही सोडीत नाहीं. म्हणून तीच सत्य आहे. तीच असत्य व सप्रतिबंध जगाचा वेष घेते. तस्मात् चिन्मात्रच सत्य व नियत आहे. बाकीचें सर्व असत्य व अनियत आहे. यास्तव सदा सद्ब्रह्माची भावना करावी. विचारदृष्ट्या पाहिल्यास स्वप्नही संविदंशीं सत्य व पदार्थांशीं असत्य आहे. जगत् ही संवित्चीच भ्रांति आहे. यास्तव त्यातही विचारानें संविदंश सत्य व पदार्थांश असत्य, असा निश्चय करावा. चितिच चित्त होऊन जगद्रूपानें दीर्घकाल चमकते. जाग्रत् स्वप्न व सुषुप्त या तीन अवस्था घट्ट थिजलेल्या किंचित् पातळ व अगदीं पातळ तुपाप्रमाणें एका द्रव्याच्याच तीन दशा आहेत. अविद्यावृत चिन्मात्ररूप सुषुप्तिच सदा आहे. स्वप्न व जाग्रत् हे तिचेच दोन किंचित् घन व फार घन आकार आहेत. सर्व नावें व आकार हे तिचेच प्रकार आहेत. स्वप्नादिकाच्या फलांची नियति व अनियतिही त्या अविद्यावृत चिन्मात्राहून पृथक् नाहीं. अज्ञानावृतचित् अनियंत्रित असणें हेंच स्वप्न व जागृति; श्रमादि निमित्तानीं ती नियंत्रित होणें हीच निद्रा व पुरुषाच्या प्रयत्नानें तिनें नियंत्रित होणें, ही समाधि होय. शेवटीं अज्ञानाचा नाश झाला असता तीच मुक्ति होते. अर्थात् जाग्रत्-चा निरोध होऊन मनोव्यापारमात्र स्वप्नांत जोंवर भान होत असतें तोंवर तीच चित्ची बाह्यप्रवृतिनियंत्रणा एक प्रकारचा शोक होय. निद्रा हाही अशाच भानप्रतिबंधामुळें शोक आहे. यास्तव शोकरहित समाधीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें विश्रांति--सुखाकरितां नियमानें संवित्चे नियमनच करावें. विषयाकार होऊन स्फुरण पावणें, हा संवित्चा स्वभाव नसल्यामुळें तिचा निरोध होणें शक्य आहे. विषयानुभव हें अज्ञात व अनिरुद्ध संवित्चे स्फुरण आहे. यास्तव सर्व चिन्मात्र आहे. नाम व रूप यांनीं युक्त असलेलें जग निष्कारण, केवल चित्तात्मक, म्हणूनच आत्मभिन्न व त्यामुळेंच निस्तत्त्व आहे. शुद्ध संवेदन हेंच या जगातील स्थिर तत्त्व आहे. यास्तव तन्मय, तत्परायण होऊन राहावें १४८.

सर्ग १४९—स्वप्नामध्येंच घरीं आलेल्या मनीच्या तोंडून ऐकलेलें अनेकाश्चर्य।

व्याध—हे मुने, त्यानंतर आपल्या जगांतील वृत्तान्त काय झाला, तो सांगा.

मुनि—बा साधो, त्यानंतर त्या प्राण्याच्या हृदयगत ओजामध्यें कोणता अपूर्व वृत्तान्त घडला तो ऐक– आत्मचमत्कार विसरून तेथें राहिलेल्या मला इकडचें स्मरणही झालें नाहीं. सुदर भार्येच्या सहवासानें ज्याची मति रंजित झाली आहे, अशीं माझीं सोळा वर्षें तेथें गेलीं. म्यां मूर्खानें त्यावेळीं तेथ गृहस्थाश्रमाचा सर्व आचार केला. एकदां माझ्या येथें एक उग्रतपस्वी आला तो महामान्य मुनि व महाबोधवान् होता. माझ्या येथें अतिथिरूपानें आलेल्या त्याची मी उचित पूजा केली. मोठा सत्कार केला. त्यामुळें अतिशय प्रसन्न झालेल्या त्यानें माझ्या येथें भोजन केलें व कांहीं वेळ विश्रांति घेतली. तेव्हा लोकांच्या समान सुखदुःखप्राप्तीविषयीं बराच विचार करून मीं त्याला म्हटलें, 'भगवन्, आपण महाज्ञानी आहा. जगाची सर्व गति जाणता. आपण क्रोधाचें मुखावलोकनही करीत नाहीं. विषयसुखलवामध्यें आसक्त होत नाहीं. फळाची इच्छा करणाऱ्या लोकांना शरत्समयीं जसें फल प्राप्त होतें त्याप्रमाणें कर्मशाली पुरुषांच्या शुभाशुभ कर्मांच्या योगानें सुखें व दुःखें प्राप्त होतात, असा नियम आहे. पण सर्व देशाला दुःख देणारे दुर्भिक्ष–रोग इत्यादि दोष एकाच वेळीं असंख्य प्राण्यांना जें दुःख देत असतात त्याचें निमित्त काय? त्यावेळीं सर्व प्राण्याचें समान अशुभ कर्म फळद्रूप होतें कीं काय? पण सर्व जीवांनीं समान दुष्कर्म केलेलें असेल, असें वाटत नाहीं. कारण तसा अनुभव येत नाहीं.'

व्याधा, हें माझें प्रश्नवचन ऐकून तो महात्मा विस्मित होऊन किंचित् हंसतसा मला म्हणाला,–" बा साधो, सर्व संशयाचें बीज अज्ञान आहे. यास्तव त्याचें निरसन केल्याशिवाय मला तुझें समाधान करतां येणार नाहीं. कारितां मला अगोदर आत्मतत्त्व व दृश्यमिथ्यात्व सिद्ध केलें पाहिजे. म्हणून बा सज्जना, अंतःकरण चित् व अचित् यांच्या विवेकानें युक्त झालें असता या दृश्याचें जें सत् किंवा असत् कारण तुला माहीत असेल तें मला सांग." पण या त्याच्या प्रश्नाचें उत्तर मी दिलें नाहीं. तेव्हां मी कांहीं बोलत नाहींसें पाहून तो पुनः मला म्हणाला,–" बा साधो, तूं

कोण आहेस, कोठें स्थित आहेस, काय करीत आहेस, याचा विचार कर. पूर्व सर्व वृत्तान्तासह त्याच्या साक्षी आत्म्याला आठव. मी कोठें आहें, हे दृश्य काय आहे? यात सार काय आहे? याचा विचार कर. हें स्वप्नमात्र आहे, हे तुला कसें कळत नाहीं. मी तुला स्वप्नांत दिसलेला पुरुष आहें. हें वस्तुतः अनाकार, अनाख्येय, अनादि, व कल्पनाही न करिता येण्यासारखें जग चिन्मात्राकाचेचें चमकणें आहे. अकृत्रिम चिन्मात्ररूपच वेदनानुसार आपल्या ठिकाणीं आरोपिलेल्या जगाच्या सत्त्वादिकांचा निर्वाह करतें. अर्थात् सर्व वस्तूंचें सकारणत्व अथवा अकारणत्व त्याच्या कल्पनप्रमाणें व्यवस्थित होतें. चित् ज्याला सकारण समजते तें सकारण व ती ज्याला अकारण म्हणते तें अकारण. आमची समष्टि–व्यष्टिकल्पनाही आमच्या चित्–च्या अधीन आहे. ज्या प्राण्याच्या हृदयगत ओजामध्यें आम्ही स्थित आहों, तो आमचा विराडात्मा. तो आमच्या चित्कल्पनेमुळेंच विराड्भावास प्राप्त झाला आहे. पण तो आपल्या कल्पनेनें आमच्या प्रमाणें व्यष्टिच आहे. या प्राण्याप्रमाणें अन्य प्राणीही अन्य प्रजाचा विराडात्मा होणें संभवनीय आहे. त्या त्या देहात तोच सुखदुःखादिकाच्या भोक्तृत्वानें त्याचें कारण आहे, दुसरा कोणी नव्हे. अर्थात् अशा समष्टि जीवाच्या उदरात राहणाऱ्या असंख्य जीवास एकाच वेळीं जें एकच दुःख भोगावें लागतें त्याचें कारण, त्या समष्टि जीवाच्या शरीरांतील कफ-वात–पित्तादि धातूंचें वैषम्य होणें, हेंच आहे. विराडात्म्याची जी सत्ता तीच त्याच्या अंगगत सर्गाची सत्ता असल्यामुळें दुर्भिक्ष, अवग्रह प्रलय इत्यादि दुःखनिमित्तें त्याच्याबरोबर सर्वांना भोगावीं लागतात व त्याची शांतिही एकाच वेळीं होते. ज्या प्राण्याना एकच दुःख भोगावें लागतें त्याचेंही एकाच प्रकारचें दुष्कृत एकाच वेळीं परिपक्व व्हावें लागतें. त्याचीही कल्पना चित्-नेंच केलेली असते. म्हणूनच तें फलभाक् होतें. जी जी थोडी किंवा फार कल्पना जेथें जशी उत्पन्न झाली असेल ती तेथें तशीच ( म्हणजे सहेतुक कल्पना सहेतुक होऊन निर्हेतुक कल्पना निर्हेतुक होऊन ) राहते. पण नुसत्या कल्पनेनें खरोखरीच कांहीं पदार्थ सहेतुक किंवा निर्हेतुक होत नाहीं. कारण स्वप्नातील पदार्थ सहेतुक आहे अशी आपण कितीही जरी कल्पना केली तरी तो खरोख-

रीच तसा होऊं शकत नाहीं. हें जाग्रत् जगही निर्हेतुक आहे. यास्तव त परमार्थतः परब्रह्मच आहे. हा सत्—असत्—रूप स्वप्नप्रपंच सकारण किंवा निष्कारण आहे, असें कितीही जरी कल्पनेनें मानलें तरी तो मिथ्या आहे. तोच न्याय जाग्रत्‌ला लागू करितां येतो. कारण स्वप्नाप्रमाणेंच जाग्रत्-चा उपलंभ होतो. त्यातील सकारणत्व-अकारणत्व-प्रसिद्धिही स्वप्नाप्रमाणेंच कल्पनामात्र आहे. स्वप्नात कार्यकारणमय क्रमाने उदय पावलेले जें स्वाभाविक चिद्वान तें चिन्मात्र आहे, हा निर्णय जाग्रत्संज्ञक स्थूल प्रपंचालाही लागू आहे. यास्तव ब्रह्मवेत्ते सर्व शांत परब्रह्मच आहे, असें जाणतात. शिवाय ज्याचें कारण सत्य आहे, असे ते भाव कोणते ? कोणत्या स्वभावाच्या पदार्थांचें कारण सत्य आहे, असें तूं समजतोस ? सत्य स्वभाववान् पदार्थांचे कारण सत्य जाणतोस कीं असत्यस्वभाववान् पदार्थाचें ? तसेंच सजातीयाचें कारण सत्य समजतोस कीं विजातीयाचे ? पहिले दोन पक्ष मानल्यास ( सत्य स्वभाववान् व सजातीय पदार्थांचें कारण सत्य आहे, असे म्हटल्यास ) ब्रह्मापासून ब्रह्मच उत्पन्न होईल. असत् स्वभाव व विजातीय जग होणार नाहीं व दुसरे ( मिथ्या व विजातीय पदार्थांचें कारण सत्य आहे हे ) दोन पक्ष घेतल्यास ब्रह्मापासून होणाऱ्या जगाची सत्यता सिद्ध होणार नाहीं. शिवाय या सर्व पक्षांविषयीं मी तुला असं विचारतों कीं आकाशाचें कारण काय ? ब्रह्म म्हटलें तर ते ब्रह्माहून भिन्न आहे, असें ठरणार नाहीं कारण, कारणच कार्य होत असतें. पण दुसरें काहीं म्हटलें तर तें सत्य ठरत नाहीं. पृथ्वीप्रभृति इतर भूतांविषयींही असेंच जाणावें. कारण सर्व पदार्थ वेदनामात्र आहेत. तिच्या अभावीं कशाचीही सिद्धि होत नाहीं. अर्थात् ही सर्व भ्रांति निष्कारण उद्भवली आहे चिरकाल अनुभव घेतल्यामुळें तीच सत्य होऊन बसली आहे. हिरण्यगर्भरूप सर्गालाच मागून ही पृथ्वी, हें जल, इत्यादि नावें कल्पिलीं आहेत. म्हणून मनोराज्याप्रमाणें प्रथम सूक्ष्म सर्ग चिदाकाशात भासतात. नंतर चिरकाल अभ्यासानें स्थूल झालेले तेच देह, कर्म, कारण इत्यादिकांची कल्पना करितात. प्रथम जी कल्पना केलेली असते ती तशीच नियति होऊन राहते. ही गोष्ट स्वानुभवानेंच सिद्ध आहे. कारण आम्ही संकल्पानें बनविलेले पदार्थच, संकल्प दृढ झाल्यास

नियति होऊन बसतात. आद्य-कल्पनेचा अन्यथाभाव मोठ-मोठ्यानाही फार कष्टानेंच करावा लागतो. सर्ग करावयास सज्ज झालेल्या हिरण्यगर्भाच्या चित्-नें जी जी कल्पना केली ती ती अद्यापि तशीच आहे. दुधाचें दहीं करावयाचें झाल्यास विरजण, काल, ऊष्मा इत्यादि कारण त्यानेंच ठरवून ठेवलें होतें. म्हणून आम्हाला आता दुधात विरजण घालून दहीं करिता येतें. पण वायूला पातळ किंवा घन ( घट्ट ) करण्याचें कारण त्यानें काहींच ठरविलेलें नाहीं. म्हणून आम्हांला मातीप्रमाणें वायूचा गोळा, किंवा घृताप्रमाणें त्याचा अग्निसंयोगानें द्रव करता येत नाहीं. असो; चित्‌चा अचित्-प्रतिभास हें तिचें कार्य नव्हे, तर विषय आहे. तो पहिला विषय असल्यामुळेंच शेवटपर्यंत असाच राहील. सारांश बा साधो, काहीं जीव एकत्र मिळूनही एकादे शुभाशुभ कर्म करितात, व त्याचें फळही मिळून एकाच वेळीं घेतात. ज्याप्रमाणें पर्वतशिखरावरील शिला त्यावेळीं प्रत्यक्ष काहीं पाप करीत नसतानाही पूर्व दुष्कृतामुळें अशनिपाताचें दुःख अनुभविते, त्याप्रमाणें काहीं जीवन्मुक्तही कर्तृत्वाभिमानशून्य असल्यामुळे वस्तुतः अकर्ते असले तरी प्रत्यक्ष कारणावाचून दुःख भोगतात १४९.

**सर्ग १५०**—या मुनीच्या वाक्यानें बोध, त्याचा सहवास, पूर्व देहांत जाण्याचें असामर्थ्य.

**मुनि**—अशा युक्तीनें त्या मुनीनें मला बोध केला असता मी तत्काळ तत्त्ववेत्ता झालों. मी त्या महात्म्याला पुष्कळ प्रार्थना करून आपल्या येथे ठेवून घेतलें. विचारशून्यत्वामुळें पूर्वी मृतप्राय असलेल्याही माझ्या येथें तो महात्मा राहिला. ज्यानें मला असा उपदेश केला तो मुनि यावेळीं तुझ्या जवळच बसला आहे, तो पहा. ज्यानें शरीरधारण केलें आहे अशा माझ्या सुकर्मामुळें प्रसन्न झालेल्या यज्ञानेंच मला तो सुबोध केला; तो यज्ञरूपी भगवान् अग्नि तुझ्या समोरच आहे.

**श्रीवसिष्ठ**—रामा, पण त्या मुनीचें तें वचन ऐकून ‘ तो मुनि मला प्रत्यक्ष कसा दिसणार ?’ असें मनात म्हणून व खिन्न होऊन व्याध पुनः म्हणाला,—“ पण भगवन्, तो स्वप्नातील मुनि जागरांत मला प्रत्यक्ष कसा दाखविता ? तो साक्षात् दिसेल कसा ? आपण हें मला मोठें

आश्चर्यच सांगून जणु काय अधिकच विस्मयांत पाडलें आहे." तें ऐकून मुनि पुनः असें बोलला—

मुनि—अशी त्वरा करूं नकोस. मी तुला सर्व सांगतों. त्यानें असा बोध केला व मी ज्ञानी झालों. मी त्याच्या सांगण्याप्रमाणें आपल्या पूर्व वृत्तान्ताचें स्मरण केलें. मी असा असा अमुक मुनि होतों, असें स्मरण होताच, मला मोठा आनंद झाला. पण 'मी केवळ भोगविषयींच्या आस्थेनें या अवस्थेस प्राप्त झालों आहें; अरेरे, मी एवढा ज्ञानी असतानाही मोहानें मला कसें ठकविलें आहे, तें पहा. मी आता काय करूं? कशाचा उच्छेद करूं? जगाची भ्रांति तर विद्येमुळेंच उच्छिन्न झाली आहे. हा उपदेष्टा मुनिही ब्रह्मरूप आहे. यास्तव मी आता याला असें म्हणतों, असा संकेत करून मी त्यास बोललों—मुनिवर्य, मी आता आपलें तें आश्रमस्थ शरीर व हें या प्राण्याचें शरीर पहावयासाठीं बाहेर जातों.

पण माझें हें भाषण ऐकून तो हंसून म्हणतो—अरे बाबा, ते देह जळून गेल्यामुळें आता फार दूर राहिले आहेत. तुला पाहिजे तर तूं स्वतः जाऊन पहा. तें ऐकून व 'बरें तर, मी प्राक्तन देहाला पाहून येईतों तुम्ही येथेंच रहा,' असें सांगून मी त्या प्राण्याच्या वायूशीं आपलें तादात्म्य केलें व त्याच्या हृदयकाशात वायूबरोबरच पुष्कळ भ्रमण केलें. पण त्या पुरुषाच्या शरीरातून बाहेर पडण्याचें द्वार न सापडल्यामुळें मी फार दुःखी झालों. नंतर मी याच आपल्या बंधनस्थानासारख्या गृहात परत आलों, तों मला पुढें असलेल्या या स्वगुरूचें दर्शन झालें. तेव्हा मी त्यालाच एकाग्र मनानें म्हटलें, "भगवन्, हें काय आहे? आपण तत्त्वज्ञ व त्रिकालज्ञानी आहा, म्हणून विचारतों. कृपा करून मला खरें काय असेल तें सांगा. मी ज्याच्या देहात प्रवेश केला होता तो प्राणी व माझा देह कोठें गेले? मला ते का सापडले नाहींत. मी या विस्तृत मंडलात स्थावरापासून आत्म्यापर्यंत हिंडलों; पण ते कोठेंच कसे दिसले नाहींत?"

त्यावर तो दयावान् मला म्हणाला, "बाबारे एकाग्र दृष्टीनें पहा, म्हणजे तुला सर्व कळेल. पण माझ्या तोंडून तें ऐकण्याचीच जर तुझी इच्छा असेल व नेत्रांनीं साक्षात् पाहण्याची इच्छा नसेल तर मी सांगतों ऐक. तूं जो आपल्याला एका शरीराचा अभिमानी म्हणून समजून

राहिला आहेस तो तसा नव्हेस. तूं सर्व जीवसमष्टिरूप हिरण्यगर्भ आहेस. तो तूं एकदां तप करीत होतास. तों इतक्यात तुला व्यष्टिजीवभावरूप स्वप्न पाहण्याची इच्छा झाली व त्या दृढ वासनेनें प्रेरणा केल्यामुळेंच तू दुसऱ्या एकाच्या शरीरात प्रवेश केलास व तेथेंच तुला हें अति विस्तृत जग दिसलें. तें पाहण्यातच तूं इकडे व्यग्र असताना सर्वभक्षक वनातील अग्नीनें आपल्या भयंकर ज्वालानीं त्रिभुवनाला सतप्त करीतच तुझ्या आश्रमाला जाळून सोडलें. त्यात तुझा, तुझ्या शिष्याचे व तूं ज्याच्या देहात प्रवेश केला होतास त्याचा असे सर्व देह जळले १५०.

**सर्ग १५१**—अग्नीची शाति, वायूनें भस्माचें उडून जाणें, स्वप्नात जागरित स्थिति.

**अन्यमुनि**—बा साधो, त्या वणव्यात केवळ तुझा आश्रमच नव्हे तर नगरादि दुसरेंही सर्व जळून गेलें. फार काय पण त्या वनातील शिलाचाही चुना झाला. तेव्हा निजलेलीं तीं तुझीं शरीरेंच कशीं राहतील ? असो; याप्रमाणें सर्व साकार वस्तूस जाळून अग्नि हळु हळु शात होत गेला. शेवटीं तर त्याचा सर्वथा अस्त झाला. तेव्हा वायूनें तथ पडलेली सर्व राख उडवून नेली. त्यामुळें तुला तो आश्रम व ते देह सापडले नाहींत. कारण जागृत झालेल्या पुरुषाला स्वप्नातील नगर कसें दिसणार ? याप्रमाणें तुझीं तीं दोन्ही शरीरें अभावरूप झालीं असता निजलेल्या तुझी सवित् मात्र विकास पावत राहली आहे. तेव्हा कोठला तूं व कोठला तो विराड्, कीं ज्याच्या शरीरातून तूं बाहेर पडून जाणार ! बा मुने, तूं या अनत स्वप्नसदृश संसार-जाग्रतींत आहेस. (साराश स्वप्न व जागर यात काहीं भेद नाहीं असें जें पूर्वी सागितलें होतें, त्याचेंच हें उत्तम निदर्शन होय.) बा ब्राह्मणा, तुझें स्वप्नच जाग्रद्भावास प्राप्त झालें आहे. आम्ही सर्व तुझे स्वप्नपुरुष आहों. तूं आमचा स्वप्नपुरुष आहेस. पण हा चिदाकाश आत्मा तिन्ही अवस्थेंत अद्वय स्वस्वभावात स्थित आहे. याप्रमाणें तूं प्रथम स्वप्नपुरुष असूनही तेव्हांपासून जाग्रत्-पुरुष होऊन गृहस्थाश्रमात स्थित आहेस. असो; मी हें सर्व तुला सागितलें आहे. याविषयीं जर काहीं संशय असेल तर तूं स्वतःच ध्यानानें सर्व पहा. बा साधो, संविदात्माच आपल्या संकल्पात्मक शुभाशुभ कर्माप्रमाणें हे सर्व विकास पावतो. १५१.

**सर्ग १५२—मुनीच्या स्वप्नार्थाची सत्यता बाधित करून अन्यमुनि व्याधगुरुत्वाचें कारण सांगण्यास आरंभ करतो.**

**मुनि**—व्याधा, याप्रमाणें मला सांगून तो अन्य मुनि रात्रीं आपल्या शयनावर निजला. मीही विस्मयानें चकित होऊन राहिलों. कांहीं वेळानें मी त्या उत्तम मुनीला म्हटलें, "विभो, तर मग काय हें सर्व स्वप्न खरें आहे ?"

**अन्यमुनि**—अरे बाबा, जागर जर खरा असता तर त्याच्या अपक्षेनें हें स्वप्न खोटें किंवा खरें झालें असतें. पण जागरही जर खरा नाहीं तर हें स्वप्न कसें खरें होणार ? अर्थात जाग्रत्–दृश्य जसें मिथ्या तसेंच हेंही मिथ्या होय. आता जसा हा दिसत आहे, तशा प्रकारच्या स्वप्नप्रपंचाहून निराळा असणारा जो जाग्रत्प्रपंच तो शुद्ध चैतन्यात्मक आहे म्हणजे याच्या इतकीही सत्ता त्याला नाहीं. हे व्याधाच्या महागुरो, याविषयीं मी उपपत्ति सांगतों ती ऐक—आज जाग्रतींत जें तूं पाहिलें होतेंस त्याच्या संस्कारामुळें हें स्वप्न झालें. यास्तव स्वप्नाची कांहीं तरी ( संस्कारात्मक ) सामग्री असते व त्यामुळेंच तें खरें आहे, असें म्हणण्यास कांहीं तरी निमित्त असतें. पण सृष्टीच्या आरंभीं जो सर्गस्वप्न-प्रतिभास होतो त्याला पूर्व संस्कारादि कांहीं कारण नसतें; कारण पूर्वकल्प संपून प्रलय झाल्यावर मध्यें पुष्कळ काल लोटतो, व त्यामुळें पूर्वीचे सर्व संस्कार विच्छिन्न होतात. यास्तव सर्गस्वप्नाला या आमच्या स्वप्नाइतकेंही स्थैर्य अथवा सकारणत्व नाहीं. तेव्हां 'विभो, स्वप्न खरें आहे,' असें म्हणून तूं आपला संदेह प्रकट कशाला करतोस ? जाग्रत्प्रपंच अधिक मिथ्या आहे. माझ्या उपदेशानेंच तुला या गृहाचा स्पष्ट अनुभव आलेला असतांनाही पुनः तूं स्वप्नध्यानानें त्याचा अनुभव घ्यावयास कसा सिद्ध झालास ? कोणाही स्वप्नद्रष्ट्याला कोणतेंही स्वप्न, स्वप्नसमयीं मिथ्या भासत नसतें. शिवाय तुझ्या अनुभवाच्या बलानें जग सत्च आहे. मग तूं त्याच्या असत्त्वाची कल्पना का करतोस ?

**मुनि**—व्याधा, पण तो अन्यमुनि असें सांगत आहे तोंच मी मध्येंच त्यास म्हटलें,—"भगवन, आपण मला व्याधगुरु म्हणून म्हटलेंत तें कां ?"

अन्यमुनि—मी हें आणखी एक आख्यान सांगतों तें ऐक. तूं व्याधगुरु होईस तों मी येथेंच आहें. हे मुनिनायका, हें माझें वचन ऐकून तूंही या आपल्या गृहांतच रममाण होशील व मलाही सोडणार नाहींस. पूजेनें तूं मला प्रसन्न करून ठेवशील. मी तुम्हांसह राहीन. बा साधो, कांहीं वर्षांनीं दुर्भिक्षानें तुझ्या सर्व आप्तांचा नाश होईल. दुष्ट राजाच्या परस्पर कलहामध्यें या ग्रामांतील लोकांचा नाश होईल. त्यानंतर आम्ही दोघे दुःखाला विसरून व एकमेकाचें दीर्घकाल समाधान करून तत्त्वज्ञानामुळें शांत होत्साते सर्वार्थांविषयीं निःस्पृह व समान आचारवान् होऊन एका शून्य वनांतील वृक्षांच्या समूहांत राहूं. कांहीं दिवसांनीं तेथें उत्तम उत्तम वृक्ष व लता निर्माण होऊन तें अरण्य नंदनवनासारखें शोभूं लागेल १५२.

**सर्ग १५३**—व्याधाचें आगमन, त्याचें गुरुत्व सर्वैकात्म्य.

**अन्यमुनि**—आम्ही तेथें त्या सुंदर वनात राहून तप करीत असतांना एके दिवशीं एक मृगया करून श्रांत झालेला व्याध आमच्या आश्रमांत येईल. त्याला स्वाभाविक पुण्यमय कथांनीं तूं बोध करशील. तूं स्वप्नसंज्ञक प्रसंगानें अखंडित ज्ञान सागशील व त्यामुळें तो योग्य होईल. याप्रमाणें तूं व्याधगुरु होशील. म्हणून मी तुला 'व्याधगुरो' असें म्हणून संबोधिलें. असो; येणेंप्रमाणें मी तुला सर्व सांगितलें आहे.

मुनि—त्यानें असें सांगितलें असता मी विस्मित झालो व त्या चिंतनांतच माझी ती रात्र गेली. दुसऱ्या दिवशीं मी त्याची पूजा केली. तिच्या योगानें प्रसन्न झालेला तो माझ्या येथेंच राहिला. त्यानतर आम्ही दोघेही त्या वनस्थ गृहात व त्या प्राचीन ग्रामगृहात प्रेम ठेवून राहूं लागलों. काळ ऋतु, वर्ष, इत्यादि रूपानें भराभर जाऊं लागला. इष्ट, अनिष्ट व मिश्र भावांचें ग्रहण व त्याग करीत मीं राहिलों. मी मरण, जीवित इत्यादिकांस सम समजून यथाप्राप्त स्थितींत आनंद मानूं लागलों. एकदां मी असा विचार केला कीं, हें दृश्यमंडळ काय आहे ? याचें कारण काय असावें ? हा जीव चित्तानें कशाला जाणत आहे ? हा पदार्थसमूह काय आहे ? याचें कारण काय आहे ? पुष्कळ विचार केल्यावर हें सर्व चिदेकघन आत्मस्वभावांत स्थित असल्यामुळें आत्मा आहे, चिदाकाश

आहे, असें मला ज्ञान झालें. चारी दिशेंत पसरलेलें चिचंद्राचें चांदणें हाच जगाचा अवभास आहे. चिदाकाशांत स्थूलता नसल्यामुळें हें सर्व प्रतीघातास अयोग्य आहे. कारण वस्तुतः हे पर्वतादिक सर्व पदार्थ चिन्मात्राचे तरंग आहेत. त्यामुळेंच त्यांना काहीं कारणच नाहीं. ही सर्व भ्रांति आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण भ्रातीचें तरी काहीं कारण असतेंच. तें येथें नाहीं. शिवाय सृष्टि ही भ्रांति आहे, असें म्हटल्यास तिचा द्रष्टा, मंता इत्यादि कोण ? संवित्‌मात्र असा मी, ज्याच्या देहांत प्रविष्ट होऊन हृदयगत ओजामध्यें राहिलों होतों तो प्राणी माझ्या देहासह भस्मरूप झाला. अर्थात् त्याचा देह, माझा देह, इत्यादि सर्व असत् असल्यामुळें सर्व चिदाभासमात्र आकाश आहे. हा चित्सागराचा फेंस आहे. सर्व सत्तास्वरूप आद्यन्तशून्य ब्रह्म आहे. त्यामुळें सर्व चेतनच होय; जड काहीं नाहीं. १५३.

सर्ग १५४—मुनींची विचारजन्य जीवन्मुक्त स्थिति. पण अभ्यासशून्य व्याधाची अनवस्थिति.

**मुनि**—असा निर्णय करून मी या दृश्यांत संतापशून्य, निःस्नेह, निःसंदेह, शांत, निरहंकार, निराधार, निर्मान, इत्यादि होऊन राहिलों, जें प्राप्त होईल तें करावें व जें अप्राप्त असेल त्याचा विचारही करूं नये, अशा निश्चयानें मी राहूं लागलों. कारण जो स्वतः आकाश त्याला कर्तृत्व कोठचें ? स्वर्ग, भू, आकाश, पर्वत, नद्या, दिशा इत्यादि सर्व आत्माकाश आहे. मी आतां शांत होतों. सर्व संकल्प सोडून केवळ सुखानें राहतों. मला विधि–निषेध नाहींत. मला काहीं बाह्य नाहीं व काहीं आंतर नाहीं. असो; हे व्याधा, मी अशा रीतीनें येथें रहात असता अकस्मात् आज हा तूं येथें आला आहेस. असो; येणेंप्रमाणें स्वप्न कसें होतें, आम्ही कोण, तूं कोण ? हें दृश्य काय आहे, इत्यादि सर्व मी तुला सांगितलें आहे. आतां हें सर्व तत्त्वतः जाणून तूं शांत हो. स्वतः चित्‌च हें सर्व भासत आहे.

**व्याध**—तर मग भगवन्, मी, तुम्ही, व हे सर्व देवादि परस्पर स्वप्नपुरुष आहेत, असें झालें !

मुनि—होय. हें सर्व परस्परांच्या स्वप्नाप्रमाणें स्थित आहे. तें अन्योन्य आत्म्यामध्यें सत् व इतरत्र असत् आहे. आतां तुला चांगला बोध झाला आहे. तूं स्वतः सुज्ञ आहेस, यास्तव आतां तुला वाटेल तसें कर. पण बा व्याधा, मी तुला असा बोध जरी केला आहे तरी तुझी मति अद्यापि परम पदीं स्थिर झालेली नाहीं. हा बोध अभ्यासावाचून परिपक्व होत नाहीं व तो पक्व झाल्यावाचून मन हृदयात प्रवेश करीत नाहीं. अभ्यासानें बोध स्थिर झाला म्हणजे तसल्या बोधानें युक्त असलेलं चित्तच निर्वाण होय. कारण बोधविश्रांति व गुरु-शास्त्र सेवन यांच्या योगानें द्वैताद्वैत दृष्टीची शांति होत असते अभिमानादि दोषरहित ज्ञानीच परम पदास पोंचतात १५४.

**सर्ग १५५**—व्याधाचे मूढ तपामुळें क्लेश, विधीच्या वरामुळें आकाशगति, शरीरवृद्धि, व मरण.

अग्नि—राजा, हे सर्व ऐकून व्याध विस्मयानें चित्रासारखा स्तब्ध झाला. अभ्यासाच्या अभावीं त्याचें चित्त परम पदीं स्थिर झालें नाहीं. तो चचळ मनानें युक्त असल्यामुळें फार खिन्न झाला. त्याला कांहींच निश्चय करवेना. हें जग अविद्यामय आहे, हें त्याच्या ध्यानात येईना. म्हणून त्यानें तपाच्या योगानें सिद्धियुक्त शरीर संपादन करून या भावाभावात्मक जगाचा अंत पाहण्याचा निश्चय केला. पृथ्वीपासून आकाशापर्यंत सर्व भूत-भौतिकाचें उल्लंघन करून गेल्यावर जेथें आकाशही नाहीं, अशा मोठ्या सुखावह स्थानीं मी राहीन, असा निश्चय करून तो मूर्ख झाला. मुनीनें केलेला सर्व बोध मातींत मिळाला. कारण त्यानें तो दृढ करण्यासाठीं प्रयत्न केला नव्हता. असो; लागलेंच त्यानें आपलें लुब्धकत्व सोडून तापसत्व धारण केलें. त्यानें दीर्घकाल तप केलें. एकदां तप करीत असतानाच तो मुनीला म्हणाला,—"भगवन्, माझ्या चित्ताला विश्रांति केव्हा मिळेल!" तेव्हां तो मुनि त्याला बोलला,—"तुला मी सांगितलेलें ज्ञान जुन्या व कुजक्या काष्ठावरील अल्पशा अग्नीप्रमाणें तुझ्या हृदयांत कसें तरी राहिलें आहे. अभ्यासाच्या अभावीं तूं परम कल्याणस्थानीं विश्रांति पावलेला नाहींस. यास्तव अभ्यास कर. म्हणजे योग्य समयीं तुला विश्रांति मिळेल. आतां मी सांगतों तो

आपला पुढचा वृत्तान्त ऐकून ठेव. यावेळीं तुझी संवित् झोकें घेत आहे. त्यामुळें तूं मूर्खही नाहींस व अजून पंडितही झालेला नाहींस. म्हणूनच हें अविद्यारूपी विस्तीर्ण जग केवढें मोठें आहे, तें पहावें, अशी तुला इच्छा झाली आहे, व तूं त्याकरितां तप करीत आहेस. हें तप तू असेंच आणखी अनेक वर्षें करशील. त्यानंतर पितामह संतुष्ट होऊन देवांसह तुजपाशीं येईल. तूं त्याला आपला संदेह सागून या अविद्याविलासाचा अंत पाहण्यास योग्य, सुदृढ, गरुडासारखें वेगवान् व अतिशय विस्तृत शरीर मागशील. तो वरद देव ' तथास्तु ' असे म्हणून गुप्त होईल.

त्यानंतर तुझा तपामुळें कृश देहही पुष्ट होईल. तो चंद्रासारखा कांति-मान् होईल. लागलाच तू मला विचारून व नमस्कार करून आका-शात उडी मारून जाशील. तुझा देह फार मोठा होईल. तूं महावेगानें आकाशात अनेक वर्षें उडत राहशील. पण तुला दीर्घप्रयासानेंही त्याचा अंत लागणार नाहीं. पुनः पुनः पृथ्वी, आकाश, इत्यादि तेच ते पदार्थ दिसतील, शेवटीं तुला त्या सदागतीचा कंटाळा येईल, तूं अतिशय खिन्न होशील, तुझें तें मोठें शरीरही तुला भारभूत वाटेल, ' असल्या निरुपयोगी मोठ्या शरीराला घेऊन काय करावयाचें आहे, कारण आकाशाच्या फार मोठ्या प्रदेशास झाकून सोडणाऱ्याही याच्या योगानें मला सुख होत नाहीं व अविद्येचा अंतही लागत नाहीं, यास्तव मी आता प्राणधारणेनें याचा त्याग करतों,' असें मनात म्हणून तूं त्याचा त्याग करशील. त्यानतर तुझा प्राण आकाशातच वायूचा आश्रय करून राहील व तें अतिशय भयंकर व फार मोठें शरीर पंख तोडलेल्या पर्वताप्रमाणें भूलोकीं पडेल. त्याच्या खालीं सर्व भूलोक चिरडून जाईल. नंतर शुष्क भगवती देवी आपल्या सर्व परिवारासह त्याला खाईल व त्यामुळें पृथ्वी पुनः शुद्ध होईल. व्याधा, तालीवनांत तप करून तुझा पुढें असा वृत्तान्त होणार आहे, यास्तव आतां तुला वाटेल तसें कर.

व्याध—भगवन् , तर मग मला अजून असें असह्य दुःख भोगाव-याचें आहे ! आणि मी तें आपल्या दुष्ट इच्छेनेंच आपल्यावर आणणार आहें !! पण त्याचा परिहार करावयास कांहीं उपाय नाहीं का ?

मुनि—अवश्य होणारी गोष्ट कोणालाही कधीं टाळता येत नाहीं, उजव्या हाता-पायाला डावा हात किंवा पाय करतां येणें जसें मनुष्यास अशक्य तसाच अवश्य भावाचा अभावही त्यास करतां येत नाहीं. ज्योतिःशास्त्रावरून भावी इष्टानिष्टांचें फार तर नुस्तें ज्ञान होतें, त्यांचा प्रतीकार करता येत नाहीं. ज्या महा पुरुषांनीं पूर्वीं सुकर्में केलेलीं असतात त्यांनाच या जन्मीं शम-दमादि साधनांचा लाभ होतो, व ते ब्रह्मज्ञान देणाऱ्या श्रवणादि उपायाच्या योगानें तत्त्व-ज्ञानी होऊन स्वस्थ झोंप घेतात, जगाचे दर्शन, या जागरितात राहत नाहीत. ते प्राक्तन कर्मांनाही नष्ट करून सोडतात. तीं जरी अति दृढ असलीं तरी ते त्याचा उच्छेद करितात १५५.

**सर्ग १५६**—वायूंत असलेला व्याधजीव सिंधु राजा होऊन विदूरथाला मारून मंत्रिमुखानें स्वतत्त्व श्रवण करील

**व्याध**—भगवन्, त्यानंतर विस्तीर्ण आकाशात असलेल्या माझें काय होईल? देह तर पृथ्वीवर पडेल. पण जीवाचें काय होणार?

**मुनि**—तेंही मी तुला सागतों ऐक. काहीं दिवस तो जीव वायूमध्यें राहील व पुढें एक भूपीठ पाहून त्यात महाराज व्हावें, अशी तुला इच्छा होईल. तिच्या बलानें तूं सिंधुदेशाचा राजा होशील. तूं आठवर्षाचा असतानाच तुझा पिता सर्व राज्य तुला देऊन वनात जाईल. तुझ्या सीमेस ज्याची सीमा भिडली आहे, असा विदूरथ फार वाढेल. त्याच्याशीं तुझें अतिशय वैर माजेल. शेवटीं मोठी लढाई होऊन तूं त्याला मारशील. तुला सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त होईल. त्यामुळें अनेक विद्वान् व शूर पुरुष व मंत्री तुझ्या सभेंत जमतील, व त्याच्याशीं तुझा असा संवाद होईल.

एक तत्त्ववेत्ता मंत्री म्हणेल,—" महाराज, आपण विदूरथाला जिंकून यमसदनीं पाठविलेंत, हें मोठेंच आश्चर्य आहे."

त्यावर तूं म्हणशील,—'पण मी एवढा मोठा शूर, सपन्न व अधिक सैन्यानें युक्त असताना तो राजा मला दुर्जय कसा झाला?'

**मंत्री**—त्याची लीला या नांवाची एक महा साध्वी भार्या आहे. तिनें तपाच्या योगानें भगवती सरस्वतीला प्रसन्न करून घेतलें होतें. त्या मातेनेंही तिला आपली कन्या म्हटलें आहे. ती त्या राजाच्या मोक्षादि

क्रियाही सहज करते. या सर्व जगाचा क्षय करण्याचेंही सामर्थ्य तिच्यामध्यें आहे. त्यामुळें विदूरथाच्या हातून आपला पराभव तिनें सहज करविला असता. पण तो का केला नाहीं, हें कांहीं कळत नाहीं.

**राजा**—मग असें असतांना मी त्याला कसा मारूं शकलों ?

**मंत्री**—त्याचेंच तर आम्हांला राहून राहून आश्चर्य वाटत आहे. परंतु त्या महात्म्यानें त्या देवीपाशीं सर्वदा अखिन्न मनानें ' माझा या कष्टकर संसारापासून मोक्ष व्हावा ' अशी प्रार्थना केली होती. त्यामुळें युद्धामध्यें मरून त्यानें तिच्या अनुग्रहानें तोच संपादन केला असावा, असें आमचें अनुमान आहे.

**सिंधु**—मीही त्या देवीची पूजा सदा करींत असतों. मग ती परमेश्वरी मला मोक्ष का देत नाहीं ?

**मंत्री**—महाराज, ती ज्ञप्ति देवी सर्वांच्या हृदयात सदा निवास करते. त्या संविद्रूप भगवतीलाच सरस्वती म्हणतात. जो जो जें जें आपलें हित इच्छितो त्याला तें तें ती देते. राजन् , तूं तिच्यापाशीं मोक्ष मागितलेला नाहींस, राज्य मागितलें होतेंस, म्हणून तें तुला मिळालें.

**सिंधु**—विदूरथानें राज्याविषयीं, तिची प्रार्थना केली नाहीं. मोक्षाविषयींच केली, व मी राज्यासाठींच तिचें सेवन केलें होतें, मोक्षासाठीं नव्हे, तें का ? आम्हा उभयतांच्या प्रार्थनाविषयांत असें अंतर का पडावें ? माझ्या हृदयात वास करणाऱ्या त्या भगवतीनें मला मोक्षाविषयीं सुबुद्धि का दिली नाहीं ?

**मंत्री**—हे विभो, तुझा प्राक्तन अभ्यास अशुभ आहे, त्यामुळें तूं तिला नमस्कार करून मोक्षाची याचना केली नाहींस, ज्याचें जसें चित्त असतें तसा तो प्राणी होतो; आबाल—वृद्धापर्यंत प्रख्यात असलेल्या या नियतीचें उल्लंघन करण्यास कोणी समर्थ नसतो. साराश ज्यानें ज्याच्या आकांक्षेनें पूर्व अभ्यास दृढ केलेला असतो त्याला तेंच फल प्राप्त होतें १९१.

**सर्ग १५७—सिंधूच्या तामस जन्मांची परंपरा व शेवटीं विवेकानें मुक्ति.**

**सिंधु म्हणेल,**—" हे आर्य, मी पूर्वजन्मीं असा कोण मोठा कुकर्मी होतों, कीं ज्याच्यामुळें मला हा असा दुर्भाव प्राप्त झाला आहे ? "

मंत्री—राजन्, मी सांगतों तें रहस्य ध्यान देऊन ऐक. म्हणजे तुझें अखंड कल्याण होईल. महाराज, आदि–अंतरहित ब्रह्मापासून तुझें हें तामसतामस जीवरूप तुझ्याच मूढतेमुळें उद्भवलें. निर्विकार ब्रह्मापासून अनेक जीवजाति उत्पन्न होतात. अगदीं प्रथम ब्रह्म जीवभावास प्राप्त झाल्यासारखें होतें, व तें त्या तेवढ्या एकाच जन्मांत ऐश्वर्ययुक्त बुद्धीनें विषयभोग घेऊन मुक्त होतें, अशा प्रकारची ही सात्त्विक सात्त्विकी जाति होय. सनकादिक महात्मे या उत्तम जातीचे आहेत. जे जीव कांहीं काळ अज्ञानात राहून त्याच जन्मात ज्ञान–ऐश्वर्यादि उत्तम गुणानीं युक्त होऊन मुक्त होतात, ते केवल सात्त्विकी जातीचे होत. जी जाति कल्पाच्या आरंभीं नवीन अभिव्यक्त होऊनही अनेक जन्मीं भोग भोगून झाल्यावर क्रमानें मोक्षभागिनी होते, ती राजसराजसी, जी पुष्कळ जन्मानंतर उत्तम गुणास प्राप्त होते, ती केवल राजसी; कल्पापासून स्थावर-कीटादि अनेक जन्म घेतल्यावर शेवटीं मोक्ष-भागिनी होणारी जाति तामसतामसी आणि जी जाति राक्षस, पिशाच, शूद्र, इत्यादि असंख्य जन्म घेऊन मुक्त होते ती केवलतामसी आहे. या जातींचे दुसरेही अनेक भेद आहेत. त्यातील तामसतामसी जातींत तूं झालास. आजपर्यंत तुझे अनेक विचित्र जन्म होऊन गेले आहेत. त्या सर्वांस मी जाणतों. विशेषें-करून त्या आकाशगामी महा शरीरात राहून तुझा फार मोठा काल व्यर्थ जाईल. असो; राजन्, याप्रमाणे तामसतामसी जातींत निर्माण झाल्या-मुळें तुला या संसारगुहेंतून मुक्त होणें अशक्य झालें आहे.

सिंधु—हे आर्य, ही माझी प्राक्तनी तामसतामसी जाति कोणत्या उपायानें जिंकली जाईल, तें मला सांग. एखादा पावन उपाय असल्यास मी जन्मभर त्याचेंच अनुष्ठान करीत राहीन.

मंत्री—महा बुद्धिमान् राजा, उद्विग्न न होणाऱ्या साधकास पुरुष-प्रयत्नानें साध्य करून घेतां येत नाहीं, असें या जगांत कांहीं नाहीं. काल केलेल्या दुष्कर्माचा दुष्ट परिणाम आजच्या शुभ कर्मानें हटवितां येतो. यास्तव तूंही सत्कार्य कर. म्हणजे तुझी प्राक्तनी अशुद्धि नाश पावेल. पुरुष ज्याची इच्छा धरतो त्याच्या प्राप्तीच्या साधनांचें अनुष्ठान जर तो फल मिळे-पर्यंत करीत राहिला तर त्याला यश अवश्य येतें. पुरुष नित्य

ज्या करितां यत्न करतो, ज्याची अनन्य मनानें भावना करता व जसें होण्याची इच्छा करतो तसाच तो होतो, अन्यथा कधींही होत नाहीं.

मुनि—त्या मंत्र्याने असें सांगितलें असता सिंधु राज्यभाराला कंटाळून त्याचा सर्वथा त्याग करील, मंत्री पुष्कळ प्रार्थना करीत असतानाही त्याच्या म्हणण्याचा आदर न करिता तो दूर वनांत जाईल. ज्यातील सर्व शत्रु नष्ट झाले आहेत अशाही त्या राज्याचा पुनः आश्रय करणार नाहीं; पुष्पाच्या संगानें जसा वस्त्रादिकांस वास लागतो त्याप्रमाणें साधूमध्यें राहणाऱ्या त्याला विवेक प्राप्त होईल. त्यानंतर हा जन्म का झाला? संसार कोणापासून झाला? इत्यादि गोष्टींचा सतत विचार केल्यामुळें तो राजा मुक्त होईल, हिरण्यगर्भापर्यंत सर्व ऐश्वर्यास तुच्छ मानून तो परम पावन पदास पोंचेल १९७.

**सर्ग १९८**—व्याधाचें तप, फलप्राप्ति, शरीरपात इत्यादिकांचें वर्णन

**मुनि**—व्याधा, याप्रमाणें तुझी होणारी पुढची सर्व दशा मी तुला मागें घडल्याप्रमाणें सांगितली आहे, आता तुला वाटेल तसें कर.

**अग्नि**—बा विपश्चित् राजा, त्या मुनीचें हें वचन ऐकून व्याध मनांत अतिशय विस्मित झाला. त्यानंतर ते दोघेही स्नान करावयास गेले. निष्कारण मित्र झालेल्या त्या दोघांनीं तेथें राहून तप, शास्त्रविचार इत्यादिकांच्या योगानें आपला काल घालविला. काहीं काळानें मुनि निर्वाणास प्राप्त झाला. देह सोडून तो परपदीं लीन झाला. व्याध तेथें तसाच तप करीत राहिला. पुष्कळ काल लोटल्यावर पितामह त्याला वर द्यावयास आला. तेव्हा पुढें होणारा अनर्थ अगोदरच कळलेला असूनही आपल्या वासनावेगाला आवरून धरण्यास असमर्थ असलेल्या व्याधानें तोच (पूर्वोक्त) वर मागितला. ब्रह्मा 'तथास्तु' असें म्हणून निघून गेला. यानंतर व्याध आपल्या तपाचें फल भोगण्यासाठीं पक्ष्याप्रमाणें आकाशांत उडून गेला. त्याचा देह क्षणोक्षणीं वाढत शेवटीं तो अनेक मेरूंएवढा झाला. त्याच्या योगानें गरुडासारख्या वेगानें तो व्याध शेकडों वर्ष आकाशांत खालीं, वर, मागें पुढें, फिरत राहिला. पण त्याला या अविद्याविलासाचा अंत लागला नाहीं. पुष्कळ दिवस फिरल्यावर त्याला आपोआप कंटाळा आला. तेव्हां त्यानें प्राण रेचनाधारणेनें आकाशांत

सोडले, त्याबरोबर शव झालेलें त्याचें शरीर खालीं पडलें. आकाशांत असलेलें प्राणयुक्त चित्त सिंधुराजा झालें, व त्यानें विदूरथाला मारून पृथ्वीचें राज्य संपादिलें, त्याचाच हा शेकडों महापर्वतांसारखा देह या वेळीं पृथ्वीवर पडला. त्यानंतर चंडिकेनें त्याला खाऊन तिच्या अनुचरांनीं सर्व पृथ्वीला त्याच्या मेदानें कसें भरून सोडलें तें वर सांगितलेंच आहे. कांहीं कालानें त्या मेदाचीच माती झाली, आणि पुनः त्या पृथ्वीवर पर्वत, वृक्ष, प्राणी, नद्या इत्यादि पूर्वीप्रमाणें होऊन तिच्यांतील सर्व व्यवहार सुरू झाला १५८.

**सर्ग १५९—**अग्नीचें गमन, विपश्चित्-राजाचें अनेक आश्चर्यें पाहणें, व शेवटीं ब्रह्मतत्त्ववर्णन.

**अग्नि—**हे राजा, आता तुला वाटेल तिकडे तूं जा. मी स्वर्गास जातों. यज्ञ करण्याची इच्छा करणाऱ्या इंद्रानें माझें स्मरण केलें आहे.

**भास—**राजन्, असें सांगून भगवान् अग्नि तेथेंच गुप्त झाला व मी पूर्व संस्कारबलानें पुनः दशदिशेंत फिरूं लागलों. मला पुनरपि पूर्वीप्रमाणेंच अनेक भूलोक व त्यांतील विचित्र रचना दिसली. पण पुष्कळ दिवस भ्रमण करूनही अविद्येचा अंत लागला नाहीं म्हणून मी कंटाळून एका पर्वतावरील एकांतस्थानीं मोक्षाकरितां तप करूं लागलों. तों इंद्र मजकडे येऊन म्हणाला, " राजा, तुझा मोक्षकाल अजून आलेला नाहीं. कारण माझ्या व तुझ्या चित्ताकाशांत दुसरी मृगयोनि उपस्थित झाली आहे. मी तुजप्रमाणें अल्पपुण्यवान् जरी नसलों तरी स्वर्गांतील भोगांनीं दृप्त होऊन मी एकदा एका पृथ्वीचें अवलोकन करावयास जात असतांना तप करीत असलेल्या दूर्वास मुनीला, हें कोणाचें शवच आहे, असें समजून पाय लाविला. त्यामुळें त्या कोपी ब्राह्मणानें 'तूं मत्त हरीण हो, व तूं ज्या लोकीं जात आहेस त्यावर एक महा शव पडून त्याचा नाश होवो,' असा मला शाप दिला आहे. तूं आता या संसाराला कंटाळला आहेस, हें मी जाणतों. पण बाबारे, शुद्ध आत्म्याचें ज्ञान झाल्यावांचून मुक्ति मिळणें शक्य नाहीं. यास्तव तूं माझ्या सांगण्याप्रमाणें मृगयोनि धारण कर. तिच्यामध्यें तुझ्या संसाराचा क्षय होईल. तुझी जन्मविषयींची भावना अद्यापि निःशेष गेलेली नाहीं. तूं आता

मृग झालास म्हणजे दशरथराजाच्या महापुण्यवान् सभेंत जाऊन वासिष्ठांच्या अनुग्रहानें ज्ञानाग्नीनें तुझा देह दग्ध होईल. तूं मृगशरीरांतून मुक्त होऊन पुरुषशरीरानें संपन्न झालास म्हणजे तुला पूर्वींचें सर्व वृत्त आठवेल व तूं ज्ञानी होशील."

त्या देवानें असें सांगताच मला हरिण- होण्याची इच्छा झाली व त्याप्रमाणें मी एका महा अरण्यांत तृण, दूर्वा व दर्भ खाणारा सुंदर पशु निर्माण झालों. कांहीं दिवसांनीं एक राजा शिकार करावयास आला व त्यानें भयभीत होऊन पळणाऱ्या मला धरून न मारताच आपल्या घरीं नेलें. राजन्, पुढें कांहीं दिवसांनीं मी तुझ्या या प्रिय व भव्य पुत्राचा क्रीडामृग झालों आणि त्याच महत्संगतीमुळें मी आता कृतकृत्य झालों आहे. राजन्, माझा हा असा सर्व वृत्तान्त आहे. हा संसार गारुडाप्रमाणें नाना आश्चर्यांनीं भरलेला आहे. अविद्येचा अंत लागणें शक्य नाहीं. तिच्या असंख्य शाखा पसरल्या आहेत. एका आत्मज्ञानावाचून तिचा निस्तार होत नाहीं. सर्व आत्ममय आहे. आत्मा सर्व शक्तिमान् असल्यामुळें त्याच्या आधारानें सर्व असंभाव्य चमत्कारहीं होतात. प्राण्याचें अन्योन्य संकल्प मिळून कार्य होत असतें. शुद्ध ज्ञप्तिच 'मी अज्ञ आहें' अशा कल्पनेनें अविद्या झाली. यास्तव 'मी सर्व आहें, मीच नित्य ज्ञानस्वरूप आहें' इत्यादि दृढ भावनेनें ती अप्रमाण ठरत असते. यास्तव तिचाच सतत अभ्यास करावा. वस्तुतः कांहीं उत्पन्न होत नाहीं व कांहीं मरत नाहीं. जलांतील तरंगादिकांप्रमाणेंच ब्रह्मामध्यें शरीरादि आहे सर्गाच्या आरंभीं स्वप्नाप्रमाणें चिदाकाशमयी सर्गशोभा असते. यास्तव हें सर्व ब्रह्मच आहे, असें समजणें युक्त होय. राजन् मी अनेक वैभवानीं संपन्न असलेलीं अनेक जगें पाहिलीं. कार्यांचे परिणाम भोगले. अनेक युगें दशदिशेंत भ्रमण केलें. पण माझें समाधान झालें नाहीं. तेव्हा शेवटीं स्वानुभवानेंच ज्ञानावांचून दृश्यदोष शांत होत नाहींत, असें मी ठरविलें १५९.

**सर्ग १६०—सायंकाळ, भासाचें जीवन्मुक्तत्व, अविद्येचें वर्णन.**

श्रीवाल्मीकि—भास इतकें सांगत आहे तों सूर्यास्त होण्याची वेळ झाली. त्यामुळें त्याची सूचना देणारा मंगलवाद्यांचा मोठा थोरला ध्वनि झाला. त्याबरोबर सर्व सभा उठली. राजानेंही भासाच्या राहण्याची क

भोजनादिकांची अनुरूप योजना केली व सर्व आपापल्या स्थानीं गेले. त्यानीं स्नान, सायंकृत्यें, भोजन इत्यादि करून दिवसां घडलेल्या व ऐकलेल्या सर्व आश्चर्यांचें चिंतन करीतच शयन केलें. दुसऱ्या दिवशीं नेहमीं-प्रमाणें प्रातःकृत्यें करून सर्व सभासद सभास्थानीं येऊन बसले असता मुनि वसिष्ठ असें अमृतप्राय भाषण करूं लागला.—राजन्, अशी ही अविद्या वस्तुतः मिथ्या असूनही सत्य असल्यासारखी भासते. तिचा अंत लागणें किती अशक्य आहे हें मी तुला या विपश्चिताच्या आख्यानानें सांगितलें आहे. त्या पुरुषार्थी राजाला इतक्या मोठ्या यत्नानेंही तिचा निर्णय करितां आला नाहीं. तिच्या यथार्थ तत्त्वाचें ज्ञान होईतोंच ती दीर्घकाल अनंत होऊन राहते. आता हा तुझा मंत्री झालेला राजा आमच्या या कथा ऐकून जीवन्मुक्त होईल. अविद्या ब्रह्माच्या सत्तेनेंच सत्तावाली झाली आहे. भ्रमानें हिचें असत् रूपही सत् असल्यासारखें भासतें. तिच्या योगानें या आकाशात अनेक चमत्कार होतात. ब्रह्माच्या अज्ञानानें आपल्याला जीव समजून जो जसा संकल्प करतो तसें त्याला या आविद्यक जगांत फळ मिळतें. तीव्र संवेगानें केलेल्या संकल्पाप्रमाणेच स्वर्गादि उत्तम फळ प्राप्त होत असतें. नरकादि अधम फळ जरी कोणी पापी इच्छित नाहीं तरी त्या पापाच्या माहात्म्यानेंच त्याला नरकांतील असह्य यातना प्राप्त होतात. त्यांचें ( यातनांचें ) वर्णन पुराणांतून पुष्कळ केलें आहे. यास्तव येथें विस्तार करीत नाहीं. तात्पर्य कल्पनेप्रमाणें सर्व शुभाशुभ सत्यासत्य फळ मिळतें.

**सर्ग १६१**—कारणशून्य चिन्मात्र प्रतिभासात्मक जगत्चित्र अबोधानें भासत असून बोधानें तेंच ब्रह्म होतें.

**श्रीवसिष्ठ**—रामा, या विपश्चित् राजानें वर्णिलेलें मुनि व व्याध यांचें वृत्त प्रत्यहीं दिसणाऱ्या निष्कारण स्वप्नाप्रमाणें असो कीं भगवद्वरादि निमित्तजन्य असो. तें कसेंही जरी असलें तरी अज्ञात आत्म्यामध्यें मोक्ष होई तों असले भ्रम सदा प्रवृत्त होत असतात. पण त्यात ब्रह्म सदा अनुवृत्त असतें. ज्ञान झाल्यावर असले भ्रम होत नाहींत, हें मी अनेकदां सांगितलेंच आहे. स्वप्नादि या अवस्थाही आत्मस्वरूपांत कल्पिलेल्या आहेत. म्हणून जाग्रत् व स्वप्न यांच्यामध्यें कांहीं भेद नाहीं. मरून पुनः जन्मास

येणे, हें निजून जागें होण्यासारखें आहे. सारांश विचारपूर्वक पाहूं लागल म्हणजे स्वप्ननगराप्रमाणेंच हें जगही चिन्मय विपुल आकाशच आहे, अस कळतें. मग अविद्या कशी व कोठें राहणार ? ही दृश्य अविद्या चिन्मय आकाशच आहे, असें कळल्यावर बंध किंवा मोक्ष कोणत्या कारणानें होणार ? कारण अविद्या नाहींशी झाली म्हणजे बंध जसा बंधरूपानें रहात नाहीं, तसाच मोक्षही मोक्षरूपानें भासत नाहीं. तर सर्व ब्रह्म होऊन 'आहे व नाहीं' या व्यवहारास योग्य असें दुसरें कांहीं रहात नाहीं. विद्या व अविद्याही नाहीं. तर ही अज चित्‌च आहे. सर्व बाह्याभ्यन्तर दृश्यामध्यें एक शांत स्वरूप आहे. चिदाकाशच भेद व अभेदबुद्धि आहे. द्वैत, अद्वैत इत्यादिकही सर्व ब्रह्म आहे. यास्तव हे सुभगा, अशा प्रकारच्या या चिन्मय ब्रह्मपदामध्यें शिलेप्रमाणें स्थिर राहून तूं स्ववर्णाश्रमोचित क्रमाचें व लोकस्थितीचें उल्लंघन न करिता आपल्या वैभवानुसार इष्ट देशीं जा, विहार कर, खान–पान कर. द्विज, सुहृत् इत्यादिकास भोजन दे आणि सुखानें रहा १११.

सर्ग १६२—सर्व द्वैत ब्रह्ममात्र आहे व हितवचनांनीं अविद्येचा निरास यांचें उपपादन.

**श्रीवसिष्ठ**—रामा, सर्व विषय चिदाकाशाकारितांच स्फुरत असल्या-मुळेंही जग चिन्मात्र आहे, असें ठरतें. स्वप्नातील नगराचा भोग घेणाऱ्या चित्–हून त्या नगराचें रूप जसें पृथक् नसतें, तसें जाग्रत् जगही शांत आकाशच आहे. अर्थात् त्यात वस्तुतः नाना असें कांहीं नाहीं. तर हे भासणारें नानात्व काय आहे ? तें अनात्मभूत केवळ चिद्भान आहे. परंतु अज्ञाना तें आहे, असा अनुभव येतो व सुज्ञांना तें चिन्मात्र आहे, असें भासतें. पण त्यातील खरें काय आहे, हें कसें कळणार ? कारण अज्ञ केवळ बाह्यदृष्टि असतात. सुज्ञ अंतर्दृष्टि असतात. यास्तव त्यांचा अनुभव एकदेशी असतो. विद्वानाची बुद्धि सदा स्थैर्यामध्यें स्थित असते यास्तव ती सदा आंत स्थिर तत्त्वच पहाते. अज्ञांची बुद्धि सदा अस्थैर्यांत स्थिर असते. म्हणून ती बाह्य अस्थिरच पहाते. अर्थात् बुद्धिगत प्रपंच स्वरूप अत्यंत आतरही नाहीं व बाह्यही नाहीं. त्यामुळें ज्ञानी व अज्ञानी अशा दोघांनाही त्याचें खरें ज्ञान होत नाहीं. 'तर मग तो स्थित कस

झाला ?' म्हणून विचारशील तर सांगतों— अज्ञात चित्स्वभावाचाच आश्रय करून, जळाच्या द्रवतेच्या आश्रयानें जसे तरंग त्याप्रमाणें तो आत्मसत्तेनें अंतराळींच स्थित आहे. म्हणूनच आम्ही त्याला चिच्चमत्कार मात्र म्हणतों. जगत् ही चित्‌ची छाया आहे. देहच आत्मा आहे, ही भ्रांतिच सर्व अनर्थांचें मूळ होय. हे मिथ्या अर्थ वासनेमुळें भासतात. जें आहे व भासतें आहे, असें वाटतें तें सर्व परमात्मतत्त्वच होय. असल्या शुद्ध बोधैकरूप आत्मविश्रांतींत स्थिर होऊन जीवभाव सोडावा. आत्माच स्वतःचा शत्रु व मित्र आहे. यास्तव आत्म्यानेंच आत्म्याचें रक्षण न केल्यास त्याच्या रक्षणाचा दुसरा उपायच नाहीं. यास्तव राघवा, तारुण्य आहे तोंच या संसार-संज्ञक सागरातून शुद्धबुद्धिनौकेनें पार हो. आजच आपलें कल्याण करून घे. तूं वृद्ध झाल्यावर काय करूं शकणार ? अंगात सामर्थ्य असेपर्यंत हितकर प्रयत्न न केल्यास पुढें आपलीं अंगेंच आपणाला भारभूत होत असल्यामुळें कोणताही शुभ प्रयत्न होत नाहीं. बालपण, वृद्धत्व, व पश्वादियोनि हेंच मरण असून तारुण्य विवेकयुक्त असल्यास तेंच खरें जीवित आहे. यास्तव त्याचा सदुपयोग करावा. विजेसारख्या या संसारास प्राप्त होऊन साधुसंगम, सच्छास्त्र इत्यादिकाच्या योगानें हित करून घ्यावें. या चिखलातूनही आत्महित हें रत्न उचलून घ्यावें. अहो, पण या क्रूर अज्ञाची काय गति होणार ! कारण ते आपले अनेक जन्म व्यर्थ घालवीत असतात. राघवा, ही भ्रांति तत्त्वज्ञानावाचून जात नाहीं. तें तत्त्वज्ञानही मनासह इंद्रियाचा निग्रह केल्यावाचून होत नाहीं. यास्तव तूं स्वभावतःच बाह्य प्रवृत्ति करणाऱ्या या इंद्रियाना जिंकून ज्ञानाच्या योगानें अविद्येचा पराभव कर. म्हणजे तूं मुक्त होऊन पुनर्जन्माचें निवारण करूं शकशील १६२.

**सर्ग १६३**—चिद्द्वयात चित्ताचा निरोध व या शास्त्राचा अभ्यास हे इंद्रियजयाचे उपाय आहेत.

**श्रीराम**—भगवन्, इंद्रियांचा जय कोणत्या उपायानें होईल ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, ज्याची दृष्टिच मंद झाली आहे, त्याला सूक्ष्म वस्तु पहावयाची झाल्यास जळत असलेल्या दिव्याचाही जसा उपयोग नसतो त्याप्रमाणें विपुल भोग, आपला उत्कर्ष, जीवित, इत्यादिकांमध्यें आसक्त

झालेल्या पुरुषाला सूक्ष्मार्थाचें दर्शन होण्यास शास्त्रज्ञान मुळींच उपयोगा पडत नाहीं. कारण तें इंद्रियांना जिंकण्यास समर्थ होत नाहीं. यास्तव मी आतां सांगतों ती इंद्रियजयाची युक्ति ऐक. तिच्या योगानें पुरुषाची अल्प साधन-संपत्तीही त्याच्या दृढ प्रयत्नानें मोक्षफलसिद्धीस प्राप्त होते. पुरुष चिन्मात्र आहे. पण तो चित्तानें जवळ आणलेल्या विषयाना प्रकाशित करूं लागल्यामुळें ( म्हणजेच चित्ताच्या अधीन झाल्यामुळें ) जीव या नांवास पात्र होतो. चित्तवृत्ति ज्या विषयाला व्यापून दाखविते तन्मय तो होतो. यास्तव चित्ताला बाह्य विषयापासून परतविणें, या प्रयत्नानें आत आकर्षण करून घेऊन ब्रह्माकार करण्याचा अभ्यास केला म्हणजे स्वतः पंगु असलेलीं इंद्रियें आपोआप पराभूत होतात. चित्त इंद्रियसैन्याचें नायक आहे. यास्तव त्याला जिंकल्यानें त्याच्या सैन्याचा पराभव आपोआप होतो. चित्तावच्छिन्न जीव चैतन्यास मोठ्या प्रयत्नानें ब्रह्मामध्यें एकाकार करून सोडलें असता चित्ताचा पराभव होतो. क्षणोक्षणीं बलात्कारानें ज्याचें ज्याचें म्हणून स्मरण होत असतें त्याला त्याला त्याच्या अधिष्ठानभूत ब्रह्मामध्यें लीन केलें असता निश्चयानें त्याचें विस्मरण पडतें. असा पुष्कळ अभ्यास केल्यानें संस्कारांचा उच्छेद झाला म्हणजे पुनः स्मरण होत नाहीं. अशा उपायानें भोगास कारण होणाऱ्या विषयाचा विजय होतो. चित्त-निरोधानेंच चित्त शांत होतें. तप, तीर्थयात्रा इत्यादि दुसऱ्या उपायानीं तें शांत होत नाहीं. स्वपौरुषानें चित्ताला विषय-आमिषापासून परतविलें असतां तेंच देवांचें स्वर्गस्थान प्राप्त झालें, म्हणून समजावें. त्याचप्रमाणें आपल्या धर्मामध्यें एकनिष्ठ होऊन राहणें हें सुद्धा तृष्णाराहित्य (वैराग्य) वाढविणारें आहे. त्याच्या योगानें इंद्रियाचा पराभव करितां येतो. स्वधर्माच्या विरुद्ध असलेल्या विषयांस वर्ज करून शम व संतोष यांचें अर्जन करणारा पुरुष जितेंद्रिय होय. आंतील संवित्-विषयीं प्रेम व बाहेरील विषयाविषयीं अप्रेम यांस ज्याची मति कंटाळत नाहीं, त्याचें चित्त शांत होतें. संवित-मध्यें चित्ताचा निरोध करण्याचा प्रयत्न केला असता मन विषयांकडे धांवणें, हें आपलें दुर्व्यसन सोडतें व चपळतेपासून मुक्त झालेलें तें विवेकाकडे जातें. विवेकी उदारात्म्यालाच जितेंद्रिय म्हणतात.

ता वासनातरंगांबरोबर वाहवत जात नाहीं. साधूंचा संपर्क व सच्छास्त्र यांच्या योगानें अहोरात्र विवेक केला असतां पुरुष जितेंद्रिय होऊन जग ब्रह्ममात्र आहे, असें साक्षात् पाहतो. सत्य वस्तूच्या अवलोकनानें संसारभ्रम शांत होतो. मिथ्या वस्तूंमध्यें आसक्त झाल्यानें व्यर्थ श्रम मात्र होतात. पाणी सुकून गेलें असतां जसें वहात नाहीं त्याप्रमाणें ज्ञानानें छिन्न झालेलें द्वैत दिसत नाहीं. असत् वस्तूच्या दर्शनास स्वप्नाचा खासा दृष्टान्त आहे. ज्ञानी पुरुषाला जागरादि तिन्ही अवस्था तुर्यरूप भासतात. द्वैताद्वैतादि भेदांनीं अज्ञ क्रीडा करीत राहतात व त्यास पाहून ज्ञानी मनांतल्या मनात हसतात. तर मग शास्त्रात द्वैताद्वैतादि वादांना मान कसा दिला आहे? म्हणून विचारशील तर त्याचें कारण सागतों. तत्त्व अति सूक्ष्म असल्यामुळें नुस्त्या प्रतिज्ञेनें शिष्याना त्याचा बोध होत नाहीं. यास्तव अतत्त्वज्ञाकडून जेवढ्या म्हणून शंका येण्याचा संभव असतो तेवढ्या त्या सर्व घेऊन शास्त्रांत शिष्याच्या उपकारार्थ त्याचें समाधान सांगितलेलें असतें. पण तेवढ्यावरून शास्त्रें शिकून कलहप्रिय होणें चागलें नव्हे. कारण त्यामुळें तत्त्वसाक्षात्कारास बाध येतो. यास्तव सुहृद् होऊन शास्त्रानें सांगितलेल्या मार्गानें विचार करावा, तत्त्वाकडेच चित्त ठेवावें, परस्पर बोध करावा, व त्याच्यायोगानेंच संतुष्ट होऊन त्यातच रममाण व्हावें. याप्रमाणें जे सतत योगी होतात त्याना लवकरच तें पद प्राप्त होतें. जगातील तृणासारखा तुच्छ पदार्थही जर रक्षणावाचून टिकत नाहीं तर ब्रह्मासारखें सर्वाधिष्ठान अयत्नानेंच कसें हातीं लागेल? यास्तव अभ्यास अवश्य आहे. म्हणून मी वारंवार निरनिराळ्या युक्तींनीं व भिन्न भिन्न कथाच्या मिषानें त्या तत्त्वाचेंच वर्णन केलें. याप्रमाणें वारंवार विचार केल्यावाचून, वारंवार तत्त्वाचा आस्वाद घेतल्यावांचून त्याच्याविषयीं निश्चय होत नाहीं. जो एकदांच एकादें शास्त्र पाहून त्याचें तत्त्व मला समजलें, असं म्हणतो व शास्त्राचा त्याग करतो त्या अधमाला कांहीं कळत नाहीं.

यास्तव राघवा, या शास्त्राचें, या उत्तम आख्यानाचें, वेदाप्रमाणें सदां अध्ययन करावें. त्याचें पूजन करावें. त्याचें व्याख्यान करावें. म्हणजे तें पुरुषार्थ देतें. या शास्त्रापासून जें प्राप्त होतें, तेंच वेदांपासूनही मिळतें. याचें ज्ञान झालें असतां क्रिया व ज्ञान हीं दोहीं पवित्र होतात. बादरायण-

प्रणीत वेदान्तशास्त्राचे श्रुति व न्याय यांनीं सिद्ध केलेले सिद्धान्त याच्या अध्ययनानें चांगले कळतात. तुमची दया आल्यामुळेंच मी हें रहस्य तुम्हांला सागितलें आहे. यांत कपट मुळींच नाहीं. ही माया मिथ्या कशी हें जर जाणावयाचें असेल तर या शास्त्राचें अध्ययन करा. याचा चागला विचार केला असतां जो बोध होतो त्याच्या योगानें इतर शास्त्रें मिठाच्या योगानें जशा भाज्या,तशीं अतिशय रुचिकार होतात.हें काव्यासारखें आहे,असें समजून तुम्ही याचा अनादर करूं नका. कारण तसें केल्यास तुम्ही आत्मघाती व्हाल. आमचे पूर्वज असे असे मोठे मीमासक होते, आमचे मोठे सांख्य होते, आमचे महाकापिल होते, इत्यादि अभिमान धरणाऱ्या व त्याच्याच मार्गाचें आलंबन करणाऱ्या असाधूंशीं भाषणही करूं नये. कारण अधम जन ही आमच्या बापाची विहीर आहे, या दुराभिमानानें गंगोदक सोडूनही तिचें खारें पाणीच पीत राहतात १६३.

सर्ग १६४—जीव–जगद्भावाचें मार्जन करून ब्रह्माच्या समरसतेचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ**—चित्सूर्य आत स्फुरण पावूं लागला असता त्याच्यापासून उद्भवणारे जीव-अणु अग्नीपासून उद्भवणाऱ्या किटाळांप्रमाणेंच तद्रूप आहेत. ते त्याचे अवयव नव्हेत. त्यामुळें देहाच्या हस्तपादादि अवयवाप्रमाणें जीव परस्पर भिन्नही नाहींत. कारण अवयवांत विलक्षणता असते व तिच्यामुळेंच ते परस्पर भिन्न होतात. पण जीव अणु ब्रह्माचे अवयव नसल्यामुळें परस्पर भिन्नही नाहींत. जे पदार्थ अत्यंत तुल्य नसतात तेच परस्पर भिन्न असतात, हें लोकप्रसिद्ध आहे.

**श्रीराम**—भगवन्, असें जर म्हटलें तर आकाशांतील सर्व नक्षत्रें समान प्रकाशरूप असल्यामुळें त्याच्यामध्येंही परस्पर भेद नाहीं व तेज निरवयव आहे असें होईल. सर्व नक्षत्राचा प्रदेश एकच नाहीं व त्यांच्या प्रकाशांतही न्यूनाधिकभाव आहे, म्हणून म्हणाल तर जीवाच्या विषयींही तेंच सांगता येण्यासारखें आहे !

**श्रीवसिष्ठ**—रामा, नक्षत्रभेदाप्रमाणें जीवांचा भेद नाहीं. तर तो घट, कमंडलु, इत्यादिकांच्या भेदाप्रमाणें औपाधिक आहे. जीवामध्यें भेद उत्पन्न करणारी उपाधि अंतःकरण, देह इत्यादि आहे. पण सर्व पर व अखंडाकार अपरोक्ष ब्रह्मच मी आहें, अशा बोधास प्राप्त होतांच ती उपाधि

आपलें उपाधिरूपत्व व स्वकृत भेदरूपत्व सोडून ब्रह्मरूप होते. अंतःकरणादि उपाधींच्या योगानें ब्रह्माला जीवभाव जेव्हां येतो तेव्हांही त्याचें शुद्ध स्वरूप विकृत अथवा मलिन होत नाहीं. पण असें असतांनाही जीव केवल मौर्ख्यामुळें अहं, त्वं इत्यादि व्यवहार करतो. पण तो कसा करतो व का करतो, हें आम्हास टाऊक नाहीं. कारण तो आमचा विषयच नव्हे. स्वर्गभूत मेरूवर राहणाऱ्या भाग्यवानाला तहान व भूक यांचा अनुभव कोठून येणार? भितरे लोक अंधकारात पिशाच कसें पहातात तें धीराना काय ठाऊक?

सारांश रामा, हें जग पूर्वी नव्हतें, आता नाहीं, व नसेल. तें सदा ब्रह्मच आहे. ती चिदाकाशाचीच नुसती चकमक आहे. कारण चित्-च्या ज्ञानशक्तीनेंच तें दिसत असतें. स्वप्न-मनोराज्य इत्यादिकांतील नगरात जसें एका स्वच्छ चित्-गगनास सोडून दुसरें काही नसतें त्याप्रमाणें उपाधीपासून पृथक् केलेल्या जगात व जीवातही चिदाकाशावाचून काहीं नसतें. द्वैत ही अज्ञाची कल्पना आहे १६४.

सर्ग १६५—चिन्मात्रत्व दृढ करण्याकरिता स्वप्न व जाग्रत् यांचें ऐक्य व प्रतिपादन

**श्रीवासिष्ठ—**रामा, स्वप्न, जाग्रत् व सुषुप्ति या अवस्था परस्परांमध्यें शिरून परस्परापासून उत्पन्न होतात. त्यामुळें जाग्रज्जाग्रत्, जाग्रत्स्वप्न, जाग्रत्सुषुप्ति, स्वप्नस्वप्न, स्वप्नजाग्रत् व स्वप्नसुषुप्ति, सुप्तिसुषुप्ति, सुप्तिस्वप्न व सुप्तिजाग्रत् असे अवस्थांचे एकदर नऊ भेद होतात. सावधान मनानें इंद्रियव्यापार ही जाग्रज्जाग्रत् आहे. मनोराज्य हें जाग्रत्स्वप्न आहे. कारण तें इंद्रियव्यापाररहित व नुसतें मनोमात्र आहे. इंद्रियें व मन यांची अति शांत स्थिति हीच जाग्रत्सुप्ति होय. अशाच प्रकारें दुसऱ्याही दशा जाणाव्या. जीव स्वप्नरूप जाग्रतींतून जागा होऊन जाग्रद्रूप स्वप्नात प्रवेश करतो. तो स्वप्नजाग्रत् पाहूं लागला म्हणजे पूर्वीची जाग्रत् स्वप्न होतें. स्वप्नापासून जशी जाग्रती होते तसेंच जाग्रतीपासून स्वप्न होतें. एकमेकींच्या अपेक्षेनें त्या दोन्ही अवस्था स्वप्न होतात व आपापल्या वेळीं त्या दोन्ही जाग्रत् दशाच आहेत. सारांश या दृष्टीनें विचार केल्यास जाग्रत् व स्वप्न या दोन्ही दशा अगदीं समान आहेत. त्यांच्यामध्यें जर काहीं फरक असला तर अल्पकाल व दीर्घकाल हाच काय तो आहे. पण मरण व आत्मसा-

क्षात्कार यावेळीं जाग्रत्स्वप्न शांत होतें. त्याचप्रमाणें स्वप्न व सुषुप्ति यांमध्येंही तें ( जाग्रत्स्वप्न ) बाधित होतें. आज पाहिलेलें स्वाप्न जग उद्याच्या स्वप्नांत दिसत नाहीं. आज पाहिलेलें जाग्रत्–जग उद्यां व देह असेपर्यंत दिसतें, हें खरें; पण तेवढ्यावरून त्या दोन अवस्था अगदीं भिन्न होऊं शकत नाहींत. कारण प्रत्येक स्वप्नांतील देह जसा निरनिराळा असतो तसा तो जाग्रतींत नसतो. म्हणून स्वाप्न जग पुनः पुनः तेंच तें दिसत नाहीं व जाग्रत्–देह मरेपर्यंत एकच असल्यामुळें जाग्रत्–दृश्य पुनः पुनः तेंच तें दिसतें. त्या दोन्ही अवस्था चिच्चमत्कारमात्र आहेत. याप्रमाणें जाग्रत् स्वप्नतुल्य आहे, असें कळलें म्हणजे पृथ्वीप्रभृति सर्व जग स्वाप्न वस्तूंप्रमाणें निराकार व असत्य होतें. तें असत्य झालें म्हणजे चिन्मात्र सार अवशिष्ट राहतें. सूर्याच्या प्रभेप्रमाणें आकाशातील जग हा चिदाकाशाचा स्वभाव आहे. चितीचा हा स्वाभाविक जगत्संज्ञक चमत्कार आकाश, भिंत, परमाणु, स्थल, जल इत्यादि जागीं चमकत असतो. यास्तव या जगद्भ्रांतीविषयीं आग्रह धरून बसणें व्यर्थ आहे. पक्षाभिमान अज्ञानामुळें होत असतो. पण राघवा, तूं व या सर्व लोकांनीं तत्त्व काय आहे, तें जाणलें आहे. यास्तव क्षुद्र विषयासक्ति सोडून आता पुरुषार्थ साधा १६५.

सर्ग १६६—आत्मख्याति, तशाच दुसऱ्या ख्याति, प्रश्नोत्तरयुक्त ब्रह्मनीलशिलाख्यान.

**श्रीवसिष्ठ**—रामा, शिळेच्या उदराप्रमाणें घनस्वरूप व वाद्यांनीं कल्पिलेल्या चारी ख्यातींनीं रहित अशा या आत्मख्यातीला तूं यथार्थ शब्दानें जाण. आदि सर्गापासूनच हें असें चिदाकाशच पसरलें आहे. आत्म्यानें आत्मस्वरूपांतच सर्गता जाणली असल्यामुळें आत्माच सृष्टिख्याति होय. त्यामुळें त्यांत नद्या वहात नाहींत. कोणी वर उठून दुसरा कोणी बुडत नाहीं. तर हें शून्यच शून्यामध्यें दिसत आहे. वस्तुतः तें क्रियाशून्य आहे. म्हणून त्याला विद्वान् आत्मख्याति ( आत्म्याचें स्फुरण ) म्हणतात. याप्रमाणें सृष्टि चिन्मात्ररूप असल्यामुळें वाद्यांनीं कल्पिलेल्या–अख्याति, अन्यथा ख्याति, आत्मख्याति, व असत्–ख्याति–या चार ख्यातींची संगतीच लागत नाहीं; कारण ख्याति या शब्दांत ख्या हा

धातु व ति हा प्रत्यय असून त्याचा प्रभा व भाव हा अर्थ आहे, व तो आत्म्याचा स्वभावच होय. तेव्हां ख्याति, अख्याति इत्यादि कल्पना करण्याचें प्रयोजनच काय आहे? जग जर जड असतें तर दुसऱ्यानें केलेलें ख्यापन किंवा अख्यापन त्याच्या उपयोगीं पडलें असतें, पण तें जर स्वप्रकाश आत्माच आहे, असें आम्ही समजत आहों तर एका दिव्याच्या ख्यापनाला किंवा अख्यापनाला दुसऱ्या दिव्याची जशी गरज नसते तशी त्यालाही दुसऱ्या ख्यातीची गरज नाहीं. आता मनोराज्यादि दुसऱ्या दृश्यासारख्यांच ह्या चार ख्यातिही कल्पनामात्र आहेत, चिच्चमत्कार आहेत, असें जर म्हणाल तर मात्र कांहीं विरोध नाहीं. कारण हे सर्व चिदंशच भासत आहेत, यांत कांहीं संशय नाहीं. वाद्यांनीं कल्पिलेल्या ख्याति ह्या आत्मचैतन्याच्या विभूति आहेत. आम्हीही आत्मख्यातिवादीच आहों. पण आमच्या आत्मख्यातीचा अर्थ आदि-अंतशून्य, अनिर्वचनीय, चिदेकघन आत्मप्रथा ( चिद्विलास ) आहे. राघवा, याविषयीं मी एक उत्तम आख्यान सांगतों तें ऐक. हें द्वैतदृष्टींचें दूषण व बोधसूर्याचें प्रकाशनच आहे.

एक महा शिळा आहे. तिचें प्रमाण अनंत कोटी योजनें आहे. आसमंतात् नीलवर्ण असलेलें हें आकाश जर भिंतीसारखें होईल, तर त्याची त्या शिलेला उपमा देता येईल. ती शिला कठिण, निर्मल व विपुल आहे. अनेक कल्प होऊन गेले तरी ती जशीच्या तशीच स्थित आहे. तिची विशिष्ट जाति कोणालाही कळत नाहीं. त्याचप्रमाणें ती कशी, कोठें व केव्हा असते हेंही कळत नाहीं. चतुर्विध भूतग्रामानें रहित असलेल्या तिच्या हृदयात लेखामय ( रेघांचीं ) जाळीं आहेत. त्यांनाच आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी इत्यादि नांवें कल्पून त्या शिलेनें, काल्पित भूतजन्य देहलेखांमध्यें परिच्छिन्न झालेल्या स्वतःचेंच, जीव असें नांव कल्पिलें.

**श्रीराम**—पण गुरो, त्या शिलेला चेतनत्व कोठून आलें? स्वभावतःच अचेतन असलेली ती नांवें कशी कल्पील?

**श्रीवसिष्ठ**—ती विपुल व उज्ज्वल असलेली शिला चेतन नव्हती व

जडही नव्हती. तिला जाति म्हणून नव्हतीच. कारण तिची अमुक एक जाति आहे, असें जाणणारा कोण आहे ?

**श्रीराम**––भगवन् , तर मग तिच्या जठरातील आकाशादि लेखांना कोण व कसा जाणतो व तिच्यामध्यें त्या लेखा कोणी कोरल्या ? कारण छिद्ररहित असलेल्या तिच्यामध्यें शिरून टांकीनें कोणी त्या ( लेखा ) काढल्या असतील, हें संभवनीय दिसत नाहीं.

**श्रीवसिष्ठ**––खरें आहे. पण तिच्यावर लेखा काढता येणें शक्य नाहीं व त्या काढणाराही कोणी नाहीं. त्या अपार व अनंत शिलेनें हें सर्व व्यापलें आहे. तिच्यामध्यें लेखामय अनंत वृक्ष–पर्वतसंघ, नगरें, पुरें, इत्यादि आहेत. त्यात लेखामय देव–दानवादि आहेत. ते अत्यंत सूक्ष्म व निराकार असूनही साकार पुतळ्यांसारखे दिसतात. त्या शिलेंत आकाश नांवाची एक विपुल लेखा आहे. त्या लेखेंतच चद्र, सूर्य इत्यादि नांवाच्या अनेक उपलेखा आहेत.

**श्रीराम**––प्रभो, त्या लेखा कोणी पाहिल्या आहेत काय ? त्या कशा प्रकारच्या आहेत ? त्या पिंडात दिसतात कशा ?

**श्रीवसिष्ठ**––रामा, त्या मी पाहिल्या आहेत. तुझी इच्छा असली तर तूंही त्याना पाहूं शकशील.

**श्रीराम**––त्या शिलेचा भंग करतां येणें जर शक्य नाहीं तर आपण त्या लेखा कशा पाहिल्या ?

**श्रीवसिष्ठ**––रामा, मी त्या शिलेच्या जठरांतच स्थित आहें म्हणून त्यांना मी पाहूं शकलों. नाहींतर तिचा भंग कोण करणार? तिच्या उदरांत असलेल्या मीं तिच्याच उदरांत असलेलें हें सर्व पाहिलें.

**श्रीराम**––भगवन् , आपल्या या भाषणाचा अर्थ मला कळला नाहीं. यास्तव ती शिला कोण? आपण कोण? कोठें स्थित आहां? काय सांगत आहा व आपण हें काय पाहिलेंत, तें मला स्पष्ट सांगा.

**श्रीवसिष्ठ**––रामा, परमात्म्याची ही महा सत्ताच मी तुला सांगितली आहे. त्या परमात्ममहासत्तेच्या जठरांत आम्ही आहों. त्या सत्तारूप शिलेच्या स्वरूपभूतच हे आम्ही सर्व आहों. आकाश, वायु, इत्यादि सर्व

संबंध, इत्यादि-निमित्तें या प्रतिभासांत आढळत नाहींत. शिवाय या प्रतीतीचे बाह्य विषय विद्यमान नसतात.

**श्रीवसिष्ठ**——रामा, तूं म्हणतोस तें बरोबर नाहीं. जगाची प्रतीति ही भ्रांतिच आहे, स्मृति नव्हे. कारण ती अविद्या—निद्रा इत्यादि दोषांपासून झालेली असते. स्वप्रकाश चिदात्म्यामध्यें इंद्रियसंप्रयोगाचा ( संबंधाचा ) कांहीं उपयोग नसतो. शिवाय मागचा त्याच्यामागचा इत्यादि कितीही जरी अनुभव घेतले तरी तेही सांप्रतकालच्या अनुभवासारखेच असल्यामुळें त्यांनाही स्मृति म्हणावें लागणार व त्यामुळें त्या स्मृतीला कारण होणारा मूळ अनुभव कोणता हें कळणार नाहीं, तें नाहींच. यास्तव या जगाच्या प्रतीतीमध्ये स्मृतीची सामग्री नसून भ्रांतीचीच अवश्य तेवढी सर्व सामग्री आहे. शिवाय अविद्येमुळें येणाऱ्या प्रतीतीला व्यावहारिक भ्रांतींचीं सर्वच निमित्तें अवश्य आहेत, असें म्हणणें युक्त नव्हे. कांहीं दोष जरी संभवले तरी भ्रांतित्वाची उपपत्ति लागते. तर मग ही भ्रांति कोणाला झाली व जगत्, पृथ्वी, जीव इत्यादि नांवें कोणी केलीं ? म्हणून विचारशील तर सांगतों. स्वभाव न सोडणाऱ्या त्या ब्रह्मात्म्यानेंच आपल्या भानरूप स्वच्छ स्वभावालाच हें जाग्रत्, हें स्वप्न हें सुषुप्त इत्यादि नांव ठेवलें व स्वतः चित्स्वभाव असल्यामुळें तें ब्रह्म स्वस्वरूपातही स्थित आहे. वस्तुतः जाग्रत, स्वप्न, सुषुप्त, तुर्य किंवा त्याहून निराळें कांहीं नाहीं, तर सर्व शांत परमाकाश आहे. किंवा सदाच जाग्रत्, सदा स्वप्न, सदा सुषुप्त व सदा तुर्यच आहे. कारण त्या सर्वात्म्याच्या ठिकाणीं या चारी अवस्थांचीं-सदा स्पष्ट ज्ञान, जगत्भ्रांतिमात्रत्व, अविद्यावरणमात्रत्व, व सदा एकरूपत्व हीं चारी लक्षणें संभवतात. जग व सर्व अवस्था हें संवित्—चे आंतील सार आहे. यास्तव कशाचाही उदय किंवा अस्त होत नाहीं. आंतील संवेदनच बाह्य विषयासारखें भासतें. तेव्हां द्वैत, विषय किंवा जगत्प्रतीति ही स्मृति कशी असणार ? हें सर्व प्रकाशरूप आहे. यास्तव रामा, शुद्ध बुद्धीनें अंतःसंकल्परूप विकल्पजालाचें निरसन करून मनाला सकलशास्त्र निष्कर्षसिद्ध महार्थभूत सच्चिदानंदाद्वय आत्म्यामध्यें स्थिर कर व या संसारसागरांतून उडून मोक्षाख्य परम पदास जा. १६७.

सर्ग १६८—अबुद्धिपूर्वक सर्गाचा आरोप चिन्मात्ररूप आहे. चित् निर्विकार असल्यामुळें त्याचा निरास.

श्रीवसिष्ठ—वृक्ष जसा अबुद्धिपूर्वक ( म्हणजे मी शाखावैचित्र्य करतों या संकल्पावाचूनच ) शाखावैचित्र्य करतो त्याप्रमाणें जन्मादि विकारशून्य परमात्मा आकाशांत ( आकाशासारख्या स्वात्म्यांत ) शून्यरूप विचित्र सर्गाभास ( प्रपंचाध्यास ) करतो. श्रुतींत परमात्म्यानें ईक्षणपूर्वक सृष्टि केली असें सांगितलें आहे, हें खरें. पण तें ईक्षण म्हणजे मायावृत्ति आहे. बुद्धिवृत्ति नव्हे. कारण त्यावेळीं बुद्धितत्त्वाचा उदयच झालेला नसतो. सागर अबुद्धिपुरःसरच जसे तरंगादि करतो त्याप्रमाणें आकाशात्मा सर्वेश्वर सर्व जगत्प्रतिभास अबुद्धिपुरःसर करतो. नंतर तो स्वतः त्या स्वसंविदांचींच मन, बुद्धि, अहंकार, इत्यादि नावें ठेवितो. चित्-पासून बुद्ध्यादि तत्त्वांची सिद्धि होईतों हा सर्व आरंभ स्वतःच अबुद्धिपूर्वक होतो. बुद्धि झाल्यानंतर संकल्पिला जाणारा सर्व आरंभ मात्र बुद्धिपूर्वक होतो. भिंतीवरील चित्रांतील जग जसें आधारभूत भित्तिमय त्याप्रमाणें चित्—मधील जग चिन्मय होय. अबुद्धिपूर्वक रचनाही नियमानें समान आकारवाली होऊं शकते. याला वृक्ष, समुद्र इत्यादिकांपासून होणारा शाखा, तरंग इत्यादिकाचा आरंभ, हाच योग्य दृष्टान्त आहे. वृक्षाच्या पानें, फुलें, फळें, इत्यादिकांप्रमाणेंच चिद्वृक्षाचीं पृथिवीप्रभृति फुलें आहेत. अर्थात् पुष्पफलादिक वृक्षाहून जशीं पृथक् नाहींत त्याप्रमाणें चिदाकाश परमात्म्याहून हें सर्व अनन्य आहे. सर्ग हे चिद्वृक्षाचे पल्लव आहेत. ते चिद्रूप असल्यामुळेंच पृथक् नाहींत. पुष्पादिकाच्या सुवासाप्रमाणेंच हे चित्—मध्यें स्वभावतः तद्रूप होऊन राहतात. अग्नीहून उष्णता हिमाहून शैत्य इत्यादि जसें पृथक् नव्हे त्याप्रमाणेंच जग चिदात्म्याहून पृथक् नाहीं. सृष्टीच्या आरंभीं आकाशात व स्वप्नसमयीं हृदयांत जें दिसतें तें योग्य कारणावांचुनच दिसत असल्यामुळें चिदाकाशाहून पृथक् नाहीं. याविषयीं प्रायः प्रत्येकाला प्रत्यहीं दिसणारें स्वप्नच उत्तम दृष्टान्त आहे. विचार करा, व त्यांत चिन्मात्राहून व्यतिरिक्त काय आहे, तें मला सांगा. अहो, कांहीं कारण नसतांना कूटस्थ चित् अन्यथा कशी होईल ? स्वप्न संस्कारजन्य असल्यामुळें स्मरणच आहे, असें जर

म्हणशील तर तें बरोबर नाहीं. कारण स्वप्नांतील वस्तुजात प्रत्यक्ष भासत असतें. स्मरणसमयीं कोणतीही वस्तु प्रत्यक्ष असत नाहीं. अर्थात् स्मृतीचा विषय स्मृतिसमयीं परोक्ष असतो व स्वप्नाचा विषय 'हा' असा अपरोक्ष असतो. यास्तव स्वप्न स्मृति नव्हे. अर्थात् चिदाकाशच त्यावेळीं साक्षात् अनुभवास येणाऱ्या पदार्थाकारानें विवर्त पावत असतें, त्याच न्यायानें जगही चिद्विवर्त आहे. स्मृति, पृथ्वी, आकाश, बुद्धि इत्यादि हीं सर्व त्या विवर्तासच मागून कल्पिलेलीं नांवें आहेत. ब्रह्मा, शंकर, सूर्य, इंद्र, चंद्र, बाह्य जग, आंतर पदार्थ इत्यादि सर्व चिद्वृत्ति आहेत. पूर्ण ब्रह्मापासून निघालेलें हें सर्व पूर्ण ब्रह्मरूपच आहे. पण मी स्वतः अनुभविलेलें व वारंवार निरनिराळ्या युक्तींनीं सांगत असलेलें हें तत्त्व कांहीं मंदाधिकारी अद्यापि जाणत नाहींत व जाग्रत् सत्य आहे, स्वप्न मिथ्या आहे, इत्यादि कल्पना करीत राहिले आहेत. फार कशाला पण तुझ्यासारखे सूक्ष्मबुद्धिमान्ही जगद्भावनेस सर्वथा सोडीत नाहींत. तेव्हां मोहाची तीव्रता किती उग्र आहे, तें पहा. अरे अरे! १६८.

**सर्ग १६९**—ज्याचें चित्त विश्रांति पावलें आहे, अशा जीवन्मुक्ताचीं लक्षणें व आत्मवानाची सदा सुषुप्ति.

**श्रीवसिष्ठ**—ज्याला सुखसाधनभूत विषय सुखकर व दुःखसाधनभूत विषय दुःखकर वाटत नाहींत त्या अंतर्मुख मतिमानाला नित्य मुक्त म्हणतात. ज्याची चिदाकाशांत स्थिर झालेली बुद्धि भोगसाधनें समीप असतानाही निश्चल राहते तो मुक्त होय. ज्याचें चित्त चिन्मात्रामध्यें निश्चल विश्रांति पावतें व तेथेंच रममाण होतें त्याला जीवन्मुक्त म्हणतात.

**श्रीराम**—भगवन्, सुखसाधनांना सुखावह व दुःखसाधनांना दुःखावह न समजणारा मानव जड व अचेतनच असला पाहिजे!

**श्रीवसिष्ठ**—रामा, असें म्हणूं नकोस. कारण शुद्ध बोधवान् पुरुष चिदाकाशांत अगदीं तन्मय झालेला असल्यामुळें प्रयत्नावांचून तो सुखसाधनांना सुखावह समजत नाहीं. म्हणूनच त्याला विश्रान्त (विश्राम पावलेला) म्हणतात. विवेकबलानें ज्याचे सर्व संदेह शांत झालेले असतात, जो विषयांविषयीं रसिक नसतो, ज्याचे सर्व समारंभ कामसंकल्पशून्य असतात, जो प्राप्त होईल तसें आचरण करितो,

संसारचिन्मात्र आहे, असें जाणून जो चिदात्म्यामध्यें स्थिर विश्रांति घेत राहतो, जे या संसारमार्गांत दीर्घकाल धांवून आतां विश्रांति घेत असतात, ते व्यवहार करीत असतानाही निजल्यासारखे दिसतात. स्वप्ननगरांत फिरणारे जन जसे वस्तुतः शय्येवर स्वस्थ घोरत पडलेले असतात, त्याप्रमाणें जे भाग्यवान् देहानें या मायिक जगांत विहार करीत असतानाही आंत मनानें स्वस्थ असतात तेच पुरुष धन्य होत. त्याना जड कसें म्हणता येईल? पुष्कळ मार्ग चालून अतिशय थकलेला पुरुषही स्वस्थ व कांहीं भाषण न करितां निश्चल बसलेला असतो, पण त्याला कोणी जड म्हणत नाहींत. मग याला तरी जड कां म्हणावें? ज्ञानी सर्वोत्तम बोध व अतिशय शांति यांमध्यें तल्लीन असतो. इतर प्राणी या दुःखदायी दृश्याविषयीं अतिशय सावधान असतात; पण तो त्याविषयीं सदा निजलेला व सुखी असतो. जो सर्व कर्तव्याचा अनादर करून आत्म्यामध्येंच स्थिर होतो त्याला आत्माराम म्हणतात. या दुःखसागरांतून पार झालेला तो आत्म्यामध्यें विश्रांतिसुखाचा अनुभव घेत राहतो. संसार-संज्ञक दीर्घ मार्गांत आसक्ति ठेवून राहणाऱ्या पुरुषाला चतुर, क्रूर, व दुःखद विषय कसे कसे दुःख देतात व अनर्थांत पाडतात याचा त्यानें चांगलाच अनुभव घेतलेला असल्यामुळें तो त्याच्या पार जाऊन सुखानें आत्म्यामध्यें शयन करतो. आत्मज्ञ मोठें घर, शय्या, इत्यादिकांची मुळींच अपेक्षा न करिता, सर्व चेष्टा सोडून सदा निजल्याप्रमाणेंच शांत पण आत्म्याविषयीं सदा जागरूक असतो. खरोखर ही त्याची अवस्था मोठी आश्चर्यकारक आहे. ज्ञानी जातां, येतां, खातां, पितां सदा निद्रित व आत्म्याविषयीं सदा जाग्रत् असतो. तत्त्वज्ञाची निद्रा कांहीं अपूर्व असते. ती कांहीं केल्या जात नाहीं. तिच्यामध्यें लीन झालेल्याही त्यांचे नेत्र मिटत नाहींत. पण त्याचे नेत्र उघडे असले तरी जग दिसत नाहीं. परमार्थाच्या मदानें मत्त झालेला तो आत्मज्ञ आपल्याच ज्ञानगुंगींत असतो. सर्व जगाला मिळून परम पूर्णतेस प्राप्त झालेला तो आकंठ अमृतपान करून, अहाहा! आनंदानें निजतो. तो सद्रूपानें सर्वत्र राहतो. हें आपलें जग त्या आनंद-महासागराच्या एका कोपऱ्यांत व अणूसारखें आहे, असें जाणून निरहंकार व समचित्त होऊन तो प्रारब्धक्षय होईतों एका सुंदर,

उपकारक व चिरपरिचित सुहृदाच्या सहवासानें रममाण होत अवशिष्ट आयुष्य घालवितो व त्यानंतर देहत्याग करून निरतिशय आनंदरूप विदेह कैवल्यात विश्रांति पावतो १६९.

**सर्ग १७०**—पुत्र–स्त्री–भृत्य इत्यादिकांसह असलेल्या स्वकर्म–संज्ञक सुहृदाचें व त्याच्या गुणांचें वर्णन.

**श्रीराम**—ज्ञानी ज्याच्यासह रममाण होतो तो याचा सुहृद् कोण? व तो रममाण कसा होतो?

**श्रीवसिष्ठ**—सहज कर्म, लोकसंग्रहार्थ केलेलें कर्म व सच्छास्त्राभ्यास, विचार, सत्संग, शम, दम, तितिक्षा, उपरम, शौच, संतोष, ईश्वरप्रणिधान, संयम इत्यादि स्वोपकारक कर्म असें त्रिविध शुभ कर्म हाच त्याचा चिरमित्र होय. तो जीवावर केवढींही भयंकर संकटें जरी आलीं तरी त्याला एक क्षणभरही सोडीत नाहीं. उत्तम सुहृदाचे-विश्वास, अकार्याविषयीं लज्जा, शांति, कोपराहित्य, समाधानरूप अमृत देणें, दुर्गममार्गांतून व संकटातून पार करणे, सर्व विश्वासांचें पात्र होणें, बाल्यापासून सहवास, दुश्चेष्टांपासून निवारण करणें, पित्याप्रमाणें रक्षण, लालन व पालन करण्यांत रत, अप्रिय न करणें इत्यादि सर्व उत्कृष्ट गुण त्याच्यामध्यें असतात. तो मित्र सर्व शीलांचा रक्षक, आधिव्याधियुक्त चित्ताचें औषध, विशेषेंकरून पांडित्याने वंद्य झालेल्या जीवाचा विनोद करणारा, राजादिकास अनुकूल व दानपरायण करणारा, सताशीं संगति करविणारा, व यज्ञ–दान–तप इत्यादिकांत प्रेरणा करणारा आहे. रामा, अशा प्रकारच्या त्या स्वकर्मसंज्ञक आत्ममित्राशीं जीवन्मुक्त स्वभावतःच रममाण होतो. त्या मित्राची भार्याही सदा त्याच्याबरोबर असते. त्याचा पुत्रादि पोष्यवर्गही मोठा आहे. स्नान, दान, तप, ध्यान, हे त्याचे पुत्र असून त्या महात्म्यावर सर्व प्रजा अनुरक्त असते. त्या स्वकर्माख्य मित्राची मुदिता ही भार्या आहे. ती चंद्राच्या कोरीप्रमाणें सर्वांस आल्हाद देते. दयेमुळें ती सदा धन देत असते. ती साध्वी चित्ताचें आकर्षण करते. समताही तिची सखी आहे. ती मुदितेला सोडून एक क्षणभरही रहात नाहीं. ती नित्य आनंद देणारी आहे. धर्म व धैर्य यांविषयींची जी बुद्धि तीच त्या धीर मित्राच्या पुढें धावणारी दासी होय. त्याला मंत्र ( सल्ला ) देणारी

मैत्री सदा त्याच्या पाशींच असते. श्रेष्ठ मर्यादा–कार्याचा उपदेश देणारी व स्वार्थ साधून देणारी सत्यता त्याच्या धनाची अध्यक्षा आहे.

रामा, अशा प्रकारच्या सपरिवार मित्रासहवर्तमान व्यवहार करणारा जीवन्मुक्त त्दृष्ट होत नाहीं व क्रोध करीत नाहीं. शांत मनानें प्राप्त स्थितींत सुखानें राहतो. तो लोकदृष्ट्या व्यवहार करीत असला तरी आंतून चित्राप्रमाणें निश्चल असतो. आत्मवस्तुरहित वादामध्यें तो मुक्यासारखा राहतो. तो निष्प्रयोजन शब्द ऐकत नाहीं. लोकाचाराच्या विरुद्ध असलेल्या कर्मामध्यें तो शवासारखा जड व श्रेष्ठ आचार-विचारात वासुकि किंवा बृहस्पतीसारखा वेगवान् असतो. वाणीनें पुण्य-कथाच बोलणारा, कपट्याचीं कपटें ओळखणारा, अतर्क्य वस्तूंचाही निर्णय सांगणारा, महावक्ता, समदृष्टि, उदरात्मा, दाता, योग्य विभाग करणारा, मृदु, स्निग्ध, मधुर, सुंदर व पुण्यकीर्तनानें युक्त असा तो जीवन्मुक्त असतो. ज्याच्या बुद्धि ज्ञानसंपन्न आहेत, ते महात्मे अशा असंख्य स्वाभाविक गुणांनीं मंडित असतात. ज्याप्रमाणें चंद्र, सूर्य व अग्नि यांचा प्रकाश दुसऱ्याच्या प्रेरणेनें त्याच्यामध्यें आलेला नसतो त्याप्रमाणें त्यांचे हे उत्तम गुण प्रयत्नानें संपादिलेले अथवा दुसऱ्याच्या प्रेरणेनें त्यांच्यामध्यें आलेले नसतात १७९

**सर्ग १७१**—जीवन्मुक्तांची प्रतिष्ठा व सर्व संदेहाची शांति याकरिता पुनः तत्त्वोपदेश व दृश्याचें निराकरण.

**श्रीवसिष्ठ**––हें चिदाकाशच जगद्रूपानें भासतें. पण वस्तुतः जगत्, शून्य किंवा भास, यांतील काहीं नाहीं. कारणावाचूनच परमात्म्यापासून दृश्याचा संभव कसा होणार? या दृश्याचें अणुमात्र बीजही संभवत नाहीं. यास्तव निर्विषय चित् हेंच सार व सत्य आहे. तेंच हें सर्व मूर्त वस्तुजात आहे. तात्पर्य काहीं मूर्त असो कीं अमूर्त असो; जें आहे तें ब्रह्म आहे. त्याला दुसरा कोणताही पदार्थ प्रकाशित करूं शकत नाहीं. कारण सूर्य–चंद्रादि सर्व प्रकाशमय पदार्थांची सिद्धि त्याच्या योगानेंच होत असते. तत्त्ववेत्त्याला चित्–वाचून दुसरें काहीं दिसतच नाहीं. जें आहे तें सर्व ब्रह्म आहे. त्याचा हा सर्व प्रकाश आहे. तो त्याच्या इतकाच नित्य आहे. जाग्रदादि अवस्थाही त्या प्रकाशाहून

पृथक् नाहींत. कारण त्या जर तशा असत्या तर चिदात्म्याला प्रतीतच झाल्या नसत्या. तत्त्वज्ञ मनानें कांहीं करीत नाहीं. तो त्याचा स्वभावच आहे. त्यामुळें रामा, महात्मा विद्वान् शांतचित्त, क्षीणसंकल्प, स्वात्मसुखनिरत, व त्यामुळेंच अतिशय तृप्त असतो १७१.

**सर्ग १७२**—विधाता मनोमात्र आहे; त्याचा संकल्प हाच जगाचा भ्रम; त्याचा देह स्मृति नव्हे, स्मृतीचें तत्त्व.

**श्रीवसिष्ठ**—येणेंप्रमाणें पृथिवी इत्यादिकांनीं रहित चिदाकाशच प्रजापति आहे. तो मनःसमष्टि हिरण्यगर्भरूप आहे, असें मी मानतों. मन संकल्परूप असल्यामुळें चिन्मात्र आहे. त्याचीं बुद्ध्यादिक दुसरीं कार्येंही चित्—हून भिन्न नाहींत. सृष्टीच्या आरंभीं प्रजापतीचें शरीर उत्पन्न होण्यास योग्य कारण नसतें. पूर्वकल्पांतील प्रजेश्वर मुक्त झालेला असल्यामुळें या प्रजापतीला वर्तमान सृष्टि निर्माण करण्याची आठवण होण्याचेंही कांहीं कारण दिसत नाहीं. संसारांत घोटाळत राहणाऱ्या जीवांना पुनः संसाराची स्मृति व त्याच्या देहाचा उदय होणें जसें शक्य आहे त्याप्रमाणें विदेहमुक्तांना स्मृत्यादि होण्याचा संभव नाहीं आणि या कल्पांतील प्रजापतीला पूर्वकल्पांतील ‘ मी हिरण्यगर्भ आहे ’ अशा दृढ उपासनेनें स्मृति होऊन तिच्या योगानें त्याचे देहादि भाव उद्भवतील म्हणून म्हणावें तर तेही पृथिव्यादिरहित शांत व संकल्पनगरासारखे सूक्ष्मच असणार, यांत कांहीं संशय नाहीं. कारण ते भाव मनोमय असतात. पण प्रत्यक्ष दिसणाऱ्या या ब्रह्मांडात्मक स्थूल विराट्—शरीराला मनोमात्रता कशी असणार? म्हणून म्हणशील तर सांगतों—संकल्पपर्वत स्पष्ट दिसत असूनही जसा पृथिवीप्रभृति स्थूल आकारानें रहित असतो, त्याप्रमाणें विराट् शरीरही वस्तुतः निराकार आहे, असें समज. शिवाय रामा, आरंभीं प्रजापतीची स्मृतिच संभवत नाहीं. तर मग ‘ धात्यानें पूर्वी जसें होतें तशीच पुनः याची कल्पना केली ’ या श्रुतीवरून स्मृतीचें ज्ञान कसें होतें ? म्हणून म्हणशील तर तेंही सांगतों. जग सत्य आहे, असें जाणणाऱ्या अज्ञांच्या बुद्धीनें अनादिसिद्ध असलेला कर्ममार्ग प्रवृत्त करण्यासाठीं श्रुतीनें त्या अज्ञांच्या भाषेनें हें वर्णन केलें आहे. वास्तव तत्त्ववेत्त्या प्रजापतीच्या बुद्धीनें स्मृति नाहीं. कारण रामा, कार्यकारणात्मक जग जर संभवतें तर मग त्याच्या

अनुभवानें स्मृति व तिच्या योगानें देहादिभाव संभवले असते. पण मूळा-लाच जेथें ठिकाण नाहीं तेथें शाखा कोठची ? हें आब्रह्मस्तंभपर्यंत दृश्यच जर असत् आहे तर स्मृतीचा संभव कोठचा ? यास्तव सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवाला जगाचें स्मरण होत नाहीं.

आतां लौकिक स्मृतिही ब्रह्मदेवाच्या मनांत कशी संभवत नाहीं तें पहा—मागच्या वस्तूची किंवा घडलेल्या गोष्टीची संस्कार-वशात् मनात आठवण होणें, यालाच लोकांत स्मृति म्हणतात. पण या कल्पाच्या आरंभीं नवीन होणाऱ्या प्रजापतीच्या पूर्वी जगातील एकही पदार्थ नसतो. तेव्हां त्याला लौकिक-स्मरण तरी कोठून होणार ? हें सुद्धा मी लौकिक स्मृतीचा अंगीकार करून बोलत आहें. तत्त्वतः पाहिल्यास सर्व चिन्मात्र असून स्मृति संभवतच नाहीं. तात्त्विकदृष्ट्या आम्हाला अनुभव व स्मृति यांत कांहींच फरक दिसत नाहीं. कारण अनुभव जसा वृत्तिरूप तशीच स्मृतिही वृत्तिरूप. अनुभवाप्रमाणेंच तीही चिदाभासानें विषयाकार धारण केल्यामुळेंच होते. बाह्य पदार्थांचा अनुभव जसा मनात होतो तसाच स्मृतीचा विषयही मनात भासतो. तात्पर्य सर्व भाव चिद्विवर्त असल्यामुळें सर्व ब्रह्ममय आहे. त्याच्यावरील या विवर्तांनाच मूढांनीं निरनिराळीं नांवें देऊन अनेकता उत्पन्न केली आहे. स्मृति व अनुभव सद्रूपानेंच भासत असतो. म्हणून तत्त्वज्ञ त्याचा भेद मानीत नाहींत. परिचित पदार्थाकार वृत्ति झाली कीं, त्यातील चिदाभासाला स्मृति व ती अपरिचित पदार्थाकार झाली म्हणजे तिच्यातील चिदाभासाला अनुभव म्हणावा, असा लोकांनीं नुस्ता संकेत केला आहे. परंतु निरानिराळ्या स्थानातील अथवा दशेंतील एकाच मनुष्याला व्यवहाराकारितां भिन्न भिन्न संज्ञा जरी योजल्या तरी त्यामुळें स्वतः त्या मनुष्यामध्यें जसें कांहीं अंतर पडत नाहीं, अथवा तो प्रत्येक जागीं निर-निराळा होत नाहीं त्याप्रमाणें चित्मध्येंही काहीं अंतर पडत नाहीं. यास्तव सर्व जग चित्च आहे. वृत्तीच्या अनुरोधानें चिदाभास क्षणोक्षणीं जरी बदलत असला तरी तो, त्याचा औपाधिक आकार स्थिर नसतो. पण कोणत्याही दशेंत त्याच्या सत्—रूपांत कधींही बदल पडत नाहीं. सारांश राघवा, हें ब्रह्मच सुंदर जगद्रूपानें विकास पावलें आहे. पण तें जगाचें

कचन स्फुरण व अकचन या दोन्ही अवस्थेंत स्वरूपांत स्थित असतें. तें दृश्यासारखें दिसलें तरी अतिशय शांत व निर्मळ आकाशच असतें. तथापि अज्ञांना तेंच अनादिकालापासून उत्पत्तिप्रलयपरंपरायुक्त आहेसें वाटतें १७२.

सर्ग १७३—चित्–लाही देहादि जडभाव कसा येतो व ती सर्वात्मिका कशी; तें सांगतात.

**श्रीराम**—सर्वानुभवरूप व सर्वात्मक अशाही ब्रह्माला देहाचे ठिकाणीच अहंभाव ठेवण्याचें कारण काय? त्याचप्रमाणें चित्–ला अचित काष्ठपाषाणादि भाव कसा प्राप्त झाला?

**श्रीवसिष्ठ**—रामा, जीव सर्व शरीराला अहं असें म्हणत असतांनाही हाताला हातच, पायाला पायच इत्यादि अनादि संस्कारामुळें जसें म्हणतो त्याप्रमाणेंच सर्वात्म ब्रह्मही देहाला अहं म्हणतें. स्वप्नात चित्‌लाच जसा काष्ठादि अचिद्भाव येतो तसा चिदाकाशालाच सृष्टीच्या आरंभीं अचित्–पणा येतो. स्वप्नातील जग आकारशून्य चित्तापासूनच झालेलें असल्यामुळें तें निराकारच आहे, यात कांहीं संशय नाहीं. तथापि तें साकार असल्यासारखा जसा अनुभव येतो त्याप्रमाणें चित् ब्रह्मही साकार झालें आहेसें वाटतें. शिवाय मायाशबल ब्रह्म चेतनाचेतनरूप एक वस्तु असल्यामुळें त्याला दोन्ही प्रकारचा व्यवहार प्रवृत्त करतां येणें शक्य आहे. ज्यानें त्यानें आपापल्या शरीराकडेच पहावें, म्हणजे निर्णय होईल. साराश राघवा, याप्रमाणें हें जग स्थावर–जंगमात्मक जरी भासलें तरी तें वस्तुतः निराकार आहे. तत्वज्ञ त्यालाच पहातात. म्हणूनच त्यांना इतरांच्या दृष्टीनें जसेंच्या तसेंच असतांनाही ज्ञान ब्रह्मरूप दिसतें. तरंग जळ आहे, असें जाणल्यावर त्याला जशी तरंगता रहात नाहीं तसेंच हें सर्व ब्रह्म आहे, असें जाणल्यावर जग निराळें रहात नाहीं.

साराश विराट्च सर्ग, सर्गच स्वप्न व स्वप्नच व्यष्टि-समष्टि जाग्रदेह आहे. जशी गाढ निद्रा स्वप्नसंवेदन होते, त्याप्रमाणें प्रलयांत अविद्या-तिमिरानें आवृत झालेला आत्माच जगत्संवेदन होतो. त्या विराटाचें जग हें सर्व स्थूल अंग आहे. कल्पांतील अवांतर प्रलय हे त्याचे केंस, कालसंज्ञक दिनरात्री, या अंगसंधी; पूर्व व पश्चिम दिशा हेच कान, चंद्र व सूर्य

हे नेत्र इत्यादि प्रकारें मनःकल्पनाच विराडाकारानें विकास पावली आहे. यास्तव निष्प्रपंचता हाच परमार्थ आहे. रामा, शुद्ध ब्रह्मपर, सर्वज्ञ ईश्वरपर, व उपासनापर वेदान्ती, जैन, सांख्य, योगी, बौद्ध ( सौत्रांतिक, वैभाषिक, योगाचार, माध्यमिक ) पाशुपत, वैष्णव व असेच आणखी दुसरेही जगांतील वादी आपापल्या दर्शनामध्यें जशा जशा वासनांचें प्रतिपादन करीत असतात त्या त्या प्रमाणें ब्रह्म स्फुरण पावतें व तेंच त्या त्या वाद्यांना त्यांच्या त्याच्या निश्चयाप्रमाणें फल देतें. त्याचा असा अचिंत्य महिमा असल्या कारणानें तेंच मायाशबलरूपानें सर्वात्मक आहे १७३.

सर्ग १७४—ज्ञानानें स्वप्नाप्रमाणें या दृश्याचें मार्जन केलें असता अवशिष्ट राहणारा चिदात्माच परमपद आहे, असें वर्णन करितात.

**श्रीवसिष्ठ**—रामा, अनेक सर्ग हे या ब्रह्मसागराचे तरंग आहेत. जागें झाल्यावर स्वप्न जग जसें होतें तसेंच आत्मसाक्षात्कारानतर हें जाग्रज्जग शून्य होतें. स्वप्नभ्रमाप्रमाणें जाग्रत् हाही भ्रम आहे, असें स्वानुभवानें सिद्ध होत असताना अनुमानानें त्याच्या सत्यत्वाची सिद्धि करणाराची धन्य असो. जगाचा बाध झाल्यावांचून निर्विकल्प समाधीपर्यंत ध्यान जरी केलें तरी त्याचा निस्तार होणें शक्य नाहीं. कारण निर्विकल्प हें परम जाड्य व सविकल्प भाव हीच संसृति होय. त्यामुळें ध्यानाच्या योगानें चित्तसमाधान जरी झालें तरी पुरुषार्थ मिळणें शक्य नाहीं. कारण आनंद हाच पुरुषार्थ आहे. धर्म, अर्थ व काम हे तिन्ही आनंदरूप असल्यामुळेंच त्याना पुरुषार्थ मानलेलें आहे. पण त्यापासून होणारा आनद नित्य नसतो. तो विरुद्ध वृत्तींनीं बाधित होतो. म्हणूनच त्यांना परमपुरुषार्थत्व नसतें. निरतिशय व नित्य आनंद हाच परम पुरुषार्थ आहे. पण तो नुसत्या ध्यानानें प्राप्त होण्यासारखा नाहीं. म्हणूनच योग्यांना आनंदरहित केवळ चिद्रूप आत्मा जरी साक्षात्-अनुभवास आला तरी हा परम पुरुषार्थ प्राप्त होत नाहीं. कारण समाधीमध्यें अवशिष्ट राहणारें ज्ञान आनंदरूप आहे, असा त्याचा अभ्युगपमच नाहीं. त्याच प्रमाणें वैशेषिक त्याला जड समजतात. त्यांच्यामतीं मोक्ष म्हणजे जडभाव; एकवीस महादुःखांची आत्यंतिक निवृत्ति. पण अशा अवस्थेंतील आत्म्याला जर मुक्त म्हणावयाचें तर

बिचाऱ्या दगडांनींच काय अपराध केला आहे? तेही मुक्त कां नव्हेत? योगी ( म्हणजे ईश्वरवादी सांख्यच ) निर्विकल्प समाधीच्या अभ्यासानें जडरूप होतात; पण आम्ही त्या अवस्थेला मोक्ष समजतच नाहीं. कारण तिच्यामध्येंही निद्रेप्रमाणेंच चित्ताचें स्थैर्य व अज्ञानावरण असतेंच. आत्मरूप ब्रह्माला निरतिशय आनंदस्वरूप न मानणाऱ्या वाद्यांना मोक्षाचें शुद्ध स्वरूप सांगता येत नाहीं. यास्तव जगत् भ्रांतिमात्र व आत्मा निरतिशयानंद चिदेकरूप आहे, असे म्हणणाऱ्या आमचाच शेवटीं जय होतो. तत्त्वज्ञानानें भ्रांतीला कारण होणारें अज्ञानावरण क्षीण झालें म्हणजे भ्रांतिही आपोआप क्षीण होऊन अवशिष्ट राहणारा आत्माच परमपुरुषार्थ आहे, हा आमचा पक्षच सर्वांना आश्रय करण्यास योग्य आहे. जीवन्मुक्ततेचा जो उदय तेंच निर्विकल्प समाधान व तेंच अनंत निर्वाण होय. यथार्थ बोधाची अतिशयिता हेंच ध्यान व तेंच परम पद आहे. तें पाषाणासारखें जाड्य नव्हे, सुषुप्त नव्हे, निर्विकल्प नव्हे. व सविकल्प नव्हे. हा अशा प्रकारचा बोध व ध्यान या शास्त्रासारख्या सर्वोत्तम शास्त्राचा सतत विचार केल्यानेंच प्राप्त होणें शक्य आहे. त्यावाचून नुसत्या तीर्थ–दानस्नानादिकांनीं तो प्राप्त होत नाहीं. कारण ही जर शुद्ध भ्रांति आहे, तर ती ज्ञानावाचून नुसत्या ध्यान–योग–यज्ञ–याग इत्यादिकांनीं कशी जाईल. त्याच्या योगानें फार तर स्वर्ग मिळेल. पण मोक्ष मिळूं शकणार नाहीं. वटबीजादि द्रव्यामध्यें जसा वृक्षरूपी चमत्कार साठवलेला असून तोच अनुकूल सामग्री मिळाली असता वृक्षाकारानें बाहेर स्फुरण पावतो त्याप्रमाणें मायाशबल चिदाकाशांत ही सृष्टि असून तिच्याच पुढें उत्पत्ति–स्थिति–लय इत्यादि दशा उद्भवतात १७४.

सर्ग १७५—अज्ञान असे तोंच जगत्. तें गेलें कीं राहणारी शुद्ध चित्‌च मोक्ष.

श्रीवसिष्ठ—रामा, हा अनादि निधन चिद्धातु असा प्रभावशाली आहे. त्याच्यामध्यें नसलेलेंही जग दिसतें. तें योग्यकारणरहित आहे; म्हणूनच मिथ्या व त्यामुळेंच सच्चिन्मय. एवढ्यासाठीं राघवा, मनाला ब्रह्माचा स्वाद घेण्याची संवय लावावी. चित्त ज्याविषयीं रसिक होतें त्याच्याकडे जातें, असा नियम आहे. तें ज्याच्याविषयीं दृढ निश्चय करतें तेंच त्याला सत् तत्त्व वाटतें. यास्तव जगाला तुच्छ समजून त्याला परमात्मपरायण करावें.

चित्त आत्मनिष्ठ झालें म्हणजे शांत व नित्यानंदरूप जीवन्मुक्तता उदय पावते. शांत ब्रह्मच सर्व आहे. सर्व विधि व निषेध त्याचेच अंश आहेत. पण हा महा भ्रम असल्या शास्त्रांचा गुरुमुखानें अभ्यास केल्याशिवाय शांत होणार नाहीं. ? कारण चित्ताला नुस्ता निरोध करून काय होणार ? व तो होणार तरी कसा ? यास्तव शास्त्राभ्यासानें त्याचा व जगाचा बाध करावा, म्हणजे तें असलें तरी जगाला पाहणार नाहीं. कारण चित्ताचा संसाराला सोडून न राहण्याचा स्वभावच असल्यामुळें त्या दोघांचाही ज्ञानानें साक्षात् बाध झाल्याशिवाय द्वैतानुभव शांत होणार नाहीं, हें उघड आहे. चित्त जसें संसाराला सोडून राहूं शकत नाहीं त्याप्रमाणेंच दृश्यरूप संसृतिही चित्त व शरीर या दोघांना सोडून राहूं शकत नाहीं. पण शास्त्राचा अभ्यास केल्यानें कांहीं बलवत्तर प्रतिबंध नसल्यास याच जन्मीं तत्त्वज्ञान होऊन त्यांची शांति होते. पण कांहीं बलवत्तर प्रारब्ध प्रतिबंध असल्यास उत्तर जन्मीं त्याचा क्षय होतांच तीं दोन्हीं (दृश्य व चित्त) शांत होतात. चित्तामुळेंच दिसणारीं तिन्हीं शरीरें ज्ञानानें शांत होतात, या सर्व कष्टावह अनर्थांचें कारण अज्ञानच आहे. ज्याच्या बुद्धीला परमार्थाचे बरेचसे संस्कार झालेले असतात त्यांचें अज्ञान हा ग्रंथ एकदा वाचताच शांत होतें. त्यांना पुढचे सदर्भ पूर्वीच स्फुरूं लागतात. यास्तव कंटाळा न करितां हा दीर्घ भ्रम शांत व्हावा म्हणून या शास्त्राचें अध्ययन कर. त्याचा अर्थ समजून घे. रामा, त्याचा तूं चांगला विचार कर. म्हणजे तूं कांहीं विचित्र अवस्थेस जाऊन पोचशील. अहो सभागत पुरुषांनो, या मोक्षशास्त्राचा यथाशक्ति विचार करा; पण हें शास्त्र ऋषिप्रणीत असल्यामुळें स्मृतिरूप आहे. यास्तव—तिच्या मूलभूत श्रुतींचाच आम्हीं विचार करूं.—असें जर कोणाचें म्हणणे असेल तर त्यानें उपनिषदादि आत्मप्रतिपादक सभाष्य व ससूत्र ग्रंथांचें अध्ययन खुशाल करावें. हाच ग्रंथ प्रत्येक साधकानें वाचावा असा आमचा आग्रह नाहीं. प्रत्येकानें आत्मविमुख होऊं नये, अशी मात्र सर्वांस प्रार्थना आहे. कोणीकडून तरी तुम्हीं आत्मज्ञान संपादन करून सर्व दृश्याचा आत्म्यामध्यें होम करा. सोन्याच्या राशी दिल्यानेंही आयुष्याचा एक क्षणसुद्धां मिळणार नाहीं, हें जर निश्चित आहे तर त्याला व्यर्थ घालविणें हा महा प्रमाद नव्हे काय?

अहो सज्जनांनो, हें दृश्य जरी प्रत्यक्ष अनुभवास आलें व तें जरी अंतः-करणोपहित ब्रह्मासह (जीवरूप द्रष्ट्यासह) असलें, तरी स्वप्नांत दैवयोगानें पाहिलेलें आपलें मरण व त्या आपल्या प्रेताच्या सभोंवार असलेल्या बांधवाचें रोदन जसें असत तसेंच तेंही असत् होय १७९.

**सर्ग १७६—सृष्टीच्या आरंभीं चिदणूमध्यें ब्रह्मांडे स्वप्नाप्रमाणें भासतात, याविषयीं ब्रह्मदेवानें सांगितलेलें चिदाख्यान.**

**श्रीराम**—भगवन्, सांप्रतकाळीं असंख्य जगें आहेत, पूर्वीं असंख्य होऊन गेलीं व पुढें होणार आहेत. पण त्यांतील वर्तमान सृष्टिच बंध देणारी आहे. यास्तव शास्त्रात त्याचा (इतरांचा) निर्देश करणें व्यर्थ आहे. कारण भूत, भविष्यत् व सांप्रतकालींही असलेलीं इतर जगें जीवाला बद्ध करूं शकत नाहींत.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तुझें म्हणणें जरी खरें आहे तरी ह्या शास्त्राचें श्रवण करण्यास योग्य असलेल्या अधिकारी जनाला जगत्—शब्दाचें यथार्थ ज्ञान व्हावें, म्हणून शास्त्रात त्यांचा निर्देश केलेला असतो. तथापि लौकिकदृष्ट्या हा तुझा आक्षेप योग्य आहे. पारमार्थिक दृष्ट्या मात्र तो बरोबर नाहीं. कारण तत्त्वज्ञाला सर्वत्र मीच द्रष्टा आहें, असें साक्षात ज्ञात झालेल असल्यामुळें भूत, वर्तमान व भविष्यत् ब्रह्मांडें एकरूप दिसतात. त्याला त्या सर्वांमध्यें व या दृश्य जगामध्यें अंतर मुळींच दिसत नाहीं. यास्तव त्याला उद्देशून शास्त्रात तिन्ही काळच्या जगाचा अभाव प्रतिपादिलेला असतो. तशीच तत्त्ववेत्त्याची सांप्रत काळच्या दुसऱ्या ब्रह्मांडात अथवा भविष्यत्काळच्या असंख्य ब्रह्मांडांतही पुनरावृत्ति (पुनर्जन्म) होत नाहीं, हें सुचविण्यासाठींही शास्त्रांत सर्व ब्रह्मांडाचें मिथ्यात्व सांगितलेलें असतें. सर्व ब्रह्मांडें स्वप्न—प्रपंचासारखीं असल्यामुळें मूळ अज्ञानाच्या बाधानें त्यांचा बाध होऊं शकतो, हें प्रतिपादन करण्यासाठीं शास्त्रात त्याचा उल्लेख करणें अवश्यच आहे. अरे बा रामभद्रा, चैतन्यघनाच्या प्रतिअणु-एवढ्या भागांत असंख्य जगें आहेत. त्यांचा निरनिराळा व्यवहार चालत असतो. त्यांची गणना करण्यास कोण समर्थ आहे! याचविषयीं माझ्या पित्यानें मला पूर्वी सांगितलेलें एक आख्यानच

मी तुला सांगतों तें ऐक. 'प्रभो हें जगज्जाल केवढें आहे व तें कोठें राहतें.' असें मी विचारलें असतां तो मला असें म्हणाला—

"मुने, ब्रह्मच हें सर्व जग भासतें. याविषयीं तूं हें ब्रह्मांडाख्यान ऐक. आकाशांत आकाशाहून अभिन्न असा चिदाकाशाचा परमाणु आहे. तो आकाशाच्या शून्यरूपाप्रमाणें अथवा वायूच्या शुद्ध स्पंदाप्रमाणें त्या आकाशाचा स्वाभाविक धर्म आहे. त्यानें स्वप्नाप्रमाणे आपल्या स्वरूपांतच आपल्याला जीवत्व आलेलें पाहिलें. त्यानंतर तो जीव आपलें आकाशरूप न सोडतांच 'अहं' असें आपल्याला समजला. त्या आकाशरूपी अहंकारानें बुद्धीची कल्पना केली. ती एक, निश्चय करणारी व मायेप्रमाणें असत् विषयाचाही भ्रम करविणारी होती. त्या बुद्धीनें मी मन आहें, असें असन्मय पाहिलें. त्या मनानेंच देहाची कल्पना केली. तो देहच त्रिभुवनात्मक विराट देह होय. तो वस्तुतः आकाशात्मा असून भासुर विस्तारलेला आहे. तो देह अनेक भूतानीं व्यापलेला व नाना स्थावर-जंगम जीवानीं युक्त आहे. स्वप्नांत प्रत्येक जीव जसा निरनिराळा प्रपंच पाहतो, त्याप्रमाणें प्रत्येक व्यष्टि जीव हें द्रष्टा, दृश्य, दर्शन, भोक्ता, भोग्य, भोग व कर्ता-कार्य-करण या नऊ रंगानीं विचित्र झालेलें जग पाहतो. प्रत्येक जण आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें तें पाहतो. प्रत्येक जीवाच्या आंतील सूक्ष्म परमाणूंत स्थूल सृष्टि आहे. याप्रमाणें पसरलेली ही अविद्या अनंत आहे. पण तिचें तत्त्व कळलें असतां ती ब्रह्माप्रमाणें निर्मल होते. ज्ञानानंतर सर्व शांत ब्रह्म दिसतें. राघवा, जलांतील तरंगाप्रमाणें या अज्ञात ब्रह्मामध्यें असंख्य ब्रह्मांडें राहिलीं आहेत १७६.

सर्ग १७७—जग कल्पनेनें सकारण पण वस्तुतः अकारण ब्रह्म.

**श्रीराम**—भगवन्, हें जग जर अकारणच ब्रह्मापासून उद्भवत असेल तर शेतें नांगरणें, पाऊस, धान्य पेरणें इत्यादिकांची काय आवश्यकता आहे?

**श्रीवसिष्ठ**—ज्यानें जशी कल्पना केली असेल तसें त्याला दिसतें. ब्रह्म स्वभावतःच कल्पनाकल्पनात्मक आहे. अनात्म जग कल्पनात्मक व चिदंश अकल्पनात्मक, असें तें मिश्रित आहे. तें सर्वशक्तिरूप असल्यामुळें अकारण पदार्थता व सकारण पदार्थत्व, असें दोन्हीं त्याचे ठिकाणीं संभवतें. त्याची अचिंत्य मायाशक्ति त्याच्या आधारानें हें सर्व करून

दाखविते. तत्त्वदृष्ट्या मात्र ब्रह्म अनादि—अनंत ठरून सर्वभावरहित होतें. कार्यकारणता व्यावहारिक आहे. यास्तव आम्ही व्यवहारव्यवस्थापक कारण-कार्यतेचें निवारण करीत नाहीं. तर जग सत्य आहे, असें म्हणून त्याचें ब्रह्मातिरिक्त प्रधान—परमाणु इत्यादि कारण आहे, असें सांगावयास जे तयार होतात, त्याचें निराकरण करतों, एवढेच काय तें. यास्तव हें जें कांहीं आहे किंवा नाहीं असें वाटत असतें तें सर्व ब्रह्मच आहे. अतत्त्वज्ञाच्या दृष्टीनें कारण-कार्यभाव आहे, असेंही म्हणता येत नाहीं. कारण ब्रह्माला साक्षात् जरी नाहीं तरी परोक्षही न जाणणारा असा जीवच आम्हाला माहीत नाहीं. कारण सर्व एकबोधमय आहेत. शांत विज्ञानघनरूप आहेत. तेव्हा ते जीव अब्रह्मज्ञ आहेत, असें कसे म्हणता येईल? शिवाय जीव ब्रह्माला ओळखीत नाहींत, असें म्हटल्यास ते आपणालाच ओळखीत नाहींत, असें होणार? पण तें अनुभवाच्या विरुद्ध आहे यास्तव हा सर्व ब्रह्मसत्तेचाच विलास आहे. त्यामुळें सर्व भाव सकारण आहेत व अकारणही आहेत. कारण जीव-संवित् जशी कल्पना करते तसें तिला दिसतें. पण ज्ञान होऊन अनुभवशाली पुरुषाच्या दृष्टीनें एक अखंड अद्वय चिन्मात्र सिद्ध झालें, म्हणजे मग सर्व प्रकारची कारणता शांत होते. मग सर्गाचें कारणच अवशिष्ट रहात नाहीं. त्यामुळें तो अकारण आहे. पण असें असतानाही वादी ईश्वरादिकांविषयीं जी भलभलतीच कल्पना करीत सुटतात ती व्यर्थ आहे. दृश्याची स्थूला-काररूप दृश्यता वस्तुतः नाहींच. कारण ती जर असती तर आत्मसाक्षा-त्कारानंतर तिचा बाध झाला नसता. पण तो होतो, असा विद्वानांचा अनुभव आहे. स्वप्नातील पृथिव्यादिकाच्या अनुभवाचें कारण चिद्घना-वांचून दुसरें काय आहे? हें स्वप्न आहे, असें समजेपर्यंत स्वप्नातील जग महामोहांत पाडीत असतें. पण तेंच त्याचें मिथ्यात्व ज्ञान झालें असतां मोह होत नाहीं. तशीच या सर्गाची अवस्था आहे. पण असें असतानाही जे शुष्कतर्क, हठ इत्यादिकाच्या योगानें अनुभवाचाही तिरस्कार करून कांहीं कारणाची कल्पना कारितात त्याचा तो नुस्ता आग्रह आहे. आतां कारण अवश्य असलेंच पाहिजे म्हणून म्हणशील तर अज्ञात ब्रह्मस्वभावच कारण आहे, असें जाण. पण शेंकडों ध्यान करणारांनीं कल्पिलेल्या एका ध्येयाचें निमित्त काय असणार? गंधर्व नगरांतील भिंतीचें कारण काय

आहे? धर्म व अधर्म हीं देहाचीं कारणें आहेत, असें कोणी म्हणतात. पण अमूर्त धर्माधर्म मूर्त देहाचें कारण कसे होतील? विज्ञानवादी बौद्ध अमूर्त व क्षणिक विज्ञान हेंच मूर्त व अक्षणिक जगाचें कारण आहे, असें म्हणतात. पण तेंही युक्तिशून्य आहे. चार्वाक अंकुर-स्वभावाचें काळ, भूमि, जल इत्यादिकासह बीजस्वभाव हें कारण आहे, असें म्हणतात. पण स्वभावाचा स्वभाव या एकार्थवाचक पदाचा अर्थ आम्हाला कळत नाहीं. शिवाय प्रत्येक वस्तूचा निर-निराळा स्वभाव मानिल्यास गौरव दोषही येतो. यास्तव सर्व भाव व त्यांचीं कारणें हा अज्ञांचा विषय आहे. ज्ञान्याला ही सर्व अकारण भ्रांति वाटत असून सर्व ब्रह्मरूप भासत असतें. म्हणूनच अज्ञ लोकांनीं शेकडों अपराध जरी केले तरी ज्ञानी पुरुषाला दुःख वाटत नाहीं. त्याचप्रमाणें त्याचें जीवितही सुखावह होतें. तस्मात् दुसरी कोणतीही उपपत्ति लागत नसून जग हा ब्रह्माचा विवर्त आहे, हीच कल्पना शेवटीं योग्य ठरते. रामा, हें सर्व ब्रह्माकाश आहे. जसे सर्ग तसेच शब्दही चिन्मात्र आहेत, इतकें कळल्यावर मग शास्त्रादिकाचा विचारही क्लेशावह होतो. शिवाय वासनाशून्य चित्तशांति हाच मोक्ष असल्यामुळें मग शास्त्रविचाराची गर-जही रहात नाहीं. बोधसत्ताच वासनादि नानारूपानें भासत असते. त्यामुळें एकत्वसाक्षात्कार झाला म्हणजे सर्व स्वप्नसदृश भासाचा क्षय होतो. १७७.

**सर्ग १७८**—ऐंदवाख्यानानें अमूर्त चित् मूर्त जगाला कशी चलन देऊं शकते, त्याचें सयुक्तिक वर्णन

**श्रीराम**—भगवन्, या त्रिभुवनांत पदार्थ मूर्त व अमूर्त असे दोन प्रकारचे आहेत. त्यांतील कांहीं सप्रतिघ ( प्रतिघातास योग्य ) व कांहीं अप्रतिघ असतात. जे एकमेकांस संश्लिष्ट करीत नाहींत ( एकमेकाशीं संसर्ग पावूं शकत नाहींत ) त्याना अप्रतिघ व जे परस्पर संश्लिष्ट होतात ते सप्रतिघ होत. त्यामुळें सप्रतिघांचा संसर्ग होत असल्याचें प्रत्यक्ष दिसतें. पण अप्रतिघांचा संसर्ग आढळत नाहीं. आपण संवेदन म्हणून ज्याला म्हणतां तें अप्रतिघ आहे. कारण चंद्राला पाहणाऱ्या पुरुषाच्या हृदयांतून निघून नेत्रकिरणांच्या द्वारा चित्तासह चंद्रमंडलांत जाऊन पड-

णाऱ्या संवेदना अमूर्त आहेत, अप्रतिघ आहेत, हें सर्वांना ठाऊक आहे. यास्तव मी आतां ज्ञानी नव्हे व अगदीं अज्ञही नव्हे, अशा अर्धप्रबुद्धाच्या दृष्टीनें आपणांस असें विचारतों कीं, हा मूर्त प्राणवायु देहांत जाणें व बाहेर येणें यांच्या योगानें देहाला प्रवृत्त करतो, असें जरी म्हटलें तरी त्या प्राणवायूला आंतून प्रेरणा कोण करतो? जीवात्मक चिदाभास तें कार्य करतो म्हणून म्हणावें, तर अप्रतिघ चिदाभास सप्रतिघ देहास चलन कसा देऊं शकेल? आणि अप्रतिघ वस्तूही सप्रतिघ वस्तूला चालवूं शकते म्हणून म्हटल्यास पुरुषाच्या नुसत्या संवित्तीनें पर्वत कसा चलायमान होत नाहीं.?

श्रीवसिष्ठ—रामा, बाह्य वायु जसा लोहाराच्या भात्यांत शिरून त्याला हालवितो त्याप्रमाणें प्राणवायुही कंठादिकांतून आंत शिरून व बाहेर पडून देहाला हालवितो.

श्रीराम—पण त्या भस्त्रेला (भात्याला) खालीं-वर करून त्यात वायूला शिरकविणारा लोहार सचेतन व सप्रतिघच असतो. यास्तव अचेतनाला चालविणारा कोणी चेतनच असला पाहिजे. तो कोण? या शरीराला प्रतिक्षणीं हालविणाऱ्या वायूला प्रेरणा कोण करतो? अंगांतील लक्षावधि नाड्यांतून संचार करणाऱ्या व्यान वायूचा हा स्वभावच आहे, म्हणून म्हणावें, तर शरीराचा व्यापार सदोदित होणें अवश्य आहे. पण तो तसा होत नाहीं. शिवाय अमूर्त चैतन्याचा संश्लेष देहांतही होत नाहीं. त्याचा आध्यासिक ( अध्यासामुळें होणारा ) संबंध तर काष्ठ, पाषाण इत्यादिकांशींही आहे. तेव्हां शरीरें सचेतन व ते मात्र अचेतन कसे? बर स्थावर वृक्षादि पदार्थही सचेतन आहेत, म्हणून म्हणावें तर त्यांच्यामध्यें जीवशरीराप्रमाणें स्पंद का नाहीं. 'कार्यकारणस्वामिनी भोक्त्याची संवित्च आंतून त्याला लोहाराप्रमाणें प्रेरणा करते' म्हणून म्हणाल तर शरीर, त्यांतील आतडी इत्यादि सर्व यंत्र सप्रतिघ असतांना त्याला अप्रतिघ संवित् कशी चालविणार? ही माझी मोठी शंका आहे.

श्रीवसिष्ठ—रामा, मी तुझ्या या शंकेचें निरसन करतों. बाबारे, सृष्टींत तूं समजतोस तसें सप्रतिघ कांहींच नाहीं. तर हें सर्व सदा शांत अप्रतिघ आहे. सर्व शुद्ध संविद्—मय आहे. तूं ज्याला सप्रतिघ म्हणतोस तें

सर्व अकारण व म्हणूनच चिन्मात्र आहे. याविषयीं तूं आता हें ऐंदवा-ख्यान ऐक. मी तें सर्व पूर्वी ( उत्पत्ति प्रकरणात ) सांगितलेंच आहे. पण तुझ्या प्रश्नाचा उलगडा होण्यासाठीं तेंच पुनः थोडक्यात सांगतों, एक. म्हणजे पर्वतादि हें सर्व चित्च कसें, तें तुला कळेल. उत्पत्ति प्रकरणात वर्णिलेल्या जगासारख्या एका जगांत एक तप, वेदाध्ययन व आचरण यानीं संपन्न असा इदु नावाचा द्विज होता. त्याला दहा पुत्र झाले. तेही सर्व महाशय, महात्मे, महात्म्याचे आश्रय, व पुरुषार्थी होते. पण कालवशात् त्याचा पिता मरण पावला. त्याच्या आईनें सह-गमन केलें. त्यामुळें अतिशय दुःखी झालेले ते ऐंदव आईबापाचें और्ध्व-देहिक कर्म करून अरण्यात गेले. त्या दहाही भावानीं एका निर्विघ्न स्थानीं बसून आपण कोणत्या धारणेनें आपलें कल्याण करून घ्यावें, याचा विचार केला व शेवटीं निश्चय करून चतुर्मुख ज्याचा अधिष्ठाता आहे तें ब्रह्मांडच मी आहें अशी धारणा धरून ते सर्व निश्चल होऊन राहिले. चित्राप्रमाणें असलेल्या त्याचीं शरीरें काहीं महिन्यांनीं सुकून गेलीं. तथापि त्या सर्वांचीं ध्यानामध्यें मग्न झालेलीं चित्तें दीर्घ काल 'मी ब्रह्म व ब्रह्मांड आहें,' असें चिंतन करीत होतीं. बऱ्याच दिव-सानीं त्या दृढ भावनेमुळें त्यातील प्रत्येकाचें निरनिराळें ब्रह्मांड बनलें. त्याची चिदिच्छाच जग झाली. त्यामुळें प्रत्येक जग निराकार व अतिशय स्वच्छ होतें. त्यातील पर्वतादि सर्व चिन्मय होतें.

राघवा, त्याच न्यायानें या जगांतील हें सर्व स्थूलही जग चिन्मय आहे. त्या दहा ऐंदवाचे दहा संकल्प जसे जगद्भावास प्राप्त झाले तसाच या जगाच्या प्रजापतीचा संकल्प या जगद्रूपास प्राप्त झाला आहे. यास्तव हे सर्व पर्वत, वृक्ष, पृथ्वी, मेघ, इत्यादि सर्व चिन्मात्र आहे. चिदाकाश-कुंभारानें आपल्या देह–द्रव्यानेंच हें सर्व निर्माण केलें आहे. रामा, संकल्पानें निर्मिलेल्या या सर्गांतील पाषाणादिक जर चेतन नव्हेत तर ते व त्यासारखेच हे पर्वतादिक काय आहेत, तें तरी तूं सांग. अनुभव, स्मृति व स्मृति–कारण संस्कार, इच्छा, इत्यादि सर्व संवित्–चेच प्रकार आहेत. ते सर्व आपल्यामध्यें अभिव्यक्त चिन्मात्रच धारण करितात. जड विषयाना धारण करूं शकत

नाहींत. त्यामुळेंही अनुभवादिकांना चिन्मयताच आहे. अहो, तें महा तेजच चित्तात तृणादि बाह्य वस्तूंच्या आकारानें उदय पावतें. त्याला कोणी कोठेही प्रतिबंध करूं शकत नाहीं. जलाच्या निम्न प्रदेशगमना-प्रमाणे हा सर्व चेतन ब्रह्माचाच स्वभाव आहे. अर्थात् रामा, हें जग भावाभावरहित मध्य अवस्थेंत स्थित आहे. म्हणूनच तृण, पर्वत, वृक्ष, काष्ठें याना अचेतन म्हणणाऱ्या मूढाना ज्ञानी नेहमीं हंसत असतात. या सृष्टींत आत्माच या सव संकल्पमय वस्तूंना जाणतो. त्या वस्तूही आत्म-सत्तेनेंच व ब्रह्मसंकल्पानेंच सत्तायुक्त होतात. यास्तव सर्व जग चिन्मय आहे, ही दृष्टि जितकी जितकी दृढ करीत जावें, तितकें तितकें दुःख कमी होऊं लागतें व शेवटीं तर तें सर्वथा लय पावतें. पण तेंच जगाला जगाच्या दृष्टीने वारवार पाहूं लागले म्हणजे दुःखही वाढत जातें. दुष्कर्मामुळे दीर्घकाळ मूढ झालेल्या जीवाना ही उत्तम दृष्टि प्राप्त होत नाहीं. त्यामुळें त्याचा संसार वज्रासारखा दृढ होतो. तो कदापि शांत होत नाहीं. तात्पर्य या जगात आकार, सत्ता, असत्ता, जन्म, नाश इत्यादि काहीं नाहीं. तर तें सर्व या परमार्थ चित्सत्तेंतच स्फुरत आहे. या स्फुरणाचा अभाव झाला असता ते ब्रह्म स्फटिकस्तंभासारखें होतें. त्यानंतर स्फटिक स्तंभात दिसणारीं साकार प्रतिबिंबेंही जशीं कधीं कोणाच्या हातीं लागत नाहींत त्याप्रमाणें त्यात भासणारीं सर्व प्रतिबिंबें नाहींतशीं होतात व तें स्वतः कैवल्य बनते. ( त्यानतर तू वर जशा घेतल्या आहेत तशा शकांना व विकल्पाना अवकाशच रहात नाहीं ) १७८.

**सर्ग १७९**—सर्व अप्रतिघ असल्यामुळें पूर्वोक्त शंकेला अवकाशच नाहीं, असें सागतात.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, याप्रमाणें हें सर्व त्रिभुवन शुद्ध सत्स्वरूप आहे. तेव्हा अज्ञानीं सप्रतिघ व मूर्त म्हणून कल्पिलेलीं भूतें या सृष्टींत संभवत नाहींत. मग भौतिक शरीरादि सप्रतिघ वस्तु कोठून असणार ? हें जें कांहीं दिसत आहे, ते अप्रतिघ ब्रह्मच पसरलें आहे. चिदाका-शात चिदाकाश, शांतामध्यें शात, आकाशांत आकाश व ज्ञप्तीमध्यें ज्ञप्ति विकास पावत आहे. सर्व संविन्मय आहे. तेव्हां तू म्हणतोस तें सप्रतिघ आहे कोठें ? आणि तेंच जर नाहीं तर तुझी शंका तरी युक्त

कशी होणार ? देह, त्याचे अवयव इत्यादि तर स्वप्नदेहाप्रमाणें चिन्मात्र आहे. हात, पाय, डोकें, इंद्रियें, इत्यादि सर्व सप्रतिघ आहे. रामा, मी या प्रत्यक्षसिद्ध पदार्थांचा अपलाप करीत आहें, असें तूं समजूं नकोस. कारण जगत्स्थिति हा ब्रह्माकाशाचा स्वरूप स्वभाव असल्यामुळें हें सर्व सहेतुक व अहेतुकही संभवतें. तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें ब्रह्म निर्विकार व अद्वय असल्यामुळें व जगाचें दुसरें कारण संभवत नसल्यामुळें त्याची उत्पत्तिच होत नाहीं, म्हणून तो जगदुत्पत्तीचा अपलाप करणार. पण भ्रांतिमान् अतत्त्वज्ञाच्या दृष्टीनें हें सर्व अनादि असल्यामुळें कारणपरंपरेचा संभव असतो. शिवाय त्यांना ब्रह्माचें ज्ञान नसतें. त्यामुळें त्यांच्या दृष्टीनें उत्पत्ति, स्थिति इत्यादि सर्व संभवतें. तात्पर्य जो तो आपापल्या निश्चयाप्रमाणें पहातो. पण युक्तिवाद्यांच्या दृष्टीनें विचार केल्यास—कारणा-वाचून उत्पन्न झालेलें व संविदात्मत्वानें अनुभवास येणारें हें जग अत्यंत असत्‌ही नाहीं व अत्यंत सत्‌ही नाहीं. तर तें सत्–सारखें आहे, असें म्हणणें युक्त ठरतें. परंतु रामा, मायावाद्याच्या दृष्टीनें पाहिल्यास या सर्वांची स्वप्न, गंधर्वनगर, गारुड इत्यादिकांप्रमाणें सुरेख उपपत्ति लागते. कारण त्या वादात नुसत्या संकल्पानेंच जें एक असतें तें सहस्र होतें व सहस्र असतें तें एक होतें. अनेक नद्यांचा एक समुद्र व एका कालाचे युग, कल्प, वर्ष, अयन, ऋतु इत्यादि अनेक भाग कसे होतात, तें प्रसिद्ध आहे. साराश हा देह स्वप्नाप्रमाणें संविद्–आकाश मात्र आहे. तो अनुभवाचा विषय होत असला तरी स्वप्नातील पर्वता-प्रमाणें निराकार आहे. त्रिपुटीमानालाच हें जग भासतें. स्वप्नांतील भयाप्रमाणें, त्यापासून होणारा संताप ज्ञानानें शमतो. एक मायाशक्तिच अनेकाकार भासते. सर्ग हे आनंदसागराचे बिंदु आहेत. वास्तव ते त्याहून थोडेसेही पृथक् नाहींत १७९.

**सर्ग १८०—कुंददंताख्यानातील वृक्षावर लोंबत राहणाऱ्या तापसाची वरलाभा-पर्यंत कथा.**

**श्रीराम**—भगवन्, आतां माझा हा एक संशय घालवा. एकदां मी एकाग्रमनानें विद्वानांच्या विद्यागृहांत बसलेलों असतांना तेथें एक तापस आला. तो केवळ विद्वानच नव्हे तर कांतियुक्त दूर्वासाप्रमाणें अतिशय

तेजस्वी व त्यामुळेंच दु:सहही होता. त्यानें सभेंत प्रवेश करितांच तिला नमस्कार केला. तो योग्य आसनावर बसला व त्याला आम्हीही सर्वांनीं प्रणाम केले आणि मी आपले वेदात साख्यपाठ संपवून विश्रांति घेत बसलेल्या त्याला म्हटलें,–' भगवन्, आपण फार दुरून चालून आलां असून थकलां आहा, असें दिसतें. तेव्हा आपण कोठून आलां तें मला सांगा.'

ब्राह्मण—राघवा, तूं म्हणतोस तें खरें आहे. बा महाभागा, मी येथें येण्याचा हा मोठा यत्न केला आहे. यास्तव मी कशाकरिता आलों आहें, तें तूं ऐक. वैदेह या नांवाचा सर्व सौभाग्यसंपन्न देश आहे. त्यांतील मी ब्राह्मण आहें. मी विद्या प्राप्त करून घेऊन तेथें राहिलों, माझे दांत कुंदाच्या फुलाप्रमाणें शुभ्र असल्यामुळें मला कुंददन्त असें म्हणतात. कांहीं दिवसांनीं मला विरक्ति येऊन मी विहार करूं लागलों. अनेक देवांचीं, मुनींचीं व ब्राह्मणाचीं पुण्यस्थानें पाहिलीं. रामा, प्रवास करता करतां मी एकदा श्रीपर्वतावर आलों. तेथें मी पुष्कळ दिवस अनुग्र व दीर्घ तप करीत राहिलों. त्या पर्वतावर एक अरण्य आहे. पण त्यात तृण–वन इत्यादि कांहीं नाहीं. त्यात मध्यभागींच एक अनेक शाखावान् वृक्ष होता. तो लहान व कोमलपल्लवयुक्त असून शून्य आकाशांतील मंद किरणवान् सूर्याप्रमाणें दिसत होता. त्याच्या एका शाखेवर एक पवित्र आकाराचा पुरुष लोंबत आहे. मौंज तृणाच्या दोरीनें त्याचे पाय वर बांधलेले असून मस्तक खालीं लोंबत होतें. त्या वनात गेलेल्या मीं त्याला एकदा पाहिलें व जवळ जाऊन आणि हात जोडून आपल्या मनांतच विचार केला.-हा कोणी महात्मा जिवंत तर आहे. कारण याचा श्वास चालला असून शिवाय त्याचा देह अक्षत आहे. शीत, वात व ऊन याचे स्पर्श याला समजत आहेत. यास्तव आपण याची सेवा करावी. असा विचार करून मी त्या पुरुषाची पुष्कळ दिवस सेवा केली. त्यामुळें हळू हळू त्याचा मजवर विश्वास बसत चालला. अशा रीतीनें आणखीं कांहीं दिवस गेल्यावर मी त्याला विचारलें–भगवन्, आपण कोण आहां ? हें दारुण तप कशाकरितां करतां ? फार उशीरानें श्वासोच्छ्वास करीत असल्यामुळें आपलें जीवितही सहज ध्यानांत येत नाहीं.

तें ऐकून तो महात्मा मला म्हणाला, " साधो, तूं माझ्या कुळदेश तप-इत्यादिकांविषयीं का प्रश्न करीत आहेस ? त्याच्या ज्ञानापासून तुला कांहीं लाभ होणार आहे का ? कारण व्यर्थ गोष्टी कोणी जाणूं इच्छित नसत " पण त्यावर मी त्याला आपली हकीकत सागण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. तेव्हा तो म्हणाला, " मी मथुरेंत झालों व पित्याच्या येथें वाढलों. बाल्य व यौवन याच्या मध्यभागीं असतानाच मला शब्दशास्त्र व अर्थ-शास्त्र यांचें ज्ञान झालें होतें. पुढें यौवनात प्रवेश करताच मला भोगाची इच्छा झाली. तो मी राजा सर्व सुखसामग्रीनें युक्त असतो, असें कोणा-च्याशा तोंडून ऐकलें आणि सप्तद्वीप पृथ्वीचें सार्वभौमपद मिळावें म्हणून येथें येऊन हें असें उग्र तप करूं लागलों. मला येथे रहावयास लागून बारा वर्षे झालीं. हे मानदा, तूं माझा निष्कारण मित्र आहेस. आता तूं आपल्या इष्ट स्थानीं जा. मीही आपल्या इष्ट प्राप्तीकरिता दृढ निश्चयानें असेंच अनुष्ठान करीत राहतों. "

पण मी त्याला फिरून बोललो-" साधो, तुला इष्ट वर मिळेपर्यंत मीही येथेंच राहून तुझें रक्षण, परिचर्या, इत्यादि करतों." मी इतकें बोलत आहें तोंच तो शांत व पाषाणमौनवान् झाला. मेल्याप्रमाणें तो निश्चेष्ट बनला. त्यानें आपले नेत्र मिटले. पण तें आश्चर्य पाहूनही मी निश्चयानें काळाचे भिन्न भिन्न वेग सहन करीत, उद्विग्न न होता, साहा महिने तेथें राहिलो. एकदा सूर्यमंडळातून निघून एक सूर्यासारखा अति तेजस्वी पुरुष त्याच्या पुढें आलेला मला दिसला. त्याची तो व मी मनानें व शरीरानें जों पूजा करीत आहों, तों तो असें अमृतप्राय वचन बोलला, " अरे या वृक्षाच्या अग्रावर लोंबत राहून तप करणाऱ्या ब्राह्मणा, तूं आपलें हें उग्र तप पुरें कर व मजपासून इष्ट वर मागून घे. सात सागर व द्वीपें यांचें जिच्या सभोंवार वेष्टन आहे, अशा पृथ्वीचें पालन याच शरीरानें तूं सात सहस्र वर्षें करशील. इतकें सांगून तो दुसरा सूर्य मंडलांत शिरला.

तो गेला असता मी त्या महातापसाला, आता इष्ट वर मिळालेला असल्यामुळें, तप पुरें करून खालीं येण्याची सूचना केली. ती त्यानें मान्य केली. त्याबरोबर मीं वृक्षावर चढून त्याच्या पायांस बांधलेली दोरी

सोडली व त्या दीर्घ तापसाला खालीं उतरून बसविलें. कांहीं वेळानें एकसारखें लोंबत राहिल्यामुळें शरीरातील शिरांना आलेला ताठपणा घालवून तो महात्मा स्नान करावयास उठला. अवश्य कर्म करून तपः-पुण्यप्रभावानें त्याच वृक्षापासून प्राप्त झालेल्या फळानीं माझ्यासह त्यानें पारणा केली. त्यानंतर आम्ही दोघेही तेथें पुण्यवशात् प्राप्त झालेलीं गोड फळें भक्षण करीत व अनेक रम्य गोष्टी बोलत तीन दिवस आनंदानें राहिलो. नंतर सूर्यपुरुषापासून अभिमत वर प्राप्त करून घेऊन तो महात्मा मजबरोबरच आपल्या मथुरा नगरीस जावयास निघाला १८०.

सर्ग १८१—मथुरेस जात असताना वाट सोडून गौरीवनांत जाणें व तेथील वृद्ध तापसाशीं संवाद.

कुंददन्त—राजपुत्रा, चद्र व सूर्य जसे सायकाळीं इंद्रनगरीस जावयास प्रवृत्त होतात त्याप्रमाणें आम्ही दोघे दिवसभर मार्ग चालून सायंकाळीं मुदित मुखाने निवासस्थानीं जावयास निघालों. आम्हाला जवळच रोध नावाचा गाव लागला. त्याच्या जवळच्या आम्रवनात राहून आम्ही विश्रांति घेतली. पुढें सालीसे नगरात आम्ही दोन दिवस विश्राति घेतली; व पुढचा मार्ग आनंदित चित्तानें क्रमू लागलों. मार्गांत अनेक प्रकारचे सुखकर पदार्थ आम्हाला दिसले. मधुर जळ, शीतल छाया, मंद वायु, सुगंधी वृक्ष व सुरस फळें याचा ठिकठिकाणीं लाभ होत असल्याकारणानें आम्हाला तो प्रवास अतिशय सुखावह झाला. आम्ही याप्रमाणें आनंदानें मार्गाचें आक्रमण करीत तीन दिवस प्रवास केला. चवथ्या दिवशीं आम्हांला गौरीच्या आश्रमाचा मार्ग लागला. तेव्हां तो महा तापसी त्या मार्गानें जाऊं लागला व मला म्हणाला—“ साधो, हा गौरीच्या आश्रमाचा मार्ग आहे. तो आश्रम अनेक मुनींच्या समूहानें मडित झालेला असतो. माझे दुसरे सात भाऊ माझ्याप्रमाणेंच सार्वभौमत्वाच्या इच्छेनें तप करीत आहेत. त्या निष्पापाबरोबर मीही येथेंच पूर्वी सहा महिने तप करीत होतों. तो पवित्र आश्रम येथून दिसत आहे. त्याच्या सभोंवार असलेल्या वृक्षांचा समुदाय फार शोभतो. त्याच्या द्वाराशीं हरिणांचीं बाळें आनंदानें क्रीडा करीत असतात. कांहीतर स्वस्थ झोंप घेत पडतात. वृक्षावरील पोपट शास्त्रांतील नानावाद बोलतात. यास्तव मित्रा, आपण त्या आश्रमांत

जाऊं या. ब्रह्मलोकाप्रमाणें असलेल्या त्याच्या नुसत्या दर्शनानेंच आमचें चित्त अतिशय स्वच्छ होईल. तत्त्वदर्शनानें ज्याचें चित्त तृप्त झालेलें असतें त्याचें दर्शन घ्यावयास विद्वानांचें मन नेहमींच उत्सुक असतें."

असो; राघवा, त्यानें असें सांगितलें असतां मीही त्याच्या बरोबर चाललों. थोड्याच वेळांत आम्हीं त्या आश्रमास येऊन पोंचलों. पण आम्ही त्या महा अरण्यांत त्या संहाररूपी आश्रमास जों पहात आहों तों त्यांत आम्हांला वृक्ष, पर्णशाला, झाडांचा समुदाय, मानव, मुनि, हरिणबालकें, पक्षी इत्यादिकांतील कांहीं आढळलें नाहीं. केवल शून्य व उन्हानें तापलेलें अरण्य पसरलें होतें. 'हाय हाय, हें काय कष्टावह घडलें!' असें म्हणून आम्ही दोघेही तेथें इतस्ततः भटकू लागलों. बऱ्याच वेळानें आम्हाला एक वृक्ष दिसला. तो शीतळ छाया व हिरवीं पानें यांनीं युक्त असून त्याच्या खालीं एक वृद्ध तापस समाधानांत स्थित होता. त्याला पाहून आम्हाला मोठा आनंद झाला व तो समाधि सोडून उठेपर्यंत आम्ही दोघेही त्याच्या अग्रभागीं छायेमध्यें हिरव्या गवतावर बसलों. पण बराच वेळ तो समाधि सोडून उठेच ना. तेव्हां मला कंटाळा आला व मीं 'अरे बा मुने, आता तुझी समाधि पुरे कर. ऊठ एकदा.' असें मोठ्यानें म्हटलें. तेव्हा त्याची समाधि भंग पावली व तो देहभानावर येऊन जांभया देत आम्हास म्हणाला "तुम्ही दोघे कोण आहां? येथील गौरीचा आश्रम कोठें गेला? मला येथें कोणी आणलें? व आता कोणतें वर्ष चाललें आहे?"

तें ऐकून मी उलट बोललों, "भगवन्, आम्हाला यांतील कांहीं एक माहीत नाहीं. पण आपण एवढे ज्ञानी असून स्वतःच कां जाणत नाहीं." माझे हे शब्द कानीं पडताच तो मुनि ध्यानस्थ झाला व त्यानें अंतर्दृष्टीनें आपलें व आमचेंही सर्व वृत्त जाणलें. दोन घटिकांनीं ध्यान सोडून तो आम्हांस म्हणाला, "तुम्ही कार्यज्ञ आहां. यास्तव काय आश्चर्य घडलें तें ऐका. तुम्ही हा जो कदंबवृक्ष पहात आहां तें माझें निवासस्थान आहे. कांहीं कारणानें सती गौरी सरस्वती होऊन दहा वर्षे या अरण्यांत राहिली. सर्व ऋतु तिची सतत सेवा करीत होते. त्यामुळें हें अरण्य अतिशय विस्तीर्ण व भूषित झालें होतें. तें गौरीवन या नांवानें प्रख्यात झालें.

यांत भ्रमरादि सर्व मधुलोलुप जीव, सर्व प्रकारचे पुष्पित व फलयुक्त वृक्ष, वापी, कूप, सरोवरें, विविध पशु, पक्षी, मानव, गंधर्व, यक्ष, किन्नर इत्यादि सर्व असून त्यांतील सर्व जीव आनंद भोगीत होते. असो; अशा प्रकारच्या या विचित्र वनात शंकराची अर्धांगी कांहीं काल कदंब वागेश्वरी होऊन चिरकाल राहिली. त्या कारणानेंच हें वन इतकें संपन्न झालें होतें.

सर्ग १८२—त्याच्या भ्रात्यांचा घरांतील समागम, वर आणि शाप यांचें कारण व सिद्धि.

वृद्धतापस—साधूंनो, त्या वनातील या कदंबवृक्षामध्यें दहा वर्ष वास करून गौरी आता आपल्या मूळ स्थानीं गेली आहे. तिच्या स्पर्शरूपी अमृतानें सिक्त झालेला हा वृक्ष आईबापाच्या मांडीवर लोळणाऱ्या बालकाप्रमाणें अद्यापि वृद्ध होत नाहीं. गौरी निघून गेली असता आसपासच्या लोकांनीं ज्याच्यातील तृण—काष्ठें इत्यादि नेऊन त्यावर आपला निर्वाह चालविला आहे, असें हें अरण्य बाकीच्या अरण्यासारखें शुष्क व शून्य झालें. आता मी आपला वृत्तान्त सांगतों तो ऐका.—मालव या नांवाचा एक देश आहे. त्यात मी राजा होतों, पण एकदा आपलें राज्य सोडून भूमीच्या आश्रमांतून फिरत मी या प्रदेशीं आलों. येथल्या आश्रमवासी जनांनीं माझा चांगला सत्कार केला असता मी या कदंबाच्या खालीं ध्याननिष्ठ होऊन राहिलों. कांहीं कालानें तूं (मथुरावासी) आपल्या सात भावासह येथें आलास. तुम्ही सर्वजण येथें तप करीत राहिला. तुम्हाला या माझ्या आश्रमातील इतर तापसही मान्य झाले. कांहीं दिवसांनीं त्यांतील तूं ( एक ) श्रीपर्वतावर गेलास. दुसरा कार्तिक स्वामीपाशीं तप करावयास गेला. तिसरा वाराणसीस व चवथा हिमाचलास गेला. बाकीचे चौघेजण येथेंच तप करीत होते. त्या सर्वांचा ‘ सार्वभौम राजा व्हावें ’ हा एकच मनोरथ होता. तो आता सफल झाला आहे. प्रत्येकाच्या इष्ट वरद देवानें तपाच्या योगानें संतुष्ट होऊन प्रत्येकाला वर दिला आहे. त्यामुळें अतिशय आनंद झालेले ते सर्व आपल्या घरीं गेले आहेत. वर प्रसंगीं त्या सर्वांनीं त्या सर्वेश्वरीपाशीं ‘ हे देवि, आमच्या राज्यांतील प्रजा सत्यपरायण व वर्णाश्रमधर्मसंपन्न असो, ’ असा उत्तम वर मागितला. तेव्हा ‘ तथास्तु ’ असें बोलून ती सर्वेश्वरी अंतर्धान पावली. असो;

याप्रमाणें इष्ट वर मिळाला असतां ते भ्राते आपल्या घरीं गेले. त्यांच्या आश्रमातील जनही त्यांच्या बरोबरच गेले. एकटा मी मात्र ध्याननिष्ठ होऊन या वागेश्वरी–कदंबाच्या खालीं एकांतात पाषाणा-प्रमाणें स्थिर होऊन राहिलों आहें. पुढें आसपासच्या लोकांनीं या अरण्याला उद्ध्वस्त करून सोडलें,तरी हा एक वृक्ष अगदीं पूर्वीप्रमाणेंच आम्लन आहे, म्हणून सर्व लोक याची व माझीही पूजा करीत असतात. आज तुम्ही दोघे दीर्घ तापसी येथे आला आहा. असो, अहो साधूनो, मी ध्यानानें पाहिलेले हें सर्व वृत्त तुम्हाला सांगत आहें. आता तुम्ही दोघेही आपल्या घरीं जा. तेथें तुम्हाला दुसरे कृतार्थ भ्रातेही भेटतील. ते सर्व आपल्या सर्व परिवाराशीं संगत झाले आहेत. तेथें गेल्यावर ब्रह्मलोकातील अष्टावसूंच्या समागमाप्रमाणें तुमचा भव्य समागम होईल.

अहो या स्थानातील श्रेष्ठांनो, त्या वृद्ध तापसानें असें सांगितलें असता मी संशयित होऊन त्याला हें आश्चर्य विचारलें.–भगवन्, सप्तद्वीप-युक्त भूमि तर एकच आहे, तेव्हा ते आठी भ्राते एकाच वेळीं सप्तद्वीपेश्वर कसे होणार ?

**वृद्धतापस**—अरे वेड्या, हें एवढेंच का तुला यात असंबद्ध वाटतें ! आणखीही आश्चर्य मी तुला सांगतों तें ऐक. हे आठी तापस भ्राते देहक्षय झाल्यावर गृहोदरात सप्तद्वीपेश्वर होतील. ते या महीपीठात या गृहातच राजे होतील. त्या आठजणांच्या आठ भार्या आहेत. त्या हे आठीजण तप करावयास गेले असता अतिशय दुःखित झाल्या. कारण साध्वी स्त्रियाना पतिविरह असह्य वाटत असतो. त्याचे वारवार स्मरण होऊं लागलें असतां त्यांनींही घरीं राहूनच दारुण तप केलें. शंभर चांद्रायणें केलीं. त्यामुळें पार्वती प्रसन्न झाली व ती ईश्वरी गुप्त राहूनच अंतः-पुरातील मंदिरांत पूजा चालली असता त्या आठजणींतील प्रत्येकीस म्हणाली,–" हे बालिके, पतीकरितां व आपल्याकरिता वर मागून घे. ग्रीष्मकाळीं जशी पुष्पमंजरी त्याप्रमाणें तूं या दीर्घ तपानें अतिशय क्लिष्ट झाली आहेस. " देवीचें हें भाषण ऐकून व तिच्या पायांवर पुष्पांजलि समर्पण करून आपल्या वासनेप्रमाणें तिची स्तुति करीत प्रत्येक सुवासिनी म्हणाली,–" देवि, देवाधिदेवाशीं जसें तुझें प्रेम आहे

तसें माझें माझ्या भर्त्याशीं प्रेम असो व माझा भर्ता अमर होवो. त्यावर देवी म्हणते-बाळे, नियतीच्या दृढतेप्रमाणें या सृष्टींत तप व दान यांच्या योगानें अमर कोणी होऊं शकत नाहीं. यास्तव तूं दुसरा एखादा वर माग.

**सुवासिनी**—भगवति, हा वर जर अशक्य असेल तर मेलेल्या माझ्या पतीचा जीव माझ्या घरातून एक क्षणभरही बाहेर जाऊं नये, हा वर मला दे.

**देवी**—तथास्तु. वत्से, हा देह सोडल्यावर लोकांतरींही तूं आपल्या याच पतीची भार्या होशील.

असा वर देऊन मेघध्वनीसारखा तो देवीचा शब्द आकाशोदरात शांत झाला. नंतर कांहीं कालानें त्याचे भर्तेही महावर मिळवून परत आले. एकटा हाच मागें राहिला आहे. यास्तव आता यालाही घरीं परत जाऊं दे. म्हणजे सर्वांनाच अत्यानंद होईल. बा तापसा, हें आणखी एक त्यांचें असमंजस आश्चर्यवृत्त ऐक. हे आठीजण तप करावयास गेले असतां अतिशय दुःखी झालेला त्याचा बाप व आई तीर्थे व मुनीचे आश्रम पहावयास निघालीं. तीं दोघें आपल्या शरीराची अपेक्षा न करिता पुत्रांच्या हिताच्या इच्छेनें कलाप ग्रामास जावयास तयार झालीं. तीं जावयास निघालीं असतां मुनींच्या ग्राममार्गांत एका शुभ्र, कपिलवर्ण, ऱ्हस्व व ज्याचे केंस वर उचललेले आहेत अशा पुरुषास पाहतीं झालीं. हा कोणी वृद्ध वाटसरू आहे, असें समजून त्या दोघांनीं त्याला नमस्कार केला नाहीं. उलट त्वरेनें जात असताना त्याच्या पायापासून उडालेली धूळ त्या पुरुषाच्या अंगावर गेली. तेव्हा अतिशय रागावलेला तो त्यास म्हणाला, " भार्येसह तीर्थयात्रा करावयास निघालेल्या हे महामूर्खा, मज दुर्वासाचा अनादर करून मला नमस्कार न करिता पुढें जात आहेस काय ? बरें आहे. तप करीत असलेल्या तुझ्या पुत्रांचे व सुनांचे मोठ्या कष्टानें संपादिलेलेही महा वर विपरीत फल देणारे होतील. "

पण असें बोलत असलेल्या त्याचा तो सस्त्रीक ब्राह्मण जों सन्मान करावयासाठीं त्याच्यापाशीं जात आहे तों तो महा कोपी मुनि गुप्त झाला. त्यामुळें त्या दोघांना फार दुःख झालें. त्याचीं तोंडें उतरलीं. तीं दोघेंहीं कृश झालीं व निराश होऊन आपल्या घरीं परत आलीं.

म्हणून मी म्हणतों कीं, त्यांना असमंजस असें कांहीं नाहीं. एका गळ-वावर दुसरें गळूं जसें यावें त्याप्रमाणें या आठ जणांच्या चरित्रात लक्षावधि असमंजस गोष्टी आहेत. साधो, केवळ यांच्यामध्येंच नव्हे तर या मायामय जगांत इतरत्रही अशीं लक्षावधि आश्चर्यें संभवतात १८२.

**सर्ग १८३**—ब्रह्मदेवाच्या वाक्यानें विरुद्ध वर व शाप यांचा जय.

कुंददंत—त्यानंतर मी त्या अतिवृद्ध तापसाला म्हटलें, " एकाच सप्तद्वीप पृथ्वींत ते आठ जण सप्तद्वीपेश्वर कसे होतील ? घरातून बाहेरही न पडलेल्या जीवांना दिग्विजय कसा करतां येईल ? वरद देवांनीं दिलेले वर शापाच्या योगानें विरुद्ध कसे होतील ? तेव्हां वृद्धतापस बोलला— " साधो, तूं याचें पुढचें वृत्त ऐक. म्हणजे तुझ्या सर्व शंका निवृत्त होतील. हा आठवा आपल्या घरीं जाऊन पोचला म्हणजे ते सर्व भाऊ कांहीं काळ तेथें आनंदानें राहतील व नंतर ते सर्वजण मरतील. त्यांचे आप्त त्यांचें और्ध्वदेहिक कर्म करतील. नंतर त्यांचे जीव सुषुप्तींत असल्या-प्रमाणें कांहीं काळ जडसे होऊन राहतील. तितक्यांत त्यांचीं तीं वरशापात्मक कर्में स्वाभाविकपणेंच त्यांच्या चित्ताकाशांत एकत्र जमतील. त्या त्या कर्मांच्या फलप्रद अधिष्ठातृदेवता कर्मरूप होऊन, आपापल्याला अनुकूल अशा समूहानें युक्त पृथक् पृथक् संपुट करतील. त्याचप्रमाणें संपुटित झालेले वर व शाप पृथक्पृथक् शरीरें करतील. वरांचा वेष सुभग, असेल. त्यांच्या हातात कमल व ब्रह्मदंडरूप आयुध असेल. त्यांना चार भुजा व चंद्राप्रमाणें शुभ्र कांति असेल. पण शापाचीं शरीरें उग्र असतील त्यांच्या हातांत त्रिशूल असून नेत्र तीन, अंगकांति मेघासारखी, दोन भुजा, व कपाळाला आठ्या असा वेष असेल. वर म्हणतील,—" अहो शापांनो, तुम्ही दूर व्हा. कारण ऋतूंप्रमाणें यावेळीं आमचा काल आला आहे. तेव्हां त्याचें उल्लंघन कोण करूं शकणार ? " पण तें ऐकून शाप म्हणतील,— " अरे वरांनो, तुम्ही दूर व्हा. हा आमचा काळ आहे. तुमचा कोठचा ?

त्यावर वरदेवता पुनः म्हणतील,—" तुम्हांला मुनीनें केलें आहे व आम्हांला सूर्यानें केलें आहे. मुनीपेक्षां सूर्य अधिक आहे. कारण विधात्यानें त्याला मुनींच्या पूर्वी निर्माण केलें आहे. " पण वर असें बोलत आहेत तों शाप रागावून त्यांस म्हणतील,—" अरे जा, तुम्हांला सूर्यानें

केलेलें असलें तरी आम्हांला रुद्राच्या अंशानें निर्मिलें आहे. रुद्र सर्व देवांहून अधिक असून आम्ही त्याच्या अंशाकडून निर्मिलेले आहों." पण इतकें बोलून त्यांनीं पर्वताच्या शिखरांसारखे आपले त्रिशूल उचलले आहेत व आपले शत्रु आयुधें उचलून लढावयास सज्ज झाले आहेत असें पाहून वर हंसत अशी निश्चित वाणी बोलतील. "अहो शापांनों, तुम्हीं हें असलें पाप शील सोडून कार्याच्या परिणामाचा विचार करा. कलहानंतर जें अवश्य करावें लागेल, असें तुम्हाला वाटत असेल तें तुम्ही प्रथम करा. कलहानतर आम्हाला ब्रह्मपुरीस जाऊन तेथें निर्णय करावा लागेल हें जर ठाऊक आहे तर तो पूर्वीच का करूं नये?

वराचें हें युक्तियुक्त भाषण ऐकून शाप बरें आहे, असें म्हणतील. कारण मूढही युक्तियुक्त भाषण मानीत असतो, असा सर्वांचाच अनुभव आहे. त्यानंतर ते सर्व मिळून ब्रह्मपुरास जातील. संदेह आला असता महा प्रभावशाली पुरुषच पुरुषांची गति होतात. ब्रह्मदेवाच्या अग्रभागीं गेल्यावर ते सर्व त्यास प्रणाम करून आपला वृत्तान्त व संदेह—बीज त्यास निवेदन करतील. नंतर त्यावर ब्रह्मा म्हणेल,—"अहो वर-शापादिदेवतानो, शास्त्रानुसार दृढ अभ्यासाने ज्याच्या विषयींची संवित् दृढ केलेली असते त्यांना अंतःसार म्हणतात व त्याचाच विजय होतो. आता तुमच्यापैकीं अंतःसार कोण आहेत, याचा तुम्हीच विचार करा."

ब्रह्मदेवाने असें सांगितलें म्हणजे ते आपापली अंतःसारता पहावयासाठीं एकमेकाच्या हृदयांत शिरतील व परस्पराची हृदयसारता पाहून अगोदर सर्व शाप ब्रह्मदेवास म्हणतील, "हे प्रजानाथ, आमचा पराभव झाला आहे. आम्ही अन्तःसार नाहीं. हे वरच वज्रस्तभपर्वतासारखे अंतःसार आहेत. हे भगवन्, आम्ही सर्व (म्हणजे वर व शाप) संविन्मय आहों. आमचा अन्य देह नाहीं. कारण वर देणाऱ्याची जी संवित् तीच दिलेल्या वररूपानें होऊन राहते. तीच वर मागणाऱ्यामध्यें मला हा वर मिळाला आहे अशा रूपानें राहते. कारण सुखभोगस्थान देह हें वराचें फल आहे. तें विज्ञप्तिमात्राचें कल्पनामय कचन आहे. त्यामुळें तीच विज्ञप्ति देहाकार होऊन देश-कालादि शेकडों कल्पनाभ्रमांनीं विविध भोग्य

विषयास पाहते. त्यांचा अनुभव घेते व जें भोग्य असेल त्याचा उपभोग घेते. शास्त्रीय तपाच्या वेळीं केलेल्या दृढ संकल्पामुळें वश करून घेतलेल्या संविदात्म्यापासून ग्रहण केलेली वरकल्पना-चित् पुष्कळ वेळानें फलोन्मुखदशेंत चांगली पुष्ट होते व त्यामुळेंच ती अंतःसार असते. दीर्घ अभ्यास हेंच त्याचें कारण आहे. अनेक शुद्ध संवित्-पैकीं शास्त्रानुसार असलेली शुद्ध संवित् प्रबल असते. त्याचप्रमाणें अनेक अशुद्ध संवित्-पैकीं जी शास्त्रविरुद्ध असते ती अधिक अशुद्ध व म्हणूनच अधिक बळकट असते. वरसंवित् आमच्याहून ज्येष्ठ ( वडील, पूर्वीची ) आहे व ती अप्रमाणजन्यही नाहीं, म्हणूनही वरांनाच प्राधान्य आहे. साराश ज्याच्या योगानें आम्हाला प्राधान्य येईल, असा एकही योग्य न्याय दिसत नाहीं. एवढ्यासाठींच जेथे वर व शाप या परस्पर विरुद्ध कर्मांचें प्रमाण, अभ्यास इत्यादिकाच्या योगानें साम्य असतें तेथें जलमिश्रित दुधाप्रमाणें मिश्र फलच प्राप्त होतें. पण जेव्हां एकाचवेळीं भिन्न स्थानीं फलभोग देणारे वरशाप एकत्र होतात तेव्हां ( विपश्चित् राजाप्रमाणें ) जीवचित्-चा विभाग होतो. भगवन् , आपल्या समोर हें तत्त्वोद्गारांचें धाष्टर्य आम्हांस शोभत नाहीं. तथापि आपल्यापासून आम्हीं जें शिकलों होतों तेंच आपल्या पुढें प्रकट केलें आहे, असें जाणून आम्हांला क्षमा कर. तुला आमचा नमस्कार असो. आम्ही आतां सत्वर स्वस्थानीं जातों. " असें बोलून शाप कोठें नाहींसे होतील.

पण दुर्वासाचे शाप शांत होतांच त्या आठजणाच्या भार्यांना झालेला देवीचा वर त्यांना घरांतून बाहेर पडावयास प्रतिबंध करील. कारण तोही वर त्यांच्या सप्तद्वीपाधिपत्याच्या विरुद्ध असणार, हें उघड आहे. असो; शापाच्या जागीं देवाच्या वरांना प्रतिबंध करावयास सज्ज झालेले देवीचे आठ वर ब्रह्मदेवास म्हणतील. " हे देवेश, हे सप्तद्वीपेश्वर होण्यासाठीं शवगृहातून बाहेर पडतील असें मला वाटत नाहीं. कारण आमच्या देवीच्या आज्ञेप्रमाणें आम्ही त्यांस प्रतिबंध करूं. यास्तव आम्ही सफल व्हावें, एवढ्यासाठीं आम्हाला काय आज्ञा करावयाची असेल ती कर. "

त्यावर ब्रह्मा म्हणेल, " अहो सप्तद्वीपेश्वर वरांनो व हे गृहरोधवरांनो, तुमचें इष्ट पूर्ण झालें आहे, असें जाणा. तुम्ही आतां जाऊन परस्परांची

अपेक्षा करून रहा. विरोध करूं नका. कारण ते आठी भ्राते मरण पावून आपापल्या घरांतच सप्तद्वीपेश्वर झाले आहेत." तें ऐकून सर्व वर म्हणतील; "पण भगवन्, हें संभवेल कसें? कारण भूपीठ तर एक आहे. तेव्हां त्यांत आठ भूपाळ व तेही एका घरांत कसे राहतील?"

तें ऐकून ब्रह्मा हंसून म्हणेल, "तुम्ही, आम्ही इत्यादि सर्वांनीं युक्त असलेलें हें आकाशरूप जग चित्परमाणूंमध्यें स्थित आहे. तें स्वप्नाप्रमाणें आंतच अनुभवास येतें. तेव्हां त्या परमाणूच्या आंतील स्वगृहोदरांत तें सर्व असल्यास त्यात आश्चर्य कोणतें? चित्-च्या एका सूक्ष्म अणूमध्येंही जर हें त्रिभुवन मावतें तर गृहोदरात सप्तद्वीपा पृथ्वी भासल्यास त्यात नवल कोणतें. कारण मरणानंतर भासणाऱ्या जगाला स्वप्नाचें साम्य आहे. जें जगत् या रूपानें भासतें तें सर्व चित्तत्त्व आहे. ज्या अर्थी तें सर्व चिन्मात्रच भासतें त्या अर्थी जगत् मूर्त नाहीं. तें वस्तुतः अमूर्त आहे. त्यामुळें तें गृहांत मावूं शकतें."

असो, वरद ब्रह्मदेवानें असें सांगितलें असता ते सर्व वर पूर्वी कल्पिलेल्या आधिभौतिक भ्रांतिमय देहाचा तत्त्वविचारानें त्याग करून व आतिवाहिक देहमय होऊन ब्रह्मदेवाला प्रणाम करून, विरोध शांत झाल्यामुळें, मिळूनच त्या त्या ब्राह्मणतापसाच्या मनानें कल्पिलेल्या सप्त द्वीपात त्या त्या देवाच्या गृहकोशात गेले. तों ते आठी भ्राते सप्तद्वीपाधिनायक झाले होते. ते प्रत्येकाच्या राज्यात परस्पराचे भ्राते झाले. पण निरनिराळ्या भूलोकीं त्यांतील निरनिराळा भ्राता अधिपति असून इतर सात भ्राते प्रत्येकाच्या संकल्पाप्रमाणें त्याचे अनुचर होऊन राहिलेले असल्यामुळें त्याच्यामध्यें विरोधाचे कारणच नव्हतें. त्यातील कोणी तारुण्यानें सुंदर झालेला राजा आपल्या घरातच होता. कोणी विहार करीत होता. कोणी शत्रूंना पादाक्रांत करीत होता व याप्रमाणें भिन्न भिन्न भूमींत राजे झालेले ते भिन्न भिन्न क्रिया करीत होते. असो; अशा प्रकारच्या त्या जीवांस पाहून दोन्ही प्रकारचे वर त्याच्या संवित्-शीं जाऊन मिळतील. इष्ट राज्यभोगादि प्राप्त झाल्यामुळें ते आठीजण चिरकाल सुखानें राहतील.

साधो, याप्रमाणें हे आठ भ्राते तपःसामर्थ्यानें मिळविलेल्या वरांच्या योगानें पूर्वीच सिद्ध झालेलें फल संपादन करून त्याचा यथेच्छ उपभोग

घेतील. प्रत्यक्चैतन्यामध्यें जें दृढ निश्चयरूपानें स्फुरतें तेंच बाह्य उचित तप-जपादि कर्मांच्या योगानें कोणाला प्राप्त होत नाहीं ! सर्वांना अवश्य प्राप्त होतें १८३.

सर्ग १८४—अज्ञात चित्च जगद्रूपानें भासत असल्यामुळें गृहामध्यें आठवर्षी काय पण कोट्यवधि जगेंही संभवतात.

कुंददंत—पण भगवन्, गृहातील अल्प अवकाशांत आठ सप्तद्वीपयुक्त भूमि कशा भासतात ?

वृद्धतापस—हा चिद्धातु असाच आहे. तो स्वतः आकाशाकार ( प्रपंचशून्य ) असला तरी आपल्याला त्रैलोक्यरूपानें अथवा सुषुप्त–तुर्यरूपानें, आपलें निजरूप न सोडताच पाहतो.

कुंददंत—एका शांत, शिवस्वरूप परम कारणामध्यें स्वभावसिद्ध नानाता वास्तविक रूपानें कशी राहते ?

कदंबतापस—अरे बा साधो, ही नानाता वास्तवी नव्हे. ती भ्रांतिमात्र आहे. त्यामुळें ती त्याच्या एकत्वाशीं विरोध करीत नाहीं. जलावरील तरंगांकडे पाहून या गोष्टीचा निर्णय कर. स्वप्नसुषुप्ताप्रमाणें तें विस्मृत आत्मस्वरूपच आहे. त्यामुळें त्यांत कांहीं विरोध नाहीं. त्या सर्वात्म्याच्या स्वाभाविक वास्तवरूपात सर्गादि स्वभाव नाहींत; त्यामुळें होणारे विषय नाहींत व ते द्रव्यरूपानें अचित्–ही नाहींत. जशी स्वप्नांत एकच चित् लक्षावधि जनांची सेना बनते व ती स्वतः साक्षिरूपानें शुद्धही असते तसेच हिचे हे सर्व पदार्थ होतात. तिचे स्वरूपांतच चकचकणें, हेंच जगत् होय. आदि सर्गांत चिदाकाशानें जसें जग पाहिलें तसेंच तें होऊन राहिलें आहे. फलें, पुष्पें, पानें, शाखा इत्यादि सर्व जसा वृक्षच तसें हें सर्व चराचर जग चित्च होय. परमार्थ व सर्ग हे दोन्ही झाड व वृक्ष यांप्रमाणें पर्याय शब्द आहेत. पण परमार्थ ज्ञानानें हें गूढ कळतें. ज्ञानाच्या अभावीं हें सर्व केवल दुःखाला कारण होतें. अध्यात्मशास्त्राच्या बोधानें परमार्थ व जगत् एकच आहेत, असा निश्चय होतो. हीच मुक्तता होय. संकल्पाकार चित्चें स्वरूप ब्रह्म आहे व तेंच जगाचें स्वरूप आहे. यास्तव जग ब्रह्मात्मक आहे. ज्याच्यापासून वाणी निवृत्त होतात अथवा होत नाहींत तें ब्रह्म होय. सर्व विधि, निषेध, भावाभावदृष्टि, सृष्टि, प्रलय इत्यादि

सत् ब्रह्म आहे, या चिदाकाश सत्तेमध्यें बीजभूत प्रलय व सर्ग भासतात. एका द्रव्यांत दुसरें द्रव्य मिळविलें असतां जसें तें मिश्रण विचित्र कार्य करूं शकतें त्याप्रमाणें अंतःकरणांत अभिव्यक्त झालेलें प्रमातृचित्सार चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा बाहेर पडून घटाद्याकार वृत्तीशीं संबंध झाल्यामुळें घट–पटादि विषयांच्या अविष्ठानभूत चित्–च्या आवरणाचा भंग करून व त्याच्याशीं मिळून त्रिपुटी स्फुरण करते. एवढ्या साठींच घटादि अर्थांची सत्ता व स्फूर्ति, त्यांच्या अधिष्ठान चित्‌च्या अधीन असल्यामुळें तेही तन्मात्र आहेत. त्यांची स्थितिही संवेदनानुसारच असते. निस्पंद चित् सर्व वस्तूंचें अधिष्ठान असल्यामुळेंच सर्व द्रव्यशक्तिही आपापल्या आश्रयापासून पृथक् होत नाहींत. किंवा त्याचा ऱ्हासही होत नाहीं. हें सर्व अविद्यमान असतांनाच दिसतें व त्याचा अनुभव येतो. इंद्र, उपेंद्र, रुद्र, ब्रह्मा इत्यादि सर्वांसह सर्व जग स्वप्नासारखें आहे. खरोखर या चिज्जलांत विचित्र स्पंदरीति दिसतात. हा सर्व संकल्पाचा परिणाम आहे. नियतार्थ देणारी नियति वाहत असते व स्थावर–जंगम सृष्टि क्रमानें राहते. जंगम जीवापासून जंगम होतें व स्थावरापासून स्थावर बनतें. नियतीमुळेंच जल उतरत्या भूमीकडे वाहतें. अग्नीची ज्वाला वर पसरते. देहयंत्रें कार्यें करितात. सूर्यादि ज्योति ताप देतात. वायु नित्य वाहतात. पर्वत स्थिर उभे असतात. कालचक्र सदा दिवस-रात्र इत्यादिक्रमानें चालत असतें.

कुंददंत—भगवन् , आम्हा व्यष्टि जीवाचा व्यवहार धात्याच्या संकल्पनियतीप्रमाणें जरी चालत असला तरी, धात्याची आद्य प्रवृत्ति कशी होते ?

वृद्धतापस—स्वप्नांतील आपल्याच मरणाप्रमाणें त्याला सर्व अपूर्व दिसतें. कारण विधात्याचा संकल्प स्मरणाधीन नाहीं. तर तो दिव्यज्ञानानें होणाऱ्या दर्शनाच्या अधीन आहे. त्रिकाल दर्शनाचें सामर्थ्य नसल्यास स्मृतीची कल्पना केली जाते. स्वप्नांत नुस्त्या कल्पनेनें चित्‌ला दर्शनसामर्थ्य येत असल्याचें अनुभवसिद्ध आहे. यास्तव चित्प्रसादानेंच सर्व दिसतें. म्हणूनच गुण–दोषादिकाचें स्मरण न करितां हर्ष–क्रोधरहित तत्त्वज्ञ कुंभाराच्या चाकाप्रमाणें प्रारब्धवेगानेंच भ्रमण करीत राहतात. साधो, हें सर्व चिदाकाश आहे. त्याचें भान कसें होतें तेंही मी तुला सांगितलें. यास्तव आतां तुम्ही दोघेही उठा. आपल्या निवास स्नानीं जा. आपापलें

इष्ट संपादन करा. मीही या दुःखमलयुक्त व्युत्थानदशेचा त्याग करून पुनः समाधिनिष्ठ होतों. १८४.

सर्ग १८५—ते दोघे घरीं गेले. क्रमानें आठी भावाचा नाश व कुंददंताला रामाच्या प्राप्तीनें ज्ञान.

कुंददन्त—असें बोलून त्या वृद्ध मुनीनें नेत्र झांकले आणि एका क्षणांत प्राण व मन यांची चेष्टा बंद करून तो चित्रांतील पुरुषाप्रमाणें निश्चल झाला. आम्ही अनेक उत्तम प्रार्थनावचनांनीं त्याला संबोधिलें. पण त्यानें आम्हांल कांहीं उत्तर दिलें नाहीं. कारण तो बाह्य संसाराला सर्वथा विसरला. तेव्हां आम्ही दोघेही तेथून निघून हळू हळू मार्गाचें आक्रमण करीत मोठ्या उत्सुकतेनें मथुरेस पोंचलों. त्या तापसाच्या येथें मीही त्याच्याबरोबर गेलों. तो आलेला पाहताच सर्व घर आनंदित झालें. काहीं काल मोठ्या उत्साहानें घालवून त्याचे ते भ्राते एका मागून एक असे मेले. शेवटीं तोही माझा मित्र अस्त पावला. त्याकारणानें मला फार दुःख झालें व मी पुनः त्या कदंबतापसाकडे आलों. पण तो महात्मा गाढ समाधींत होता. मी तेथेंच राहिलों. त्यानंतर तीन महिन्यांनीं तो महापुरुष देहभानावर आला. तेव्हा मी प्रणामपूर्वक तत्त्वोपदेश करण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. पण तो महात्मा मला म्हणाला, "साधो, मी समाधि सोडून एक क्षणभरही राहण्याची इच्छा करीत नाहीं. मी आता पुनः समाधींत प्रवेश करतों. अभ्यासावांचून तत्त्वोपदेश तुझ्या मनात चागला ठसणार नाहीं. यास्तव मी सागतों तशी युक्ति कर.

अयोध्या नावाची एक नगरी आहे. तिच्यामध्यें दशरथ राजा राज्य करीत आहे. त्याचा पुत्र राम. तो या जगांत प्रख्यात आहे. त्याच्यापाशीं तूं जा. त्याचा कुलगुरु वसिष्ठ त्याला भर सभेंत दिव्य मोक्षोपायकथा पुष्कळ दिवस सागेल. ती ऐकून तूं परम पावन पदीं मजप्रमाणेंच विश्रांति पावशील. इतकें सांगून तो महात्मा समाधींत प्रविष्ट झाला व मी येथें तुजपाशीं आलों. सारांश हा मी असा एक जिज्ञासु आहें. माझें वृत्त, मीं पाहिलेलें व ऐकलेलें वृत्त इत्यादि सर्व मी तुला सांगितलें आहे.

**श्रीराम**—भगवन्, असें बोलून तो वक्ता कुंददन्त तेव्हां पासून सदा मजपाशीं राहिला. हा पहा तो माझ्या बाजूलाच बसला आहे. या महात्म्यानें आपली ही संहिता ऐकली आहे. आतां हा निःसंशय झाला आहे कीं नाहीं तें याला विचारा.

**श्रीवाल्मीकि**—राघवानें असें सांगितलें असतां वक्त्यांतील श्रेष्ठ मुनिवर्य वसिष्ठ कुंतदन्ताकडे पहात म्हणाला, " बा ब्राह्मणा कुंददन्ता, मी सांगितलेलें ज्ञेय तुला कळलें कां ? तें मोक्षपददायी आहे.

**कुंददन्त**—भगवन्, सर्व संशयाचा उच्छेद करणारें आपलें परम पावन वचन मीं ऐकलें. त्यामुळें माझ्या मनांतील सर्व संदेह पार गेले. त्याच्या योगानें मला ज्ञेय कळलें. मला जें द्रष्टव्य होतें तें दिसलें. जें प्राप्तव्य होतें तें प्राप्त झालें. मी आता परम पदीं विश्रांति घेत आहें. ब्रह्म आदि-अंतरहित व एक आहे. त्याचेच हे सर्व विलास आहेत. त्यामुळें एका अणूंत सहस्रावधि जगें राहूं शकतात. मग शून्य गृहामध्यें सप्तद्वीपयुक्त आठ भूलोक राहिले तर त्यात आश्चर्य कोणतें. ? या महात्म्यामध्यें सर्व सर्वदा सर्वत्र संभवतें. आत्माच सर्व बोध–विषयभावानें अनुभवास येतो. त्यावाचून दुसरें काहीं नाहीं १८५.

**सर्ग १८६**—सर्व ब्रह्मच आहे विधात्याच्या संकल्पाप्रमाणें वर–शापसिद्धि.

**श्रीवाल्मीकि**—कुंददन्तानें असें सांगितलें असतां भगवान् वसिष्ठमुनि असें परमार्थोचित वचन बोलला.

**श्रीवसिष्ठ**—खरोखर मोठी हर्षाची गोष्ट आहे कीं या महात्म्याला विज्ञानविश्रांति प्राप्त झाली आहे. हा हातातील आवळ्याप्रमाणें हें सर्व विश्व प्रत्यक्ष पहात आहे. हें सर्व भ्रांतिमात्र आहे. भ्रांतिही ब्रह्मच आहे. एक व अनामय ब्रह्म शांत आहे. शबल ब्रह्म–निष्कर्ष–दृष्टीनें यानें जें पाहिलें व वर्णिलें तेंही सर्व योग्य आहे. मायाशबल संवित् ज्या ज्या अवस्थेचा संकल्प करते ती ती अवस्था, जलसेकानें जशी एकादी लता, ह्याप्रमाणें सहस्रशाखांनीं युक्त होते. ब्रह्मांडच परमाणु व परमाणुच ब्रह्मांड. कारण त्याच्या आंत तें आहे. यास्तव शरीरवैचित्र्यकृत जात्यादिभाव सोडून म्हणजेच बंधशून्य होऊन, जशाच्या तसाच ब्रह्म होऊन रहा. व्यवहारांत स्वतः ब्रह्मच दृश्य, द्रष्टा, चित्, जड, किंचित् व न

किंचित् होऊन राहिलें आहे. पण तें परमार्थतः आपल्या अद्वय आनंद-एक-रसात्म्यामध्यें स्थित आहे. तें मायेनें दृश्य जग जरी झालेलें असलें तरी तेवढयानें द्वैत सत्य आहे, असें समजूं नये. कारण तें द्वैतसमयींही विकाररहित असतें. जागें झाल्यावर जसें स्वप्नादि त्याप्रममाणें हा देह निराकार संविन्मात्ररूप, अप्रतिघ ( प्रतिघातास अयोग्य ) व अनुभवाचा विषय होत असला तरी असत् आहे. पण संवित्-लाही जड स्थावर-भाव कसा येतो म्हणून विचारशील तर सांगतों—संविन्मय जंतूही निद्रा-कुल झाला असतां जसा जड होतो, त्याप्रमाणें स्थावर नांवाची संवित् तशीच जड होऊन राहते. जसा निजलेला पुरुष स्वप्न व जाग्रत्—भावास प्राप्त होतो, त्याप्रमाणें चित् स्थावर भावानंतर जंगम भावांत व्यक्त होते. ती जीवसंवित् आत्मज्ञानानें मोक्ष होईतों स्थित असते. नर जसा निद्रास्थिति धारण करतो त्याप्रमाणें चित् जाड्याचा अभ्यास करते. तथापि तिचें चित्त्व लुप्त होत नाहीं. जाड्य वेदनवेत्त्याकरितां ( म्हणजे जीवाकरितां ) चित् स्थावर व जंगम शरीर धारण करते. पण तरी सुद्धां चित्चा भेद होत नाहीं. तर त्या महा चितीवर आरोपित केलेलें सर्व अचेतन व चेतन जग शरीराच्या नखपादादि अवयवाप्रमाणें अवयवभूत आहे. हिरण्यगर्भानें प्राथमिक सर्गास कारण होणारा संकल्प केला असता जें रूप जसें व्यक्त झालें तें तसेंच आताही स्थित आहे. पण तें असें चिरकाळ जडरूपानें जरी राहिलें तरी चिन्मय असल्यामुळें अप्रतिघ व शांत आहे. कारण तत्त्व-ज्ञाच्या दृष्टीनें जगाचें नांवही नसतें. मग रूप तर दूरच राहिलें. चित्रां-तील चित्रवधूप्रमाणें हें आत्म्याहून पृथक् नाहीं. चित्रातील सेना जशी अनाना तशीच चित्तत्त्वांतील सर्गताही नाना नाहीं. अविद्या आवरणाच्या योगानें मोक्षाचा अपलाप करून जाग्रत व स्वप्न दाखविते. जाग्रतादि हे सर्व आत्मसूर्याचे प्रकाश आहेत. उद्भत वासनारूप जो हा स्वप्नभाग तोच उपाध्यंश-प्राधान्यानें चित्त व चिदंश-प्राधान्यानें जीव होतो. तोच देव, असुर, मनुष्य इत्यादि अधिकारी शरीरास प्राप्त होऊन तत्त्वज्ञानानें अविद्यानिद्रेला हटवून मुक्त होतो. हाच चवथ्या व पांचव्या भूमींत ज्ञात होतो; सहावींत सुषुप्ति होतो व सातव्या भूमिकेंत त्यालाच मोक्ष म्हणतात.

**श्रीराम**—देव, असुर इत्यादिकांच्या शरीरांत चित्त कोणत्या आकारानें व केवढें असतें व त्यांतील जगाचें प्रमाण काय असतें ?

**श्रीवसिष्ठ**—तें सर्वांमध्यें एकसारख्याच प्रमाणाचें असतें. अनंत हें त्याचें प्रमाण आहे. अणुरेणूंपासून हें जें सूर्याच्या व ध्रुवाच्याही पलीकडचें निळें आकाश दिसत आहे तेथपर्यंत त्याची व्याप्ति आहे. याच्या योगानें दुःसह संसारदुःख होत असल्यामुळें हें चित्‌चें उग्र रूप आहे. या समष्टिरूप चित्ताच्या आत भुवनांची सर्व ऋद्धि जेव्हा कल्पनेनें येते तेव्हां हा सर्ग चित्तापासून आला आहे, असें आम्ही म्हणतों. चित्तच जीव आहे. त्यामुळें तें आदि-अंतरहित आहे. त्याला विभु म्हणतात. पण वस्तुतः तें अणुरूप आहे. कारण तें व्यष्टि जीवाच्या शरीरांत अगदीं सूक्ष्म भागीं राहतें. त्यात सर्व त्रिभुवन साठवलेलें असतें. चित्तच जीव आहे. जीव चेतन असल्यामुळेंच ब्रह्माहून पृथक् नाहीं. त्यामुळें हें सर्व चिदात्ममय आहे. सर्व संकल्पमय आहे. वर, शाप इत्यादिकही संकल्पमय आहेत. तथापि ब्रह्मदेवाच्या संकल्पामुळेंच वर व शाप व्यर्थ होत नाहींत. कारण तो विधाता ब्रह्मात्मवेत्ता असतो, त्यामुळें त्याचा संकल्प सत्य आहे. तो ब्रह्मरूप ब्रह्मा निराधार कल्पना करतो. त्यानें सर्व प्रजा व त्याप्रमाणेंच धर्म, दान, तप, गुण, वेद, शास्त्रें इत्यादि केलें. त्याच महा पुरुषानें तपस्वी व वेदवेत्ते जें जें बोलतील तें तें सत्य व्हावें, अशीही कल्पना केली आहे. त्यानें अशी सर्व पदार्थांच्या स्वभावाची कल्पना केली आहे. सारांश, ही सर्व सृष्टिकल्पना प्रजापतीचा वेष घेतलेल्या चिद्धातूंचीच आहे. शुद्ध चित्स्वभावानें जें जसें जाणलें आहे, त्याला बदलावयास दुसरा कोणी समर्थ होत नाहीं. सर्व त्रिपुटी एक चिद्रूप आहे. ब्रह्मसंवित्‌नेंच स्वतः देहादिकाची कल्पना करून सृष्टिता स्वीकारली आहे. पण मन-बुद्धि इत्यादिकांची कल्पना सोडली म्हणजे अज्ञानमात्र जग आहे, असें पर्यवसान होतें. दुर्बोध शून्याला सर्व जग व कर्म अनुत्पन्नच वाटतें. या शरीरांत मन-बुद्धि इत्यादिकांनीं रहित असलेली मृतावस्था जशी अनुभवास येते अथवा पाषाणादिकांमध्यें जडसत्ता जशी असते तशीच परमात्म्याची मनो-बुद्धिरहित विक्षेपशून्य सत्ता असते, असें जाणावें. ज्याप्रमाणें एकाच गाढनिद्रेंत सुषुप्त व स्वप्न या दोन

अवस्था स्थित असतात, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें हे सर्ग—संहारभास आहेत. ते अज्ञाननिद्रेचे अवातर भेद (पोटभेद) आहेत. साराश, प्रकाश—अप्रकाश, जड—अजड इत्यादि सर्व भेदकल्पनांची व्यवस्था स्वप्नाच्या दृष्टान्तानें लावावी. चेतनाला जाड्यानुभव संभवत नाहीं, म्हणून म्हणाल तर सागतों—मानवाचें चित्त दुसरीकडे आसक्त झालें असता त्याच्या पायांच्या बोटांना लागलेल्या वायु, ऊन, धूळ, इत्यादिकाचें भान होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. म्हणजे त्याला त्याचा अनुभव झालेला असूनही न झाल्यासारखाच असतो. त्याप्रमाणें आत्मा पाषाणादिकामध्यें असूनही नसल्यासारखा भासतो. हेंच त्याचें जाड्य होय. त्याचप्रमाणें जडालाही चेतनभाव कसा येतो, तें स्वानुभवानेंच जाणावें. चित्तशून्य दशेंत आम्ही जड होऊन सचित्त दशेंत चेतन कसे होतों, त्याचा विचार करावा. आम्हामध्यें जशा दिनरात्रींच्या संविद् भासतात तशा परमात्म्यामध्यें सर्ग—संहारसंविद् भासतात. ज्याप्रमाणें केवल जलस्वभाव सागरात तरंगादिक त्याप्रमाणें आनंदस्वभाव शातरूप आत्म्यामध्यें हा सर्ग-संहारसमूह स्वभावतःच स्फुरतो. पण प्रमाणपूर्वक तत्त्वदर्शन झालें असता तो स्फुरत नाहीं १८६.

सर्ग १८७—नियति व जीवप्राप्तीचे हेतु

**श्रीराम**—असंख्य विचित्र भावांची नियति (कार्यकारणभावादि नियम) कोठून आली? वस्तूंचा स्वभाव जगात स्थिर कसा झाला? असंख्य देव असताना त्यातील एकटा सूर्यच उग्र तेजस्वी कसा? दिवस कधीं लहान, कोठें मोठे इत्यादि वैचित्र्य का?

**श्रीवसिष्ठ**—रामा, प्रथम सर्गांत धात्याला काकतालीयन्यायानें जें जें जसें जसें भासलें, तें तें सर्व तसेंच आजपर्यंत स्थित आहे. कारण ईश्वराची शक्ति नियत आहे. मायेच्या उदरात असलेलाच सर्ग सृष्टिसमयीं व्यक्त होतो व प्रलयसमयीं तोच स्थूलभाव सोडून अव्यक्त होतो. यास्तव सर्व वस्तूंची ही अर्थक्रियाशक्ति अनादि आहे. तीच नियति होय. अथवा ब्रह्मच सर्व नियत अर्थक्रिया करण्यास समर्थ आहे व तेंच जगाचा आकार धारण करतें. म्हणून नियति प्रतिष्ठित आहे. किंवा तीन अवस्था हा अज्ञात आत्म्याचा स्वभाव आहे,

त्यामुळें नियतीची सिद्धि होते. त्यामुळेंच एका जीवांचा क्षण दुसऱ्या जीवांचा कल्प होतो. यास्तव स्वभावाचें तत्त्व जाणणारे ज्ञानी प्रजापतीच्या कल्पनेलाच नियति म्हणतात. अग्नीचें कोठेंही व केव्हाही व्यभिचार न पावणारें औष्ण्य, जलाचें द्रवत्व हे सर्व स्वभाव आहेत व ईश्वराच्या सत्य संकल्पामुळें ते कल्प संपेपर्यंत तसेच राहणार !

परंतु राघवा, पृथ्वी, जल इत्यादि सर्व संविन्मय आहे. त्यामुळें तें चिद होय. मायाशबल ब्रह्मच त्या सर्वांची खाण आहे. हें भूपीठ जनांचा महान् आधार आहे. गंगा–यमुना–प्रभृति मुख्य जलांचा राजा समुद्र, सर्व तेजाचा आधार सूर्य, सर्व स्पंदाचें कारण हा वायु व सर्व शून्याचा कोश हें आकाश. अर्थात् पंच महाभूतें ह्या बाह्य संवित्तिच आहेत. त्यांतही अनुगत असलेलें ब्रह्म हाच सत्स्वभाव आहे. यास्तव अनेक देवांतील एकटा सूर्यच इतका भास्वर का हा प्रश्न करावयास अवकाशच नाहीं. कारण हा सर्व त्या सर्वज्ञ सर्वशक्तीचा प्रभाव आहे. हा चतुर्मुख नावाचा बालक या विस्तीर्ण पृथ्वीला अशा विविध वस्तूंसह आपल्या स्वरूपांतच पसरतो. तस्मात् सर्व चिन्मात्र आहे.

पण रामा, तें शुद्ध स्वयंप्रकाश तत्त्वच अविद्यालक्षण मायास्वभाववशात् सत्तामात्ररूपानें स्फुरतें. तें स्वतःलाच विसरून आपल्यालाच अन्यरूपानें पाहते. तें भावि सर्गाचें पर्यालोचन करतें. त्यामुळें तें बहिर्मुख होऊन सर्व कल्पित जग रचतें. त्याच्या सत्यसंकल्पामुळें हें जग व त्यातील स्थूल सूक्ष्म भाव क्षणात निर्माण होतात. देह व इंद्रियादिकांची विचित्र कल्पना करून व त्या सर्वांना अहं–ममाभिमानानें आपलेंसें करून जीव मोक्षापर्यंत सुंदर संसार करीत राहतो. पण रामा, हें सर्व करीत असतांना सर्वव्यापी अनंततत्त्व नित्यसिद्ध व निर्दोष असतें १८७.

**सर्ग १८८**—जीव ब्रह्मच आहे. त्याची ही उत्पत्ति लिंगदेहाच्या भ्रांतीनें गौण आहे.

**श्रीवसिष्ठ**——रामा परमात्म्यापासून ही जी जीवांची उत्पत्ति सांगितली आहे ती खरी नव्हे. तें जीवोत्पादन आत्म्याचें स्वाभाविक अग आहे. त्यांचीं नावें अनेक आहेत. त्या विषयोन्मुख चिदात्म्याचीं तीं विचित्र नावें ऐक. ती चित् मुख्यप्राण व कर्मेंद्रियें यांस धारण केल्यामुळें व ज्ञानें-

द्रियानाही धारण केल्यामुळें जीव; माग अनुभविलेल्या व पुढच्या विषयांकडे उन्मुख झाल्यामुळें चित्त; हें असेंच आहे, असा स्पष्ट बोध होत असल्यामुळें बुद्धि, कल्पना व मनन यांच्या योगानें मन; व मी आहें, या अभिमानामुळें अहंकार होतें. विद्वान् लोक चित्ताला शास्त्रीयदृष्ट्या परमार्थ वस्तु ( आत्मा, ) असेंच म्हणतात. संकल्पजाल पुष्ट झालें असतां तो जीवच पुर्यष्टक होतो. तें सर्व सृष्टीच्या पूर्वी असल्यामुळें प्रकृति होय. आत्मज्ञानानें बाध होत असल्यामुळें तिला अविद्या म्हणतात. हीं सर्व त्या जीवाचींच नांवें आहेत. पण जीव आद्यन्तरहित व अनामय आहे. सुज्ञ आतिवाहिक देहाचा निर्देश करूनच त्याचा उल्लेख करितात. याप्रमाणें हा जगद्भ्रम स्वप्ननगराप्रमाणें मिथ्या भासत आहे. भोग व मोक्ष करीत असला तरी तो निःस्वरूप आहे. तो मोक्षापर्यंत राहतो. वृक्षावरील फळाप्रमाणें त्या शबल चित्च्या आधारानें असंख्य संसार व भूतें होऊन गेलीं आहेत व पुढें होतील. हा चित्तमय देह, आरशाप्रमाणें, आपल्यामध्यें ( आत ) व बाहेरही प्राकृत प्रलय होईतों जगें धारण करतो. याप्रमाणें हें सर्व होतें. चित्प्रकाशानें प्रवृत्त केलेल्या त्या आतिवाहिक देहालाच कोणी ब्रह्मा, कोणी विराड्, सनातन, नारायण, ईश, प्रजापति, इत्यादि नांवें देतात. ज्या ज्या भागीं पाच इंद्रियसंविद् भासतात तेथें तेथें तसेच विषय स्थित असतात. वास्तव सर्व चिद्भास आहे. सत्य कांहीं नाहीं. अनादि ब्रह्ममात्र नित्यसिद्ध आहे. असो; हा आतिवाहिक देह स्वतः निराकार असूनही क्रमानें स्वप्नाप्रमाणें स्थूलशरीर, जन्म, कर्म, स्थान, परिणाम, वय, देश, काल, क्रिया, इत्यादिकास पाहतो. जरा-मरणादि दशांचा अनुभव घेतो. सारांश अशा क्रमानें आतिवाहिक देह झालेला पुराण पुरुष कल्पित आधार-आधेयभावमय भ्रांति पाहतो. हें त्याचें स्वप्न आहे १८८.

**सर्ग १८९—आतिवाहिक देहरूप प्रजापतीच्या मनोरथात आधिभौतिक भ्रांति.**

**श्रीवसिष्ठ—**अरेरे, सत्यसंकल्पसंवित्स्वभावामुळें हें विश्व भासतें. हें भ्रांतिमात्र असल्यामुळें द्रष्टा, दृश्य, दर्शन इत्यादि त्रिपुटी असत्य आहे. किंवा तें सर्व चिन्मात्र असल्यामुळें त्याला तुम्ही पाहिजे तर सत्य म्हणा.

**श्रीराम**—पण गुरुवर्य, त्या आद्य प्रजापतीचा आतिवाहिक प्रकाश शिला, पर्वत इत्यादि कठिनभावास कसा प्राप्त झाला. त्याचप्रमाणें त्याची पारलौकिक फलादि अर्थ क्रिया सत्य कशी?

**श्रीवसिष्ठ**—रामा, त्या प्रजापतीला आतिवाहिक प्रकाशाचा निरंतर अनुभव येतो व दीर्घकाल अनुभव आल्याकारणानें तोच घन झाल्यासारखा वाटतो. पण हा मी, तो तूं, ही नदी, हा पर्वत इत्यादि सर्व बाह्य दृष्टि अविवेक्याचा भ्रम आहे. आद्य स्रष्ट्याचा हा सूक्ष्मदेहच पृथ्वीशरीरादिरूप पिंडाकार झाला आहे. चिदाकाश मी ब्रह्म आहें, हें विसरून मी हा देह आहें, पृथिवी इत्यादि माझा आधार आहे, इत्यादि पाहतें आणि अशी असत्य वस्तूच्या ठायीं सत्यबुद्धि कल्पून आपल्या भावनेमुळेंच बद्ध होतो. अनेक प्रकारची भावना केल्यामुळेंच तो स्वतः अनेकत्वाचें अनुकरण करतो. तो प्रथम लौकिक व वैदिक शब्द करतो. नंतर त्यांचे अर्थसंकेत व संज्ञा ठरवितो. ' ओं ' असा उच्चार करताच वेद व शास्त्रें यांची त्यास स्फूर्ति होते. त्यांच्या उपदेशाप्रमाणें तो इतस्ततः सर्व व्यवहार करतो. तो आपल्या मनाची कल्पना करतो. तें ज्याचा ज्याचा संकल्प करतें तें ते होतें. कारण जो ज्यात आसक्त होतो तेंच पाहतो. याप्रमाणें ही खोटीच जगाची भ्रांति भासत आहे. ब्रह्मदेवापासून सर्वांना ती निष्कारण भासत आहे. वास्तव आतिवाहिक प्रकाशालाच ही आधिभौतिकता उचित आहे. त्यामुळें ती खरी नव्हे. मूळापासूनच हा असा मिथ्या मोह पसरला आहे. स्रष्ट्यालाही त्यानें सोडलें नाहीं, त्यामुळेंच प्रारब्धक्षय होईतों तत्त्ववेत्त्यानाही त्याचें उल्लंघन करता येत नाहीं. पण ही भ्रांति आहे, कारण चिदेकरसब्रह्माचे ठिकाणीं असली दुर्दशा संभवत नाहीं. साराश शाश्वत ब्रह्माहून जगाचें भिन्न कारण नाहीं. कारणही कार्याच्या अपेक्षेनेंच स्थित होतें. पण अनामय ब्रह्माच्या ठिकाणीं त्या दोघांचाही संभव नाहीं. वास्तव ही सर्व भ्रांति पसरली आहे. १८९.

**सर्ग १९०**—मागच्या व पुढच्या सर्व शंकांचें निरसन करून ज्ञानाची ज्ञेयताशाति हीच मुक्ति, येथें वर्णितात.

**श्रीवसिष्ठ**—रामा, ज्ञानाच्या ज्ञेयतेची आपत्ति ( प्राप्ति ) हाच बंध होय, व त्याचीच ज्ञेयताशाति हा मोक्ष आहे.

**श्रीराम**—भगवन्, ज्ञानाची ज्ञेयताशांति कशी प्रवृत्त होते व अत्यंत रूढ झालेली बंधताबुद्धि निवृत्त कशी होते ?

**श्रीवसिष्ठ**—शम, दम, तितिक्षा इत्यादि साधनांसह दृढ अभ्यासिलेल्या सम्यग्ज्ञानलक्षण बोधानें मंदबुद्धि ( भ्रांति ) निवृत्त होते आणि तें भ्रांतिस्वप्न निवृत्त झालें म्हणजे अशाप्रकारची ज्ञेयताशांति ( मुक्ति ) उदय पावते. नंतर भूमिका-परिपाकक्रमानें ती रूढ होत जाते.

**श्रीराम**—भगवन्, ज्याला सम्यग्ज्ञान असेंही म्हणतात, तो केवलतारूप बोध म्हणजे काय ? कारण तो कांहीं विलक्षणच असला पाहिजे. त्यावांचून जंतु बंधापासून सर्वथा मुक्त होणें शक्य नाहीं.

**श्रीवासिष्ठ**—अधिष्ठान-चिन्मात्ररूप ज्ञानाला ज्ञेयता त्रिकालीं नसते. यास्तव सर्व दृश्याच्या बाधामध्यें ज्याचें पर्यवसान होतें तें तत्त्वसाक्षात्काररूप अव्यय ज्ञानच सम्यग्ज्ञान होय. आपाततः ( परोक्ष ) ज्ञान हें सम्यग्ज्ञान नव्हे.

**श्रीराम**—चिदेकरस आत्म्याच्या ज्ञानस्वरूपात त्याच्याहून भिन्न ज्ञेयता कोठची ? शिवाय येथील ज्ञान हा शब्द भावार्थी आहे कीं साधन या अर्थी ? ( म्हणजे ज्ञप्ति ( ज्ञानस्वरूप ) हें ज्ञान कीं ज्याच्या योगानें जाणलें जातें तें ज्ञान )

**श्रीवासिष्ठ**—रामा, हें ज्ञान भावमात्र आहे. केवळ बोधस्वरूप, बोधमात्र आहे. त्याचप्रमाणें ज्ञान व ज्ञेय यांचा वायु व स्पंद याप्रमाणें भेद नाहीं.

**श्रीराम**—असें जर आहे तर हा सशाच्या शिंगासारखा ज्ञान-ज्ञेयादि विभ्रम कसा सिद्ध झाला व तो वर्तमान, भूत, भविष्यत् इत्यादि भेदांनीं व्यवहारास योग्य कसा झाला आहे ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, असत् वस्तूंनीं भासूंच नये अथवा व्यवहारक्षम होऊं नये, असा नियम कोठें आहे ? कारण स्वप्नांतील संभ्रमांत आम्हीं सहस्रावधि असत् पदार्थ व्यवहारक्षम झालेले प्रत्यक्ष पाहतों. असत् पदार्थांचा बाध होतो; हाच काय तो सत्-पेक्षां त्यांत विशेष आहे. ज्ञेयाचा बाध कसा होतो, हें तत्त्ववेत्त्यांना साक्षात् व विचारवानांना युक्तियुक्त विवेकदृष्ट्या कळलेलें असतें.

**श्रीराम**—पण भगवन्, लौकिक प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध असलेल्या प्रपंचाचा अपलाप कसा करितां येईल ?

**श्रीवसिष्ठ**—आदिसर्गाच्या वेळीं विराडादि कोणताही अर्थ योग्य सामग्रीपासून झालेला नाहीं. म्हणून त्याच्या पुढचा हा वर्तमान प्रपंचही अवाच्य आहे. त्याचा संभव कोणत्याही युक्तीनें सिद्ध होत नाहीं. यास्तव केवल लौकिक व्यवहारांत मात्र सत्य ( किंवा अबाधित ) असलेलीं प्रत्यक्षादिप्रमाणें तात्त्विक युक्ति व श्रुति यांच्या दृष्टीनें सर्वथा बाधित होतात.

**श्रीराम**—गुरुवर्य, ही त्रैकालिक जगद्दृष्टि सतत अनुभवास येत असतांना ती झालीच नाहीं, असें कसें म्हणतां ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, स्वप्नप्रपंच, मृगजल, दोन चंद्र, मनोरथाचा विषय इत्यादिकांप्रमाणें भासणारी ही जगद्दृष्टि मिथ्या आहे. अहं, त्वं इत्यादि कांहीं सत्य नाहीं.

**श्रीराम**—आपण तिचा बाध कोणत्या दृष्टीनें करतां ?

**श्रीवसिष्ठ**—कारणापासून कार्य होतें, त्यावाचून होत नाहीं, हा लौकिक निश्चय आहे. तेव्हां सर्व शांत झाल्यावर ( प्रलयानंतर ) जगाचा उद्भव होण्यास कांहीं निमित्त राहत नाहीं.

**श्रीराम**—मुनिराज, महाप्रलय झाल्यावर जें अज व अव्यय तत्त्व अवशिष्ट राहिलेलें असतें तें सृष्टीचें कारण कां नव्हे ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, जें कार्य कारणांत असतें तेंच त्याच्यापासून प्रवृत्त होतें. कारणांत नसलेलें कार्य कधींही उत्पन्न होत नाहीं. घटापासून वस्त्र कधींही होत नाहीं.

**श्रीराम**—महा प्रलय ओढवला असतां जग सूक्ष्मरूपानें ब्रह्मामध्यें राहतें व त्यामुळें तें सृष्टिसमयीं पुनः त्यांतूनच प्रवृत्त होतें; अशी कल्पना केल्यास कोणता दोष येईल ?

**श्रीवसिष्ठ**—महा प्रलय झाल्यावर ब्रह्मामध्यें सूक्ष्म सर्ग राहतो, याला प्रमाण काय ? तो राहतो, असा अनुभव कोणी घेतला आहे का ? कोणीही नाहीं. शिवाय ब्रह्माच्या चिदेकरसत्वाचें वर्णन करणाऱ्या श्रुतींशीं विरोध येतो, तें निराळेंच !

**श्रीराम**—असें जर आहे तर त्यावेळीं प्रपंचसत्ता ज्ञप्तिमात्ररूप व स्वप्रकाशच असो. तिला मायाकाशरूप कशाला म्हणा ? कारण असत् सत् होणें शक्य नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—तर मग ज्ञप्तिच त्रिजगत् आहे, असें म्हणावयास कोणता प्रत्यवाय आहे ? आणि ज्ञप्तिच जर त्रैलोक्य तर विशुद्ध ज्ञानदेहाला जन्म व मरण कोठचें ?

**श्रीराम**—मग याप्रमाणें सर्ग जर आरंभींच झालेला नाहीं तर ही भ्रांति कशी झाली ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, याचें वास्तविक कारण अथवा कार्य ( भावात्मक जग ) नाहीं. तर ब्रह्मच मायेनें त्या त्या त्रिपुटीचा वेष धारण करतें. अर्थात् कर्ता, त्याचें साधन व कार्य हें सर्व आत्माच आहे.

**श्रीराम**—पण भगवन्, चेतिता या कार्यकरणसंघातरूप देहयंत्राला जाणतो. तेव्हा सर्वद्रष्टा ईश्वर दृश्यत्वास कसा प्राप्त होतो ? काष्ठ अग्नीला कसें जाळील ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, द्रष्टा दृश्यत्वास प्राप्त होत नाहीं. कारण दृश्याचा मुळीं असंभवच आहे. तर केवळ द्रष्टा स्वतः भासतो. त्याच्या विपरीत काहीं नाहीं. चेत्याचा जर मुळीं संभवच नाहीं तर तें कसें झालें हें कोण सांगणार ? अर्थात् हें सर्व शांत ब्रह्म आहे. भ्रम होण्याचेंही वस्तुतः काहीं कारण नाहीं.

**श्रीराम**—भगवन्, आपलीं हीं उत्तरें ऐकून मी भ्रांत झालों आहे. मला काहीं सुचेनासें झालें आहे. पण माझें समाधानही झालेलें नाहीं. तेव्हा मी आणखीं अधिक काय विचारूं ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, असा संदिग्ध मनाने राहू नकोस. तर संशय नाहींसा होईतों मला प्रश्न कर. म्हणजे संशयाबरोबरच अज्ञानाचाही क्षय होऊन तूं परम स्वभावात विश्रांति पावशील.

**श्रीराम**—कारण नसल्यामुळें सृष्टीच्या आरंभींच काहीं उत्पन्न झालें नाहीं, हा आपला सिद्धान्त मला कळला. पण हा विषयांविषयीं भ्रम

कोणाला होतो, हें अजून कळलें नाहीं. त्याविषयींचा संशय अद्यापि जात नाहीं. त्याचें कारण काय ?

**श्रीवसिष्ठ**—मी सांगितलेला सिद्धान्त जर तुला कळला आहे, तर संशय कां जाऊं नये ? पण तुला अद्यापि संशय आहे, हेंही खरें; व त्याचें कारण अभ्यासाच्या अभावीं ज्ञान दृढ झालेलें नसणें, हेंच आहे. चित्ताची अविश्रांति हेंच नानासंशयाचें बीज आहे.

**श्रीराम**—जगद्भ्रांतीचेंही जर कारण नाहीं, तर ही अभ्यासात्मक भ्रांति कोठची आली ?

**श्रीवसिष्ठ**—रामा, कोणतीही भ्रांति नसेना कां ? तथापि जीवन्मुक्ताच चिद्घनात्मक सर्व वस्तूशीं जसा व्यवहार व्हावा तशीच तुझीही चिद्घनात्मक अभ्यासप्रवृत्ति होऊं दे.

**श्रीराम**—भगवन् , आपल्यासारख्या सर्व जीवन्मुक्ताच्या दृष्टीनें सर्व जगद्भ्रम शांत झाला असतां त्यांना या अध्यात्मशास्त्ररूप शब्दसंपत्तीनें उपदेशास पात्र असलेल्या आम्हांसारख्यावर उपदेशानुग्रह कसा करतां येतो ? त्याच्या त्या प्रवृत्तीचें कारण काय ?

**श्रीवसिष्ठ**—त्यांच्या उपदेशादि सर्व व्यवहाररूपानें ब्रह्मच ब्रह्मामध्यें स्थित आहे. कारण इतराच्या दृष्टीनें बंध, मोक्ष, त्याचे उपाय इत्यादि जरी असले तरी तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें त्यातील काहीं नसतें.

**श्रीराम**—अज्ञदृष्टया प्रसिद्ध असलेली ही जगत्सत्ता कशी उपस्थित झाली आहे ?

**श्रीवसिष्ठ**—अज्ञानानें. कारण जीवन्मुक्तीच्या पूर्वी दुसरी अनुभवसिद्ध सत्ता आम्हाला भासली नाहीं. तर मग तत्त्वबोध तरी कोणाला होतो ? म्हणून म्हणशील तर सांगतों—तो अज्ञाला होतो. जसा निजलेलाच पुरुष जागा होतो; जागा असलेला जागा होत नाहीं, त्याप्रमाणें ज्याला तत्त्वज्ञान नसतें तो बोधाचा विषय होतो. बोधालाच आम्ही अहं, त्वं इत्यादि नावें देतों. कारण अशा कल्पित भेदावाचून मुळीं शब्द-व्यवहारच होत नाहीं. यास्तव शुद्ध अद्वैताचाच आश्रय करावा. ज्ञेयविषय सत्य आहे, अशा अभिनिवेशानें प्राप्त होणारा बंध तत्त्वज्ञानानें क्षीण होतो. तत्त्वज्ञांना सत्य

ज्ञेय दिसतच नाहीं. त्यांची ज्ञप्तिच अवशिष्ट प्रारब्धभोग भोगावयासाठीं नाना विषयाकार होत असते. त्यामुळें त्याना पुनः बद्ध होण्याचा प्रसंग येत नाहीं. ज्ञप्तीच्या बळानेंच सिद्ध होणाराही बाह्य पदार्थ भ्रांतिमात्र आहे, असा तत्त्वज्ञांचा निश्चय असतो. त्यामुळें त्यांना त्यांच्या सत्यत्वाची भ्रांतिच कधीं होत नाहीं.

**श्रीराम**—पण भगवन्, स्वप्न सत्य किंवा असत्य, कसेंही जरी मानलें तरी तें दुःख देतेंच. त्याप्रमाणेंच हा प्रपंच कसाही जरी असला तरी दुःख दिल्यावांचून काहीं रहात नाहीं. यास्तव दुःखशांतीचा कांहीं उपाय सांगा. कारण अगोदर ती झाली पाहिजे आहे.

**श्रीवसिष्ठ**—आत्मज्ञानशून्य अज्ञाच्या दुःखाची सकारण शांति व्हावी म्हणून तर आम्ही या विक्षेपात पडलों आहों. रामा, ही जगत्स्थिति स्वप्ना-प्रमाणें आहे, इतकें ठरलें म्हणजे हा सर्व आकारग्रहरूप भ्रम आहे, असें समजतें. पिंडग्रहतेचा बाध होतो व त्यामुळें दुःखाचा उपशम होतो. पूर्वापर विचार करूं लागलें म्हणजे बोध अवश्य होतो व स्थूलस्वप्न-भावना निवृत्त होते.

**श्रीराम**—ज्याची भावना कृश झाली आहे, तो जगाला कसें पाहतो ? त्याचा हा संसारभ्रम कसा शांत होतो ?

**श्रीवसिष्ठ**—वासनाशून्य पुरुष ज्ञान उत्तरोत्तर जसें जसें परिपक्क होत जाईल तसा तसा जगाला उद्‌ध्वस्त झालेल्या नगराप्रमाणें, असत् आभा-साप्रमाणें, पावसाच्या योगानें धुवून गेलेल्या चित्राप्रमाणें पाहतो. शेवटीं तर त्याची जगद्वासनाही विलीन होते. त्यामुळें तो महात्मा अतिशय शांत होतो. जगद्वासना अनेक जन्मापासून रूढ जरी झालेली असली तरी यथार्थविज्ञानानें शांत होऊं शकते. रामा, पिंडग्रहभ्रम निघून गेला म्हणजे चित्त निरोधगौरवापासून मुक्त होतें. तें आत्ममात्र होतें. त्यामुळें जगाची आस्था सुटते. सर्व संकल्पमात्र होतें. मग दुःख कोठून होणार ? चित्तें चिद्विषयोन्मुख होणें हेंच चित्त आहे. पण या शास्त्रात सांगितल्याप्रमाणें विचार केला असतां वासना शांत होते व चित्तही विषयोन्मुख होत नाहीं. चित्त अंतर्मुख झालें कीं दुःख तत्काल नाहींसें होतें; पण चित्त अचित्त कसें होईल, म्हणून म्हणशील तर सांगतों. चेत्याचा मुळीं संभवच नस-

त्यामुळें चित् त्याकरिता उन्मुख होत नाहीं व त्यामुळें चित्त अचित्त होऊं शकतें.

**श्रीराम**—भगवन्, चेत्य जर सर्वथा संभवत नाहीं तर त्याचा जो अनुभव येतो त्याचा विषय कोण? शिवाय अनुभविलेल्या विषयाचा अपह्नव कसा करितां येईल?

**श्रीवसिष्ठ**—अज्ञाच्या दृष्टीनें असलेलें जग तात्त्विकदृष्ट्या खरें नव्हे. कारण अज्ञाच्या दृष्टीनें जन्म-नाशयुक्त असलेलें जग तत्त्वज्ञाला संभवनीयच वाटत नाहीं. तर मग त्याचा अनुभव कसा येतो, म्हणून म्हणशील तर स्वप्नातील जगाप्रमाणे असें समज. जाग्रतींतील संस्कारामुळेंच स्वप्न दिसतें, असें म्हणता येत नाहीं. कारण जाग्रतींतील विषयच जर स्वप्नात भासते तर ते विपरीत भासले नसते. जसे जाग्रतींत असतात किंवा भासतात तसेच भासले असते. पण तसे होत नाहीं. जाग्रतींत मेलेली स्त्री स्वप्नात दिसते; त्याचप्रमाणे स्वप्नांत जळलेलें किंवा पडलेलें घर उठल्यावर जसेंच्या तसेंच्या तसेंच दिसतें. जाग्रत् व स्वप्न यामध्यें जर काहीं संबध अथवा दोघाचें ऐक्य असतें, तर दोन्ही अवस्थामध्यें पदार्थांचें भान समान झालें असतें.

**श्रीराम**—भगवन्, जाग्रत्-पदार्थच स्वप्नात भासत नाहीं, तर ते ब्रह्मच तसें भासतें, हें मी मानतों; पण आता मला एवढाच संशय आहे कीं, तें अन्य ब्रह्म अपूर्व जगत्-आकारानें कसें भासतें?

**श्रीवसिष्ठ**—राघवा, अपूर्व पदार्थच स्वप्नात भासतो, असा काहीं नियम नाहीं, तर काहीं पूर्वीं कधींही न अनुभविलेले पदार्थ स्वप्नात दिसतात व काहीं अनुभविलेले दिसतात. सृष्टीच्या आदि-मध्य-अंतसमयीं पदार्थ ज्या ज्या आकारानें अनुभविलेला असेल त्या त्या आकारानेंच तो भासतो. यास्तव सर्व ब्रह्माकार आहे, असा दृढ अभ्यास केलेला असल्यास स्वप्नांतही तसाच भास होईल.

**श्रीराम**—खरें आहे. आपल्या या उत्तम बोधानें जाग्रज्जगत्ही स्वप्नात्मकच भासतें, हें मी समजलों. पण तसलाही हा जगद्यक्ष एकाद्या उग्र ग्रहाप्रमाणें बाधा करीत असतो तेव्हा त्याची शांति कशी होणार?

**श्रीवसिष्ठ**--रामा, याच्या चिकित्सेचा विचार हा एकच उपाय आहे. यास्तव हें संसारस्वप्न कोणाल्या कारणानें झालें आहे; याचा विचार करावा. रामा, कार्याहून कारण भिन्न नाहीं या गोष्टीचा चांगला विचार करून या भ्रमाचें कारण काय आहे, तें सांगा पाहूं.

**श्रीराम**--भगवन् , स्वप्नभ्रमाचें निमित्त चित्त आहे.

**श्रीवसिष्ठ**--मग झालें तर; तेंच महा चिद्धन चित्त स्वप्नादिरूपानें स्थित आहे, दुसरें कांहीं नाहीं, असें समज.

**श्रीराम**--तें खरें. पण शाखा, पान, फुलें इत्यादि अवयव व वृक्ष ( अवयवी ) यांचा तादात्म्यरूप ऐक्यभाव जसा स्वगतभेदसहिष्णु असतो तसाच चित्त व जगत् यांचा ऐक्यभावही भेदास पात्र आहे, असें कां म्हणूं नये? जगदादि--समष्टि चित्ताच्या योगानें निरवयव ब्रह्मामध्यें राहील.

**श्रीवसिष्ठ**--पण जगत् संभवेल तर ना हें सर्व म्हणावयाचें! ते मुळीं जर संभवतच नाहीं तर त्याची एकता कोठली व अवयवता तरी कोठची? तस्मात् चित्तभ्रमरूप जग अजर, शांत, अज व अखंड ब्रह्म आहे.

**श्रीराम**--गुरुवर्य, मी आतां सर्व समजलों. सृष्टि, स्थिति, लय, इत्यादि सर्व भ्रम काकतालीय न्यायानें झाले आहेत. द्रष्टृत्व, भोक्तृत्व इत्यादि सर्वही परम पदीं झालेले भ्रमच होत.

**श्रीवसिष्ठ**--रामा, तीन प्रकारची दृष्टि आहे. एक पामरदृष्टि, दुसरी यौक्तिकदृष्टि व तिसरी तत्त्वदृष्टि. त्यांतील पहिलीचें निराकरण पुढच्या दोन दृष्टींचा आश्रय करून करावें व दुसरीचें तिसऱ्या दृष्टीच्या आश्रयानें करावें, असा तत्त्वज्ञांचा संकेत आहे त्यास अनुसरूनच मीही या शास्त्रांत सर्व दृष्टी व त्यांचे द्रष्टे जीव नाहींत, जगाची शून्यता व भ्रमही नाहीं, इतकी स्थिति येईतों ( म्हणजे नित्य अपरोक्ष परमानंद ब्रह्मात्मैकवस्तु-स्थितिपर्यंत) या विश्वाचा निर्णय केला आहे १९०.

**सर्ग १९१**--अज्ञानामुळें ब्रह्मच जगदाकार भासतें व निर्वाण, तत्त्वज्ञानी पुरुषाचाच विषय आहे.

**श्रीराम**--मुनिवर्य, तर मग हें जग परतत्त्वाचा विवर्त आहे. त्यामुळेंच तें कधीं उत्पन्न व नष्ट होत नाहीं. ही विक्षेपशक्ति-प्रधान अविद्याच

यौक्तिकदृष्टीनें भासत आहे. पण तात्त्विकदृष्ट्या पाहिल्यास ती भ्रांतिही नाहीं. तर केवळ ब्रह्मसत्ताच आहे.

**श्रीवसिष्ठ**—राघवा, खरें आहे. काकतालीय न्यायानें अतर्क्य अविद्येच्या योगानें ब्रह्मच स्वरूपात जीवरूपानें भासतें व तेंच स्वतःला जग समजतें.

**श्रीराम**—पण भगवन्, मला मोठें आश्चर्य वाटतें कीं महाप्रलयसमयीं दिशादि कांहीं आश्रय नसताना अपरिच्छिन्न चिदाकाशाचा प्रकाश कसा संभवतो ? त्याचप्रमाणें मोक्षसमयीं तें स्वयं कसें प्रकाशमान होतें ? ( भिंत, पडदा इत्यादि कांहीं तरी आधार सांपडल्यावाचून सूर्य, दीप इत्यादिकांचा प्रकाश जसा व्यक्त होत नाहीं त्याप्रमाणें चिदात्म्याचीही निराधार अभिव्यक्ति असंभाव्य आहे. )

**श्रीवसिष्ठ**—खरें आहे. हें मोठेंच आश्चर्य आहे, यात कांहीं संशय नाहीं. कारण निराधार प्रकाश कोठेंही दिसत नाहीं. पण त्याला काय करणार ? त्याला आमचा काय इलाज आहे ? तथापि यथार्थ अनुभवबळानेंच त्याची संभावना करणें भाग आहे. तूं चागला विचार करून पहा. कारण ती चिति सूर्यादिकांच्याही प्रभेची प्रभा आहे. ती अंधकारामध्येंही प्रकाशमान होते व सूर्योदयानंतर इतर प्रकाशादिकांसहवर्तमानही राहते. सूर्यादिकांचा प्रकाशही भिंत, पडदा इत्यादि आधार असले तरच सिद्ध होतो असें नाही. तर तो त्यांच्यावाचूनही राहूं शकतो. तो त्या आधारांवर स्पष्ट भासतो इतकेंच काय तें. त्याची प्रकाशता भिंत इत्यादिकांमुळें सिद्ध होते किंवा ती तत्प्रयुक्त आहे, असें मुळींच नाहीं. उलट भिंत व तिचें भासन सूर्यादिकांच्या प्रकाशस्वभावामुळेंच सिद्ध होतें. भिंतीच्या संबंधापूर्वीच आकाशात प्रकाश जसा दिसतो तसाच सृष्टीच्या पूर्वीं प्रलयसमयींही हा निर्विषय आत्मा असतो, असें समजावें आणि याप्रमाणें निराधार चित्संभावनेची सिद्धि होत असल्यामुळें तीच सर्गाच्या आरंभीं जगाच्या आकारानें मिथ्या परिणाम पावली आहे. जशी स्वप्नादिकांमध्यें तशीच ती एक चित्च आतांही द्रष्टृ-दृश्यात्मक होऊन भासते. तीच स्वयंप्रभा देवी भास्य विषय व भाव आहे. एकच चित् तीन रूपांची होऊन सृष्टिसमयीं व्यक्त होते. अशा भासुर रूपानें भासणें

हाच तिचा स्वभाव आहे. स्वभाव हीच मायाशक्ति आहे. तिच्या अघटित घटनाचातुर्यामुळें प्रथम उदय पावलेली चिद्दीप्तिच अशी प्रकाशित होते. वास्तव हें जग आदि-अंतरहित आहे. तिचें सर्गरूपानें भान, हेच सर्ग होत. पण अज्ञ जनाना या गोष्टीचें जसें मोठें आश्चर्य वाटतें, तसें तत्त्ववेत्त्याना तें वाटत नाहीं. कारण आम्हांला हें सर्व स्वभावभूत आहे, असेंच वाटतें. त्यामुळें अग्नीच्या स्वभावभूत दाहाप्रमाणें त्याचेंही आश्चर्य वाटत नाहीं. त्या कारणानें ही दृश्यदर्शन संवित्ति अकस्मात् जरी आहे, अशी वाटली तरी तत्त्वाचें अनुसंधान केल्यानें लागलीच क्षीण होते. (तत्त्वानुसंधान कसें करावयाचें तेंही सांगतात.) सृष्टीच्या पूर्वी कोणी भास्य विषय नव्हता व भासक नव्हता. पण खांबाकडे पाहून हा पुरुष असावा, असा प्रत्यय जसा यावा, त्याप्रमाणें मिथ्या-ज्ञानवशात् आत्म्याच्या ठिकाणीं द्वितीभान ( द्वैताचे भान ) झालें आहे. त्यामुळें हे द्वैतभासन चित्तात आहे. सृष्टीच्या पूर्वी भास्य पदार्थ नव्हता. पण त्याबरोबरच सर्व भासक चिदात्माही नव्हता, असें म्हणता येत नाहीं. कारणाचा अभाव असल्यामुळें केवल चिदाकाशच द्वैतरूपाने भासतें, असें म्हणणेंच भाग आहे. बरें कारण आहे, म्हणून म्हणावे तर तें कोणतें, तें सांगितलें पाहिजे. पण तें कोणालाही सांगता येत नाहीं. सृष्टीच्या प्रारंभीं जगाचें जें भान होतें त्याचा जाग्रत् , स्वप्न किंवा सुषुप्ति यांतील एकांतही अवस्थेमध्यें अंतर्भाव होत नाहीं. वास्तव तें चवथी, तुर्यावस्थाच होय. असो; रामा याप्रमाणें तत्त्वाचें अनुसंधान करून तत्त्वास जाणावें. नंतर भूमिकापरिपाकक्रमानें तें दृढ होईतों सर्व व्यापार सोडून निर्विकल्पसमाधींत स्थिर व्हावें. अज्ञ जनानीं वारंवार भोग घेऊन शेवटीं वैराग्यानें सोडलेलें हें विषयजात कोणी कुजनानें घे म्हणून सांगितलें तरी घेऊं नये. कारण विषयग्रहण करूं लागलें म्हणजे तें भोगळांपट्यास कारण होतें व समाधिसुखाचा विघात करतें १९१.

**सर्ग १९२**—प्रबुद्ध राम आपला बोध गुरूपुढें प्रकट करतो.

**श्रीराम**—हर हर ! आम्ही दीर्घ काल या संसारसंज्ञक परमाकाशात केवल अज्ञानामुळें भ्रमण करीत राहिलों होतों. आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झाल्यावर ही सर्व जगद्भ्रांति, मुळींच नव्हती, आतां नाहीं व पुढें नसेल, हें

निश्चयानें कळतें. सर्व शांत, निराधार तत्त्व पसरलें आहे सृष्टीच्या पूर्वी तिच्या आरंभीं, परलोकीं, स्वप्नादिकामध्यें, कल्पना इत्यादिकात एक चित्‌च चेत्या-प्रमाणें भासते. पुरुषास केवळ भ्रांतीमुळें बंध होतो. पण वस्तुतः हें दृश्य नाहीं, द्रष्टा नाहीं, सर्ग नाहीं, जगत् नाहीं, चिदाभास नाहीं, जाग्रत नाहीं व स्वप्नही नाहीं. तर हें काहीं तरी असत् आहे. ही भ्रांति असद्रूप असल्यामुळेंच हिच्या कारणाविषयीं विचार करणेंही युक्त नव्हे. तत्त्वज्ञान-रूप पदामध्यें भ्रांति संभवतच नाहीं. स्वप्नातील आपल्याच मरणाप्रमाणें हा भ्रांतीचा मिथ्या अनुभव आहे. पण अज्ञान नेहमींच ज्ञानानें नाश पावत असतें. यास्तव हा भ्रम विचारानें क्षीण होतो. बाळकाळा वेताळाचा भ्रम जाग्रतींतच होत असतो. त्यामुळें जागरामध्यें प्रत्यक्ष पाहि-लेलीही भ्रांति असू शकते. अर्थात् जागरावस्थेंत दिसणारें हें जग यथार्थ ज्ञान आहे, असें म्हणता येत नाहीं. पण असला हा भ्रम का झाला, असा प्रश्न करणेंही युक्त नव्हे. कारण प्रश्न विचारासाठींच नेहमीं होतो. पण विचारानें सुद्धा सत् वस्तूचाच लाभ होतो, असत् वस्तूचा लाभ होत नाहीं. प्रमाणतः विचार करूं लागलें असता जें सापडत नाहीं, तें असत् होय. असलें असत् अज्ञानच जगाचें मूळ आहे. त्यामुळें जगाचा अनुभव हा भ्रम आहे. अज्ञान व त्याचें कार्य जग याचें मूळ सत् कां मानूं नये ? म्हणून म्हणावें, तर प्रमाणाच्या योगानें परीक्षण करूं लागलें असता जें नाहीं, असा निश्चय होतो तें सत्—पासून झालेलें कसें असेल ? सर्वत्र पाहिल्यावरही ज्याचा उपलंभ होत नाहीं तो पदार्थ विद्यमान कसा अस-णार ? यास्तव कोणत्याही प्रकारची भ्रांति कधींही संभवत नाहीं. तर हें सर्व आवरणरहित विज्ञानघन तत्त्वच पसरलें आहे. ते आपल्या निरतिशय परानंदांत स्थिर आहे. कोणालाही त्याचा अपहार करता येत नाहीं. विद्वान् त्याचेंच सेवन करीत असतात. अहं, त्व, इत्यादि आवरण—परिच्छेदशून्य झालेलें तें सर्वतः विकसित झालेलें असतें १९२.

**सर्ग १९३**—राम नित्य आत्मस्थितीचें वर्णन करतो.

**श्रीराम**—भगवन्, त्या परम पदास देव किंवा ऋषि जाणत नाहींत. जळाच्या जलत्वाप्रमाणें ब्रह्माचें हें जगत्व आहे. ज्या जीवाला परम तत्त्वाचा साक्षात्कार होतो त्याचा हा संसारपिशाच शांत होतो. अज्ञान

गेलें कीं संसाराचा अस्त झालाच म्हणून समजावें. त्रिविध ताप व विषयतृष्णा इत्यादि शांत झाल्या कीं मोक्षसुखाला आरंभ होतो. नंतर जीव सर्व व्यवहार करीत असला तरी कांहीं करीत नाहीं. आम्हा तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें अविद्या, भ्रांति, दुःख, सुख, इत्यादि कांहीं नाहीं. तर सर्व शुद्ध ब्रह्मच आहे. भगवन्, आपल्या अनंतानंत उपकारानीं मी आता अज्ञाननिद्रेपासून जागा झालों आहें. माझ्या सर्व कुदृष्टि शांत झाल्या आहेत. मी आता तेंच शांत सर्व प्रकारच्या वैषम्यानें रहित झालेलें जग पहात आहें. विवेकदृष्टीनें पाहिलें असता हें जग केवल ब्रह्मच दिसतें. मी पूर्वींही कोणी अन्य नव्हतो व आतां ही नाहीं. तर पूर्वी ब्रह्मच होतें व आताही तेंच आहे. पण एवढा वेळ तेंच आपल्याला जाणत नव्हतें व आता जाणत असल्यामुळें स्वस्वभावात स्थित आहे. नीलत्वाभाव व नीलत्व या दोन्ही अवस्थामध्यें आकाश जसें एक तसें अज्ञात व ज्ञात या दोन्ही अवस्थामध्यें ब्रह्म एक. गुरुवर्य, अनेक सुकृत परिपाकामुळें आता मला ज्ञान झालें आहे व त्या कारणानें मी स्वतः निर्वाणच होऊन राहिलों आहें. आता माझ्या सर्व शंका निवृत्त झाल्या आहेत. मला कशाची इच्छा राहिली नाहीं. त्यामुळेंच मी आता सुखानें रहात आहें. जाणण्यास योग्य असलेलें पुरुषार्थरूप मी जाणलें आहे. अज्ञास अप्राप्य असलेलें मोक्षसुख मला प्राप्त झालें आहे. संसार-अनर्थरूप वस्तुजात अस्त पावलें आहे. माझें अंत्य साक्षात्काररूप निजस्वरूप उदय पावलें आहे. या माझ्या स्वरूपात मरण, जन्म, व्याधि इत्यादि अनर्थांचें नांवही नाहीं १९३.

सर्ग १९४—राम स्वतः जाणलेलें आत्मतत्त्व, जगत्तत्त्व व निर्वाणसाधन गुरूंना निवेदन करितो.

**श्रीराम**—सर्व जीवांच्या सर्व मनोवृत्तींमध्यें जेव्हां जेव्हां ज्या ज्या भोगनिमित्तानें जसा स्वप्रकाश चिदात्मा भासतो ( विवर्त पावतो ) त्याप्रमाणें तेव्हा स्वतःच नाना जीवत्वाचा अनुभव घेतो, ( म्हणजे आपल्या मयाशक्तीमुळें तो स्वतःच त्रिपुटीभावानें विवर्त पावतो ). एका निरवयव परम सूक्ष्म ब्रह्मामध्यें अनेक जीवानीं कल्पिलेले अनेक सर्ग राहूं शकतात. एवढयाशा रत्नामध्यें घरभर पसरणारे किरण कसे राहतात ?

तसेच अनंत सर्ग स्वभावांत राहतात. कारण स्वरूपांत स्वरूपालाच अवकाश सांपडत नाहीं, असें मुळींच होत नाहीं. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष जग या महातत्त्वात अगदीं मोकळेपणानें राहूं शकतें व व्यवहारही करतें. त्यात ज्या जीवाचा समानकर्मवासनानिमित्त अध्यास असतो त्याचा परस्पर संबंध होतो. अज्ञानदृष्ट्या प्रत्येक अणुरेणूंत ब्रह्म आहे व ज्ञानदृष्ट्या तें कशातही नाहीं. कारण सृष्टि असेल तर तें त्यांत राहणार कीं नाहीं ? सर्वत्र चिद्घन आहे. तेव्हां त्यातील सर्गांची गणना कोण कोठवर करणार ? अवयवीहून अवयवित्व जसें पृथक् नाहीं, त्याप्रमाणें परमात्म्याहून सर्गता पृथक् नाहीं. त्याचा भेद नाममात्र आहे. काहीं कारणच नसल्यामुळें एक व अनंत आत्म्यापासून जगत् इत्यादि अनर्थ उत्पन्नच होत नाहींत. स्फुरण पावणारी ही ज्ञप्तिच कर्तृरूप अखंड ज्ञेयता निर्माण करते. वैराग्यानें सर्व भावाचें तत्त्वज्ञान झालें असतां त्याच्या योगानेंच भावाचा बाध होतो आणि त्याची समाप्ति झाली कीं, स्वतः अक्षय तत्त्व देहादि क्षयिष्णु पदार्थांच्या तादात्म्याध्यासापासून मुक्त होतें. तेंच समाधान व निर्वाण होय. भगवन्, परमपुरुषार्थरूप बोध अंत्यसाक्षात्काररूप वृत्तीनें जाणला जात नाहीं. कारण जडबुद्धीमध्यें त्याला जाणण्याचें सामर्थ्य नसतें. बोधानेंही बोध जाणला जात नाहीं. कारण तो आपणच आपल्याला कसा जाणील ? तस्मात् अध्यासपरंपरा चरम साक्षात्कारबुद्धिपरंपरेनें शांत होते. ती शांत झाली कीं नित्य प्रबुद्ध असलेलाच आत्मा धुकें गेलें असतां जसा सूर्य तसा व्यक्त होतो. तोच नित्य निरतिशयानंदलक्षण परम पुरुषार्थ आहे. साक्षात्कारामुळें सर्व कर्मफलाविषयीं वितृष्ण झालेल्या विरक्त संताना निर्वाण प्राप्त होतें. ज्याचा आत्मा मोहनिद्रेपासून मुक्त झाला आहे, ज्यानें आपल्या बाह्यवृत्तींचा निरोध केला आहे व जो केवल स्वभावात स्थित झाला आहे, तो कशाचें ग्रहण करीत नाहीं व कशाचा त्याग करीत नाहीं. जो व्युत्थानसमयींही जशाच्या तसाच असतो तो विषयासंगाचा अभाव असल्यामुळें मनोमननवान् असला तरी मन, मान व मनन त्यांनीं रहित व त्यामुळेंच दीपाप्रमाणें प्रकाश करीत असला तरी अक्रिय व उदासीनासारखा असतो. तत्त्वसाक्षात्कारानंतर पुरुषाची बोधमात्र सत्ता राहते. कारण जगाचा

बाध झाल्यावर एक साक्षि चिन्मात्र सत्ताच अवशिष्ट राहते. पुरुष त्या सत्तेमध्यें स्थित असता त्याच्या त्या दशेचें वर्णन करवत नाहीं. त्यावेळीं परा सत्ता अवशिष्ट राहते कीं नाहीं, हें सांगवत नाहीं. कारण सामान्य सत्तेची ( बोधाची ) ती पराकाष्ठा आहे. सर्गही तन्मय आहे. यास्तव सर्व शांत व अव्यय आहे. ब्रह्मा, विष्णु, हर इत्यादिकांनाही तें निरतिशयानंदरूप अतिशय प्रिय असतें. ते त्याची स्पृहा करितात. यास्तव तेंच निर्वाण होय. सर्व जीवांना सर्वदा अत्यंत स्पृहणीय असलेली वस्तु एक चैतन्यच आहे. तें सर्वकाळीं व सर्व देशामध्यें सर्व वस्तूंच्या स्वरूपानें सदा असतें. तेंच स्वयंस्फूर्तिरूप शुद्ध तत्त्व होय. यास्तव त्याचें अदर्शन ( लोप ) एक क्षणभरही होऊं शकत नाहीं. संसार अतिशय दुःखरूप आहे व निर्वाण अतिशय सुखरूप आहे. सौम्यजळ कोशस्थ तरंगमंडळास जसे व्यक्त करतें त्याप्रमाणें महाचित् अव्यय चेत्यास चेतित करिते. तें स्वतःच चेत्य ( विषय ) होऊन स्फुरण पावतें. अज्ञानानें आवृत झाल्यामुळें जडप्राय व परमार्थाकाशाचे कृत्रिम वेषच अशा जीवांनीं जशी जशी भावना करावी तसा तसा तो अज्ञात आत्मा होतो. स्वप्नांतून उठलेल्या ( जागा झालेल्या ) पुरुषाला स्वप्नांत पाहिलेलें स्वबंधूचें मरण अथवा जीवित जसें सत्य वाटत नाहीं त्याप्रमाणें तत्त्वज्ञाला सर्व दृश्याविषयीं सत्य भावना अथवा तत्प्रयुक्त हर्ष व शोक होत नाहींत. कारण जें दृश्यादि त्रिपुटीरूप तें सर्व शांत शिव आहे, असें मनांत समजलें म्हणजे मग भ्रांतीचा उद्भव कसा होणार? यथार्थबोध झाला कीं भोग व त्याचे उपाय याविषयीं वैराग्य उत्पन्न होतें. वैराग्याच्या योगानें बोधाचा उदय होतो व बोधानें वैराग्य दृढ होतें. म्हणजे भिंत प्रकाशाला व प्रकाश भिंतीला जसा सिद्ध करतो त्याप्रमाणें वैराग्य व बोध परस्परास सिद्ध करितात. वितृष्णता हेंच बोधाचें बोधत्व आहे. ज्यांत वितृष्णता नाहीं, तें पांडित्य म्हणजे मूर्खताच होय. वैराग्य व बोध परस्परांकडून वृद्धि पावणारे जरी असले तरी सत्यच होत. चित्रांतील अग्नीप्रमाणें ते कार्य करण्यास असमर्थ आहेत, असें समजूं नये. कारण बोध व वितृष्णता यांची निरतिशय संपत्तिच परम आनंदरूप व आत्यंतिक दुःखक्षयरूप असल्यामुळें मोक्ष आहे. कारण अबोध हेंच

बंधाचें मूळ व तृष्णाच बंध आहे. यास्तव त्या दोघांचा क्षय हाच मोक्ष असें म्हणता येणें शक्य आहे. भगवन्, माझा बोध व वैराग्य या दोघांचीही अतिशय वृद्धि झालेली असल्यामुळें मी आता कृतकृत्य झालों आहें. आत्माराम, शांत, विरक्त व निरहंकार अशा माझी आता संकल्पशून्य व म्हणूनच आकाशासारखी निर्मल स्थिति झाली आहे. प्रभो, सहस्त्रावधि लोकांतील कोणी एकादाच वीर्यवान् महाप्रयासानें या संसारगर्तेंतून निघून, सिंह जसा पिंजऱ्याला, त्याप्रमाणें वासनाजालाला तोडून बाहेर पडतो. ज्याला आत्मप्रकाश प्राप्त झाला आहे व जो बोधाच्या योगानें अति शुद्ध झाला आहे तो महा भाग्यवान् पुरुष आपोआप शांत होतो. ज्याला ज्ञेय कळलें आहे व ज्याचें चित्त संकल्पाचें उल्लंघन करून गेलें आहे, अशा वासनारहित जीवन्मुक्तानें पाहिजे तर व्यवहार करावा किंवा नये करूं. तत्त्वाच्या मननानें सर्व वस्तु भ्रांतिमात्र आहेत अशा निश्चयानें निश्चळ राहणें, हेंच वासनारहित अवस्थान होय. भगवन्, शुद्ध अंतःकरणाच्या पुरुषाला सर्व दृश्य ब्रह्मच आहे, असें स्थिर ज्ञान झालें असता सर्व संसार-शांतिरूप मोक्ष आपोआप उदय पावतो १९४.

**सर्ग १९५**—गुरु रामाच्या शुभ युक्तींची प्रशंसा करितात व त्याची प्रश्नपूर्वक परीक्षा करितात.

**श्रीवसिष्ठ**—वाहवा रामा, तूं आता चांगला ज्ञानी झाला आहेस. तुझी ही वाणी अज्ञांच्या पापाचा नाश करणारी व ज्ञानी पुरुषांना आनंद देणारी आहे. हें जगत् असत्च आहे. तथापि तें बाधप्रयुक्त संकल्पानें भासतें. पण तेंच, असंकल्प दृढ झाला असता तत्त्वज्ञानानें शांत होतें. अर्थात् जगाचें संकल्पप्रयुक्त मिथ्या भान हाच बंध व असंकल्पप्रयुक्त तत्त्वज्ञान हेंच निर्वाण किंवा मोक्ष होय. अतिशय शांति हीच परमार्थता आहे. बंध व मोक्ष हीं ब्रह्माचींच रूपें आहेत. ज्ञानी पुरुषाची शिळेच्या आंतील ( मध्य ) भागाच्या स्थितीसारखी जी व्यवहारकालींही स्थिर व निर्विकार स्थिति तीच शुद्ध मुक्ति होय. या पदीं स्थिर होणें हीच आमच्या सारख्या जीवन्मुक्ताची समाधि व व्युत्थान कालींही असलेली समस्थिति होय. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर इत्यादि सर्व याच पदीं स्थिर

राहतात. ज्ञानी व्यवहार करीत असतानाही शांत राहतात. यास्तव रामा, तू आता याच आमच्या प्रसिद्ध पदाचा आश्रय करून रहा.

**श्रीराम**—भगवन्, आपल्या मनोहर उपदेशामृतानें मी आतां तृप्त झालों आहें. ब्रह्मामध्यें हें सर्व असत् व अनाकार जग भासतें. तें मृगजळासारखें, पाण्यावरील तरंगासारखें, सोन्यातील कडेंपणा इत्यादिकासारखें अथवा स्वप्नातील पर्वतासारखें आहे.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तुला जर खरोखरच तत्त्वज्ञान झालें आहे तर माझ्या शंकांचें समाधान कर पाहूं. असा हा नित्य अनुभवास येणारा विस्तीर्ण जगाचा आभास विद्यमान कसा नाहीं ?

**श्रीराम**—भगवन्, हें मुळीं काहीं पूर्वी उत्पन्नच झालें नाहीं. त्यामुळें वंध्यापुत्रासारख्या त्याची सत्ता काल्पनिक आहे. या जगद्भ्रांतीचें कारण काय आहे ? काहीं नाहीं. मग कारणावांचून कार्य कसें संभवणार ? ब्रह्म त्याचें कारण आहे, म्हणून म्हणावें तर तें निर्विकार व अक्षय्य तत्त्व सविकार व क्षयवाळें कसें होऊ शकेल ? बरें तें निर्विकार ब्रह्मच विवर्ताचें उपादान कारण होऊन मायेच्या योगानें जगदाकारानें विकास पावतें म्हणून म्हटलें कीं जग सत्य रहात नाहीं. तें असत्य, मिथ्या, भ्रमरूप होतें. हिरण्यगर्भ या नावाचें प्रथम चेतन आतिवाहिक देह धारण करून राहतें व तेंच जगद्भ्रांतीचा विषय होतें. तें प्रथम चेतनच एका क्षणामध्यें वर्ष, युग इत्यादि काळाचा विस्तारभ्रम पाहतें. त्यांत अकस्मात् सूर्य-चंद्रादिकास अवलोकन करतें. केवळ संकल्परूप अशा त्याला देश-काल-क्रियायुक्त भुवन भासतें. तसल्या त्या जगात हा मिथ्या पुरुष मिथ्या सर्गव्यवहार करीत राहतो. नंतर तोच पुरुष आपल्या काल्पित भुवनात व्यष्टि जीवरूपानें दुष्कर्मांचें फळ भोगीत खालीं व वर भ्रमण करीत राहतो. यास्तव या संसाराला निश्चयानें सत्य किंवा असत्य म्हणवत नाहीं. पाण्यात लाटा कितीही जरी उन्मज्जन व निमज्जन करीत असल्या तरी जलामध्यें काहीं अंतर पडत नाहीं. त्याचप्रमाणें योगानें पर तत्त्वात अंतर पडत नाहीं. जलबिंदु जसे जलांत तसें काहीं परतत्त्वज्ञ शुद्ध तत्त्वात मिळून जातात. अमळ व शांत तत्त्वामध्यें जगें व त्यांच्या क्रिया (व्यवहार) संभवत नाहींत. ज्ञानी प्रपंचभोगरस कसा असतो तें जाणत नाहीं. अभाव व भाव याच्या यो-

र्गानें बाह्य दृष्टीपासून परावृत्त होऊन विषयोन्मुखत्व सोडून, समाधींत स्थिर होऊन आत्म्याचा साक्षात्कार केला असतां पुरुषाची स्थिति शांत आत्मरूप होते.

**श्रीवसिष्ठ**—रामा, बीजांकुर न्यायानें हें दृश्य ब्रह्मरूप कारणांत स्थित आहे. त्यामुळें सर्गादि भाव सत् आहे, असें म्हटल्यास कोणता दोष येतो?

**श्रीराम**—बीजांत असलेला अंकुर बीजरूपानें उपलब्ध होत नाहीं. बीजामध्यें असलेली जी त्याची सत्ता ती पृथक् नसून स्वतः बीजच आहे. त्याचप्रमाणें ब्रह्मामध्यें जर जग असतें तर तें उपलब्ध झालें असतें. पण तसें होत नाहीं. तथापि त्याची सत्ता जर मानावयाचीच असेल तर ती ब्रह्मरूपानेंच मानणें भाग आहे. अविकार व अनाकार तत्त्वापासून विकारवान् व महा आकारयुक्त पदार्थ होतो, असें आम्ही कोठें पाहिलें नाहीं व कोणाच्या तोंडचे ऐकलें नाहीं. आकाररहित ब्रह्मामध्यें हें साकार जग कसें राहूं शकेल? परमाणूंत मेरु साठवेल का? करंड्यात जसें रत्न तसें निराकार ब्रह्मात साकार जग राहतें, हे वेड्याचें भाषण आहे. कारण परब्रह्म तादात्म्यानें साकार वस्तूचें आधार होतें, असें म्हणणें शोभत नाहीं. साकार अविनाशि कसें असेल? क्षणिक बोधच या साकार स्वप्नसदृश जगद्रूपानें उत्पन्न होतो. हें बौद्धाचें म्हणणेंही उपपन्न दिसत नाहीं. कारण सर्ग हें अपूर्व स्वप्न आहे, पूर्वी ज्याचा कधीं अनुभव घेतलेला नव्हता असा हा नेत्रादि प्रमाणाचा विषय होतो. पण स्वप्न जाग्रत्संस्कारापासूनच होत असतें, अशी लोकप्रसिद्धि आहे. त्यामुळें जाग्रत् व स्वप्न एकच; त्यात कांहीं भेद नाहीं. असें जें बौद्धाचें म्हणणें आहे, तें सुसंगत दिसत नाहीं. कारण त्या दोन्ही अवस्था जर खरोखरच भिन्न नसत्या तर स्वप्नात मेल्यामुळें श्मशानात नेऊन जाळलेला पुरुष दुसऱ्या दिवशीं अक्षत कसा दिसला असता? यास्तव प्रपंच स्वप्नतुल्य नव्हे. तर मग शास्त्रातही त्याला स्वप्नतुल्य कसें म्हणतात? म्हणून विचाराल तर तेंही सांगतों–प्रपंच कूटस्थ ब्रह्माचे ठायीं आरोपिलेला असल्यामुळें बाध होण्यास योग्य असतो. म्हणून तेवढ्या त्या अंशामध्यें त्याचें ब्रह्माशीं साम्य आहे. आतां कोणी म्हणेल कीं ज्याला शरीरच नाहीं त्याला स्वप्न कसें होणार, तर तें ठीक नाहीं. कारण पिशाचादिक संभवतात व त्याची स्थिति स्वप्नासारखी

असते. यास्तव सविदात्म्यामध्यें स्थित असलेला हा संसार स्वप्नवत् आहे. म्हणूनच प्रपंच नाना आकृतींनीं युक्त असला तरी परमात्मा निराकार राहूं शकतो, अथवा निराकार परमात्माच विवर्तरूप नाना आकृतींनीं स्थित आहे. हा आत्मा सर्व बंधमुक्त ब्रह्मच आहे. ज्ञानानंतर जग दिसतच नाहीं. तें दिसलें तरी त्याचा जग या रूपानें अनुभव येत नाहीं. अज्ञ-दर्शेतही तें अनिर्वचनीयच आहे. माझी ही वाणीही सचिन्मय आहे. हे सर्व जीव त्याच्या दृष्टीनें बद्ध असले तरी माझ्या दृष्टीनें मुक्त भासत आहेत. अनेक व्यवहारांनीं युक्त असलेलें हें जग मला भिंतीवरील चित्राप्रमाणें भासत आहे. कारण त्या निराधार उद्भवलेल्या जगाला सत्यता कसली? तें अज्ञदृष्ट्या सत्य, परमार्थज्ञानवान् पुरुषाच्या दृष्टीनें मिथ्या; ब्रह्मरूप पाहणाऱ्याच्या दृष्टीनें ब्रह्म; व सातव्या भूमिकेपर्यंत अभ्यास केलेल्या पुरुषाच्या दृष्टीनें शून्य आहे. त्याचा अनुभव केवळ तत्त्वज्ञालाच येतो. सर्व चिदाकाश आहे. साराश सर्व शास्त्रार्थाहून अतीत, केवळ स्वानुभवगम्य, चिह्नरहित, शुद्ध, चिदात्मस्वरूप व एक ब्रह्मच आहे, दुसरें कांहीं नाहीं, याविषयीं मुळींच शंका घ्यावयास नको १९५.

**सर्ग १९६**—गुरु-शास्त्र इत्यादि उपायांनीं ब्रह्म कसें प्राप्त होतें, तें दारुवैवधिक-आख्यानानें थोडक्यांत वर्णितात.

**श्रीवाल्मीकि**—हे महामते भारद्वाजा, ( अथवा हे राजन् अरिष्टनेमे ) राजीवनयन राम असें बोलून व क्षणभर विश्रांति घेऊन परमपदीं मुकाट्यानें बसला व अत्यंत तृप्त झालेला तो पुनः कौतुकानें गुरूस म्हणाला. " भगवन्, ब्रह्म तर वाणी व मन यांचा विषय होत नाहीं. तें स्वसंवेद्य असल्यामुळें तुर्यावस्थेंतच लभ्य आहे. त्यामुळें तें जाग्रदवस्थेंतील गुरुशास्त्रादिकांच्या योगानेंही गम्य होण्यासारखें नाहीं. तेव्हां गुरु-शास्त्र इत्यादि तत्त्वसाक्षात्काराच्या उपयोगीं आहे कीं नाहीं?

**श्रीवसिष्ठ**—हे महाबाहो, तुझी शंका बरोबर आहे. शास्त्र ज्ञानाचें कारण होऊं शकणार नाहीं. कारण तें नाना शब्दमय आहे व परम पद तर अनाम आहे. तथापि हे राघवा, शास्त्रादि उत्तम बोध व त्याचें फल ( मोक्ष ) यांच्या उपयोगीं अथवा याचें कारण ( निमित्त ) कसें होतें, तें मी सांगतों, ऐक. कोण्या एका देशीं कावडी वाहणारे दरिद्री कीरक

या नांवाचे शूद्र होते. ग्रीष्माच्या योगानें जसा जुना वृक्ष त्याप्रमाणें ते सर्व दुःखानें सुकून गेले होते. कावडी वहाणाऱ्या त्यांना वैवधिक असें म्हणत. असह्य दारिद्र्यानें त्यांना अतिशय पीडलें होतें. उपाशीं मरत असलेल्या त्यांनीं ' आता आम्हीं आपलीं जठरें कोणत्या उपायानें भरावीं ?' असा पुष्कळ विचार करून शेवटीं अरण्यातून लाकडें आणून व तीं विकून त्यावर पोट भरावें, असा निश्चय केला व लागलेच ते अरण्यांत गेले. कारण आपत्कालीं ज्या युक्तीनें प्राण वाचतात तीच उत्तम होय. असो; त्यामुळें त्यांना भोजनापुरतें द्रव्य मिळालें.

त्या दिवसापासून ते प्रत्यहीं अरण्यातून लाकडें आणून त्यावर निर्वाह करूं लागले. पण ते ज्या वनात जात होते त्यात सर्व गुप्त गुप्त रत्नें, काष्ठें व सोनेंही होतें. परंतु त्यामध्यें जे भाग्यवान् होते त्यानाच तीं रत्नें व सोनें सापडत असे. कित्येकास चंदनाचीं काष्ठें मिळत; कांहीं जणास केतकी, चंपक, इत्यादिकांचीं उत्तम पुष्पें सांपडत. त्यातील कित्येक फळेंच आणून विकीत व त्यावर उदरभरण करीत आणि बरेचसे दुर्भाग्यवान् व सार कसें शोधून काढावें हें न जाणणारे कीरक जाळावयाचीं लाकडें आणूनच त्यावर उपजीविका चालवीत होते. साराश ते सर्वजण लाकडें आणावयास म्हणून एकाच अरण्यात गेले. पण त्यातील प्रत्येकाला त्याच्या भाग्याप्रमाणें लाभ होऊन ते सर्व निश्चिंत झाले.

असो, याप्रमाणें ते सतत त्या अरण्याचें सेवन करीत असताना एके जागीं एकाला एक चिंतामणि लाधला. त्याच्या योगानें त्या सर्वांना सर्व चिंतित अर्थ प्राप्त झाले. त्यामुळें ते सर्वजण तेथें सुखानें नांदूं लागले. ते लाकडें वाहण्यास तयार झाले. पण भाग्यवशात् सर्व अर्थ देणारा मणि त्याना लाधला व त्यामुळें ते देवलोकच्या देवाप्रमाणें राहूं लागले. तात्पर्य काष्ठोद्यमानेंच ज्यांना चिंतामणि लाधला आहे, असे ते कीरक सर्व उत्तम धनांनीं परिपूर्ण होत्साते शान्त, सम, भय—मोह—दुःख-रहित व त्यामुळेंच आनंदपूर्ण होऊन राहिले १९६.

**सर्ग १९७—वरील आख्यायिकेचें तात्पर्य व त्याच्यायोगानें गुरु आणि शास्त्र यांना ज्ञानाचें हेतुत्व.**

श्रीराम--गुरुवर्य, या वैवधिकांच्या आख्यानाचें तात्पर्य मला स्पष्टपणें कळेल, असें त्याचें विवरण करा.

श्रीवसिष्ठ---रामा, प्रस्तुत कथेंतील जे वैवधिक तेच भूलोकचे मानव होत. हे महा तपस्व्या, त्याचें जें दारिद्र्यदुःख तेंच अज्ञान (व अज्ञानप्रयुक्त त्रिविध ताप) होय. मी जें महावन म्हणून सांगितलें आहे तें गुरुशास्त्र इत्यादि होय. ते जन भोगाची इच्छा करणारे असून त्याच्या उपायांकरितां प्रयत्न करूं लागले. कारण माझे भोगसंघ सिद्ध होवोत, असें म्हणून कृपण झालेला जन दुसऱ्या कोणत्याही कार्यार्थाची अपेक्षा न न करिता शास्त्रादिकामध्यें प्रवृत्त होतो. पण तो भोगाकरिताच जरी प्रवृत्त झालेला असला तरी शास्त्राभ्यासाच्या बलानें शेवटीं त्याचें कल्याण होतें. म्हणजे तें शास्त्रच प्रथम त्याला इष्टफलास्वादानें लोभयुक्त करून शेवटीं आपल्या तात्पर्यभूत विषयात ( परम पदांत ) नेऊन सोडतें. कारण ज्या कामनेनें पुरुष शास्त्रीय उपायाचें अनुष्ठान करूं लागतो ती पूर्ण झाली असता शास्त्रावर त्याचा विश्वास बसतो आणि उत्तरोत्तर अधिक फलाच्या आशेनें तो न कळत उत्तम पदापर्यंत जाऊन पोचतो. म्हणजे लाकडें आणावयासाठीं गेलेल्या लोकातील कांहीं जणांना रत्ने कित्येकाना चंदनाचीं लाकडें, कांहींना जळण व त्यांतील एका सारासारशोधक कीरकालाच चिंतामणि जसा लाधला त्याप्रमाणें या मानवांची अवस्था होते. शास्त्रविचारानें काय होतें, तें पाहूं या तर खरें; असें म्हणून संदेहयुक्त कौतुकानें जो प्रवृत्त होतो त्यालाही उशीरानें तें पद मिळतें. सर्व जन आपापल्या वासनेप्रमाणें शास्त्रादिकांमध्यें प्रवृत्त होतात. पण त्याना परम फलच कसें मिळतें हें सांगण्याकरिता वरील आख्यायिका प्रवृत्त झाली आहे. मानवांनीं शास्त्रीय उपायाचें फल आपल्या समजुतीप्रमाणें कांहीं जरी मानलें तरी तें त्यास निरातिशय सुख या एकाच रूपानें मिळतें. जो सतत स्वभावतःच परोपकारामध्यें प्रवृत्त होतो त्याला साधु असें म्हणतात. त्याचें आचरण इतर लोक प्रमाण मानतात आणि स्वतः भोगाकरिता त्या उत्तम आचरणाचें अनुष्ठान करितात. शास्त्राच्या परम फलाविषयीं जरी त्यांना शंका असली तरी भोगप्राप्तीच्या आशेनें ते त्यांत प्रवृत्त होतात. राघवा,

शास्त्रादिकांमध्यें धर्म, अर्थ व काम यांचा उपदेश आहे. पण ब्रह्मबोध पदें व वाक्यें यांच्या मुख्य वृत्तीनें करतां येण्यासारखा नसल्यामुळें त्याचा निर्देश ब्रह्मप्रतिपादक शास्त्रातही कोठें नाहीं. तर वसंतादि कालाची श्री ( शोभा ) पुष्पें, फळें, पानें इत्यादिकांवरून जशी ज्ञात होते त्याप्रमाणें शास्त्रवाक्यांवरून केवळ ब्रह्म ध्वनित होतें. ( याच शब्दवृत्तीला अलंकार-शास्त्रात व्यंजनावृत्ति व न्यायशास्त्रात लक्षणा म्हणतात. )

परंतु रामा, शास्त्र अशा रीतीनें मुख्यवृत्त्या बोध करण्यास जरी समर्थ नसलें तरी लक्षणादि उपायांनीं बोध करण्यास समर्थ आहे. त्यामुळें अधिकारी पुरुषास त्याच्या श्रवणानें बोध होतो. अर्थात् शास्त्र व्यर्थ नाहीं. शास्त्रात अतिशय उत्कर्ष-सपन्न, व अतिशय स्वच्छ ब्रह्मबोध आहे. पण त्याचा योग्य ग्राहक पाहिजे. योग्य ग्राहकावाचून तो मिळण्यासारखा नाहीं. नुस्त्या–शास्त्र, गुरुवाक्य, अन्नदान, ईश्वरपूजन, इत्यादि उपायांनीं हा सर्व–पदातीत श्रेष्ठ बोध प्राप्त होत नाहीं. पण शास्त्रादि हीं त्याचीं वस्तुतः साक्षात् कारणें नसतानाही चित्तशुद्ध्यादि साधन-परंपरेच्या द्वारा कारणे झालीं आहेत. कारण शास्त्राभ्यास करूं लागलें म्हणजे पुरुषाचें चित्त त्याची इच्छा नसली तरी शुद्ध होऊं लागतें. तें अतिशय शुद्ध झालें म्हणजे अनायासानें परम पद पाहते. या किंवा असल्याच दुसऱ्या शास्त्राच्या योगानें अविद्येच्या सात्त्विक भागाचा उत्कर्ष होतो. त्यामुळें तिच्या तामस भागाचा क्षय होतो. खचित शास्त्र-रूपी मुख्य जलानें पुरुष आपले मनोमळ धुवू लागला म्हणजे शास्त्राच्या व ज्ञेय परमार्थाच्या अचिंत्य प्रभावानें त्याचें मन अतिशय स्वच्छ होतें. ज्याप्रमाणें सूर्य व समुद्र याचा, परस्परांच्या सन्मुख येणें, हा संबंध झाला असतां त्याच्या स्वच्छ व प्रकाशस्वभावामुळेंच पूर्वी न पाहिलेलेंही प्रति-बिंब अवश्य दिसतेंच, त्याप्रमाणें मुमुक्षु व शास्त्र यांचा केवळ परस्परसंबंध झाला असता आत्मज्ञान प्रवृत्त होतें. सूर्य व समुद्र या दोघाकडे दृष्टि देऊन विचार केला असतां जसें दोघांचेंही परस्पर विरुद्ध स्वरूप व्यक्त होतें, त्याप्रमाणें शास्त्रजन्य विवेकानेंही देहातील सर्व उपाधिसबंधशून्य अद्वितीय ज्ञेय समजतें. स्वविचारानें आत्मतत्त्वपरीक्षणरूप जलानें चित्तवि-कल्प धुवून सोडले म्हणजे परम शुद्धता प्राप्त होते. ऊंसांना घाण्यात

घालून पिळलें असतां जसा मधुर रस प्राप्त होतो त्याप्रमाणें शास्त्रांच्या व गुरूंच्या महावाक्यांचा विचाररूपी घाण्यांतून स्वात्मज्ञानरूप रस मिळतो. भिंत व प्रकाश यांच्या संसर्गाच्या योगानें जसा आकाशभर पसरलेल्या प्रकाशाचा अनुभव येतो त्याप्रमाणें श्रवण व मुमुक्षु यांच्या संसर्गानें नित्य स्वप्रकाश आत्मज्ञान व्यक्त होतें. जें शास्त्राध्ययन धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाच्याच उपयोगीं असतें व मोक्षाच्या उपयोगीं नसतें तें कितीही जरी विस्तीर्ण असलें तरी तुच्छच होय. ज्याच्यापासून आत्मज्ञान होतें तेंच खरें शास्त्राध्ययन. ज्याच्या योगानें समता प्राप्त होईल तेंच खरें आत्मज्ञान आणि जागरावस्थेंतही सौषुप्तस्थिति असणें हेंच खरें साम्य आहे. पण हें सर्व शास्त्राच्या द्वाराच प्राप्त होतें. यास्तव सर्व प्रयत्नानें शास्त्रादिकाचा अभ्यास करावा. हे रामा, ब्रह्मलोकापर्यंत जीं सुखें आहेत त्या सर्वांहून अतिशय सुखरूप असलेलें परम पावन पद गुरूपदेश, शास्त्रश्रवण, सत्समागम नियम व शम याच्या योगानें प्राप्त होतें. तेंच सर्वेश्वर व अनादि–निधन सुख आहे. १९७.

**सर्ग १९८—सर्वत्र समदर्शन हेंच ज्ञानी पुरुषाच्या निर्विक्षेप सुखस्थितीचें कारण आहे.**

**श्रीवसिष्ठ**—हे रघूद्वहा, पुनरपि चांगला बोध होण्यासाठीं मी काय सांगतों तें ऐक. कारण पुनः पुनः तेंच तें सांगितल्यास दुर्ज्ञेय रहस्यही अज्ञांना सुद्धा सुज्ञेय होतें. उत्पत्ति व स्थिति प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणें उत्पन्न होऊन स्थित झालेल्या या जगाला केवळ भ्रांतिमात्रत्व आहे, असें त्या प्रकरणावरूनच कळलें असता समदर्शन प्रतिष्ठित ( दृढ ) व्हावें, यासाठीं उपशम प्रकरणांत त्याचें बरेंच वर्णन केलें. पण तेंच आता पुनः जीवितसमयींच निर्वाणसुखाचें दार्ढ्य व्हावें, म्हणून थोडक्यात समदर्शनाचेंच वर्णन करतों.

रामभद्रा, मागच्या ( पाचव्या ) प्रकरणांत सांगितलेल्या क्रमानें परम उपशमास प्राप्त होऊन सुखानें रहावें. ज्याला प्राप्तव्य प्राप्त झालें आहे अशा तुझ्यासारख्या तत्त्वज्ञानें संसारदृष्टीमध्यें कसा विहार करावा, तें तुला सांगावयाचें आहे. तुझ्या इतक्या बाल्य दशेंतच जगाची स्थिति जाणून पुढें सांगितल्याप्रमाणें निर्विक्षेप रहावें. सर्वांचें प्रेम संपादन करणारी व

सर्वांच्या मनांत विश्वास उत्पन्न करणारी समता धारण करून विहार करावा. कारण समतारूपी वेलीला सर्वसंपत्तिसुभग व सर्वसौभाग्यवर्धन असें पवित्र फल येतें. समतारूपी सुंदर आचरण करणाऱ्या व या प्रस्तुत क्रमानें वागणाऱ्या पुरुषाला ही सर्व जगल्लक्ष्मी वश होते. समतेच्या योगानें जें अविनाशी सुख मिळतें तें राज्य अथवा कांताजनसंगम याच्या योगानें प्राप्त होत नाहीं. समभाव म्हणजे द्वंद्वशांतीची पराकाष्ठाच आहे. तो सर्व प्रकारच्या वेगास शांत करीत असतो. सर्व दुःखांना नाहींसें करतो. तत्वज्ञाचे सर्व शत्रु मित्र बनतात. कारण या जगात साम्यामृतमय जन दुर्लभ आहे. जनकादि सर्व या साम्यावरच आपला निर्वाह करितात. कारण तें त्याच्या चित्तरूपी चंद्रापासून स्रवलेलें अमृतच होय. साम्याचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाचे क्रोध-लोभादि दोषही गुण होतात. दुःख सुखासारखें आचरण करतें व मरण जीवितासारखें प्रिय वाटतें. मुदिता, मैत्री, करुणा इत्यादि भावना आसक्त स्त्रियाप्रमाणें ज्ञानी महात्म्याला क्षणभरही सोडीत नाहींत. सर्वत्र समभाव ठेवणारा पुरुष सदा कल्याणकर गुण व सर्व संपत्ति याच्या योगानें उदय पावलेला असतो. त्याला कशाचीही चिंता नसते. सम पुरुषाला प्राप्त झालेल्या नाहींत अशा ऋद्धि या जगात नाहींत. आपल्या व दुसऱ्याच्या कार्याविषयीं सदा एकसारखा तत्पर असणारा, अपराध्यास सदा क्षमा करणारा, व उदार महात्मा मानवाना व देवानाही प्रिय होतो. सदाचार व सर्वजनहित करणाऱ्या पुरुषास अग्नि जाळीत नाहीं व जल भिजवीत नाहीं. जो सर्व उचित कार्य करतो त्या हर्षशोकरहित तत्त्वज्ञाची तुलना कोणाशीं करणार ? सदाचरणशील पुरुषावर मित्र, बंधु, शत्रु व व्यवहारचतुर राजेही विश्वास ठेवितात. महात्मे अनिष्टाला भिऊन पळत नाहींत व इष्टप्राप्तीनें तुष्ट होत नाहींत. ते प्राप्त स्थितीमध्यें समभावानें राहतात. अनिंद्य पण दुसऱ्यांस ग्राह्य असलेले सर्व गृह—क्षेत्रादि भावही सोडून निर्लोभ व संतोषलक्षण वृत्ति धारण करणारे महात्मे जगज्जालास हसतात व त्याला विवेकोपदेशानें उज्जीवित करितात. समतेनें संपन्न असलेल्या पुरुषाला सर्व ज्ञानी पूजतात. एकाद्या समचित्त पुरुषानें परहितासाठीं मुखचंद्रावर कदाचित् कोप जरी व्यक्त केला तरी तो अमृता-

सारखाच होतो. उद्वेग देणारा होत नाहीं. समदृष्टि पुरुष जें काहीं करतो, खातो, पितो, जातो, येतो त्या सर्वांविषयीं जनसमूह त्याची प्रशंसाच करितात. त्याच्या हातून फार दिवसांपूर्वी अथवा नुक्ताच काहीं अक्षम्य अपराध झालेला असल्यास त्याचेंही लोक अभिनंदन करितात. समदृष्टि संत दीर्घकाल घोर दुःखें जरी पीडा देत राहिलीं तरी उद्विग्न होत नाहींत. शिबिराजा या समदृष्टीच्या प्रभावानेंच आपल्या अंगातील मास आनंदित चित्तानें कापून देऊ शकला. या समत्वाच्या सामर्थ्यानेंच (पूर्व कल्पांतील) धीर पांडवांनीं आपल्या समक्ष शत्रूंनीं पीडलेल्या भार्येला शांत मनानें पाहिलें. त्रिगर्तराजानें या समतेनें प्राप्त झालेल्या धैर्यानेंच, राक्षसानें पणात जिंकलें असता आपल्या एकुलत्या एक पुत्राला गवताच्या काडीप्रमाणें त्याच्या स्वाधीन केलें. सर्व महीपालांतील श्रेष्ठ राजा जनक सर्व संपत्तीनें भरलेली नगरी जळली असताही समदृष्टि राहिला. तूं मागशील ती दक्षिणा देईन, असें म्हणून ब्राह्मणानें शिरःकमळ मागितलें असता साल्व राजानें समताबलानेंच तें आपल्या हातानें कापून दिलें. पुढें त्याच वीरानें या समतेच्या योगानेच ऋत्विजांच्या सांगण्यावरून यज्ञात इंद्रापासून जिंकून आणलेल्या शुभ्र पर्वतासारख्या ऐरावताचा इंद्राच्या उद्देशानें त्याग केला. समवृत्तीनेंच एक कुंडप नावाचा मातंग सिद्ध झाला. ( एकदां एका ब्राह्मणाच्या पाच गायी चिखलात रुतल्या होत्या. तेव्हां त्यांना त्यांतून वर काढण्यासाठीं समबुद्धीनें सदा व्यवहार करणाऱ्या एका मातंगाला त्यानें सांगितलें व त्या चांडाळानेंही एक गाय वेतन ठरवून ब्राह्मणाच्या पाची गायींना चिखलातून वर काढलें. नंतर त्यातून वेतन म्हणून मिळालेली गाय चांडा-ळानें समबुद्धीनें त्याच ब्राह्मणास पुष्करक्षेत्रीं दान दिली. त्याबरोबर त्या उदार पुरुषाला वैकुंठीं न्यावयास विमान आलें. ) कदंब नांवाच्या वन-राक्षसानें साम्याचा पुष्कळ अभ्यास करूनच सर्व भूतक्षयकरी राक्षसी वृत्ति सोडली. जड भरतानें या समभावनेनेंच भिक्षापात्रात आलेल्या अग्नीचेंही भक्षण केलें. क्रूर व्यवहार करणारा धर्मव्याधही समबुद्धीच्या बलानेंच शरीरत्याग केल्यावर परमपदीं गेला. नंदनवनांत असलेला

नाहीं. त्यानेंच आपल्या भव्य राज्याचा त्याग केला व विंध्यारण्यात काटेऱ्या झाडाच्या झुडपात सुखानें दीर्घ काळ वास केला. ऋषि, मुनि व तसेच देवानाही पूज्य झालेले सिद्ध समदृष्टित्वामुळेंच तपःक्लेश व ऋद्धि यास उद्विग्न न होता भोगते झाले. साराश रामा, आजवर असे अनेक राजे, प्राकृत पुरुष, व धर्मव्याधादि दुष्कर्में करणारेही पापी समदृष्टीच्या अभ्यासानेंच मोठमोठ्याना पूज्य झाले आहेत. सुबुद्धिमान् धीर या लोकीं व परलोकीं सिद्धि मिळविण्यासाठीं व पुरुषार्थामध्यें प्रवृत्ति व्हावी, म्हणून समदृष्टीनें नित्य व्यवहार करितात. यास्तव मरणाची किंवा जीविताचीही इच्छा न करिता प्राप्त व्यवहार करीत येथें विहार करावा. व्यर्थ कोणाची हिंसा करूं नये. ज्याला गुण व दोष एकसारखेच वाटतात, सुख व दुःख समान भासतें; जो मान व अवमान याना सम लेखितो, तोच पवित्र पुरुष लोकानुग्रहार्थ देशभर फिरतो १९८.

**सर्ग १९९**—मुक्ताना कर्में केल्यापासून अथवा तीं सोडल्यापासून जरी लाभहानि नाहीं, तरी ते सत्कर्माचेंच अनुष्ठान करितात.

**श्रीराम**—मुनिवर्य, तर मग नित्य ज्ञाननिष्ठ व आत्माराम मुक्त कर्मत्याग का करीत नाहींत ?

**श्रीवसिष्ठ**—ज्याची त्याज्य व ग्राह्य बुद्धिही क्षीण झाली आहे त्याच्या क्रियात्यागाचा तरी काय उपयोग ? किंवा त्यानें कर्मांचा अंगीकार केला म्हणून काय हानि होणार ? ज्ञानी सज्जनाला या जगातील एकही वस्तु अथवा दशा उद्वेग उत्पन्न करणारी वाटत नाहीं. तेव्हा त्याला त्याज्य काय असणार ? किंवा एकादीही वस्तु ग्राह्य भासत नाहीं. तेव्हा तो संग्रह कशाचा करणार ? यास्तव ज्ञान्याला कर्मत्याग व कर्मानुष्ठान यांचा कांहीं उपयोग नाहीं. तथापि तो वर्णाश्रमाला जें जें उचित दिसेल तें तेंच करतो. रामा, या शरीरात प्राण असत तों त्याचें स्पंदन होणार हें जर निश्चित आहे तर तें जन्मभर अभ्यासिलेल्या सदाचाररूपानेंच कां स्पंदन पावेना. शास्त्रीय अनुष्ठानाचाच तेवढा त्याग करून काय करावयाचें आहे ? ज्याप्रमाणें दुसऱ्याच्या येथें जाऊन राहण्यापेक्षां आपल्या दोषरहित गृहातच राहणें अधिक प्रशस्त आहे त्याप्रमाणें शास्त्रीय व अशास्त्रीय असे

दोन्ही अनुष्ठानप्रकार जर एकसारखेच आहेत तर ज्ञान्यानें शास्त्रीय सदाचार करण्यातच कोणता दोष आहे ? कारण सम, स्वच्छ व निर्विकार बुद्धीनें जें जें करावें तें तें निर्दोषच असतें. हे महाबाहो, या पृथ्वींत सर्व शास्त्रें व लोक यातील रहस्य जाणणारे बहुदृष्टि विद्वान् समदृष्टीच्या बलानेंच विविध कर्मे करीत असताना होणाऱ्या क्लेशाना सहन करून लोकसंग्रह करितात. पुष्कळ गृहस्थही यथाप्राप्त अनुवर्तन करीत असतानाही समबुद्धीमुळें जीवन्मुक्त राहतात. तुझ्यासारखे निःस्तृष्ण राजर्षि अनासक्त बुद्धीनें शातपणें राज्यही करितात. कित्येक वेदवेत्ते ब्राह्मण व्यवहारानुसार वर्तन करून यज्ञशिष्ट अन्न खाण्याची संवय झाल्यामुळें यावज्जीव अग्निहोत्र करीत राहतात. कित्येक ध्यान, देवार्चन इत्यादि करीत आनंदानें काल घालवितात. कित्येक ज्ञानी आतून सर्वसंगत्याग करून सतत अज्ञासारखेच सर्वकर्मपरायण होतात. कित्येक निर्जन वनभूमींत ध्यानपरायण होऊन राहतात. कित्येक पुण्यवान् पुरुषानीं भरलेल्या पुण्य तीर्थामध्यें, क्षेत्रामध्यें किंवा आयतनामध्यें पुण्यसमागमाच्या लोभानें पुण्याचरण करीत राहतात. कित्येक समचित्त पुरुप रागद्वेष–परिहारार्थ स्वदेश सोडून अन्य देशात शुभ स्थानीं जाऊन राहतात. कित्येक ज्ञानी संसाराचा उच्छेद करण्यास्तव एका वनातून दुसऱ्या वनात, एका गावातून दुसऱ्या गावात, एका देशातून दुसऱ्या देशांत, असे एकसारखे भ्रमण करीत राहतात. अति पुण्यकारक वाराणसी, प्रयाग, श्रीशैल, सिद्धपुर, बदरिकाश्रम, महापुण्य शालिग्राम क्षेत्र, कलापग्राम, मथुरा, कालंजर पर्वत इत्यादि अनेक पावन स्थानीं अनेक तपस्वी विविध तप करीत आपलें आयुष्य घालवितात. कांहीं ज्ञानी आपला आचार सोडून उन्मत्तासारखे वागतात. कित्येक एका शुद्ध स्थानाचा आश्रय करून राहतात व कित्येक भ्रमण करितात. साराश या जगांतील अज्ञासारखीच ज्ञान्याचीही अनियत स्थिति असते. पण नुस्तें वनांत राहणें, स्वदेशाचाच आश्रय करणें, कष्ट तप करणें, कर्मांचा संन्यास, वर्णाश्रमाचाराचें पालन, इत्यादिकांतील कोणत्याही उपायानें संसारातून तरून जाता येत नाहीं. तर एका स्वरूपस्थितीनेंच ( तत्त्वसाक्षात्कारानेंच ) त्याचें उल्लंघन करतां येतें. ती स्वभाव–स्थिति मनाची आसक्ति सर्वथा सोडल्यानें प्राप्त होते. ज्या मुनींचें

मन असंसक्त असतें तो शुभाशुभ क्रिया नित्य करीत असला तरी
नसला तरी पुनरपि संसारांत पडत नाहीं. पण जो आपल्या मनाला विषय
मोकळें सोडतो तो शुभ कर्में करीत असला व अशुभ कर्मांचा त्याग
राहिला तरी संसारांत मग्न होतो. आता तूं कदाचित् म्हणशील कीं,
जर आहे तर मनाचेंच निवारण करावें, अथवा त्याला मारावें; तत्त्व
संपादन करण्याचेंच काय प्रयोजन आहे? तर तें बरोबर नाहीं. व
जिनें विषयरसास्वाद घेतला आहे, अशा दुःख–सुख देणाऱ्या म
मारता किंवा निरुद्ध करिता येत नाहीं. कदाचित् मोठ्या भाग्यानें सा
चतुष्टयसंपत्ति प्राप्त झाली असता श्रवणादि उपायाच्या योगानें आत्मा
कनामध्यें आपोआप प्रवृत्ति होते. नंतर निर्मल झालेलें चित्त विच
तत्त्वास प्राप्त होऊन निर्द्वंद्व, अनासक्त व अनामय ब्रह्मच बनतें. य
राघवा, अचित्तत्वास प्राप्त झालेल्या सत्त्वरूप चित्तानें तू सम व पराकाश
होऊन रहा. हे महात्मन्, तुला आता परमार्थ अवगत झाला आ
स्नेह, द्वेष इत्यादि दोष सोडले आहेस. तूं समचित्त, व महात्मा अ
यास्तव आता सर्व शोकरहित होऊन रहा. सर्व शंका सोड. तू तें
मरणरहित पावन पदच आहेस. यास्तव विमल ब्रह्मरूप जगामध्यें
तिरूप, मलरूप विकाररूप, उपाधिरूप, तद्बोधरूप, त्याची इच्छा, प्र
त्याग, ग्रहण, भोग इत्यादिरूप काहींही कोठेंच नाहीं. तर अ
चिद्धाम ब्रह्मच आहे. तें स्वतः मीच आहें, असें स्वानुभवानें सम
तू एकाकी व निःशंक रहा. हे सुभगा, तुझ्या ज्ञानाच्या उपयोगीं
दुसरें याहून अधिक शुभ उपदेशार्ह वचन नाहीं. कारण तुझें आ
अखिल ज्ञानसार पूर्णपणें उदय पावलें आहे. राघवा, तुला आतां
वेद्य कळलें आहे.

श्रीवाल्मीकि—भरद्वाजा, मुनिनायक वसिष्ठ असें बोलून राघव
एषणाशून्य व शुद्ध बुद्धीनें ब्रह्मपदीं स्थिर झाला असतां आणि सर्व स
जनही ध्यानांत निमग्न झाल्यासारखे निश्चल राहिले असतां, भ्रमर क
समूहावर प्रथम गुंजारव करून रसपान करण्यांत निमग्न झाला अ
जसा मुकाट्यानें बसतो, तसा मौन धरून बसला १९९.

सर्ग २००—सिद्धाचा साधुवाद, दुंदुभिध्वनीसह पुष्पवृष्टि व गुरुपूजामहोत्सवाचा आरंभ.

श्रीवाल्मीकि——बा शिष्या, याप्रमाणें निर्वाणवाक्याचा संदर्भ समाप्त झाल्यामुळें मुनिनायक मुकाट्यानें बसला असता, सर्व सभासदांची मनोवृत्ति शांत व स्वच्छ झाली असता व त्यामुळेंच सर्व सभा निर्विकल्प समाधिस्थाप्रमाणें समतेस प्राप्त झाली असता श्रवण करणाऱ्या सर्व जनांचें सचित्तत्त्व सन्मात्रभावाच्या पराकाष्ठेस प्राप्त झालें. इतक्यांत एकाएकीं आकाशवासी सिद्धांच्या तोंडांतून व त्याबरोबरच सभास्थानीं बसलेल्या विश्वामित्रप्रभृतिमुनींच्या तोंडून मोठा धन्यवाद निघाला. त्याच्या योगानें आकाश दुमदुमलें. देवदुंदुभि वाजूं लागल्या. देवसुंदरींनीं चोहों-कडून दिव्य पुष्पांची वृष्टि केली. पुष्पांच्या योगानें तें स्थान, कोलाहलानें पर्वताच्या गुहा, पुष्पांच्या रजानें आकाश व सुगंधाच्या योगानें वायु रंजित झाला तो साधुवाद, देवदुंदुभींचा ध्वनि व पुष्पवृष्टीचा ध्वनि यांचें मिश्रण फार चांगलें शोभलें. त्या चमत्कारामुळें दशरथाच्या सभेंतील सर्व पुरु-षांचे नेत्र स्तिमित झाले. स्त्रिया व बालक यांचे नेत्र भयानें चंचल झाले. पक्षी, हरिण, हत्ती, घोडे व इतर पशु त्या कोलाहलास कान टव-कारून ऐकूं लागले.

असो, तो सर्व संवेग शांत झाला असता सिद्धांचीं हीं अशाप्रकारचीं वाक्यें स्पष्ट ऐकूं आलीं. आम्ही कल्पाच्या आरंभापासून सिद्धसंघामध्यें सहस्रावधि व्याख्यानें केलीं आहेत व दुसऱ्यांचीं ऐकलीं आहेत. पण या ग्रंथासारखे उपाय आम्ही आजवर कोठें ऐकले नाहींत. या मुनींच्या वाक्य-विलासानें पशु, पक्षी, स्त्रिया बालक, नाग इत्यादिकही शांतीस प्राप्त होतात, यांत कांहीं संशय नाहीं. या भगवान् वसिष्ठाचा या श्रीरामावर फार स्नेह आहे. कारण तो असल्या उपदेशाचा मुख्य अधिकारी झाला. या मुनिवर्यानें दृष्टान्त, हेतु, युक्ति इत्यादिकांच्या योगानें रामाला जसा बोध केला तसा तो अरुंधतीलाही केला असेल कीं नसेल याची शंकाच आहे. यांतील नुसते शब्द ऐकून तिर्यक् प्राणीही निरुपद्रव व मुक्त होतील. मग अर्थज्ञानसमर्थ मानव हें शास्त्र ऐकल्यावर व त्याचें वारंवार मनन केल्या-वर मुक्त झाल्याशिवाय कसे राहतील? खरोखर आम्ही सुद्धां हें अमृत

श्रवणाजलींनीं पिऊन आज परम ऐश्वर्यास प्राप्त झालों आहों. आमच्या सिद्धी या ज्ञानामृतानें पुनः पूर्ण व नवीन झाल्या आहेत.

भरद्वाजा, सभेंतील लोक सिद्धांच्या तोंडचे हे शब्द, विस्मित होऊन, जों ऐकत आहेत तों सभास्थान पुनः दुसऱ्या कमलवृष्टीनें भरलें आहे, असें पाहते झाले. मंदार, पारिजात, संतान इत्यादि त्रिविध पुष्पें वरून त्यांच्या डोक्यांवर, हातांवर, खांद्यांवर, माड्यावर व पायावर पावसाच्या थेंबाप्रमाणें पडत होतीं. त्यानंतर सर्व सभाजनानीं भगवान् वसिष्ठास साष्टांग प्रणाम करून पुष्पांनीं पूजिलें. सर्व लोकांचें गुरुपूजन संपलें असता राजा दशरथ हातात अर्घ्यपात्र घेऊन मुनीची पूजा करीत असें म्हणाला.–

हे अरुंधतीपते, आपण केलेल्या या बोधानें निरनिशय आत्मवस्तूचें ज्ञान होऊन मनात सर्वोत्कृष्ट पूर्णता उत्पन्न झाली आहे. भगवन्, तुमच्या-सारख्या परम पूज्य व परमार्थ देणाऱ्या गुरूंच्या पूजनास योग्य अशी वस्तु त्रिभुवनांत आढळत नाहीं. तथापि मी आपलें गुरुपूजनरूप शास्त्र–लोक-प्रसिद्ध कर्तव्य सफल करण्यासाठीं कांहीं प्रार्थनावचन बोलतों. भगवन्, तिघी भार्यासह मी स्वतः, भूलोकच्या आणि स्वर्गलोकच्या भोगाकरिता संपादिलेलें शुभ सुकृत व सर्व सामंतांसह हें राज्य याच्या योगानें मी आपलें पूजन करतों. हे विभो, हें सर्व तुमचें आहे. मी तें तुमच्या स्वाधीन केलं आहे. यास्तव त्याचे स्वामी होऊन आपण आज्ञा करा.

**श्रीवसिष्ठ**—हे राजन्, आम्ही नुसत्या प्रणामानेंच संतुष्ट होणारे ब्राह्मण आहों. आम्हाला प्रिय असलेला प्रणाम तर तूं केलाच आहेस. राज्याचें रक्षण कसें करावें तें तूंच जाणतोस. तें तुलाच शोभतें. यास्तव तें तूंच घे. ब्राह्मण राजे कोठे तरी आहेत का ?

**दशरथ**—भगवन्, आपण आत्मज्ञानदानानें केलेल्या उपकाराशीं तुलना करून पाहिल्यास राज्यदान हें अगदींच क्षुद्र ठरतें. तथापि आप-ल्याला जसें योग्य वाटेल, तसें करा.

**श्रीवाल्मीकि**—दशरथानें असें म्हटलें असतां रामानें उठून प्रणाम-पूर्वक पुष्पांजलि अर्पण केली व नम्र होऊन तो म्हणाला, " भगवन्, आपण महाराजांस निरुत्तर केलेंच आहे. यास्तव प्रणामप्रिय अशा आप-

त्याला मी प्रणाम करतों." इतकें बोलून त्या सच्छिष्यानें गुरूच्या चरणांवर मोठ्या भक्तीनें नेत्रांत आनंदाश्रु आणून वारंवार मस्तक ठेविलें. रामाच्या मागोमाग त्याच्या जवळच बसलेल्या शत्रुघ्नानें, लक्ष्मणानें व तशाच दुसऱ्या राजकुमारांनीं मुनींना प्रणाम केले. त्या महामुनीचा देह पुष्पांनीं भरून गेला. पण त्या महात्म्यानें आपल्या हातांनीं पुष्पें दूर लोटून मेघांच्या आडून दिसणाऱ्या चंद्राप्रमाणें आपला मुखचंद्रही लोकांस दिसेल असें केलें. नंतर तो सर्व सभाक्षोभ, पूजन, कोलाहल, पुष्पवृष्टि, वाद्यांचा घोष इत्यादि शांत झालें असता व लोक स्वच्छ व स्वस्थ चित्तानें बसले असतां साधुवाद ऐकणारा मुनिवसिष्ठ विश्वामित्रादिकांस म्हणाला, " हे गाधिकुलकमला विश्वामित्रा, वामदेवा, निमे, क्रतो, भरद्वाज, पुलस्त्य, अत्रे, धृष्टे, बा नारदा, हे शांडिले, हे भास, भृगो, भारंड, वत्सा, वात्स्यायना व त्याचप्रमाणें अहो इतर सर्व मुनींनो, तुम्हीं सर्वांनीं माझें हे तुच्छ वचन ऐकलेंच आहे. आतां मजवर अनुग्रह करून यांत जें मी सांगितलें नसेल अथवा जें दुरर्थ ( दुष्ट अथवा विपरीत अर्थयुक्त ) किंवा व्यर्थ असेल तें तुम्ही सांगा."

**सभ्य**—हे ब्राह्मणा, केवळ परमार्थाच्या योगानें शोभणाऱ्या वसिष्ठाच्या वचनांत दुरर्थ इत्यादि असेल, ही आम्ही आज नवीनच वाणी ऐकली आहे. अनंत जन्मांतील दोषानें आमच्या मनावर जो मळ सांचला होता तो आज तूं काढून टाकलास. ब्रह्मपूर्ण वाणीनें आम्ही विकास पावलों आहों. सर्व प्राण्यांस महाबोध देणाऱ्या तुज मुनिनायकास ( नित्य गुरूस ) हे आम्ही प्रणाम करितों.

**श्रीवाल्मीकि**—मुने, असें बोलून त्या सर्व सिद्धादिकांनीं वसिष्ठास प्रणाम केले. पुनः पुष्पवृष्टि केली. नंतर दशरथ व विष्ण्ववतार राम यांची अशी प्रशंसा केली. कारण राम हा आपल्या चार अंशांनीं अवतीर्ण झालेला माधवच आहे हें ते सर्व जाणत होते.

**सिद्ध**—साक्षात् चतुरात्मा नारायणच अशा या भ्रातृयुक्त रामाला, या जीवन्मुक्त राजकुमाराला आम्ही वंदन करतों. सर्व पृथ्वीचें संरक्षण करण्यांत अतिशय निपुण असलेल्या राजा दशरथाचेंही भाग्य फार मोठें आहे.

रामासारख्या सत्पुत्राचा पिता होणारा तोच एक या जगांत धन्य आहे. महाबळ्या वसिष्ठाची व तपोनिधि विश्वामित्राची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे. या महात्म्यांच्या प्रभावानेंच आम्हाला आज ही भ्रांतिनाशिनी युक्ति ऐकावयास सापडली.

श्रीवाल्मीकि—असें बोलून सिद्धानीं आकाशातून पुनः सभेंत पुष्पवृष्टि केली. सभास्थ जनही त्या सर्वांना धन्यवाद देऊं लागले. आकाशचर, भूचर, मुनीश्वर, महर्षि, देवगण, ब्राह्मण, राजे, इत्यादि सर्वांनीं अशा रीतीनें आपापल्या सामर्थ्यानुसार स्तुतिमय वाणी, पुष्पांजलि इत्यादिकांच्या योगानें भगवान् वसिष्ठादिकांची प्रशंसा केली. २००.

सर्ग २०१—गुरूनें आदरानें विचारलें असतां रामानें आपली पूर्णानंदपदीं विश्रांति प्रकट केली.

श्रीवाल्मीकि—भरद्वाजा, कांहीं वेळानें तो साधुवाद शांत झाला असता ज्ञानोपदेशानें राजे उल्लसित झाले असता, सत्याचें अनुसंधान करणाऱ्या सभेंतील प्रत्येकाचें चित्त आपापलें पूर्व चरित आठवून आपल्यालाच हंसूं लागलें असता, विवेकीजन ध्यानसे करीत बसले असता, भ्रात्यांसह राम गुरूंच्या पुढें पद्मासन घालून व हात जोडून बसला असता, राजा दशरथ स्थिर चित्तानें जीवन्मुक्तात्मिका व सर्वदा पावनी स्थितीचा अनुभव घेत असताना मुनि वसिष्ठ भक्ताची पूजा ग्रहण करण्यासाठीं क्षणभर मुकाट्यानें बसून पुनः म्हणाला,—" रामा, तूं आतां आणखीं काय ऐकण्याची इच्छा करीत आहेस ? तूं स्वतः आता कोणत्या स्थितीचा अनुभव घेत आहेस ? तूं ह्या जगाचा आभास कोणत्या रूपानें पहात आहेस ? "

राजा, गुरूनें असें विचारलें असता राम त्याच्या मुखाकडे अवलोकन करीत म्हणाला,—" प्रभो, आपल्या प्रसादानें मी अत्यंत निर्मलतेस प्राप्त झालों आहें. भवभंग देणाऱ्या माझ्या सर्व भ्रांति शांत झाल्या आहेत. मी आता अति स्वच्छ आकाशाप्रमाणें शुद्ध स्वरूपानें स्थित आहें. माझी हृदयग्रंथि तुटली आहे. माझीं सर्व विशेषणें शांत झालीं आहेत. माझी बुद्धि आता स्फटिकासारखी स्वच्छ आहे. माझें मन आतां अत्यंत तृप्त होऊन निजल्यासारखें झालें आहे. यास्तव मी आतां दुसरें कांहीं ऐक-

ण्याची अथवा जाणण्याची इच्छा करीत नाहीं. माझें सर्व विषयस्मरण व भोग-कौतुक पार निघून गेलें आहे. मी आतां शांत झालों आहें. पुनः स्वप्न किंवा जाग्रत् अवस्थेचा अनुभव येणार नाहीं, अशा स्थितींत मी आतां आहें. माझ्या सर्व आशा पूर्ण झाल्या आहेत. मला आता उपदेश, शास्त्र, बंधु, त्याग इत्यादिकांतील कशाचीही आवश्यकता वाटत नाहीं. मी अक्षुब्ध साम्राज्याचा अनुभव घेत आहे. मी नेत्राच्या योगानें बाहेर जरी पाहिलें तरी मला स्वच्छ परमाकाशच दिसतें. माझें चित्त प्रत्यगात्म्यामध्येंच प्रतिष्ठित झालेलें असल्यामुळें हर्ष, शोक, इत्यादि कांहीं होत नाहीं. हा सर्ग राहो, जावो कीं त्याचें आणखीं काय हवें तें होवो. मी आपल्या स्वरूपात स्थिर स्थित आहें. मी आता विश्रांति पावलों आहें. मी आता बाह्य इंद्रियांनीं अथवा मनानेंही लक्ष्य होण्यासारखा नाहीं. मी आशापाशांनीं बद्ध होत नाहीं. ज्याप्रमाणें झाडावरील फुलाचा वास आकाशात भरून राहतो त्याप्रमाणें मी या देहाला सोडून अंतरालीं स्थित आहें. जसे सर्व राजे राज्योपयोगीं अनेक कर्मांत विहार करीत असतात व आनंद भोगतात तसा मी आनंदानुभव घेत आहें. पण त्याना प्रसंगोपात्त दुःखाचा तरी अनुभव घ्यावा लागतो. ब्रह्मामध्यें स्थित झाल्यामुळें मला तोही घ्यावा लागत नाहीं. कारण मी आता आत्म्यामध्यें स्थिर स्थित आहें. मला शंका किंवा भीति मुळींच वाटत नाहीं. भगवन् मी सर्वांहून अधिक सुखी आहें, यास्तव मी विषय सुखाची फारशी इच्छा करीत नाहीं. तथापि मी इतर जनाप्रमाणेंच लोकव्यवहाराचा आश्रय करून राहिलों आहें. करिता मला जी आज्ञा करावयाची असेल ती करा. बालकाच्या खेळाप्रमाणें मी आता यावज्जीव संसार-स्थितीचे अवलंबन करणार आहें. मी खाईन, पिईन, व आपलें कर्तव्य करीन. तुमच्या प्रसादानें मला आतां कशाचीही शंका राहिलेली नाहीं.

श्रीवसिष्ठ—रामा, मोठ्या समाधानाची गोष्ट आहे कीं, तुला अतिशय पुण्य पद प्राप्त झालें आहे. तूं आता निःशोक व आदि-अंतरहित पदीं स्थित आहेस. तुला परम विश्रांति लाधली आहे. मोठ्या भाग्यामुळेंच तूं निःशोक, स्वस्थ व निःशंक झाला आहेस. बोधाच्या योगानें तूं आपल्या सर्व कुळाला पावन केलें आहेस. आता या मुनिश्रेष्ठ विश्वामित्राची

इच्छा पूर्ण करून तूं आपल्या पित्यासह या पृथ्वीचें रक्षण कर. हे सुभगा, तुझ्या सारख्या महा पुरुषाचें ज्याना पूर्ण साह्य आहे अशा तुझ्या राष्ट्रांताल पुत्र—पौत्रांसह भृत्य—बांधव—प्रजा इत्यादि सर्वांस सुख होवो. सर्व निरुपद्रव असोत. सर्व निर्भय राहोत. सर्वांच्या संपत्ति अक्षय होवोत व ते सर्व उत्कर्ष पावोत २०१.

सर्ग २०२—हृष्ट राजे व राम यांचे वर्णन व रामानें सांगितलेली आपली ज्ञान-निर्मल स्थिति.

**श्रीवाल्मीकि**—वसिष्ठाचें हें वचन ऐकून सभेंतील सर्व जन अमृत-वृष्टीप्रमाणें आत अतिशय तृप्त झाले. रामाच्या तोंडावरही मनातील परम-तृप्तीची छाया स्पष्ट उमटली. वामदेवादिक सर्व तत्त्वज्ञ ‘ ज्ञानाचें आपण फार चांगलें प्रतिपादन केलें ’ असें मोठ्या आदरानें वसिष्ठांस म्हणाले. ज्याचें अंतःकरण अतिशय शांत झालें आहे, असा राजा दशरथ विकसित मुखानें सर्व सभेस शोभवूं लागला. अनेक लोकांच्या तोंडून अनेक साधु-वाद ऐकूं येत असतांना ज्याचें अज्ञान गळलें आहे असा राम पुनः असें वचन बोलला.

**श्रीराम**—भगवन्, अग्नि सोन्याचा मळ जसा नाहींसा करतो त्याप्र-माणें आपण आमचा सर्व चित्तमल धुवून टाकला आहे. पूर्वीं आम्ही केवल या तुच्छ देहालाच आत्मा समजत होतों. पण आता आम्ही सर्व आत्माच आहे, असें पाहणारे झालों आहों. मी आता अगदीं परिपूर्ण होऊन राहिलों आहें. आता मी सदा जागा राहणार आहें. मला अक्षय आनंद झाला आहे. मला आपण चिरकाल सुखी केलेंत. माझा शाश्वत उत्कर्ष झाला. माझ्या या हृदयकमलास आपण ज्ञानजलानें चांगलें पुष्ट केलेंत. आपल्या मोठ्या अनुग्रहामुळेंच मी या स्थितीस प्राप्त झालों आहें. हिच्यामध्यें स्थिर झाल्याकारणानें मला हें सर्व जग अमृतमय भासत आहे. माझी मति आतून प्रसन्न झाली आहे. त्यामुळें माझा सर्व शोक अस्त पावला आहे. ज्याअर्थी मी शांतीनें सकार्य मूळ अज्ञानाचा नाश केला आहे त्या अर्थी मी अमलचित्त झालों आहें. आत्म्यामध्यें आनंदास प्राप्त झालों आहें. आत्म्याचेंच विचारपूर्वक दर्शन घेतल्यानें मी स्वतःसिद्ध निर्मळ झालो आहें. यास्तव माझा मलाच नमस्कार असो.

**सर्ग २०३**—मध्याह्नवाद्यघोष, दिनकृत्य, रात्रीचा क्रम, व प्रातःकाळीं सभेंत रामाचा निःसंदेह, यांचें वर्णन.

श्रीवाल्मीकि—याप्रमाणें मुनि व राघव विचारपरायण झाले असतां भास्कर जणुं काय श्रवण करावयासच आकाशाच्या मध्यभागीं आला. सर्व पदार्थांच्या स्पष्ट दर्शनाकरितां रामाची जशी मति त्याचप्रमाणें त्याची कांति त्यावेळीं प्रखर झाली. तो नारायण सर्व दिशांना तापवूं लागला. उद्यानांतील तडाग ताठ कमलामुळें सभेंतील राजांप्रमाणें शोभूं लागले. वृक्षादिकांच्या छाया कृपणाच्या धनाप्रमाणें स्वाश्रयास सोडून एक अंगुळ-भरही इकडे तिकडे जातनाशा झाल्या. पशु, पक्षी उन्हामुळें व्याकुळ झाले. इतक्यांत राजसभेसमीप मध्याह्नसमयसूचक मोठा शखनाद आ-काशास भरून सोडूं लागला. कमलांवर जसे दंवाचे थेंब त्याप्रमाणें सुंदर व तरुण स्त्रीपुरुषाच्या मुखावर घामाचे बिंदु चमकूं लागले. त्याबरो-बर राजा सर्व सामंत परिवार, भगवान् वसिष्ठ, राम व इतर सर्व सभासद यांसह सभास्थानांतून उठला व परस्पर नमस्कारादि शिष्टाचार करून स्वस्थानीं जावयास सज्ज झाला. पण पंख्याच्या वाऱ्यानें कापुराची धूळ उडूं लागली असता व वाद्याचा ध्वनि त्या भव्य राजगृहांत घुमूं लागला असता वक्ता मुनिनायक राघवाला पुनः म्हणाला, "रामभद्रा, तुला आता आणखीं काहीं ज्ञातव्य राहिलेलें नाहीं. यास्तव आता माझा उपदेश, शास्त्राचें प्रतिपादन व आपला अनुभव याची एकवाक्यता होईल, असें कर. आता तूं जाऊन आपलें कर्तव्य कर. आम्हीही माध्याह्नस्नान करावयास जातो. कारण आता आम्हाला शिष्टाचारा-नुसार प्राप्त कर्तव्य करणें भाग आहे. आणखीं जर तुला काहीं प्रष्टव्य (विचारावयाचें) असेल तर तें तूं मला उद्या सकाळीं विचार." मुनिनायकानें असें म्हटलें असता राजा दशरथानें रामासह वसिष्ठाच्या आज्ञेनें व त्यानीं सांगितलेल्या क्रमानें सिद्ध, मुनि, सभासद इत्यादिकाची पूजा केली. त्या उदार भूपालानें ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें मणि-मोत्यें, दिव्यपुष्पें, रत्नें, मोत्याचे हार, प्रार्थना, प्रणाम, वस्त्र, आसन, अन्न, पान, सुवर्ण, भूमि, यांचें दान, गंध, पुष्प, धूप, दीप, इत्यादि उपचार याच्या योगानें पूजन केलें. नंतर ते सर्व एकमेकांस विचारून स्वस्वस्थानीं

गेले. त्यांनीं आपापलीं आश्रमोचित कर्मे केलीं व कांहींवेळ सभेंतील उपदेशाचा जों प्रत्येकजण विचार करीत आहे तों भास्कर अस्त पावला. तेव्हां सायंकाळचीं अवश्य कर्तव्यें करून ते राम व वसिष्ठ याच्या अद्भुत संवादाचें चिंतन करीतच दीर्घ यामिनीला एका क्षणाप्रमाणें घालविते झाले. पहाट झाली. अरुण आपल्या लाल रंगानें पूर्व दिशेस सुशोभित करूं लागला. तत्काळ यम—नियमसंपन्न लोक उठले. त्याचीं स्नान, संध्योपासना, होम इत्यादि कर्मे जों होत आहेत तों भगवान् सूर्यानें रात्रीच्या सर्व काळोखास पार घालवून आपल्या सुवर्णवर्ण किरणास भुवनभर पसरलें. लागलेच सर्व श्रोते राजसभेकडे वेगानें चालले. राजे, राजपुत्र, मंत्री, मुनि, वसिष्ठादि दशरथाच्या सभेंत आले व परस्पराचा उत्तम सत्कार करून सर्व आपापल्या उचित स्थानीं बसले. तों इतक्यात गुरु वसिष्ठ व पिता दशरथ यांच्यामध्यें बसलेला राजीवनयन राम, आसनावर बसलेल्या मुनीची सर्वजण प्रशंसा करूं लागले असतां, मध्येंच असें मृदु वचन बोलला—

**श्रीराम**—भगवन्, आपण सर्वधर्मज्ञ, सर्व ज्ञानाचा महासागर, व सर्व संदेहांचा परशु आहा. आपण माझा सर्व शोक घालवून मला निर्भय केलें आहे. मला आतां आणखीं श्रोतव्य किंवा वेद्य काय आहे तें आपणच सांगा. मला तर कांहीं दिसत नाहीं.

**श्रीवसिष्ठ**—रामा, तुला आता उत्तम बुद्धि प्राप्त झालेली असल्यामुळें श्रोतव्य कांहीं राहिलेलें नाहीं. तुझी बुद्धि आतां कृतकृत्य झाली आहे. आता तूंच मनात काय असेल तें साग. काहीं श्रोतव्य अवशिष्ट राहिलें असल्यास मला विचार.

**श्रीराम**—भगवन् , मी धन्य झालों आहें, मी पूर्ण शांतीचा अनुभव घेत आहें. मला आतां आणखीं कशाचीही आकांक्षा राहिली नाहीं. आपल्याला जें सांगावयाचें होतें तें आपण सागितलें आहे. मला जें ज्ञेय होतें तें मी जाणलें आहे. यास्तव आपली कृतकृत्य झालेली वाणी आता विश्राति घेवो. मला सर्व कळलें आहे. मी द्वैताद्वैतरहित झालों आहें. माझा दृश्यभाव गळून गेला आहे. कारण मी मुळीं संसारित्वावरील आस्थाच सोडली आहे २०३.

सर्ग २०४—पुनः चित्च्या ठिकाणच्या दृश्याचें परिमार्जन.

श्रीवसिष्ठ—हे महाबाहो, तथापि तूं माझें हें वचन पुनः ऐक. कारण आरशाला पुनः पुनः पुसलें असता तो अतिशय स्वच्छ होत असतो; मी आतां तुला थोडक्यात दृश्यमार्जनाची उत्तम युक्ति सांगतों. रूप व नाम असें दोन प्रकारचें दृश्य आहे. पण त्यातील जाति, गुण, क्रिया व आकार यास व्यक्त करणाऱ्या गाय, काळी, चपळ व सुंदर इत्यादि चार प्रकारच्या शब्दांचा अर्थ भ्रांतिकल्पित आहे. कारण त्या चारी शब्दावरून चार पृथक् अर्थांचा ( वस्तूंचा ) साक्षात्कार होत नाहीं. याप्रमाणें वस्तूंचें पृथक्त्व नाहींसें झालें म्हणजे निरर्थक शब्द जलाच्या ध्वनीप्रमाणें, पदार्थामध्येंच राहतो. पदार्थांचें मार्जन तर पूर्वींच केलेलें आहे. यास्तव शब्द व अर्थ, असें दोन्ही प्रकारचें दृश्य चिदाभानमात्र व म्हणूनच स्वप्नतुल्य आहे, हें सिद्ध झालें. आणि जाग्रत्च जेव्हा मिथ्या आहे, तेव्हा तिच्या निमित्तानें होणारें स्वप्न तरी सत्य कोठचें असणार? अर्थात् तें स्मरणाप्रमाणें विषयभूत पदार्थावाचूनच मनांत उभें राहतें. यास्तव तें संवेदनमात्रच आहे. तें संवेदनाहून भिन्न असल्यासारखा जरी भास झाला तरी संविद्व्यतिरिक्त नाहीं. तस्मात् जाग्रत् व स्वप्न हीं दोन्ही अगदीं सारखीं आहेत. त्रिभुवन स्वच्छ संविदाकाशमय आहे. तें सर्व स्वप्ननगरासारखें आहे.

श्रीराम—भगवन्, खरें आहे. तथापि चित्–मध्यें जाड्य व त्यांतही भूमि, पर्वत, पाषाण, तेज, क्रिया, काल, जल, वायु, आकाश, इत्यादि कसें झालें, तें पुनः एकदा सर्वांवर उपकार करण्यासाठीं मला समजावून सांगा.

श्रीवसिष्ठ—रामा, स्वप्नात दिसलेल्या महाराष्ट्राची भूमि, आकाश, त्यांतील जल, मेघ, पर्वत, पाषाण, काल, क्रिया, इत्यादि कसें झालें तें सांग पाहू?

श्रीराम—स्वप्न पाहणाऱ्या पुरुषाचा आत्माच तें सर्व आहे. यास्तव वस्तुतः जग शून्य आहे. तो निराकार व निराधार असला तरी आपल्या अचिंत्य मायाशक्तीनें सर्वांचा आधार होतो. पण हें सुद्धा मी आरोपदृष्ट्या सांगत आहें. कारण अपवाददृष्ट्या पाहिल्यास कांहीं झालेंच नाहीं.

तर मन चित्स्फुरणमात्र असल्यामुळें तेंच हें सर्व आहे. चित्च नुस्त्या संकल्पानें कठिण, आर्द्र, स्थूल, सूक्ष्म, शून्य, इत्यादिरूप झाली आहे. हा आकाशात्मक चिद्धातु अशा स्वभावाचाच आहे. समुद्र व आकाश यांत पाणी व अवकाश यावांचून दुसरें जसें काहीं नसतें तसें या त्रिभुवनांत चित्–हून दुसरें कांहीं नाहीं. अहं, त्व इत्यादि या सर्व कल्पना आहेत. जेव्हा देह नाहीं तेव्हां असत् अज्ञानामुळें देहाकार चित् उदय पावते. पण ती सत्य नव्हे, असें चिंतन करावें. मन, बुद्धि, अहंकार, भूतें, पर्वत, दिशा, इत्यादि सर्व अनिर्वाच्य आहे. सारांश काहीं उत्पन्न झालें नाही. काहीं नष्ट झालें नाहीं. तर जगाचें रूप चिद्ब्रह्मात्म्यामध्यें स्थित आहे. चित्कचन, चित्चा नाम–रूप इत्यादि रूपानें विकास, हेंच जग होय. तात्त्विक दृष्टीनें पाहिल्यास जगद्भावानें भासणारेंही जग अभानच आहे. वस्तुतः चिदाकाशच आहे. मग तें अज्ञाला कसेंही का वाटेना २०४.

सर्ग २०५—ही जगत्स्थिति विवर्तरूप, स्वप्नतुल्य व चिन्मात्र आहे.

श्रीराम—भगवन्, जसें स्वप्नांतील दृश्य परम आकाश तसेंच जाग्रतींतील दृश्यही पराकाशच होय, यांत कांहीं संशय नाहीं. पण भगवन्, माझ्या या महाप्रश्नाचें उत्तर मला सागा. देहरहित चित् स्वदेहासारखी कशी होते ?

श्रीवसिष्ठ—रामा, हें दृश्य स्वप्नात व जाग्रतींतही आकाशरूप आकाशापासून झालेलें, आकाशाच्या आधारानें राहणारें, व स्वतः आकाशच आहे. यास्तव तुझ्या प्रश्नास कारण होणारा हा तुझा संदेह उपपत्तिशून्य आहे. कारण सर्गाच्या आरंभीं सर्व भूतें योग्य कारणावाचूनच उत्पन्न होतात. पृथिव्यादिक भौतिक पदार्थांचीही हीच स्थिति आहे. मग देह कोठून होणार ? यास्तव विवर्त पक्षाचाच आश्रय करणें उचित आहे. चिदाकाश स्वप्नाप्रमाणें हा आभास पाहतें. तो मायागुणांमुळें विक्षेप पावलेला असतो. तें आभानमात्रत्वच स्वप्नभान आहे, व तीच जगाची आकृति आहे. चिदाकाशच त्याला विवर्त, स्वप्न, जग इत्यादि म्हणतें. तात्पर्य वेदनामध्यें भासणारें जग सूक्ष्मावस्थेंत स्वप्न व स्थूलावस्थेंत जगत् आहे. हा प्रपंच वेदनमात्र आहे व तो ( प्रपंच ) वेदनमात्र आहे,

असें सिद्ध झालें असतां नामप्रपंचही वेदनमात्रच होतो. चिद्रूपानेंच या सर्व पृथ्वी, जल इत्यादि पृथक् पृथक् संज्ञा केल्या आहेत. भान हा त्या महातत्त्वाचा स्वभाव आहे. यास्तव स्वप्नादि शांत झालें तरी तें भान कधींही शात होत नाहीं. त्याच्या सद्भावामुळेंच त्याच्यामध्यें पुष्कळ विवर्त प्रवृत्त झाले आहेत.

**श्रीराम**—भगवन्, आपण लीलोपाख्यान, भुशुंडाख्यान इत्यादिकामध्यें कोटीच्या कोटी सर्ग सांगितले आहेत. त्यांची स्थितीही एकाच प्रकारची नाहीं. तर त्यांतील कांहीं ब्रह्मांड कोशात स्थित आहेत; कांहीं ब्रह्मांडशून्य आहेत. कांहीं पृथ्वीकोशात स्थित आहेत, काहीं आकाश, तेज जल इत्यादि कोशांत आहेत, इत्यादि आपण वर्णन केलें आहे. पण त्यात आमचें हें ब्रह्मांड कशा रीतीनें स्थित आहे तें मला सांगा. कारण आपण तत्त्ववेत्त्यांतील वरिष्ठ आहां.

**श्रीवसिष्ठ**—रामा, हा प्रश्न तत्त्वज्ञानोपयोगी नाहीं. किंवा तो तत्त्वसंबंधीही नाहीं. त्याचें जसें कांहीं प्रयोजन नाहीं तसाच तो (प्रश्न) प्रकृतोपयोगीही नाहीं. तथापि ज्योतिषसिद्धान्तामध्यें मुनींनीं भूमि, भुवन इत्यादिकांच्या स्थितीचें वर्णन निरनिराळ्या रीतीनें केलें आहे. पण ते दुसऱ्या प्रमाणांनीं सिद्ध न होणाऱ्या व कधींही कोणी तत्त्वज्ञानें न अनुभविलेल्या सृष्टिरचनेचें व स्थितीचें वर्णन करीत असतात. त्या त्या सिद्धान्ताचे प्रवर्तक त्याचें त्याचें वर्णन करितात. शिष्य तें ऐकतात व त्याचें मनन करितात. पण तें सर्व तुला पूर्वीच (अन्य शास्त्रांवरून) ज्ञात झालें आहे. उपनिषदादि तत्त्वप्रतिपादक आगमांत त्याचें कसें वर्णन केलें आहे तेंही तूं जाणतोस. तेव्हा आता पुनः त्याचेंच चर्वितचर्वण करीत बसण्यांत काय अर्थ आहे?

**श्रीराम**—आगमवाक्याप्रमाणें हें सर्व चिन्मात्र आहे, असें ठरतें. पण महाराज, चिदाकाश ब्रह्माडाकार कसें झालें? व तें असेंच किती वेळ राहणार? तें तरी सांगा.

**श्रीवसिष्ठ**—ब्रह्म अनादिनिधन आहे. तें नित्य व अव्यय आहे. अर्थात् तें कधींही साकार झालेलें नाहीं. त्याचा कालिक परिच्छेद होत नाहीं. परंतु त्या आत्म्याचें हें स्वाभाविक स्वरूप साक्षात् अनुभवास

येईपर्यंत निजलेल्या पुरुषाप्रमाणें तेंच आपल्याळाच जगदाकारानें पाहतें. चिदाकाशाचें स्वयभान हेंच विश्व आणि त्यामुळेंच तें मिथ्या. चिदेक-स्वभावामध्यें त्याच्या विरुद्ध पर्वत–काठिन्यादि स्वभाव सत्य कसे असतील? तस्मात् चित्च भ्रांतिचेतनामुळें अनेक पदार्थाकार दिसते. याविषयीं मी पूर्वी शतशः प्रतिपादन केलें आहे. यास्तव ब्रह्मांड कशामध्यें लीन झालें नाहीं व स्वतः निष्कारण असलेलें तें अकारण अशा दुसऱ्या कशापासून प्रकट झालें नाहीं. तें ब्रह्मपदीं भिन्न आहे, असें नाहीं व नाही, असेंही नाहीं. तसेच अनादि, निराभास, निराकार चिदाकाश व स्वतः प्रकाशरूप असल्यामुळें दुसऱ्या कोणत्याही दृष्टीचें तें कार्य होऊं शकत नाहीं. दिसणारें हें काहीं नाहीं, याविषयीं 'नेह नानास्ति किंचन' इत्यादि श्रुति प्रमाण आहे. तथापि स्वप्नादिकाप्रमाणें त्याचा प्रतिभास होतो. चिदाकाशाचें अमल व स्फुरदाकार हृदयच ( सारभूत स्वरूपच ) नाना आकाराचा संकल्प करून प्रलयापर्यंत त्याना पाहतें २०५.

**सर्ग** २०६—याविषयीं कुशद्वीपेश्वराच्या प्रश्नांचें निरूपण.

**श्रीवसिष्ठ**—कारणावाचून भासणारें हें काहीं नाहीं. परमार्थ ब्रह्मच असून तें परमार्थानेंच स्थित आहे. याविषयीं मी सांगतों तो महाप्रश्न ऐक. याच्या श्रवणानें तुझा यथार्थ बोध पुष्ट होईल. दोन्ही बाजूंनीं समुद्राच्या योगानें वेष्टित झालेलें कुशद्वीप या नांवाचें एक प्रख्यात द्वीप आहे. त्यातील ईशान्य दिशेंत इलावती या नांवाची एक सुवर्णनगरी आहे. तिच्या पूर्व-भागात प्रज्ञप्ति या नावाचा महाविख्यात राजा राहतो. एकदा मी आपल्या सप्तर्षिमंडलातून निघून त्याच्या येथें गेलों. तेव्हां त्या ब्राह्मणप्रिय राजानें माझा मोठा सत्कार करून मला उचित आसनावर बसविलें आणि अर्घ्यादि उपचारानीं माझी पूजा केल्यावर तो हात जोडून मला असें विचारूं लागला.

" भगवन्, सर्व सृष्टीचा संहार होऊन सर्वत्र शून्यता पसरली असता पुनः सृष्टि उत्पन्न होण्यास कोणतें कारण राहतें ? त्याचीं सहकारी कारणें कोणतीं, कशीं व कोठें असतात ? उत्पन्न झालेलें जगत् तत्त्वतः काय आहे ? त्याचे उत्पत्ति, स्थिति, इत्यादि विकार हें काय आहे ? त्यातही कांहीं भूमि नित्य अंधकाराला धारण करितात. काहीं ( ब्रह्मलोकादिक ) आका-

शांत असतात. कांहीं ( नरकादि भूमी ) कृमींनीं आकुळ असतात. कांहीं ( अंतरिक्षादि लोक ) आकाशांत स्थित असतात. काहीं ( दैत्यादिकाचीं नगरें ) पाषाणादिकात असतात. पण पृथिव्यादि भूतें व त्यांतील चार प्रकारचे जरायुजादि कोश यांचें तत्त्व काय आहे ? त्या जीवांचीं बुद्ध्यादिक इंद्रियें हें काय आहे ? याचा कर्ता कोण ? द्रष्टा कोण ? याचा आधार कोण व आधेय काय आहे ? जगाचा अत्यंत नाश होत नाहीं, असा तर वेदवेत्त्यांचा निश्चय आहे. पण जसें संवेदन तसे अनुभव, अशी प्रसिद्धि असल्यामुळें संवेदनच देहादिकाचें निमित्त आहे कीं दुसरें काहीं ? संवेदन कारण आहे, असें म्हटल्यास तें नित्य व अव्यय आहे कीं नश्वर व असत् आहे ? नित्य असेल तर त्याच्यापासून देहादि विकार कसा होईल ? बरें तें नश्वर आहे म्हणून म्हणावें तर त्याच्या उत्पत्तीचे कारण काय, तें काहीं सागता येण्यासारखें नाहीं. कारण संवेदनावांचून त्याची सिद्धिच होत नाहीं. या आमच्या कुशद्वीपांत मरून ज्याच्या देहाचें भस्म झालें आहे अशा देहशून्य प्राण्याचीं शरीरें, जेथें माता-पिताही नाहींत अशा प्रदेशीं कशीं उत्पन्न होतात ? त्याचें उपादान अथवा सहकारी कारण काय ? धर्म व अधर्मच देहादिकांच्या आकारानें परिणाम पावतो म्हणून म्हणावें तर अमूर्त धर्माधर्मांपासून मूर्त देह होणें संभवत नाहीं. जें द्रव्य नव्हे तेंच पार्थिवादि द्रव्यभागांनीं देहादिकांस निर्मितें म्हणून म्हणावें तर तेंही समंजस नव्हे. माता व पिता याचा अभाव असल्यामुळें परलोकीं त्यांच्या देहोत्पत्तीचें बीजही नसतें. बरें नास्तिकाचा पक्ष स्वीकारून या सृष्टीचा धर्माधर्मादि कोणी कर्ता नाहीं म्हणून म्हणावें, तर तेंही समंजस नव्हे. कारण हा जन्म मानला कीं त्याला कारण होणारा पूर्वजन्मही अवश्य मानावा लागतो. तोच परलोक होय. शिवाय परलोक न मानल्यास समस्त लोक व वेद याच्याशीं विरोध येतो. या जगातील लोकाना त्यांच्या इच्छेच्या व प्रयत्नाच्या विरुद्ध फळ मिळत असल्याचें आपण शतशः पाहतों. पण त्याचें कारण काय, हें नास्तिकांना सांगता येत नाहीं. एकादे वेळीं एकाद्याला इष्ट देव, गुरु इत्यादिकांच्या अनुग्रहानें मोठा लाभ होतो तो कां ? एकसारखा घोष करीत असलेल्या या विधि-निषेध शास्त्रांचा काय उपयोग ? पूर्वी हें सर्व असत् होतें; तें आतां सत् झालें आहे, इत्यादि श्रुतिवाक्यांची संगति कशी

लावावयाची? तसेंच–सृष्टीच्या आरंभीं शून्य आकाशापासून हिरण्यगर्भ कसा झाला? आकाशाचा असाच विचित्र प्रभाव आहे, म्हणून म्हटल्यास, तर मग सर्वत्र ( आकाशभर अनेक ) हिरण्यगर्भ का उत्पन्न होत नाहींत? असा प्रश्न उद्भवतो. औषधींनीं आपापल्या पूर्व बीजापासून उत्पन्न व्हावें, अग्नीनें उष्णच असावें, इत्यादि स्वभाव कसे व का स्थित झाले? प्रयागादि क्षेत्रामध्यें जे काम्य देहत्याग करितात त्यांना इष्ट फल मिळतें कीं नाहीं? मी चंद्र व्हावें, अशा हेतूनें सहस्रावधि उपासक उपासना करितात व त्याना उपास्यभाव प्राप्त होतो, असे शास्त्रानेंही सांगितलेलें आहे. पण तदनुरोधानें आजपर्यंत मेलेल्या अनेक चंद्रोपासकांच्या चद्ररूपानीं आकाश कोठें भरलें नाहीं, तें का? एका साध्वीवर अनेक स्त्रीलंपट दुराचाऱ्याचें मन जातें व ते आपापल्या मनोरथानें तिचा संगास्वादही घेतात. तथापि ती साध्वीच कशी राहते? भगवन्, मला आणखीं असे अनेक संदेह येतात. पण त्याचे निवारण होत नाहीं. यास्तव आपण आज माझ्या या सशयांचें निरसन करा. त्यावांचून माझें अत्यंत समाधान होणार नाहीं. साधुसमागम कधींही व्यर्थ होत नसतो २०६.

**सर्ग २०७**—वरील प्रश्नातील काही प्रश्नाचें समाधान.

**श्रीवसिष्ठ**—राजन्, आतां मी काय सांगतों तें ऐक म्हणजे तुझे सर्व संदेह नाहींसे होतील. हें सवेदन स्वतःप्रमाण आहे, असें जाणणाऱ्या लोकाना विषयतत्त्वाची व्यवस्था करणें अगदीं सोपें असल्यामुळें त्याविषयीं सशय संभवतच नाहीं. कारण जेथें आहे असा किंवा नाहीं असा प्रत्यय येतो तेथें ( त्या दोन्ही स्थानीं ) भगवती संवित्च त्या दोघांचेंही समर्थन करिते. ही वस्तु अमुक ( काळी, लाल, घट, वस्त्र इत्यादि प्रकारचीच ) आहे अथवा ती तशी नाहीं, अशा निश्चयानें संवित् ज्या विषयाला व्यापते त्याचें तसें रूप अवश्य होतें. मग तें रूप सत् असो कीं, असत् असो. संवित्चा त्याविषयीं कांहीं आग्रह नाहीं. प्रतिभेप्रमाणें विषयाचें समर्थन करणें हा संवित्चा स्वभावच आहे. ती संवित् प्रथम एकाचदेहाची आत्मभावानें भावना करते. मग ती त्या देहाचाच धर्म होते. ( म्हणजे संवित्च्या भावनेनें त्या दोघांचा अन्योन्याध्यास होतो. ) म्हणूनच जन स्वप्न व जागर या दोन अवस्थांमध्यें देहासच चेतयिता जाण-

तात. त्याचाच अनुभव घेतात. ते संवित् हा चेतयित्याचा धर्म आहे, ती स्वतः चेतयित्री नाहीं, असें जाणतात. यास्तव कोणीएक भ्रांतिरूप संवित्च शरीर होते. तिच्याहून पृथक् शरीरता संभवत नाहीं. अर्थात् 'स्वर्ग–नरक–भोगार्थ विदेहावस्थेंत देहाचें कारण काय आहे?' हा प्रश्न उरत नाहीं. जगाचीही संवेदनबलानेंच सिद्धि होते. सर्गाच्या आरंभीं कोणतेंही कारण नसल्यामुळें स्वप्नद्रष्टा संविदात्माच जगद्रूपानें भासतो. स्वप्नापेक्षा या जगात कोणता विशेष आहे? शिवाय आहे, भासतें आहे, इत्यादिप्रकारें प्रत्यगात्म स्वभावानेंच जगाचा अनुभव येत असतांना तें ( जग ) त्याहून अन्य कसें असणार? अर्थात् ब्रह्मसंज्ञक शुद्ध वेदनच हें जग आहे. याप्रमाणें अविकार्य ब्रह्मच जगद्रूपानें स्थित असल्यामुळें प्रमाणभूत विद्वान्, वेद, अध्यात्मशास्त्रें इत्यादिकांनीं व आम्हींही अनुभवानुसारच वर्णन केलें आहे. याप्रमाणें समस्त प्राण्यांच्या संवित्मध्यें रूढ झालेलें ( दृढ अनुभवानें सिद्ध झालेलें ) सत्तारूपानें सर्वत्र पूर्ण, व महात्म्यानीं सांगितलेलें जगाचें नित्य संविन्मात्रत्व नाकबूल करून जे केवळ आपातवर्तमान नाम–रूपानुभवालाच प्रमाण मानतात ते संवित् नित्य नाहीं, तर शरीरच तिचें कारण आहे, जडच तिचें उपादान आहे किंवा जड आत्म्याचाच तो गुण आहे, असें म्हणून व्यर्थ मोहित होतात. ते सर्व वेडे आहेत. आम्हा आत्मवाद्याच्या कथामध्यें मिळण्यास ते योग्य नाहींत. कारण मत्त व अमत्त, अज्ञ व ज्ञानी याचा परस्पर संभाषणव्यवहार कसा होणार? ज्या विद्वानांच्या कथेनें सर्व संशयाचा क्षय होत नाहीं, ती मूर्ख कथा होय. मग ती भूलोकीं झालेली असो कीं स्वर्ग लोकीं चालो. केवळ प्रत्यक्ष प्रमाणावर निष्ठा ठेवून राहणाऱ्या अज्ञाना विवेकादि दुसरीं सर्व यथार्थ ज्ञानाचीं साधनें नाहींशीं होतात. शिवाय चार्वाकादि नास्तिकांच्या युक्तींनीं तरी जगाची व्यवस्था कोठें लागते आहे? त्यांच्या उपदेशानें तरी श्रोत्याचे सर्व संशय कोठें जात आहेत? कारण त्यांच्या परिभाषेंत प्रत्यक्षापलीकडे मुळीं जावयाचेंच नाहीं. आमच्या वैदिक दर्शनाविषयीं पाहिल्यास वेदादिकांचें अध्ययन गुरुमुखानेंच होत असल्यामुळें शिष्याचे सर्व संशय शब्द, अनुमान, अनुभव इत्यादि अनेक प्रबळ युक्तींनीं घालवितात, व वेदवेत्ते आचार्य शिष्याला

निःसंदेह करण्यास समर्थही असतात. ते सर्व सिद्धान्त स्वानुभवाच्या अनुरोधानेंच सागतात.

असो; प्रत्यगात्मसंविद–च जर देहादि जगत् आहे तर मृत शरीरही संविन्मय असल्यामुळें ज्ञानकार्य का करीत नाहीं, अशी ज्याची शंका असेल त्याचें आम्ही निराकरण करें करतों तें तूं ऐक– हिरण्यगर्भाचा ज्यानें वेष घेतला आहे अशा ब्रह्माचें हें जगद्रूप भान स्वप्ननगरच आहे. ते वस्तुतः निरंतर चिन्मात्रच जरी आहे तरी तुझ्या स्वप्ननगरांतील पाषाणादिकाना चेतनत्व जसें नसतें तसेंच तें शवादिकात नाहीं. अर्थात् स्थावर व जंगम हे त्या स्वप्नाचे पोटभेद आहेत. स्वप्नांत पृथिवी, पर्वत इत्यादि सर्व जडही सविन्मय कसें तें तुला स्वानुभवानेंच समजण्याजोगें आहे. ब्रह्म-सविदाकाश घन आहे. विराट् हें त्याचें संकल्पनगर आहे. हिरण्यगर्भ शुद्ध संविन्मय असून त्याचें संकल्पित शरीर हेंच ब्रह्माडशरीर होय. त्यात कल्पक ब्रह्मदेवानें जशी जशी कल्पना केली तसा तसा आता आम्हांला अनुभव येत आहे. देह जिवंत असेपर्यंतच स्पंद पावावा, नंतर त्यानें ( मृतावस्थेंत ) स्पंदरहित व्हावें, इत्यादि जशा कल्पना केल्या आहेत, तसाच त्याचा व आम्हाला अनुभव येतो.

महा प्रलय संपला म्हणजे सर्ग पुनः प्रवृत्त होतो. पण त्यावेळीं त्याचें कोणतेंही कारण नसतें. अर्थात् द्रव्यापासून हें सर्व द्रव्यमय जग झालें आहे, असे म्हणता येत नाहीं. पूर्व कल्पातील प्रजापति मुक्त होऊन गेलेला असल्यामुळें या कल्पातील प्रजापतीला पूर्वीच्या द्रव्याचें स्मरण होतें व त्यामुळें तो त्यास निर्माण करतो, असें म्हणता येत नाहीं, इत्यादि जें तुझें म्हणणें आहे, तें आमच्या सिद्धान्ताला अनुकूलच आहे. म्हणूनच आम्ही स्वयंज्योति ब्रह्मच जगद्रूपानें भासतें, द्रव्यरूप जग पृथक् नाहीं, असें ठरविलें आहे. स्वप्ननगराच्या दृष्टान्तानें त्याची उपपत्तिही लागते. त्यामुळें माता-पिता इत्यादिकाच्या अभावीं देह कसा होतो, ही शंका उरत नाहीं. कारण शरीर असो कीं नसो. जेथें जेथें चिदाकाश आहे, तेथें तेथें तें आत्म्याला द्वैताद्वैतमय जगद्रूपानें पाहतें. याच न्यायानें मरणानंतर चिदाकाश संकल्पाप्रमाणें शरीरादिकाचा अनुभव घेतें. पहिल्या उत्पत्तीच्या वेळीं पूर्वी मेलेल्याही जीवसंवित्‌ला अपृथिव्यादिमय असेंही हें जग पृथिव्यादियुक्त

असल्यासारखें भासतें. स्वप्नांतील देश-काल जाग्रतींतील देश-कालादिकांस जसे व्यापीत नाहींत त्याप्रमाणें परलोकास प्राप्त झालेल्या जीवाचे ऐहिक देशकाल तेथें अडचण करीत नाहींत. त्याचप्रमाणें तत्त्ववेत्याचा विषय अशा ब्रह्मामध्येंही अज्ञाचा विषय असें हें जग रहात नाहीं. निजलेल्या पुरुषाला चिदाकाशच जसें स्वप्नांतील जगाच्या रूपानें भासतें तसें मरून परलोकीं गेलेल्या जीवाला तें आकाशच सर्गासारखें भासतें. तो सर्ग जरी वस्तुतः पूर्वी नसतो तरी पूर्वी असल्यासारखाच भासतो. त्याला पूर्व जन्मांत ही पृथ्वी, हें अंतरिक्ष, हा यम, इत्यादि जसा जसा अनुभव, शास्त्र इत्यादिकांच्या द्वारा संस्कार झालेला असतो तसाच तो परलोकाला पाहतो. मेलेला पुरुष हा मी मेलों, हा आतां या लोकांत उत्पन्न झालों आहें, येथें शुभाशुभ कर्मफल भोगीत आहे, इत्यादि भ्रांति पाहतो. पण ती भ्रांति मोक्षोपायांचें सेवन केल्यानेंच निःशेष निवृत्त होते. त्यावांचून जात नाहीं. यावरून धर्माधर्मच जगाच्या आकारानें परिणाम पावतात, या आस्तिक पक्षालाही पुष्टि मिळते. कारण त्या अतत्त्वज्ञ आस्तिकाची संवित् धर्माधर्मवासनाकार झालेली असते. साराश, राजा, जगाचें स्वरूप अगदीं शून्यही नाहीं व अत्यंत सत्‌ही नाहीं. तर ब्रह्मसंज्ञक चैतन्य जगत्स्वरूप भासतें. तें अज्ञानामुळेंच अनर्थभूत आहेसें वाटतें. पण ज्ञान्याला तें परम कल्याण व निरतिशय आनंदरूपच आहे, असा अनुभव येतो २०७.

**सर्ग २०८**—विधात्याच्या इच्छेप्रमाणें जनांना प्रतिकूल फल मिळतें.

**श्रीवसिष्ठ**—राजा, प्रजाजनाना त्यांच्या इच्छेविरुद्ध फल कां मिळतें, तेंही सांगतों. चित्-ब्रह्मच सर्व कांहीं आहे, हें वर सिद्ध झालेंच आहे. त्याच्या संकल्पाप्रमाणें सर्व होतें व तसाच अनुभव येतो. राजा, तुझ्या गृहांतील ही प्रजा जशी तुझ्या संकल्पानुसार झाली आहे तशीच ही सर्व सृष्टिगत प्रजा प्रजापतीच्या संकल्पानुसार झाली आहे. तूं आपल्या संकल्पनगरींत जशी जशी कल्पना करतोस तसें तसें पाहतोस कीं नाहीं? त्याच न्यायानें हें सर्व जाण. आतां जगामध्यें आमच्या संकल्पाच्या विरुद्ध गोष्टी होत असल्याचा अनुभव येतो. पण त्यालाही मुनींच्या यम-नियमादिकांच्या योगानें शुद्ध झालेल्या संवित्-पासून उद्भवलेले वर व शापच कारण आहेत. ब्रह्मसंवित्‌ही त्यांच्या संकल्पाप्रमाणें बनते. शिवाय तप-

त्यांचे वरशापादिकें सिद्ध होवोत, अशी कल्पना प्रजापतीनेंच केलेली असते. जन विधि–निषेधबोधक शास्त्रावरून ज्ञात होणाऱ्या धर्माधर्मीतील ज्यावर आस्था ठेवतील तदनुसार त्यांना फल मिळावें, ही सुद्धा ब्रह्मदेवाची संकल्परूप नियतीच होय. असत् जगाचें किंचित् काल भान होणें, याला सुद्धा ब्रह्मसंकल्पच कारण आहे.

**राजा**—जग ब्रह्मसंकल्पामुळेंच जर सत् आहे तर तें पूर्वी ( प्रलय व सुषुप्ति यामध्यें ) का उपलब्ध होत नाहीं व मागून ( जाग्रत् व स्वप्न ) यामध्येंच का उत्पन्न होतें? शिवाय सदा विकार पावणारें हें जग अति स्थिर आरंभयुक्त व भास्वर ( भासणारें ) कसें झालें आहे?

**श्रीवसिष्ठ**—स्वप्न व जागर यांमध्यें होऊन प्रलय, सुषुप्ति व मोक्ष यांमध्यें जगानें न होणें, हा स्वभावच आहे. संकल्प असेपर्यंत भ्रांति टिकते, असा नियम असल्यामुळें संकल्प व जगाचें सत्त्व याच्या व्याप्तीप्रमाणेंच असंकल्प व जगाचें असत्व याची व्याप्तिही अबाधित आहे. जो जगाचा संकल्प करतो तोच त्याचा प्रलयही करितो. वास्तव सर्व चिदाकाशमय आहे. तें आकाश नित्यसिद्ध आहे. या ब्रह्मसंकल्प नगरात हे सर्व स्वभाव उदय पावले आहेत. चिद्ब्रह्म ज्या अर्थी सर्वांचा आत्मा आहे त्या अर्थी तें सर्व भूतांमध्यें, तृणादि सर्व जातींमध्यें, व इतर सर्वांमध्यें त्याच्या त्याच्या स्वभावरूपानें प्रकट होतें २०८.

सर्ग २०९—एकाच वेळीं भोगसंपत्ति, विरुद्ध फल देणाऱ्या कर्मांचें अविरोधानें साफल्य इत्यादि.

**श्रीवसिष्ठ**—आतां क्षेत्रादिकांतील मरणाचें फल कसें मिळू शकतें तें ऐक. आदि सर्गामध्यें क्षेत्रें, सर्व धर्म, इत्यादिकांचें शास्त्रोक्त फल ब्रह्मदेवानें कल्पून ठेवलें आहे. आपल्या या संकल्पनगराकार जगातील कोणत्या क्षेत्रात, कोणा अधिकाऱ्यानें कशा रीतीनें कर्मानुष्ठान केलें असतां कोणतें फल मिळतें, तें जसें जसें त्या ईश्वरानें ठरवून ठेवलें आहे तसें तसेंच होतें. त्यामुळें प्रयागादि क्षेत्रात वाछितार्थ सिद्ध्यर्थ स्नान-तप-दान यज्ञ इत्यादि पुण्य अवश्य मला याचें फल मिळेल, अशा निश्चयानें अधिकाऱ्यानें केल्यास त्याच्या त्या भावनाबलानें इष्ट फल आविर्भूत होतें. पुण्यवानाला जसें तें मिळतें तसेंच पाप्यालाही त्याच्या पापाच्या योग्य

अंशाचा निरास करून क्षेत्रानुष्ठान उपकारक होतें. पापांश थोडा असून क्षेत्रांतील पुण्यांश अधिक घडल्यास तें पुण्यानुष्ठान पापाचा निःशेष नाश करून शिवाय अवशिष्ट पुण्यांशानें पुरुषाला उचित इष्ट फलही देतें. पाप व पुण्य हीं दोन्हीं ज्याचीं समान असतात त्याला दोघांचेंही फल भोगण्यासाठीं दोन पृथक् शरीरें घ्यावीं लागतात. सारांश ब्रह्मदेवाच्या संकल्पाप्रमाणेंच पुण्य–पाप–फल मिळतें. चिद्धातूलाच ब्रह्म म्हणतात. तेंच पद्मोद्भवादि समष्टि व अहं इत्यादि व्यष्टि जीव होय. यास्तव व्यष्टि व समष्टि या दोन प्रकारच्या उपाधींत तें जसा संकल्प करतें तसें जग होऊन राहतें. धात्याच्या संकल्पाप्रमाणेंच, पुण्यवान् पुरुषाला क्षेत्रार्जित पुण्याच्या अनुरोधानें स्वप्नासारखी फलभोगप्रतिभा व पाप्याला पापाच्या अनुरोधानें नरकादि प्रतिभा होते. त्याला प्रतिभा कशी होते तेंही थोडक्यात सांगतों. 'मी एकटाच मेलों. हे माझे बांधव रडत आहेत हा मी एकटाच परलोकास प्राप्त झालों आहें.' असें एका जीवाला वाटलें. तिकडे त्याच्या आप्तांनाही 'हा आमचा अमुक मेला आहे.' असें वाटून ते त्याच्यासाठीं रडतात; त्याना श्मशानांत नेतात; जाळतात; व त्याचें और्ध्वदेहिक कर्म करितात. पण वायु झालेल्या पुरुषाला जसा भ्रम व्हावा तशा प्रकारचा हा भ्रम आहे. अत्युग्र पुण्यपापांच्या योगानें मृतांची चित्कलाच लक्षावधि देहभावही कल्पिते. ज्याच्या कर्मांचा ज्यांच्याशीं संबंध असतो त्यांचाच परस्पर बंधु, मित्र, शत्रु, उदासीन इत्यादि भाव जडतो. तथापि हा सर्व भ्रांतीचा विलास आहे.

आतां धर्माधर्म देहसंवित्चें कारण कसे होतात, तें सांगतों; ऐक. बा राजा, ब्रह्मदेवाच्या या संकल्पनगरांत कांहीं संभवत नाहीं असें नाहीं. स्वप्नांत जसें जें दिसतें तें सर्व संभवतें, तसेंच या चिदाकाशसंकल्पांत उपलब्ध होणारें हें सर्व संभवतें. म्हणूनच तत्त्वज्ञ सर्व कौतुक सोडून या मायिक विकासाविषयीं निःस्पृह असतात. धर्माधर्मांचें अनुष्ठान करणारेही जन शास्त्रांत स्वर्गादिकांचें केलेलें वर्णन ऐकून त्याप्रमाणें आपली भावना दृढ करितात व तिच्या अनुरोधानेंच संविन्मय स्वर्गाचें फल भोगतात. प्राणी येथें जें शुभाशुभ कर्म करतो त्याचें फल परलोकीं भोगतो. अशी भावना दृढ झाल्यामुळें जीवांना ब्रह्मसंकल्पाप्रमाणें फल मिळणें अगदीं युक्त आहे. पण

हें सर्व कल्पित असल्यामुळें मिथ्या आहे, असें जर तुला वाटत असेल तर मग स्वर्गभोगादिचसे काय पण हा लोक, त्यांतील धर्मानुष्ठान, परलोक, त्यातील भोग इत्यादि सर्वच जग असमंजस आहे. या सृष्टींत कांहीं जर सुस्थिर असतें तर हा विरोध आला नसता व मग यांत हें समंजस आहे, हें असमंजस आहे, इत्यादि म्हणता आलें असतें. पण जेथें हें सर्व द्रष्टाच आपल्या संविदाकारानें पहातो तेथें वरील विकल्पाना अवकाश कोठून मिळणार? साराश, सर्व जग ब्रह्मदेवाच्या रूपानें स्थित असलेल्या चित्‌चा संकल्पच आहे. त्यामुळें सर्व ब्रह्मचित्संकल्पाप्रमाणें कल्पान्तापर्यंत स्वाभाविक होऊन राहिलें आहे. राजा, या स्वप्नसदृश जगात सर्व संभवतें व तें कल्पना करणाऱ्या या चिदात्म्याहून पृथक् नाहीं यास्तव जगत् ब्रह्मच आहे २०९.

**सर्ग २१०**—विवेकदृष्ट्या देहादि जगत् ब्रह्ममात्रच आहे.

श्रीवसिष्ठ—आतां चंद्रोपासकाच्या उपासनेप्रमाणें आकाशांत अनेक चंद्र का नाहींत, तें ऐक. मी चंद्र आहें, अशा भावनेनें अहंग्रह उपासना करणारे सहस्रावधि ध्यानशील जन आपल्या दृढ संकल्पानुसार चंद्रभावास प्राप्त झालेच आहेत. तथापि या आकाशांत आलेले नाहींत अथवा या चंद्रामध्येंही प्रविष्ट झाले नाहींत. कारण दुसऱ्याच्या संकल्पपुरास तिसराच कसा प्राप्त होईल? ज्यानें ज्या नगराची कल्पना केली असेल त्यालाच तें व त्यातील पदार्थ उपलब्ध होणार, हें उघड आहे. ते सर्व ध्यानशील पुरुष आपापल्या पृथक् पृथक् कल्पिलेल्या सर्गाकाशात कलाक्षयरहित चंद्र होऊन चमकत आहेत. आम्ही याच चंद्रामध्यें प्रवेश करणार, असा जर त्यांनीं भावनाभ्यास केला असता तर ते त्यांत शिरले असते. पण तुझ्या प्रश्नावरून त्यानीं तशी भावना केली नव्हती, असें मी समजतों. ध्यानाप्रमाणेंच फल मिळावें, अशी विधात्यानें नियति केली आहे. इतर सर्व ध्यानविषयाचेंही याच न्यायानें समाधान करून घ्यावें. एकाद्या साध्वी स्त्रीविषयीं अनेकांनीं अनेक कल्पना जरी केल्या व त्याना स्वकल्पनेप्रमाणें जरी फल मिळालें तरी साध्वी पतिव्रता असाध्वी कधींही होत नाहीं. कारण मी साध्वी, पवित्र, पुण्यशीला आहें, ही

तिची दृढ भावना तिला तसेंच फल देईल. कारण हा सर्व कल्पनांचा विकास असून कल्पना सवित्च्या आधारानें राहणारी आहे.

दान, और्ध्वदेहिक कर्मे, तप, जप, इत्यादि अमूर्तांचें परलोकीं मूर्त फलही याच न्यायानें मिळतें. कारण दानादिकांच्या भावनेनें ज्यांची मति चिह्नित झालेली असते ते परलोकीं स्वप्नाप्रमाणें मूर्त फल भोगतात. त्यांची चित्च मूर्त आकाराची कल्पना करते. मन व ज्ञानेंद्रिय यांच्या योगानें वेदनावेदनाकार भ्रांति होते तिच्या योगानें चिन्मात्र विषयप्राप्त्यर्थ मनासह कर्मेंद्रियांच्या द्वारा स्पंदास्पंदात्मक होतें. पण ती भ्रांति शांत झाली म्हणजे निर्मळ शांतात्माच राहतो. या लोकीं केलेल्या दानाचें परलोकीं चित्प्रतिभासात्मक फल जीवास प्राप्त होतें, असे विद्वान् लोक सांगतात. तस्मात् येथील दान किंवा अदान यांचें अकृत्रिम संकल्प, हेंच भोग–ऐश्वर्य इत्यादि दानफल अथवा दारिद्र्यादि अदानाचें फल परलोकीं मिळत असलें तर त्यांत कांहीं विरोध नाहीं. कारण हा सर्व संसार कल्पनात्मक आहे. असो; राजा, तुझ्या प्रश्नांचें उत्तर मी यथामति दिलें आहे. या जगाचें ब्रह्म हेंच तत्त्व आहे.

**राजा**—भगवन्, सर्गाच्या आरंभीं देहशून्य असलेल्या चिन्मात्राला देहाची कल्पना कशी करितां येते? दीपादिकांच्या प्रकाशाच्या अभिव्यक्तीला भिंतीसारख्या मूर्त पदार्थांची जशी आवश्यकता असते तशी चित्च्या कल्पनामय अभिव्यक्तीलाही देहाची गरज आहे, असें मला वाटतें.

**श्रीवसिष्ठ**—बा महामते, तूं देह या शब्दाचा जो अर्थ जाणत आहेस तो तत्त्वज्ञाला भासत नाहीं. तत्त्वज्ञ ब्रह्मशब्दाचा जो अर्थ तोच देह या शब्दाचा अर्थ असें जाणतात. जल व पाणी या शब्दाचा अर्थ जसा एकच तसा ब्रह्म व देह यांचा अर्थ एकच समजतात. ब्रह्मच हा स्वप्नतुल्य देह आहे. त्याला स्वप्न म्हणणें ही सुद्धां तुला समजण्याकरितां योजलेली युक्ति आहे. वस्तुतः देह स्वप्नही नव्हे. स्वप्न कसें असतें तें तुला माहित आहे. म्हणून मी तुला त्याचा दृष्टान्त देऊन समजावीत आहें. वस्तुतः चित्नें आभासित केलेल्या सर्गांत बाधित होणाऱ्या स्वप्नाचें सादृश्य नाहीं. त्यांतील हा देह कोण आहे? स्वप्नार्थ कोणाचे आहेत, स्वप्नबुद्धि कोठें राहतात? इत्यादि विचारांत प्रविष्ट करून ज्ञानी अज्ञाला

बोध करतो. पण वस्तुतः जगांत जाग्रत्, स्वप्न, सुषुप्त इत्यादि कांहीं नाहीं, तर एक निर्विकार शुद्ध चिदाकाश आहे. तेंच सर्व अंशाच्या लयानंतर अवशिष्ट राहणारें तुरीय होय. यास्तव त्याचा साक्षात्कार झाला कीं, सर्व साधनें व पुरुषार्थ यांची पूर्ति होते. आज जें हें असें भासतसें आहे तें वस्तुतः भासत नाहींच. पूर्वी भासणाऱ्याचीही तीच स्थिति आहे. यास्तव ज्यांत जाग्रत्–स्वप्नादि कधींही नाहीं असें ब्रह्म तूं जाण. हें सर्व निर्विषय चिन्मात्र आहे. ज्ञान्याच्या दृष्टीनें स्वप्नादि सर्व चिन्मात्र आकाशच आहे. हें जग पूर्ण ब्रह्मापासून प्रसार पावलेलें असल्यामुळें तें पूर्णच स्थित आहे. ज्या अर्थी जगत् आकाशरूप अप्रतिघ चिदुन्मेष आहे त्या अर्थी चिन्मात्र जेथें जेथें आहे तेथें तेथें जगत असणें उचितच आहे. चिदाकाश सर्वत्र आहे, व हें सर्व जगन्मय आहे. सर्व शांत ब्रह्मच आहे. दुसऱ्या कोणत्याही युक्तीचा असंभव असल्यामुळें हीच युक्ति ( विवर्तवादच ) उत्तम आहे. पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्या श्रोत्याच्या पुढें युक्तिशून्य अनुभवाचें कितीही जरी प्रतिपादन केलें तरी तें शोभत नाहीं. वेदशास्त्रादि सत्प्रमाण, युक्ति व अनुभव यावरून जे सिद्ध होतें ते अबाधितच होय. यास्तव वेदादिकावरून जें सत् म्हणून ठरलें असेल तेंच ब्रह्म व जें असत् म्हणून ठरलें असेल तें जगत् होय. जेव्हा चरम-साक्षात्कार-वृत्तिरूप ज्ञानानें हें विश्व स्थित असतानाच, ब्रह्मरूपांत लीन होतें, तेव्हा पूर्वी ब्रह्म नसलेलेंच ते ब्रह्म होतें. हा न्यायच परम पुरुषार्थाचा उपाय आहे. कारण त्याच्या योगानें जीवन्मुक्तिसह लोकवेदादि हें सर्व जग ब्रह्मच आहे असें सिद्ध होतें. अज्ञात आत्ममात्ररूप संसार-वृक्षामध्यें ज्ञात चित्—आकाशच आहे. त्याहून दुसरें कांहीं नाहीं. अज्ञात व ज्ञात चिदाकाश मीच आहें व असा हा मीच पर्यायानें त्रिभुवन, बंध, मोक्ष इत्यादि आहें, हा निर्णय होय. आत्मज्ञानानंतर हें जग जसें आहे तसें रहात नाहीं. तत्त्वज्ञाचें स्वरूप सर्व दृश्यरहित व वाङ्मनसातीत दृङ्मात्र अवशिष्ट राहतें. जीवन्मुक्त जनांच्या शतशः विचारानें व वेद-वचनानें जें सिद्ध होतें तेंच स्वानुभवानें सर्वप्रकारें ज्ञात होतें आणि तेंच परम पुरुषार्थभावानें फळतें. बाकीचे सर्व अर्थ सोडून तदेकनिष्ठ होणें हाच कोणत्याही विषयाच्या प्राप्तीचा उत्तम उपाय

आहे. व्यवहारांतही तदेकनिष्ठतेचें फल अवश्य मिळतें. पण लौकिक फल असत्य व मोक्षाख्य फल सत्य असा जरी फलांत मोठा फरक असला तरी तदेक निष्ठतारूप साधन व तदनुसार फलानुभव हीं दोन्ही जागीं एकसारखींच आहेत. असो; हे मतिमाना, याप्रमाणें तुझ्या महा प्रश्नाचें विचार-फलनिर्णयरूप समाधान मी सांगितलें. तूं या मार्गानें जा. म्हणजे तूं मनांत आधिशून्य, देहामध्यें व्याधिशून्य व इंद्रियामध्यें निर्व्यसन होऊन सर्वोत्कृष्ट होशील २१०.

**सर्ग २११**—सिद्धसाध्यादि लोकांच्या दर्शनाचा उपाय पुनः ब्रह्मच सकल जग.

**श्रीवसिष्ठ**—रामा, याप्रमाणें कुशद्वीपांत इलावती राजधानींत बसून मी राजाला उपदेश केला व त्यानें पुनः केलेल्या पूजेचा स्वीकार करून त्याच्यावर अनुग्रह करणें हें प्रयोजन सिद्ध झालें असता स्वर्गास जाण्याकरितां आकाशांत उडून गेलों. आज या अयोध्येंत असलेल्या मीं तेंच रहस्य तुला सांगितले आहे. या सुदृष्टीनें चालल्यास तूं शांतचित्त व आकाशात्मा होशील. हें सर्व ब्रह्मच आहे.

**श्रीराम**—भगवन्, सिद्ध, साध्य, यम, ब्रह्मा, विद्याधर, देव इत्यादिकांचे लोक कसे दिसतात?

**श्रीवसिष्ठ**—रामा, चूडालोपाख्यानांत सांगितल्याप्रमाणें विशेष प्रकारच्या धारणाभ्यासानें तूं त्यांना व दुसऱ्या सर्वांना प्रत्येक दिवशीं अहोरात्र खालीं, वर, आजुबाजूस इत्यादि सर्वत्र पहाशील. सिद्धाचे लोक दोन प्रकारचे आहेत. त्यांतील महर्, जन, तप व सत्यसंज्ञक जे लोक ते दूर आहेत. पण संकल्पलोक नावाचे जे दुसऱ्या प्रकारचे सिद्धलोक आहेत त्यांनीं सर्व विश्व व्यापलें आहे. पण या दोन्ही प्रकारच्या लोकांच्या दर्शनाचा उपाय धारणाभ्यास हाच आहे. तो तूं केलेला नाहींस. परंतु ते असार असल्यामुळें त्यांच्याकरितां धारणाभ्यास करण्याची तुला आवश्यकताच आहे, असें कांहीं नाहीं. त्यांचे ते लोक जसे कल्पनामय तसाच हा आमचा लोकही कल्पनामात्र सिद्ध आहे. पण ज्याप्रमाणें काल्पनिक वातही सर्वत्र भ्रमण करतो त्याप्रमाणें ते लोक भ्रमण करितात. पण हा भ्रमण करूं शकत नाहीं. तुला जे स्वप्न व संकल्पमय लोक भासतात तेच सिद्ध लोक आहेत. तसलेच

दुसरेही लोक त्यांनीं निर्माण करून संकल्पानेंच स्थिर केले आहेत. तूंही जर योगधारणेनें स्थिर केलेल्या ध्यानानें स्वसंकल्पप्राप्त लोकांस स्थिर करशील तर हेही स्थिर होतील. तसेच दुसऱ्या सर्वांचेही संकल्प दृढतर ध्यानानें स्थिर होणें अगदीं साहजिक आहे. पण त्यांत एवढा फरक आहे. त्या सिद्ध लोकानीं आपल्या महर्, जन इत्यादि लोकांस इतर जीव पुण्य-संपत्तीच्या बलानेंच येऊं शकतील, अशा रीतीनें स्थिर केलें आहे. अर्थात् अतिशय पुण्य करणाराना ते अनायासानें प्राप्त होतात. पण दुसरे जीव धारणाभ्यासानें ज्याना सिद्ध करितात त्यांचे लोक मोठ्या श्रमानेंच स्थिर होतात. तस्मात् जगत् शांत ब्रह्म आहे. त्याविषयीं जसा निश्चय करावा तसें तें भासतें. त्याचें तत्त्व समजलें म्हणजे अस्ति, नास्ति इत्यादि तर्कांना अवकाशच रहात नाहीं. स्वभावतः तें शून्य व प्रतिघातास अयोग्य आहे. कारण दृढ संवेदनानें भासलेलें तें चित्स्वभावामुळेंच भासमान दिसतें. वस्तुतः त्यांत चिदभिमान नाहीं. कारणसत्तेहून कार्याची सत्ता पृथक् आहे, इत्यादि कुतर्कांसही येथें अवकाश नाहीं. कारण सर्वदा सिद्ध असणाऱ्या अनंत आकाशापासून कोण कसें होणार ? तथापि उत्पन्न होत असल्यासारखें जें भासतें तें सर्व महाकाशांत उत्पन्न होणाऱ्या घटाकाशा-प्रमाणेंच होतें. तेव्हा त्यांत एकत्व, द्वित्व इत्यादि कल्पना कशी होणार ? व तिच्यावाचून कार्य-कारणभाव कोठचा ? यास्तव पूर्वीं जें जसें होतें तें आताही तसेंच निर्विकार आहे. यास्तव ब्रह्म विवर्ताधिष्ठान होऊं शकतें. पण विकारी नसल्यामुळें कारण होऊं शकत नाहीं. संकल्प-समर्थी चित्र आकार धारण करून पर्वताच्या लीलेनें जसें उदय पावतें; पण वस्तुतः पर्वत नसून तें आकाशच असतें, त्याप्रमाणें ब्रह्ममय जगाची स्थिति आहे. म्हणूनच आपापल्या दृष्टीनें निर्व्यापार असलेलेही जीवन्मुक्त व्यवहार करीत असल्यासारखे इतरांस भासतात. जलांतील तरंगांप्रमाणें ब्रह्मामध्यें सर्व सृष्टि अनन्यरूपानेंच परिवर्तन पावत असतात. वायूंतील स्पंदाप्रमाणें व आकाशांतील शून्याप्रमाणें ब्रह्मामध्यें सृष्टि अमूर्त व अनन्य ( अपृथक्, एकरूप ) असतात. संकल्पनगर जसें शून्य तसें ब्रह्मांतील हें साकार जगही अनाकार आहे. याचा जरी चिरकाळ अनुभव आला, तें जरी सर्व लौकिक व वैदिक कार्यें करण्यास

समर्थ असलें तरी निराकार व शून्यच होय. संकल्पनगर जसें संकल्पमय तसें जग ब्रह्ममय. स्वप्नांतील पर्वत जसा चित्तमय तसें हें त्रिभुवन ब्रह्ममय. पुरुषानें स्वप्नात पाहिलेलें स्वमरण जसें खरें नव्हे तसें चिरकाल अनुभवलेलें हें जगही सत्य नव्हे. स्वप्नांत मेलेला पुरुषही जसा आपला देह पाहतो तसें हें असत् जगही दिसतें. जगत्-पणा व अजगत्ता हीं दोन्हीं, परमात्म्याचें शुद्ध रूपच आहे. एक वस्तूच्या ठिकाणीं भासलेली दुसरी वस्तु सत्य नसते. हे रामा, सिद्ध लोकांतील भोगादि फल मी वर्णिल्याप्रमाणेंच कल्पनामात्र असो कीं, दुसऱ्या मुनींनीं सांगितल्याप्रमाणें दुसऱ्या प्रकारचें असो. अथवा तें मुळींच नसो. तुज जीवन्मुक्ताला त्याचा काय एवढा मोठा आदर आहे? तू तुच्छ सिद्ध्यादि फलांना पुरुषार्थ समजू नको. कारण तूं ब्रह्मतत्त्वाला साक्षात् जाणलें आहेस. यास्तव आता या मायामात्र वैभवामध्यें आसक्त होऊं नकोस. त्याचें नुसतें ज्ञानही परिश्रम देणारें आहे २११.

**सर्ग २१२**—ब्रह्माची अहंभावकलना हाच पितामह व त्याचा संकल्प हेंच त्रिभुवन, यास्तव सर्व ब्रह्मच.

**श्रीवसिष्ठ**—रामा, ब्रह्म चिद्रूप असल्यामुळें मी आकाशच आहें, असें जें आपोआप जाणतें तेंच परमेष्ठित्व असून हें जग त्याचें उदर आहे. त्यामुळें वस्तुतः ब्रह्मा नाहीं व जगही उत्पन्न झालेलें नाहीं. तर हें सर्व जसेंच्या तसेंच परब्रह्मच आहे. संवित्तींत जगद्रूप असेंच भासतें, म्हणून तें मिथ्या आहे. दिसत असलें तरी खरें नव्हे. ( अर्थात् तें प्रातिभासिक आहे. ) सर्गकालापासून ही भ्रांति उदय पावली आहे. अथवा ती मुळीं उदय पावलीच नाहीं. तर सर्व अनामय ब्रह्मच आहे. जगत् हा ब्रह्मजलावरील तरंग आहे. तेव्हा त्यात द्वित्व व एकत्व कोठचें? ( अर्थात् जगत् ब्रह्माचा अनिर्वचनीय धर्म असला तरी त्यात कांहीं हानि नाहीं. ) चिद्रूप असल्यामुळेंच शांत ब्रह्म 'अहं' असा अहंकारसमष्टिरूप-भाव जाणतें आणि तेंच आतां विषयाकार होऊन भासतें.

**श्रीराम**—स्वरूप चैतन्यच जर विषयाकार होऊन भासतें तर तें सदा विद्यमान असल्यामुळें आतांच भासतें, असें म्हणण्यांत काय अर्थ आहे?

**श्रीवसिष्ठ**—खरें आहे. तथापि सर्ग व असर्ग या दृष्टींमध्यें ब्रह्म जरी

तुल्यरूपानें असलें तरी विषयांचें अस्तित्व व नास्तित्व हा फरक आहेच. यास्तव विषयांच्या सत्त्वसमयींही तेंच पर तत्त्व आहे, हें सांगण्याकरित 'आता,' असें मी म्हटलें, पण त्या महा चितीला साक्षात्कारसमयी स्वरूपानें स्फुरत असताना व अविद्येच्या योगानें 'अहं' इत्यादि स्फूर्ति होत असतांना दुसऱ्या कशाची अपेक्षा नसते. पण अविद्यादृष्टीमध्यें हें तत्त्व कळत नाहीं. तर जग मात्र दिसत असतें. विद्यादृष्टींत मात्र हें कांहींच नाहींसें होतें. अविद्या व विद्या याच्या मिश्र अवस्थेंत तें वायूचा स्पंद, चंद्राचें शैत्य, आकाशाचें शून्यत्व इत्यादिकाप्रमाणें, ब्रह्माहंभावानें चेतित होतें. ही सत्ता सर्वदा अशी आहे. ती अन्य प्रकारची कधींही नाहीं. कारण सर्व जीवांच्या संसाराचा उच्छेद केव्हा होतो हें अप्रसिद्ध आहे. ज्या अर्थी ब्रह्म आदि-अंतरहित व निरामय आहे त्या अर्थी जगही ज्ञान होईतों तसेंच आहे. पण ही मिश्रदृष्टि सुद्धा बोध होईपर्यंतच उपयोगाची आहे. त्यानंतर नाहीं. म्हणजे ती परमार्थभूत नव्हे. मिश्र दृष्टीमध्यें ब्रह्म सर्वात्मक असतें. त्या सर्वांतील एक असा जीव स्वतः ब्रह्म असून तो त्यांतील जें काहीं जाणतो तेंही ब्रह्मच होय. निर्विशेष ब्रह्मरूपानें तर कोणी केव्हांही कांहीं जाणत नाहीं. तस्मात् बद्ध पुरुषाच्या दृष्टीनें त्रिभुवनाभासरूपानें सदा ब्रह्मच भासतें व मुक्ताच्य दृष्टीनें कांहीं भासत नाहीं. पण या दोन दृष्टींतील बद्धदृष्टि बाधित होण्याजोगी असते. यास्तव तिचा त्याग करून मुक्त दृष्टीचा अंगीकार करावा. जोंवर उपदेशप्रवृत्तीची दशा असते तोंवर ( म्हणजे ज्ञान होईतों ) मिश्रदृष्टीचा अंगीकार करण्याविषयीं मी सांगितलेंच आहे. बोधानंतर शास्त्र, श्रवण, गुरु, भेद, अभेद इत्यादि काहीं नाहीं.

असो; रामा, आता अहंत्वानंतर काय होतें तें सांगतों. अहंरूप प्रजापतीच्या अस्तित्वानंतर त्याच्याच संकल्पानें आकाशसत्ता, कालसत्ता, क्रियासत्ता, दिक्सत्ता, भेदसत्ता ( तीन प्रकारच्या परिच्छेदाची सत्ता ) उदय पावते. कारण अहंकाराचा अध्यासच इतर परिच्छेदाचा हेतु आहे. उदाहरणार्थ पहा—जेव्हा याला या देहादिकात अहं असें भासतें तेव्हां देहभिन्न स्थानीं 'मी नाहीं' असेंही भासणें अगदीं साहजिक आहे. हाच देशपरिच्छेद आहे. कालपरिच्छेद व वस्तुपरिच्छेदही या अहंमुळेंच होतो.

त्यानंतर जाति, गुण इत्यादिकांच्या योगानें नामभेदाध्यास होतो. ( या वस्तूचें हें नाव, याचें हें इत्यादि. ) त्यातील अहंकाराच्या अवच्छेदामुळें प्रतिशरीरीं साक्षिचैतन्यामध्यें जरी भेद भासला तरी तें चैतन्य आवरण-शून्य असल्यामुळें त्यांत स्वाभाविक चित्‌ची अभिव्यक्ति होते व त्यात अध्यस्त जगाच्या आकारानें ब्रह्मच अब्रह्म असल्यासारखें भासतें. साराश रामा, शात ब्रह्मच जीवभावना करून आवरणशून्य साक्षिस्वरूपात विस्तृत दृश्य पाहतें. आत्मज्ञान होई तों तें आपल्या स्वरूपालाही विपरीत रूपानें पाहतें २१२.

सर्ग २१३—राम व वसिष्ठ याच्या मागच्या सवादाचें वर्णन.

श्रीवसिष्ठ—हे रामा, तूं आज मला जगत्तत्त्व व आत्मतत्त्व जसें विचारलेंस तसें पूर्वीही दुसऱ्या रामजन्मामध्यें विचारलें होतेंस. त्या जन्मातही मी तुझा गुरु व तूं माझा शिष्य होतास. पूर्वीं एका कल्पात कोण्या एका निर्जन वनात गुरु–शिष्यरूपानें आपला अगदीं असाच संवाद झाला. तूं माझ्या पुढें बसून कसा प्रश्न केलास, व मी काय उत्तर दिलें तें आतां ऐक.—

शिष्य—भगवन्, सर्व जगाविषयीं मला एक मोठा संशय आहे. त्याचें आपण निरसन करा. महा कल्पाच्या वेळीं नाश काय पावतें व कशाचा नाश होत नाहीं ?

गुरु—पुत्रा, ज्याप्रमाणें गाढ झोंपेंत शिरणाऱ्या पुरुषाचें आत्ममात्र स्वरूप अवशिष्ट राहून बाकीचें सर्व स्वप्ननगर नाश पावतें, त्याप्रमाणें सर्व जगतूही प्रलयसमयीं नाश पावतें. त्यावेळीं भूमि, पर्वत, दशदिशा, क्रिया, काल इत्यादि दुसरें कांहीं अवशिष्ट रहात नाहीं. सर्व भूतें नाश पावतात. आकाशही नष्ट होतें. कारण कोणतेंही उपलभ्य ( दृश्य ) भोग्य भोक्त्याच्या ( द्रष्टयाच्या ) अधीन असतें. पण प्रळयामध्यें भोक्ताच संभवत नाहीं. मग भोग्य आकाश कोठचें ? प्राकृत व विज्ञानजन्य प्रळयामध्यें ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, इत्यादिकांचें नाव सुद्धां रहात नाहीं. पण सर्व विवर्तांचा बाध झाल्यावर एक आधारभूत अव्यय चिद्वस्तु मात्र अवशिष्ट राहते, असें अनुमान होतें. कारण प्रलयाचा साक्षी कोणी तरी पाहिजे. त्यावांचून त्याची सिद्धि होणें शक्य नाहीं. यास्तव ज्याच्यावर हा सर्व जगदारोप

होतो त्याचा अनुभव घेणारा हा चिदात्माच त्याच्या बाधाचाही अनुभव घेत असला पाहिजे.

शिष्य—पण गुरुराज, सत् वस्तूचा अभाव व असत् वस्तूचा भाव संभवत नाहीं. तेव्हां सद्रूप जगाचा असत्तारूप नाश कसा सिद्ध होणार?

गुरु—बा शिष्या, श्रुति, प्रत्यक्ष, अनुमान, स्मृति इत्यादिकांवरून सिद्ध होणारा जगाचा नाश होत नाहीं, असें म्हणता येणें शक्य नाहीं. शिवाय या सावयव जगाचा नाश होणारच. तो होत असल्यामुळेंच जग सत् नव्हे. अर्थात् असत्चा भाव नसतो, हें न्यायपूर्ण म्हणणें आम्हास मुळींच प्रतिकूल नाहीं. जें वस्तुतः असतें तें कधींही नाश पावत नाहीं. सत असत् कसे होईल? मृगजल, चंद्राचें द्वित्व, रज्जुसर्प, इत्यादि भ्रामक पदार्थ जसे सत् नव्हेत तसें सामान्यदृष्टीनें (विवेकरहित दृष्टीनें) जग जरी दिसलें तरी तें सद्रूप आहे, असें म्हणता येत नाहीं. पुत्रा, हें सर्व दृश्य भ्रांतिमात्र आहे. तेव्हा तें शांत कसें होणार नाहीं? जसें जाग्रतींत स्वप्न व स्वप्नांत जाग्रती शांत होते त्याप्रमाणें हें सर्व शांत होणारच. भ्रामक पदार्थ अधिष्ठानाच्या साक्षात्कारानें बाधित झाल्यावर कोठें जातो व कोठें राहतो तें योग्याच्या सूक्ष्म दृष्टीलाही कळत नाहीं. यास्तव त्याचें असत्त्वच मानणें भाग आहे.

शिष्य—गुरुवर्य, दृश्य जर नाहींच तर दृश्याच्या वेषानें काहीं काल कोण भासतें? व तेंच परमार्थभूत तत्त्व साक्षात्कारानंतर का भासत नाहीं?

गुरु—शिष्या, हें चिदाकाशच जगदाकारानें चकाकत आहे. त्याचेंच हें मूर्त व अमूर्त रूप आहे, तथापि प्रतिभाससमयींही तें तत्त्व स्वरूपापासून च्युत होत नाहीं. तें प्रतिबिंबाच्या बिंबाप्रमाणें उदयास्तरहित व एक आहे. जाग्रत् व सुषुप्ति यामध्यें स्वप्नजग जसें शांत होतें तसें हें जगही बोध व प्रलय दशेंत शांत होतें. तें इतरत्र कोठें अथवा दुसऱ्या पुरुषाच्या जीवाकाशांत राहील, अशी शंका करणेंही उचित नव्हे. कारण आमचें वासनामय जग आमच्या चिदाकाशांतच असणें शक्य आहे. यास्तव बाधित दशेंतही तें इतरत्र असणें युक्त नाहीं. आमच्या अनुभवानें सिद्ध असलेला सर्ग प्रबोधानें बाधित होऊन दुसऱ्याच्या संविदाकाशांत जर शिरूं लागला तर दुसऱ्याच्या प्रबोधानें शुद्ध चिदाकाशाचें स्फुरणच होत नाहीं, असें म्हणावें लागेल. पण त्याला काहीं प्रमाण नाहीं.

शिष्य—भगवन् , आमच्या संवित्चा विषय दुसऱ्याच्या संवित्-मध्यें भासत नाहीं, असें जर असेल तर स्वप्न पाहणाऱ्या पुरुषाच्या अपेक्षेनें भिन्न असलेला जाग्रत् पुरुष जसा दृश्य पहात असतो त्याप्रमाणें प्रलयसमयींही दुसऱ्या पुरुषांमध्यें जगदादि बुद्धि असते, असें मला वाटतें.

गुरु—हे महाबुद्धिमाना, खरें आहे. जगत् हें काहीं चित्चें स्वरूप नाहीं. त्यामुळें तें सर्वांनाच एकसारखें भासत नाहीं. तर तें चैतन्याच्या ठिकाणीं आरोपिलेलें आहे. यास्तव तें भ्रांताना भासतें व इतरांना भासत नाहीं. तें सर्वांना सामान्य रीतीनें भासत नसल्यामुळेंच तुच्छ आहे, सत नव्हे, तर त्या त्या जीवाच्या चिदाकाशस्फुरणरूप आहे. तेव्हां त्यांत सत् व असत् दृष्टि कोठल्या? आता चिदाकाशरूपानें तें विद्यमान आहे, असें जर म्हणावयाचें असेल तर तें जग सर्व प्रकारें सर्वदा आहेच. स्वरूपतः ( जगदाकारानें ) मात्र तें केव्हाही कोणीही नाहीं. जसें ब्रह्म अनिर्वचनीय तसेंच तेंही अनिर्वचनीय. जसें चिदाकाश अविनाशी तसेंच तेंही नाश न पावणारें आहे. चिदाकाशच सर्व आहे. पण त्याचें ज्ञान न झाल्यास तेंच दुःखदायक होत असून ज्ञान होताच स्वतः सुखमय होतें. ज्ञानी व अज्ञानी याच्या बोधाबोधांच्या अनुरोधानें तें सर्वदा आहे व नाहींही. हा महादेवच घट, पट, पर्वत, तृण, जंगम व सर्व स्थावर आहे. आहे, नाहीं, क्रिया, काल, शून्य, आकाश, पृथ्वी, जन्म, नाश, शुभ, अशुभ इत्यादि सर्व आहे. ब्रह्मभावानें पाहिलें असता तृण, घट, पट, इत्यादि प्रत्येक पदार्थ कर्ता, भोक्ता व विभु सर्वेश्वर होतो. दृक्शक्तिच कर्ता, भोक्ता व सर्वेश्वर आहे. ती सर्वत्र प्रत्यगात्मरूपानें स्थित आहे. वस्तूंचे क्षयोदयही ती आत्मवस्तुच आहे. ज्यांच्या मतीं बाह्य पदार्थ आहे, त्यांचा तोच कर्ता व भोक्ता. ज्याना नुस्तें विज्ञानमात्र आहे, असें वाटतें, त्यांचा तें विज्ञानच कर्ता व भोक्ता. शून्यवाद्याना मुळीं कर्ताही नको, व भोक्ताही नको. पाशुपतादिक ईश्वरालाच कर्ता व भोक्ता समजतात. तात्पर्य वाद्यांच्या या सर्व कल्पना त्या सर्वशक्तिमान् व सर्वात्मक पदीं संभवतात. त्या पदामध्यें या वाद्यांच्या परस्परविलक्षण पदार्थ-प्रक्रिया, साधनानुष्ठान, फल इत्यादि विधि, परस्परांनीं केलेले त्याचे प्रति-षेध इत्यादि सर्व कांहींएक विरोध न येतां संभवतात. कारण त्यांच्या

त्याच्या बुद्ध्यवच्छिन्न चैतन्यांत वरशापांप्रमाणें स्वसंकल्पानुसार व्यवस्थित विवर्त संभवनीय आहे. ठिक–ठिकाणीं चिदाकाश आपल्या शुद्ध स्वरूपात वासनानुसार दृश्यतेचीशी भावना करीत, द्रष्ट्यासारखेंसें होऊन आपल्याच रूपांत तसलें जगत् पाहते. तथापि तें स्वतः त्यावेळींही निर्विकार राहूं शकतें. हे रामा, सर्व जीवाच्या आपापल्या अनुभवानें सिद्ध असलेल्या पदार्थदृष्टि व परस्पर विलक्षण विधिनिषेधदृष्टि, ज्या अर्थीं त्याचे त्याचे संकल्प, वेदन, अनुभवजन्य वासना, काम व कर्म इत्यादिकांनीं युक्त असतात त्याअर्थीं त्या तेवढ्या त्या वेळेपुरत्या अर्थक्रियासमर्थ असल्यामुळें सत्य असतात. पण इतरांच्या दृष्टीनें त्याची प्रतीतिच येत नसल्यामुळें असत् होत. कारण प्रत्यगात्म्याचें रूप अनुभवानुसारच जगद्रूप धारण करीत असतें.

असो; राघवा, पूर्व कल्पात तूं शिष्य होऊन मज गुरूपासून हा अशा प्रकारचा उपदेश ऐकला होतास. पण त्यावेळीं तुला साक्षात्कार झाला नाहीं. त्यामुळेंच तूं पुनः हा जन्म घेऊन आता या त्रेतायुगात दशरथाच्या येथें झालेला आहेस, व पूर्वीं जें विचारलें होतेंस तेच फिरून विचारीत आहेस. आता तुला माझ्या उपदेशामुळें शुद्ध ज्ञान झालें आहे. त्यामुळें तूं आतां अभ्युदयवान् झाला आहेस. यास्तव आता आपल्या शुद्ध बोधापासून न ढळतां तूं व्यवहारपरंपराप्राप्त राज्यपरिपालनादि कार्य कर. हे रामा, तूं विमलस्वभाव स्वप्रकाश सर्वात्मक आत्म्यामध्यें सर्व दृश्यपदार्थांपासून मुक्त होऊन निर्वाण, निरतिशयानदात मग्न, शातचित्त व मनोहरस्वभावानें रहा. धर्मानें राज्याचें रक्षण कर २१३.

**सर्ग २१४**—उपदेशाची प्रशंसा, श्रोत्यांची कृतकृत्यता, देवांचा व मानवांचा महोत्सव.

**श्रीवाल्मीकि**—मुनि वसिष्ठ इतकें बोलून थांबत आहे तों आकाशातून अमृतानें भरलेल्या मेघाच्या गडगडाटाप्रमाणें देवांची दुंदुभि वाजूं लागली. सर्व दिशांचीं मुखें शुभ्र करीत तुषारवृष्टीप्रमाणें पुष्पवृष्टि पडली. ती वृष्टि स्वर्गातून उत्सवदर्शनार्थ भूलोकीं उतरलेल्या पुण्यलक्ष्मीसारखी दिसली. त्या दिव्य पुष्पवृष्टीनें सभास्थान भरून गेलें. उचित स्थानीं बसलेल्या सभ्यांनीं तीं दिव्य पुष्पें वसिष्ठांच्या चरणावर अर्पण केलीं व त्यांस मोठ्या भक्तीनें नमस्कार करून पुष्पांचा वास, शैत्य इत्यादि

संपर्कामुळें दुर्गंध, घाम इत्यादिकांपासून होणारा त्रास, रोग, क्षुधा, तृषा, इत्यादिकामुळें होणारे कष्ट व जन्म मरण इत्यादिकांमुळें होणारें दुःख या सर्वांचा त्याग केला.

**दशरथ**--अहाहा काय चमत्कार आहे ! या संसारसंज्ञक दीर्घ अरण्यात फिरतां फिरता आम्ही दीर्घ कालापासून श्रांत झालों होतों, पण भगवन्, आज तुमच्या या उत्तम उपदेशानें आत्मनिष्ठ होऊन त्यांतच दीर्घ विश्रांति घेत आहों. पुरुषार्थासाठीं अवश्य कर्तव्य असलेल्या कर्मांची व साधनाची आता पूर्ति झाली आहे. आपत्तींची परमावधि ( ब्रह्म ) आम्ही पाहिली. सर्व ज्ञेय ज्ञात झालें, व आता परम पदीं विश्रांति पावलों आहों. कल्पनेनें बनविलेल्या आकाशात दीर्घकाल विहार, धारणेनें आत्मविश्रांति पावून देहत्याग, सकल्पनिर्मित जगापासून होणारा ज्वर, स्वप्नातील स्वतःचें मरण, वायु व स्पंद, जल व द्रवत्व इत्यादिकाचें अनन्यत्व, शिंपीवर भासणाऱ्या रुप्याचा अनुभव, इंद्रजाल, गंधर्वनगर, मायेनें दाखविलेले जलपूर, प्रलयातील आपत्ति, विवेकभ्रंशामुळें भासणारे मिथ्या पदार्थ, खोटेच भूकंप, बालाना दिसणारे यक्ष, डोळ्यापुढें दिसणारे कुरळे केस, व असेच आणखीं दुसरेही स्वानुभव देणारे दृष्टान्त याच्या योगानें आपण माझी दृश्यदृष्टि सर्वथा घालविली आहे.

**श्रीराम**—हे मुनीश्वरा, माझा मोह नष्ट झाला. मी आता तुमच्या प्रसादानें परम पदास प्राप्त झालों आहें. मी आता सत्य ब्रह्मच झालों आहें. माझी बुद्धि आता अत्यंत शुद्ध झाली आहे. मी आता निःसंदेह होऊन स्वभावभूत ब्रह्मामध्यें स्थित आहें. माझें विज्ञान आतां अज्ञानावरणशून्य झालें आहे. भगवन्, यापुढें मी तुमच्या आज्ञेप्रमाणें चालेन. अमृतवृष्टीप्रमाणें सुख देणारें हें तुमचें वचन पुनः पुनः आठवून मी हर्षविषादशून्य झालेलों असलों तरी पुनः पुनः हृष्ट होतों. मला कर्तव्य व अकर्तव्य याच्या योगानें जरी कांहीं साधावयाचें नसलें तरी मी पूर्वीप्रमाणेंच यापुढेंही व्यवहार करीत राहणार. मला व्यवहारामुळें अवश्य भासणारा संतापही होणार नाहीं. आपल्या उपदेशापासून जसा विश्रांतीचा उपाय सांपडला आहे तसा दुसरा उपाय किंवा दुसरी दृष्टि कोणती असणार ! अहाहा मला अमर्याद विश्रांतिभूमि सांपडली आहे. हर हर ! प्राण्यांना ही संसारदशा किती

कष्टकर होत आहे. ती जन्म-मरणादि अनेक अनर्थांनीं व्याप्त आहे. मला मुळीं दुःखाचें कांहीं निमित्तच नाहीं. शत्रु, मित्र, शरीर, दुर्जन, सुजन इत्यादि मला कोणी नाहीं. ही आत्माचित्च जोंवर अज्ञात असते तोंवर क्षुब्ध होऊन दुःखद जग बनते. पण आता तिचा चांगला बोध झालेला असल्यामुळें तीच शांत व सर्व पदार्थाकारानें सुंदर झाली आहे. हे भगवन्, आपल्या अनुग्रहाशिवाय ही दृष्टि लोकाना कशी प्राप्त होईल ?

**लक्ष्मण**—जन्मांतरीं केलेल्या अनेक दुष्कर्मांच्या वासनांमुळें उत्पन्न होणाऱ्या संशयांचें निरसन होऊन पूर्व-पुण्य-बलानेंच लाधलेल्या या मुनि-वचनाच्या श्रवणानें माझें मन विचार करावयास तयार झालें व आज तर त्यांत परम आह्लाद देणारा परमात्म्याचा प्रकाश पडला आहे. भगवन्, आपल्यासारख्याच्या उपदेशानें असली निरतिशयानंद प्रकाशरूप आत्मदृष्टि साक्षात् ज्ञात होण्यासारखी असतानाही हे सर्व जन आपल्याच दुर्भाग्यामुळें महात्म्याची सेवा, त्याच्या वचनाचें श्रवण इत्यादि-कांपासून पराङ्मुख होऊन राग, द्वेष, अहंकार, जरा, जन्म, मरण, इत्यादि शेकडों दोषदशांच्या योगानें काष्ठाप्रमाणें जळत राहतात !

**श्रीविश्वामित्र**—खरोखर आम्ही आज या मुनींच्या मुखांतून हें मोठें पुण्यच ऐकलें. त्याच्या योगानें गंगास्नानें केल्याप्रमाणें आम्हाला हर्ष होत आहे.

**श्रीराम**—सर्व उत्कर्षांची पराकाष्ठा आत्मा आहे. कारण तो निरतिश-यानंद आहे. सर्वदृष्टींची पराकाष्ठाही आत्मदृष्टिच आहे. कारण एका आत्म्याचें ज्ञान झाल्यानें सर्व ज्ञान होते. अध्यात्मशास्त्र हें शेवटचें प्रमाण असल्यामुळें सर्व शास्त्राची सीमा आहे. पुत्र, पशु, धन इत्यादिकांच्या नाशरूप आपत्तींची अवधि सर्व संसारनाश आहे. कारण त्याचा एकदां नाश झाला म्हणजे आणखीं दुसरा नाश व्हावयाचा रहातच नाहीं. काव्यरस, अलंकार इत्यादिकांनीं शोभणाऱ्या वाणींची सीमाही भगवान् वसिष्ठांची वाणी आहे. प्रासाद, आराम, पर्वत, नदी, पुलिन इत्यादि दृष्ट विश्रांतिस्थानाचा परम-अवधि परमात्मदेश आहे. कारण तो परम विश्रांतीचा हेतु होतो. अथवा सर्वांची पराकाष्ठा तो उत्तम देवच आहे. मीं त्याला पाहिलें.

**नारद**—जें ब्रह्मलोकीं, स्वर्गांत व भूतलींही आजवर कधं ऐकलें नाहीं तें ज्ञान आज ऐकून माझे कान पवित्र झाले आहेत.

**लक्ष्मण**—मुने, बाहेरील व हृदयांतील अज्ञान घालविणाऱ्या आपण आपलें उत्कृष्ट सूर्यत्व आज आम्हास दाखविलें आहे.

**शत्रुघ्न**—मी सुखी, शांत व दीर्घकालानें आज तृप्त झालों आहें. मी परमपदास प्राप्त झालों आहें. आतां केवळ सुखानें रहात आहें.

**दशरथ**—आमच्या अनेक जन्मांतील पुण्याच्या प्रभावानेंच या धीमान् मुनिवर्यानें आम्हांला पावन करणारा हा उपदेश केला.

**श्रीवाल्मीकि**—मुने, ते सर्व सभासद व राजपुत्र राजा दशरथाशीं असें बोलत असतांना भगवान् वसिष्ठ आपल्या पावन वाणीने म्हणाला, "राजा दशरथा, आता मी सांगतों तसें कर. कोणत्याही इतिहासाची कथा समाप्त झाली असता ब्राह्मणांचें पूजन करावें, असा शास्त्रनियम आहे. यास्तव तूं आज अनेक ब्राह्मणांच्या इच्छा पूर्ण कर, म्हणजे या शास्त्रश्रवणाचें उत्तम फल तुला प्राप्त होईल. मोक्षोपायकथा समाप्त झाली असता दरिद्रानेंही यथाशक्ति ब्राह्मणाचें पूजन करावें, असें आहे. मग तुझ्यासारख्या राजाविषयीं काय सांगावें?"

मुनीचें हें वचन ऐकून राजानें निरनिराळ्या देशच्या सहस्रावधि वेदवेत्त्या आचारसंपन्न व कुलीन ब्राह्मणांना बोलावून आणलें. त्यांची उत्तम प्रकारें पूजा केली. त्यांच्या योग्यतेप्रमाणें क्रमानें सर्वांस भोजन घातलें. त्यांच्या त्या महोत्सवांत त्यावेळीं दहा सहस्र उत्तम ब्राह्मण जेवले. त्यांना त्या समर्थानें इष्ट भोजन, दान, दक्षिणा इत्यादि देऊन तृप्त केलें. पितरांना उद्देशून श्राद्धें केलीं. देवांना उद्देशून पुष्पादिकांचे उपहार, व इष्टि इत्यादि केलें. राजांना वाहनें, रत्नें, इत्यादि दिलीं. नागरिकजन, अमात्य, भृत्य, दीन, अंध, दरिद्र इत्यादि सर्वांना विविध देणग्यांच्या योगानें तृप्त करून राजा दशरथ सुहृदांसह उत्सव करिता झाला. ज्याच्या संसाराचा अंत झाला आहे अशा राजानें आपलें गृह सुवर्ण व रत्नें यानीं भूषित केलें. सर्व नगर सुशोभित करविलें. मत्तकामिनी व विलासिनी स्त्रिया प्रतिगृहीं उत्सवामुळें नाचूं लागल्या. वेदपाठी ब्राह्मणानीं पारायणें केलीं. शास्त्रज्ञांनीं शास्त्रांच्या आवृत्त्या केल्या. स्तुतिपाठक राजाची स्तुति करीत सुटले. नागरिकांनीं उत्तम वस्त्रें व वेष यांच्या योगानें आपल्या शरीरास भूषित केलें. व्यसनी जनांनीं द्यूत व पान; कलावानांनीं गायन

व नृत्य; आणि इतरांनीं विविध क्रीडा केल्या. जे भोजनार्थी होते त्यांनीं भोजन केलें. सर्वांनीं आपापल्या घरांना नवा रंग लाविला. पुष्पहार, उट्या इत्यादिकाच्या योगानें राम व लक्ष्मण यांचे देह चंद्रासारखे शोभूं लागले. राजाचे दास, दासी इत्यादि सर्व भृत्य उत्तम वेष करून आनंदानें राजकार्यें करूं लागले. नर्तकी स्त्रिया आपापल्या अंगयष्टीस चदनादिकाच्या योगानें भूषित करून रंगस्थानीं प्राप्त झाल्या. सारांश, दशरथ राजा अक्षय ब्रह्मपदास प्राप्त होऊन व बोधसूर्यानें कृष्णपक्षांतील रात्रीचा नाश करून मोठ्या हर्षानें सात दिवस असा मोठा उत्सव करता झाला २१४.

**सर्ग २१५**—वाल्मीकिमुनि भरद्वाजास रामाप्रमाणें तूंही जीवन्मुक्त व सुखी होऊन रहा, असें सांगतात.

**श्रीवाल्मीकि**—हे माझ्या शिष्या भरद्वाजा, याप्रमाणें रामादिक ज्ञेयास साक्षात् जाणून निःशोकतेस प्राप्त झाले. तूंही याच सुंदर दृष्टीचा आश्रय करून निःस्नेह, निःशंक, जीवन्मुक्त व शांतबुद्धि हो. मी सांगितलेलें हें ज्ञान दुःसंग, भोगासक्तीचा अभ्यास इत्यादिकाच्या योगानें नाश न पावेल, असें कर. त्याचें रक्षण कर. असो; याप्रमाणें हे सर्व महा बुद्धिमान् राघवादि राजपुत्र व दशरथादिक राजे जीवन्मुक्त पदास प्राप्त झाले. बा पुत्रा, तूं तर रामाप्रमाणें स्वतःच विचारानें मुक्त झाला आहेस. खरोखर ही मोक्षसंहिता ऐकून तूं अतिशय मुक्त झालेला आहेस. हे पुण्यकारक व प्रत्यक्ष अनुभव देणारे मोक्षोपाय ऐकून बालकसुद्धा जर तत्त्वज्ञ होतो तर तुझ्यासारख्याची काय कथा? वसिष्ठांच्या वाक्यांचें श्रवण करून रघुवंशज जसे अनादि पदास प्राप्त झाले व शोकरहित बनले त्याप्रमाणें बा साधो, प्रत्येकानें शोकरहित व्हावें. उत्तम शिक्षण, सेवा, प्रश्न, इत्यादि उपायांनीं व संताच्या सहवासानें ज्ञान प्राप्त होतें. मोक्षकथेचा विचार केला असतां तृष्णारज्जूंच्या हृदयस्थ ग्रंथी भराभर सुटून जाऊन सर्व मानव, बाल्यावस्थेंत भर्त्याविषयीं अप्रेम असलें तरी प्रौढ झाल्यावर स्त्रिया जशा तदेकरस होतात त्याप्रमाणें, सर्व भूताशीं ऐक्य पावतात. हे पुत्रा भरद्वाजा, मंद अधिकाऱ्यांनींही वारंवार श्रवण केल्यास त्यांच्या अज्ञानाचा नाश करण्यास समर्थ असलेले हे महा प्रभावशाली मोक्षोपाय गुरुमुखानें श्रवण करून जे जाणतात ते तत्त्वज्ञांतील

वरिष्ठ होऊन पुनः संसारांत येत नाहींत. हें मी तुला थोडक्यांत सर्व उपदेशाचें रहस्य सांगितलें आहे. उगीच पुष्कळ सांगून काय करावयाचें आहे ? जे बहुश्रुत सज्जन या शास्त्राचा चांगला विचार करून संप्रदायास न सोडतां त्याचा इतरांस उपदेश करितात ते पुनः बालभावास प्राप्त होत नाहींत. जे निरपेक्ष बुद्धीनें हें शास्त्र दुसऱ्याकडून अर्थावाचूनही नुस्तें वाचवितील, लिहवितील, व याचें उत्तम प्रदेशीं व्याख्यान करवितील त्याना राजसूयाचें फळ वारवार मिळेल. ते अनेकदा स्वर्गसुख भोगून शेवटीं त्याविषयींही विरक्त होत्साते मुक्त होतील. त्याना उत्तम जन्म, सच्छास्त्र, सद्गुरु इत्यादिकांचा लाभ आपोआप होईल. कारण पूर्वी मीं केलेल्या या मोक्षमय सुसंहितेचा अचिंत्यरूप बिरंचीनें मुनींच्या समाजात आरंभापासून शेवटपर्यंत विचार करून असें म्हटलें; " सत्य भाषण करणाऱ्या वाल्मीकीचें, वसिष्ठाचें व माझें वचन असत्य होणार नाहीं. "

असो, हा मोक्षोपायकथाचा प्रबंध समाप्त झाला असतां सुबुद्धिमानानें गृह, अन्न, वस्त्र, धन इत्यादिकाचें दान सत्पात्र ब्राह्मणास अवश्य देऊन त्यांचें पूजन करावें. आपल्या धनांतील इष्ट पदार्थ योग्य ब्राह्मणास द्यावा. वेदवेत्त्याना उचित दक्षिणा द्यावी. कर्त्याला स्वतः केलेल्या पुण्याचें फळ अवश्य प्राप्त होतें, या गोष्टीचा विचार करून हें सर्व करावें. भरद्वाजा, तुझ्या बोधाकरिता शेकडों कथा, दृष्टान्त, युक्त्या इत्यादिकांनीं अतिशय पूज्य झालेलें हें शास्त्र मी तुला सांगितलें. हें ऐकून, जीवदवस्थेतच मुक्त होऊन, लोकानुग्रहार्थ ज्ञान, तप, क्रिया इत्यादि करून व प्रारब्धभोग आणि सत्कर्मफलभूत अक्षय योगज्ञानसिद्धिलक्ष्मी भोगून तूं सदेह व विदेह दशेंत सुद्धा नित्य निरतिशयानंद मुक्तीचा अनुभव घे २१५.

**सर्ग २१६—अरिष्टनेमि, सुरुचि व कारुण्य यांची कृतार्थता व शिष्यांचें गुरूस आत्मनिवेदन.**

**श्रीवाल्मीकि**—हे राजन्, वसिष्ठांचें हें सुभाषण मी तुला सांगितलें आहे. या तत्त्वमार्गानें तूं त्या पदास खचित प्राप्त होशील.

**राजा**—भगवन्, आपली दृष्टि भवबंधांस तोडून टाकणारी आहे. तिच्या योगानें आपण मजकडे पाहिल्यामुळें मी भवसागरांतून पार पडलों आहें.

**देवदूत**—असें बोलून तो विस्मित राजा आपल्या नम्रवाणीनें मला असें मधुर वचन बोलला,–" हे देवदूता, तुला नमस्कार असो. हे विभो, तुझें कुशल असो. सात शब्द परस्पर बोलल्यानेंच सज्जनांचा स्नेह जमत असतो, हें म्हणणें आज तू सत्य केलेंस. आता तूं इन्द्र-नगर जा. तुझें कल्याण असो. या कथा-श्रवणानें मी आनंदपूर्ण झालों आहे. आतां ऐकलेल्या शास्त्रार्थाचाच विचार करीत मी येथें सुखानें राहतों. " हे अप्सरे, त्या अरिष्टनेमि राजानें असें सांगितलें असता मला मोठा विस्मय वाटला. पूर्वी कधींही न ऐकलेलें हें ज्ञानसार मला सत्संगामुळें ऐकावयास सांपडलें. त्यामुळें मी आतल्या आंत अतिशय मुदित झालों. नंतर भगवान् वाल्मीकीला विचारून मीं परत निघालों व येथें मार्गांत तुझी-माझी गाठ पडली. हे निष्पापे, तू विचारलेलें सर्व मी तुला सांगितलें आहे. आता मी इंद्र-भवनास जातों.

**अप्सरा**--हे महाउदारा देवदूता, तुला नमस्कार असो. तूं सांगितलेल्या या अर्थविज्ञानामुळें मी अतिशय तृप्त झालें आहें. मी कृतार्थ व शोकशून्य झालें आहें. आतां मी आनंदानें काल घालवीन. तूं जा. तुझें कल्याण होवो.

**अग्निवेश्य**—त्यानंतर ती सुरुचि अप्सरा, त्याच शास्त्रार्थाचें चिंतन करीत हिमालयाच्या पृष्ठभागीं राहिली. बा पुत्रा कारुण्या, हा वसिष्ठाचा उपदेश तूं ऐकलास का ? आता त्या सर्वांचा निश्चय करून आपल्या इच्छेप्रमाणें कर.

**कारुण्य**—भगवन्, स्मृति, वाणी, दृष्टि, सत्ता इत्यादि सर्व संसार-स्थिति मला ज्ञानामुळें आता स्वप्नातील पदार्थ, वंध्यापुत्र, मृगजल इत्यादि-कासारखी झाली आहे. मला आतां कांहीं संशय उरलेला नाहीं. मला कर्मानुष्ठान करून अथवा सोडून कांहीं मिळवावयाचें नाहीं. मी आतां प्राप्त होईल त्या स्थितींत राहीन. मला अकर्माविषयींच आग्रह धरून काय करावयाचें आहे ?

**अगस्ति**—असें बोलून अग्निवेश्याचा कृतकृत्य पुत्र कारुण्य प्राप्त कर्म करीत राहिला. उचितसमयीं तो स्नान–दान–अग्निहोत्रादि कर्में करीत असे. यास्तव बा सुतीक्ष्णा, ज्ञानानंतर केलेलें कर्म बंधास कारण होईल

अशी शंका घेऊं नये. संशयामुळें मानव स्वार्थापासून भ्रंश पावत असतो. कारण संशयवान् नाश पावतो, असें सांगितलेलें आहे.

मुनीचें हें ऐक्यबोधक वाक्य ऐकून सुतीक्ष्ण विनयानें गुरूस नमस्कार करून म्हणाला,–" माझें अज्ञान व अज्ञानाचें कार्य नष्ट झालें. मला उत्तम ज्ञान प्राप्त झालें आहे. सर्वसाक्षी परमात्मा नित्य स्वयंप्रकाशमान होत असल्यामुळेंच, नाटकगृहातील दीपाच्या प्रकाशानें चालणाऱ्या नटांच्या नृत्यादि क्रियाप्रमाणें, मनाच्या सर्व लौकिक व वैदिक क्रिया प्रवृत्त होतात. जसे सोन्यापासून अलकार व जलापासून तरग त्याप्रमाणें ज्याच्यापासून हें सर्व दृश्य उद्भवतें, तें हें सर्व पूर्ण जग असून तें पूर्णात राहिलें आहे. असो; आता मी प्राप्त कर्तव्य करीत राहतों. कारण सद्वचनाचें उल्लंघन कोण करणार ? भगवन्, आपल्या प्रसादानें मला सर्व ज्ञेय कळलें आहे. मी आतां कृतार्थ होऊन राहिलों आहें. आपणास माझा साष्टांग नमस्कार असो. शिष्य दुसऱ्या कोणत्या कर्मानें गुरूच्या ऋणातून मुक्त होणार ? यास्तव शिष्यानीं शरीर, वाणी व मन यांच्या योगानें गुरूस आत्मनिवेदन करावें. त्यांच्या ऋणातून मुक्त होण्याचा हाच उपाय आहे. हे स्वामिन्, आपल्या अवर्णनीय अनुग्रहानें मी भवसागरातून पार पडून पूर्णानंदानें सर्व जगाला भरून सोडून राहिलों आहें, यांत कांहीं संशय नाहीं. सामवेदात–हें सर्व ब्रह्मापासूनच उत्पन्न, त्याच्या आधारानेंच स्थित व त्यातच लय पावत असल्यामुळें सव ब्रह्म आहे,– असें ज्याचें स्पष्ट वर्णन केलें आहे–त्या प्रत्यक्चिदानंदघनास नमस्कार असो. ब्रह्मानंद, परमसुखद, केवल ज्ञानमूर्ति, द्वंद्वातीत, आकाशतुल्य, महावाक्यांचा लक्ष्य, एक, नित्य, विमल, अचल, सर्व बुद्धिसाक्षिभूत, भावातीत व त्रिगुणरहित अशा सर्वश्रेष्ठ वसिष्ठाख्य आत्म्यास आमचा नमस्कार असो २१६.

इति श्रीशंकराचार्यभक्तविष्णुकृत श्रीबृहद्योगवासिष्ठसाराच्या सहाव्या निर्वाण-प्रकरणाचा उत्तरार्ध समाप्त झाला ६.

**येथें हा महाग्रंथही समाप्त झाला.**

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**

# परिशिष्ट १.

## बृहद्योगवासिष्ठाचा मथितार्थ.

श्रीवाल्मीकि मुनींनी योगवासिष्ठाला उत्तर रामायण असे म्हटले आहे ब्रह्मदेवाच्या प्रेरणेनें भरद्वाजशिष्यास सांगितलेलें तेंच इंद्राच्या प्रार्थनेने त्यानी अरिष्टनेमि राजाला पुन. सांगितलें. त्यावेळी राजाबरोबर आलेला इंद्राचा अनुचर देवदूत तेथें होताच त्याने लक्षपूर्वक ऐकलेले ते एका सुरुचिनावाच्या अप्सरेला निवेदन केलें अग्निवेश्याने त्याच इतिहासाचा बोध आपल्या कारुण्यनामक पुत्रास केला व शेवटी मुनि अगस्त्याने तेच हे उत्तर रामायण अथवा योगवासिष्ठ आपल्या सुतीक्ष्ण नावाच्या शिष्याला उपदेशिले अर्थात् याची अशी आनि शुद्ध परपरा आहे

योगवासिष्ठ हा अद्वैत वेदान्ताचा प्रकरणग्रथ आहे. शास्त्रप्रमेयाच्या एकदेशाशी सबद्ध असलेल्या फलवद्ग्रथाला प्रकरण म्हणावे, अशी जरी आमची परिभाषा आहे तरी प्रस्तुत ग्रथ वेदान्तशास्त्राच्या सकल प्रमेयाचे सागोपाग प्रतिपादन करीत असतो यास्तव हे वेदान्तशास्त्रच आहे, असे म्हणण्यास फारसा प्रत्यवाय नाही, हे जरी खरें असले तरी याला तसे म्हणण्याचा परिपाठ नाही कारण प्रमाणभूत अपौरुषेय उपनिषदें व त्याच्या अर्थसिद्ध्यर्थ व्यास, वाल्मीकिप्रभृति मुनि व गौडाचार्यादि आचार्य यानी रचलेले सूत्र–आख्यान–कारिका-भाष्यादि तदुपकारक ग्रथ यास वेदान्तशास्त्र म्हणून त्यातील प्रत्येकास प्रकरण म्हणण्याचा परिपाठ आहे पण त्यातल्या त्यात अधिक शास्त्रीय रीतीने बोलावयाचे झाल्यास ‘ ब्रह्मसूत्र ’ हेच वेदान्तशास्त्र असून उपनिषदादि बाकीचे सर्व ग्रथ ही त्याची प्रकरणे आहेत यास्तव सकल प्रमेयाचे प्रतिपादन करणारेही योगवासिष्ठ ‘ वेदान्त प्रकरण ’ आहे, असेच समजणे सयुक्तिक होय

योगवासिष्ठाचे पहिले वैराग्य प्रकरण आहे त्यात–वैराग्याचें निमित्त दुःख आहे, मानसिक पीडा ( आधि ) आहे, दु खावाचून, मग ते त्रिविध दुःखातील कोणतेही असो, जन्म व ससार याचा कटाळा येणे, विषयाविषयी वितृष्णा उद्भवणे, शक्य नाही–हे सुचविले आहे वासनाक्षय हेच मुक्तीचें साधन आहे, असे प्रतिपादन करून भगवान् वाल्मीकींनी रामाच्या यात्रेची जी योजना केली आहे ती त्या राजपुत्रानें यात्राप्रसगी ससाराचे विविध आपातरमणीय भाव पाहून त्याविषयी विचार करावा व विरक्त व्हावें म्हणूनच होय. ऐहिक सुखात निमग्न असलेल्या रामासारख्या भाग्यशाली राजपुत्राला विषयाचे दोष स्पष्ट दिसल्यावाचून त्याविषयी विरक्ति येणे मुळीच शक्य नव्हतें. तीर्थयात्राप्रसगाने अनेक पुण्य तीर्थाचे स्नान व तीर्थभूत महात्म्याचें दर्शन घडून राघवाचें अगोदरच सात्त्विक असलेलें चित्त अधिकच सात्त्विक व त्यामुळेच रजस्तमोमलरहित झाले. तें विक्षेपशून्य

होताच निर्मल स्फटिकातील प्रतिबिंबाप्रमाणें त्यात शुद्ध विवेक उदय पावला विवेक हा सूर्याहूनही अधिक प्रभावशाली असल्यामुळें त्याने विवेकविकल बुद्धीला गोचर न होणारे विषयातील दोषही प्रकट केले व दोषदर्शन हेच वैराग्याचें उत्थापक निमित्त असल्यामुळें राजपुत्राच्या चित्तात ते पूर्णपणे बाणले वैराग्याचेही मद, तीव्र व तीव्रतर असे तीन प्रकार असून मद वैराग्याचा फारसा दृष्ट उपयोग होत नाही तीव्र वैराग्य पुरुषाला विवेकोन्मुख करितें व तीव्रतर त्याला ज्ञानाची योग्यता देतें पूर्वजन्मार्जित पापाच्या प्राबल्याने मद वैराग्य इधनरहित अग्नीप्रमाणे उत्तरोत्तर क्षीण होत नाश पावतें. राम, हा शापवशात् भगवान् विष्णूचाच अवतार असल्यामुळे आम्हा प्रकृतिगुणवश मानवाप्रमाणे त्याच्या स्वभावात दुरितमल नव्हता त्यामुळें आगतुक दोष यात्राजन्य सुकृताने नाहीसे होताच विवेकाचा उद्भव होऊन कल्पनातीत तीव्र वैराग्य त्याच्यामध्ये उद्भवले

आपल्या राजधानीस परत आल्यावर तो या ससारातील अनेक भावाचा विवेचक बुद्धीनें विचार करू लागला तेव्हा त्याला सर्व भाव अनित्य आहेत, असें वाटले प्रत्येक क्षणी अनुभवास येऊन अनुकूल असल्यास सुख व प्रतिकूल असल्यास दुःख देणारे हे जग स्थिर आहे, तें कधीही नाश पावणार नाही, त्यातील सर्व पदार्थच सर्व ससाराचें सार आहे, असें जोवर वाटतें तोंवर त्याविषयी विरक्ति येणे शक्य नसते व विरक्तिवाचून ज्ञान होत नाही यास्तव जग तुच्छ आहे, शून्य आहे, दुःखद आहे, अनित्य आहे इत्यादि भावना दृढ होऊन विषयवैराग्य स्थिर होताच रामाची वृत्ति काही चमत्कारिक झाली दिनचर्या अनियमितपणे व अनिच्छेने होऊ लागली तो समोर आलेल्या प्रत्येक वस्तूचे गुण–दोष अगोदर पहात असे यामुळें तो विवेकीही इतराना भ्रांतिकटासारखा किंवा मूढासारखा भासला त्याची ती अपर्व अवस्था पाहून त्याच्या आईबापाना व इतर हितेच्छूनाही मोठी चिंता लागली व त्याना राघवाच्या स्वास्थ्याचा काहीच उपाय सुचेनासा झाला इतक्यात विश्वामित्र मुनि यज्ञसरक्षणाकरिता रामाला मागावयास आला दशरथानें पुत्राची दुःखद दशा त्याला सांगितली व त्याच्याच आग्रहावरून राजाने रामाला सभेंत आणविलें

सभेत आल्यावर मुनि विश्वामित्राने रामाला त्याच्या अस्वास्थ्याचें कारण विचारलें व त्याच्या सांगण्यावरून ती व्याधि नसून परमफल देणारी विरक्ति आहे, असे त्यांना कळले. रामानें आपल्या विवेचक बुद्धीनें जगातील सर्व वस्तूंचें सूक्ष्मतत्त्व जाणून भोगांचे दुःखरूपत्व व सपत्तीचें अनर्थत्व राजसभेत व्यक्त केलें मूर्ख जीविताची निंदा, अहंकाराचा धिक्कार, चित्ताचे दोष, तृष्णेची निंदा, शरीराची निंदा, बाल्याची निंदा, तारुण्याची निंदा, स्त्रीनिंदा, जरेची निंदा, कालाचे वर्णन, कालाचे विलास, कृतांताचे विलसित, दैवाचा खेळ, पुरुषार्थाच्या विरोधी भावाची निंदा इत्यादि सविस्तर वर्णून त्याने तत्त्वोपदेश करण्याविषयी प्रार्थना केली. विश्वामित्रानेंही त्यांचें कडकडीत वैराग्य व

दृढनिश्चय पाहून, आकाशचर सिद्धादिक व भूलोकचे श्रेष्ठ मुनि सभेंत आले असता, त्यानी केलेली रामाची प्रशसा ऐकून, त्याला उपदेश करण्याविषयी रघुकुलाच्या गुरूची म्हणजे भगवान् वसिष्ठाची प्रार्थना केली रामाला 'तशी अवस्था व्यासपुत्र शुका-सारखीच अगदी हुबेहुब आहे,' असे सांगून त्या गाधिपुत्राने दशरथसुताला चित्त स्थिर करून गुरूचा उपदेश ऐकण्याविषयी सुचविलें

नतर वसिष्ठानी पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें वारंवार होणाऱ्या सर्गाचें सविस्तर वर्णन करून शास्त्रीय पौरुषाची प्रशंसा केली शास्त्रीय पुरुषयत्नास पौरुष म्हणतात. पुरुषाची स्वाभाविक प्रवृत्ति अशास्त्रीय असते अथवा सर्वप्राणिसाधारण, अशा प्रवृत्तीला प्रतिबध करण्यासाठीच शास्त्रीय पुरुषयत्न अस्तित्वात आलेला असतो. अशास्त्रीय पौरुषयत्नानें जीवाचे जीवत्व उत्तरोत्तर दृढ होत जाऊन त्याला हा संसारही आपल्यासारखाच दृढ व नित्य आणि सारभूत भासतो पण शास्त्रीय पौरु-षानें अशास्त्रीय प्रवृत्तीला प्रतिबध करण्याचा दीर्घ प्रयत्न केल्यास जीवत्वाप्रमाणेच ससाराचे स्थिरत्वही हळू हळू शिथिल होत जातें व शास्त्रीय पौरुषाच्या योगानेंच शेवटी मोक्षलक्षण परम पुरुषार्थ प्राप्त होतो

वस्तुस्थिति अशी असल्यामुळे वसिष्ठानी मुमुक्षुव्यवहार नावाच्या दुसऱ्या प्रकरणात शास्त्रीय पौरुषाची प्रशसा केल्यावर दैवाला भिऊन काही अदूरदर्शी लोकानी त्याचाच आश्रय करून पौरुषाचा अव्हेर करू नये, म्हणून दैवाचें सयुक्तिकपणें खडन केले आहे पहिल्या प्रकरणात रामानें आपल्या अवस्थेचे व विरक्तीचे जसे वर्णन केले आहे तशी स्तुत्य अवस्था व विरक्ति ज्याला प्राप्त झाली असेल तोच या शास्त्राचा खरा अधिकारी आहे, असे निश्चित झाल्यावर भगवान् वसिष्ठानी रामाचे मिष करून तसल्या अधिकारी मनुष्यमात्रानें स्वाभाविक प्रवृत्तीला शास्त्रीय पौरुषाने प्रतिबध करावा, असे सुचविले आहे. पौरुषाला प्राधान्य व दैवाला गौणत्व दिल्यावर त्या महात्म्यानें कर्माचा विचार केला भूलोकी ज्ञानाचा अवतार कसा झाला, त्याचा इतिहास सांगि-तला वक्ता व पृच्छक कसा असावा, त्याच्यामध्यें कोणकोणते मुख्य गुण असावेत, त्याना कोणत्या लक्षणावरून ओळखावें, इत्यादि सांगितल्यावर वसिष्ठानी तत्त्वाचें माहात्म्य, शम, विचार, सतोष व सदाचार याचे वर्णन केले आहे

साराश याप्रमाणे या ग्रथाच्या पहिल्या दोन प्रकरणात वेदान्त शास्त्रात प्रवृत्त होणाऱ्या अधिकारी पुरुषाच्या अथवा स्त्रीच्या ठिकाणी कोणकोणते मुख्य गुण असणे अवश्य आहे, ते सागितलें आहे तिसऱ्या प्रकरणाचे 'उत्पत्ति प्रकरण' असे (नाव) असून त्या प्रकरणापासूनच पुढें खऱ्या तत्त्वोपदेशास आरभ होतो जीवाला 'मी सुखी, दुःखी, जीव, कर्ता, भोक्ता, जन्म व नाश पावणारा, अल्पज्ञ, इत्यादि आहे' असें वाटणें, हाच बध असून त्याचा जसा व जितका साक्षात् अनुभव येतो तसा व तितकाच

त्याच्या अभावाचा ( म्हणजे मी सुखी–दुःखी नाही, मी अल्पज्ञ जीव नव्हे, मी देहरूप नसल्यामुळें कर्ता व भोक्ता नव्हे, असा ) अनुभव येणें, हाच मोक्ष आहे. स्वरूपाचें भान नसणे, स्वात्म्याला विसरणें, हा बधाचा हेतु आहे. स्वरूपाचे विस्मरण झाल्याने दृश्य दिसू लागतें चित्ताचा उदय झाला असता दृश्य जग अनुभवास येणारच अथवा चित्ताचा अस्त हाच जगाचा अस्त व चित्ताचा विकास हाच जगाचा विकास आहे. अर्थात् जगाची उत्पत्ति म्हणजे चित्ताची उत्पत्ति होय. चित्ताचा निरोध करणें यापेक्षा जगाच्या लयाचा दुसरा उपाय नाही. चित्तवृत्तीचा निरोध हाच योग आहे व त्या ( योगा ) च्या योगानें बाधित होणाऱ्या जगाच्या उत्पत्तीला वास्तविक सत्त्व नाही अर्थात् जगाच्या उत्पत्तीचें वर्णन रज्जूच्या ठिकाणी होणाऱ्या सर्पाच्या उत्पत्तीच्या वर्णनासारखेंच मिथ्या आहे. कारण उत्पन्न होणारी वस्तुच जर मिथ्या तर तिची उत्पत्ति तरी सत्य कशी असणार ? प्रत्यक्ष दिसणारेंही हे जग मिथ्या आहे त्याला पारमार्थिक सत्यता नाही. ज्या वस्तूचा त्रिकाली नाश होत नाही, ज्याचा कधी बाध होत नाही, ज्याची उत्पत्ति कोणी पाहिलेली अथवा कोणत्याही प्रमाणाने सिद्ध झालेली नाही तीच वस्तु पारमार्थिक सत्य असून बाकीच्या क्षणोक्षणी उत्पन्न होऊन नाश पावणाऱ्या सर्व स्थूल व महत्परिमाणवान् वस्तुही असत्य आहेत या दृश्य जगाचा क्षणोक्षणी बाध होत असतो, त्यातील प्रत्येक वस्तूचा प्रतिक्षणी परिणाम होतो, त्यात अनेक पदार्थ प्रतिक्षणी नाश पावून असंख्य नवीन भाव उत्पन्न होत असतात तेव्हा अशा अस्थिर जगाला परमार्थसत्य कसें म्हणता येईल ? परतु ते आहे, यातही काही शका नाही कारण तें जर मुळीच नसते, त्याचा जर शशशृगाप्रमाणे त्रैकालिक अभाव असता तर या सृष्टीत प्रतिक्षणी ज्या हजारों अर्थक्रिया होत आहेत व त्यातील लोक, गाव, नगरें, नद्या, पर्वत, समुद्र, अरण्यें, नक्षत्रे, ग्रह, इत्यादि दीर्घकाल प्रवाहरूपाने नित्यशी दिसत आहेत, ती दिसली नसती. यास्तव या जगाचे अस्तित्व काही विचित्र प्रकारचें आहे, असें म्हणावे लागतें त्याला कोणी, कधी, कसे व केव्हा केलें, तें कोणाला माहीत नाही त्याचें पुढे केव्हां, कोणाकडून व काय होणार आहे ? तेही राम जाणे । मोठमोठे तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ व कलाकुशल ज्ञानी या सृष्टीतील काही पांच–पन्नास वस्तूचे गुणधर्म जाणून त्यातच आपल्याला कृतार्थ समजतात. इतराना तुच्छ लेखितात व आपल्या नावामागें ज्ञत्वद्योतक उपपदे लावितात पण ते आपणही जीवच असल्यामुळें इतरांसारखेच एकाच अज्ञान नौकेत बसलों आहों, हें जाणत नाहीत आम्ही कोण आहों, कोण होतो, कोठून आलों व येथील जीवनयात्रा सपवून कोठें जाणार आहों, याचे ज्ञान आपणाला नाही, आपण या गोष्टीचा नुस्ता विचारही करीत नाही, याबद्दल त्यांना लज्जा वाटणेंच युक्त असूनही ती वाटत नाही, हें केवढें आश्चर्य आहे अथवा हाच तर जगन्नियत्याच्या अद्भुत शक्तीचा आश्चर्यकारक मोहविलास आहे ! ! आम्ही मोठे इतिहासज्ञ आहों, असें मोठ्या अभिमानानें सांगणाऱ्या मानवांना सृष्टीची उत्पत्ति कधी

झाली, तिला कोणी वसविले, हें जोपर्यंत सांगतां येत नाही तोंपर्यंत त्यांचें इतिहास-ज्ञत्व ही शुद्ध विडंबना आहे !!

असो, अशा या आश्चर्यकारक सृष्टीची उत्पत्ति कशी झाली, ते योगवासिष्ठाच्या तिसऱ्या प्रकरणात भगवान् वसिष्ठानी सांगितले आहे जगाला जरी व्यावहारिक सत्यत्व असले तरी त्याची उत्पत्ति व्यावहारिकही नाही कारण व्यवहारात कारणापासून कार्य होते सृष्टिसमयी बीजापासून अकुर होतो त्या अकुराचा वृक्ष बनतो त्याला पानें, फुले व फळे येतात आणि पुन. ती फळेच दुसऱ्या तसल्याच वृक्षाची बीजें बनतात. मातीपासून घट, पगळ इत्यादि कार्ये होतात कापूस, लोंकर इत्यादि द्रव्यापासून वस्त्रादि बनतात यास्तव ती सर्व व्यावहारिक सत्य आहेत पण जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वी बीज, माती, इत्यादि काही सामग्री नसतानाच हे जग झालें आहे. तेव्हा योग्य कारणावाचून होणाऱ्या त्याची व्यावहारिकता कशी सिद्ध होणार? तसाच-सृष्टीच्या पूर्वी कोणी योग्य (देहवान्) कर्ताही नसतो तेव्हा बीज पेरणारा, कुंभार, कोष्टी इत्यादिकासारख्या सचेतन कर्त्यावाचून झालेल्या या सृष्टीला वृक्षादिकाइतपत तरी सत्यत्व कोठचें? तस्मात् जगाची उत्पत्ति हें एक निष्कारण व अयुक्तिक गौड-बंगाल आहे. गारुड्याने हातावर माति घालून, फुंक मारून निर्मिलेल्या रुपयाप्रमाणे हें जग परब्रह्माच्या आधाराने मायासामर्थ्याने उत्पन्न झालें आहे व अशा मायिक उत्पत्तीचेच सविस्तर वर्णन भगवान् ब्रह्मपुत्र वसिष्ठानी केले आहे. वस्तुतः मायिक वस्तूच्या उद्भवाचा इतका विस्तार करण्याचें काही कारण नव्हते. पण सर्व पामरास नित्य वाटणारे हे जग अनित्य आहे, असें सर्वांच्या प्रत्ययास आणून देणे, फारच कठिण असल्यामुळे मडपोपाख्यानासारख्या कल्पित, विस्तृत आणि रमणीय आख्यानाच्या योगाने त्याचे प्रतिपादन करणे, वसिष्ठास भाग पडलें कारण प्राण्याचा स्थूलावरील अभिनिवेश इतका स्वाभाविक व दृढ असतो की त्याचे निरसन करून अस्थूल, अनणु, अन्हस्व, इत्यादि वस्तूकडे त्याचें लक्ष्य लावणे सर्वथा दुष्करसेंच झाले आहे. शिवाय स्थूलाचे निराकरण केल्यावाचून अस्थूलाचे ज्ञान होणें शक्य नाही लक्ष्य दुर्ज्ञेय असल्यास लक्षणाचेच सविस्तर वर्णन करून त्याचा लक्षणावृत्तीने बोध करावा लागतो व तोही अनायासाने दृढ होत नसल्यामुळे वारंवार प्रसंग आणून त्याचेच चर्वितचर्वण अवश्य करावे लागतें. या महाग्रंथात वेदान्तास अत्यंत इष्ट असलेल्या अजातवादाचेच अथपासून इतिपर्यंत प्रतिपादन केलें आहे. हें जग उत्पन्नच झाले नाही तें जर उत्पन्न झाले असतें, त्याची उत्पत्ति होणे जर शक्य असतें, त्याच्या उत्पत्तीचें जर योग्य कारण असते, त्याचा जर कोणी समर्थ कर्ता असता व लौकिक कार्याच्या कर्त्याप्रमाणें त्यानें जर वारंवार अंगचेष्टा करून सामग्रीच्या साह्याने क्रमानें जगाला निर्मिलें असते तर त्याची उत्पत्ति झाली व त्यातील प्रत्येक वस्तूचा प्रतिक्षणी जो वृद्धिक्षयलक्षण परि-

णाम ( विकार ) होत असतो तो जर झाला नसता तर ते स्थिर व नित्य आहे, असे म्हणता आलें असतें पण तसा अनुभव येत नाही तर त्याच्या उलट अनुभव येतो. म्हणून श्रीशंकराचार्यांच्या प्रसिद्ध मीमांसेत ज्याची अनेक युक्तींनी सिद्धि केलेली आहे, तोच विवर्तवाद या प्रकरणात सविस्तर वर्णिला आहे आत्म्याला विसरणे हे संसाराचें बीज व त्याला जाणणें, तोच मी, मी देहादि नव्हे, असें साक्षात् अनुभविणे हा मोक्ष होय जग जर सत्य असतें व प्रत्येक जीवाला स्वभावतःच प्रतीत होणारें जीवत्व जर स्थिर असते तर मोक्षाची आशाही करणें निरर्थक झालें असतें, व त्यामुळे या सृष्टीतील प्रत्येक जीवाच्या अनुभवास येणाऱ्या दुःखाचा अथवा दुःखमिश्रित सुखाचा त्रिकालीही बाध झाला नसता पण सुदैवाने तशी स्थिति नाही तर जगद्दशा वज्राप्रमाणे दृढ असल्यासारखी जरी प्रायः सर्वांना भासली तरी ती वस्तुत स्वप्नातील नगरासारखीच क्षणभंगुर आहे जगातील अनुकूल अथवा प्रतिकूल अवस्था एका क्षणात उलटून तिचा विपरीत भाव कसा होतो याचा अनुभव घेऊन त्याविषयी ज्याने चांगला विचार केलेला असतो तो या असल्या जगाच्या स्थितीला ‘स्थिति’ असें कधीच म्हणणार नाही तर जलावरील तरंगासारखा तो एक मूलतत्त्वाचाच परिवर्त आहे, असेच निश्चयानें म्हणेल, व तीच गोष्ट भगवान् वसिष्ठांनी चवथ्या स्थितिप्रकरणात प्रतिपादिली आहे कोणत्याही वस्तूची प्रथम उत्पत्ति, नंतर स्थिति व त्यानंतर नाश असा क्रम आपणास सर्वत्र दिसतो व त्याला अनुसरूनच भगवान् मुनींनी स्थितिप्रकरणानंतर पाचवे उपशम प्रकरण रचिले आहे पण या तिन्ही प्रकरणाचा उद्देश—एक चित्तत्त्व सत्य असून बाकीचें सर्व अचित्, चिद्विषयभूत, जड, दृश्य, देश–काल–वस्तु–परिच्छिन्न, इत्यादि असल्यामुळेच असत्य, मिथ्या, रज्जुसर्पन्यायाने भ्रामक पण मिथ्याभ्रामक पदार्थाप्रमाणेच अर्थक्रिया करणारे आहे —हे दाखवावयाचा आहे हिरण्यगर्भाच्या संकल्पावाचून या जगाच्या उत्पत्तीचे दुसरे काही कारण नाही कारण ज्याची रचना मनाने नुसत्या मनोरथमात्र करता येणेही शक्य नाही त्या या विचित्र पण नियमबद्ध जगाची उत्पत्ति कोणा सर्व शक्तिमान् ईशाची कल्पना केल्यावाचून आपोआप ( स्वभावत.च ) झाली असेल, असे म्हणवत नाही पण त्या चेतन सर्व शक्तिमानापाशीही सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी तिला कारकव्यापारानें कार्यास उत्पन्न करावयाचें झाल्यास अवश्य लागणारी सामग्री नसते यास्तव त्यानें नुसत्या आपल्या जवळील सर्वशक्तिसंज्ञक मायेच्या योगानेच हें सर्व केले असावे, असें अनुमान केल्यावाचून गत्यंतरच नसते त्याचा संकल्प सत्य असतो. पण त्याला सुद्धा व्यावहारिक सत्यत्वच असतें, पारमार्थिक सत्यत्व नसते. कारण स्वतः हिरण्यगर्भही चित्-विकास असल्यामुळें, तो स्वतःच जर औपाधिक आहे तर त्याचा संकल्प तरी पारमार्थिक कसा असणार? यास्तव व्यावहारिक सत्यसंकल्पाने, सामग्री व योग्यकाल याची अपेक्षा न करितांच उभारलेल्या या जगदाडंबराला पारमार्थिक सत्यत्व नाही. म्हणूनच जगाची उत्पत्ति जशी

मिथ्या तशीच त्याची स्थिति व नाशही मिथ्या. तर मग ती सत्य कशी व कां भासते? म्हणून विचाराल तर त्याचें उत्तरही या ग्रंथात वारंवार दिले आहे. जगाचे भासमान सत्यत्व, हा त्याचा स्वाभाविक धर्म नसून तो त्याच्या अधिष्ठानाचा आहे कारण स्वतः जग जर सत् असतें तर त्याचा बाध कधीही झाला नसता पण त्याचा व त्यातील प्रतीत होणाऱ्या विषयाचा बाध क्षणोक्षणी, प्रत्येक चित्तवृत्तीबरोबर होत असतो तेव्हा अशा क्षणभंगुर वस्तूला सत्य कसें म्हणता येईल? जे स्वभावतःच सत् असते ते त्रिकाली असत् होणे योग्य नाही पण जग तर प्रलयसमयी असत् होतें तेव्हा तें स्वतः सत्ताशून्य असून परसत्तेने सत्तावान् झाले आहे असेंच या योगवासिष्ठात सिद्ध केल्याप्रमाणे समजणे, सर्वथा युक्त होय वस्तुस्थिति अशी असल्याकारणानेच जगातील काही पदार्थ बाधित झाले तरी इतर सर्व विद्यमान असल्यासारखे भासतात योगिजन चित्ताचे ऐकाग्र्य करून आत्मस्वरूपात जेव्हा स्थिर होतात तेव्हा त्याना सर्व जगाचे जरी अभान होत असले तरी स्वात्म्याचे अभान कधीच होत नाही तर तो सर्व बाधाच्या अवधिरूपाने, सत्य, मुक्त, व नित्यबुद्ध स्वरूपानें सूर्याप्रमाणे हृदयाकाशात चमकत असल्याचा त्याना साक्षात् अनुभव येतो या व असल्याच दुसऱ्याही अध्यात्मग्रंथात आत्मज्ञ विद्वानाच्या अनुभवानें ठरलेल्या सिद्धान्ताचेच प्रतिपादन केलेलें असतें यास्तव ते ग्राह्य असतात

पण जग असत्य असून त्याचे अधिष्ठान सत्य आहे, हा परम सिद्धान्त दीर्घ प्रयत्नावाचून कळत नाही अनेक जन्मातील असंख्य परस्पर विरुद्ध यत्नाच्या योगाने बहुतेक सर्व जीव बहिर्दृष्टि होऊन त्या तत्त्वज्ञानापासून फार दूर गेलेले असतात यास्तव त्याना आपल्या मूल स्थानी यावयाचें झाल्यास थोडयाशा विरुद्ध यत्नाचा काहीच उपयोग होत नाही अनेक जन्मातील बाह्य व जड विषयाविषयीच्या असंख्यात वासनाचा गज मनावर चढलेला असतो त्यातील ज्या दृढ वासना जन्मास कारण होतात तदनुसार प्रत्येक जीव उत्पन्न होऊन वासनानुसार जग पाहतो व त्यातील वस्तूशी व्यवहार करतो. पण त्याच्या सर्व अनर्थाला कारण होणाऱ्या वासनाचा क्षय केल्यावाचून पुरुषार्थाचा लाभ होणे अगदी शक्य नाही कर्म, उपासना व ज्ञान (आत्मसाक्षात्कार) याच्या योगानें चित्ताचा मल झडून जाऊं लागून ते उत्तरोत्तर जसें जसे शुद्ध होत जाईल तसा तसा त्यातील बहिर्मुखभाव न्यून होऊन अंतर्मुखत्व वाढू लागतें पण ते चित्तस्थैर्य सुखसाध्य नसते आणि त्याच्यावाचून तर आत्मसाक्षात्कार होत नाही पण तो होणें अवश्य आहे. कारण त्याच्या अभावी दुःखाचा उच्छेद होणे अगदी अशक्य आहे. यास्तव कल्पित जगात केवल आत्म्याच्या अज्ञानानेच अतिशय दुःखी होऊन राहणाऱ्या या जीवाचा उद्धार करण्यासाठीच त्या परमेश्वरानें वेद व शास्त्रे हे उपायबोधक कल्पित भागच नियत केले.

वेद व स्मृत्या प्रथम आचरण कसें ठेवावें ते सागून अधिकारी प्राण्याची बाह्यदृष्टि सकुचित करून अंतर्दृष्टीचा विकास करण्याचा प्रयत्न करितात सकाम कर्मकाड हें अनर्दृष्टीचे मुख्य साधन नसले तरी सर्वथा बहिर्मुख झालेल्या लोकांच्या स्वैर वृत्तीस तें आळा घालते निष्काम कर्म पुरुषाच्या बाह्य प्रवृत्तीला आळा घालून शिवाय तें त्याच्या चित्ताला शुद्ध करते श्रौत-स्मार्त कर्में स्वर्गादि पारलौकिक व पुत्रादि ऐहिक फलाची अपेक्षा न धरतां केवल ईश्वरार्पण बुद्धीने केल्यास पुरुषाच्या चित्तावर काही विलक्षण शुद्ध सस्कार होऊन तें अधिकाधिक शुद्ध व सात्त्विक होत जाते निष्काम कर्माचें हे दृष्ट फल असल्यामुळे त्याविषयी ते कसें होते ? कर्मामध्ये असा काय मोठा गुण आहे, इत्यादि प्रलाप व्यर्थ आहेत निष्काम कर्माच्या योगानें चित्त शात झाले मैत्रि, करुणा, मुदिता, उपेक्षा या भावना आपोआप उत्पन्न झाल्या म्हणजे तो पुरुष उपासना करण्यास योग्य होतो उपासना हा निष्काम कर्मानुष्ठानाहून अगदी विलक्षण उपाय नसल्यामुळें बरेच वेळा तिचा कर्मकाडातच अतर्भाव करितात. पण उपासना चित्ताच्या ऐकाग्र्यास अधिक साह्य करते कारण कर्माप्रमाणे तिच्यामध्ये शारीर व्यापार मुळीच करावयाचा नसून मानस व्यापारच कर्तव्य असतो, व तोही चित्ताला एका ध्येयाकडे वारवार लावणे, एवढाच होय त्यामुळे चित्त शुद्ध किंवा सूक्ष्म होण्यास उपासना फार उपयोगाची आहे ती योगशास्त्रातील धारणा व ध्यान याचे काम करते. निष्काम कर्में पूर्वीच्या यम-नियमादि अगाचे प्रयोजन साधतात उपासनेचा अगदी पूर्ण परिपाक झाला म्हणजे तीच सप्रज्ञातसमाधि होते व तिची पूर्णावस्था हाच आत्म-साक्षात्कार होय. अशारीतीनें योग व कर्म-उपासना-ज्ञान याची एकवाक्यता होते. व तीच भगवान्-वसिष्ठानी योगवासिष्ठाच्या तिसऱ्या, चवथ्या, पाचव्या व सहाव्या प्रकरणात करून दाखविली आहे

वर म्हटल्याप्रमाणें हें वेदान्त प्रकरण असूनही याला योगवासिष्ठ असें नाव पडण्याचें कारण काय, असें पुष्कळान्च्या मनांत येण्याचा सभव आहे पण नुकेच वर म्हटल्या-प्रमाणें योग व वैदिक काडत्रय याची एकवाक्यता कशी होते, तें सूक्ष्म दृष्टीनें पाहिले व त्याविषयी विचार केला म्हणजे शका रहात नाही. साख्य व योग या दोन शास्त्राचा फार निकट सबध आहे. त्यामुळेच वैशेषिक-न्याय, साख्य-योग, व मीमासा-वेदान्त अशी सहा दर्शनांची तीन त्रिकें विद्वान् मानू लागले पण वेदान्तशास्त्राने साख्य व योग याना आपल्यामध्यें इतकें मिळवून सोडलें आहे की श्रीमच्छकराचार्यांच्या आश्चर्यकारक स्वमतस्थापनेनतर त्या दोन शास्त्राची वाढच खुटली कारण पूज्य आचार्यांनी, योग-वासिष्ठांत श्रीवसिष्ठानी सांगितल्याप्रमाणें कांही लोकाना योग असाध्य आहे व कित्ये-काना ज्ञाननिश्चय असाध्य आहे, असें जाणून भगवानांच्या इच्छेप्रमाणें अधिकारपरत्वें साख्य व योग यांची योजना आत्मसाक्षात्काराकडे केली. साख्य म्हणजे आत्मविचार व योग म्हणजे चित्ताच्या वृत्तीचा निरोध. आत्मविचार करूं लागल्यानें जशी वृत्ति

तन्मय होते व अनात्मपदार्थही आत्ममय भासू लागतात त्याप्रमाणेंच चित्तवृत्तीचा निरोध केला असताही सृष्टीचा बाध होऊन शुद्ध आत्म्याचा, निरुपाधिक आत्मतत्त्वाचा, साक्षात्कार होतो सृष्ट पदार्थाकडे पाहत असताना त्यातील निरुपाधिक ब्रह्माकडे ध्यान ठेवणें आणि वृत्तीचा प्रवाह बद करून सृष्ट पदार्थांशी असलेला सबध तोडणे व नतर आंतल्या आत स्वरूपाचे अनुसधान करणे हे दोन्ही उपाय सारख्याच योग्यतेचे व सारखेच फल देणारे आहेत म्हणूनच श्रीगीतेतही ‘ यत्साङ्ख्यैः प्राप्यते स्थान तद्योगैरपि गम्यते ’ असे म्हटले आहे श्रीमद्भगवद्गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी ‘ योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसवादे ’ असे जें म्हटले आहे, तेंही एवढ्याकरिताच होय अर्थात् चित्ताच्या एकाग्रतेच्या उपयोगी असलेला योग व आत्मविवेचनाच्या उपयोगी असलेला विचार ( साख्य ) ह्या दोघाचाही अगीकार वेदान्ताने प्राधान्यत. करून त्याना आपलेंसेच केले आहे त्यातल्या त्यात योगाच्या योगानें होणारा आत्मसाक्षात्कार अधिक स्पष्ट व परम सुखावह असल्यामुळें व तोच ( योगच ) जीवन्मुक्तीला कारण होत असल्याकारणाने, तिसऱ्या व सहाव्या प्रकरणात सागितलेल्या सात योगभूमींतील पाचवा, सहावी व सातवी या शेवटच्या तीन भूमिकास त्याचाच मुख्य आधार असल्या-मुळे आणि या चचल व म्हणूनच दु.सह दु.ख देणाऱ्या चित्ताला स्थिर करण्याविषयी-चाच मुख्यतः उपदेश केलेला असल्यामुळे या ग्रथाला योगवासिष्ठ हे नाव पडलें आहे.

यात लीला, चूडाला इत्यादि स्त्रिया व भृगुपुत्रादि पुरुष याच्यामध्यें योगजन्य सिद्धीही आल्याचे व त्याच्या योगानें त्यानी आकाशगमनादि केल्याचे वर्णन आहे पण त्यामध्यें या वेदान्त ग्रथाचे तात्पर्य नसून तें भावना व धारणा याच्या अनुरोधाने प्राप्त होणारें योगाचें आनुषगिक फल आहे, असें दाखविण्याकरिता केले आहे. कारण रामानें सिद्धीविषयी प्रश्न केला असता वसिष्ठानी त्याचा केवल अनादरच नव्हे तर सर्वथा त्याग करण्याचाच उपदेश केला आहे. आकाशगमनादि हें ज्ञानी पुरुषाचें लक्षण नसून एक आत्ममात्र होऊन राहणें, सर्व अनात्म्याचा मनापासून तिरस्कार करणें, चित्ताला शात करून निरुपम विश्रातिसुख घेणे, सर्व सकल्प व चिंता सोडणें, इत्यादि ज्ञानित्वाची लक्षणे आहेत, व ती जीवन्मुक्ताचे ठायी स्पष्ट प्रत्ययास येतात. जीवन्मुक्ति हें ज्ञानाचें दृष्ट फल आहे. तें स्वर्गाप्रमाणें मरणानतर मिळणारें नसून भोजनोत्तर प्राप्त होणाऱ्या तृप्तीप्रमाणे येथल्या येथें साक्षात् अनुभवास येणारे आहे यास्तव त्याच्याविषयी सश-यित होण्याचे काही प्रयोजन नाही अप्रत्यक्ष अथवा ज्याचा अनुभव येथें शक्यच नसतें त्याविषयी शका आल्यास कोणी फारसा दोषी होत नाही पण ज्याच्यामध्यें प्रत्यक्ष प्रतीत होण्याची योग्यता असते त्याच्याविषयी व्यर्थ साशक होणे व केवल सशयग्रस्त होऊनच परमार्थाला मुकणें, यासारखी आणखी दुसरी हानि ती कोणती? प्रवृत्त व निवृत्त असे दोन्ही प्रकारचे धर्म अभ्युदय व निश्रेयस ही दोन्ही फळें साक्षात् देण्यास समर्थ आहेत. त्याच्या कर्म–योग–सांख्यादि उपायांच्या अनुष्ठानाचीच ती

अपेक्षा करीत असतात पण मायिक ईश्वराच्या अचिंत्यरचनाचतुर मायेच्या योगानें मोहित झालेल्या प्रायः सर्व जीवास त्याच्या अनुष्ठानाची इच्छाच होत नाही व त्यामुळे ते बहुतेक सर्व स्वार्थापासून भ्रष्ट होतात.

तथापि या सृष्टीत काही जीव पुरुषार्थीही निपजतात. कारण ईश्वराची नियति सृष्टीच्या आरंभी तसाही संकल्प करिते पुरुषाचा प्रयत्न सर्वांत अधिक प्रबल आहे. त्यामुळे मिथ्याभिमानी जीवानें निश्चयाने प्रयत्न केल्यास त्याला आत्मस्वरूपाला पुनः जाऊन मिळता येते व त्यामुळे सर्व दु.खाची हानि होते शरीर असे तों दु.खक्षय होणें शक्य नाही शरीरच मी असा अभिमान असेपर्यंत तर तो मुळींच संभवनीय नाही. दु खक्षयाकरिता सर्व जीवाची एकसारखी धडपड चाललेली असते. अविचारी जन बाह्य विषयातीलच सुखलेश मिळवून धन्य होण्याची आशा करितात, व इष्ट विषय मिळाला असता, उत्तरक्षणी पुन मी असाच साकांक्ष व त्यामुळें असाच दु खी होईन, हें मनात न आणता सुखी होतो पण त्याचे ते सुख त्या आनंदसागराचा एक सूक्ष्मसा बिंदु असल्यामुळे अति तुच्छ असतें, असें काही थोडेसे विवेकी मात्र जाणतात अशा महा पुरुषाकरिताच वासिष्ठ रामायण हा ग्रंथ रचिलेला आहे ज्याना विषयप्राप्ति करून घेणे, हाच पुरुषार्थ वाटत असेल, ज्याना पृथ्वीच्या काही विकारानाच लक्ष्मी म्हणावयाचें असेल, ज्याना हा लोकच मात्र भासत असून पूर्वीच्या व पुढच्या लोकाचे भान होत नसेल, चित्ताचा विक्षेप हेच महादुःख असून त्याची शांति ( चित्ताची विश्रांति ) हेंच नित्य सुख आहे, असे वाटत नसेल, त्याच्याकरिता हा महोपदेश नाही भगवान् वसिष्ठ स्वत. दैववादी नसून त्यानी रामाला किंवा दुसऱ्या कोणालाही दैवावर हवाला ठेवून खुशाल रहा, आत्म्याच्या उद्धाराचा भगीरथ प्रयत्न करू नकोस, असें कोठेही सांगितलेलें नाही तर उलट ' प्रयत्न ही कामधेनु आहे, पौरुष यत्नानें मिळत नाही, असे काही नाही पौरुष हा पाहिजे ते फळ देणारा कल्पवृक्ष आहे, अशा दिव्य उपायाचा अव्हेर करून जे मूढ दैवावर भार टाकून स्वस्थ बसतात त्यांना धिक्कार असो,' इत्यादि प्रतिपादन करून सर्वथा पुरुषार्थाचेंच समर्थन केलें आहे. योगवासिष्ठाप्रमाणेंच इतर वेदान्त ग्रंथातही पुरुषप्रयत्नानेच आत्म्याचा जीवकोटीतून उद्धार करावयास सांगितलेलें असते पण हे वेदान्तरहस्य न जाणता, त्याविषयी कोणा तज्ज्ञाला न विचारता व स्वत' काही माहीत नसता ' मुखमस्तीति वक्तव्य ' या न्यायानेच ' लेखनीस्तीति लेख्य ' या सिद्धान्ताचा जे आधुनिक सुशिक्षित अंगीकार करितात व वेदान्त दैववादी आहे, असे व्याख्याने व लेख यातून प्रतिपादितात त्याच्याविषयी श्रीविद्यारण्यस्वामीच्या शब्दानीच बोलावयाचें झाल्यास ' तेषां प्रज्ञातिविशदा, किं तेषां दुःशकं वद । तं कथं बोधयेच्छास्त्रं लोष्ठं नरसमाकृतिम् ' असें म्हणून त्याची उपेक्षा करणेच योग्य होय.

आहे कोठें ? ' नर करनी करे तो नरका नारायण होत, ' या म्हणीप्रमाणे ' मी साक्षात् ब्रह्म आहें ' असें म्हणून त्याप्रमाणे अनुभव घेण्यासाठी अहर्निश शास्त्रीय प्रयत्न करणारा व मध्येच निर्विण्ण ( खिन्न ) न झाल्यास जीवन्मुक्तीचे अनुपम सुख याच लोकी याच शरीरात असताना घेणारा महाप्रयासी वेदान्ती कोठें व अधाप्रमाणे सर्व भार ईश्वरावर टाकून त्यानें आपल्याला मुक्त करावें, म्हणून त्याच्या नावानें कठरवानें आक्रोश करणारा, वर्णाश्रम धर्माचा उच्छेद करणारा, युक्तिवादांना वाघाप्रमाणे भिणारा व संकुचित बुद्धि धरूनही स्वतःला वैष्णव म्हणणारा व ' असेल माझा हरि तर देईल खाटल्यावरी ' असें म्हणून ईश्वरपरतंत्र, पुरुषार्थशून्य होणारा केवल भक्त कोठें ? खरे वेदान्ती पुरुषार्थास सोडून एक क्षणभरही राहण्याची इच्छा करीत नाहीत योगवासिष्ठातही मोठ्या त्वेषाने दैवाचें खंडन करून पौरुषार्थाचेंच मंडन केलें आहे यातील सर्व आख्यानें व सर्व उपदेश पौरुषमय आहेत.

आता ' ऐहिक सुखाची साधनें संपादन करून देणारा जो यत्न तोच पुरुष प्रयत्न होय व तसा प्रयत्न करण्याविषयी वेदान्तात सांगितलेलें नसनें, म्हणून तें शास्त्र व्यवहाराच्या उपयोगी नाही ' असें कोणी म्हणेल तर तें खरें आहे पण ऐहिक सुखसाधनाकरिताच प्रयत्न केला पाहिजे, पारलौकिक सुखसाधनाचें संपादन करण्याकरिता प्रयत्न करिता कामा नये, असा निर्णय तरी कोणी व कशाकरिता करावयाचा ? ऐहिक सुखसाधनें पौरुषानें जरी संपादन केली तरी ती त्रिकाली टिकतीलच, असा काही भरवसा आहे का ? नाही पुरुषाच्या जीविताचा काही विश्वास आहे का ? नाही जगातील इतरांचें ( दुसऱ्या जीवाचें ) सुख वाढण्याकरिता यत्न करावा, म्हणून म्हणाल, तर आम्ही त्याच्या सुखाची जी साधनें स्वप्रयत्नानें वाढविणार ती तरी कायमची आहेत, अशी हमी कोणी देऊ शकेल काय ? नाही कारण ईश्वरानें ही विचित्र सृष्टीच अशी रचली आहे की तिच्यातील एकही भाव स्थिर रहात नाही शिवाय बाह्य सुखाची साधनें विपुल झाली म्हणजे त्याबरोबर जीवाचें सुख वाढतेंच असा तरी अबाधित नियम कोठें आहे ? यास्तव जगाच्या अस्थिरतेचा पूर्ण विचार करून नंतरच वेदान्त शास्त्र व योगवासिष्ठासारखी प्रकरणें बाह्य वस्तूचा अनादर करून, ऐहिक भावना तृणतुल्य तुच्छ मानून, आंतर व पारमार्थिक वस्तूकडे पुरुषाची वृत्ति कळविण्यास सज्ज झाली आहेत यातील कोणत्याही आख्यानाचें अथवा उपदेशाचें रहस्य, सूक्ष्म विचारदृष्टीनें पाहू गेल्यास, हेच आढळेल असो आता तिसऱ्या प्रकरणापासून पुढील प्रत्येक आख्यानाचा संक्षिप्त मथितार्थ सांगून हें परिशिष्ट संपवितों.—

१–आकाशज ब्राह्मणाच्या आख्यायिकेनें अविद्या–काम व कर्म हें संसाराचें बीज असून त्याच्या अभावी मृत्यु कोणालाही मारू शकत नाही, हें सुचविलें आहे. स्थूल आकाराचाच नाश होतो. चित्तरूप सूक्ष्माचा नाश होत नाही. अविद्यादिकामुळें जीवांना

जीवत्व व स्थूलत्व येत असतें यास्तव विचारानें व आत्मभावनेनें त्यांचा नाश केला असता अमृतावस्था प्राप्त होणें सयुक्तिकच आहे प्रत्येक कार्य सकारण आहे, व कारणाहून कार्य अत्यंत पृथक् नाही, असें मानणारें वेदान्तशास्त्र कारणाचा निरोध करून त्याच्या योगानेच कार्यरूप संसाराचा उच्छेद करण्याविषयी बोध करीत आहे, ते त्याला उचितच होय.

२–सर्व सृष्टि मनोमय आहे, अनेक प्राण्यांच्या असंख्य वासनांनी ती नित्यशी होऊन राहिली आहे. एका संकल्पासून दुसरा, दुसऱ्यापापासून तिसरा, इत्यादि परंपरा सुरू झाल्यामुळें व त्याच्या योगानें उत्पन्न झालेल्या वासना आत्मज्ञानाच्या अभावी अनेक विलक्षण जन्मांचे निमित्त होत असल्यामुळे हे सर्व संसारचक्र अविच्छिन्न गतीने सतत चाललें आहे यांतील सर्व इष्टानिष्ट दशा हा वासनांचाच विकास असून वासना क्षयावाचून संसारचक्राची गति कुंठित होण्यास दुसरा उपायच नाही ज्ञप्ति देवी सर्वांच्या हृदयात वास करीत असते व ती लीलेप्रमाणेच दुसऱ्या सर्व उपासकांवरही अनुग्रह करते हे दृश्य जग आहे, असा जो प्रत्येक जीवाला भ्रम होत असतो त्याचे निरसन करून त्यानें जगाच्या सत्यतेची भावना सोडावी, व नित्य सिद्ध आत्मरूप व्हावें, हा लीलोपाख्यानाचा मुख्य उद्देश आहे

३–५–कर्कटी, ऐंदव व इंद्र-अहल्या, या तीनही आख्यानांचा मुख्य उद्देश मनःसंकल्पाचे बल किती विचित्र आहे, दृढ अत्यासक्ति इतर सर्व विरुद्ध प्रयत्नांना कशी दाद लागू देत नाही, हें सांगण्याचाच आहे.

६–इंद्रजालाच्या उपाख्यानानें हे सर्व जग स्वप्नमय असून ते तसें असलें तरी दुःख–सुखादि भोग कसें देऊं शकते, त्याचें वर्णन केलें आहे. अहंममाभिमानाचा व वासनांचा त्याग करूनच चित्ताला जिंकावें लागते. त्यावाचून तें स्वाधीन व स्थिर होत नाही योगाच्या सात भूमिकांचा उत्तरोत्तर अभ्यास केल्यानें चित्ताचा नाश होऊन पांचव्या भूमिकेपासून जीवन्मुक्त दशेचा अनुभव येऊं लागतो

७–जगाची उत्पत्ति जशी मन.संकल्पमय तशीच स्थितिही इंद्रियसहित मनोमय आहे पण तें मनही मूळ एक व अद्वितीय तत्त्वाचाच अविद्याशक्तिजन्य विकार आहे. विकार केव्हाही उपादानाहून पृथक् नसतो, असा न्याय व अनुभवही आहे म्हणून तो स्व-रूपतः मिथ्या व आपल्या कारणरूपानें सत्य असतो मनोमय जगाचे उपादान मन आहे मनाचें विवर्तोपादान चित् आहे. यास्तव चिद्ब्रह्मच सत्य असून मन, जग इत्यादि सर्व स्वरूपतः मिथ्या व कारणरूपानें सत्य आहे तें वस्तुतः सत्य आहे, असें युक्तींनी सिद्ध करिता येत नाही. कारण त्याचें अस्तित्व अन्या-(मिथ्या मना)च्या अधीन आहे यास्तव चित्तविरोधानें मनाचा उच्छेद केला म्हणजे चा उच्छेद आपोआप होतो. जगामध्यें अशा प्रकारची पराधीन स्थिरता अस-

तांनाही त्याच्या सत्यत्वाविषयी आग्रह धरणारे पुरुष धन्य होत असो, स्थितिप्रकरणातील भार्गवोपाख्यानात मनःसकल्पानें अनेक जन्म व अनेक विचित्र अनुभव कसे सभवतात, ते दाखविलें आहे जगाची स्थिति ही मनाची क्रीडा आहे जगासारखे विचित्र विकार होत असतांनाही अधिष्ठानाचें स्वरूप थोडेसेही बदलत नाही तर ते जसेच्या तसेंच निर्विकार असते त्यामुळेंच जग हा ब्रह्माचा मिथ्या परिणाम आहे, असें म्हणणें भाग पडतें. शुद्ध चित्ताला आत्मसाक्षात्कार सहज होतो इत्यादि सत्य सिद्धात भार्गवोपाख्यानात सागितले आहेत

८. दाम, कट व व्याल या तीन राक्षसाना देहवासना जोंवर नव्हती तोवर ते देवाना अजिक्य होते, पण देहवासना उत्पन्न होताच ते मृत्यूला भिऊ लागले व त्याबरोबर देवानी त्याचा उच्छेद केला अर्थात् 'देहच मी' असे जाणणें हें सर्व अनर्थाचे मूळ आहे, असे या आख्यानांत सविस्तर व सोदाहरण वर्णिले आहे

९ दाशूराच्या आख्यानावरून शुद्ध सकल्पानें केलेले कर्म, तप अथवा उपासना विचित्र शुभ फल देतें, असे ध्यानात येते ससाररचना मायामय आहे, हे कळण्याकरिता खोत्याचे आख्यान वर्णिले आहे मनाचा सकल्पस्वभाव जर नष्ट झाला तर जग काही रहाणार नाही सर्व शुभाशुभ वासनाचा त्याग करणें हाच मनाचा सकल्पस्वभाव सोडण्याचा उपाय आहे कल्पना सोडल्याने वासनाचा मूलोच्छेद होतो

१० कचाच्या गाथेतही जगाचे सकल्पात्मकत्व वर्णिले आहे विवेक-वैराग्यादिकाच्या योगानें सात्त्विक जीव भवचक्रातून सुटू शकतात.

११. उपशम प्रकरणात 'विचार करून सत्य वस्तूच्या परायण होणे,' हा या काल्पनिक जगाच्या उपशमाचा उपाय सागितला आहे शास्त्रावलोकन, तीव्र वैराग्य, सज्जनसग व अभिमानराहित्य याच्या योगाने शुद्धचित्त होऊन विचार करणारा आत्मसाक्षात्कार अगदी सुलभ होतो

१२. ज्याचे पूर्व सस्कार प्रशसनीय असतात त्याला नुसतें विचार विषयाचे दिग्दर्शनही पुरेसें होतें, हे जनकाच्या आख्यायिकेने स्पष्ट केले आहे जनकाची मनोभूमि चागलीच तयार असल्यामुळें वसत समयी उपवनांत विहार करावयास गेलेल्या त्याच्या कानावर सिद्धाची गाथा पडतांच त्याच्या अतःकरणात विवेक जागा झाला व विचाराच्या योगाने त्या महात्म्याने मागील गोष्टीचें स्मरण न करितां व पुढच्या स्थितीविषयी संकल्प व चितन न करिता वर्तमान समयी प्राप्त होईल त्या इष्टानिष्ट दर्शेतच समचित्ताने ( म्हणजे हर्ष-विषाद सोडून ) राहण्याचा निश्चय केला. त्यामुळें त्याला जीवन्मुक्तीचे सुख लाधलें. त्याच्याप्रमाणें दुसराही जो कोणी निश्चय करून तदनुसार आचरण करील त्याचेंही असेंच कोटकल्याण होईल. वेदान्ताचा व्यवहाराला काही उपयोग नाही, असें कित्येक म्हणतात. पण त्यांना वेदा-

न्ताच्या शुद्ध व परंपराप्राप्त विचाराचा मनावर दृढसंस्कार झालेला असल्यास संसार-स्थिति अतिशय सुखावह होते, हे माहीत नसते

१३–पुण्य व पावन यांच्या आख्यानात अनेक जन्मांतील आप्तजनांचें असत्यत्व, मृत्यूचा स्वभावतः अभाव व त्यामुळेच शोकाचा अनवसर सांगून तृष्णारूपी पाशास क्षाण केले असता मोक्ष मिळतो, असे प्रतिपादिले आहे.

१४–बलीच्या आख्यायिकेत मनःसंज्ञक दुष्टमंत्र्याच्या दुर्विलासामुळें आत्म-राजाचे दर्शन दुर्लभ झाले आहे, असें प्रतिपादन करून त्या दुर्मंत्र्याला वैराग्यादिकांच्या योगाने जिंकून आत्मराजदर्शन घेण्याविषयी सांगितले आहे

१५–अति शुद्ध विचार, दृढनिश्चय व शुभ उपायाचा सतत अभ्यास त्यांच्या योगा-नेंच ईश्वराचाही अनुग्रह होतो, हे प्रल्हादाच्या आख्यानाचे रहस्य आहे

१६–दृश्याचें मायामयत्व, संकल्परूपत्व व मिथ्या दुःखरूपत्व• गाधीच्या आख्यानात वर्णिले आहे.

१७–चित्ताचें नित्य व निरतिशय समाधान, हीच उत्कृष्टसमाधि आहे, हे सुरघूच्या उत्तम आचारावरून व सहज स्थितीवरून कळतें सत्य आत्म्याचा विचार, अंतर्मुखवृत्ति, चित्–चें नित्य अनुसंधान, शुद्ध चित्त, भोगवैराग्य, इत्यादि हे सर्व आत्म्याच्या उद्धा-राचे उपाय आहेत

१८ सर्व बंध आसक्तिजन्य आहे यास्तव तिचा सर्वथा त्याग करून मनाला चिन्मात्र केलें असता व्यावहारिक दुःख होत नाही, हे विलास व भास यांच्या आ-ख्यानात सांगितलें आहे

१९ इंद्रिये व मन यास कोणत्या प्रकारचा बोध करून आत्मनिष्ठ करता येतं, तें वीतहव्याच्या आख्यानात वर्णिले आहे जीवन्मुक्ताची स्थिति, दोन प्रकारचा चित्त-नाश, वासनाक्षय व विवेक–वैराग्य यांच्या योगाने निरतिशय आनंदाचा प्रादुर्भाव कसा होतो तेंही या आख्यानात चांगल्या रीतीनें सुचविले आहे.

निर्वाण म्हणजे ब्राह्मी स्थिति ती उपशमाचीच उत्तर अवस्था आहे. सर्व जग चिन्मात्र आहे त्यामध्यें द्वैतभाव मन व इंद्रिये यांच्या योगानें नुस्ता भासत असतो. पण तो खरा नव्हे. म्हणूनच सर्व द्वैत चिन्मात्र आहे. त्यांत अचित्–पदार्थ वस्तुतः नाहीत. ते आहेत, असें भासणे, हा शुद्ध भ्रम आहे वस्तुस्थिति नव्हे यास्तव सर्व शांत आहे. विक्षेपाचा अभाव आहे संकल्पत्याग व त्यामुळेच होणारा मनोनाश यांच्या योगानें जगाचा उपशम झाला असता, तें ब्रह्ममात्र आहे अशी भावना दृढ झाली असता, चिंतनाला निमित्तच न राहिल्यामुळे अंतःकरण ब्रह्ममय व परिपूर्ण होऊन राहतें. तेंच निर्वाण होय. ही जीवन्मुक्तीची पराकाष्ठा आहे, आत्मज्ञ

या अवस्थेचा अनुभव घेतात. अशा आत्मज्ञातील भुशुंड काक, चूडाला इत्यादि असून सहाव्या निर्वाण प्रकरणांत तसल्या महात्म्याचेच वर्णन केलें आहे.

२० प्राण व मन यांच्या स्थैर्याचा अभ्यास केल्यास आणि अनात्मदृष्टि सोडून आत्मदृष्टि कायम केल्यास भुशुंडाप्रमाणे प्रत्येक साधकाला दीर्घायुष्य प्राप्त होतें. मृत्यु त्याला काही करू शकत नाही. भुशुंडाप्रमाणेच प्रत्येक साधकानें प्रथम ज्ञान व नतर योग यांचे सपादन करावें

२१ सर्व अनर्थ हा जीवाच्या वासनाचाच परिणाम आहे, हें अधिक स्पष्ट करण्या-करिता जीवटाख्यान सागितले आहे

२२. वेताळ व राजा यांच्या सवादांत जगाच्या मिथ्यात्वाचे रमणीय वणन केलें आहे.

२३. ऐहिक ऐश्वर्याला तुच्छ मानून त्यान्यापासून दूर होण्याचा प्रयत्न जसा जसा करावा तसे तसें ते मार्गे लागून अनायासाने प्राप्त होतें. पण त्याविषयी उत्सुक होऊन त्याला मिळविण्याकरिता आतुर झालें की त्यानें दु.ख दिलेच म्हणून समजा वास्तव प्रत्येकाने आत्मविचार व ऐश्वर्याविषयी विरक्ति यांच्या योगाने भगीरथाप्रमाणें नित्य सुखी व्हावें.

२४ चित्तात आत्म्याविषयी सदा सावधान असताना बाहेर शरीराच्या द्वारा यदृच्छेनें विविध चेष्टा जरी होत असल्या तरी पुरुष बद्ध होत नाही. कारण बध, अनात्म्यावर अभिनिवेश ठेवल्यामुळेच उद्भवत असतो. नित्य आत्मा व अनित्य अनात्मा याना पूर्णपणे ओळखल्यावर देहादिकान्या चेष्टा नुस्त्या आत्मसत्तेनेच होऊ शकतात, हें चूडाला व शिखिध्वज यांच्या आख्यायिकेचे तात्पर्य आहे

निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धात आणखीही अनेक युक्तींनी जीवाचे व जगाचें भ्राम-कत्व सिद्ध करून अनेक उपायान्च्या योगाने चित्ताला स्थिर करण्याचा व आत्मानु-भव घेण्याचा उपदेश केल्यावर भगवान् वसिष्ठानी उत्तरार्धात आरंभी पुष्कळ सोपपत्तिक प्रतिपादन केले आहे त्याचे चागले मनन केल्यास व तदनुसार आचरण ठेवल्यास जीवाचें अत्यत हित झाल्यावाचून कधीही राहणार नाही

२५ शुद्ध चित्तात थोडासा उपदेशही अत्यत दृढ होतो, पण अशुद्ध चित्तांत पुष्कळ उपदेशाचाही काही उपयोग होत नाही याविषयी विद्याधराची भुशुंडानें सागितलेली कथा वसिष्ठानी रामाला सागितली व तिच्या द्वारा इंद्रियादिकापासून होणारे अनर्थ, अनहभावाची प्रशसा, आत्मज्ञानाचे महाफल इत्यादिकांचेंही सविस्तर वर्णन केले आहे

२६ विरक्तीच्या बलानें सर्व ससारवासना सोडून तत्त्वज्ञानानें प्रकृतीपासून दूर कसें हाता येते ते वसिष्ठानी मकीला मेरूवर केलेल्या उपदेशाने चांगलें कळतें. मकीने केलेलें

दुःखांचे वर्णन ऐकून प्रसन्न झालेल्या वसिष्ठांनी त्याला संसाराची चार बीजें व त्याच्या विनाशास कारण होणारी आत्मविद्या सांगितली. भावनाच अनर्थाचे मूळ आहे.

२७ सर्व चित्च आहे. चित्चा विलास आहे. सर्व मनःकल्पित आहे. सर्व अज्ञात ब्रह्ममय आहे, हें पाषाणाख्यायिकेच्या योगानें चांगलें व्यक्त केलें आहे. कूटस्थ ब्रह्माला अनिर्वाच्य जगद्भाव कसा आला, ते या आख्यायिकेंत व त्यापूर्वीही चांगलें व्यक्त केलें आहे. सर्व ध्यानाचें फळ आहे. जसें ध्यान करावें तसें सुख किंवा दुःख उलट घ्यावें शुभ ध्यान केल्यास सुख होतें व अशुभ चिंतनानें अर्थात्च दुःख होतें तात्पर्य पुरुषाचें हित किंवा अहित त्याच्या स्वाधीन आहे

२८ अविद्या जेव्हां तत्त्वज्ञानानें नष्ट होईल तेव्हांच जगाचा बाध होतो, त्यावांचून नाहीं, व अविद्येमध्येही देशकृत व कालकृत मर्यादा नाहीं, असें अविद्याख्यानानें व्यक्त केलें आहे विपश्चित् राजांनीं दीर्घकाल, निरंतर व अत्यासक्तीनें जगाचा अंत लावण्याचा भगीरथ प्रयत्न केला पण त्यांतील एकालाही अंत लागला नाहीं यास्तव आतांच्या साधकांनीही बाह्य सृष्टींतील वस्तूंचा अंत लावण्याच्या तीव्र इच्छेनें कालक्षेप न करितां चित्तनिरोध करून, अंतर्मुख होऊन व आत्मसाक्षात्कार संपादन करून कृतार्थ व्हावें, असा उपदेश या आख्यानापासून मिळतो

२९ सर्व भ्रांतिमात्र, संकल्परूप व म्हणूनच मिथ्या आहे, हें कुंददंताच्या कथेनें व्यक्त केलें आहे. त्या रम्य व विस्तृत कथेचा मनावर चांगलाच ठसा उमटतो

३० चैतन्याच्या अतिसूक्ष्म भागीं ब्रह्मांडें स्वप्नाप्रमाणें भासतात, याविषयीं ब्रह्मदेवानें चिदाख्यान सांगितलें

३१ कीरक शूद्राच्या कथेनें वसिष्ठांनीं जगांतील विविध स्वभावाच्या लोकांचें चांगलें वर्णन केलें आहे शास्त्र व गुरु यांचा उपयोग काय, ते यांत सांगितलें आहे

असो, या महाग्रंथांतील विस्तृत आख्यानांचा असा संक्षिप्त तात्पर्यार्थ आहे पण त्या सर्व आख्यानांत आणि त्यांच्या संबंधीं उपदेशांतही जागजागीं सर्वोत्तम तत्त्वज्ञान भरलेलें आहे जग वस्तुतः झालेंच नाहीं, तें चिन्मात्र आहे सर्व चिद्विलास आहे, जीवाचा संभवच नाहीं, परलोक, इहलोक इत्यादि व्यावहारिक सत्य असल्या तरी पारमार्थिक असत्य कल्पना आहेत, इत्यादि वेदान्ताचे अनेक सिद्धान्त या अलौकिक ग्रंथांत युक्तिपूर्वक आख्यायिकांच्या द्वारा सुलभ करून सांगितले आहेत. स्वतः तो ग्रंथच वाचकांच्या पुढें आहे व ते आमच्या या म्हणण्याचा अनुभव घेण्यास समर्थही आहेत. यास्तव या महाग्रंथाचें मूळ नाहींतर नाहीं, पण हें रूपांतर तरी वारंवार वाचून साधकांनीं विचार करावा व स्वतः कृतार्थ होऊन इतरांनाही कृतार्थ करावें. म्हणजे सर्व जग शीतल आहे, संसार अमृतमय आहे, इत्यादि शास्त्रोक्त गोष्टींचा अनुभव येईल.

---

# परिशिष्ट २.

## पारिभाषिक कठिण शब्दांचा अर्थ.

### अ

**अकृत-अभ्यागम**—न केलेल्या कर्माच्या फलाचा उपभोग घ्यावयास लागणे ( पूर्व-जन्म न मानल्यास ह्या जन्माची व त्यातील सुख-दु खादि भोगाची कारणोपपत्ति लागत नाही हा न्यायशास्त्राच्या दृष्टीने दोष आहे )

**अखंड**—त्रिविध परिच्छेदशून्य, सर्वव्यापी.

**अचित्तत्व**—जड तत्त्व

**अचेत्य-चिद्रूपमयी**—निर्विषय चैतन्यात्मक

**अज**—जन्मरहित

**अज्ञानावरण**—अज्ञानाचे आच्छादन

**अतःकरण**—अतरिंद्रिय, ( मन, बुद्धि, चित्त व अहकार हे त्याचे चार भेद आहेत. )

**अतर्दृष्टि**—सूक्ष्म-मानसिक-विचारजन्य दृष्टि

**अद्वैत**—द्वैतरहित, अह-ममभावशून्य

**अधिष्ठान**—आरोपिताचा आधार जशी-रज्जु, शिप.

**अध्यस्त**—ज्याचा अध्यास केला आहे, तो रज्जुसर्पादि पदार्थ

**अध्यारोपापवादन्याय**—निरुपाधिक वस्तूच्या ठिकाणी कल्पित व औपाधिक भावाचा आरोप करणे हा अध्यारोप व तिच्या अधिष्ठानाचे ज्ञान करून देऊन आरोपित वस्तु अधिष्ठानमात्र आहे, असें प्रतिपादन करणें, हा अपवाद आहे प्रपच-शून्य वस्तूचे प्रतिपादन या न्यायानेच करिता येते

**अध्यास**—एका वस्तूच्या ठिकाणी पूर्वी पाहिलेल्या दुसऱ्या वस्तूच्या स्मरणासारखा होणारा भास जसा-दोरीच्या ठिकाणी सर्पाचा, चकचकीत पदार्थांचे ठिकाणी रुप्याचा

**अनन्य**—एकरूप, अव्यभिचारिणी

**अनावृष्टि**—पाऊस न पडणें

**अनिर्वाच्य**—ज्याचे वर्णन करिता येत नाही अवर्ण्य

**अनुग्रह**—प्रसाद, कृपा.

**अनुवृत्ति**—व्याप्ति. सर्व वस्तूत अनुगत असणें

**अपचीकृत**—ज्याचे पचीकरण न्यायाने मिश्रण केलेलें नाही, सूक्ष्म भूतें, तन्मात्रें.

**अपरिच्छिन्न**—अमर्यादित
**अभिमत**—मान्य, इष्ट, आवडता
**अभ्युपगम**—स्वीकार मान्य सिद्धान्त
**अविद्या**—आत्मज्ञानाने नाश पावणारें एकप्रकारचें ज्ञान
**अव्याकृत**—अव्यक्त, प्रकृति, जगाची बीजावस्था कोणत्याही कार्याची उत्पत्तीच्या पूर्वीची स्थिति.
**अव्याकृताकाश**—अव्यक्त नावाच्या शून्याशीं तादात्म्य पावलेला ईश्वर.
**अश्लील**—ग्राम्य, विचकट
**असत्**—त्रिकालीं नसणारी वस्तु जसें मनुष्याचें शिंग.

## आ

**आकाश**—हा शब्द या ग्रथांत शून्य, निराकार या अर्थी ब्रह्म, चित, चैतन्य इत्यादि शब्दांच्या पुढें योजलेला आहे
**आजन्म**—जन्मापासून
**आतिवाहिक**—सूक्ष्म मरणोत्तर देवदूताकडून वाहिलें जाणारें शरीर
**आदि-मध्यावसान**—उत्पत्ति-स्थिति-नाश
**आधिभौतिक**—भूताच्या विकारासंबंधी, तसेंच आधिदैविक म्हणजे देवसंबंधी वें आध्यात्मिक म्हणजे शरीरसंबंधी
**आपातवर्तमान**—चित्ताचा विकास
**आपातवर्तमान**—सामान्यत असणारें
**आब्रह्मस्तंभपर्यंत**—ब्रह्मदेवापासून जड काष्ठ-तृणापर्यंत किंवा ब्रह्मदेवासारख्या सर्व शक्तिमानापासून स्तंभ नावाच्या एका अति क्षुद्र जंतूपर्यंत
**आरोग्य**—अरोगिता
**आरोपित**—ज्याचा आरोप केला आहे जसा रज्जुसर्प, शुक्तिरजत
**आविद्यक**—अविद्यामय, अविद्या परिणामरूप
**आसक्ति**—अति प्रेम अतिशय आवड

## इ

**इंद्रिय**—कर्म अथवा ज्ञान यांचें साधन

## उ

**उद्भूत**—आविर्भूत, प्रकट, जागृत, फलोन्मुख
**उपचार**—उपाय
**उपदेशार्ह**—उपदेशास योग्य

**उपलंभ**—उपलब्धि, अनुभव, प्राप्ति.
**उपसर्ग**—पीडा, प्रतिबंध, अडचण
**उपाधि**—वस्तूच्या मूलस्वरूपात बदल पाडून तिला आपल्याप्रमाणे करणारा भाव. उत्कृष्टास निकृष्टता आणणारा भाव.
**उपाध्यंश**—उपाधीचा अंश.
**उपास्य**—जिची उपासना करावयाची ती देवता वगैरे

### ए

**एषणाशून्य**—पुत्र, लोक, वित्त, याविषयींच्या इच्छांनी विरहित.

### औ

**औपचारिक**—गौण
**औपाधिक**—उपाधीसंबधानें.

### क

**कचन**—स्फुरण, विकास.
**कल्प**—देवाची सहस्रयुगें, ब्रह्मदेवाचा एक दिवस
**काकतालीय न्यायानें**—अकस्मात्, निष्कारण.
**कारणकार्यता**—कारण व कार्य याचा भाव, दोन पदार्थांतील एकानें कारण व दुसऱ्यानें कार्य असणे
**काल्पनिक**—कल्पनेनें बनलेलें
**कीट**—किडा.
**कृतकृत्य**—ज्याचें सर्व कृत्य ( कर्तव्य ) करून झालें आहे, धन्य
**कृतप्रणाश**—केलेल्या पुण्यापुण्यादि कर्मांचा इष्ट-अनिष्ट फल दिल्यावाचूनच नाश होणें ( पुढचा जन्म न मानल्यास या जन्मांतील केलेलीं अदृष्टफलक पुण्यें व पापें सुख व दुःख हे फल दिल्यावाचूनच नष्ट होतात. हाही अकृताभ्यागमा-प्रमाणेंच दोष आहे )
**क्षणभंगुर**—क्षणात भंग-नाश-पावणारें क्षणविनाशि

### घ

**घन**—पट विरलता सोडून कठिण, साकार होणें.

### च

**चरमवृत्तिज्ञान**—अंत्यवृत्तिज्ञान. चरमसाक्षात्कार, की ज्याच्या नंतर कृतकृत्य झालेली चित्तवृत्ति पुनः उठत नाही

(३१) ६३-१८।६।१२

**चिदाभास**—चैतन्याचा आभास. चैतन्याचे उपाधीत पडलेले प्रतिबिंब, छाया.
**चिदुन्मेष**—चित्‌चा विकास
**चिरकांक्षित**—फार वेळापासून इच्छिलेले.
**चिन्मात्र**—केवल चिद्रूप.
**चिन्मात्रस्वभाव**—केवल चैतन्य हाच ज्याचा स्वभाव आहे
**चिद्रूप**—चैतन्यरूप
**चिद्विषयोन्मुख**—चेत्या ( चिद्विषया ) कडे उन्मुख ( प्रवृत्त, उत्कंठित ) होणे.
**चित्सत्ता**—चैतन्याची सत्ता.
**चेत्य**—चित्‌-चा विषय
**चैतन्याकाश**—चिदाकाश, निराकार चैतन्य, ब्रह्माकाश

## ज

**जगत्कोटी**—जगत्पक्ष कोटी हा शब्द पक्ष या अर्थी सर्वसामान्य नामापुढे लागतो.
**जरा**—वृद्धावस्था.
**जलतरंगन्याय**—जलावर जसे तरंग उठतात पण ते जलरूपच असतात त्याप्रमाणे.
**जलाशय**—तळी, विहिरी, नद्या, इत्यादि जलाधार, ज्यात पाणी असते ते प्रदेश
**ज्ञप्ति**—ज्ञानशक्ति, चेतना
**ज्ञातव्य**—जाणण्यास योग्य.

## त

**तादात्म्य**—तद्रूपता जसे जल व दूध यांचे मिश्रण केलें असता तादात्म्य होते
**त्रसरेणु**—त्र्यणुक घरातील कवडशात तरंगत असल्याप्रमाणे दिसणारे बारीक कण सहा परमाणूंचा मिळून एक त्रसरेणु झालेला असतो

## द

**दुरितें**—पापे
**दुर्नय**—दुष्ट व्यवहार.
**दुर्भिक्ष**—दुष्काळ
**दृक्शक्ति**—दर्शनशक्ति, ती द्रष्ट्याचे स्वरूप आहे. ती चेतनरूप आहे. ती दृश्य कधी होत नाही
**दृप्त**—दर्पयुक्त
**दृश्य**—दर्शनविषय, ज्ञानाचा विषय, कोणत्याही इंद्रियाचा, मनाचा व शेवटी साक्षीचाही विषय

भाग पृथक् ठेवून दुसऱ्या भागाचे प्रत्येकी चार भाग केल्यावर त्यातील प्रत्येक पहिल्या अर्धात मिळविल्याने पंचीकरण होते ( पंचदशी प्र० १ श्लो० २७ पहा.

**प्रतिभा**—कल्पना.

**प्रत्यक्-आत्मा**—अंतर्यामी आत्मा, साक्षी.

**प्रातिभासिक**—भासणारा, वस्तुभूत नव्हे, सत्य नव्हे

**प्राक्तन**—पूर्व, प्राचीन, पूर्वीचा.

**प्रमातृ चैतन्य**—अंतःकरणाने मर्यादित झालेलें चैतन्य, जीवचैतन्य

## ब

**बाध**—प्रमाणानें निरूपण करू लागतांच प्रातिभासिक वस्तूचें भान नाहीसें होणें, अधिष्ठानाचें ज्ञान झाले असतां आरोपित वस्तूचा प्रत्यय न येणे, जसें—ही दोरी आहे असे कळताच भासलेल्या सर्पाचें अभान, अप्रतीति होते

**बाह्यदृष्टि**—विषयोन्मुख वृत्ति.

**बाह्याभ्यंतर**—आत बाहेर

**बीजांकुरन्याय**—बीजापासून जसा वृक्षाचा अंकुर उद्भवतो त्याप्रमाणें

**ब्रह्मांड**—चवदा लोकांचा समूह.

## भ

**भक्ष्याभक्ष्यविचार**—अमुक भक्षण करण्यास योग्य आहे व अमुक नाही, असा विचार.

**भावाभावात्मक**—सदसद्रूप, व्यवहारसमयीं विद्यमान व इतर स्थानीं अविद्यमान.

**भाव्य**—शुभ लक्षणसंपन्न.

**भासुर**—भासणारा. प्रकाशमान होणारा, विशाल, भयंकर

**भास्य**—प्रकाश्य, विषय होणारा.

**भूत-भौतिक**—आकाशादि पांच भूतें व त्यांचा हा सर्व स्थूल व सूक्ष्म विकार.

**भूताकाश**—आकाश नांवाचें पांचवें महाभूत

**भ्रांतिसंवेदन**—भ्रांतिज्ञान

## म

**मरुभूमि**—रूक्ष माळ जमीन.

**महत्संगति**—महात्म्याची संगति.

**महावाक्य**—ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्याचें प्रतिपादन करणारें जें वाक्य तें महावाक्य. जसें तें ब्रह्म तूंच आहेस, हा आत्मा ब्रह्म आहे, प्रज्ञान ब्रह्म आहे. इत्यादि.

**मायापटल**—मायेचे आवरण

**मायावी**--मायावान्, ईश्वर

**मिथ्या**—जे पारमार्थिक सत्य नव्हे, काही काळ भासणारें.

## य

**याचना**--मागणें, प्रार्थना करणें

## र

**रात्रिंचर**—राक्षस

## ल

**लिंगदेह**—सूक्ष्म शरीर, ( पंच ज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें, पांच प्राण व अंतःकरण इतक्यांचें मिळून सूक्ष्म शरीर बनतें )

## व

**वासना**—पूर्व दृढ संस्कार. या जन्मांतील व्यक्त स्वभावाचें बीज

**विकास**—विलास, आविर्भाव

**विराट्**--स्थूल सृष्टीचा अभिमानी ( हिरण्यगर्भाची उत्तरावस्था )

**विवर्त**--अतात्त्विक अन्यथाभाव, खोटा भास, मिथ्या परिणाम

**विविध**—नानाप्रकारचे

**विक्षिप्त**--चंचल.

**वृत्ति**--अंतःकरणाचा इंद्रियांच्या द्वारा विषयापर्यंत झालेला परिणाम

**वेदना**--ज्ञान, प्रतीति, अनुभव.

**वैचित्र्य**--विचित्रता.

**व्यष्टि**--वनांतील प्रत्येक वृक्षाप्रमाणें कोणत्याही संघातील एकेक व्यक्तीस व्यष्टि म्हणतात. अर्थात् व्यष्टि म्हणजे व्यक्ति

**व्यवहारव्यवस्थापक**—व्यवहाराची व्यवस्था करणारी

**व्यावहारिक**—व्यवहाराच्या उपयोगी, पारमार्थिक नव्हे

**व्युत्थान**—समाधि सोडून देहभानावर आल्यानंतरची अवस्था

## श

**शव**--प्रेत.

**श्रवण**--सर्व उपनिषदांचें ब्रह्मात्मैक्यामध्येंच तात्पर्य आहे, असा बोध गुरुमुखानें करून घेणें.

**श्रोत्रिय**--वेदाध्यायी.
**श्वापद**--पशु.

## स

**सत्**--त्रिकाली विद्यमान असणारी वस्तु
**समष्टि**--वनाप्रमाणे व्यष्टींचा समूह
**समाधि**--चित्ताची स्थिरता वृत्तिरहित स्थिति
**संवित्**--चित्, ज्ञान
**संवित्ति**--ज्ञान.
**साधनचतुष्टय**—नित्यानित्य वस्तुविवेक, वैराग्य, शमादिसाधनसंपत्ति व मुमुक्षुत्व.
**संवित्तत्त्व**—ज्ञानतत्त्व
**संवेदन**—वृत्तिज्ञान, प्रतीति
**सहकारिकारण**— कार्याच्या निष्पत्तीला अवश्य असलेले व साहाय्य करणारें कारण.
**सह्य**—सहन करिता येण्याजोगे
**सांसारिक**--संसारसंबंधी
**सूचिका**--सुई
**सोपाधिक**--उपाधियुक्त
**सर्ग**--सृष्टि, जग, संसार
**सर्वगत**—सर्वव्यापी, सर्वत्र असणारं
**स्पंद**—चलन.
**स्पंदरीती**—तरंग, चंचलतेचे प्रकार
**स्वगत भेदसहिष्णु**—आपल्या स्वरूपगत भेदास सहन करणारा.
**स्वतत्त्व**—आत्मरूप सत्य वस्तु
**स्वयंप्रकाश**—इंद्रियादि साधनांवाचून स्वतःच प्रकाशमान होणारं ब्रह्मतत्त्व

## ह

**हिरण्यगर्भ**—ईश्वराची उत्तरावस्था सूक्ष्म समष्टीचा ' हाच मी ' असा अभिमानी.
**हिंस्र**— हिंसा करणारे, मारणारे व्याघ्रादि प्राणी

- - - - - - -